लीं असतात तीं भ०;२,गृहाचे समीप कुंपणाचे आंत शाकभाजी किं० फुलझाडें करायाकरितां जी जागा राखिली असती तें, कोणेकाचें परडें जड होणें,चढणें, इ० स्थलीं विद्याद्रव्यादि मूलक योग्यताचढणें,किं०अभिमानचढणें असा अर्थ जाणावा, परडें बसणें किं० उतरणें इ०स्थलीं योग्यता,किं०अभिमानउतरणें असाअर्थ एकेतागडीचीं परडीं आहेत एथे हे लबाडी इ० दुर्गुणाविषयीं समानयोग्यतेचे दोघेजण असाअर्थ होतो.

**परत**, अ० जिकडून आलें तद्विपरीत गतीनें पुनः तिकडे होई असें येणें, जाणें, देणें, करणें, टाकणें, इ०क्रियांचें वि०, परतगोष्टसांगणें इ० स्थलीं उलटून गोष्टसांगणें असा अर्थ.

**परतअहेर**, पु० आपल्यास कोणी अहेर केला असतां त्यास आपण जो अहेर करितों तो.

**परतकूळ**, न० जाघरीं आपलेघरची मुलगी दिली ती जीवंत असतां त्या घरची मुलगी आपलेघरीं करण्याचा जो प्रकार तें.

**परतणी**, स्त्री० भूम्यादिकांचाठायीं एक्या अंगावर स्थित जो पदार्थ त्याचा दुसरे अंगावर परतण्याचा जो व्यापार ती.

**परतणें**, परतकरणें होणें, देणें येणें, जाणें, इ० २; भूम्यादिकांचाठायीं एक्या अंगावर स्थित जो पदार्थ तो दुसरे अंगावर करणें,किं० इकडचा तिकडे तिकडचा इकडे असा करणें, उ० भाकरी सुटली म्ह० परतावी, जोडा डावेपायांचा उजवेपायांत उजवेपायांचा डावेपायांत असा नित्य परतीत असावें म्ह० साररखा झिजतो, ३,सिद्धतेस आलेली गोष्ट इ० विपरीत भावपावे असें करणें उ० अर्थ लिहिला होता परंतु दोष आला म्हणून परतला;४, मनुष्यादिकानें धृतनिश्चयातें सोडून विपरीत भावातें पावणें;५, संवत्सर,दशा इ०पूर्वस्थित संपून दुसरें नवून होणें,दुपार,मध्यरात्र, इ० परतणें म्ह० अतिक्रांत होणें, मनुष्य स्वभावादिकानें पूर्वस्थितितें सोडून स्थित्यंतरातें पावणें.

**परतंत्र**, १लिं० सं० दुसऱ्याचे जो स्वाधीन तो,२, सं० स्त्रिया भर्तृ परतंत्र इ० स्थलीं समासीं भर्त्रधीन असा अर्थ होतो.

**परतभाडें**, न० भाडेकरी भाडें पोंहोंचवून मागें स्वस्थानीं जाण्याचे प्रसंगीं जें तिकडचेंच भाडें पतकरितो तें.

**परतवण**, न० द्विरागमन.

**परतवेल**, स्त्री० परतकूळ.

**परतवेळ**, स्त्री० दुपार परतल्यावरची जी वेळ ती.

**परता**, अ० पलीकडे;२,भाषणांत औदासिन्यादि गम्य असतां केवलवाक्यालंकारार्थ याचा प्रयोग होतो.उ० मलाजावेना मी परता एथेंच राहतो.

**परतीर**, न० नद्यादिकांचें पलिकडलें जें तीर तें.

**परंतु**, अ० पूर्ववाक्यार्थ अंगिकारून त्यास दोषप्रतिपादनादिरूप विरुद्धवाक्याचा उपन्यास कर्तव्य असतां मध्यें याचा प्रयोग होतो.

**परतून**, अ॰ पुनरपि; परतून गोष्ट इ॰ सांगणें ह्म॰ उलटून गोष्ट सांगणें असा अर्थ आणावा.

**परत्वें**, अ॰ अनुरोधेंकरून याचा प्रयोग समासीं होतो; उ॰ कालपरत्वें, वयःपरत्वें.

**परदेश**, पु॰ सं॰ स्वदेशाहून भिन्न कांहीं दूर जो देश तो; २, प्रवास.

**परदेशी**, ३ लिं॰ स्वदेश सोडून परदेशांत आला जो मनुष्यादि त्यास तेथें ह्म॰; २, पु॰ हिंदुस्थानी, रजपूत, इ॰ लोकांस दाक्षिणात्य ह्म॰.

**परदार**, न॰ सं॰ परवनिता किं॰ सामान्यवनिता यांशीं जो संग तें.

**परदारी**, ३ लिं॰ सं॰ व्यभिचारी पुरुष तो.

**परधन**, न॰ सं॰ कन्यारूप संतानास ह्म॰; २, पराचें जें धन तें.

**परंपरा**, स्त्री॰ सं॰ एकापुढें एक किं॰ एकामागें एक अशा क्रमानें अनेक संबद्ध पदार्थांची जी माला ती, वंशपरंपरा, वडिलपरंपरा, शिष्यपरंपरा, इ॰ शब्द आणावे.

**परंपरागत**, ३ लिं॰ सं॰ वंशादिपरंपरेनें चालत आली जी वृत्ति, आचार, इ॰ तो.

**परंपराविटाळ**, पु॰ परंपरास्पर्शजन्य जो विटाळ तो.

**परंपरासंबंध**, पु॰ सं॰ आपले संबंध्याशीं कोणे काचा संबंध आहे ह्मणून त्याचा आपला जो संबंध तो.

**परंपरास्पर्श**, पु॰ सं॰ परंपरासंबंधानें जो स्पर्श तो.

**परपुरुष**, पु॰ सं॰ स्त्रियांस आपले पतीवांचून जो इतर पुरुष तो.

**परवाण**, न॰ जा काठीस शीड संबद्ध असतें अशी जी उभी काठीवर चढवायाची काठी तें.

**परभारां, रा, रें, रे**, अ॰ गमनावसरीं आमच्यावर्तिस्थलावरून आण्याची संभावना असते त्या स्थलास चुकवून, आणें, येणें, या क्रियांचें वि॰; उ॰ घरीं आण्याची तरा होती ह्मणून तुमचे घरीं न येतां परभारें मीं गेलों; २, कोणे एक व्यवहार जा आस्थलीं संबंध पावून होत असावा अशी योग्यता असतां त्या त्या स्थलीं संबद्ध न होतां; उ॰ मला न सांगतां त्यांस तूं परभारें निरोप देउं नको, तुमचे शत्रूचें परभारेंच पारिपत्य झालें; ३, आपले परोक्ष; उ॰ आपले परभारें आपल्यास कोणी शिव्या दिल्या तर त्याचा राग मानूं नये.

**परभुडा**, पु॰ निंदेनें परभूस ह्म॰

**परभू**, पु॰ कायस्थ आणि पाठारे या दोन जातीचा जो मनुष्य त्यास ह्म॰ व त्या दोन जाती त्या प्र॰

**परम**, ३ लिं॰ उत्कृष्ट, केवल प्राकृत व्यवहारीं हें क्रियाविशेषण, किं॰ विधिविशेषण प्रायः दिसत नाहीं.

**परममर्यादा**, स्त्री॰ कांहीं एक व्यवहार, शक्ति, इ॰ कांची केवल शेवटची जी मर्यादा ती.

**परमहंस**, पु॰ सं॰ सन्याशांत एक भेद आहे.

**परमा**, पु॰ एक धातुरोग आहे.

**परमाणु**, पु॰ सं॰ पृथ्वी, जल, तेज, वायु, यांचा केवल सूक्ष्म जो अंश आहून पुढें सूक्ष्मतेची कल्पना राहात नाहीं तो.

**परमात्मा**, पु॰ सं॰ सर्वव्यापी, सर्वसाक्षी, सच्चिद्स्वरूप एक जो आत्मा तो.

**परमायु**, न॰ सं॰ योनिपरत्वें करून परममर्यादा जा आयुष्याचा आहे तावत्पर्यंत जें आयुष्य तें.

**परमार्थ**, पु॰ सं॰ ईश्वरसाधनरूप जो पुरुषार्थ तो; २, कांहीं एक गोष्टींतील केवल खरा जो अंश असतो

तो तद्रूप जो अर्थ तो; उ॰ कवी वर्णनप्रसंगीं मुखापेक्षां चंद्रास केवल तुच्छ करितात परंतु परमार्थ पाहतां मुखतें मुख आणि चंद्रतो चंद्रच.

**परमार्थबुद्धि**, स्त्री॰ सं॰ कपटादिरहितभावार्थरूप जी बुद्धि ती.

**परमार्थी**, ३ लिं॰ सं॰ ईश्वरसाधनरूप परमार्थाकडे जानें प्रपंचापेक्षां विशेष लक्ष्य तो; २. भावार्थी.

**परमावधि**, पु॰ स्त्री॰ सं॰ परममर्यादा.

**परमें**, न॰ परमा.

**परमेश्वर**, पु॰ सं॰ जगदीश्वर.

**परलोक**, पु॰ सं॰ पुण्य,पाप, तारतम्यानें मेल्यानंतर प्राप्त होणारे जे स्वर्ग,नरक, इ॰ तो.

**परवचा**, पु॰ साळेंतली मुलें सायंकालीं धुळाक्षरगचा पाठ ह्मणतात तो; २, ग॰ ला॰ संसारकृत्यादि संबंधी झालेल्या गोष्टी ऐकणारास कंटाळा येई तों कोणीं पुष्कळपणीं सांगूं लागला असतां त्या गोष्टीस ह्म॰.

**परवंट**, पु॰ मुली नेसलेवस्त्राचाच कांहीं पदर उरवून तो त्या नेसणावरून कंबरेभोंवता गुंडाळितात असा नेसण्याचा प्रकार तो.

**परवंटी**, स्त्री॰ परवंटानें नेसायाचे दशोंत जी मुलगी ती.

**परवड**, स्त्री॰ था॰ पन्याकार द्वितीयार्थी; २, परवचा; ३, दे॰ दुर्दशा; उ॰ मीं घरीं नव्हतो ह्मणून मासे संसाराची परवड झाली; ४, कों॰ थर; उ॰ शंभर परवडीनी ही भिंत तयार होईल.

**परवडणें**, पुरवणें प्रथमार्थी.

**परवणें** रा॰ कन्हणें.

**परवता**, पु॰ परवचा.

**परवर**, न॰ एक भाजीचें फल आहे; २, स्त्री॰ त्याची वेल.

**परवश**, ३ लिं॰ सं॰ परतंत्र.

**परवा**, स्त्री॰ कोणे कपदार्थादिकाचाविषयीं आसजपलें पाहिजे एतद्गुरोधानें वर्तलें पाहिजे इ॰ रूप जो उत्कृष्टाग्रह असतो ती; उ॰ हे जेव्हां भांगेचे कैफांत गुंग होतात तेव्हां राजाचीही परवा बाळगीत नाहीं; प्रायः निषेधविषयीं प्र॰; २, कोणे गोष्टीविषयींही गोष्ट कशी निभावेल इ॰ रूपजी चिंता वाटत्ये ती; उ॰ हें काम तुमचें मला पावलें तुह्मी परवा बाळगू नका.

**परवां**, अ॰ वर्तमान दिवसापासून एकदिवसानें व्यवहित पूर्वदिवशीं किं॰ उत्तरदिवशीं; २, स्त्री॰ न॰ तो दिवस; उ॰ तूं परवां देईन परवां देईन ह्मणतोस पण अशीं शंभर परवां गेलीं; हें पोर परवांचें आणि फार बोलतें इ॰ स्थलीं अल्पकालाचें उपलक्षण होतें.

**परवाजा**, पु॰ कों॰ परवचा.

**परवाणगी**, **परवानगी**, स्त्री॰ राजादिकांपासून कोणेक कार्य करण्याविषयीं मागून घेतलीजी आज्ञा ती.

**परवानगीबरदार**, पु॰ कोणेकास परवानगी घेउन देण्याचे कामावर श्रीमंत लोकानीं कोणीं सेवक ठेविला असतो तो.

**परवार**, अ॰ आणें, याचा योगीं प्र॰ व्यालेली गोम हिष्यादिक फळायाचे पडणास नफळतां राहणें.

**परवारी**, पु॰ महार.

**परव्हा**, पु॰ मूल केवळ लाहान असतांच त्याची माता

पुनः गरोदर राहिली असतां तिचें दुग्ध प्राशिल्यामु ळें मुलास रूखवशी लागल्ये तो.

**परव्हां**, अ० स्त्री० परवां.

**परश**, पु० परशु.

**परशु**, पु० सं० शस्त्र आहे.

**परशुराम**, पु० सं० विष्णूचे दशावतारांतील साहावा अवतार तो.

**परशुरामक्षेत्र**, न० सं० दक्षिणेस गोकर्ण, उत्तरेस विमलनिर्मल, पूर्वेस सह्याद्रि, पश्चिमेस समुद्र, एतन्मध्यवर्ती जो देश तें.

**परस**, न० परडें द्वितीयार्थी; परसांतील भाजी ह्म० जास आत्मसात् करायास विशेष प्रयत्न नलागे असा जो शत्रु इ० त्यास ह्म०.

**परसदार**, न० मागील दार.

**परसा**, पुं० शीतनिवारण किं० भिजलेलें वस्त्रादि शेकणें इ० घर्थ जो चुलीवांचून इतरत्र भूमीवर अग्निपेटवितात तो.

**परसाकड, परसाकडे, परसाकडेस**, अ० मलविसर्गार्थ जाणें, बसणें, इ० क्रियांचें विशेषण; २, स्त्री० न० मलाची बाहेर पडायासाठीं अपान द्वाराकडे गति होउं लागल्ये तें.

**परसूं**, न० परस.

**परस्त्री**, स्त्री० सं० आपले स्त्रियेवांचून इतर दुसर्याची जी स्त्री; जिशीं संग केला असतां व्यभिचार दोष घडतो ती.

**परस्पर**, ३ लिं० सं० यानें त्याजवर उपकारादि करावे त्याणें याजवर करावे अशा प्रकारानें उपकारकरण कलह, युद्ध, इ० क्रियांच्या ठायीं प्रवृत्त जे उभयतां ते; उ० परस्परांनीं परस्परांचे तोंडांत मारिलीं, हे परस्पर सरवे आहेत ह्म० याच्या तो सरवा त्याचा हा सरवा; २, तादृश रीतीनें केलेला जो कलह, स्नेह, इ० तो; उ० यांचें परस्पर वैर आहे: ३, अ० परभारें; ४, याणीं एकमेकास परस्पर चावलें इ० स्थलीं क्रियाविशेषण ही होतें.

**परस्परां, परस्परें**, अ० परस्पर तृतीय चतुर्थार्थी.

**परस्वाधीन**, ३ लिं० सं० परतंत्र; ह्म० परस्वाधीन जिणें आणि पुस्तकीं विद्या उपयोगी नाहीं.

**परळ**, पु० मृत्तिकेचें पात्र आहे, जाजवर तव्याचे अभावीं भाकरी भाजतां येतात इ० सुपयोगी पडतो तो: २, एक झाड आहे.

**परळी**, स्त्री० लाहान जो परळ ती.

**परा**, स्त्री० सं० केवल सूक्ष्म सकल शब्दांचें बीजभूत असें जें योगगम्य शब्दस्वरूप आहे ती.

**पराई**, स्त्री० तारुण्य आणि वार्धक्य अशा दोन जा वयोवस्था त्या प्र०; उ० चढती पराई जाउन उतरती पराई लागली.

**पराकाष्ठा**, स्त्री० सं० कांहीं एक गोष्टीचें अतिशयितपण्याची शेवटची जी दशा, जी पुढें अतिशय होण्याची मर्यादा राहिली नाहीं ती; यंदां पराकाष्ठा स्वस्ताई जाली इ० स्थलीं स्वस्ताईची पराकाष्ठा जाली किं० पराकाष्ठेची स्वस्ताई जाली असें तात्पर्य.

**पराक्रम**, पु० सं० लोकानीं वाहवा ह्मणाया जोगें जें प्रबल शत्रूचा पराजय विपुल धन संपादन इ० असाधारण कर्म त्याचा निर्वाह व्हावया जोगा पुरुषादि चेतनाचेतन सर्व पदार्थाचे अंगीं जो सामर्थ्यविशेष

असतो तो; २, त्याची अभिव्यक्ति त्या रिपुपराजया दिकर्मे करून होत्ये ह्मणून त्या कर्मास ही ह्म॰.

पराक्रमी, ३ लिं॰ सं॰ पराक्रम आहे ज्याचे अंगीं तो.

पराग, पु॰ सं॰ पुष्पांत जें बारीक चूर्ण असतें तो.

परागंदा, ३ लिं॰ आपलेंजें गांव, घर, वतन, शेत, इ॰ तें कांहीं कारणामुळें सोडून तेथील वस्ती मोडून ग्रामांतरास किं॰ देशांतरास गेलाजो तो; होणें, असणें, इ॰ धा॰ योगीं प्र॰; उ॰ आम्ही दाहा वर्षे परागंदा होतों ह्मणून वतनाचा भोगवटा आह्माकडे नवता.

पराङ्मुख, ३ लिं॰ सं॰ तोंड मागें फिरविलें आहे ज्याणें तो; २, ला॰ कोणेक विषयाची किं॰ कार्याची वासना सोडली तो त्यापासून.

पराजय, पु॰ वाद, युद्ध, इ॰ कामध्यें दुसर्याचा उत्कर्ष होउन आपल्याकडे अपकर्ष येतो तो.

पराजित, ३ लिं॰ सं॰ ज्याचा पराजय जाला तो.

परात, स्त्री॰ ताटाचा आकारानें धातूचें पात्र आहे.

पराधीन, ३ लिं॰ सं॰ परस्वाधीन.

परान्न, न॰ सं॰ अन्यस्वामिक जें अन्न तें; ला॰ अन्यस्वामिक अन्नाचें भोजन तें; उ॰ आज परान्न आलें त्यामुळें पथ्याचा विचार राहिला नाहीं.

पराभव, पु॰ सं॰ पराजय.

पराभवणें, पराजित करणें.

पराभूत, ३ लिं॰ सं॰ पराजित.

परामर्श, पु॰ सं॰ आपले स्वकीयजन किं॰ गोरगरीब इ॰ कांस कोणास काय पाहिजे कोणास काय विपत्ति आहे तें जाणून घेउन स्वसामर्थ्यानुसार पाहिजे तें देणें किं॰ विपत्ति दूर करणें इ॰ आचरणाचा जो प्रकार तो, करणें, घेणें, इ॰ धा॰ योगीं प्र॰; २, सर्वनामादि सामान्य पदानें वाक्यपद्धत्यनुरूप विवक्षितार्थाचें ग्रहण होतें तो; उ॰ जो पढतो तो सन्मान पावतो, एथेंजो या शब्दानें उपात्तजो पढणारा मनुष्य त्याचाच तो या शब्दानें परामर्श होतो; ३, अनुमितीस कारणीभूत जें ज्ञान तो; पोळ्या इ॰ कांचा परामर्श घेणें ह्म॰ खाउन निःशेष करणें; चोरादिकांचा परामर्श घेणें ह्म॰ चांगली शिक्षा करणें.

परामृष्ट, ३ लिं॰ सं॰ परामर्श केला आहे ज्याचा तो.

परायण, ३ लिं॰ सं॰ परवृत्ती यार्थी, याचाही समासीं प्र॰; उ॰ या मनोवृत्ति नारायणपरायण झाल्या.

परार्ध, न॰ सं॰ ब्रह्मदेवाचे आयुष्याचे जे दोन विभाग ते प्रत्येकीं संख्या १००००००००००००००००.

परावर्तन, न॰ सं॰ कांहीं एक गोष्टीचाठायीं जो प्रवृत्त त्यानें विमुख होउन मागें फिरण्याचा जो व्यापार तें.

परावा, ३ लिं॰ परका.

परि, अ॰ हा संस्कृत उपसर्ग आहे, शब्दाचे मागें लागला असतां त्या त्या धात्वर्थाचें सर्वांशीं सर्वथा च हूंकडे इ॰ प्रकारें भवन अशा अर्थाचें द्योतन करितो, विशेष प्रसिद्ध शब्द आहेत ते लिहितों.

परिखा, स्त्री॰ सं॰ चर.

परिगणन, न॰ सं॰ कोणेक समुदायांतून विवक्षित कार्यार्थ कांहीं पदार्थ हा एक हा एक अशा प्रकारें मेजून घेण्याचा जो व्यापार तें.

परिगणित, ३ लिं॰ सं॰ परिगणन करून घेतलेला तो.

परिगृहीत, ३ लिं॰ सं॰ अंगीकृत; उ॰ हा गोष्ट शिष्ट

परिगृहीत आहे.

**परिघ**, पु॰सं॰ कांहींएकस्थलांत मनुष्यादि प्रतिबंधार्थ भोंवतालें भिंत किं॰ कुंपण इ॰ करितात तो; २, एक आयुध आहे; ३, सत्तावीस योगांतील एकुणिसावा योग तो.

**परिचय**, पुं॰सं॰ मनुष्यादिकांची परस्परें सहवासादिकामुळें पुरतेपणीं जी ओळख किं॰ कोणेक विषयाचे अथवा गोष्टीचे सेवनाद्यभ्यासामुळें यामध्यें याथा प्रकारचे गुण आहेत किं॰ हें याथा प्रकारें करावें लागतें इ॰ रूप ज्ञान संस्कार होतो तो; २, दे॰ प्रत्यय.

**परिचरण**, न॰सं॰ सेवा.

**परिचर्या**, स्त्री॰ सं॰ परिचरण.

**परिचायक**, ३लिं॰सं॰ कोणेक अर्थाचें अन्यथात्व भ्रांनिपरिहारक जें कांहीं चिह्न असतें तो.

**परिचित**, ३लिं॰सं॰ ज्याचा परिचय ज्यास झाला आहे तो त्याचा.

**परिछिन्न**, ३लिं॰ कोणेक परिमाणानें किं॰ संख्येनें परिछेद झाला आहे ज्याचा तो; २, अ॰ आंत अन्यथा भावाचा यत्किंचित् हि प्रवेश नठेवितां सांगणें इ॰ क्रियांचें वि॰; उ॰ तुला परिछिन्न बोलून को ह्मणून सांगीतलें असतां पुनः बोलतोस.

**परिछेद**, पु॰ कोणेक परिमाणादिकें करून कांहीं पदार्थाचें जें इयत्ताकरण तो; २, ग्रंथादिकांचे कांहीं प्रकरणादि संगतीनें भिन्नभिन्न केलेले जे विभाग ते प्र॰.

**परिछेदक**, ३सं॰ परिछेदकर्ता जो पुरुषादिक किं॰ परिछेदसाधन जें परिमाण विशेषादि तो.

**परिजन**, पु॰सं॰ सेवक.

**परिणत**, ३लिं॰सं॰ परिणाम पावला तो; २, नम्र.

**परिणय**, पुं॰सं॰ विवाह.

**परिणयन**, न॰सं॰ विवाहमार्गानें जें स्त्रीचें ग्रहण तें.

**परिणाम**, पु॰सं॰ कोणेक पदार्थाचें किं॰ गोष्टीचें पूर्वरूप जाउन रूपांतररूप जी अवस्था होत्ये तो; उ॰ उदकाचा धूमरूप परिणाम होउन त्याचा पुनः पर्जन्यरूप परिणाम होतो; पापकर्माचा परिणाम नरक होतो, एथें कारणच फलादिरूपता पावतें असा सिद्धांत विवक्षित आहे.

**परिणामशूल**, पु॰सं॰ एकपोटस्कळांत भेद आहे, ज्याची अन्नपचन होउन पोट रिकामें होउं लागलें ह्म॰ वेदना होउं लागत्ये तो.

**परिणीत**, ३लिं॰ विवाहित.

**परितः**, अ॰सं॰ सभोंवार चहूंकडे.

**परितुष्ट**, ३लिं॰सं॰ संतुष्ट.

**परितोष**, पु॰सं॰ संतोष.

**परित्यक्त**, ३लिं॰सं॰ सर्वथा जो त्यक्त तो.

**परित्याग**, पु॰सं॰ कोणेक गोष्टीचा किं॰ मनुष्याचा सर्वथा जो त्याग तो.

**परिधान**, न॰सं॰ नेसणें किं॰ पांघुरणें एतद्रूपें करून जें वस्त्राचें धारण तें.

**परिधि**, पु॰सं॰ कांहींएक वस्तूचा जो सभोंवता घेर तो; २, कांहींएक वस्तूभोंवता जो कशा एकाचा वेढा तो.

**परिनाळिका**, स्त्री॰ कोणेक कर्मामध्यें यापुढें हें करावें त्यापुढें अमुक करावें इ॰ रूप जो क्रम ती; २, ला॰ ऐकणारास कंटाळा यावयाजोगी लांबचलांब

ञी गोष्ट निश्चा ल्ह०; २, शालुंकेच्या वरचें पाणी आया-
स ओपनव्सा सारखा अवयव करितात ती.

परिपक्क, ३ लिं० सं० पुरता जो पक्क तो.

परिपक्कबुद्धि, ३ लिं० सं० प्रौढबुद्धी तो.

परिपाक, पु० सं० पुण्यपापरूप कर्माच्या किं० अन्न, धा-
न्य, फल, इ० कांच्या पुरतेपणीं जो पाक तो.

परिपाटी, स्त्री० सं० परिनाळिका.

परिपाठ, पु० कोणेक गोष्ट करण्याची चाल चालत अ-
सत्ये तो; उ० आमच्या त्यांचे घरीं जाण्याच्या परिपा-
ठ नाहीं.

परिपालन, न० सं० सर्वीशीं जें पालन तें.

परिपालित, ३ लिं० सं० परिपालन केलें जाचें तो.

परिपीठिका, स्त्री० सं० मूळपीठिका.

परिपुष्ट, ३ लिं० सं० सर्वीशीं जो पुष्ट तो.

परिपूरण, न० कांहीं एकाची न्यूनता परिहार करण्या-
च्या जो व्यापार तें.

परिपूर्ण, ३ लिं० सं० परिपूरण झालें जाचें तो.

परिपूर्ति, स्त्री० सं० परिपूर्णता.

परिभाषा, स्त्री० सं० लौकिक किं० शास्त्रीय जे भि-
न्नभिन्न व्यवहार त्यांच्या ठायीं प्रत्येकीं विधिव्य-
वस्थार्थ अमुकास अमुक ह्मणावें अमुक भास-
झालें असतां अमुक करावें इ० रूप जे शब्दादि
विषयक नियमित संकेत निरनिराळे असतात ती,
ती त्या त्या व्यवहाराची; २, ग्रंथप्रतिपाद्य व्यवहा-
रांतील संकेत समजावा ह्मणून तद्विधायक जो ग्रं-
थांश असतो ती.

परिमल, परिमळ, पु० सं० सुगंध.

परिमाण, न० सं० हें एवढें, इतकें, अशा व्यवहारास का-
रणीभूत जो पदार्थनिष्ठ संख्याभिन्न गुणविशेष
असतो तें; २, तद्विशिष्ट पदार्थांचीं परिछेदक तोळा,
पायली, गज, घटिका, इत्यादि साधनं तें; ३, त्यास
धनानीं तद्विशिष्ट पदार्थांचें जें परिछेदकरण तें.

परिमार्जन, न० सं० मलादि दूरी करणार्थ जें प्रक्षाल-
न; २, क्रोध, शोक, लज्जा, इ० कांचें कांहीं उपायें
करून जें निरसन तें.

परिमार्जित, ३ लिं० सं० प्रक्षालित; उ० घड्याळा
वरच्यांच्या रजंक परिमार्जित तिनुक्या.

परिमित, ३ लिं० सं० कांहीं एक परिमाणानें जो मा-
पलेला पदार्थ तो; २, ला० जितक्यास तितकें अति-
रिक्त न व्हेजें भाषणादि तो.

परियेसणें, ग्रं० ऐकणें.

परिवर्जन, न० सं० कांहीं पदार्थादिकाचें सर्वथा जें
वर्जन तें.

परिवर्जित, ३ लिं० सं० परिवर्जन केलें जाचें तो.

परिवार, पु० सं० आपले पदरचे दासी, दास, चाकर,
कारकून, इ० रूप जें खटलें तो.

परिवेष, पु० सं० चंद्रास किं० सूर्यास खळें पडतें तो.

परिवेषण, न० सं० भोजनोपयुक्त पदार्थांचें पात्राव-
र घालण्याच्या जो व्यापार तें.

परिवेष्टित, ३ लिं० सं० कांहीं एकाभोंवतालें परितः
वेष्टित जें वस्त्रादिक किं० वस्त्रादिकानें परितः वे-
ष्टित जो कांहीं पदार्थ तो.

परिशीलन, न० सं० शास्त्रादिकांचें अनेक प्रकारें
जें अभ्यसन तें.

परिश्रम, पु० सं० कांहीं एक कामावर शरीरास क-
ष्ट होत असें खपण्याचा जो व्यापार तो; २, तेणें करून
होता

होतात जेकष्ट तो.

**परिष्कार**, पु॰ सं॰ लक्षणावर कांहीं दोष आला असतां विशेषण दानादि द्वारा त्या लक्षणाचें जें समर्थन तो.

**परिष्कृत**, ३ लिं॰ सं॰ परिष्कार झाला आहे ज्याचा तो.

**परिसंख्या**, स्त्री॰ सं॰ करणार तर एवढेंमात्र करावें अशा तात्पर्याचा जो कांहीं एक गोष्टीविषयीं विधि असतो ती; उ॰ अनध्याय दिवशीं खेळावें हा परिसंख्याविधि, याचें तात्पर्य खेळावें या अंशीं नाहीं अध्ययनदिवशीं सर्वथा खेळूं नये या निषेधांशीं आहे.

**परिसणें**, ग्रं॰ परियेसणें.

**परिस्फुट**, स्त्री॰ सं॰ गुप्त गोष्टीची जी प्रसिद्धता; २, ३ लिं॰ अर्थाविषयीं कांहीं गुप्तांश राहूं नये असें जें स्पष्टभाषणादि तें; उ॰ असें आंवांकून आंवांकून कां बोलतां काय असेल तें चांगलें परिस्फुट बोला.

**परिस्फोट**, पु॰ सं॰ फलादिकाचा आंतील अंश बाहेर दिसूं लागे असें फुटण्याचा जो प्रकार तो; २, गुप्तांशाची जी फोड तो.

**परिहार**, पु॰ सं॰ दोष, संकट, इ॰ कांचें जें दूरीकरण तो.

**परिहार्य**, ३ लिं॰ सं॰ परिहार करायास योग्य जें दोषादिक तो.

**परिहास**, पु॰ सं॰ थट्टा, मस्करी, इ॰ जो विनोद तो.

**परिहृत**, ३ लिं॰ सं॰ परिहार झाला आहे ज्याचा तो दोषादिक.

**परिज्ञात**, ३ लिं॰ सं॰ पुरतेपणीं जो जाणला किंवा ओळखिला तो.

**परिज्ञाता**, ३ लिं॰ सं॰ परिज्ञान आहे ज्यास तो.

**परिज्ञान**, न॰ सं॰ कांहीं गोष्टीचें किं॰ पदार्थाचें पुरतेपणीं जें ज्ञान किं॰ ओळख तें.

**परी**, अ॰ स्वस्वबुध्यनुसार किं॰ स्वस्वयोग्यतानुसार; उ॰ मीं आपलेपरी काय सांगायाचें तें सांगीतलें, वडील वडिलांपरी बोलणार लेंकरें लेंकरांपरी छळणार; २, तद्रूपें करून तो अशा प्रकारें कोणेक अर्थाची विवक्षा असतां याचा प्र॰ होतो; उ॰ पैक्यापरी पैका खर्च झाला बायकोपरी बायको मेली; घरांत नको काय तांदुळांपरी तांदुळ पाहिजेत तुपापरी तूप दुधापरी दूध पाहिजे अवघें पाहिजे; ल॰ बापापरी बाप गेला बोंबलतां ओंडगेला; ३, परंतु या अर्थीं ग्रंथीं प्र॰; ४, परस्पर अर्थाचें जें सादृश्य त्याचें वाचक हें अव्यय; उ॰ असा प्रभुहि सेवकां भजसि रवा सदारापरी; ५, स्त्री॰ प्रकार, यापरी, त्यापरी, इ॰ स्थलीं या प्रकारें त्या प्रकारें असा अर्थ होतो; ६, तोंड मनुष्याचें, अंग पशूचें, पुछ मयूराचें असें सपक्ष जें चित्र करितात ती.

**परीट**, पु॰ लोकांचीं वस्त्रें धुवून उपजीविका करणारी अशी जाति आहे.

**परीटघडी**, स्त्री॰ परीट वस्त्र धुवून त्याची घडी घालितो ती; २, ३ लिं॰ तद्विशिष्ट जें वस्त्र तो.

**परीप्रकारचा**, ३ लिं॰ नानाप्रकारचा.

**परीप्रकारें**, अ॰ नानाप्रकारें.

**परीस**, पु॰ एक पाषाण आहे, ज्याचे स्पर्शानें लोहाचें सुवर्ण होतें; २, सौंदर्यादि गुणानीं उत्कृष्ट जो मुलगा, इ॰ त्यास आरोपानें विधान करितात; ३, अ॰

अधिक, उणा, चांगला, वाईट, दूर, जवळ, लांब, आखूड, इ॰ कांचें सार्वधिकत्वें करून कथन कर्तव्य असतां अवधिभूतापुढें याचा प्रयोग होतो; उ॰ या मुलापरीस हामूल चांगला, इ॰.

परीक्षक, ३ लिं॰ परीक्षा करण्यामध्यें जो कुशल तो.

परीक्षणें, कोणेकपदार्थ किं॰ गोष्ट हा अमुक किं॰ यामध्यें अमुक गुण आहेत, अमुक दोष आहेत, अशा प्रकारानें जाणणें.

परीक्षा, स्त्री॰ सं॰ परीक्षण्याचा जो व्यापार ती; २, नहिषयीं जें बुद्धिकौशल असतें ती; उ॰ मला रुपयांची परीक्षा नाहीं, तूं खरा खोटा सराफास दाखीव.

परीक्षित, ३ लिं॰ परीक्षा ज्याची झाली आहे तो.

परूस, न॰ परसूं.

परूसदार, न॰ परसदार.

परोचा, परोता, पु॰ परवचा.

परोपकार, पु॰ दुसर्यावर जो उपकार तो.

परोपकारी, ३ लिं॰ परोपकार करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

परोपरी, अ॰ नानाप्रकारें.

परोक्ष, अ॰ सं॰ असमक्ष.

पर्जन्य, पु॰ सं॰ मेघापासून पडतें जें उदक तो, हा बोलूं लागला म्हणजे पर्जन्य पाडलो म्ह॰ लक्षिनआणि पुष्कळ असें बोलतो, पुष्पांचा पर्जन्य इ॰ स्थलीं पुष्पादिकांचा पर्जन्यवत्पात असा अर्थ होतो.

पर्जन्यकाळ, पु॰ उन्हाळा आणि हिंवाळा यांचेमधला चातुर्मास्यात्मक पर्जन्य पडायाचा जो काळ तो.

पर्ण, न॰ क्रमानें बारीक होत गेलेली अशी मध्यें मोठी शीर पाठीचे कण्यासारिखी असते आणि तिचे दोहों अंगानीं अस्थिपंजरासारिखे तुल्य अवयव विभाग असतात, असें जे वृक्षावयव विशेष तें.

पर्णकुटी, स्त्री॰ सं॰ वरपर्णांचेंच आच्छादन करून केलेलें जें लहानसें घर ती; २, लहान जें तृणादिकांचें घर त्यास गाईसगाधरुं म्हणणें असा कांहीं एक बोलण्यांत दुबकेपणाचा डौल आहे त्याडौलानें म्ह॰.

पर्णणें, पुरुषानें पत्नीत्वें करून स्त्रीतें, किं॰ स्त्रीनें पतित्वें करून पुरुषातें, विवाहधर्मानें स्वीकृत करणें.

पर्णबीज, न॰ एक औषधी आहे, जिचा पानास अंकुर फुटून झाडें होतात तें.

पर्णशाला, स्त्री॰ सं॰ पर्णकुटी.

पर्वाण, न॰ परवाण.

पर्यंक, पु॰ सं॰ मंचक.

पर्यटन, न॰ सं॰ विवक्षित देशीं इकडून तिकडे तिकडून इकडे किं॰ सभोंवार इ॰ अनेक गतीनीं फिरण्याचा जो व्यापार तें.

पर्यंत, पु॰ जेथें पदार्थाचें अस्तित्व संपतें आणि पुढें अभाव लागतो असा जो त्यापदार्थाचे भोंवताला भावाभावांचा अवधि असतो तो; २, अ॰ कोणेक क्रियादिकांविषयीं उत्तरावधित्वें करून विवक्षित जो देशकालादि तो लागे इत्यर्थांत.

पर्यवसान, न॰ सं॰ कोणेक गोष्टीचा जो शेवट तें.

पर्या, पु॰ रा॰ ओढा.

पर्याप्त, ३ लिं॰ सं॰ आणखी कांहीं पाहिजे अशी

आकांक्षा नउरे इतका झाला जो तो; उ॰ एवढा कागद इतकें लिहिण्यास पर्याप्त होईल, शंभर रुपये मिळाले ह्म॰ माझे इच्छेस पर्याप्त, हा वीर माझे शक्तीस पर्याप्त होणार नाहीं; २, कांहीं विषयाविषयीं आणखी पाहिजे अशी आकांक्षा जास राहिली नाहीं तो; उ॰ पावसानें सगळीं सरोवरें पर्याप्त झालीं.

**पर्याप्ति**, स्त्री॰ सं॰ परिपूर्णता.

**पर्याय**, पु॰ सं॰ एकार्थक जे दोन शब्द ते परस्पर; २, एक कार्याविषयीं साधक परस्पर निरपेक्ष अनेक जे कृतिप्रकार असतात ते प्रत्येकीं; उ॰ माहागिरी करून जलमार्गानें जावें किं॰ घोडें करून पायवाटेनें जावें असे दोन पर्याय आहेत, त्यामध्यें एकास मुख्यत्व आणि इतरास गौणत्व असतां गौणास मात्र ह्म॰; एकादशीचा मुख्यपक्ष होईना तर कांहीं पर्याय करावा; ३, कोणेक गोष्टीचा पूर्वप्रवर्तमान जो ओघ तो, विवक्षितानुरूप दुसरे कडे फिरायासाठीं युक्तीनें काढिला जो कांहीं मार्ग तो; सावकार सोडीनां तेव्हां शेत पिकलें ह्मणजे तुझे स्वाधीन करीन असा पर्याय काढून मी निघून आलों; ४, कांहीं एक कार्याची मुळापासून शेवटपर्यंत जी आवृत्ति तो; उ॰ शास्त्र केवळ पहिल्या पर्यायास समजतें असें नाहीं दोन तीन पर्याय करावे लागतात; ५, एकच कार्य एकवारन करितां विभागून विभागून अनेकवार केलें असतां कालभेदप्रयुक्त घडतात जे त्याचे विभाग ते प्र॰; उ॰ जाग्याचे अडचणीमुळें चार पर्यायानीं ब्राह्मणभोजन झालें; ६, कोणेक मोठें कार्य

थोड

थोडके कालांत व्हावें ह्मणून कर्त्रादि सर्व सामग्री अनेक पट करून अनेक स्थलीं चालतात जीं तीं कार्यें तीं प्र॰; उ॰ एकदांच चार पर्याय चालविले तेव्हां हजार ब्राह्मणास चार घटकांत दक्षिणा आटपली; ७, कोणेक क्रियेचा संस्कार अनेकांवर यौगपद्यें करून असूनये एकावर झाला ह्म॰ दुसऱ्यावर होई असा जो क्रियेचा प्रकार तो; उ॰ नित्य एकच धोत्र नेसूं नये पर्यायानें दोन्हीं नेसावीं; ८, वयाद; उ॰ होय किं॰ नाहीं ह्मणून सांगावें तो हजार पर्याय सांगतो, हिशेब विचारिला असतां इकडे दोनशें खरचले तिकडे शंभर खरचले असे अनेक पर्याय सांगतो; ९, क्रिया किं॰ गुण यांचा भेदक जो प्रकार त्याचे अर्थीं प्रायः याचा प्रयोग करितात; उ॰ यांचे बोलण्याचा पर्याय निराळा त्यांचे बोलण्याचा निराळा इ॰.

**पर्युदास**, पु॰ सं॰ विधीचा ठायीं अन्वित होणारा जो अर्थसमुदाय त्यांतून जा व्यक्तीवर विध्यन्वय इष्ट नसतो त्या व्यक्तीचा त्या समुदायापासून केला असतो जो भेद तो; उ॰ अनृतातिरिक्त सर्व बोलावें या वाक्यांत बोलावें या विधिविषयीं अनृताचा पर्युदास केला आहे.

**पर्युषित**, ३ लिं॰ शिजलेलें अन्न, घरांत आणिलेलें पाणी, पुष्प, इ॰ क एकरात्रादि काल राहिल्यामुळें जें दोषयुक्त झालें तो.

**पर्व**, न॰ अमावास्या, पूर्णिमा, वैधृति, व्यतीपात, संक्रांति, ग्रहण, कपिलाषष्ठी, इ॰ जे समुद्रस्नान, श्राद्ध, दान, इ॰ पुण्यकर्माविषयीं काल सांगितले आहेत जांचा ठायीं पुण्यकर्म केलें असतां

कोटि

कोटिगुणित फल होतें इ॰ सांगीतलें आहे तें काल प्रत्येकीं; २. ला॰ कोणेक व्यवहार अतिशय पूर्वक सर्वत्र प्रवृत्त होतो किं॰ कांहींपदार्थ विपुलपणें सर्वत्र होतो असाजो काल तो, त्या व्यवहाराचें किं॰ पदार्थाचें पर्व असें ह्म॰; उ॰ आतांसें हुरडयाचें पर्व आलें आहे; ३, वेळू, बोरू, बोट, इ॰ कांचें पेरतें,

**पर्वकाल, पर्वकाळ**, पु॰ पर्व, तृतीयार्थाशींचून; २, कांहींएक अर्थाचें जिकडे पाहावें तिकडे तोच दिसावा असें होतेंजें बाहुल्य त्यास ह्म॰

**पर्वणी**, स्त्री॰ पर्वकाल आणि पर्व यांचा अपभ्रंश.

**पर्वत**, पु॰ सं॰ सह्याद्रि इ॰ पृथ्वीचे मोठमोठे जे उंच वटे आहेत ते प्रत्येकीं; २, दुर्निर्वह जड भारी जे काम, दुःख, इ॰ त्यास त्याचा त्याचा पर्वत असें ह्म॰; उ॰ बापानें कर्जाचे पर्वत करून मात्र ठेविले आहेत.

**पऱ्ह्या**, पु॰ कों॰ पर्या; २, पर्जन्य कालीं पावध्या इ॰ संबंधी पाणी बाहेर काढून द्यावयासाठीं जो चर खणून करितात तो.

**पल**, न॰ सं॰ घटकेचा साठावा भाग; २, मांस; ३, चाळीसमासे वजन तें.

**पलख**, पुं॰ न॰ हिं॰ पल प्रथमार्थीं

**पलंग**, पु॰ हिं॰ वरनिजायाजोगा लांकडाचा एक पदार्थ करीत असतात तो.

**पलंगडी**, स्त्री॰ लाहान जो पलंग ती.

**पलंगपोस**, पुं॰ हिं॰ सर्वआंथरुणाचे वर घालायाचें जें पांढरें वस्त्र असतें तो.

**पलटण, पलटन**, न॰ बंदूकवाले पायदळाचा जो समुदाय तो प्रायः अकराशांचा असावा.

**पलटणी, पलटनी**, ३ लिं॰ पलटन संबंधी मनुष्यादिक तो.

**पलतड**, स्त्री॰ नद्यादिकांचें जें परतीर ती.

**पलभा**, स्त्री॰ सं॰ अयनांश सहित सूर्य केवल विषुवसूत्रावर असतां मध्यान्हीं द्वादशांगुल शंकूची जाजा देशीं जीजी अंगुलाद्यात्मक छाया पडती ती त्या देशीं.

**पलाखतीमार**, पु॰ फरमाशीमार.

**पलाटन**, न॰ पर्यटन, २, पलांटी.

**पलाँटी**, स्त्री॰ आसपासचे देशीं जी फेरी ती; उ॰ तुह्मीं अशीपलांटी मारून या तों मीं रुपये तयार करून ठेवितों.

**पलांडु**, पु॰ सं॰ कांदा ह्मणून कंदविशेष आहे तो.

**पलाण**, न॰ उंटाचें जें पल्याण तें.

**पलायन**, न॰ सं॰ भयादिकामुळें दुसऱ्यास आपण नसांपडावें ह्मणून शीघ्रगतीनें किं॰ त्याचा डोळा चुकवून इ॰ युक्तीनें क्वचित् गमन करितात तें.

**पलाश**, पु॰ सं॰ एकवृक्ष आहे.

**पलिकडचा, पलिकडला, पलिकडील**, ३ लिं॰ पलिकडे जो स्थित तो.

**पलिकडून**, अ॰ पलिकडचे देशादिकाहून.

**पलिकडे**, अ॰ स्वसन्निकृष्टत्वेंकरून विवक्षित जो सभोंवता देशांश किं॰ भूतभविष्य रूप कलांश त्याचे बाहेर; उ॰ तुझा घोडा आलीकडे पडला कालचें वर्तमान मात्र मला ठाउक आहे पलिकडे न कळे; उद्यांचा दिवस मीं संभाळीन पलिकडे मला न कळे.

**पलिबा**, पु॰ हिं॰ हिलालांत घालायासाठीं चिरगुटाची वाटोळी गुंडाळी करितात तो.

**पलिस्त**, ३लिं॰ हिं॰ अतिशयितपीडा देणारा जो वारा, पर्जन्य, द्वाडपोर, कार्याधिकार, इ॰ त्यांस म्ह॰.

**पल्याण**, न॰ सं॰ बसायाचे किं॰ ओझें घालायाचे सोईकरितां घोडें, उंट, इ॰ कांचे पाठीवर घालायाचें जें जीन, खोगीर, इ॰ केलें असतें तें.

**पल्लव**, पु॰ सं॰ पर्णसमुदाय विशिष्टजें शाखाग्र तो; २, ला॰ कोणेक गोष्टीस नवाच जोडिलाजो दुसरा अवयव तो; उ॰ त्याणें सांगीतलें असेल तितकेंच बोल नवापल्लव लावूंनको; ३, वस्त्राचाजो पदर तो.

**पल्लवित**, ३लिं॰ सं॰ पल्लवजास फुटले आहेत तो वृक्ष, शाखा, इ॰.

**पल्ला**, पु॰ तीसपायलीरूपजें माप तो; २, पल्लेकर्याचें जें दाणें इ॰ वाहायाचें पोतें तो; ३, अडीचमण रूपजें पक्कें वजन तो; ४, गतिमंताचे गतीनें प्राप्य जो देशरूप, कालरूप, किं॰ व्यवहाररूप, अवधि तो; उ॰ अशाचालीनें लांबचापल्ला आटोपणार नाहीं; इनक्याद्रव्यानें पुढीलवर्षपर्यंत पल्ला येणार नाहीं; मनसुबीचें प्रकरण साक्षीदार सांगतील तें ऐकावें इनक्यापल्यास आणून ठविलें; कोणेकाचे पल्यांवर असणें म्ह॰ बरें करायास पाठीवर किं॰ वाईट करायास पाठलागावर असणें; ५, शेला इ॰ कांचा जो जरीचा मोठा पदर तो; ६, रवबुत्रें इ॰ पक्ष्यांचा जो कळप तो.

**पल्लाण**, न॰ वा॰ पल्लाचतुर्थार्थी परंतु देशविषयीं प्र॰



**पल्ली**, स्त्री॰ सं॰ क्षुद्रजंतु आहे.

**पल्लेकरी**, पु॰ दाण्याचे पल्ले वाहून उपजीविका करीत असतो तो.

**पल्लेदार**, ३लिं॰ लप्फेदार; २, लांबगोळा जावयाजोगी जी तोफ, बंदूक, ती.

**पव**, पु॰ फांशावर एकत्वसंख्या बोधकचिन्ह असतें तो.

**पवन**, पु॰ सं॰ जासरूप नाहीं असें असून जाचा स्पर्श होतो असें पंचमहाभूतांतील भूत आहे तो.

**पवनचक्की**, स्त्री॰ कोणीहातानें नफिरवितां वार्यानें चफिरत असावें असें जातें केलें असतें ती.

**पवबारा**, पु॰ तिफांशीखेळांत एकदान आहे, पवबाराकरणें, किंवा म्हणणें म्ह॰ पळून जाणें.

**पँवाडा**, पु॰ कोणेकपराक्रमी पुरुषाचे कीर्तीचें वर्णन जांत केलें असतें असा एक प्राकृत कविता विशेष आहे.

**पवित्र**, ३लिं॰ सं॰ जाचें भक्षण, स्पर्शन, इ॰ कृतसंबंधानें प्रत्यवाय लागत नाहीं किं॰ पापक्षयादिचांगलें फल होतें तो अन्न, उदक, स्थल, इ॰ पदार्थ त्यामध्यें भक्षणाविषयीं अपवित्र असून स्पर्शाविषयीं पवित्र असे ही कितीएक पदार्थ क्रियाविशेषीं मात्र पवित्र आहेत; २, प्रत्यवायाजनक किं॰ पापक्षयकारक जें कर्म तो; ३, निष्पाप किं॰ अशौचादिदोषरहित जो मनुष्य तो.

**पवित्रक**, न॰ ब्राह्मणादिक संध्यादिकर्मसमयीं दर्भाचें ग्रंथिविशेषयुक्त अंगुलीयक बोटांत घालितात तें किं॰ तदाकार स्रुवर्णाचें ही असतें तें.

**पशम**, न॰ پشم संकेतानें उपस्थस्थित लोमास म्ह॰; २, लोहोंकर.

**पशमी**, ३लिं० پشمی लोंकरीचें जें वस्त्र तो.

**पशु**, पु० सं० हत्ती आदिकरून मुंगुसपर्यंत जे चतुष्पाद् जीव तो; २, ला० केवल जो मूर्खमनुष्य त्यास ह्म०.

**पश्चात्**, अ० सं० अनंतर; २, पाठीमागें.

**पश्चात्ताप**, पु० सं० काहींवाईटकर्म हातून झाल्यानंतर छीछी, वाईट, म्यांकर्मकेलें असाजो मनास भावउत्पन्नहोतो तो.

**पश्चिम**, स्त्री० अस्ताचलाकडील जी दिशा ती; २, ३लिं० पश्चिमदिगवच्छिन्न तो; उ० एथूनसमुद्र शुद्ध पश्चिम आहे.

**पश्चिमद्वार**, न० संकेतानें अपानद्वारास ह्म०.

**पश्चिमवायु**, पु० संकेतानें अपानवायूस ह्म०.

**पश्यंती**, स्त्री० सं० परेपासून हृदयस्थानी ईषन्मात्रउमटती जीवाणी ती.

**पश्यतोहर**, पु० सं० सोनार.

**पसंत**, **पसंद**, ३लिं० चवघानीं खोड नठेवितां मान्य करायाजोगा जो पदार्थ, भाषणादि व्यवहार, पुरुष, इ० तो; २, जोपदार्थादि जासमान्य झाला तो त्यास.

**पसरट**, ३लिं० उंची लांबीपेक्षां रुंदीचा विस्तार जाचा कांहीं अधिक दिसतो असें जें भांडें आवृतस्थल इ० किं० त्याचाजो आकार तो; २, ला० आटोपसारनव्हे असाजो कारभार इ० व्यवहार किं० भाषणादि तो.

**पसरणें**, संकुचितपणें स्वल्पदेश व्यापून स्थित जो पदार्थ तो अधिकदेशव्यापी असा करणें किं० होणें.

**पसवणें**, घोडीनें प्रसूत होणें; २, केळीनें केळफूल, भात, नाचणी, वरी, इ० कानीं कणसें, तसेंच इतरही तृणास काहीं तुरे येत असतात ते त्याणीं बाहेर टाकणें.

**पसा**, पु० एके हातांत जितकें धान्यादिक मावेल तितकें घ्यावयाकरितां खोळकट करितात जो हाताचा आकार तो; २, वा० ओंजळ.

**पसार**, पु० एकत्र बसून राहिलें असतां भुक्तान्नाचा परिणाम चांगला होत नाहीं तो व्हावा इ० अर्थ आसमंतात् भागीं फिरण्याचा व्यापार करितात तो; २, भरून चुकला तो घटिकादि कालमानवृत्ति.

**पसारा**, पु० कांहींएक पदार्थाची किं० कार्याची चहूंकडे पसरून जी स्थिति होत्ये तो; २, गुरांस रात्रौ चरायास नेण्याचा जो व्यापार तो.

**पसारी**, पु० हिंग, जिरें, मिरें, लसूण, कांदा, इ० किरकोळ जिन्नस विकणारा जो दुकानदार तो.

**पसू**, ३लिं० शिंगरें उत्पन्न करायासाठीं जी घोडी बाळगितात ती, घोडीचेंच वि०

**पस्तकरणें**, चोरादिकानीं कोणेकास सर्वस्वीं नागविणें; उ० शहरपेंढार्यानी लुटून पस्त केलें.

**पस्तावणें**, पस्ताव्यांत पडणें.

**पस्तावा**, पु० कांहींएक कार्याचा उद्देशानें केलाजो उद्योग तो निष्फल होउन उरफाटें कांहीं संकट आल्यामुळें मीं यांत व्यर्थ प्रवृत्त आलों असाजो खेद उत्पन्न होतो तो.

**पस्तीस**, ३लिं० ३५.

**पहाँट**, **पहाट**, स्त्री० उषःकाळापासून सूर्योदयपर्यंत जो काळ ती; २, उत्तररात्रीसही ह्म०; उ० पहांटेचे प्रहररात्री उठला.

**पहाँटपटीं**, अ० रा० मोठ्यापहांटेस.

**पहाड**, पु॰ हिं॰ डोंगर; २, अत्यंत उंच मोठा जो कंठध्वनि त्यास ल॰; ३, भूमीवरून हात पुरेना अशा उंच प्रदेशीं भित्यादिकांहीं कार्यकर्तव्य असतां भित्यादिकांत लांकडें घालून माळ्यासारिखा आश्रयार्थ करितात तो.

**पहाडमूळ**, न॰ एक औषधीमूल आहे.

**पहाडी**, स्त्री॰ पालखी, मेणा, इ॰ एकेका यानास वहायास जे भोयांचे समुदाय ठेविले असतात ते प्र॰; २, डोंगरवट जो देश, जागा, इ॰ ती.

**पहाडीकिल्ला**, पु॰ डोंगरावरील जो किल्ला तो.

**पहाडीजिल्हा**, पु॰ हिं॰ एक रागिणी आहे.

**पहाणखरडा**, पु॰ शेत इ॰ कांची पाहाणी करून त्याचा लेख आजवर लिहिला असतो तो कागद.

**पहाणदार**, पु॰ पाहाणीदार.

**पहार**, स्त्री॰ दगड फोडणें इ॰ उपयोगी एक लोखंडी आउत आहे ती; २, प्रहराचा अपभ्रंश.

**पहारा**, पु॰ मार्गादिकांचा ठायीं अविवक्षित मनुष्यादि येउं नये किं॰ ठेवलेला जिन्नस पानस कोणी नेउं नये किं॰ बंदिवान इ॰ कांनीं कोणीकडे यथेच्छ जाउं नये म्हणून तत्तद्विषयीं जपत बसण्याचा जो व्यापार तो; २, त्या कामावर नियुक्त जो शिपाई इ॰ तो; ३, ला॰ कोणेकस्थलीं तेथील वस्त इ॰ गेली आली असतां समजाया जोगी कोणे काची जागरूकपणें सर्वकाल असत्ये जी स्थिति ती.

**पहारेकरी**, पु॰ पहाऱ्यावर नियुक्त जो शिपाई इ॰ तो.

**पहारेबंदी**, स्त्री॰ शहर इ॰ कांत जागजागां पहारे बसवून केला असतो जो बंदोबस्त ती.

**पहाळी**, स्त्री॰ दे॰ पावसाची मोठी जी सरती.

**पहिलवान**, पु॰ हिं॰ जेठी.

**पहिला**, ३लि॰ एक दोन तीन असें मोजायाचें असतां एक या संख्येचा जो विषय तो; २, अ॰ पूर्वी.

**पहिलार, पहिलारू**, ३लिं॰ पहिल्यानेंच आलेली जी गर्भिणी किं॰ प्रसूत ती.

**पहिल्यान, पहिल्यानें**, अ॰ प्रथमपर्यायास.

**पहीपाहुणा**, पुं॰ पाहुणा इ॰ तो.

**पहुडणें**, ग्रं॰ निजणें.

**पळ**, न॰ पल; २, पु॰ दंगा इ॰ कांमुळें गावांतील किं॰ देशांतील सर्व मनुष्यादिकांनीं पळत सुटावें अशी जी अवस्था येत्ये तो; ३, तसा पळत चाललेला जो मनुष्यादि समुदाय तो; उ॰ महामारी येतांच गावांत पळ सुटला; उ॰ आमचे गावांत पळ आला आहे; ४, स्त्री॰ कों॰ शेताचे बांधणांत पाणी अधिक आलें असतां तें बाहेर जावयास वाट बांधली असत्ये ती; ५, कोणेक पाठीस लागल्यामुळें कोणेकाची होत्ये जी तिरपीट ती.

**पळका**, पु॰ दे॰ जळल्यामुळें जो आंगावरील त्वगंश निघतो तो.

**पळंज**, न॰ जांत तांदूळ नाहीं असा वांझा जो भातगोट्यांचा समुदाय तें.

**पळंजी**, स्त्री॰ कों॰ वांझा जो धान्याचा समुदाय ती.

**पळण**, स्त्री॰ पळद्विती यार्थी.

**पळणें**, पलायमान होणें, पळायास वाट ठेवणें ल॰ भाषणांत किं॰ लेखांत दुसरा धरील तर न सांपडावें अशी कांहीं खिडकी राखून ठेवणें

**पळनेंपीक**, न॰ फलादिकांचा शेवटला बार तें; २, ला॰ कांहीं एक पदार्थापासून कांहीं एक फलाचा शेवटील

जो लाभ तें.

**पळपट**, स्त्री॰ कों॰ पळण.

**पळपटा, पळपट्या, पळपुटा, पळपुट्या**, ३लिं॰ पळण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पळपळीत**, ३लिं॰ ज्यांत स्थंबीरपणा नाहीं अतएव विश्वसनीय नव्हे असें जें भाषण व्यवहार इ॰ तो.

**पळवा**, पु॰ वाळवून ठेविली जी पाले भाजी तो.

**पळशा**, पु॰ हिंदूंत एक जाति आहे.

**पळशी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**पळस**, पु॰ पलाश.

**पळसपापडी**, स्त्री॰ पळसाची जी बी ती.

**पळसुला**, पु॰ मुंजीचे चौथे दिवशीं करायाचें एक कर्म आहे.

**पळा**, पु॰ मोठी जी पळी तो.

**पळिंज**. न॰ पळंजी.

**पळी**, स्त्री॰ पात्रांतून कांहीं जल, घृत, इ॰ पदार्थ काढणें इ॰ कांस साधनभूत दंडविशिष्ट धातुमय पात्र असतें ती.

**पळें**, न॰ कों॰ पळी, डाब, यांचें जें टवळें तें.

**पल्हाटी**, स्त्री॰ कापसाचे झाडाची जी काडी ती.

**पक्ष**, पु॰ सं॰ चांद्रमासाचीं दोन अर्धें तीं प्र॰; २, महालयश्राद्ध; ३, आकाशमार्गें जाणारे जे काकादिक त्यांचें उड्डान साधनभूत जे दोन दोन अवयव असतात ते प्र॰; ४, वाद, युद्ध, एतद्रुपजीवक परस्परविरुद्ध जे दोन किं॰ बहुत मतभेद असतात ते किं॰ तीं प्रकरणें प्रत्येकीं; ५, एकाच कार्याचे साधनाविषयीं परस्पर निरपेक्ष अनेक जे कृतिप्रकार असतात ते प्र॰; ६, संदिग्धरूपें करून साध्य जाजवर राहतें तो अनुमानाविषयीं; ७, अनेक मनुष्यादिकांकडील मनुष्य समुदायादिरूप जीं अनेक भिन्नभिन्न प्रकरणें तीं प्रत्येकीं; उ॰ आमचे मातुलपक्षांत कोणी मूर्ख जाला नाहीं, आज वरपक्षाचे वऱ्हाड्यांस मेजवानी आहे.

**पक्षघात**, पु॰ पक्षाघात.

**पक्षपात**, पु॰ वाद, युद्ध, इ॰ संबंधि जे दोन पक्ष त्यामध्यें एके पक्षाकडे कोणेकाचे अंतःकरणाचा त्याचे वर्यविषयीं जो ओढा असतो तो.

**पक्षपाती**, ३लिं॰ पक्षपात आहे ज्यास तो.

**पक्षवायु**, पु॰ अर्धांगवायु.

**पक्षाघात**, पु॰ पक्षवायु.

**पक्षिणी**, स्त्री॰ एक रात्रि आणि दोन दिवस किं॰ दोन रात्रि आणि एक दिवस इतका जो सतत काल ती, अशौचप्रकरणीं प्र॰प्र॰.

**पक्षी**, पु॰ पक्षानीं आकाशमार्गें चालणारे जे प्राणी ते.

**पक्षीं**, अ॰ विकल्पें करून.

**पां**, अ॰ ग्रं॰ वाक्यालंकारार्थक.

**पाईक**, पु॰ चाकर.

**पाईर**, पु॰ स्त्री॰ एक वृक्ष आहे.

**पाउटणी**, स्त्री॰ पायरी प्रायः मुख्यार्थीं.

**पाउणकें**, न॰ पाउण अंक एकापासून शतांत अंकानीं गुणून क्रमें करून मुलांस एकपावणें पाउण इ॰ शब्दपूर्वक शिकवितात तें.

**पाउणह्मातारी**, स्त्री॰ मज पुढें ह्मा केवळ तुच्छ, अप्रयोजक, अशी कोणेकाची निंदा कर्तव्य असतां त्यास प्र॰.

**पाउ**, स्त्री॰ फणस, अननास, रामफळ, इ॰ फळाचे आंत जें देंठाचें अग्र शिरलेलें असतें तें; २, ओंठ्याचे वरल्यातळीचे भोंकाचे आंतल्या बाजूस खुंट्यास आश्रयभूत जा दोहों बाजूंचा दोन कडा असतात ती.

**पाउड**, पु॰ न॰ पांगूळ, वाघ्या, मुरळी, इ॰ भिकारी धर्मार्थ पैसा, पाउड, या शब्दानें मागतात.

**पाउण**, ३लिं॰ चतुर्थांशानें उणा जो पदार्थ तो.

**पाउल**, न॰ पायांचे घोंट्याखालचा जो भाग तें; २, चालतानां सहजरीतीनें जितकें लांब पाउल पडतें तत्परिमित जें मार्गादि प्रमाण तें, पाउल जपून टाकणें, ठेवणें, इ॰ स्थलीं कोणेक गोष्ट करणें ती विचारपूर्वक करणें असा अर्थ, कोणेकाचें पाउल ओळखणें ल॰ भलेपणा, लबाडपणा, इ॰ स्वभाव यत्किंचित् त्याचा व्यवहार पाहिल्यावरून ओळखणें, वाटेचें पाउल आडवाटेस पडणें ल॰ प्रमादानें एकादी गोष्ट घडूं नये ती हातून घडणें, कोणेकाचें पाउल वांकडें पडणें ल॰ व्यभिचारादि अन्याय्य गोष्टीचा ठायीं प्रवृत्ति होणें, कोणेक व्यवहारादिकाचे ठायीं कोणेकाचें पाउल पडणें किं॰ शिरणें ल॰ तेथे तेथे कोणेक संबंधानें याणें लागू होणें, पाउल पुढें ठेवणें किं॰ माघारें काढणें इ॰ स्थलीं कोणेक काम करण्या विषयीं प्रवृत्त होणें; किं॰ निवृत्त होणें; ल॰ चोराचीं पावलें चोर ओळखतो, सगळ्यांचीं पावलें हत्तीचे पावलांत, जेथे जावें तेथे पाउलभर पाणी.

**पाउलवाट**, स्त्री॰ गाडे, घोडीं, इ॰ जा वाटेनें जातनाहींत अशी जी लाहानशी वाट ती.

**पाउस**, पु॰ पर्जन्य.

**पाउसकाळ**, पु॰ मृगशीर्ष महानक्षत्रापासून हस्त नक्षत्र पर्यंत पर्जन्याचे दिवस तो.

**पाउसकाळा**, पु॰ पाउसकाळ.

**पाउसपाणी**, न॰ पु॰ पाउस इ॰ तो तें.

**पाक**, पु॰ स॰ तंडुलादि पदार्थांचा ठायीं अग्निसंयोगानें, आम्रादि फलांचा ठायीं कालयोगानें, पक्कताजनक जो व्यापार होत असतो तो; २, स्वयंपाक; ३, दहा पांच औषधें एकत्र करून त्यांचा रांधा करितात तो; ४, पंक द्वितीयार्थी; ५, ला॰ महाकवी इ॰ कांचे वाणीचा ठायीं भिन्न भिन्न रसोत्पादक जो धर्मविशेष असतो तो; उ॰ कालिदासाचे काव्याचा पाकच निराळा; ६, निर्मळ; उ॰ माझें अंतःकरण तुजविषयीं पाक आहे; ७, पवित्र; ल॰ लावली राख आणि जाली पाक.

**पांक**, पु॰ पंक द्वितीयार्थी.

**पाकटी**, स्त्री॰ कों॰ किंचित् तांदूळ आंत उत्पन्न होत आहे इतक्यांत वाळलें जें भात ती.

**पाकड**, पु॰ भाताचे शेतांत एक तृणधान्य उत्पन्न होतें तो.

**पाकणें, पांकणें**, बुंदीचा कळ्या, चिरोटे, इ॰ पाकानें युक्त करणें.

**पाकदोस्ती**, स्त्री॰ हिं॰ कोणेक स्त्रियेचा कोणेक पुरुषाशीं मैथुनसंबंधनसतां शुद्ध भावानें केवल मैत्री असत्ये ती.

**पाकनिष्पत्ति**, स्त्री॰ सं॰ स्वयंपाकाची शिजविणें, भाजणें, इ॰ तत्तत्क्रियाद्वारा जी सिद्धता ती.

**पांकळी, पाकळी**, स्त्री॰ पांकोळी प्रथमार्थी.

**पाकी**, स्त्री॰ हिं॰ एकमेकाची एकमेकाशीं अंतःकरणाची जी मित्रता ती.

**पाँकुलें**, न० रा० मुलांचे भाषेनें गुरांचे वत्सास ह्म०

**पाँकोळी, पाकोळी**, स्त्री० पुष्पांचे पत्रासारखे अनेकअवयव असतात ते प्र०; २, लाहान देहाची एक वाघळांत जाति आहे; ३, चिमणी सारखें एक पांखरूं आहे.

**पांक्त**, ३ लिं० सं० पंक्तिव्यवहारास जो योग्य तो; २, पुस्तकाचा जा मूळचा पंक्ति असतात त्यामध्यें लिखित जो ग्रंथ ह्म० टीप इ० रूपें वरखालीं लिहिलेला नव्हे तो; उ० बोलतां यास प्रमाण काय असें विचारतांच त्याणीं पांक्त ग्रंथ वाचून दाखविला; श्लोकादि पांक्त लागणें इ० स्थलीं मधील पदें किं० अक्षरें नजातां यथास्थित लागणें.

**पाँख, पाख**, पु० पक्ष; २, कों० महिन्याचे जे दोन पक्ष ते प्रत्येकीं.

**पाखंड, पाखांड**, न० एक देवतेस पूज्यत्व मानून इतर देवांची निंदा करावी अशीं जीं कलियुगामध्यें अनेक मतें जालीं आहेत तीं प्रत्येकीं; २, निर्मूल बुद्धिबलानें चजी एखादी गोष्ट रचली तें.

**पाखडणें**, शूर्पव्यापारानें धान्यादि तुषादिरहित करणें; कोणेकावर आग पाखडणें ह्म० सर्वस्वीं त्याचा नाश होई असें कुभांड घेणें, चहाडी सांगणें, इ० द्वारा करणें. दे० हात पाय पाखडणें ह्म० मरणासन्न दशा प्राप्त जाल्यामुळें किं० क्रोधावेशामुळें हात पाय इतस्ततः आदळणें.

**पाखंडी, पाखांडी**, ३ लिं० पाखंड मतानें चालणारा जो तो; २, नवें नवें पाखंड रचण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पाखर**, स्त्री० घोड्यास गोळी, भाला, नलागावा ह्मणून सूत्रादिकांचें विणून काहीं आछादन करून घालिता

न

त ती; २, कों० पक्षी आपले पिलांवर पक्षरूप जें आछादन घालितात ती; कोणेकावर पाखर घालणें ह्म० संकटसमयीं कृपा करणें, गाई, ह्मशी, इ० कांचे दोन दोन सडांचे जे वाम दक्षिण भाग ते प्रत्येकीं.

**पाखरूं, पांखरूं**, न० पक्षी.

**पाखल**, स्त्री० वा० पाखर तृतीयार्थी; २, क्षुधादिकारणामुळें पोटास बाहेरून जी खळी पडत्ये ती.

**पाखलपुजा**, स्त्री० यात्रादि प्रसंगीं अनेक लोकांचे संमर्दामुळें देवापाशीं जमतो जो खळमळ तो सर्व धुवून स्थल स्वछ करून जी पूजा करितात ती.

**पाखा**, पु० वा० लहान देहाची वाघळांत जाति आहे.

**पाखाडी**, स्त्री० चिरेबंदी जी अरुंद वाट ती; २, कों० ग्रामांत जा घरांचा आळ्या असतात त्या प्र०; ३, वा० गृहाची जी पडवी ती; ४, गृहाचें आढें आणि इंद्रकट यांचे मध्यें वांशांस आधारभूत जीं आडवीं लांकडें असतात तीं प्र०

**पाखाळणी, पाखाळपुजा**, स्त्री० पाखलपुजा.

**पाखें**, न० घरावरचा आढ्यापासून पावसाचें पाणी उतरायाकरिता जे दोहों कडे दोन भाग किं० चहूं कडे चार भाग पक्षाकार करितात ते प्र०.

**पाग**, पु० रा० समुद्रादिकांत मासे धरायाचीं मोठीं जाळीं असतात तो; २, स्त्री० कों० गलबतावर शेजारीं होडी गिडी बांधून ठेवणें इत्यादर्थ जी पिछाडीस दोरी बांधून ठेविली असत्ये ती.

**पांग**, पु० अन्नाछादनादि विषयक जी चिंता तो; प्रायः फेडणें, फिटणें, या धा० योगीं अनेक वचनांत प्र०; उ० हा मुलगा मोटा जाला ह्म० तुझे पांग फेडील; २, वा० ताबी; उ० त्याचा पांगांत मासानें राहवत नाहीं;

२,

३,ओशाळगत; उ० या कर्जदारांचा मला पांगवाटतो.

पागणें, स० पागानीं मासे धरणें.

पाँगणें, समुदायभूत जे मनुष्यादि जीव त्यानीं समुदायपुढें असें चहूंकडे आणें.

पागनीस, पु० पागेकडली पाग्याचे हातास्वालचा जो मुख्य कारभारी तो.

पागळणें, पाघळणें.

पांगळा, ३लिं० जन्मतः किं० वातादि विकृतीमुळें अधू अतएव चालण्याचे उपयोगी नाहींत असे जे दोनीं पाय ते किं० तद्विशिष्ट मनुष्यादि तो.

पाँगा, ३लिं० पांगळा; २, हात टेंकल्यावांचून आसचालतां येत नाहीं इतका जो पायांनीं अधू तो; ३, फेंगडा.

पागा, स्त्री० हिं० घोडशाळा; २, एक स्वामिक जो अश्वसमुदाय तो; कांहींएक पदार्थ कोणेकाचे पागेस लागणें म्ह० त्याचा धनी माघारें घेईतोंपर्यंत यानें संभाळावें अशा प्रकारानें स्वाधीन होणें, कोणेक मनुष्य कोणेकाचे पागेस लागणें म्ह० त्याजवर आपला वरचढपणा पडूं नये अशा प्रकारें स्वाधीन होणें.

पाँगारा, पु० एक वृक्ष आहे.

पाँगूळ, ३लिं० पांगळा; २, नंदीबैल बाळगून जो भीक मागतो तो किं० पहांटेस भीक मागायास फिरत असतो असा एक भिकारी आहे तो.

पाँगूळगाडा, पांगूळगाडी, पु० स्त्री० लहान मुलास चालायास शिकवायासाठीं जी लहानशी गाडी करितात ती तो.

पाँगूळपोवा, पांगूळपोहा, पु० अशक्त, दुर्बल, आंधळे, पांगळे, इ० रूप जो मनुष्यसमुदाय तो; २, चालायास धटीं करींत नव्हेत अशींजीं मुलें, बायका, म्हातारीं, इ० रूप जें खटलें त्यास मार्गप्रसंगीं म्ह०.

पागोटें, न० शिरास वेष्टित करायाचें वस्त्र आहे; पागोटें गमावणें म्ह० कोणेक केलेला व्यवहार आंगीं आल्यामुळें पदरभरीस घालणें; पागोटें खालीं करणें म्ह० कांहीं दुष्कर्म करून कुळास बट्टा लावणें; पागोटें संभाळणें म्ह० कांहीं व्यवहार आंगीं न येई असें त्या व्यवहारांतून पार पडणें; कोणेकाचे पागोट्यास फुलें बांधणें म्ह० त्याणें स्वेष्ट कार्यीं प्रवृत्त व्हावें म्हणून स्तवादि आर्जव करणें; पागोट्याचे पेंच गळ्यांत येणें म्ह० केलें कर्म आंगीं येणें; हा त्याचें पागोटें घेईल इ० स्थलीं हा त्याचे हातून ठकला जाणार नाहीं उलटा त्यास ठकवील असा अर्थ होतो; पागोटें फिरवणें म्ह० उक्त जें कांहीं एक तदर्थ गळ्यांत येतो असें वाटल्यास तें भाषण फिरवून बोलणें किं० फेरपगडी करणें

पागोरा, पु० वृक्ष, वल्ली, कंद, इ० कांचे मूलप्रदेशीं फुटोन चोहोंकडे पसरतात जा तंतुरूप मुळ्या त्या प्रत्येकीं; २, एका वेलास फुटोन वृक्षादिकांस संबद्ध होउन पसरले असतात जे अनेक वेल ते प्र०; ३, ला० तनावा, पागोरे फोडणें म्ह० फांटे फोडणें.

पागोळी, स्त्री० पर्जन्योदकाची धारा जा प्रदेशापासून पडत्ये तो गृहप्रदेश; २, तेथून गळतात जा उदकधारा ती; ३, ला० तदाकार कांहीं एकापासून गळत्ये जी उदकादि धारा ती; उ० ओळ्यांत केर पडल्यामुळें एकसारखी पागोळी लागली आहे.

**पाग्या**, पु॰ पागेवरजो मुख्यत्वें करून अधिकृत असतो तो; म्ह॰ आधीं होता वाघ्या मग झाला पाग्या त्याचें एलकोट राहीना मूळस्वभाव जाईना.

**पाँघरणें** वस्त्र, पाठ, पोट, इ॰ विवक्षित अवयव झांकत असें अंगावर घेणें, एथें नेसणें, आंगरखा, पागोटें, घालणें, यांविषयीं पांघरणें याचा प्रयोग होत नाहीं.

**पाँघरूण**, न॰ पांघरलें जाई अशाप्रकारें अंगावर घेतलें जें वस्त्र तें; उ॰ आंगवस्त्र गुंडाळून कशाला घेतलें आहेस चांगलें पांघरूण घे; २, आंगरखा, पागोटें, शेला, रजई, इ॰ शरीरावर धारण करायाचीं जीं वस्त्रें तें; उ॰ परटाकडचीं पांघरुणें आलीं नाहींत; ३, ला॰ आपले निर्वाहाचा भार ज्यांजवर असतो ज्यांचे योगानें आपल्यास तादृश चिंता करावी लागत नाहीं असे जे मातापित्रें, यजमान, इ॰ त्यांस म्ह॰; उ॰ आई हें मुलांचें पांघरूण तीमेल्यावर पोरें उघडीं पडतात यांजवर तें पांघरूण आहे म्हणून यांची अब्रू आहे त्याचे पाठीमागें यांना कोडयार्नी मारतील; पांघरूण घालणें म्हणजे कोणेकाचें दुष्कर्मादि आपल्यास समजलें असतां हीवभ्रान होई असें करणें; म्ह॰ उघडयावर पांघरूण घालावें.

**पाघळ**, पु॰ रा॰ गूळ, साखर, इ॰ पदार्थांस द्रव सुटतो तो.

**पाघळणें**, जलादिद्रवयुक्त आर्द्रवस्त्रादिक जो पदार्थ त्यापासून जलादिक गळणे, पक्षीं आर्द्रवस्त्रासही कर्तृत्व असतें; २, गूळ, शर्करा, घृत, इ॰ द्रवरूप होणें; पाघळून जाणें किं॰ येणें म्ह॰ पराजित होउन जाणें किं॰ येणें असा अर्थ.



**पाच**, पु॰ स्त्री॰ एक रत्न आहे; २, एक सुगंधि वनस्पति आहे.

**पाँच**, ३ लिं॰ ५; त्यापाशीं पांच रुपये आहेत पांच करतील तें आपण करावें इ॰ स्थळीं पांच हें अनियमित संख्येचें उपलक्षण; पांचांवर धारण बसणें म्ह॰ घाबरणें; म्ह॰ पांचामुखीं परमेश्वर; मासें घ्या आणि पांचांत न्या; पांचांबुद्धि ती पन्नासांबुद्धि.

**पाचक**, पु॰ सं॰ आचारी; २, ३ लिं॰ जेणें करून अन्नाचें पचन होतें असें औषधादि तो.

**पाचकळ**, ३ लिं॰ पचकळ.

**पाचंग**, स्त्री॰ पचंग.

**पांचजन्य**, पु॰ सं॰ विष्णूचा शंख; २, संकेतानें बोबेस म्ह॰.

**पांचट**, ३ लिं॰ पानचट.

**पाचट**, न॰ दे॰ उंसाचा पाला.

**पाचन**, अ॰ धा॰ रुजत ; अळू इ॰ कंद भूमीत घालणें या धातूचा योगीं प्र॰

**पाचन**, न॰ सं॰ भुक्तान्नाचें जें पचन तें; २, ३ लिं॰ पाचक.

**पाँचपट**, स्त्री॰ धा॰ पहांट.

**पाँचपाट**, पु॰ चोरादिकांची बहुतशा प्रतिज्ञा कर्तव्य असतां वस्तर्यानें डोक्याचे केसांचे पांचपट्टे काढितात ते.

**पाँचपालीभाजी**, स्त्री॰ रा॰ उडीद, चवळी, इ॰ पांचचार पाले एकत्र करून जी भाजी करितात ती.

**पाँचपेँच**, पु॰ मल्लयुद्धामध्यें जेडाव घाव करितात ते; २, ला॰ वाद, युद्ध, इ॰ व्यवहारीं दुसर्‍यास पाडाव करण्याची अनेक प्रकारची जी युक्ति कौशल्यें ते.

**पांचभौतिक**, ३ लिं॰ पृथ्वी इ॰ पंचमहाभूतांपासून आलेलें जें शरीरादि तो.

**पाचर**, स्त्री॰ खुंटा इ॰ घट्ट बसायाकरितां किं॰ छिद्र बुजवायाकरितां लहानशी धलपी मारितात ती; कोणेककार्यांत पाचरमारणें म्ह॰ कांहींविघ्न होउन सर्वथा न होई असें करणें.

**पाँचवा**, ३ लिं॰ पांच हीसंख्या जेणेंकरून पूर्ण होते तो.

**पाँचवी**, स्त्री॰ प्रसूतिदिवसापासून पांचवे दिवशीं जीवंतिकादि देवतांची जीपूजा करितात ती.

**पाँचशेरी**, स्त्री॰ पांचशेर प्रमाणाचा ओरवायासाठीं दगड इ॰ बांधिलाअसतो ती.

**पाचारण**, न॰ आकारण.

**पाचारणें**, कोणेकास विवक्षित देशीं येअसें म्हणणें; २, कोणेकास कुशलप्रश्नानें सन्मानित करणें; ३, न॰ ग्रामांतराचा ग्रामीं स्थितजो इष्टमित्रादि त्यास जें पुसणें सांगून पाठवितात तें; ४, वा॰ कोणी मेलाअसतां त्याचा घरीं समाचारार्थ जाणें.

**पाचावा**, पु॰ दे॰ज्वरादि दुखणें एकदांबरें आलें असतां दृष्टिविकार आल्यामुळें पुनः जें उलटून तेंच दुखणें येतें तो; २, कों॰ पाचुंदा म्हणून वृक्ष आहे तो.

**पाचित**, ३ लिं॰ पक्ककेलाजो तो; तैलपाचित, घृतपाचित, म्ह॰ तैलादिकांत पक्क केलेला वडा इ॰ ब्राह्मणपाचित, स्त्रीपाचित, म्ह॰ ब्राह्मणादिकानें पक्क केलेला इ॰ समास जाणावे.

**पाँची**, स्त्री॰ पांचरुपयांचें एकरूबर्णाचें नाणें आहे.

**पाँचींव**, न॰ रा॰ गुरांचें जें मूत्र तें.

**पाचुंदा**, पु॰ एकवृक्षआहे ज्याचे लांकडाचे मणि आला पाचावा झाला आहे त्याचे हातांत किं॰ गळ्यांत बांधितात तो; २, गवत, कडबा, इ॰ दिकांचे पेंढयांचें पंचक तो; ३, भक्षणातिशयादिवर्णन प्रसंगीं लाडू, पोळी, इ॰ कांचे पंचकास म्ह॰.

**पाचू**, स्त्री॰ पाच म्हणून जें रत्न ती; उ॰ पाचूचेपदकरुळें स्मरमना श्रीदेवकीनंदना.

**पाँचेरूं**, न॰ रा॰ पाचर.

**पाचोळा**, पु॰ कडबा, वेळू, इ॰ कांचा पातेरा.

**पाज**, स्त्री॰ रा॰ सह्याद्रि इ॰ मोठेपर्वतांवर चढायास घाटा वांचून इतरजी चोरवाट असते ती.

**पाजण**, न॰ नवें वस्त्र करायाचें असतां त्यासूताचे ताण्यास पूर्वीजी खळ देतात तें.

**पाँजणी**, स्त्री॰ रा॰ सूत, दोरी, इ॰ पांजण्याचा व्यापार किं॰ तज्जनित सूत्रादिकावर संस्कार होतो ती.

**पाँजणें**, रा॰ सूत, दोरी, इ॰ काष्ठादिकानें घासून साफ करणें किं॰ हस्तादिकावरून दोरीबळानें घासत गेल्यामुळें हस्तादिक खरचडला जाणें.

**पाजणें**, पिववणें.

**पाँजरा**, पु॰ वर आणि खालीं दोनफळ्या किं॰ पत्रे घेउन त्यांस सभोंवार गज मारून कीर, सालुंखी, इ॰ बाळगायास घर करितात तो; २, ला॰ मनुष्यादिकांचे पाठीचे कण्यांतून फुटून हाडें उरापर्यंत आलीं आहेत त्याविशिष्ट आकारास हाडांचा पांजरा म्ह॰.

**पाजवणें**, शस्त्रास धार यावयासाठीं शस्त्र साहाण इ॰ कांवर घांसणें; मिशीपाजवणें म्ह॰ गर्वानें आपल्यामिशीवरून हात फिरविणें.

**पाजळणें**, दिवटी, दिवा, इ॰ उजळणें; २, रा॰ पाजवणें; त्याचा टेंभा पाजळला म्ह॰ राजद्वारादिकांच्या ठायीं मोठी प्रतिष्ठा मिळाली.

**पाजी**, ३ लिं॰ वीर, सभ्य पुरुष, यांस उचित नव्हे असें जें युद्धपलायनादि हलकें अश्लाघ्य कर्म तें करायास जो लाजत नाहीं तो.

**पाझर**, पु॰ गूळ, मीठ, बर्फ, इ॰ कांस द्रव स्फुटतो तो; २, उदक, घृत, इ॰ कानें भरलेल्या मडक्यापासून किं॰ खडक इ॰ कांपासून थोडथोडा द्रवाचा स्राव होत असतो तो; दगडास पाझर आणणें म्ह॰ आर्जवाद्यनेक युक्तींनीं केवल निर्दयास दया अदत्त शिरोमणीस कांहीं दानवासना उत्पन्न करणें असा अर्थ.

**पाझरणें**, गूळ, इ॰ क द्रव विकारातें पावणें; २, मडकें इ॰ क पाझरानें युक्त होणें किं॰ त्यांतील जलादिक पाझरपणें बाहेर वाहणें

**पाट**, पु॰ बसायासाठीं लांकडाचें आसन करितात तो; २, नदी, तळें, इ॰ कांपासून खणून विवक्षित देशीं जें पाणी नेलें असतें तो किं॰ तें पाणी जायाचा मार्ग तो; ३, शूद्रादिकांच्या स्त्रिया पुनर्विवाह करितात तो; ४, गोणताट, पडम, इ॰ वस्त्र विणते समयीं जी रुंदी धरली असते तितकेंच रुंदीचें जें तें वस्त्र तो; उ॰ तीन पाटांची धोंगटी केली म्ह॰ रुंदच रुंद होते; ५, डोकीचे केशांचा जो वस्तर्यानें काढिला पट्टा तो; ६, रा॰ न॰ बैल, टोणगा, इ॰ कांचा गाय, म्हैस, इ॰ कांवर उडण्याचा जा आवृत्ति त्या मध्ये; ७, पु॰ कों॰ नदीचें जें पात्र तो.

**पाटकरी**, पु॰ पाटाची बायको जाणें केली आहे तो.

**पाटकरीण**, स्त्री॰ पुनर्विवाह केला आहे जिणें ती.

**पाटकरूं**, न॰ पाटकरीण निंदावृत्ति; म्ह॰ पाटकरूं तें बटकरूं.

**पाटकुळी**, स्त्री॰ रा॰ लहान जो पाणी पाववयाचा पाट ती.

**पाटणी**, स्त्री॰ पाटण्याचा जो व्यापार किं॰ तद्द्वारा जालें जें आच्छादन ती.

**पाटणें**, तक्तपोशीनें गृहप्रदेश आच्छादित करणें.

**पाटपासोडा**, पु॰ कों॰ विवाहादिकांत वधूवरें बसायासाठीं सखलाद इ॰ वस्त्रानें आच्छादित दोन तीन पाट पंक्तीनें संलग्न मांडितात तो.

**पाटल**, पु॰ सं॰ ईषत् पांढरेपणानें युक्त जो रक्तवर्ण तो; २, ३ लिं॰ तद्विशिष्ट तो.

**पाटली**, स्त्री॰ स्त्रियांचें हस्तभूषण आहे.

**पाटव**, न॰ सं॰ पटुपणा.

**पाटवड**, स्त्री॰ रा॰ पाटाचें पाणीं वहावयाचा जो खणून करितात मार्ग ती.

**पाटवडी**, स्त्री॰ हरभर्याचा पिठाचा शिजवून जा बरफी सारिख्या तोंडीं लावायाकरितां वड्या करितात ती.

**पाटवण**, न॰ दे॰ पाण्याचा जो पाट तें.

**पाटवणी**, न॰ पाटाचें जें पाणी तें.

**पाटसरी**, स्त्री॰ जई.

**पाटस्थळ**, न॰ पाटाचे पाण्यानें शेत, आगर, इ॰ जेथें होतें तें स्थळ.

**पाटा**, पुं॰ पुरण, कोशिंबीर, इ॰ जाजवर वाटितात तो दगड; २, एकसारिखी लागत गेली जी मोठी शेतजमीन तो; कोणेक देशांचा पाटावर वंटा होणें म्ह॰

स्॰ दुष्काळ, गलीम, इ॰ कानें सत्यानास होणें; अन्माच्या पाटावरवंटा घेणें स्॰ जन्मपर्यंत पोषणाविषयीं पक्कर घेणें याचा प्रयोग निषेधार्थी.

**पाँटागर**, न॰ पाटाचे पाण्यानें करितात जें आगर तें.

**पाटाँव**, पु॰ न॰ अनेक चित्रविचित्रांकित रेशमी वस्त्र आहे; स्॰ वेडीचें सोंग घेतल्यास पाटांव फाडावें लागतें.

**पाटिलकी**, स्त्री॰ पाटलाचा जो अधिकार ती.

**पाटी**, स्त्री॰ धुळाक्षरादि लिहायाची जी फळी असते ती; २, मोटीजी टोपली ती; ३, रा॰ तुळई इ॰ व्हावयाजोगें मोठें लांब चौरस लांकूड ती; ४, चरकाचे मुसळाचे खालीं आणि वर जा दोन आडफळ्या बसविल्या असतात त्या प्रत्येकीं; ५, कों॰ रुंदी थोडी आणि लांबी बहुत असें जें शेत ती; ६, दे॰ आट्यापाट्यांची जी फळी ती; ७, कों॰ घरटाचे किलावर जी आडवी लोखंडाची पट्टी बसवितात ती; ८, स्त्रियांचें कंठभूषण आहे.

**पाँटी**, स्त्री॰ मोठीजी टोपली ती.

**पाटील**, पु॰ गांवचा कारभार करणारा वतनदार अधिकारी आहे.

**पाटीलपटवारी**, पु॰ पाटील, कुळकरणी इ॰ तो.

**पाँटें**, न॰ रा॰ मोठी रुंदट जी पांटी तें.

**पाटेल**, पु॰ पाटील.

**पाटेलकी**, स्त्री॰ पाटिलकी.

**पाठ**, पु॰ विद्यार्थी गुरूपासून स्वाध्यायदिवशीं जितकें व्याख्यान शास्त्रादिकांचें घेतो तो; २, परिपाठ; ३, स्तोत्रादिकांची जी आवृत्ति तो; ४, कोणेक ग्रंथामध्यें एका पोथीवर एक आणि दुसरे पोथीवर दुसरे प्रकारचा परंतु अशुद्ध नव्हे अर्थ ही प्रायः सारखा मिळतो असे जे दोन प्रकारचे अक्षरक्रम असतात ते प्र॰; ५, ३ लिं॰ तोंडपाठ; ६, स्त्री॰ शेळीचें जें स्त्र्यपत्य ती; ७, कंबरेपासून मानेपर्यंत जो शरीराचा मागला भाग ती; ८, फूल, पान, चर्म, साल, इ॰ कांचा बाहेरचा जो भाग ती; ९, तवा, पाट, सहाण, पाटा, यांचे प्रसिद्ध कार्योपयुक्त आंगाचा मागचा जो भाग ती; १०, मश्रू, किनखाप, इ॰ कांचें दर्शनीय अंगाचें प्रतिपक्षी जें आंग ती; पाठरिघणें किं॰ निघणें स्॰ भयादिकांमुळें कोणेक समर्थाचा आश्रय करणें; पाठघेणें किं॰ पुरवणें स्॰ कोणेकास विवक्षित कार्य करण्याविषयीं सततत्वष्ट लावित असणें किं॰ कोणेक कार्यावर निरंतर झटून उद्योग करित असणें किं॰ कोणेकाचे हात धुवून पाठीस लागणें; पाठसोडणें स्॰ कोणेकाची पाठ घेण्याचा जो व्यापार धरिला होता त्यापासून निवृत्त होणें; पाठधरणें स्॰ चालत्यास मागून धांवत जाउन गांठणें; पाठदेणें स्॰ कोणी कलहादि करीत असतां आपल्यास सामर्थ्य असतां ही उपेक्षा करणें; त्याची त्यास पाठ आहे इ॰ स्थलीं पाठ बळ आहे असा अर्थ होतो; शत्रूस पाठदेणें किं॰ दाखविणें स्॰ युद्धादि प्रसंगीं पळून जाणें; पाठकांपणें स्॰ भयानें किं॰ घोर कर्म पाहिल्यानें शरीर कांपणें; पाठटाकणें स्॰ पासलपट्टी करणें; पाठराखणें स्॰ कोणेकाचा पाठराखेपणा करणें; पाठभुईस लागणें स्॰ द्रव्यहीनतेमुळें किं॰ वार्द्धक्यामुळें तत्तद्व्यापारीं केवल असमर्थ होणें; पाठउचलणें स्॰

ह्म० तद्विपरीत समर्थदशा पावणें; ह्म० वारावाहील तशी पाठ करावी; शत्रूची पाठ तुडविणें ह्म० आघाडीपिछाडी मारणें; पाठवळणें ह्म० विवक्षित देशाकडे पाठ व्हावयाजोगें फिरणें; पाठीवर असणें ह्म० प्रभु इ० कानें प्रमादादि जालें असतां शिक्षा करण्याविषयीं मित्र, बंधु, इ० कानीं प्रसंगीं आपत्ति दूर करण्याविषयीं, शत्रूनें नाश करण्याविषयीं, आश्रयभूत असणें; उ० या माणसांचा पाठीवर कोणी असल्याशिवाय काम करणार नाहींत; उ० आमचे पाठीवर ईश्वर आहे; चोराचे पाठीवर दोनशें स्वार पाठविले आहेत; संततिक्रमानें कनिष्ठ सोदरस्थानीं असणें; उ० माझे पाठीवर पांच भावंडें आहेत; संसारादि पाठीवर पडणें ह्म० अंगावर पडणें असा अर्थ जाणावा; कांहीं एक कार्य पाठीवर टाकणें ह्म० आज करूं उद्यां करूं अशा खालीं टाकणें; पाठीस लागणें ह्म० कोणेक गोष्ट सुटेना अशा प्रकारें जडणें किं० कोणेक जाणारास मागून धरायास धांवणें किं० पाठपुरवणें; पाठीस लावणें ह्म० आग्रहानें कांहीं एक कोणेकाचे पदरीं बांधणें; याचें काळीज पाठीस आहे ह्म० हा पराकाष्ठेचा साहसिक आहे; पाठीवरून असणें ह्म० आपले मागून स्वसोदरस्थानीं असणें; उ० माझे पाठीवरून चार भाउ जाले; पाठीशीं, आपल्यास अवश्य निर्वाह केला पाहिजे अशा प्रकारें आपल्या संबंधांत; उ० हें काम मीं आपले पाठीशीं लावून घ्यावें तर माझामागें हजार लचांडें आहेत; पाठीस पोट लागणें किं० पोट आणि पाठ एक होणें ह्म० अन्नांश कांहीं नसल्यामुळें अतिशयित पोट खोल जाणें; पाठीशीं घालणें ह्म० दुसऱ्याचा अपराध्यास आपण



आश्रय देऊन ठेवणें; पाठीस तेल लावून ठेव इ० ज्याला अपराध करतो आहेस तर मार घेण्याविषयीं सिद्ध होउन राहा असें तात्पर्य; पाठीं ह्म० पाठीमागें; उ० त्याचे पाठींपोटीं कोणी नाहीं; पाठीशीं ह्म० पाठीमागें; उ० माझे पाठीशीं शंभर माणसें आहेत; पाठीमागें ह्म० आस वास्तविक पाठ आहे असे जे मनुष्यादि त्याचे पाठीमागें किं० परोक्ष; उ० आपले पाठीमागें आपल्यास दिसत नाहीं; पाठीमागें कोणास कोण चागलें ह्मणतो; विवक्षित देशापासून किं० कालापासून अतिक्रांत जे पूर्ववर्ति काल किं० देश त्यांचा ठायीं; उ० आतां तो गांव पाठीमागें राहिला; वर्षाचे पाठीमागें आपणास कांहीं समजत नव्हतें; कोणेक क्रिया किं० मनुष्यादिक होउन गेल्यावर अनंतर कालीं; उ० बापाचे पाठीमागें मुलानें नावलौकिक चांगला मिळविला; विभक्त जाल्याचे पाठीमागें जें जानें मिळविलें तें त्याचें; कोणेक पदार्थाचा आपल्याकडील जो भाग तद्विपरीत भागाकडे; उ० त्या आंब्याचा पाठीमागें तुझी गाय चरती; चालणारा जो पदार्थ तो जो शरीरभाग पुढें करून चालत असतो तद्विपरीत भागाकडे; उ० घोड्याचे पाठीमागें जाउं नको लात मारील; आपण प्रवासार्थ गेलों असतां आपलें सर्व संभाळायास अधिकारी पुत्र, बंधु, इ० जे संबंधी असतात त्या कोटींत; उ० मी येथें एकटाच आहें परंतु पाठीमागें वीस मनुष्यें आहेत; पाठीमागें जो असेल तो क्रिया करील; कोणेक क्रिया जिकडून आली पुनः विपरीतगतीनें तिकडे; उ० पागोटीं आणलीं होतीं तीं पाठीमागें दिलीं; पाठीमागें सरणें ह्म० कोणेक कार्याविषयीं

मागेंसरणें; उ॰ हाकोणतेही साहसकर्माविषयींपाठीमागें सरणार नाहीं; कोणेकाचा पाठीमागें लागणें ह्म॰ कोणेकाचे नादीं लागणें; पाठवळणें ह्म॰ पाठमोरा होणें.

**पाठक**, पु॰ अध्यापक.

**पाठकांब**, स्त्री॰ दे॰ वेळूचा पाठीसहित जी कांबती.

**पाठकुळी, पाठकोळी**, अ॰ दे॰ घेणें इ॰ कांचा योगीं प्र॰ पोर इ॰ उचलून त्या यासाठीं पाठीवर घेणें.

**पाठकोरा**, ३ लिं॰ एका अंगानें लिहिल्यामुळें दुसरें अंग ज्याचें कोरें आहे तो कागद.

**पाठकोरें**, न॰ एक्या अंगानें जो कोरा कागद तें.

**पाठचा**, ३ लिं॰ पाठीमागचा किं॰ आपले पाठीवर जालेलें भावंड तो.

**पाठजाळ**, पु॰ आपले पाठचे भावंडास कांहीं वाईट झालें असतां जो शोकादिक होतो तो; ह्म॰ पाठजाळ पुरवेल पण पोटजाळ पुरवत नाहीं.

**पाठण**, न॰ कों॰ मारबसणें इ॰ प्रसंगीं पाठीस पाठण ह्म॰; २, रा॰ चोळीचा पाठीवरचा जो प्रदेश तें.

**पाठपुरावा**, पु॰ कोणेक कार्यार्थ जो प्रवृत्त आला त्याचे पाठीमागून अनेक प्रकारें साहित्य करण्याचा जो व्यापार तो.

**पाठपोट**, अ॰ दोहीं पृष्ठांकडून लिहिण्याचें किं॰ वाचण्याचें वि॰; उ॰ पुण्याहून कागद पाठपोट लिहून आला; २, दे॰ न॰ वायकामकरसंक्रांतीचे दिवशीं दोन जोगल्या स्ततानें गुंडाळून परस्पर वाण देतात तें.

**पाठबळ**, न॰ कोणेक कार्याविषयीं प्रवृत्त आलेल्या समागाहून पाठपुरावा होण्याविषयीं कोणेक बंधु इ॰ समर्थाचा आश्रय असतो तें.

**पाठबीळ, पाठबेळ**, न॰ रा॰ पाठीकडल्या अंशाची सूप इ॰ करण्याचे उपयोगी जी पातळ वेळू इ॰ कांची कांबतें.

**पाठमोरा**, अ॰ ज्याची पाठ ज्यासमोर आहे तो त्यास; २, गमनादि प्रसंगीं जिकडे मुख असावें तिकडे पाठ करून; उ॰ मला अडचणीमुळें फिरायास सांपडेना ह्मणून पाठमोरा माघारा सरलों; कलहादिकांविषयीं पाठमोरा होणें ह्म॰ पराङ्मुख होणें; पाठमोरा पहाणें ह्म॰ मागें दृष्टि करून पहाणें.

**पाठराखणा**, ३ लिं॰ नव्यानेंच मुलगी सासर्यास जाते वेळेस जो माहेरचा कोणी बरोबर जाउन जो रहातो तो.

**पाठराख्या**, ३ लिं॰ पाठराखणा; २, कोणेकास कोणेक जो पाठपुरावा करितो त्याचा तो.

**पाठरिघावा**, पु॰ वा॰ पाठबळ.

**पाठलग**, पु॰ वा॰ विद्यादिसाधनार्थ गुरू इ॰ कांचे संबंधांत सर्वदा रहाण्याचा जो प्रकार तो; उ॰ त्याचा तूं पाठलग सोडूं नको ह्म॰ बरें होईल.

**पाठलाग**, पु॰ चोरादिक कोणी पळाला असतां त्यास कोणी एक पाठवून धरण्याविषयीं जो उद्योग तो.

**पाठवण, पाठवणी**, स्त्री॰ आपले घरीं कोणी आलेला जो भिक्षकादिक त्यास कांहीं दक्षिणादिदानपूर्वक निरोप देतात ती किं॰ तें दक्षिणादि द्रव्य ती.

**पाठवणें**, धाडणें.

**पाठवळ**, न॰ पाटाळ, ह्म॰ शेटशा हाणा आणि बैल

पाठबळ.

**पाठशक्ति**, स्त्री॰ कांहींएकग्रंथ पाठ करण्याचें किं॰ पाठ ह्मणण्याचें बुद्धिसामर्थ्य तें.

**पाठशाला, पाठशाळा**, स्त्री॰ शास्त्रादि पाठ सांगण्यासाठीं जी शाळा केली असत्ये ती.

**पाठाड**, न॰ मार देणें इ॰ प्रसंगीं पाठीसच ह्म॰

**पाठाण**, न॰ पाठाड.

**पाठांतर**, न॰ कोणेक ग्रंथामध्यें श्लोक, वाक्य, पद, इ॰ विषयीं जो पाठ चालत असतो त्याहून विलक्षण क्वचित् प्रत्यंतरादिकांच्याठायीं उपलभ्यमान असतो जो इतरपाठ तें; २, तोंडपाठ जो श्लोकादि ग्रंथ त्याचा कोणेकापाशीं असतो जो भरणा तें किं॰ त्याभरण्यानें त्यापुरुषास असतें जें वैशिष्ट्य तें; ३, तोंडपाठ.

**पाठार**, न॰ ग्रंथादिकांत पाठीसच ह्मणतात; उ॰ अग्नीचें पाठारी पिके होती; २, पर्वतादिकांचें जें पठार तें; ३, महागिरी बांधते समयीं तळीं जें लांब उभें लांकूड प्रारंभीं घालितात तें; ४, ला॰ कोणेककार्याची जी आरंभावस्था तें; उ॰ त्यानें नुकतें घर बांधायाचें पाठार घातलें आहे.

**पाठाशक्ति**, स्त्री॰ पाठशक्तीचा अपभ्रंश.

**पाठाळ**, न॰ पाठीवरून ओझें किं॰ स्वारी वाहाण्याचे उपयोगीं जें घोडें, बैल, उंट, इ॰ तें.

**पाठिंगा, पाठिंबा**, पु॰ ज्याचें ज्यास पाठबळ आहे तो बंध्वादि त्याचा.

**पाठी**, ३ लिं॰ ज्यास पाठशक्ति मोठी तो.

**पाठीमागचा**, ३ लिं॰ पाठीमागें स्थित्यादि द्वारा ज्याचा संबंध आहे असा जो कांहींपदार्थ किं॰ कांहींगोष्ट इ॰ तो.



**पाठीमागला**, ३ लिं॰ पाठीमागचा.

**पाठीमागून**, अ॰ कांहींएकपदार्थाचा किं॰ मनुष्यादिकांचा जो पाठीमागला भाग किं॰ प्रदेश त्यातें धरून; उ॰ माझे पाठीमागून तूं विस्तून येउं नको; हें पागोटें पाठीमागून चांगलें दिसतें; २, कोणेक व्यवहार, काळ, किं॰ देश यांचा अतिक्रांत जो विभाग त्यानें पुनः धरून; उ॰ हें वाक्य पुनः पाठीमागून ह्मण; पाठीमागून जसा संप्रदाय चालत आला आहे तसें चालावें; ३, कोणेक मनुष्यादिक किं॰ कार्य होउन गेल्यानंतर; उ॰ बापमेल्यानंतर पाठीमागून यानें पैसा मिळविला; तुह्मीं जेवल्यानंतर पाठीमागून आह्मी जेवूं; ४, विवक्षित मुख्य समयातें अतिक्रमून; यंदा पाठीमागून लावणी झाली; ५, परोक्षता धरून; उ॰ हा तोंडावर गोड बोलतो आणि पाठीमागून शिव्या देतो.

**पाठून**, अ॰ पाठीमागून.

**पाठोपाठ**, अ॰ एकानें आरंभिली जी क्रिया तदव्यवहितोत्तरक्षणीं तदन्यकर्तृक तत्सजातीय क्रियेचा आरंभ होई असें; उ॰ तुझे पाठोपाठ मी निघालों.

**पाड**, पु॰ निरर्थ; त्याचा काय पाड आहे इ॰ स्थलीं तो कःपदार्थ असा अर्थ; २, आंबा, बोर, चिंच, इ॰ जो हा वृक्षांचीं फळें वृक्षावर कांहीं पिकूं लागण्याची जी दशा ती; ३, दे॰ वृक्षावरच ईषन्मात्र पिकलेला जो आंबा तो; पाडचा ह्म॰ वृक्षावरच पिकलेलें असें आंबा, पेरू, बोर, रामफळ, इ॰ तो, वि॰ त्या सन्नदशापन्न जो तोही.

**पाँड**, पु॰ तीसकाठ्यारूप जें क्षेत्रमापण, किं॰ क्षेत्र तो.

**पाडकुला**, ३लिं० रा० वयातीत असतां हीं आचे अंगावर कोंवळेपणा आणि कांहीं पुष्टता दिसत असल्ये असा जो पुरुषादिक तो; उ० तिला पंधरा लेंकरें आलीं तथापि पाडकुली दिसत्ये.

**पाडगें**, न० पासोडी इ० कांचें एकपट्टें; २, लुगडें, खणाळें, इ० कोरे कापडाचा जो व्यक्ति त्यास म०, क्रयविक्रय व्यवहार प्रसंगीं म०.

**पाडणें**, पडेअसा करणें.

**पाडय**, पुं० पाडांव.

**पांडव**, पु० पुराणप्रसिद्ध पांचजण भाउ राजे आहेत; २, ला० पांचवा संख्येस म्ह०.

**पांडवकृत्य**, न० डोंगर, खडक, पोंखरून देवालयें सभामंडप इ० कांहीं मनुष्य शक्तीनें व्हावयास कठिन दिसावा ओगेंजे आकार कोठें कोठें आहेत त्यांस म्ह०.

**पाडवणें**, पाडणें.

**पाडवा**, पु० प्रतिपदा.

**पांडवांचें लेणें**, न० पांडवकृत्य.

**पाडस**, न० हरिणीचा वत्स तें; २, ग्रंथादिकांत गाय मनुष्यादिकांचे ही वत्सांस म्ह०; ३, ३लिं० पाडसा.

**पाडसा**, ३लिं० कों० तान्हें नव्हे असें जें गोमहिष्यादिकांचें वांसरू तो किं० तान्हें नव्हे असें जें दुपतें गुरूं इ० तो.

**पाडळ**, स्त्री० एक ओषधी आहे.

**पाडा**, पु० गाईचें जें पुमपत्य तो; प्रायः अल्पवयस्क वृत्ति; २, कों० पोफळ, नारळ, कोकंब, इ० वृक्षसमुदायाचीं जून पाडायास आलेलीं फळें एकवार पाडण्याचा जो व्यापार तो; ३, कोणे कगांवचीं जी मुख्य वसति असल्ये तदितर दाहापांच घरांचा स्थलभेदें करून जा अनेक वसत्या असतात त्याप्रत्येकीं; ४, एकादिक संख्या एकादि दशांत संख्यानीं गुणून जे मुलांस लिहायास शिकवितात ते प्रत्येकीं

**पाडाचा**, ३लिं० वृक्षावरच पिकलेलें ओंबा, बोर, इ० फल तोवत दासन्न दशापन्न जो तो ही.

**पाडाव**, पु० दे० पराजय; उ० त्यानें दोन शब्दांत त्याचा पाडाव केला; २, ३लिं० पराजित; उ० मी त्याचीं घोडीं पाडाव करून आणिलीं.

**पाडांव**, ३लिं० पाडाव द्वितीयार्थी.

**पांडित्य**, न० शास्त्रार्थकथन, तत्वविवेचन, इ० रूपजें पंडितकर्म तें; २, भाषण चातुर्य.

**पाडी**, स्त्री० गाईचें जें स्त्र्यपत्य तीं.

**पांडु. पांडुर**. ३लिं० सं० पांढरा.

**पाडेकरी**, पु० कों० नारळ, पोफळ, इ० कांचा पाडा करण्याविषयीं जो कुशल तो.

**पांड्या**, पु० ग्रामाद्यधिकारी एक वतनदार आहे; २, दे० केवल लहान नव्हे आणि केवल प्रौढ नव्हे असा जो वाघ तो.

**पांढर**, स्त्री० देवतारूपें करून मानलेली जी ग्रामाचे चतुःसीमेचा आंतली भूमि ती; उ० तूं या गावांत राहून अशालवाड्या करितोस पण पांढरीस मानणार नाहीं; २, गांवचे वतनदारांचा किं० गावांत राहाणारे यच्चयावत् मनुष्यांचा जो समुदाय ती.

**पांढरपेशा**, पु० ब्राम्हण, परभू, सोनार, कांसार, लोहार इ० जाजाति तो, म्ह० जाजाति मुख्यत्वेंकरून कृषिकर्म करीत नाहींत.

**पांढरमाती**, स्त्री० पांढरी जी माती ती.

**पांढरवट**, ३लिं० ईषत् जो पांढरा मृत्तिकादिपदार्थ तो.

**पाँढरा**, ३लिं॰ दुधाचे वर्णासारिखा जो वर्ण तो; २, तद्विशिष्ट; ३, संकेतानें सर्पास म्ह॰; पांढर्यावर काळें करणें म्ह॰ आपण दस्त ऐवजीं गुंते असा लेख करून देणें.

**पाँढरापरीस**, पु॰ पांढरे पायांचा जो मनुष्यादि त्यास म्ह॰.

**पाँढरापाल**, ३लिं॰ रोगादिकानें शरीर नीरक्त झाल्यामुळें पांढरे पालीसारिखा दिसूं लागला तो.

**पाँढराफटफटीत**, ३लिं॰ केवळ जो पांढरा तो; २, जेथें कांहीं लाली इ॰ वर्णांतर असावें तें नाहीं म्हणून पदार्थ निस्तेज दिसतो तेथेंच प्रायः प्र॰; उ॰ पुतळीपुढें बारांचे दराचें सोनें पांढरें फटफटीत दिसतें.

**पाँढराभोँपळा**, पु॰ दुधभोंपळा.

**पाँढरासफेत**, ३लिं॰ स्वच्छ पांढरा जो वस्त्रादि पदार्थ तो.

**पाँढरी**, स्त्री॰ पांढर.

**पाँढरेंपाणी**, न॰ केवळ पातळ जें ताक त्यास म्ह॰.

**पाँढरेपायाँचा**, ३लिं॰ जेथे जाईल तेथें वाटोळें होतें असा अपयशाचा जो मनुष्यादि त्यास म्ह॰; कोणकाचें उखळ पांढरें होणें म्ह॰ दारिद्र्यदशा जाउन कांहीं संपत्तिदशेतें पावणें.

**पाँढुरका**, ३लिं॰ पांढरा असा जो दिसतो तो, जेव्हां पदार्थाचें अमुकत्वें करून ज्ञान नाहीं केवल तन्निष्ठ पांढरेपणामात्र दिसतो इ॰ कांहीं विषय असतां प्र॰; उ॰ तो मार्गावर कोणसा पांढुरका दिसतो तस्मात् तो कांबळ्या नव्हे कोणी धोत्र्या आहे असें वाटतें.

**पाणउतारा**, पु॰ कठोरभाषण, शिवी, गाळ, पराजय, इ॰ कें करून होतो जो तेजोभंग तो.

**पाणकापड**, न॰ कापल्या अंगावर ओल्या वस्त्राची जी पट्टी बांधितात तें.

पाण

**पाणकोंभडा**, पु॰ कोमड्यासारिखा पाण्यांत एक जीव असतो तो.

**पाणक्या**, पु॰ लोकांचे घरीं पाणी भरून उपजीविका करितो तो प्रायः ब्राह्मण.

**पाणखार**, पुं॰ उकडांबे इ॰ खारवायासाठीं पाण्यांत मीठ घालून खारें पाणी करून ठेविलें असतें तो.

**पाणघर**, न॰ पाणी तापवून स्नान करायाकरितां जें स्थल केलें असतें तें.

**पाणचट**, ३लिं॰ जास मिष्टपणा कांहीं कमी असा जो सद्रवपदार्थ तो; २, ला॰ ज्यांत रस नाहीं किं॰ तात्पर्य नाहीं असें जें भाषण, गाणें, इ॰ किं॰ तादृश भाषणादि करणारा मनुष्य तो.

**पाणचूल**, स्त्री॰ पाणघरची जी चूल ती.

**पाणजंजाळ**, न॰ कों॰ पर्जन्य बाहुल्यादिकामुळें जिकडे तिकडे पाणीच पाणी अशी जी दशा होते तें.

**पाणजाँवई**, पु॰ जांवयाचा बंधू सथट्टेनें म्ह॰.

**पाणढाळ**, पु॰ घराचे पाख्याचा किं॰ भूमीचा कोणेक दिशेकडे जो क्रमें करून उतरतेपणा असतो तो.

**पाणथरी**, स्त्री॰ पोटांत एक रोग होत असतो ती.

**पाणथळ**, न॰ पर्जन्य गेला असतांही जेथील ओल एकाएकीं उडत नाहीं व उष्णकालीं खणिलें असतां जवळच उदक लागतें अशी जी भूमि तें; २, जास्थलीं पाटाचें पाणी इ॰ सोय असती अशी जी जमीन तें.

**पाणंद**, स्त्री॰ दोहों कडून कुंपण, शेरताटी, इ॰ आवरण जास आहे असा जो ग्रामांतील किं॰ ग्रामसन्निहित

हित

हितमार्ग तो.

**पाणदळ**, न॰ पाणथळ.

**पाणपट्टी**, स्त्री॰ पाणकापड.

**पाणपिकलें**, न॰ कों॰ पाउस पडत असतांच पिकतें असेंजें हळवें धान्य त्याचें पावसाळ्यांत करितातजें शेत त्यास प्रसंगविशेषीं ल॰.

**पाणपीक**; न॰ कों॰ पाणपिकलें.

**पाणपोई**, स्त्री॰ पन्हेरी प्रथमार्थी.

**पाणफोल**, न॰ रा॰ भाताचे फुलावर पर्जन्य पडल्यामुळें जें त्यामध्यें फोल होतें तें.

**पाणबुडया**, पु॰ नदी, समुद्र, इ॰ कांत मोतीं इ॰ नव्या पदार्थ काढायासाठीं चिरकाळ बुडण्याचा ज्याणें अभ्यास केला असतो तो.

**पाणभर्या**, पु॰ पाणक्या.

**पाणमांजर**, न॰ पाण्यांत मांजरासारिखा एक जीव असतो.

**पाणमोट**, **पाणमोटली**, **पाणमोटळी**, स्त्री॰ प्रसूतिकालीं गर्भ बाहेर पडायाचे पूर्वी पाण्यानें भरलेली एक चर्माची मोट बाहेर येत्ये ती.

**पाणरस**, पु॰ रा॰ आंब्याचा एकवार रस काढिला असतां पुनः त्याखालीं कोयांत पाणी घालून रस काढिता तो.

**पाणलोट**, पु॰ पाणढाळ.

**पाणवठा**, पु॰ गांवचे लोकांनें पाणी भरून आणणें वस्त्रें धुणें, इ॰ कर्मांचें नद्यादिकांवर जें स्थल असतें तो.

**पाणवळ**, न॰ कों॰ पाणथळ; २, ३ लिं॰ पाणवट प्रथमार्थी.

**पाणशाई**, स्त्री॰ मृदंगास केवळ जी पावळशाई देतात ती.

**पाणशेंग**, स्त्री॰ संकेतानें मासळीस ल॰.

**पाणसरडें**, न॰ पाण्यांत एक सर्पजातीय जीव असतो तें; २, रहाटाचीमाळ सरूं नये म्हणून जें प्रतिबंधक लांकूड बांधितात तें.

**पाणसरा**, पु॰ घाटानें बैल, घोडें, इ॰ आतें त्यापासून कांहीं कर घेउन घाट कोसळला असेल तो नीट करावा इ॰ कर्मांचा अधिकारी वतनदार असतो तो.

**पाणसा**, पु॰ कों॰ गोमहिष्यादिकांस जीवनपोषणादि हेतुभूत जें तत्तद्देशीय उदक तृण इ॰ तो; उ॰ या गांवचा पाणसा गुरांस मानत नाहीं.

**पाणसाप**, पु॰ जलांत राहाणारा साप आहे.

**पाणसांपूड**, स्त्री॰ कों॰ गृहादिकांचे पाख्याचे खालचे बाजूचे वांशांचे टोंका जवळ जी मोटी मजबूद सांपूड बांधित असतात ती.

**पाणसाळ**, स्त्री॰ भूम्यादिकाचें उच्चत्व प्रयुक्त जें समत्व, विषमत्व, तें पाहाण्याचे उपयोगी गंवडी इ॰ कां पाशीं ओळख्यानें विशिष्ट काष्ठाचें त्रिकोण आउत असतें ती.

**पाणारणें**, रा॰ फणस, आंबा, इ॰ कांचें फल इ॰ पर्जन्यादि संबंधी उदकाचा आंत संबंध झाल्यामुळें त्याचा स्वादादि बिघडायाजोगें विकृतीनें विशिष्ट होणें.

**पाणि**, पु॰ सं॰ हस्त; दंडपाणि, वज्रपाणि, इ॰ स॰ आणावे.

**पाणिग्रह**, पु॰ विवाहधर्मानें स्त्रीचा जो स्वीकार तो.

**पाणिग्रहण**, न० पाणिग्रह.

**पाणिवेद्य**, पु० विवार इ० उपद्रवांवर पाणी अभिमंत्रितकरून देतो तो.

**पाणी**, न० उदक; २, शस्त्रादिलोहमय पदार्थांस तापवून पाण्यांत बुडविलें असतां तत्संस्कारानें जो गुणविशेष उत्पन्न होतो तें; ३, तेज लाक्षणिकार्थी; उ० मोती मोठें आहे पण पाणी कमी; लढकून दोन आपसांत करायास अंगीं पाणी पाहिजे; ४, काहींपदार्थावर स्वर्णादिकांचा जो द्रव करून लावितात तें; पाणीपाउस, पाउसपाणी, केरपाणी, धुणेंपाणी, स० पाणीभरणें, केरकाढणें, धुणीधुणें, इ० नित्य व्यवहाराचा उपयोग असा अर्थ जाणावा; पाण्यावरची रेषा किं० रेघ स० लामलेंच दुसरें प्रकारचें व्हायाचें असें जें कोणकाचें मनितादिरूप भाषण त्यास म्ह०; कोणेकास पाण्यापेक्षां पातळ करणें म्ह० त्याचा केवळ पाणउतारा करणें; कोणेकास पाणी पाजणें म्ह० पराजित करणें.

**पाणीदार**, ३ लिं० ज्याचे अंगीं पाणी चांगलें आहे तो रत्नादि पदार्थ किं० मनुष्यादि तो.

**पाणीपाउस**, पु० पाउस इ०.

**पाणेरा**, पु० **पाणेरें**, न० कों० पाणी भरलेली भांडीं ठेवायासाठीं घरांत चिरेबंदी किं० चुन्याची भूमि करितात तें तो.

**पात**, स्त्री० कांदा, लसूण, भात, तृण, इ० कांचें जें पर्ण ती; २, धान्यमळायासाठीं खळ्यामध्यें तिवडापुरून त्याचे भोंवतीं कणसें इ० कांचे राशीवर फिरवाया करितां जी बैलांची पंक्ति बांधितात ती, धर धा० पो० म०; ३, पु० सं० पतन; ४, चंद्रसूर्याचें जें क्रांतिसाम्य ती; ५, व्यतीपात; ६, न० कों० पातें; ७, केवळ लाहान जो भाग तें.

**पांत**, स्त्री० कों० लावणी लावणें किं० रोप काढणें इ० व्यापारीं तन्नत्येकाचा सारखे रुंदीचा आपले समोरचा जो भूप्रदेश धरिला असतो ती.

**पातक**, न० अधर्म; २, ज्याणें लागतो जो दोष तें.

**पातकिरला**, ३ लिं० कों० पातळांगी मनुष्य तो.

**पातकी**, ३ लिं० पातक केलें आहे ज्याणें तो.

**पातडें**, न० पंचांग म ल०.

**पातफणस**, पु० फणसांत एक भेद आहे.

**पातवड**, पुं० कों० अळू इ० कांचे पानास डाळीचें पीठ लावून गुंडाळून शिजवून कापून तळून खावयासाठीं वड्या करितात तो.

**पातवडी**, स्त्री० पातवड.

**पातळ**, ३ लिं० ज्यामध्यें द्रवांश अधिक असा जो तक्रादि सद्रवपदार्थ; २, जाडपणास कमी असा जो फळी, पान, इ० पदार्थ, ३, विरल; उ० शेतभारी पातळ पेरलें स; ४, दाटन व्हे असें जें स्नेह, ममता, इ० तो; ५, कृश जें शरीर; ६, न० स्त्रियांचें नेसायाचें वस्त्र आहे.

**पातळपोट्या**, ३ लिं० ज्याचें पोट वर दिसत नाहीं तो.

**पातळाई**, स्त्री० दाटीचा प्रतिपक्षी जो धर्म ती; उ० मघा देवळांत दाटी होती आतां पातळाई झाली.

**पातळांगी**, ३ लिं० जन्मतः शरीरानें जो कृश तो.

**पातळांग्या**, ३ लिं० पातळांगी.

**पातळी**, स्त्री० दे० पातळाई; २, लोहाचें एक आउत आहे.

**पाताण्या**, पु० एक जाति आहे.

**पाताल**, न० भूलोकाचे खालीं सात लोक आहेत ते प्रत्येकीं;

२, खोलपणा आधिक्यें करून वर्णावयास असतां अतिशयोक्तीनें लचलचदेशास ल०; उ० एकेउपासानें डोळे पाताळांत गेले; पोट पाताळास गेलें.

पाताळ, न० पाताल.

पाताळयंत्र, न० उदेल इ० तेल काढायाचें पात्र आहे तें.

पाताळयंत्री, ३ लिं० ज्याची मसलत भारी खोल असल्ये तो.

पातित्य, न० सं० पतितपणा, दुष्कर्म केल्यामुळें जो पतितपणा येतो तद्विषयीं लोकांत म०.

पातिव्रत्य, न० पतिव्रतापणा.

पाती, स्त्री० अनेककृतव्यवहारांत अनेकांचे जे अंश असतात ते म०; उ० या सावकारींत चवघांचा पात्या आहेत; २, सोनें, रुपें, इ० कांचें साधकाम करण्याचें उपयोगी जोडां कांचा पत्रा असतो ती; ३, रा० पात प्रथमार्थी; ४, माडसुपारी इ० कांचें पर्ण ती.

पांती, स्त्री० पाती प्रथमार्थी.

पातीदार, ३ लिं० भागीदार.

पातें, न० डोळ्याची पांपणी; २, तरवार, सुरी, इ० कांचें जें पान तें; ३, रा० फणसांत जामध्यें आंठळ असतनाहीं असेजे केवळ बारीक गरे असतात तें; पात्यास पातें नलागणें ल० ईषन्मात्रहि निद्रा नलागणें.

पातेजणें, पात्यवणें.

पातेरा, पु० अनुपयोगित्वें करून विवक्षित वाळलेल्या पर्णांचा जो समुदाय तो.

पातेरें, न० कों० पातेरा.

पातेली, स्त्री० लहानजें पातेलें ती.

पातेलें, न० कढी, सांबारें. इ० करण्याचें उपयोगी ताम्रादिकांचें आकारविशेषाचें उथळ पात्र असतें तें.

पातोडा, पु० पापोडा.

पातोडी, स्त्री० पातवडी.

पातोळा, पु० तांदुळांचे पिठाचें पक्वान्न आहे.

पात्यवणें, रा० जो पदार्थ किं० व्यवहार निरंतर देखरेख इ० पूर्वक आपण संभाळायाचा तो दुसरा संभाळील असा विश्वास पावून त्याजवर ठेवणें किं० केवळ आपण देखरेख नकरितां मोकळा सोडणें; उ० नेणतेमुलावर घरपात्यवून बाहेर जातां येतनाहीं; विहिरीवर मुलास पात्यवूंनका.

पात्र, न० कांहींएकपदार्थ ठेवायास आधारभूतजें भांडें, पान, इ० तें; २, नदीच्यें पाणी जितकी रुंदी व्यापून चालतें तो तितका प्रदेश; ३, ला० दान, शाप, इ० देण्याविषयीं उचित जो ब्राह्मण अपराधी इ० तें; ४, प्रशंसानिंदा, इ० करण्याविषयीं उचित जो सद्गुणी दुर्गुणी इ० तें; ५, क्षमा, दया, इ० का विषयीं जें उचित उद्देश्य तें; ६, गुणदोष इ० कांचा जो निधि तें, सत्पात्र, दानपात्र, इ० समासहि जाणावे; ७, सं० नाटकामध्यें जीं सोंगें येतात तीं प्रत्येकीं.

पात्रा, स्त्री० वेश्या.

पात्सर, पात्सार, पु० वा० विश्वास.

पांथ, स्त्री० पांत.

पांथ, पु० पथिक.

पाथर, स्त्री० रा० वस्त्रें धुणें, वर बसून स्नान करणें, इ० च्युपयोगी सपाट जो दगड ती.

पाथरआंबटी, स्त्री० रा० जी बोंची दगडांवर पर्जन्यकाळीं

कालीं एक ओंबट वनस्पति रुजत असती ती.

पाथरफोड, पु॰ एक पक्षी आहे जो चोंचीनें दगड फोडीत असतो तो; २, वा॰ पाथरवट.

पाथरफोड्या, पु॰ पाथरवट.

पाथरवट, पु॰ जोतें इ॰ बांधायाचे दगड घडून उपजीविका करणारी अशी मनुष्यांत एक जाति आहे.

पाथरी, स्त्री॰ पालेभाजी आहे; २, मनुष्यांचे पोटांत एक रोग होत असतो ती.

पांथस्थ, पु॰ पांथाचा अपभ्रंश.

पाँथा, स्त्री॰ पांत; २, दे॰ पु॰ कोणेक कामाचा जो मार्ग तो.

पाँथी, स्त्री॰ भागी प्रथमार्थी.

पाँथीदार, पु॰ भागीदार.

पाथेय, न॰ सं॰ मार्गीं खावयाचे उपयोगी लाडू इ॰ जे पांथजन बाळगितात तें.

पाद, पु॰ चरण; २, गुद शब्द तो.

पाँद, स्त्री॰ पाणद.

पादचारी, ३ लिं॰ पायानें चालणारा जो मार्गस्थ तो, ल॰ अश्वादियानरहित.

पादडणें, कों॰ कोणेकास कांहीं एक कामाखालीं धरून पुष्कळ श्रमविणें.

पादडा, पु॰ कों॰ कोणेकास पुष्कळ पादडल्यामुळें जी जर्जर प्राय अवस्था होते ती; काढणें, घालणें, निघणें, या धातूंचायो॰ प्र॰.

पादणें, गुदद्वारानें शब्द करणें; ल॰ पादोपणनांदो.

पादत्राण, न॰ सं॰ जुतें, जोडा, इ॰ तें.

पादरटाण, स्त्री॰ रा॰ गुदद्वायूचीजी घाण ती.

पादरधिटाई, स्त्री॰ अंगीं सामर्थ्य व धीटपणा नसतां तोंडानें मात्र जो धीटपणाचा डौल कोणी दाखवितो ती.

पादरफुसका, ३ लिं॰ विवक्षित कामाचे निर्वाहापुरतें ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं तो मनुष्यादि जीव किं॰ पदार्थ तो.

पादरा, ३ लिं॰ अतिशयित पादण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, ला॰ भितर्यास ल॰; ल॰ पादर्यास वरणाचें मीस.

पादरीमामी, स्त्री॰ एक वनस्पति आहे.

पादवणें, पादडणें.

पादशाह, पु॰ فا॰ پادشاه यवन जातीय जो राजा तो.

पादशाही, स्त्री॰ فا॰ پادشاهی पादशाहाचा जो अधिकार तो; २, ३ लिं॰ पादशाही संबंधी जो शिका सनद इ॰ तो.

पादाक्रांत, ३ लिं॰ पराक्रमानें पराजित करून स्वाक्रांत केले जे देश, शत्रु, इ॰ तो.

पादुका, स्त्री॰ देवादिकांचा जा खडावा असतात त्या प्र॰; २, दगड इ॰ कांवर देव, गुरु, इ॰ कांचे पाउलाचें चिन्ह केलें असतें ती; ३, साधारण पादत्राणासही कदाचित् ल॰

पादेलोण, न॰ एक क्षार आहे.

पादोदक, न॰ चरण तीर्थ.

पाद्य, न॰ सं॰ पादप्रक्षालन किं॰ तदर्थ जें उदक तें; २, ला॰ कोणेकास पायाचें घालणें ल॰ लात, बुक्या, इ॰ कानें पुष्कल तुडविणें.

पान, न॰ सं॰ प्राशन; २, पर्ण; ३, शस्त्राचीमूठ सोडून अवशिष्ट जो भाग तें; ४, कागदाचा जो ताव किं॰ पोथीचें जें पत्र तें; ५, मुलांचे कपाळावर एक

भूषण पर्णाकार बांधित असतात तें; ६, धोतरजोड्याचीं जीं दोन धोतरें तीं प्र०; ७, केतकीच्या पुष्पाची जी पांकळी तें; ८, गंजीफांचा जा चकत्या असतात त्या प्र०; या शब्दानें मद्यपानासही केवल पानव्यवहार आहे; सर्प मोंवण्यास पानलागणें ल०, विडा खाण्यास पान खाणें ल०.

**पानउतारा**, पु० पाणउतारा.

**पानकोंबडा**, पु० पाणकोंबडा.

**पानगा**, पु० तवा नसतां पानास च्व पीठ लावून जी भाकरी करितात तो.

**पानगी**, स्त्री० लहान जो पानगा तो.

**पानघणस, पानघोणस**, पु० सर्पाकार पाण्यांतील एक जीव आहे.

**पानघोंगडें**, न० धिरल्यास ल०

**पानचट**, ३ लिं० पाणचट.

**पानडी**, स्त्री० कंठा इ० कांत पदकस्थानीं त्रिदलाकार किं० पर्णाकार पदार्थ करून जी घालितात ती.

**पानदाळ**, पु० पाणदाळ.

**पाननाटी**, स्त्री० पत्रावळी इ० उपयोगी पानांच्या काठ्या लावून जो लांबट भारा बांधितात ती.

**पानथळ**, न० पाणथळ.

**पानदान**, न० विड्याचीं पानें ठेवायाचें जें पात्र तें.

**पानपट्टी**, स्त्री० विड्याचे पानांत सुपारी इ० घालून जी गुंडाळी केली असती ती.

**पानपात्र**, न० उदकादि प्राशन करायाचें पेला, लोटा, इ० पात्र तें.

**पानपूड**, न० कांहीं आकारविशेषाचें वेळू इ० कांचें पानदान असतें तें.

**पानपेंडा**, पु० रा० पानभारा.

**पानबाजी, पानबाजू**, स्त्री० पादशाह आणि वजीर यांव्यतिरिक्त जीं उंचीं पानें गंजिफांचे डावांत थाटलीस येतात तीं.

**पानबाळी**, स्त्री० स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

**पानभारा**, पु० भोजनास उपयुक्त पानांचें जें ओझें तो.

**पानमळा**, पु० विड्याचे पानांचा जो मळा तो.

**पानलोट**, पु० पाणलोट.

**पानवठा, पानवथा**, पु० पाणवठा.

**पानवेल**, स्त्री० नागवेल.

**पानसडें**, न० रा० पानसुपारी इ० विड्याचें साहित्य ठेवायाचें बटवी इ० पात्र तें.

**पानसरडें**, न० पाण्यांतील जिवाणू आहे.

**पानसळ**, स्त्री० दे० भूमि इ० कांचें समानत्व पाहाण्याचें एक आयुध आहे.

**पानसुपारी**, स्त्री० विडा; २, आपलें काम दुसऱ्यापासून करून घ्यावयाचें असतां अल्पस्वल्प जें त्यास इत्यादि देतात त्यास ल०.

**पाना**, ३ लिं० पुरता पिकल्यानंतर वर पर्जन्य पडल्यामुळें विकृति पावलेला जो भात इ० दाणा तो.

**पानेणें**, धा० दाण्यानें पानेपणा पावणें.

**पान्हणें**, गाय इ० कांनीं पान्ह्यानें युक्त होणें.

**पान्हवणा**, न० गाय इ० कांस पान्हा यावयासाठीं जें तृण अंबोण इ० खावयास घालितात तें; २, ला० कोणेकानें आपल्यास अनुकूल व्हावें म्हणून जें इत्यादि देतात त्यास ल०.

**पान्हवणें**, पान्हणे.

**पान्हा**, पु० पुत्रप्रेमादिकारणानें शरीरावयव बंधशिथिल झाल्यामुळें दुग्धादिकांची गति बाहेर व्हावयास कारणीभूत जो त्याजवर वेग उत्पन्न होतो तो; २, ला० दयेनें किं० प्रसन्नतेनें जो अंतःकरणास कळवळा येतो तो.

**पान्हेणें**, पान्हवणें.

**पाप**, न० पातक; २, कोणे कामिनादिकाविषयीं कुडाभाव इ० कजी दुष्टवासना उत्पन्न होती तिला ह्म०; उ० आतां याचे मनांत कांहीं पाप आलें ह्मणून हा निर्मळ बोलत नाहीं; मीं कांहीं पापानें पायधुतले नाहीं इ० स्थलीं मीं कांहीं सर्वदा पापाचरणच करितों असें नाहीं असा अर्थ.

**पापड**, पु० उडदांची दाळ इ० कांचे पिठाच्या आंत मीठ, हिंग, पापडखार, इ० मसाला घालून भिजवून लाटून जो पोळी सारखा तोंडीं लावावयास पदार्थ करितात तो.

**पापडखार**, पु० एक क्षार आहे.

**पापडी**, स्त्री० पापडासारिखेंच तांदळाचे पिठाचें तळून खावयाचें तोंडीलावणें आहे; २, घारग्याला क्वचित् ह्म०; ३, गुळाचीसाय नवक इ० कांत घालून जी पातळ वडी बांधितात ती; ४, कों० फरसबंदी केलेली जी भूमि ती; ५, बुंदी पांकून परात इ० कांत थापून वड्या बांधितात ती.

**पापणी**, **पाँपणी**, स्त्री० डोळ्यास खालीं आणि वर जीं सकेश आच्छादक चर्में आहेत तीं प्र०

**पापदरा**, पु० शरीर, फळ, कंद, इ० कांवरील केवळ पातळ जो त्वगंश तो; २, कों० पापोडा.

**पापदृष्टि**, स्त्री० कांहीं एक पदार्थाकडे काम, मत्सर,



इ० धुनांत धरून पाहण्याचा जो प्रकार ती; उ० पर स्त्रीकडे पापदृष्टीनें पाहिलें तर दोष.

**पापा**, पु० मुलांचे भाषेनें भाकरीस ह्म०.

**पापिष्ठ**, ३ लिं० अतिशयित जो पापी तो.

**पापी**, ३ लिं० पातकी.

**पापुदरा**, पु० पापदरा.

**पापोटा**, **पापोडा**, पु० भाकर, पोळी, इ० कांचे दोहीं अंगें जे साली सारखे पातळ अवयव असतात ते प्र०.

**पापोदरा**, पु० पापदरा.

**पाप्याचापितर**, **पाप्याचेंपितर**, पु० न० केवल शरीरानें रोड, अशक्त, जो मनुष्यादि त्यास ह्म०.

**पाँबरी**, स्त्री० पांमरी.

**पाभर**, स्त्री० शेतांतील बीं पेरायाचें एक आउत आहे.

**पाभळ**, स्त्री० ग० वृक्ष, माळा, इ० कांपासून पुष्पें, टेंकूण इ० कांची दाटपणें जी वृष्टि होत असत्ये ती.

**पाभारी**, स्त्री० दे० पाभर.

**पामर**, ३ लिं० सं० ज्यामध्यें कोणतेंही तेज नाहीं अशा प्रकारें केवल तुच्छत्वेंकरून विवक्षित जो मनुष्यादि तो.

**पामरी**, स्त्री० रेशमाचें एक पांघरायाचें वस्त्र आहे.

**पामा**, स्त्री० सं० खरूज.

**पाय**, पु० चालण्याचे साधनभूत जे शरीराचे अवयव असतात ते; २, पलंग, माचा, इ० कांचा जो खूर तो; ३, चतुर्थांश या अर्थी एतत्पर्यायभूत जे चरण, पाद, इ० संस्कृत शब्द त्यांचा व्यवहार वहूत आहे; ४, वृक्षांचीं जीं मुळें त्यांस त्यांचे पाय

असें स्न॰; ५, पर्वताचा जो केवल खालचा प्रदेश तो; ६, अक्षरांचा जो अधोभाग तो; ईश्वर, गुरु, धनी, इ॰ उद्देशून नम्रतेनें भाषणादि प्रसंग असतां प्राय या अवयवाचें लक्षून बहुतव्यवहार होतो; उ॰ मजवर आपले पायांची कृपा असली स्न॰ मी तरेन; मी पायांचा सेवक आहें इ॰ व्यवहार जाणावे; कोणेकाचे पाय धरणें स्न॰ आपला संभाळ होण्याविषयीं कोणेकाचा आश्रय धरणें; कोणेक व्यवहारादिकांत पाय घालणें किं॰ शिरविणें इ॰ स्थलीं तत्तद्व्यवहारीं आपण शिरणें; पाय काढणें इ॰ स्थलीं तत्तद्व्यवहारादिकांपासून बाहेर निघणें; कोणेकाचे पोटावर पाय देणें स्न॰ पोटिस्थ बुडविणें; कोणेकाचे डोकी, उर, नाक, यांवर पाय देणें स्न॰ त्यापेक्षां आपण वरचढ होणें; पायरीस पाय लावणें स्न॰ चिरकाल चालत आली जी मर्यादा तिचा वरचढपणें उल्लंघ करणें; पाय मोडणें स्न॰ चिंतिलेलें कार्य करण्याविषयीं उत्साहभंग होणें; पाय पसरणें स्न॰ एखादे व्यापारांत किं॰ देशांत अल्पस्वल्प प्रवेश आला असतां युक्तियुक्तीनें तो सर्व व्यवहारादि व्यापणें; स्न॰ भटास दिली ओसरी आणि हळू हळू पाय पसरी; वाटेचा पाय आडवाटेस पडणें स्न॰ प्रमादानें होवून दुष्कर्म घडणें; कोणेकाचे पाय उचलणें स्न॰ त्यास अधिकारभ्रष्ट करणें; पायांची आग किं॰ आग मस्तकांत जाणें स्न॰ एकाएकी क्रोध चढणें; पायांशीं पाय बांधून बसणें स्न॰ कोणेकास सक्त तगादा करणें; पायांवर पाय देउन वाद सांगणें किं॰ काम करणें इ॰ स्थलीं त्याची त्याची भीड न धरितां बरोबरीपेक्षां किंचित् अधिक वाद सांगणें, काम करणें, असा अर्थ; पायांत खोडा पडणें, अथवा बांधून घेणें, पाय गुंतणें, इ॰ स्थलीं कांहीं एक व्यवहारामध्यें आपण गुंतून पडणें; मी त्याचा पायांवर कुतरीं माजरें घातलीं नव्हती स्न॰ तत्कार्याविषयीं प्रवृत्त होण्यास मी कांहीं त्याचें आर्जव केलें नव्हतें; पायांचा प्रताप स्न॰ पायगुण, मनुष्यवृत्ति; त्याचा पायांशीं तो बांधावा स्न॰ लबाडी इ॰ दुर्गुणाविषयीं ते उभयतां तुल्य असा अर्थ; पायांवर पाय घालून, टाकून, चढवून, बसणें इ॰ स्थलीं निष्काळजीपणें उद्योगादि श्रम न करितां राहणें; पायांतला पायपोस डोकीवर चढणें स्न॰ हलक्या मनुष्यानें चढून थोराची अमर्यादा करणें; पायांतला पायपोस पायांतच ठेवावा स्न॰ हलक्या योग्यतेचा मनुष्यास उच्चपदसंबंध होउं देउं नये; पायांखालची वाट, मार्ग, स्न॰ नित्याचे वहिवाटेची वाट, मार्ग, पायांखालीं जळतें तें न विझवितां डोंगरास आग लावायास धांवणें स्न॰ आपले दोष न पाहतां किं॰ न गणितां दुसर्यांचे दोष काढण्यास प्रवर्तणें; पाय पुढें ठेवणें स्न॰ कांहीं एक व्यापारीं प्रवृत्त होणें; जळता पाय जाळणें स्न॰ धरिलेला हट्ट तडीस नेणें; एका पायांवर उभें असणें स्न॰ कोणेक गोष्टीविषयीं हौसेनें सिद्ध असणें; पाय फोडणें स्न॰ तपशील लावणें; फुंकून पाय टाकणें स्न॰ अतिशयित विचार करून व्यवहार करणें; पायां पडणें किं॰ पायांवर डोकी ठेवणें स्न॰ नमस्कार करणें; स्न॰ आंथरूण पाहून पाय पसरावे.

**पायउतार**, पु॰ नद्यांस होडी इ॰ साधनांवांचून उतरून जावया जोगा ओउतार असतो तो.

**पायउतारा**, ३ लिं॰ वाहनावरून उतरून पायानें चालला तो.

तो; उ॰ थोरांचे दर्शनास पायउतारा जावें; २, अ॰ चरणचालीनें; उ॰ आह्मी काशीस पायउतारा गेलों; ३, पुं॰ पानउतारा; दे॰ पायउतार्यावर येणें ह्म॰ अरेतुरेवर येणें.

**पायका**, पु॰ कों॰ पावका.

**पायकाळा**, पु॰ कों॰ कृष्यादिकर्माविषयीं ओगडीट दिला असतो तो.

**पायखुंट**, न॰ कों॰ गोमहिष्यादिकांस पळूंनये इ॰ कारणार्थ पायांला आणि गळ्याला मिळून एक दोरीनें बंधन करितात तें.

**पायखुंटी**, स्त्री॰ कों॰ पायखुंट.

**पायगत**, न॰ पायतें.

**पायगूण**, पु॰ कों॰ कोणीं आपले घरीं उत्पन्न आला किं॰ आला जो मनुष्य, पशु, इ॰ पदार्थ तत्संबंधीनंतर आपल्यास जें बरें किं॰ वाईट फल होतें तत्कारणानें करून कृप्त तत्तन्मनुष्यनिष्ठ सुलक्षण किं॰ दुर्लक्षण तो.

**पायघडी**, स्त्री॰ लग्नसमारंभांत रासना ह्मण्याचे दिवशीं वरपक्षीय वऱ्हाडयांस आपले घरीं आणते समयीं मार्गांत त्यांचे पायांखालीं मृदु लागावें ह्मणून आवरूचा घडया घालितात त्या प्र॰ बहुवचनांत.

**पायघोळ**, ३ लिं॰ अतिशयित विस्तृतपणामुळें पायांवर घालायाजोगें जें नेसायाचें धोत्र अंगरखा इ॰ किं॰ पायांवर घोळे असें न आटोपितां पांघरलेलें जें शेला, शालजोडी इ॰ किं॰ तादृश गळ्यांत घातलेली जी पुष्पादिकांची माळ इ॰ तो.

**पायचळ**, स्त्री॰ रा॰ पायरवा.

**पायचाल**, स्त्री॰ चरणचाल.

**पायजमा**, **पायजामा**, पु॰ इजार.

**पायजिर्भी**, स्त्री॰ दे॰ तोरडी.

**पायठा**, पु॰ रा॰ सपाट भूमीस भाजून जें नाचण्याचें शेत करितात तो.

**पाँयडा**, पु॰ कोणेक व्यवहार यारीतीनें उत्तरोत्तर सतत चालणार अशा अर्थाचा ज्ञापक तत्तद्व्यवहाराचा जो आरंभांश तो; २, रा॰ माड, पोफळ, इ॰ कांवर चढते समयीं जी दोरी पायांत किं॰ हातांत घालितात तो.

**पाँयतण**, **पायतन**, न॰ जुनें किं॰ कुणब्याचे उपयोगीं जो दांडगा जोडा तें.

**पायतर**, **पायथर**, पु॰ कों॰ पायतें प्रथमार्थी.

**पायतैं**, न॰ निजणाराचे पायांकडील जो प्रदेश तो; २, भूमी, डोंगर, इ॰ कांचे निम्नतेकडचा शेवटील जो प्रदेश तें.

**पायथा**, पु॰ पायथें.

**पायथैं**, न॰ पायतें.

**पायदळ**, न॰ पायानें चालणारी जी फौज तें.

**पायधरणी**, स्त्री॰ कोणेक कार्यार्थ कोणेकाचें जें पराकाष्ठेचें आर्जव ती. प्र॰ अनेकवचनांत.

**पायधूळ**, स्त्री॰ पायांस लागलेली मार्गसंबंधी जी धूळ ती; याचा प्रयोग आपले घरीं कोणीं आला असतां आपणमजवर दया केली अशा प्रकारें त्याला गौरवायाचें असतां आजमजवर पायधूळ झाडली इ॰ होतो; २, नम्रतेनें गुरू इ॰ कांजवळ बोलायाचें असतां आपल्यास ह्म॰

**पायपिटी**, स्त्री॰ अनेक कारणार्थ इकडे धांव तिकडे धांव

असे जे पायानें करायाचे परिश्रम ती.

**पायपोशी**, अलिं॰ पायपोसाचे डौलाचें बांधलेलें जें पागोटें किं॰ घडलेला पोहरा ती.

**पायपोस**, पु॰ चर्माओडयाचे जे दोन अवयव ते प्र॰; कोणेकास पायपोस मारणें ल॰ दुर्भाषणादिकानें निर्भर्त्सना करणें; पायपोस दांतीं धरणें ल॰ कोणे कास अतिनम्रभावानें शरण जाणें; पायपोसासारिखें तोंड करणें ल॰ फजीती जाल्यामुळें तोंड वाईट करणें; त्याचे पायपोस घेउन तो पळेल ल॰ त्यास तो ठकवील.

**पायपोसरवाडु**, अलिं॰ खेटररवाडु.

**पायपोळ**, स्त्री॰ तापलेले जमीनीवरून चालताना जी पायांची संतप्तता होती ती.

**पायबंद**, पु॰ घोडयाचे मागले पायांस बांधितात जी दोरी ती; २, ला॰ कोणेकामागें संसार इ॰ रूप जो पाश असतो त्यास ल॰.

**पायमर्दी**, स्त्री॰ या॰ कांहींएक कार्यसाधनार्थ जिकडे जाण्याचा प्रसंग येईल तिकडे धांवत जावें असें त्या कामावर खपण्याचा जो प्रकार ती; उ॰ काम होण्याचें कठिन होतें परंतु पायमर्दीकेली तेव्हां काम जालें.

**पायमल्ली, पायमल्ली, पायमाली**, स्त्री॰ सैन्य, गुरें, इ॰ कानीं देश, शेत, इ॰ कांची केलीजी तुडवातुडवती; २, शेत इ॰ कांस जी निगा अभावी तिचा अभावती; उ॰ यंदां शेताचीपायमल्ली जाली ह्मणून शेत चांगलें पिकलें नाहीं; २, ला॰ कोणेकाचे भाषणादिकांची कोणेकानें केलीजी अवगणना ती.

**पायमार्ग**, पु॰ भूमीवरील जोमार्ग तो, जलमार्गाचे व्यावृत्त्यर्थ याचा प्रयोग होतो; २, गाडे, घोडीं, इ॰ जामार्गानें जातनाहींत केवलमनुष्यमात्र जातेंअसाजो लहान अवघड मार्ग तो.

**पायमोडें**, न॰ कों॰ कोणेक व्यापारीं प्रवृत्त होणारास उत्साहभंगरूप जें निवृत्तीस कारण उपस्थित होतें तें; २, क्रमानें कांहींएक व्यवहार वाढत जात असतां तीगति कुंठित होण्यास जें कांहीं निमित्त उपस्थित होतें तें; उ॰ हें पोर अमंगळ, अमळ चालूं लागले ल॰ खोकला, पडसें, अशीं अनेक पायमोडीं येतात.

**पायरव**, पु॰ कों॰ चाहूल; २, रसायन, दुग्ध, इ॰ नासायास किं॰ दुखणें अधिक व्हावयास कारणीभूत येणार्या जाणार्या मनुष्याचे रहदारीनें जो विकार उत्पन्न होतो तो; ३, कोणेकाचें कोणेकाचे घरीं किं॰ कोणेक देशीं जाणें येणें इ॰ रूपजी वहिवाट असती तो.

**पायरवणें**, रसायनादिक पायरवाचे विकारानें युक्त होणें; २, रा॰ चाहुलीनें किं॰ प्रत्यक्षतः कोणेक मनुष्यादिक आढळणें.

**पायरस्ता**, पु॰ पायवाट.

**पायरहाट**, पु॰ पायांनें पाणी काढायाचा जो रहाट तो.

**पायरहाटी**, स्त्री॰ कों॰ पायरहाट.

**पायरी**, स्त्री॰ उच्चस्थलावर चढायाचा जो मार्ग त्याचाठायीं एकापेक्षां एक उंच अशा क्रमानें पाषाण काष्ठादिकांचे पाय ठेवायास आधार केले असतात ते प्र॰; २, एकापेक्षां एकानें उच्चपणानें वागावें एकानें नीचपणानें वागावें असे लोकशास्त्र व्यवहार

सिद्ध

सिद्ध जे अनेक अधिकार ते प्रत्येकीं; पायरीनें पायरी चढावें किं॰ जिकावी इ॰ स्थलीं आज थोडेंसें, त्यापेक्षां उद्यां कांहीं अधिक, अशा क्रमानें कोणेक कार्य करित जाणें; ३, कों॰ पाईर.

**पायली**, स्त्री॰ देशभेदें करून व्यवस्थित केलीमणाचा षोडशांशरूप किं॰ द्वादशांशरूप धान्यादि मोजायाचें एक माप आहे ती.

**पायवट**, स्त्री॰ दे॰ मार्गादिकांचा ठायीं येणारा जाणाराचे पावलांची जी पंक्ति उठत असती ती.

**पायवटणें**, मार्गादिस्थल कोणेकाचे पायवटीनें युक्त होणें; २, कोणेक मार्ग कोणेकाचे नित्य येण्याजाण्याचा वहिवाटीमुळें अभ्यस्त होणें.

**पायवस**, न॰ रा॰ पायतर.

**पायवाट**, स्त्री॰ पायमार्ग.

**पायस**, न॰ खीर.

**पायसूट**, ३ लिं॰ चालण्याविषयीं जो चपल तो.

**पाया**, पु॰ भिंत, जोतें, इ॰ करायाचें असतां पूर्वी भूमी खणून त्यामध्यें दगड चुना इ॰ क घालून जी बंदिस्त करितात तो; २, ला॰ कांहींएक कर्तव्य व्यवहाराचा जो प्रारंभांश तो, जावरून त्या कार्याचा आकारही त्यादि प्रायः म्हणोन येतें, प्रायः घालणें, पडणें या धातूंचा यो॰ प्र॰.

**पायाशुद्ध**, ३ लिं॰ कोणेक कार्यास जींजीं साहित्यें असावीं किं॰ जीरीति असावी त्यामध्यें यत्किंचित् वैकल्य नाहीं असें जें कार्य तो.

**पायाँस**, न॰ रा॰ पायवंस.

**पायाळ, पायाळू**, ३ लिं॰ पायांकडून जो उत्पन्न होतो तो मनुष्य.

**पायी**, स्त्री॰ दे॰ राहुटीचा तनाव्यावरचा हातभर जो अंश ती; २, राहुटीचें पाणी आंत नयावें म्हणून तिचा भोंवता चर खणितात ती.

**पायीं**, अ॰ मुळें; उ॰ शेतापायीं मी शंभर रुपयांस बुडालों; वानराचे पायीं वस्ती होणें कठिण; २, चरणचालीनें चालत; उ॰ ते सर्व घोडयांवर होते आणि मी पायीं होतों.

**पायींत**, न॰ कों॰ पायतर.

**पार**, पु॰ पिंपळ, वट, इ॰ कांचे मुळीं भोंवताला जो ओटा बांधितात तो; २, कों॰ नद्यांस जो पायउतार असतो तो; ३, कोणेक गोष्टीची किं॰ पदार्थाची पलीकडची जी कड, म्ह॰ यदुत्तर त्या गोष्ट्यादिकांचा अंश उत्तर नाहीं तो; उ॰ या शास्त्राचा पार कोणी पाहिला नाहीं; माया, प्रपंच, समुद्र इ॰ कांचे पाराविषयीं सर्वप्रयोग होतात, इतरत्र तत्तद्धातुसन्निधानें अव्ययतापावून होतात ते प्रायः लिहितों; पारपडणें म्ह॰ संकटादिकांतून मुक्त होणें किं॰ कांहींएक कार्य शेवटास जाणें किं॰ कालमार्गादि अतिक्रांत होणें; पारजाणें म्ह॰ नद्यादिमध्यवर्तिपदार्थ अतिक्रमून पलीकडे जाणें; पार होणें म्ह॰ पारपडणें किं॰ जाणें किं॰ आरपार होणें; पिंपळास पार बांधून देणें म्ह॰ कोणेकाचें लग्न किं॰ कांहीं मोठें कार्य करणें; पुण्याचे पारीं बसणें म्ह॰ निरंतर परोपकार करायाचा स्वभाव धरणें; ४, समुद्रकांठीं भरतीचा वेळेस मात्र उतार होत नाहीं अशा जाला हान नद्या असतात तो; ५, रा॰ प्रहराचा अपभ्रंश.

**पारई**, स्त्री॰ रा॰ पहार प्रथमार्थी.

**पारका**, ३लिं॰ परकी; २, कों॰ पारखा.

**पारख**, स्त्री॰ परीक्षा.

**पारखणावळ**, स्त्री॰ रुपये इ॰ दुसर्‍याचे पारखीनें पारखून घेतले असतां त्या पारखणारास जें मोल्य द्यावें लागतें ती.

**पारखणें**, परीक्षित करणें.

**पारखा**, ३लिं॰ पूर्वी ज्याचें प्रत्यक्ष झालेलें नाहीं किं॰ प्रत्यक्ष होउन बहुत दिवस झाले ह्मणून हा अमुकच अशी ज्याची ओळख पटत नाहीं असा जो मनुष्य, पशु, स्थल, भाषण, इ॰ सर्व पदार्थ तो; २, पूर्वी आपला असोन कांहीं कारणामुळें आजवर पूर्ववत् आत्मसंबंध मानायास शंका वाटों लागली अशा अवस्थेतें पावला जो मनुष्य गृहादि तो; उ॰ मा मेकडचे पंच जे बोलत होते ते तिकडून कांहीं लोभ दृष्टीस पडतांच सारे पारखे जाहाले.

**पारखी**, ३लिं॰ परीक्षक.

**पारंगत**, ३लिं॰ सं॰ आरब्ध व्यापाराचा ज्यास पार लागला तो त्या व्यापारामध्यें; उ॰ तो ब्राह्मण एका शास्त्रामध्यें पारंगत आहे.

**पारंगा**, पु॰ पांगारा.

**पारगीवारगीनें**, अ॰ पाळीपाळीनें.

**पारजक्त**, पु॰ पारिजातकाचा अपभ्रंश तो; २, न॰ त्याचें पुष्प तें.

**पारठा**, ३लिं॰ पाडसा.

**पारडी**, स्त्री॰ ह्मशीचें जें स्त्र्यपत्य ती, प्रायः लाहान असतां व्यवहार.

**पारडूं**, न॰ ह्मशीचें जें वत्स तें.

**पारडें**, न॰ परडें प्रथमार्थी.

**पारणें**, न॰ कांहीं एक निमित्तानें उपोषण केलें असतां त्या नियमानें सोडून जें भोजन करितात तें; पारणें फिटणें ह्म॰ ज्या ज्या इंद्रियास ज्या ज्या विषयावर अतिशयित प्रीति आहे तत्तद्विषय लाभानें तत्तदिंद्रियाचें समाधान होणें; उ॰ आपला मुखडा पुरता दाखवून माझ्या डोळ्यांचें पारणें फेड.

**पारणें**, वा॰ अन्न, उदक, औषध, इ॰ हितावह पडणें.

**पारतंत्र्य**, न॰ सं॰ परतंत्रपणा.

**पारद**, पु॰ सं॰ पारा, पारदभस्म इ॰ समासांत आणावे.

**पारध**, स्त्री॰ अरण्यांतील पशु किं॰ पक्षी मारण्याचा किं॰ धरण्याचा व्यापार तो, किं॰ ते पशु पक्षी ती; पारध साधणें ह्म॰ ज्या कार्याचा उद्देशानें प्रवृत्त झाला तें कार्य साधणें

**पारधी**, ३लिं॰ पारध करणारा जो तो.

**पारपत्य**, न॰ अपराध्यास शिक्षा लागावी ह्मणून जें दंडन तें.

**पारंपर्य**, न॰ सं॰ शिष्य, वंशज, इ॰ कांचा तादृश परंपरारूप जो क्रम तें.

**पारपळ, पारंपळ**, ३लिं॰ कों॰ शिक्षकाचे शिक्षेंतून सुटल्यामुळें मनस्वीपणें वर्तूं लागला जो मनुष्य, पशु, इ॰ तो.

**पारपोळ**, ३लिं॰ वा॰ पारपळ.

**पारंबा**, पु॰ रा॰ पारंबी प्रथमार्थी.

**पारंबी**, स्त्री॰ वड, पिंपरी, पाईर, इ॰ कांचे खांद्यास ज्या मुळ्या फुटून खालीं येतात ती; ह्म॰ शेंडी तुटो किं पारंबी तुटो; २, रा॰ आंब्याचे वांट्याचे आंतर्जा

द्विदल वी असती ती.

**पारय**, स्त्री॰ कों॰ पाहार.

**पारलौकिक**, ३ लिं॰ सं॰ परलोकसंबंधी जे भोगादि तो.

**पारवडा**, पु॰ कों॰ एका गावांतील जे अनेक विभाग ते प्र॰.

**पारवा**, पु॰ एक पक्षी आहे; २, त्याचे अंगवर्णासारिखा जो रंग तो; ३, तद्विशिष्ट वस्त्रादि तो.

**पारशी**, पु॰ एक मनुष्यांत जाति आहे.

**पारसनाथ**, पुं॰ जतींचा देव आहे.

**पारसनीस**, पु॰ हिं॰ हिंदुजातीय राजा असतां त्याशीं प्रसंगवशात् फारशी भाषा लिहिण्याचें जें काम पडतें त्याजवर जो अधिकारी कारकून ठेविला असतो तो.

**पारसा**, ३ लिं॰ कों॰ पारोसा.

**पारा**, पु॰ रसायनाद्युपयोगीं एक रस आहे; २, कोंवळा फणस तो; ३, कों॰ घायाळ ह्मणून झाड आहे तिचीपाती; ४, वा॰ भिंतीस विटादिकांचा थर लावितात तो; ५, काळे व पांढरे ठिपके ज्याचे अंगावर आहेत असा जो बैल, गाय, इ॰ तो.

**पारायण**, न॰ पुराणादि ग्रंथांचें साद्यंत जें पठन तें.

**पारायणी**, ३ लिं॰ पुराणादिकांचें पारायण करणारा तो.

**पारावार**, पुं॰ सं॰ अंत पारयाचा निषेधाविषयीं प्र॰; उ॰ भाषेंत शब्द किती आहेत यांचा पारावार कोणास लागणार नाहीं.

**पारिजातक**, पु॰ एक पुष्पवृक्ष आहे.

**पारितोषिक**, न॰ सं॰ आपल्यास कोणेकानें संतोषकेल्यामुळें प्रसन्न होउन त्यास देतात जें वस्त्र, इत्यादि तें.

तें.

**पारिपत्य**, न॰ पारपत्य.

**पारिभाषिक**, ३ लिं॰ विवक्षित व्यवहारसिध्यर्थ कांहीं परिभाषेनें संकेतित करून ठेविला जो अर्थ तो.

**पारी**, स्त्री॰ केळफुलाचे पोटचा फण्यावर जे आवरक अवयव असतात ते प्र॰; २, मोदकाचे पुरणाभोंवतालें जें पिठाचें आवरक असतें तें; ३, वा॰ आंब्याचा जो बाठा तो.

**पारुष्य**, न॰ सं॰ कठोरपणा; २, कोणेकास शिव्यागाळी एतद्रूप किं॰ हाणणें, मारणें, एतद्रूप कोणेकानें केला जो अपकार तें.

**पारोशी घोंसाळी**, कों॰ स्त्री॰ घोंसाळीसच ह्म॰ कदाचित् पारोशी इतक्याचाही प्र॰ होतो.

**पारोसा**, ३ लिं॰ रात्र अतिक्रमल्यामुळें धुवून शुद्ध करण्याचे योग्य तेंचा जो मनुष्य, मनुष्यावयव, वस्त्र, भांडें, इ॰ पदार्थ तो धुतल्याचे पूर्वी; उ॰ तूं पारोसा आहेस तर पारोशीं भांडीं घांसून आण; २, पूर्वदिवशीं आणून ठेविलें जें पाणी, पुष्पें, इ॰ किं॰ पूर्वदिवशींचा पडलेला जो केर तो; पारोसें काम ह्म॰ रात्र अतिक्रमिल्यामुळें दुसरे दिवशीं भूम्यादि शुध्यर्थ सडासंमार्जन इ॰ करावें लागतें तें.

**पारोसादोडका**, कों॰ पु॰ पारोसें.

**पारोसें**, न॰ कों॰ पारोशी घोंसाळीचें जें फल तें.

**पारोळी**, ३ लिं॰ पारोळें ह्मणून गांव आहे तेथील जी संध्येचीपळी, उपकरणी, इ॰ पदार्थ तो.

**पार्थक्य**, न॰ सं॰ पृथक्पणा.

**पार्थिव**, न॰ सं॰ पूजा करायाकरितां जें मृत्तिकेचें लिंग करितात तें; २, ३ लिं॰ पृथ्वीसंबधी जो पदार्थ तो; ३,

२, पु० राजा.

**पार्वती**, स्त्री० देवी.

**पार्श्वभाग**, पु० सं० मनुष्यादि प्राण्याचे किं० गृहादि पदार्थाचे पुरोभाग आणि पृष्ठभाग वर्जून अवशिष्ट जे दोन भाग ते प्र०.

**पाल**, स्त्री० पल्ली; २, न० दाहा पांच सुताडे एकत्र जोडून बैठक घालणें किं० छाया करणें इत्याद्यर्थ जें वस्त्र करून ठेविलें असतें तें; ३, उडपाल; ४, पु० मोठ लदाउ गलबतांत एक भेद आहे; ५, ३, सं० पालक याचे प्र० प्रायः समासीं, भूपाल, महीपाल, गृहपाल, इ० आणाचे; पाल घालणें, मोडणें ल० स्त्रीनें प्रसिद्धपणें व्यभिचारावर पैका मिळवूं लागणें.

**पालक**, ३लिं० सं० पालनकर्ता तो; २, पु० ग्रं० पाळणा.

**पालकी**, स्त्री० पालखी.

**पालकीपदस्थ**, ३लिं० पालखीपदस्थ.

**पालख**, पु० ग्रं० पाळणा; २, स्त्री० सोनें, रुपें, तापवून परीक्षा कर्तव्य असतां कानस, कलारव, इ० त्यास चिन्ह करितात ती.

**पालखी**, स्त्री० राजादिकांनीं बसून आवयाचें मनुष्यवाह्य लांकडांचें यान आहे, जीस धनुष्याकार वेळूची दांडी असती ती.

**पालखीपदस्थ**, ३लिं० ज्यास राजापासून पालखींत बसायाचा अधिकार मिळाला आहे तो.

**पालछत्र**, न० काठीस पागोटें बांधून नवर्यामुलावर मार्गीं धरायाकरितां गुढीसारिखें करितात तें.

**पालट**, पु० एक कार्य अनेकानीं वांटून वांटून करायाचें असतां त्या विभाग्यांनीं वांटून घेतले जे कालविभाग ते त्या त्या विभाग्यांचे, येथें विभागी शब्दानें कर्ता कर्म, करण, इत्यादि कारकें किं० क्रिया विवक्षित आहे; उ० चाकरी करायास चार चार घटकेंचे पालट बांधून दिल्हे आहेत; काल पांढरें पागोटें घातलें आज तांबडे पागोट्याचा पालट; काल जेवलों आज उपोषणाचा पालट; २, कोणेक क्रिया एक दिवस वगळून होत असती तिचा होण्याचा जो दिवस तो, किं० तशा प्रकारें क्रिया होण्याचा जो प्रकार; उ० उद्यां ज्वराचा पालट आहे; ज्वर नित्य येत नाहीं, पालटानें येत असतो; ३, कांहींएक पदार्थांची इकडचें तिकडे, तिकडचें इकडे, होई अशी जी व्यवस्था; उ० नित्य एकच पागोटें घालूं नये पालट करून घालावें; ४, कांहींएक अवस्थावान् किं० प्रकारवान् जें बुद्धिक्रियादि त्याची तत्तदवस्थादिभेदें करून जी भिन्नता तो; उ० त्याला पैसा मिळतांच बुद्धीस पालट आला; एकाच मांडीवर बसलें असतां कळ लागती मांडीचा पालट करावा.

**पालटणें**, बुध्यादिकानीं पालट चतुर्थार्थीं तें पावणें; २, कोणेक पदार्थानें पालट तृतीयार्थरूप व्यवस्थेतें पावविणें.

**पालटें**, न० रा० तट्याउभा करून दाणा ठेवायास जें सांठवण करितात तें

**पालत, पालथ**, स्त्री० कों० पाळत.

**पालती, पालथी**, ३लिं० पाळती.

**पालथणें**, पालथें करणें.

**पालथा**, ३लिं० उपडा; कोणेकास पालथा घालणें ल० विवादादिकांमध्यें पराजित करणें.

**पालन**, न० रक्षण.

**पालपट्टी**, स्त्री० पाल करण्याचे उपयोगीं जें वस्त्र

विणलें असतें ती; २, लहान जें पाल ती.

**पालपडदळ**, न॰ पाल इ॰ नें.

**पालंबी**, स्त्री॰ कों॰ पारंबी प्रथमार्थी.

**पालव**, पु॰ पदर प्रथम चतुर्थार्थी; २, पल्लव; ३, कोणेक मुख्य देशादिकांचा जो आसपास देशाचा ठायीं छायारूप संबंध असतो तो; ४, कोणेक गोष्टीस किं॰ ग्रामादिकांस नवाच वाढला जो अवयव तो; ५, कोणेकास पालव घालण्याचा जो व्यापार तो; कोणेकास पालव घालणें किं॰ टाकणें ह्म॰ दूरस्थितास समीप येण्याकरितां वस्त्रानें खुणावणें; ६, दयादिरूप जो हृदयास द्रव त्यास कदाचित् ह्म॰; उ॰ वाळल्या झाडास पालव फुटेल पण याचे हृदयास पालव फुटणार नाहीं.

**पालवण**, न॰ वा॰ गुरानीं खावया जोगा जो ओला पाला तें.

**पालवणीं**, न॰ दुखण्यांतून उठलेल्या मनुष्यास प्रथम स्नान घालायासाठीं ओषधी कढवून जें पाणी करितात तें.

**पालवणें**, वृक्षानें पल्लवयुक्त होणें; २, कोणेकास जवळ येण्याकरितां वस्त्रानें खुणावणें; ३, पदरचे वार्यानें किं॰ पुष्पादिकानें दिव्यातें मालविणें.

**पालवा**, पु॰ कों॰ नांगरादिक हाकते वेळेस बैलादिकांस हाकायाकरितां जी काठी घेतात तो.

**पालवी**, स्त्री॰ वृक्षांस नूतन फुटला जो पल्लव समुदाय ती; २, ला॰ केवल क्षीण शरीरास रसायनादिद्वारा रक्तवृद्धीचा जो प्रारंभ होतो ती; ३, वा॰ कोणेकाची दरिद्रावस्था जाउन कांहीं संपत्ति येउं लागती ती दशा; फुटणें येणें या धा॰ प्रा॰ प्र॰.

**पाला**, पु॰ व्यक्तिगत संख्या ज्याची विवक्षित नाहीं अशा पर्णांचा जो समुदाय तो.

**पालाशविधि**, पु॰ जामेल्या मनुष्याचा दाहसंस्कारार्थ देह किं॰ अस्थि सांपडत नाहींत ह्मणून पळसाचे पानाचा पुतळा करून दाहादि उत्तरक्रिया करितात तो.

**पालुपद**, न॰ दे॰ वारंवार ह्मणायाचें गीतादिकांमध्यें जें ध्रुपद असतें तें.

**पालें**, न॰ कों॰ पालवण; २, वा॰ पालटें.

**पालेआसण**, पु॰ एक झाड आहे.

**पालेजणें**, वा॰ वृक्षानें पल्लवयुक्त होणें; २, ला॰ मनुष्यानें पालवी तृतीयार्थानें युक्त होणें.

**पालेणें**, को॰ वृक्षानें पल्लवयुक्त होणें.

**पालेभाजी**, स्त्री॰ पालारूप जी मेथी, माठ, इ॰ भाजी ती.

**पालोपद**, न॰ कों॰ पालुपद; २, ला॰ कोणेकाचे भाषणामध्यें वारंवार उगीच एखादा शब्द येत असतो त्यास ह्म॰

**पाल्हाळ**, पु॰ थोडयांत सांगावयाची जी गोष्ट तीचा विशेषणादिद्वारा अतिशयित जो विस्तार तो; उ॰ कविजन गोष्टीचा क्वचित् संक्षेप करितात क्वचित् पाल्हाळ करितात; २, मूलभूत गोष्टीस वाढवायास नवा जो विशेषणाद्यंश लावितात तो; उ॰ मी याला थोडेंच बोलायास सांगितलें होतें परंतु यानें पदरचा त्यास पाल्हाळ लाविला; ३, कों॰ दयादिनिमित्त हृदयास जो द्रव येतो तो.

**पाव**, पु॰ चतुर्थांश; पावभाकर, पावशेर, पावमण, इ॰ समासीं, भाकर इ॰ कांचा चतुर्थांश असा अर्थ होतो, परंतु लिंग उत्तरपदाचें होतें; २, स्त्री॰ कों॰ पाउ.

**पावक**, पु॰ सं॰ अग्नि.

**पावका**, पु॰ शिडीस पायरे व्हायास जीं लांकडें मारिलीं असतात तीं प्र॰; २, घडोंचीं, मेज, इ॰ कांचा जो पाय तो; ३, माड, ताड, इ॰ कांवर चढायाकरितां आ कि॰ विहिरींत उतरायाकरितां त्यास रवांची पाडितात तो.

**पावकें**, न॰ एकपावपाव, बेपाव अर्धा, अशी चतुर्थांशाचें जें लेख आहे तें; २, कापड, चोपड, इ॰ किती एक जिनसांचे एका ओझ्याचा जो चतुर्थांश तें.

**पावटा**, पु॰ एक द्विदल धान्य आहे; २, नृत्य, दांडपट्टा, इ॰ व्यवहारीं बेताप्रमाणें जो पावलाचा प्रक्षेप तो; उ॰ इला आजून नाचण्याचा पावटा साधला नाहीं; ३, पांवडा प्रथमार्थीं; पाउल शब्दावरील संप्रदाय प्रायः एथें ही आणावे.

**पावठणी**, स्त्री॰ वा॰ पाउटणी.

**पांवडा**, पु॰ पावका तृतीयार्थी.

**पावडा**, पु॰ लोखंडाचे नांगरास फांटे असतात त्याचे अग्रास पर्णासारिखी आकृति असते तो.

**पावडी**, स्त्री॰ लीद, शेण, गुळ, इ॰ काढायाकरितां जें लांकडाचें पावडें केलें असतें ती.

**पावडें**, न॰ खोरें म्हणून माती ओढायाचें आउत आहे.

**पावण**, न॰ कों॰ ग्रामांतराहून नवीन धूसासर्यास आणण्याचा जो व्यापार तें; २, रा॰ मुलीची वरात आणतेसमयीं माहेराहून लाडू, तांदूळ, इ॰ एके पात्रांतून बरोबर देतात तें.

**पावणा**, पु॰ वा॰ पाहुणा.

**पावणी**, स्त्री॰ वा॰ मार्गी भय नव्हावें म्हणून सर्कारचा शिपाई किं॰ पत्र बरोबर घेतात ती.

**पावणें**, मनुष्यादि पदार्थानें गतिद्वारा मध्यदेशातें आक्रमून विवक्षित देशीं संबद्ध होणें; २, अवस्था, गुण, मान, अपमान, इ॰ कांनीं कोणेकानें विशिष्ट होणें, येथें त्या अवस्थादिकांस कर्मता असती; उ॰ वृद्धत्व पावल्यामुळें तो बधिरत्व पावला इ॰ आणावें; ३, कोणेक मनुष्यादि पदार्थ किं॰ निरोप इ॰ नेवून विवक्षित स्थलीं संबंध करणें; उ॰ मला तुम्ही माहेरीं पावून माघारे आ; ४, काहींएक विषय कोणेकास कोणेकापासून लब्ध होणें; उ॰ आजवर यजमानाची कृपा असती त्याला कायतें पायतें आल्यास कांहींपावत नाहीं; मागील कर्जापैकीं काय पावलें तें सांगा; हीगोष्ट मला पावली म्ह॰ यागोष्टीविषयीं बरें वाइटाचा निर्वाह करणार मी धनी आलों असा प्रतिज्ञेचें वाक्य; ५, आराध्यादि देवानें इष्टकामना पूरक होणें.

**पावता**, ३ लिं॰ विवक्षितस्थलीं विवक्षित मनुष्यादिकांकडे पावला जो कागद, द्रव्य, इ॰ तो; उ॰ आची पोथी त्यास पावती करून ये; २, पु॰ सासुरवाशीण, माहेरवाशीण, इ॰ सासरें इ॰ स्थलीं आउं लागली असतां तिकडचें मूळ न आल्यास इकडचा कोणी गडी इ॰ आपल्यास पोहचवायाकरितां घेती तो.

**पावती**, स्त्री० कोणेकापासून कोणेकास कांहीं रुपये इ० द्रव्याचा जो पावलेपणा ती; २, सावकार इ० कांस कूळ इ० कांपासून पावलें जें द्रव्यादिक त्याचा अमुक अमुक पावलें असा जो लेख करून देतात ती.

**पावंद**, स्त्री० कों० भात सोडतेवेळेस मांदाचे आसपास पडतें जें भात ती.

**पावधी**, ३ लिं० कों० वर्षास किं० महिन्यास अमुक द्रव्य देईन अशा बोलीनें जी दुधत्यासाठीं दुभती गाय किं० म्हैस आणली ती.

**पावधूक**, स्त्री० कों० गुरूं पावधें आणल्यामुळें जें गुराचे धन्यास देय द्यावें लागतें ती.

**पावधें**, न० कों० पावधी परंतु महिष्यादि गुरांचें वि०

**पावन**, ३ लिं० सं० पवित्र; २, पाप किं० अस्पृश्यत्वादि दोष ज्याचा गेला तो; ३, ज्याचे संबंधानें पापादि दोष जातो तो.

**पांवरी**, स्त्री० लहान जो पांवा ती.

**पावलट**, स्त्री० रा० पायवट.

**पावलटणें**, वा० पायवटणें.

**पावला**, पु० रुपयाचा चतुर्थांश; २, पावटा द्वितीयार्थी.

**पावली**, स्त्री० पावल्याचे मोलाचें रुप्याचें नाणें आहे.

**पावलोपावलीं**, अ० पदोपदीं.

**पावशा**, पु० चातक म्हणून पक्षी आहे.

**पावशेर**, पु० शेराचे चतुर्थांशाचें माप किं० वजन असतें तो; २, तत्परिमित जें धान्य, गूळ, इ० तो.

**पावसाळा**, पु० पर्जन्यकाळ.

**पावसाळी**, स्त्री० कों० पावसाळा.

**पावसाळें**, न० कों० मेघाछादन, वृष्टि, इ० रूप जी पर्जन्याची व्याप्ति तें; उ० काल उघड होती पण आज पावसाळें दिसतें.

**पावळी**, स्त्री० कों० पागोळी.

**पांवा**, पु० वंशाचे नळीस अनेक छिद्रें पाडून ममस्वर साधून वाद्य करितात तो.

**पावीत**, ३ लिं० रा० पावता.

**पांवेतों**, अ० पर्यंत.

**पाव्हणा**, पु० पाहुणा.

**पाव्हणासवळा**, पु० पाहुणारउळा.

**पाश**, पु० सं० दोरी इ० कांस गांठमारून कांहीं पदार्थ बांधाया करितां जो वलयाकार करितात तो; २, जेणें करून आपण गुंतला जातो असा जो संसार, स्नेह, चाकरी, इ० त्यास ल०; ३, सोंकटीं. इ० खेळायाचा जो फांसा तो.

**पाशी**, स्त्री० कों० फाशी म्हणून गुरांस रोग होत असतो ती.

**पाशीं, पासीं**, अ० कोणेकाचे जवळ; उ० त्याजपाशीं हजार रुपये आहेत; शेतापाशीं गाय चरते आहे.

**पाशुपत**, पु० सं० शिवोपासनेमध्यें मत आहे त्या मतानें चालणारा जो तो.

**पांशेरी**, स्त्री० पांचशेरी.

**पाषंड**, न० पाखंड.

**पाषंडी**, ३ लिं० पाखंडी.

**पाषांडी**, ३ लिं० पाखांडी.

**पाषाण**, पु० सं० दगड.

**पाषाणभेद**, पु॰ एक औषध आहे तो.

**पाषाणी**, ३ लिं॰ पाषाणाचा जो पदार्थ तो.

**पाष्ट**, पु॰ रा॰ गृहाचा आढ्यावरील जो प्रदेश तो.

**पास**, स्त्री॰ कों॰ जमीन साफ करण्याचे उपयोगी एक विरवंड आहे; २, वाद्ला करावयासाठीं सोनें च दवायाकरितां प्र॰ पसीस तोळे रुप्याची जी लगड करितात ती.

**पासंग**, न॰ तराजू, कांटा, इ॰ कांस जो विषमपणा तें; २, तो विषमपणा जाउन समव्हावें म्हणून हलक्या पारड्यांत जें दगडादि घालितात तें; त्याचा पासंगास तो पुरणार नाहीं म्ह॰ त्यापेक्षां तो फार चकर्मा असा अर्थ.

**पासच्चा**, ३ लिं॰ जो आपाशीं स्थित तो त्यापासच्चा.

**पासंबा**, पु॰ केळीचे कांघास जो कोंब फुटतो तो.

**पाँसरी**, स्त्री॰ पाचशेरी.

**पासन्ड**, स्त्री॰ भूमीवर शरीर आडवें टाकून जी स्थिति ती; वे॰ धा॰ प्र॰.

**पासलणें**, पासलघेणें.

**पासलपट्टी**, स्त्री॰ पासलघेण्याचा जो व्यापार ती.

**पासला**, ३ लिं॰ भूमीवर आडवा पडला जो मनुष्य, वृक्ष, इ॰ पदार्थ तो; कोणेकास पासलें पाडणें म्ह॰ वाद युद्धादिकांचाठायीं पराजित करणें; कांहीं कार्य पासलें पाडणें म्ह॰ कांहीं विघ्नकरून विवक्षितानुरूप नहोईअसें करणें.

**पासाव**, अ॰ पासून.

**पासून**, अ॰ येणें, काढणें, जाणें, इ॰ क्रिया द्वारा कोणेक अर्थाचा जा अर्थाशीं वियोग विवक्षित आहे तें जें अवधिभूत कारक त्यापुढें तन्निष्ठकारक तेंचें वाचक हें अव्यय लागतें; २, जा अवधिभूत पदार्थातें आरंभून कालदेशादिरूप अवधिमान् धरला असतो त्या अवधिभूत पदार्थापुढें पूर्वावधित्व वाचक हें अव्यय लागतें.

**पासोडा**, पु॰ चित्रविचित्र रंगाची जी पासोडी तो.

**पासोडी**, स्त्री॰ खादी इ॰ वस्त्राचीं दोन आटपडीं एकत्र शिवून केलें जें प्रावरण ती.

**पाहणी**, स्त्री॰ शेत, आगर, इ॰ कांचा त्यांत अमुक उत्पन्न होईल असा सर्कारांतून अदमास करण्याचा व्यापार ती; कोणेक पदार्थाची पाहणी करणें म्ह॰ कांहीं पदार्थ ठायीं पाडायाकरितां तत्संभावितस्थलीं इंद्रिय व्यापार करणें, एथें त्यापदार्थास कर्मता.

**पाहणें**, अवलोकिणें; २, जिव्हादि इंद्रिय द्वारा तत्तद्विषय अनुभविणें; ३, संसार दुकान इ॰ कांचें खटलें अंगावर भारघेउन करणें; उ॰ संसाराचा खटला मुलगा पाहतो; ४, कांहींएक व्यापारीं प्रवृत्त किं॰ त्यापासून निवृत्त होण्याविषयीं निमित्तें करून कांहीं पदार्थादिकांतें हा आपल्यास जउ अनुल्लंघनीय अशा प्रकारें मानणें; उ॰ यावेळेस थोबाडांत मारली असती परंतु तुझ्या आल्ण्याकडे पाहिलें; आम्हीं पैशाकडे पाहत नाहीं मनुष्याकडे पाहतों; ५, तीती क्रिया करून कांहीं फलाचा अनुभव घेणें याअर्थी तुनंततत्तद्वाचक सर्व धातूंवरून याचा प्र॰ होतो; उ॰ एकदां सांगून पहा; ६, कांहींएक व्यापार करायास इच्छून त्या व्यापाराचे तजविजींत असणें; आवयास, आयास, उं, एतलत्ययांत तत्तद्व्यापारवाचक धातूंवरून याचा प्र॰

प्र० होतो; कोणेकाच्या अपराधादिक किं० अपराधिमनुष्यादिक यांस पाहून घेणें ल० जितका अपराध तितकी शिक्षाकरणें; उ० तूं असा अपराध करितोस पण ईश्वर तुला पाहुन घेईल; माझा हातचालेल त्या दिवशीं मीच पाहून घेईन; दुरवर पाहणें इ० स्थलीं कांहींकार्य करण्याविषयीं पुरतेपणीं विचारकरणें; मागेंपुढें पाहणें ल० दुरवरपाहणें किं० करावें नकरावें यासंदेहांत पडणें; याचें बोलणेंमात्र पाहून घ्यावें इ० स्थलीं तदतिरिक्त पहावयाजोगा आंत गुणादिक नाहीं असा अर्थ; मीं आजपर्यंत दुसऱ्याचें घर पाहिलें नाहीं इ० स्थलीं द्रव्यार्जनाघर्थ दुसऱ्याची सेवा इ० केलेंनाहीं इ० प्रसंगानुरूप अनेक अर्थभेद होतात.

**पाहण्या**, पु० हारवल्या वस्तूंचा थांगलावण्याची मंत्रादिविद्या जाणतो किं० भूमींत अमुकस्थलीं खणिलें असतां पाणी लागेल असें जो जाणतो तो.

**पाहार**, स्त्री० पहार.

**पाहारा**, पु० पहारा.

**पाहारेकरी**, ३लिं० पहारेकरी.

**पाहारेबंदी**, स्त्री० पहारेबंदी.

**पाहाळ**, स्त्री० पहाळ.

**पाहाळी**, स्त्री० पहाळी.

**पाहिजे**, हें क्रियापद, अ० अपेक्षित आहे; उ० हा घोडा मला पाहिजे; २, तीतीं क्रियाअवश्यक आहे या अर्थी आयास, आवयास, आणि ला एतत्प्रत्ययांत तत्तत्क्रियावाचक धातूंपुढें याचा प्र० होतो; उ० तिथें आवयास पाहिजे, गेलें पाहिजे.

**पाहिजेत**, अ० पाहिजे याच अर्थी परंतु अपेक्षित पदार्थास किं० सकर्मकस्थलीं आवश्यक क्रियेचे कर्मास अकर्मकस्थलीं कर्त्यास अनेकत्व असतांच प्र०

**पाहिजेल**, पाहिजे.

**पाहुणचार**, पु० कोणी पाहुणा आला असतां त्याचा यथायोग्य सत्कार करितात तो.

**पाहुणा**, ३लिं० नातलग, ओळखीदेखीचा, जो कोणी गांवाहून आपले घरास आलातो; २, अतिथि, अभ्यागत, जो कोणी आपले घरीं भोजनाघर्थ येतो तो.

**पाहुणाराउळा**, पु० पाहुणा इ० तो.

**पाळ**, स्त्री० तळें, विहीर, यांचाजो कांठाचा प्रदेश तो; २, आंत कांहीं पाणी इ० राहावयाकरितां भोंवताला माती इ० कांचा जो परिधि करितात तो; ३, कानाचा सभोंवताल ची जी कड, जी यत्किंचित् दुणलेली असती ती; ४, आंत्याचे बरचे तळीचें जें तोंड त्याचे भोंवती जीउंच कड राखली असते ती, आंत वैरण घालितात; ५, न० वृक्षाचे मूळप्रदेशापासून जे अवयव भूमींत प्रसृत झाले असतात ते प्र०; कोणेकाचीं पाळेंमुळें खणून टाकणें ल० विवक्षित देश व्यवहारादिकांचा ठायीं चिरकाल प्रसृत झालेला जो त्याचा संबंध तो सर्वथा नाहीं असा करणें; कोणेकाचीं पाळेंमुळें भूमींत जाणें किं० कोणेकानें पाळें घेणें ल० कोणेकदेशीं किं० व्यवहारीं वृत्ति, गृह, दार, इ० कानें पुरतेपणीं

स्थिर

स्थिर होणें; ६, सर्कारांतून ज्याचा कर सोडिला आहे असें जें शेत, घर, कूळ, इ॰ तो, किं॰ सर्कारानें कोणेकाची वेठबिगार पडेल तीं करून त्यांचे ठिकाणांत घर बांधून घरदेणें नदेतां राहावें असें जें कूळ सोडिलें असतें तो.

**पाळक**, ३ लिं॰ पालक शब्दमार्थी; २, पाळ नपुंसकार्थी.

**पाळकबेटा**, पु॰ जो दुसर्याचा मूल पुत्रत्वेंकरून पाळिला तो.

**पाळणा**, न॰ पालन.

**पाळणावाला**, ३ लिं॰ अन्न, उदक, इ॰ कें करून जो ज्याचा रक्षण कर्ता तो त्याचा.

**पाळणा**, पु॰ लाहान मूल निजवून त्यास झोंके द्यावे ह्मणून जो काष्ठाचा पदार्थ टांगायाजोगा करितअसतात तो; २, पाळण्यांत मूल निजवून स्त्रिया कृष्णादिकांचें बाळचरित्राचें गाणें ह्मणत असतात तो.

**पाळणूक**, स्त्री॰ बालकादिकांचें पालन करण्याचा व्यापार ती.

**पाळणें**, ज्याचें ज्याचे जीवनास जोंजो अन्नादि पदार्थ हितकारक तोतो देउन त्यास जगिवणें; २, धर्ममर्यादा, व्रतादिनियम, शपथ, इ॰ कन्तदनुरूप स्वाचरणानें राखणें; ३, रा॰ अन्न, उदक, औषध, इ॰ कोणेकास सौख्यावह होणें; उ॰ हें जडउदक तुह्मास पावणार नाहीं.

**पाळत, पाळथ**, स्त्री॰ कोणेकाचा कृत्याचें किं॰ त्यापाशीं आहे काय नाहीं काय इ॰ वर्तमानाचें त्यास समजूंन देतां गुप्तरूपें करून जें कोणीं परिज्ञान करून घेतो ती.

**पाळतवणें**, श॰ कोणेकाचें कृत्य किं॰ पदार्थादिक गुप्तरूपें करून जाणणें.

**पाळती**, ३ लिं॰ पाळत घेणारा जो तो.

**पाळा**, पु॰ प्रा॰ ग्रं॰ कोणेकाचे भोंवतालीं मनुष्यादिकांचें पडलें असतें जें कडें तो.

**पाळी**, स्त्री॰ पालट अंत्यअर्थावांचून; २, कांहीं इष्टानिष्ट होण्याविषयीं संभावितजो प्रा॰ क्रमप्राप्त अवसर ती; उ॰ मीं आज छत्री आणली नाहीं ह्मणून फजीतीचीपाळी दिसती; ह्म॰ नावडतीची आलीपाळी तोंगांवाची झाली होळी.

**पाळींव**, ३ लिं॰ कोणेकानें घरीं पाळलेलीं जीं गुरें, कुत्रा, बकरा, इ॰ तो.

**पाळें**, न॰ मीठ, तिरवट, इ॰ ठेवायाकरितां जें लांकडाचें पात्र करितात तें.

**पाळेगार**, पु॰ राजास नगणितां रामोशी, भिल्ल, इ॰ लोक ठेवून देशापासून खंडदंड घेणारा जो तो.

**पिंक**, स्त्री॰ तांबुलादिभक्षण करून जो थुंका टाकितात ती.

**पिकटाण**, स्त्री॰ रा॰ पिकला फणस, केळें, यांचा जो वास ती.

**पिकटी**, स्त्री॰ रा॰ अंगावर जो पिकुटलेपणा दिसतो ती.

**पिकणें**, पर्ण, फल, धान्य, केश, गळूं, इ॰ केवल कालानें किं॰ औषधयोगानें पक्क होणें; २, धान्य, गूळ, इ॰ त्यात्या शेतांत उत्पन्न होणें; उ॰ विघ्यांत दाहा खंडी गूळ पिकला; ह्म॰ पिकल्यावांचून

विकत नाहीं; वस्त्रादिकांवरील रंग सर्दीमुळें पिकट होणें; कोणेकाचें पिकणें ल० अनुकूल कालदशा प्राप्त होणें; कांहीं वर्तमान पिकणें ल० लोकांत प्रसिद्ध होणें; याशीं बोलतांना उरपिकला इ० स्थलीं दुखूं लागला असा अर्थ; कोणेकास पिकविणें ल० लाथा बुक्यां खालीं मारून जर्जर करणें.

**पिकंदर**, न० आंबोणी थोंडे फोडा याचें शस्त्र आहे.

**पिकदाणी**, स्त्री० पिंक थुंका याचें पितळ इ० काचें पात्र आहे.

**पिकदाव**, पु० **पिकराड**, **पिकलाड**, स्त्री० **पिकलें**, न० कों० शेतांतील जें पीक किं० शेतें पिकण्याचा जो समय तो ती तें.

**पिकलैंपान**, न० केवल वृद्धमनुष्यास ल०

**पिकवण**, न० अंबे, केळें, किं० गळू, बद, इ० पिकाचा करितां जें तृणादि घालितात किं० औषध लावितात तें.

**पिकळी**, स्त्री० रा० गोगलगाय.

**पिका**, ३ लिं० रा० पिकलेला जो फलादिपदार्थ तो.

**पिकाउ**, ३ लिं० पिकायाचे योग्यतेस आला जो अंबा, फणस, इ० तो.

**पिकी**, **पिंकी**, स्त्री० पिंक.

**पिकुटणें**, मनुष्यादिकाचें शरीर, वृक्ष, पर्ण, इ० रोगादि विकृतीनें पिंगटवर्ण दिसूं लागणें किं० वस्त्रावरील तांबडा जो रंग तो सरदी इ० विकारानें फिक्का होणें.

**पिकूट**, ३ लिं० पिकुटलेला तो.

**पिखुरणें**, धान्य, केश, इ० विखरणें.

**पिंगट**, ३ लिं० एक रंग आहे; २, तद्विशिष्ट तो.

**पिंगल**, पु० साठ संवत्सरांतील एकावन्नावा संवत्सर आहे.

पिंग

**पिंगवी**, स्त्री० कों० कांगोणी.

**पिंगवें**, न० कों० कांगोणीचें जें बीं तें.

**पिंगवेल**, न० कांगणेल.

**पिंगळा**, पु० एक पक्षी आहे; २, मेढेजोशास ल०; ३, ३ लिं० पिंगटवर्णविशिष्ट जो नेत्र इ० पदार्थ तो.

**पिंगा**, पु० मुलींचा खेळांत एक प्रकार आहे; २, ३ लिं० पिंगटवर्ण जो नेत्रादि तो.

**पिंगाणें**, न० एक क्षुद्र पक्षी आहे.

**पिंगूळ**, पु० एक सपक्ष किडा आहे.

**पिचकट**, ३ लिं० स्वल्प जो पिचका डोळा किं० तद्विशिष्ट तो.

**पिचकनू**, **पिचकर**, **पिचदिशीं**, अ० पिंक किं० चिपळीचें पाणी इ० चपकन उडविण्याचें वि०.

**पिचकळी**, स्त्री० वा० गुळणी.

**पिचका**, ३ लिं० आडोळ्यास सतत पाणी येतें असा विकार आहे तो डोळा; २, आला चीर पडली आहे असा जो चुडा, बांगडी, इ० तो; ३, पादरफुसका; ४, विवक्षित कामापुरतें ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं असा काष्ठ, वस्त्र, इ० तो.

**पिचकारी**, स्त्री० चिपनळी; २, रक्त, उदक, इ० कांची जी चिरकांडी ती.

**पिचकुडा**, ३ लिं० कों० पिचकट.

**पिचंडया**, स्त्री० वा० पिचुंडया.

**पिचणें**, बांगडी, काच, भिंग, इ० किं० वरू, चिवा, इ० फुटणें; २, हाड, चुन्याचे खडे, इ० केवल भस्मप्राय होत असे भाजले जाणें; ३, तांदूळ फार वेळ भिजू न राहिल्यामुळें केवल हातानें चुराया जोगे होणें.

**पिचपीच**, अ० अनेकवार सशब्द थुंकण्याचें वि०.

पिच

**पिंचवणें**, रा॰ चुन्याचे खडे, हाड, इ॰ पिचणें; २, पित्तविकृतीमुळें गळ्याखालीं जळजळणें.

**पिचुंडया, पिचोंडया**, स्त्री॰ पाठीमागें हात वळवून बांधिलेजे दंड त्या; कोणेकाचा पिचुंडया बांधून घेणें ल॰ लेखपत्रादि द्वारा पुरता गुंतवून घेणें.

**पिच्छ**, न॰ पक्ष्याचें जें पीस तें.

**पिच्छा**, पुं॰ कांहीं पदार्थाचा पाठीकडील जो प्रदेश परंतु लाक्षणिक अर्थी प्रयोग होतात ते लिहितों; कोणेक मनुष्यादिकाचे किं॰ व्यवहाराचे पिच्छास बसणें, किं॰ लागणें, पिच्छा पुरिवणें, घेणें, धरणें, ल॰ पाठ पुरिवणें; पिच्छावर असणें ल॰ पाठलागावर किं॰ पाठपुराव्यावर असणें

**पिछाडा**, पु॰ कांहींएकाचा पाठीकडील जो प्रदेश तो.

**पिछाडी**, स्त्री॰ पिछाडा; २, घोडयाचे मागील जे पाय ती; ३, पायबंद; ४, चाललेला जो सैन्यादि समुदाय त्याचा जो मागील विभाग ती.

**पिछोंडे**, पु॰ पिचुंडया ते.

**पिंजका**, ३ लिं॰ पिंजलेला वेळू, वरू, इ॰ तो; २, रा॰ फाटलेलें जें वस्त्र, हंथी, इ॰ तो.

**पिंजट**, ३ लिं॰ किंचित् पिंजलेला जो वरू, चिवा, इ॰ तो; २. न॰ रा॰ चोया इ॰ उपयोगीं जीचिच्याची किं॰ वरूची कांबीट काढितात तें.

**पिंजणावळ**, स्त्री॰ कापूस, लोहोंकर, पिंजल्यामुळें जें पिंजाऱ्यास मोल देतात ती.

**पिंजणें**, वरू, चिवा, इ॰ उभा फोडणें; २, कापूस, लोहंकर, विशकलावयव होत अशीं करणें; ३, रा॰ वस्त्र, कागद, इ॰ उभें फाडणें ; ओरडण्यानें गळा पिंजला ल॰ अपूर्व विलक्षण कर्कशध्वनियुक्त झाला असा अर्थ.

**पिंजर**, स्त्री॰ उंच लाल जें कुंकु; २, कों॰ तेल घालून कालिवलें नव्हें असें जें कुंकू ती.

**पिंजरणें**, डोसकीचे केश, तृण, इ॰ कवातादिकानें उडून अस्ताव्यस्त होणें.

**पिंजरा**, पु॰ पांजरा; २, सभोंवताल्या साव्ळ्या कुटल्या असतात त्याचा मध्यवर्ती जी आगा तो; कोणेकास पिंजऱ्यांत घालून रक्षण करणें इ॰ स्थलीं मोटया प्रयत्नानें कांही उपसर्ग लागूं नये असें अगत्य रक्षिणें.

**पिंजरी**, स्त्री॰ पालखीवर छायार्थ जें सुशोभित वस्त्र केलें असतें ती; २, गाडीस छायेकरितां घुमटाकार जें आच्छादन करितात ती.

**पिंजार**, न॰ रा॰ भाताचें आंखूड गुंतलेलें तृण तें.

**पिंजारणावळ**, स्त्री॰ पिंजणावळ.

**पिंजारणें**, पिंजणें द्वितीयार्थी; २, डोसकीचे केश, पिसें, इ॰ पिंजरत असें करणें; ३, डोळे किं॰ नाक, पिसें, इ॰ क्रोधादिकानें प्रफुल्लित करणें; ४, वृक्ष, शाखापल्लव फुटून विस्तृत होणें.

**पिंजारी**, पु॰ कापूस, लोहंर, पिंजून उपजीविका करितो तो; ल॰ पादशाहास पादशाही झाली म्हणून पिंजाऱ्यानें तार तोडूं नये

**पिंजूळी, पिंजोळी**, स्त्री॰ पाती, झाडाचा दोर इ॰ पिंजून बारीक जो अवयव काढिला ती.

**पिटकन, पिटकर, पिटदिशीं**, अ॰ अनु॰ बेटकुळी, टोळ, इ॰ कानीं उडी मारणें किं॰ लिंबू इ॰ कोंतील बी इ॰ पटकर उडणें इ॰ कांचें चि॰.

**पिटकुला**, ३ लिं॰ चिमकुला.

**पिटकें**, न॰ दे॰ कोळवें.

पिटणें, शत्रु इ॰ कांस पराभूत करून पळेअसा करणें, किं॰ आसृद् इ॰ विवक्षितदेशीं त्वरेनें जाईअसा करणें; २, घोडा, गाय, इ॰ धांविवणें; ३, सुवर्ण, धान्य, उर, इ॰ हातोडा, मुसळ, हात, इ॰ कांचा आघातानीं बळकट ठेंचणें; दोंडी, धांडोरा, थाळा, पिटणें ह्म॰ तें तें वाजवीत गांवभर फिरणें; टाळी पिटणें ह्म॰ वाजिवणें.

पिटपीट, स्त्री॰ पिरपीर.

पिटाळणें, पिटणें प्रथम द्वितीयार्थी.

पिठरडीभाजी, स्त्री॰ रा॰ आंत पीठ घालून करितात जी पडवळ इ॰ कांची भाजी ती.

पिठलें, न॰ झुणका.

पिठा, ३ लिं॰ केवळ भुसभुशीत जो दगड तो; २, जें चिंभूड आंत पांढरें तरवाळ

पिठाड, पिठार, पु॰ अ॰ कों॰ भाकरी, तृण, इ॰ कांची खाउन नासून केलीजी निःशेषता तो; पाड, कर, इ॰ धा॰ योगीं प्र॰

पिठाळ, ३ लिं॰ दे॰ पुरता न भाजल्यामुळें किं॰ न शिजल्यामुळें गिजगिजीत लागतो असाजो भाकरी इ॰ पिठाचा पदार्थ तो.

पिठी, स्त्री॰ पापड, पोळी, इ॰ लाटतेवेळेस न चिकटावें ह्मणून त्यांस कोरडें तांदूळ इ॰ कांचें बारीक पीठ लावितात ती; २, तांदुळ इ॰ कांचें पीठ पाण्यांत शिजवून जो पातळ पदार्थ दुखणे करी इ॰ कांस खावयास करितात ती.

पिठुळणें, भाकरी इ॰ कांस वरपाणी लाविनात तें न लाविल्यामुळें किं॰ अग्निसंयोग साखा न लागल्यामुळें पिठाळ होणें; २, तांदूळ बहूतवेळभिजून राहिल्यामुळें फुसफुशीत होणें

पिठूळ, ३ लिं॰ पिठाळ; २, भुसभुशीत जो दगड, भाकरी इ॰ तो.

पिठोरा, पु॰ श्रावण अमावास्येस करायाचें व्रत आहे.

पिठोरी, स्त्री॰ पिठोरा व्रत करायाचा जो दिवस ती.

पिठोळा, ३ लिं॰ दे॰ पिठूळ.

पिठ्या, ३ लिं॰ पिठा; २, कणक्याचा प्रतिपक्षी तो.

पिंड, पु॰ भात, मृत्तिका, धातु, यांचा जो गोळा तो; २, देह; ३, देहांतच दोन विभाग कल्पून मस्तकोतीलजी पोकळी तद्व्यतिरिक्त जो देहभाग तो; ४, क्षेत्रव्यवहारीं पदार्थाचे आडीस ह्म॰; भाताचा पिंड, भाकरीचा पिंड, इ॰ स्थलीं अन्नापासून भात इ॰ खाउन वाढलेला असा अर्थ जाणावा; कोणेकाचे पिंडास बसणें, लागणें, इ॰ स्थलीं ज्याचा आपल्यास कंटाळा त्या मनुष्यादिकानें आपल्यास कदापि न सोडणें.

पिडणें, कोणेकास कोणेकानें त्रासे असा करणें.

पिंडा, पु॰ सूत्र, स्तंभ, इ॰ कांचा जो गोळा करितात तो.

पिडा, स्त्री॰ पीडा; २, ज्यापासून आपल्यास पीडा होती किं॰ ज्याचा आपल्यास कंटाळा आला त्यास ह्म॰ उ॰ ही पिडा येथून गेली ह्मणजे मी सुटलों; ३, पु॰ वा॰ माडाचे सोपाचें जें थरपील तो.

पिंडी, स्त्री॰ महादेवाचे जे बाण किं॰ स्वयंभू किं॰ पाषाण तासून केलेलें जें लिंग असतें ती.

पिढा, पुं॰ रा॰ थरपील.

पिढी, स्त्री॰ पुत्र, नातू, पणतू, बाप, आजा, पणजा, इ॰ जे वंशपरंपरेंतील पुरुष ते प्र॰; हें वतन चार पिढ्या चालत आलें इ॰ स्थलीं हा शब्द त्या

पिढ्यांच्या उपभोग्य जो काल त्याचा उपलक्षक होतो.

**पिढीचा**, १लिं॰ अनेक पिढ्या जो गुणादिक अनुस्यूतपणें चालत आला त्या गुणादिकानें विशिष्ट जो त्यावंशींचा कोणी एक तो; उ॰ हा गृहस्थ पिढीचा संपत्तिमान्.

**पिढीजादा**, १लिं॰ कुलीन; २, पिढीचा.

**पिढीदरपिढी**, अ॰ पुश्तदरपुश्त.

**पिढीपेस्तर**, अ॰ पिढीदरपिढी.

**पिढें**, न॰ सरासरी बसायासाठीं केला जो लांकडाचा लाहान पाट तें; २, घरट मांडायाकरितां जींती न लांकडें खालीं बसविनात तीं म॰; ३, वर तुळई इ॰ ठेवायाकरितां खांबाचे डोईवर आडवा जो लांकडाचा तुकडा बशिवतात तें.

**पिणें**, जल, वायु, इ॰ पातळ पदार्थ गळ्याखालीं मुखद्वारानें उतरणें; २, गुरगुडी, बिडी, यांचा धूर मुखांत प्राणवायूनें आकर्षून घेणें; येथें गुरगुडी इ॰ कांसही कर्मता येती; ३, क्रोध, दुःख, अपराध, इ॰ साहून जिरविणें; ४, वस्त्र, जोडा, गाडा, इ॰ कानें रंगाचें पाणी तेल इ॰ आकर्षून घेणें; तोफ, इ॰ कानें रंजक पिणें म्ह॰ बार न होतां काम्यावरची दारू जळणें; म्ह॰ पीहळद हो गोरी.

**पितर**, पु॰ अग्निष्वात्तादिक शास्त्रप्रसिद्ध देवता विशेष आहेत ते; २, पु॰ न॰ मेल्यानंतर ज्याचें श्राद्ध, तर्पण, पुत्रादिकानीं करावें म्हणून सांगितलें आहे तो तें; म्ह॰ कालमेला आणि आज पितर झाला; ३, न॰ आई, बाप; ४, न॰ महालय श्राद्ध; हा शब्द प्रायः अनेकवचनांत, कोणे कार्ची पितरें उद्धरणें म्ह॰ आईबापावरून शिव्या देणें.

**पितरखस्ता**, स्त्री॰ श्राद्धाचे खटपटीस म्ह॰; २, आ॰ अल्प कार्याविषयीं फार मोठी कंटाळा यावयाजोगी जी खटपट ती.

**पितरखंड**, १लिं॰ पितरांचें श्राद्ध करावयास जो चुकवितो त्यास म्ह॰.

**पितळ**, न॰ स्त्री॰ एक धातु आहे.

**पितळा**, १लिं॰ रा॰ चिरडखोर.

**पितळी**, स्त्री॰ पितळेची लहान जी परात ती; २, १लिं॰ पितळेचा जो गडवा इ॰ पदार्थ तो.

**पिता**, पु॰ सं॰ बाप.

**पितांबर**, पु॰ एक रेशमाचें नेसायाचें वस्त्र आहे.

**पितांबरी**, स्त्री॰ अल्पमोलाचा लाहान जो पितांबर ती.

**पितांबी**, स्त्री॰ बा॰ पित्तोपद्रवामुळें जी अंगावर गांठ येती ती.

**पितामह**, पु॰ सं॰ बापाचा जो बाप तो; २, ब्रह्मदेव.

**पितामही**, स्त्री॰ पितामहाची जी स्त्री ती.

**पितृकर्म**, न॰ सं॰ श्राद्ध, तर्पण, इ॰ जें कर्म तें.

**पितृगृह**, न॰ सं॰ पित्याचें जें गृह प्रायः स्त्रियांविषयीं प्र॰.

**पितृतिथि**, स्त्री॰ सं॰ पित्याचा किं॰ आईचा जो श्राद्ध दिवस ती.

**पितृपक्ष**, पु॰ सं॰ भाद्रपदाचा कृष्णपक्ष तो.

**पितृव्य**, पु॰ सं॰ चुलता.

**पित्त**, न॰ सं॰ शरीर निर्वाहक प्राणिमात्राचे शरीरांत एक पातळ पदार्थ विशेष आहे; ज्याचा अतिरिक्तपणा किं॰ न्यूनपणा झाला असतां विकृति होती; पित्त

पित्तखवळणें, -चढणें, पायांचें पित्त मस्तकास जाणें ह्म० कांहीं कारणामुळें अकस्मात् क्रोध येणें.

**पित्तकर, पित्तकारी**, ३ लिं० सं० ज्याचा भक्षणादि संबंधानें पित्तक्षोभ होतो तो पदार्थ.

**पित्तज्वर**, पु० सं० पित्तक्षोभ आल्यामुळें जो ज्वर येतो तो.

**पित्तपापडा**, पु० पित्तनाशक एक ओषधी आहे.

**पित्तप्रकोप**, पु० सं० पित्ताचा जो अतिशय तो.

**पित्तमारी**, स्त्री० एक ओषधी आहे.

**पित्तवायु**, पु० सं० पित्तप्रकोप होऊन जी वातविकृति तो

**पित्तवेगी**, ३ लिं० रा० शीघ्रकोपी जो मनुष्य, पशु इ० तो.

**पित्तक्षोभ**, पु० सं० पित्तप्रकोप.

**पित्ताळू**, ३ लिं० पित्तकर; २, ज्यास पित्तविकृति फार होती तो.

**पिंपरी**, स्त्री० एक वृक्ष आहे.

**पिंपरें**, न० पिंपळाचें फल तें.

**पिंपळ**, पु० एक वृक्ष आहे; पिंपळास पार बांधणें ह्म० कोणे कगरीबाचें लग्न करून देणें; २, वा० न० पिंपरें.

**पिंपळपान**, न० मुलाचे कपाळावर बांधायाचें एक भूषण आहे.

**पिंपळमूळ**, न० एक ओषधीचें मूळ आहे.

**पिंपळवण, पिंपळवन**, न० पिंपळपान.

**पिंपळवासी**, ३ लिं० अंधारीं रात्रीं घोर अरण्यांत फिरायास भीत नाहीं इ० कर्मानीं जो अघोरी तो.

**पिंपळाचेंफूल**, न० जो कोणे कस्थलीं वारंवार यायाचा नव्हे ह्मणून ज्याचें दर्शन दुर्लभ अशा मनुष्यास ह्म० .

**पिंपळी**, स्त्री० एक ओषधोपयोगी फल आहे; २, तिचा जो वेल तो; ३, पानवेलीची जी शेंग ती; ४, दोरीचा एक पदर धरून दुसरा पदर खालीं सरकिवला असतां जो पिंपळी सारिखा आकार होतो तो.

**पिंपळीपाक**, पु० पिंपळी इ० ओषधांचा जो भक्षाया करितां पाक करितात तो.

**पिंपाणी**, स्त्री० सनई, सूर, इ० कांस ताडपत्रादि युक्त तोंड्याची बारीक नळी लावितात ती; २, नदाकार वळकटी पर्णाची वाजवायाकरितां करितात ती.

**पिपासा**, स्त्री० सं० तृषा.

**पिपीलिका**, स्त्री० सं० मुंगी.

**पिरंगणें**, रा० पोर इ० कानें पिरपीर लावणें क्रि० याचकादिकानें रडगाणें.

**पिरगळणें, पिरगाळणें**, शरीरावयव, वृक्ष, इ० क धरून बळानें पीळ पडे असा फिरविणें.

**पिरंगा**, ३ लिं० वा० पिरंगण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पिरपिरणें**, क्रि० पिरंगणें.

**पिरपिरा, पिरपिर्या**, ३ लिं० सर्वकाल पिरपिर करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पिरपीर**, स्त्री० ज्यास पावयाजोगा बालक, याचक, इ० कांचा हें दे, तें दे, हें नको, तें नको, इ० क जो लांबलांब भाषणादि व्यापार ती; २, केवळ उघडूं नये आणि केवळ मोठ्यानें ही पडूं नये असें चिरकाल जें पर्जन्याचें पतन ती.

पिलखाना, पु॰ پیلخانہ हत्तींचा बांधायाची जी शाला तो.

पिलवा, पु॰ कों॰ पिलूं.

पिलवानू, पु॰ پیلبان महात.

पिला, पु॰ कों॰ वाघ, सिंह, सर्प, इ॰ कांच्या जो बालक तो.

पिलूं, न॰ पशु, पक्षी, सर्प, इ॰ कांचें जें बालक तें.

पिलें, पिलूं, न॰ पिलूं.

पिंवळट, ३ लिं॰ यत्किंचित् जो पिंवळा तो.

पिंवळणें, चा॰ पिरमाळणें.

पिंवळा, ३ लिं॰ एक रंग आहे; २, तद्विशिष्ट जें वस्त्रादिक तो; अर्धा हळकुंडानें पिंवळें होणें ल॰ अल्पविद्या संपत्यादिकानें फार गर्व वाळगणें.

पिंवळाधमक, ३ लिं॰ अतिशयीत जो पिंवळा तो.

पिशवी, स्त्री॰ वस्त्र, चर्म, इ॰ कांनें आंत कांहीं पदार्थ ठेवायाकरितां शिवून जें पात्र करितात तें; २, पोटांत पित्तादिसमावेशाची जी पात्रें आहेत ती म॰.

पिशाच, पु॰ न॰ सं॰ देवयोन्यंतर्गत जातिविशेष आहे; २, मरणसमयीं काहीं हेतू गुंतल्यामुळें मेल्यानंतर वायुरूपी होउन मनुष्यादिकांस पीडा करितो तो; पिशाचबाधा पिशाचोपद्रव इ॰ समास आणावे; ३, ला॰ ज्याचे कृतीचा अनुगम कोणास होत नाहीं असा मनस्वी वर्तणारा अघोरी, साहसी, जो मनुष्यादि त्यास ल॰.

पिशाचपक्वान्न, न॰ वडे, कोडबुळीं यांस ल॰.

पिशाचदेवरू, ३ लिं॰ ग्रा॰ वेडसर जो मनुष्य त्यास ल॰.

पिशाचषष्ठी, ३ लिं॰ पिशाचदेवरू.

पिशी, स्त्री॰ ओंधळे, सजगुरे, यांचें धान्यरहित जें कणीस ती.

पिशुन, ३ लिं॰ सं॰ चहाडखोर.

पिष्ट, न॰ सं॰ धान्यादिकांचें पीठ.

पिष्टपेषण, न॰ सं॰ एकदा सिद्ध आले त्या गोष्टीचा अप्रयोजकपणें निष्फल जो पुनः पुनः व्यापार तें.

पिसणें, दळणें क्रि॰ चंदनादि उगाळणें.

पिसळणें, पिसाळणें.

पिसा, ३ लिं॰ पिशाचा सारिखा चेष्टा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

पिसाई, स्त्री॰ दळणावळ.

पिसाट, न॰ पिशाचजनित जो कोणेकास बुद्धिभ्रंश व्हावया जोगा उपद्रव होतो तें.

पिसाटणें, कों॰ कोणेकानें पिसाटानें विशिष्ट होणें.

पिसारा, पु॰ पिसांचा जो समुदाय तो; २, तिराचे मूलप्रदेशीं पिसांचे तुकडे बांधिले असतात तो.

पिसाळणें, कुत्रा, कोल्हा, यांस एक रोग होत असतो जेणेंकरून ते वेडावतात आणि सविषता मात्र होते असा रोगानें त्यांणीं युक्त होणें; २, तो कुत्रा इ॰ डसल्यामुळें मनुष्यादिकानें त्या रोगानें विशिष्ट होणें; ३, ला॰ पिशाचोपद्रवानें किं॰ क्रोधावेशामुळें कर्तव्याकर्तव्य विचार सुटे अशी दशेतें पावणें;

पिसू, स्त्री॰ उवेएवढा सपक्ष एक जंतु आहे.

पिसें, न॰ पिशाचोपद्रव, ल्लातारचळ इ॰ कारणानें कोणेकास लागतें जें वेड तें.

पिसोड्या, स्त्री॰ दे॰ पिचुंड्या.

पिसोळा, पु॰ एक क्षुद्र जंतु आहे; २, एक औषधी आहे.

पिस्ता, पु॰ एक वृक्षाचें फल आहे.

पिस्ताई, ३ लिं॰ एक रंग आहे; २, तद्विशिष्ट जो वस्त्रादि तो.

पिस्वाद, पु॰ रा॰ वेश्या नृत्य करितेसमयीं अंगांत जो झगा घालितात तो.

पिहू, अ॰ कोकिल पक्ष्याचे शब्दाचें अनु॰.

पिळण, स्त्री॰ कों॰ ओलें वस्त्र, सूत्र, इ॰ कांतील जलांश निघावा ह्मणून त्यांस जो पीळ घालितात ती.

पिळणें, आंतील द्रवांश बाहेर निघे असा कोणेक पदार्थ दाबणें किं॰ पिळवटणें; पक्षीं त्या द्रवांशासही कर्मता येते; उ॰ यांचे नाकांत कांद्याचा रस पिळावा; गोमहिष्यादिकांस पिळणें ह्म॰ त्यांचें दुग्ध काढणें.

पिळपिळीत, ३ लिं॰ ज्यास पीळ कमी असा जो सूत, दोरी, इ॰ पदार्थ तो.

पिळवटणें, हस्तादि शरीरावयव, इक्षुदंड, वृक्षशाखा, इ॰ पदार्थ बळानें जितका पीळ पडेल तितक्या पिळानें युक्त करणें.

पिळा, पु॰ पिळलेलें वस्त्रादिक जें पिळासहित असतें तो; २, पिशाच, वायु, इ॰ उपद्रवानें पिळ्यासारिखें होतें जें शरीर तो.

पिळू, स्त्री॰ रा॰ पेळू.

पीक, न॰ शेत, आगर, इ॰ कांपासून उत्पन्न होतें जें धान्यादि तें; २, स्त्री॰ रा॰ पिंक.

पीठ, न॰ धान्यादिक दळून, कुटून, त्यांचें बारीक करितात जें चूर्ण तें; खाउन पीठ करणें इ॰ स्थलीं चपाट करणें, इ॰ कोणा एकास मारून पीठ पाडणें इ॰ स्थलीं असें करणें; आइत्या पीठावर रेघा ओढणें; किं॰ मुटका मारणें, एथें पित्रादिसंपादित संपत्तीवर मौजा करणें.

पीडणें, कोणेकास पीडाविशिष्ट करणें.

पीडा, स्त्री॰ रोग, शत्रु, अग्नि, इ॰ कांसंबंधी जें दुःख ती.

पीडित, ३ लिं॰ पीडा पावला जो तो.

पीत, ३ लिं॰ सं॰ पिंवळा; २, प्राशिला तो.

पीनस, पु॰ सं॰ नाकामध्यें एक रोग होत असतो तो.

पीर, पु॰ हिं॰ मुसलमान लोकामध्यें कोणी साधु मरून देवत्व पावतो तो; कोणेकास पीर भेटणें ह्म॰ मारून त्याची खैरी जिरवी असा दमनकर्ता भेटणें.

पील, न॰ पिलूं.

पीस, पींस, पु॰ न॰ पक्ष्यांचे पक्षांस किं॰ पुच्छास जे अनेक अवयव असतात ते प्र॰.

पीळ, पु॰ सूत्र, लता, तार, इ॰ कांचें एक शेवट धरून दुसरें शेवट वर्तुलाकार फिरविलें असतां त्याचे अंगीं जो संस्कारविशेष उत्पन्न होत असतो तो; २, ला॰ कोणेकाचे अंगीं जो अभिमानाचा ताठा असतो तो; ३, कोणेकाविषयीं कोणेकाचे अंतःकरणांत जो वांक असतो तो; पीळ घालणें, पीळ पाडणें, इ॰ स्थलीं. सौरस्यानें चालणारे जे उभयतां त्यांचे मनांत परस्परां विषयीं वक्रभाव उत्पन्न करणें ह्म॰ संभाळतें पण पीळ जळत नाहीं.

**पुकार**, स्त्री॰ दे॰ हाकाटी.

**पुकारणें**, दूर ऐकायास जावयाजोगी कोणेकास
हाकमारणें.

**पुकारा**, पु॰ पुकार.

**पुरवा**, पु॰ संकेतानें भोजन, उपहार, यांस स्त॰.

**पुरवानंद**, पु॰ पोटभर मिष्टान्न मिळालें ह्मणजे
कृतार्थतामानून कांहींउद्योगाची काळजी वाढ
गीत नाहीं असाजो तो.

**पुंगट**; ३लिं॰ दे॰ पिंगळाच्येअंगास जसा वास ये
तो तत्सजातीय जोवास त्याचें वि॰.

**पुंगळ**, पु॰ पिंगूळ.

**पुंगळवेल**, स्त्री॰ एकलता आहे.

**पुंगी**, स्त्री॰ मुखानें वाजवायाचें गारुडी इ॰ कांचें
एकवाद्य आहे; कोणेकाची पुंगी बंदकरणें स्त॰
कोणेक साध्याविषयीं भाषणादि व्यापारीं आर
ब्धजो प्रयत्न तो चालेनासा करणें; स्त॰ गाजरा
चीपुंगी वाजलीतर वाजली नाहींतर मोडून खा
ली.

**पुची**, स्त्री॰ स्त्रियांचेंजें उपस्थ ती.

**पुच्छ**, न॰ पशु, पक्षी, सर्प, इ॰ प्राण्याचे गुदाचेउ
परिभागीं लंबायमान अवयव विशेष असतो
तें; कोणेकगोष्टीस पुच्छफुटणें इ॰ स्थलीं पूर्व
चेपेक्षां अधिक कांहींनवाच एकअवयव उत्प
न्नहोणें; पुच्छवाढणें, लांबणें, स्त॰ कोणेककार्या
चा प्रथमतः मनांत आलाजो आकार तोअधिक
वाढणें;

**पुंज**, पु॰ सं॰ धान्यादिकांचाजो राशि तो.

**पुंजणें**, देवब्राह्मणादिक गंधपुष्पादिकें करूनअ
र्चिणें; लोकांचीं घरेंदारें, पुजणें इ॰ स्थलीं आर्ज
वास्तव प्रा॰ प्रतिदिनीं तेथें तेथें खेपा घालणें; पा
नें पुजणें इ॰ स्थलीं कांहीं भक्ष्यपदार्थ पात्रांवरथो
डथोडा वाढल्यासारखा करणें; कोणेकपदार्थ पुजून ठे
वणें स्त॰ त्याचा उपभोग, दान, इ॰ नकरितां उगी
चसंग्रहीं ठेवणें.

**पुजा, पुजां**, स्त्री॰ पूजा शब्दाचा अपभ्रंश; २, रा॰
पिशाचोपद्रवामुळें दुखणें आलें असतां तच्छां
त्यर्थ शूद्रलोक पिशाच संतोषार्थ कांहीं कर्म करि
तअसतात ती; कोणेकाचीपुजा करणें स्त॰ खर
डपट्टी काढणें.

**पुंजा**, पु॰ पुंज; २, कांहींएक नियतप्रमाणाचें सु
ताचें गुंडळें असतें तो; उ॰ आठपुंजे सुताचे दो
नपंचे निघतात.

**पुजारा, पुजारी**, पु॰ रा॰ देवालयांतील देवाची
पूजा करायाकरितां जो ब्राह्मणादिक वेतन देऊ-
न ठेविला असतो तो.

**पुंजावणें**, भूम्यादिकांचेठायीं प्रसृतजें धान्यादि
क तें एकत्रपुंज होईअसें गोळाकरणें.

**पुंजी**, स्त्री॰ दाणे, रुपये, इ॰ पदार्थांचा लहानजो
ढीग ती; २, संग्रहींस्थितजो द्रव्य, विद्या, इ॰ कां
चा भरणा ती; ३, सुताची अखंड केली असल्ये
जी सरोसर ती; धान्यादिपुंजीकरणें स्त॰ पुंजाव
णें.

**पुट**, न॰ सं॰ मध्यें काहींपदार्थ रहावयाचे योग्यते
मुळें पात्रत्वें करून विवक्षित जो हस्त, पर्ण, कर्ण,
इ॰ तें; चंचु, पुट, इ॰ समास,

**पुटकळी, पुटकुळी**, स्त्री॰ रक्तादिविकारानें शरीरा
वर

वर बारीक जो स्फोट येतो जामध्यें निवळपाणी अस तें तें.

**पुटपाक**, पु॰ सं॰ औषधादिकांचे भोंवतालीं पर्णादिक गुंडाळून तोपदार्थ अग्नींत घालून जी त्याची पकता करितात तो.

**पुटपुटणें**, दुसर्यास स्पष्ट ऐकायास नयेई असें कांहीं एक हळूहळू बोलणें किं॰ पढणें.

**पुटपुट**, स्त्री॰ लांबट अस्पष्ट जें हळूहळू भाषण ती; २, अ॰ बेडकी, पोर, इ॰ कानें पटपट उड्या मारणें चालणें, इ॰ कांचें वि॰.

**पुटी**, ३ लिं॰ पुटें दिल्हीं आहेत जास असें जें रसायनादि तो; समासीं प्र॰; उ॰ सातपुटें दिल्हीं आहेत जास तो सातपुटी; गजपूट दिल्हें आहे जास तो गजपुटी.

**पुठा, पुट्ठा**, पु॰ अश्वादिकांचे पुच्छाजवळचा जो भाग तो; २, वह्यांचे खालींवर लावितात जीं कातडीं तीं प्रत्येकीं.

**पुंड**, ३ लिं॰ राजा, मातापितरें, धनी, इ॰ कांची आज्ञा नमानितां स्वेच्छेनें अनेक प्रकारचीं मोठमोठालीं कचाटें करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**पुडका, पुडकें**, पु॰ न॰ कागद, पत्रावळी, इ॰ अनेक पदार्थ एकत्र जुळून सूत्रादिकानें बांधिला असतां जो आकारविशेष होतो तें.

**पुडा**, पु॰ पुडका; २, साकर इ॰ पदार्थ, कागद, पान, इ॰ कानें गुंडाळून बांधिला असतां जो आकारविशेष होतो तो; ३, मृदंगादिकांचें जें बूड तो.

**पुंडाई, पुंडायकी**, स्त्री॰ देश, ग्राम, इ॰ कांस उपद्रव करणें इ॰ रूप जें पुंडाचें कर्म ती; २, पुंडाचा जो देशादिकांस उपद्रव ती.

**पुंडावकें, पुंडावें**, न॰ पुंडाई.

**पुडी**, स्त्री॰ लाहान जो पुडा ती, प्रा॰ तृतीयार्थावांचून; २, दूरदेशापासून कोणेकानें कोणी एक मेला किं॰ कोणेकाचें दिवाळें निघालें इ॰ रूप आणिलें जें वर्तमान ती; आणणें, फोडणें, येणें, इ॰ कांचे योगीं प्र॰; ३, संन्याशास अर्पितात जी भोजनभिक्षा ती.

**पुंड्र**, पु॰ सं॰ गोपीचंदन, भस्म, इ॰ कांचा शरीरावर लावितात जो तिलक तो.

**पुढचा**, ३ लिं॰ देश, काल, आणि अनुक्रम, यांचा अग्रिमप्रदेशीं किं॰ मनुष्यादिकांचे तोंडाकडील प्रदेशीं स्थित जो तो; ल॰ पुढचा लाठेंच लागली ह्मणजे मागचा सावध होतो; २, या॰ आपेक्षां जो आधीं उत्पन्न किं॰ कांहीं कार्याचे ठायीं आधीं उत्पन्न झाला तो त्यापेक्षां.

**पुढचापुढें**, अ॰ पुढपुढें प्रथमार्थीं; २, कोणेकानें सांगीतलें जें कांहीं काम तें त्याचे डोळ्यां देखत मात्र करितो असें दिसायाजोगें कांहींएक करण्याचें वि॰

**पुढपुढें**, अ॰ अनेक साध्य जें काम त्याविषयीं इतरांस मागें टाकून आपण एकल्यानेंच पुढें सरून बोलणें कांहींएक काम करणें इ॰ कांचें वि॰; २, उत्तरोत्तर पुढें; उ॰ हा ग्रंथ पुढपुढें चांगला आहे.

**पुढला**, ३ लिं॰ पुढचा.

**पुढा**, पु॰ रा॰ कोणेक अर्थाचा तोंडाकडील जो भाग किं॰ प्रदेश तो; उ॰ दक्षिणेकडे पुढा करून बसूं नकों; माझे पुढ्यांतील दोंतयानें घेतली.

**पुढों**, अ॰ पुढें.

**पुढाकार**, पु॰ अनेकांनीं कर्तव्य जें कार्य त्याविषयीं कोणेकाकडेस दिल्हा जो मुख्यत्वें करून अधिकार तो; २, अनेकसाध्य कार्याविषयीं अनेकांस हातारवालीं घेउन तें करायाविषयीं एकानें पुढें सरण्याचा जो प्रकार तो.

**पुढाकारी**, पु॰ कांहीं एक कार्याचा पुढाकार ज्याणें घेतला आहे तो.

**पुढार**, पु॰ पुढाकार द्वितीयार्थीं; २, दे॰ पुढाकारी.

**पुढारों**, अ॰ ग्रं॰ पुढें.

**पुढारीं**, अ॰ ग्रं॰ पुढें.

**पुढारी**, पु॰ पुढाकारी.

**पुढील**, ३ लिं॰ पुढचा.

**पुढून**, अ॰ पुढें या अव्ययाचें वाच्य जें अधिकरण तेथून किं॰ तिकडून.

**पुढें**, अ॰ विवक्षित अवधीपासून अग्रिम प्रदेशीं किं॰ अग्रिम कालीं किं॰ अग्रिम विषयीं; २, मनुष्यादिकांचे तोंडाकडल्या भागीं किं॰ प्रदेशीं.

**पुणेरी**, **पुणेशाई**, ३ लिं॰ पुणें ह्मणून एक शहर आहे तेथील जो मनुष्य, कागद, भाषा, चाल, इ॰ तो.

**पुण्य**, न॰ उत्तमाचरण केल्यानें ईश्वरप्राप्ति द्वारा सुखप्रापक आत्म्याचे ठायीं जो धर्मविशेष होतो तें.

**पुण्यकर्म**, न॰ पुण्यजनक जें कर्म तें.

**पुण्यकाल**, पु॰ संक्रांति, ग्रहण, इ॰ कांचा जो पर्वकाल तो.

**पुण्यतिथि**, स्त्री॰ संन्याशी मेला असतां बाराव्या दिवशीं किं॰ प्रतिवार्षिक मृततिथीस त्याचे पुत्र शिष्यादि श्राद्धस्थानीं जें कर्म करितात ती.

**पुण्यप्रताप**, पु॰ कांहीं लोकोत्तर कार्यसिद्धीस आपल्याविषयीं साधनभूत जें पुण्याचें सामर्थ्य तो.

**पुण्यभूमि**, स्त्री॰ यज्ञादिकर्म करण्याविषयीं शास्त्रानें योग्य ह्मणून सांगीतली जी भूमि ती किं॰ हिमाचल आणि विंध्याचल यांचे मधला जो प्रदेश ती.

**पुण्यलोक**, पु॰ पुण्यानें प्राप्त होणारा जो स्वर्गलोक, ब्रह्मलोक, इ॰ तो.

**पुण्यवंत**, **पुण्यवान्**, ३ लिं॰ ज्याचे पदरीं पुण्य आहे तो.

**पुण्यश्लोक**, ३ लिं॰ ज्याचे नामस्मरणादिकें करून पुण्य लागतें असा ईश्वर, धर्मराज, नल, इ॰ ते प्र॰.

**पुण्यसामग्री**, स्त्री॰ इष्टकार्यसिद्ध करण्याविषयीं साधनत्वें करून विवक्षित जें पुण्य तो.

**पुण्यक्षेत्र**, न॰ जेथें वासादिकें करून पुण्य लागतें अशीं काशी, कुरुक्षेत्र, इ॰ क्षेत्रें तीं प्र॰.

**पुण्याई**, स्त्री॰ पुण्यसामग्री.

**पुण्याचा**, ३ लिं॰ बाप, आई, भाउ, बहीण, इ॰ धर्माचा.

**पुण्याहवाचन**, न॰ विवाहादि शुभकर्माचें अंगभूत एक कर्म आहे.

**पुतणी**, स्त्री॰ भ्याडी.

**पुतण्या**, पु॰ भावाचा जो मुलगा तो त्याचा, त्याचे स्त्रीचा ही; २, रा॰ एके बहिणीचा जो मुलगा तो दुसरे बहिणीचा.

**पुतळा**, पुं॰ धातू, काष्ठ, मृत्तिका, यांचें जें पुरुषाकार बाहुलें करितात तो.

**पुतळी**, स्त्री॰ धात्वादिकांचें स्त्रीच्या आकाराचें जें बाहुलें ती; २, एकरूपवर्णाचें नाणें आहे; ३, तलवारीचें जें अग्र ती.

**पुत्येण**, न॰ रा॰ गवतांत भेद आहे.

**पुत्र**, पु॰ जो आईबापांपासून उत्पन्न झाला जो पुरुष तो त्यांचा; २, दुसर्यापासून दत्तक घेतला किं॰ अन्नदानादिकेंकरून पोषिल्यामुळें जो पुत्रत्वें करून मानिला इ॰ तो.

**पुत्रक**, पुं॰ सं॰ पुत्र.

**पुत्रधर्म**, पु॰ मातापितरांची शुश्रूषा, श्राद्ध, इ॰ कजो पुत्राचा धर्म तो.

**पुत्रपौत्रादिवंशपरंपरा**, स्त्री॰ पुत्र, नातू, इ॰ रूपजी संततीची परंपरा ती.

**पुत्रवंती**, स्त्री॰ एक झाड आहे.

**पुत्रवान्**, ३ लिं॰ स्त्री॰ वती किं॰ वंती, पुत्र आहे जास तो.

**पुत्रसंतान**, न॰ पुत्ररूप जें संतान तें.

**पुत्रायण**, न॰ जातकर्म.

**पुत्रिका**, स्त्री॰ जो आईबापांपासून उत्पन्न झाली जी कन्या त्यांची ती.

**पुत्री**, स्त्री॰ पुत्रिका; २, ३ लिं॰ पुत्रवान्.

**पुत्रेषणा**, स्त्री॰ पुत्राविषयींजो लोभ ती.

**पुत्रोत्सव**, पु॰ आपल्यास पुत्र आल्यामुळें जो आनंद होतो तो; किं॰ तत्समयीं जो वाद्यगजर, इ॰ समारंभ करितात तो.

**पुदडणें, पुदळणें**, ह्मातारेल दुर्दशापावेल हेंमनांत नधरितां वस्त्र, अश्व, इ॰ पदार्थ जर्जर होई असें उपभोगिणें.

**पुदाणा**, पु॰ पुदिना.

**पुदिना**, पु॰ एक ओषधी आहे.

**पुनः**, अ॰ कांहींएकगोष्ट केल्यापेक्षां किं॰ झाल्यापेक्षां आणखी एकदां; उ॰ याला एकदां सांगीतलें ह्मणजे पुनः सांगावें लागत नाहीं, त्याक्रिया प्रायःएकात्मक असाव्या किं॰ परस्पर विरुद्ध असाव्या; उ॰ एकदां रुपये दिले ते पुनः घेणार नाहीं.

**पुनःपुनः**, अ॰ वारंवार.

**पुनरपि**, अ॰ पुनः ही.

**पुनरागमन**, न॰ जा स्थलापासून जो निघाला त्याचें त्याठिकाणीं पुनः जें आगमन तें.

**पुनरावृत्ति**, स्त्री॰ कांहींएक ग्रंथादिकाची दुसरी जी आवृती.

**पुनरुक्त**, ३ लिं॰ एकवार उच्चारिलें तें नपुनः उच्चारिलें जें वाक्यादि तो.

**पुनरुक्ति**, स्त्री॰ एकवार बोलले त्या वाक्याची पुनः निष्प्रयोजन जी उक्ति ती.

**पुनर्जन्म**, न॰ पु॰ मृत्यु यावयाजोग्या रोगादिसंकटापासून निभावून जीजीवंतपणें स्थिति तें तो.

**पुनर्नवा**, स्त्री॰ पु॰ एक ओषधी आहे.

**पुनर्भू**, स्त्री॰ पाटाचीजी स्त्री ती.

**पुनर्वसु**, पु॰ स्त्री॰ सातवें जें नक्षत्र तें त्या.

**पुनव**, स्त्री॰ पूर्णिमा.

**पुनश्च**, अ॰ मात्स्यान, आणखी.

**पुनस्संधान**, न॰ कांहीं आरंभिलेला व्यवहार तडीस नजातां विसकटल्यामुळें पुनः मुळापासून

कराची लागती जी खटपट तें.

**पुनीत**, ३लिं॰ प्रायश्चित्तादिकें करून जो शुद्ध झाला तो.

**पुनीव**, स्त्री॰ पुनव.

**पुन्नाग**, पु॰ नागचांपा; २, उंडीण.

**पुन्हा**, अ॰ पुनः.

**पुमपत्य**, न॰ सं॰ पुरुषरूप जें अपत्य तें.

**पुमान्**, पु॰ पुरुष.

**पुर**, न॰ सं॰ नगर.

**पुरः**, अ॰ सं॰ पुढें; याचा प्रयोग समासीं; उ॰ पुढें गमन करणारा तो पुरोगामी इ॰ आ॰.

**पुरखांब**, पु॰ जमनींत पुरलेला जो गृहादिकांचा खांब तो.

**पुरचुंडी**, स्त्री॰ पराकाष्ठा नारळा एवढी मोटी जी मोटली ती.

**पुरजा**, पु॰ कागदाचा जो कपटा तो.

**पुरण**, न॰ पोळ्या, मोदक, करंजा, इ॰ कांत घालायासाठीं शिजवलेली डाळ, नारळाचा कीस, इ॰ कांत गूळ साकर घालून जो पदार्थ करितात तें; २, सुवर्णाचे पाटली इ॰ कांचे पोटीं जें ताम्रादि घालितात तें; ३, भिंत, बांध, जोतें, इ॰ कांचा पोटीं भरीस जें माती, धोंडे, इ॰ घालितात तें; ४, न॰ स्त्री॰ कांहीं वेल, झाड, लाविलें असतां त्यांचे मुळांत जें माती, शेण, इ॰ घालितात तें ती.

**पुरणपोळी**, स्त्री॰ जिचे पोटीं डाळीचें पुरण घातलें असतें अशी जी गव्हांची पोळी ती.

**पुरणावरणाचें**, न॰ नित्याचा जो स्वयंपाकाचा आणि भोजनाचा साधा प्रकार असतो त्याहून विलक्षण कुलधर्म, पाहुणा, इ॰ निमित्तानें पोळ्या, पक्कान्न, इ॰ असावें असा आधिक्यविशिष्ट जो भोजनाचा सयंपाकाचा प्रकार असतो तें.

**पुरणी**, स्त्री॰ पुरणतृतीय चतुर्थार्थी.

**पुरणें**, कांहीं एक पदार्थ भूम्यादिकांचा खळ्यांमध्यें घालून आच्छादित करणें किं॰ मेढ, स्तंभ, वृक्ष, इ॰ कांचा मूलावयव भूम्यादिकांत घट्ट बसवून तो पदार्थ स्थिर राही असा करणें; २, कांहीं एक पदार्थ विवक्षित कार्यास किं॰ विवक्षित प्रमाणाशीं तुल्य व्हावयास जितका पाहिजे तदपेक्षया न्यून न होणें; ३, इच्छा, हौस, मनोरथ, आशा, हेत, इ॰ पूर्ण होणें; दारिद्र्य हें सर्वांस पुरलें आहे इ॰ स्थलीं अमुकस्थलीं याची व्याप्ति नाहीं किं॰ न्यूनपणा आहे असें नाहीं असा अर्थ होतो.

**पुरत**, अ॰ पुरेन.

**पुरतकाली**, ३लिं॰ पुरतकाल ह्मणून देश आहे तेथील जो कागद, भाषा, लोक, इ॰ तो.

**पुरता**, ३लिं॰ ज्यामध्यें अवयव, अवस्था, इ॰ संबंधी न्यूनत्व किमपि नाहीं तो; २, कांहीं एक कार्यास किं॰ कांहीं एक प्रमाणाशीं तुल्य होण्यास पुरायाजोगा जो तो; या अर्थीं त्यात्या कार्याचा नामाशीं समास होउन प्रयोग होतो किं॰ आया व्या यया प्रत्ययांत न ह्याचक धातूपुढें प्रयोग होतो; उ॰ संसारापुरता पैसा मिळाला ह्मणजे पुरे, जेवायापुरता घरीं येतो; हा धोत्रजोडा पुरता दाहा हात नाहीं.

**पुरतेपणीं**, अ॰ कांहीं आंत न्यूनता न राहतां पुरतें होई असें; ऐकूनघेणें, करणें, बोलणें, इ॰ क्रि॰.

**पुरपुराट**, पु॰ कांहीं एक पदार्थाची विवक्षित कार्यास

पुरू

पुरून उरायाजोगी जी विपुलता ती.

**पुरव**, पु॰ पुरवठा.

**पुरवटा, पुरवठा**, पु॰ कांहींएक कार्याविषयीं योजिलेला जो अन्न, द्रव्य, इ॰ पदार्थ त्याचा त्यात्या कार्याविषयीं तोटा न येतां पुरण्याचा किं॰ पुरून उरण्याचा जो प्रकार तो; २, रा॰ बायकांचा ओव्या इ॰ गाण्याचें जें शेषपूरण तो; ३, धा॰ वटवा.

**पुरवणी**, स्त्री॰ कागदामध्यें लिहिल्या मजकुराचा शेष तो कागद संपल्यामुळें जो दुसरे कागदावर लिहितात ती; २, तो दुसरा कागद ती; ३, कांहींएक बोललेल्या गोष्टीचा साक्षी, लेख, इ॰ प्रमाणांनीं खरें करून देण्याचा जो व्यापार ती; ४, त्यामध्यें जो न्यूनांश त्याचें पूरण करण्याचा व्यापार ती; ५, मोत्यांचे घोंसास जे अनेक सर असतात त्यांस प्रत्येकीं अमुक अमुक मोतीं असावीं असें जें संख्यारूप एक प्रमाण धरिलें असतें ती.

**पुरवणीबंद**, पु॰ पुरवणी द्वितीयार्थीं.

**पुरवणें**, कांहींएक गोष्ट किं॰ पदार्थ हें मला येईल कामास अशा बुद्धीनें मान्य होणें; उ॰ ह्यामाझा स्वभाव शिव्या देण्याचा आहे पुरवेल तर राहा; ही गोष्ट सांगतां पुरवत नाहीं इ॰ स्थलीं सांगायास शक्य होत नाहीं असा अर्थ; २, कांहींएक पदार्थानें कांहींएक विषयातें व्यापून राहाणें प्रायः जा पदार्थाचा संबंध अभीष्ट आहे तद्विषयीं प्र॰; उ॰ हा जेथे तेथे पुरवला आहे; ३, कांहींएक कार्याविषयीं साधनभूत कांहींएक पदार्थ जितका पाहिजे तितका देणें किं॰ युक्तियुक्तीनें खर्चून कांहींएक पदार्थ विवक्षित कार्याचे समाप्तीपर्यंत पुरायाजोगा करणें; उ॰ तुह्मी पुरवून पुरवून खाल तर तुह्मास पाहिजे तितकें मीं पुरवीन; ४, कोणेक व्यवहार किं॰ पदार्थ त्यापासून आपल्यास तोटा न येतां कांहीं नफा होई असा कोईवार पडणें; उ॰ फारसलाई असली ह्मणजे कोणताही व्यवहार पुरवत नाहीं.

**पुरशीस**, پرسش स्त्री॰ वादी प्रतिवादी इ॰ कांनीं आपलें वृत्त समजाविल्यानंतर त्यांतील कांहींएक अंशाविषयीं त्यांस जो प्रश्न करितात ती चाल, पड, इ॰ धा॰ यो॰ प्र॰

**पुरश्चरण**, न॰ सं॰ मंत्र आपल्यास सिद्ध व्हावा ह्मणून तदनुसार त्या मंत्राचा अमुक संख्याक जप करावा इ॰ मंत्रशास्त्रामध्यें अनुष्ठान सांगितलें आहे तें.

**पुरस्कर**, अ॰ पुरस्सर तृतीयार्थीं; भक्तिपुरस्कर, आदरपुरस्कर, इ॰ समासीं प्र॰.

**पुरस्कर्त्ता**, पु॰ सं॰ राजकीय व्यवहारादिकांचा ठायीं आपलें कांहीं काम असतां तेथे आपला प्रवेश करून अनेक प्रकारें आपलें साहित्य करणारा असा जो आपला पक्षपाती असतो तो.

**पुरस्कार**, पु॰ सं॰ पूजादिसत्कार तो.

**पुरःसर**, ३ लिं॰ सं॰ अग्रेसर; २, जा समुदायामध्यें जो मुख्यत्वें करून विवक्षित तन्नामपूर्वक या शब्दांशीं समास होतात तेथें विशिष्टाचा अर्थ तो तो समुदाय होतो; उ॰ इंद्रपुरःसर देव ईश्वरास शरण गेले; शपथादि शब्दांपुढें याचा योग होउन समास झाला असतां विशिष्ट शब्द क्रिया विशेषण होतो तेथें वक्ष्यमाण क्रियेवर शपथादिपदार्थांचा अन्वय होई असें, असा अर्थ; उ॰

शप

शपथपुरस्सर मीं सांगतों, आदरपुरस्सर त्यानें बोलाविलें.

**पुरळ**, पु॰ पित्तादि विकृतीमुळें अंगावर जो पुळ्यांचा समुदाय येतो तो.

**पुरा**, ३ लिं॰ पुरता प्रथमार्थी; उ॰ हा अंगरखा पुरा झाला नाहीं; २, ज्या कर्मामध्यें जो निपुण तो त्या विषयीं; उ॰ हा पुरा गाणार आहे; ३, पु॰ एक जातीचे किं॰ एक कसबाचे लोक जेथें राहातात असा जो नगराचा एक अवयव तो; उ॰ आम्हीं गोसावींपुर्यांत राहातो; ४, अ॰ सं॰ पूर्वी.

**पुराड**, न॰ नदीचा पुराबरोबर वाहवत येतें जें तृण, काष्ठ, पानें, इ॰ तें.

**पुराण**, न॰ सृष्टीची उत्पत्ति, स्थिति, प्रलय, इ॰ ईश्वरचरित्र ज्यामध्यें सांगीतलें असतें असे जे भागवतादि ग्रंथ ते ब॰; २, ३ लिं॰ सं॰ पुरातन; ३ ला॰ संसारादि संबंधी भारी लांबट जी गोष्ट नि॰ ला स्त्री॰

**पुराणा**, ३ लिं॰ हिं॰ जुना.

**पुराणीक**, पु॰ पुराण वाचून त्याचा अर्थ सांगणारा जो तो; २, देवालयादिकाचा ठायीं पुराण सांगण्याची वृत्ति आहे ज्यास तो तेथील.

**पुराणोक्त**, ३ लिं॰ पुराणांत सांगीतलेंजें स्तोत्र, मंत्र, इ॰ तो.

**पुराणोक्तआशीर्वाद**, पु॰ ज्यांस वेदाधिकार नाहीं त्यांस आशीर्वाद लिहायाचा असतां हा शब्द लिहितात तो.

**पुरातन**, ३ लिं॰ जुना.

**पुरावा**, पु॰ कांहीं कार्याविषयीं पाहिजे जो पदार्थ तो पुरविण्याचा व्यापार तो; २, पुरवणी तृतीय चतुर्थार्थी.

**पुरी**, स्त्री॰ नगरी; २, एक पक्वान्न आहे; ३, पु॰ गोसांव्यांत भेद आहे.

**पुरीतति**, स्त्री॰ सं॰ शरीरामध्यें एक नाडी आहे.

**पुरीष**, न॰ सं॰ विष्ठा.

**पुरुष**, पु॰ सं॰ ज्याचे अंगीं प्रजोत्पादक बीज आहे असा जो मनुष्यादि प्राणी तो; २, बाप्या; ३, एक जातीय वजे वृक्ष, लता, इ॰ दोनप्रकारचे असतात एकास फल आहे आणि एकास नाहीं त्यामध्यें ज्यास फल येत नाहीं त्या व्यक्तीस म्ह॰; ४, पुंलिंग नामानें वाच्य जो अर्थ तो; उ॰ वृक्ष हा पुरुष आणि झाड हें नपुंसक; ५, साडे तीन हात रूप जें उंचतेचें प्रमाण तो; उ॰ या विहीरींत दोन पुरुष पाणी आहे; ६, दिव्य सामर्थ्य ज्याचे अंगीं नाहीं असा जो मनुष्यादि जीव तो; उ॰ भ्रांति हा पुरुषाचा धर्म आहे.

**पुरुषत्व**, न॰ पुरुषाचा ठायीं प्रजोत्पादना विषयीं उपयुक्त जी शक्ति असती तें; २, कांहीं पराक्रम करण्याविषयीं उपयुक्त पुरुषाचे अंगीं जो उत्साहादि शक्तिरूप धर्मविशेष असतो तें.

**पुरुषार्थ**, पु॰ सं॰ मनुष्यादि जन्मल्या प्राण्यानें साधायास योग्य जे धर्म, अर्थ, काम, मोक्ष, हे चार ते ब॰; २, लोकांनीं वाहवा म्हणायाजोगा केला जो शत्रुपराजयादि पराक्रम तो.

**पुरुषोत्तममास**, पु॰ सं॰ अधिकमास.

**पुरूरव**, पु॰ रा॰ अनिश्शूद्रांचा देव आहे.

**पुरूळ**, पु॰ पुरळ.

**पुरे**, अ॰ विवक्षित कार्याचे किं॰ इछेचा पूर्ततेविषयीं जितका पाहिजे तितका तो तो पदार्थ व्यापार झाला

झाला याअर्थाचें वाचक तोपदार्थ आणखीनकों किं॰ तो व्यापार आणखी करूंनये याअर्थाचें भान अर्थात होतें; उ॰ मला दाहाहात धोतजोडा पुरे; हाएकदां बोलूं लागला ह्मणजे पुरे.

पुरेत, पुरेयाचें अनेकवचन.

पुरोडाश, पु॰ सं॰ अग्निहोत्राचा अग्नीवर पिष्ट भाजून जें होमद्रव्य करितात तो.

पुरोभागी, ३ लिं॰ सं॰ कांहींपदार्थ किं॰ गोष्ट यांतील दोषकाढण्याकडेसच ज्याचें लक्ष्य तो.

पुरोवर्ती, ३ लिं॰ कोणेकाचा पुढेंजो स्थित तो; उ॰ पुरोवर्तीपदार्थ जासदिसेना त्यास दूरस्थित कसा दिसेल.

पुरोहित, पु॰ सं॰ उपाध्याय.

पुलक, पु॰ सं॰ भयादिकामुळें जो अंगावर कांटा उभाराहतो तो.

पुलन, न॰ वा॰ क्षतादिकांत पू उत्पन्नकरणाराजो पावटा इ॰ पदार्थ तें.

पुला, पु॰ पुली॰

पुलाव, पु॰ ؋ मुसलमानलोक एकपक्वान्न करीतअसतात तो.

पुलिन, न॰ सं॰ वाळवंट.

पुली, स्त्री॰ गवत, कडबा, इ॰ कांची जी पेंढी ती.

पुलेणें, वा॰ क्षत, गळूं, इ॰ पुळणासयेणें.

पुल्लिंग, न॰ सं॰ नामाचींजीं तीनलिंगें त्यांत तो या सर्वनाम्यानें ज्याचा परामर्श होतो त्याचें लिंग तें.

पुवळणें, कों॰ पुलेणें.

पुशी, स्त्री॰ कों॰ पिसू.

पुंश्चली, स्त्री॰ सं॰ व्यभिचारिणी.

पुष्कर, न॰ सं॰ हस्तीचा शुंडेचा जो अग्रभाग तें.

पुष्कराज, पु॰ सं॰ एकरत्न आहे.

पुष्करिणी, स्त्री॰ सं॰ लहानजें सरोवर ती.

पुष्कल, पुष्कळ, ३ लिं॰ थोडानव्हे तो.

पुष्ट, ३ लिं॰ सं॰ कृशाचा प्रतिपक्षी.

पुष्टि, स्त्री॰ सं॰ पुष्टता; २, भाषणादि व्यवहाराचें व्यंगतेचें जें पूरण.

पुष्टिपत्र, न॰ पुस्तकनमळावें, नचुरावें, ह्मणून त्याचे भोंवतालें विरीचा तुकडा, जाडाकागद, इ॰ लावितात तें; २, लिहितेसमयीं त्याकागदाचें रक्षालीं आधारार्थ जो दुसरा कागद धरितात तें.

पुष्टीकरण, न॰ सं॰ भाषणादि व्यवहाराची पुष्टि करण्याचा जो व्यापार तें.

पुष्प, न॰ सं॰ फूल; २, स्त्रियांचें ऋतुसंबंधीजें रज तें.

पुष्पवटिका, पुष्पवाटिका, स्त्री॰ अनेकप्रकारचीं पुष्पांचीं झाडें लावून जें सुशोभित स्थल करितात ती.

पुष्पवृष्टि, स्त्री॰ सं॰ कोणेकानें कांहींउत्कृष्ट कर्म केलें असतां त्याजवर देव, मनुष्य, इ॰ आनंदित होउन जी पुष्पांची वृष्टि करितात ती; २, सर्वसभासदादिकांनी समाधानपावयाजोगें कोणेकानें अर्थयुक्त अस्खलित जें भाषण त्यास ह्म॰.

पुष्पांजलि, पु॰ सं॰ पूजासमाप्तीस देवादिकांवर जी दोहों हातानें फुलें वाहतात तो.

पुष्पित, ३ लिं॰ सं॰ पुष्पेंजास आलीं आहेत तो.

पुष्य, पु॰ सं॰ आठवें नक्षत्र तें.

पुष्यार्क, पु॰ रविवारीं पुष्यनक्षत्राचा जो योग तो.

पुसकट, पुसट, ३ लिं॰ यत्किंचित् पुसका जो

अक्षरादि तो; २, अ॰ अंधकारादि दोषानें अस्पष्ट दिसण्याचें वि॰.

**पुसकटणें, पुसटणें**, लिहिलेलें अक्षरादिक पुसकटे असें करणें.

**पुसका**, ३ लिं॰ स्पष्टढळढळीत दिसत नाहीं असें जें अक्षर, चित्र, गंधाचीरेषा, इ॰ तो.

**पुसणें**, कागद, शरीर, वस्त्र, इ॰ कांस लागलेला मलादिक किं॰ अक्षर, रेषा, इ॰ चिन्ह फडकें इ॰ कानें चोळून नाहींअसें करणें; २, विचारणें; ३, न॰ पुसायाचें साधन जें फडकें इ॰ तें; प्रयोग समासीं; उ॰ नाकपुसणें, तोंडपुसणें, इ॰.

**पुसणारा, पुसता**, पु॰ कोणी अपराध इ॰ केले असतां तूं हें कां केलेंस असें पुसण्याविषयींजो धनी इ॰ अधिकारी तो.

**पुंसवन**, न॰ स्त्रीसप्रथमतः गर्भअसतां दुसर्या तिसर्या मासीं करायाचा एक संस्कार आहे तें.

**पुसूनटाकणें**, शत्रु, सैन्य, इ॰ मारून लुटून भयाभंगास जाई असें करणें.

**पुस्त**, स्त्री॰ न॰ پشت गंजीफांचे पानाचा जो पृष्ठ भाग ती; २, पु॰ पिढी; उ॰ हें वतन आजाकडेचार पुस्त चालत आलें आहे.

**पुस्तक**, न॰ सं॰ वेद, शास्त्र, पुराण, इ॰ ग्रंथ जा कागदांवर लिहिले आहेत असा जो त्या कागदांचा समुदाय; स्त्र॰ पराधीन जिणें आणि पुस्तकीं विद्या.

**पुस्तकपाठ**, ३ लिं॰ पोथीपाठ.

**पुस्तंग**, पु॰ घोड्याचें खोगीर आंवळायाचा जो तंग त्याचा खोगरावर यावयाचा जो कानड्याचा अवयव असतो तो.

**पुस्तदरपुस्त**, अ॰ एकेपिढीपासून दुसर्यापिढीचाठायीं दुसर्येपासून तिसरीचाठायीं कांहींएक अच्छिन होत जाई असें वतन इ॰ चालणें, उपभोगणें, इ॰ कांचें वि॰.

**पुस्तपना**, पु॰ कांहींएक कार्याचाठायीं प्रवृत्त झाला जो कोणीएक त्याचें जें न्यून पडेल त्याविषयीं कोणी मित्रादिक रितो साहित्य किं॰ त्या साहित्य करणाराचा कार्यप्रवृत्तास असतो जो आश्रय तो.

**पुस्तापास्त**, स्त्री॰ तूं कोण कोठें जातोस, काय नेतोस, इ॰ वाटसरू इ॰ कांस जो प्रश्न करितात ती.

**पुस्ती**, स्त्री॰ अक्षर कोठपर्यंत वळलें याची परीक्षा पाहावयासाठीं मुलापासून कागद लिहून घेतात ती; २, मोट, जोडा, इ॰ फाटलें असतां त्यास जें चर्माचें ठिगळ देतात ती; ३, पाठबळ; ४, कों॰ जीर्ण झालेला कागद, भिंत, इ॰ कांचा संरक्षणार्थ तत्सजातीय दुसरा जो ओड देतात ती; ५, लिहिणार मुलाची यास काय काय समजतें हें पाहावया करितां कोणेक घेतो जी परीक्षा ती.

**पुळण**, स्त्री॰ कों॰ रेती; २, न॰ पुलिन; ३, न॰ था॰ पुलन.

**पुळणावट**, ३ लिं॰ जाजमिनीमध्यें पुळणीचा अंश बहुत आहे ती भूमि तो.

**पुळणास येणें**, गळू, स्तन, इ॰ पुवानें युक्त होणें.

**पुळी**, स्त्री॰ फुटकुळी; २, एकस्फोटरूप रोग आहे.

**पू**, पु॰ शरीरांतील रक्तास कांहीं विकृति झाल्यामुळें जो त्याचा पांढरा द्रवरूप परिणाम होतो तो; २, वस्त्र, काष्ठ, इ॰ अतिशयित कुजल्यामुळें जो परिणाम होतो

त्यास ल० .

पूगीफल, न० सं० पोफळीचें फळ तें .

पूज, न० टिंब; २, कांहींएक पदार्थाचा अभावाचें द्योतक लेखामध्यें जें वाटोळें चिन्ह करितात तें; बाकी पूज करणें इ० स्थळीं वारून निःशेष करणें इ० अर्थ जाणावे; स्थानसंख्येचा नावें पूज, पैशाचे नावें पूज, इ० स्थळीं त्यात्या पदार्थाचा केवळ अभाव असा अर्थ; स्थानसंख्यादिकांवर पूज पडणें या स्थळीं ही तोच अर्थ.

पूजक, ३ लिं० पूजा करितो तो.

पूजणें, पुजणें.

पूजन, न० अर्चन.

पूजा, स्त्री० सं० पूजन; २, देवादिपूजनार्थ आणिलीजी पुष्पादिसामग्री ती; पूजा बांधणें ल० देवावर सुशोभित दिसायाजोगी गंध, पुष्प, वस्त्र, धान्य, इ० कांची रचना करणें; विपरित लक्षणेनें कोणेकास शिवी, मार, करणें.

पूजित, ३ लिं० पूजिलेला जो तो.

पूज्य, ३ लिं० ज्याची पूजा करण्यास योग्य असा जो देव, गुरु, इ० तो; २, ज्याची आज्ञा अवश्य पाळली पाहिजे असे जे माता, पिता, गुरु, शास्त्र, इ० तो; ३, न० पूज.

पूट, पूठ, न० कांहींएक पदार्थांत विशेष गुण उत्पन्न व्हावा ह्मणून कांहींएक रसादिकांचा त्या पदार्थास लेप देउन सुकवून त्याचा अंगीं तो रस भिने असा जो संस्कार करितात तें; २, तें रसादि द्रव्य तें; धोत्रास शाईचीं पुटें बसलीं आहेत इ० स्थळीं लेप बसला आहे असा अर्थ.

पूड, स्त्री० कांहींपदार्थाचें केलेंजें चूर्ण ती; २, न० नगारा, चौघड, इ० कांचें जें पात्र तें; ३, पु० न० चौफुला, पानपुडा, पेटी, बटवा, इ० कांचा पोटीं जी घरें असतात तीं ग०; ४, न० वेळू, वेत, इ० कांचा पात्यांचें वाती, चिवट्याचीं पानें, इ० देवाया करितां जें पानपुड्याचे आकाराचें पात्र करितात तें; ५, चुनाळ्याचीं जीं दोन दोपडें तीं किं० मृदंगास दोहोंकडे दोन जी चर्में लाविलीं असतात तीं ग० .

पूत, पु० पुत्र; असा कोण मायेचा पूत आहे इ० वाक्यीं प्र०; २, ३ लिं० पुनीत.

पूय, न० सं० पू.

पूर, पु० नदी, ओढा, यांस पर्जन्योदक आत मिळाल्यामुळें जी त्या उदकाची अतिशयित वृद्धि होती तो.

पूरक, ३ लिं० पूरण करणारा तो.

पूरण, न० संख्या, प्रमाण, श्लोकादि ग्रंथ, इ० कांत न्यूनजो अंश तो आंत घालून पुरता करण्याचा जो व्यापार तें किं० जेणें करून तो पुरता होतो तो जो अंश तें.

पूरित, ३ लिं० पूर्ण केला जो तो.

पूर्ण, ३ लिं० सं० पुरता प्रथमार्थी; २, जलादिकानें भरण्याविषयीं ज्यामध्यें यत्किंचित् रिकामेपणा राहिला नाहीं तो; ३, न० संख्येचें अभाव बोधक जें वर्तुलाकार चिन्ह करितात तें

पूर्णगर्भा, स्त्री० पुरणपोळी ती.

पूर्णपात्र, न० सं० राजादिकानीं ब्राह्मणास बहुत भिक्षा मिळावी एतदर्थ एकपंचपात्रासारिखें धातुमय पात्र दिल्हें असतें तें; २, विवाहादिकीं एक

एक कर्मामध्यें अन्ननादिकानीं भरलेलें जें पात्र घेतअसतात तें.

**पूर्णपात्री**, पु॰ सं॰ प्रथमार्थसंबंधी पूर्णपात्र घेऊन भिक्षामागणाराजो तो.

**पूर्णा**, स्त्री॰ सं॰ पंचमी, दशमी, पूर्णिमा, अमावास्या, यातिथि प्र॰.

**पूर्णिमा**, स्त्री॰ सं॰ जातिथीस सर्वचंद्रबिंब तेजानें पूर्णहोतें ती तिथि.

**पूर्त्त**, न॰ सं॰ विहीर, तळें, बाट, देवालय, इ॰ निर्माण करणें इ॰ रूपजें धर्मकृत्य तें; २, ३ लिं॰ परिपूर्ण.

**पूर्तता**, ३ लिं॰ परिपूर्णता; इतक्याद्र्व्यानें याची पूर्तता होणारनाहीं इ॰ स्थळीं याचे इच्छेची परिपूर्णता होणारनाहीं असा अर्थ.

**पूर्त्ति**, स्त्री॰ सं॰ पूर्तता.

**पूर्भख्या**, पु॰ हिंदुस्थानी लोकांत एक भेद आहे.

**पूर्या**, पु॰ कल्याणरागांत भेदआहे.

**पूर्व**, स्त्री॰ जिकडेसूर्योदय होतो तिकडील जीदिशा ती; २, ३ लिं॰ विवक्षित स्थलापासून पूर्वदिशेकडील जो देश किं॰ तद्देशस्थित पदार्थ तो; ३, विवक्षित क्रमानुरोधानें जाहून जो आधींचा तो त्याहून; उ॰ आजदिवसाचे पूर्वदिवशीं प्रतस्थअसावें.

**पूर्वक**, अ॰ पुरस्सर तृतीयार्थी; २, ३ लिं॰ जोपदार्थ जाक्रमस्थितपदार्थाचा पूर्वभागीं आहे तत्पूर्वक तोपदार्थसमुदाय तो; उ॰ ईश्वराचें नाम श्रीशब्दपूर्वक घ्यावें.

**पूर्वकथा**, स्त्री॰ नित्यनित्यपुराणादिग्रंथाचा क्रमानें अर्थसांगत असतां वक्ष्यमाण कथेचा संदर्भ लागावा ह्मणून पूर्वींची उक्तकथा पुनः सांगतात ती.

**पूर्वकर्म**, न॰ सुखदुःखास कारणीभूत जें पूर्वजन्मादिकांचाठायीं केलें जें कर्म तें.

**पूर्वज**, ३ लिं॰ आपला बाप, आजा, पणजा, ज्येष्ठबंधू, इ॰ जे वडील तो.

**पूर्वजन्म**, न॰ वर्त्तमानजन्माचा पूर्वींचें जें जन्म तें.

**पूर्वजन्मार्जित**, ३ लिं॰ सं॰ पूर्वजन्मीं संपादिलेलें जें पुण्य किं॰ पाप तो.

**पूर्वदत्त**, ३ लिं॰ याजन्मीं तत्तत्पदार्थ प्राप्तहोण्यास कारण भूत पूर्वजन्मीं केलेंजें दानादि सत्कर्म तो.

**पूर्वपद**, न॰ हरिदास कथेचा आरंभीं जेंपद, अभंग, इ॰ ह्मणतो आणि त्याकथेचा उपसंहारीं ही तेंच ह्मणतो तें.

**पूर्वपश्चिम**, ३ लिं॰ पूर्वेकडून पश्चिमेकडे जाची लांबी आहे असेंजें गृहादिरूप क्षेत्र तो.

**पूर्वपक्ष**, पु॰ दुसर्यानें वरउत्तर करावें अशाबुद्धीनें पंडितापुढें कांहींएक मताचा केला उपन्यास तो; २, उपन्यास करावयाजोगा दोषाभास विशिष्टजो ग्रंथप्रतिपादित विषय तो; ३, वादप्रकरणीं अग्रवादी निवेदितोजें आपलें वृत्त तो.

**पूर्वपीठिका**, स्त्री॰ कोणेकपुरुषादिकांचें विवक्षितसमयापासून पूर्वींचें इत्थंभूतजें वृत्त ती; उ॰ आतां यानीं साधूपणा धरला पण यांची पूर्वपीठिका तर बहुत विरुद्ध आहे; २, कांहींएकगोष्टीचा विवक्षित अंशापासून पूर्वींचा जो अंश जाचे ज्ञानावांचून उत्तरांशाची व्युत्पत्ति होतनाहीं ती.

**पूर्वपुण्य**, न० पूर्वजन्मार्जित जें पुण्य तें.

**पूर्वपुण्याई**, स्त्री० पूर्वजन्मींची पुण्याई.

**पूर्वरात्र**, स्त्री० मध्यरात्रीच्या पूर्वींचा जो रात्रिभाग ती.

**पूर्वरूप**, न० रोग, संकट, इ० पुढें होणार त्यणजे पूर्वीं त्याचें ज्ञापक जें चिह्नत्यादि होतें तें; उ० कामला ही पांडूचें पूर्वरूप; बुद्धिभ्रंश हें दारिद्र्याचें पूर्वरूप.

**पूर्वरेषा**, स्त्री० देवरेषा.

**पूर्ववत्**, अ० पूर्वींच्याप्रमाणें.

**पूर्वसमुद्र**, पु० पूर्वदिशेकडील जो समुद्र तो.

**पूर्वस्थल, पूर्वस्थान**, न० जा स्थलापासून जो निघून देशांतरादिकास गेला तें त्याचें.

**पूर्वस्थिति**, स्त्री० बुध्यादिकांची प्रकृतिभूतजी विकृत्यवस्थेहून पूर्वींची अवस्था ती; उ० आलीकडे याला पिशाच उपद्रव झाला आहे हा पूर्वस्थितीवर केव्हां येईल हें कळत नाहीं.

**पूर्वा**, स्त्री० अकरावें नक्षत्र त्या.

**पूर्वांग**, न० कांहींएक अनुष्ठानाचे प्रधान कर्माचे पूर्वींचें जें कर्म तें; उ० स्वयंपाकाचें सडासंमार्जन हें पूर्वांग.

**पूर्वापर**, अ० विवक्षित काल, देश, ग्रंथ, इ० कांचा पूर्वींचा आणि अनंतरचा असे जे दोन विभाग त्यांतें धरून; उ० ग्रंथ पूर्वापर पाहिल्यावांचून लागणार नाहीं.

**पूर्वापरविरोध**, पु० एका ग्रंथांत पूर्वापरस्थित जीं वाक्यादिक त्यांचा परस्पर जो विरोध तो.

**पूर्वापार, पूर्वपार, पूर्वांपार**, अ० कांहींएक व्यापाराचा जो आद्यकाल त्याकालापासून सतत; उ० आली पूर्वापार असे वर्तत आलों त्याप्रमाणें पुढें वर्तूं.

**पूर्वाफल्गुनी**, स्त्री० पूर्वा.

**पूर्वाभाद्रपदा**, स्त्री० पंचविसावें नक्षत्र त्या.

**पूर्वाषाढा**, स्त्री० विसावें नक्षत्र त्या.

**पूर्वाह्ण**, पु० प्रातःकालापासून दुपारपर्यंत जो काल तो.

**पूर्वी**, स्त्री० एक राग आहे.

**पूर्वीं**, अ० अगोदर.

**पूर्वींचा, पूर्वील**, ३ लिं० अगोदरचा.

**पूर्वींपासून**, अ० अगोदरपासून.

**पूर्वोत्तर**, ३ लिं० आधींचा आणि त्याहून मगचा असा मिळून विशिष्ट जो ग्रंथ, वर्तमान, संबंध, इ० तो.

**पूर्व्या**, पु० पूर्भय्या.

**पूल**, पु० नद्यादिक उल्लंघून जावयाकरितां पाषाण, लांकडें, इ० कानीं रचून पाणी जावयास मार्ग ठेवून जो मार्ग बांधितात तो.

**पूस**, पु० पौष; स्त्र० पूस आणि थंडीनें पाडिला भूस.

**पृच्छक**, ३ लिं० पृच्छा करणारा तो.

**पृच्छा**, स्त्री० हें कसें, काय, इ० रूप दुसर्‍यास विचारण्याचा व्यापार ती.

**पृथक्**, अ० निराळा.

**पृथक्करण**, न० एकत्र स्थित पदार्थ निराळे निराळे करण्याचा जो व्यापार तें.

**पृथिवी, पृथ्वी**, स्त्री० समवाय संबंधानें जेथे गंध

गंधरूपगुण राहतो असें जें पंचमहाभूतांतील भूत ज्यावर नद्या, समुद्र, वृक्ष, पर्वत, वनें, नगरें, मनुष्य, पशु, इ॰ राहातात असा जो ईश्वरानें पृथ्वीरूप द्रव्याचा गोलाकार पदार्थ रचला आहे ती; २, ला॰ त्याजवर राहाणारे जे मनुष्य, पशु, वृक्ष, इ॰ सर्व ती.

पृथु, ३ लिं॰ सं॰ मोटा जाडा जो कांहीं पदार्थ तो.

पृथुक, पु॰ सं॰ पोहा; २, बालक.

पृष्ठ, न॰ सं॰ मनुष्यादिपदार्थाची जी पाठ तें; २, कागदाचीं दोन जीं अंगें तीं प्र॰.

पृष्ठतोनुपृष्ठ, अ॰ एकाचेपुढें दुसऱ्याचीपाठ दुसऱ्याचा पुढें तिसऱ्याची पाठ असें व्हावया जोगे प्रकारें किं॰ एकमेकापुढें एकमेकाची पाठ व्हावया जोग्या प्रकारें.

पृष्ठफल, न॰ गोलक्षेत्राचें जें वरील क्षेत्रफल तें.

पृष्ठभाग, पु॰ सं॰ मनुष्यादिकांचा जो पृष्ठ देश तो.

पृष्ठमात्रा, स्त्री॰ केकैकोकौ इ॰ अक्षरांस वरच्या बयाची जी मात्रा ती त्या अक्षराचा मागें देतात ती.

पेकट, पेंकट, न॰ कंबरेचा जो सांधा तें.

पेकणें, पेखणें, कोणेकाची वाटपाहात खोळंबून राहाणें

पेंका, पु॰ बेडका सारिखा एक प्राणि आहे.

पेँगणें, बसून डुकल्या घेऊं लागणें; २, लंगडणें; ३ रोगादिकानीं अशक्त होणें.

पेगम, पु॰ पराधीन दुर्घट कार्याचा सिद्धिविषयीं अनेकयुक्तीनीं बांधिलेंजें संधान तो.

पेंगळा, ३ लिं॰ दे॰ पांगळा.

पेच, पेँच, पु॰ मल्लयुद्धांत दुसऱ्यास पाडावयाच्या ज्या अनेक युक्ति त्या प्र॰; २, अनेकप्रकारचीं संकटें प्राप्त आल्यामुळें जी अडचण प्राप्त होती तो किं॰ तीं संकटें; ३, वाद्प्रतिवादादि भाषणांत दुसऱ्यास धरावयाच्या आपण न सांपडावें अशा ज्या अनेक युक्ति असतात त्या प्र॰; ४, पागोट्याचे जे वेढे किं॰ जे सारखे पीळ पडतात ते प्र॰.

पेँचणें, हस्तपादा घवयव किं॰ वृक्षशाखा इ॰ पिळवटणें, दुमडणें, इ॰ कारणामुळें आंत मुरगळले जाणें; कदाचित् अन्यकर्तृकता असतां सकर्मकही प्रयोग होईलसा दिसतो; २, कोणेकास भाषणानें कोंडणें; ३, रा॰ काष्ठादिक पिंजलें जाणें; ४, चोर, शत्रु, इ॰ कांचें अनिष्ट करण्याविषयीं कांहीं नवस करून देवास प्रार्थिणें; ५, पायफांकटणें.

पेँचपाँच, पेचपाँच, पु॰ पांचपेंच.

पेँचाटी, स्त्री॰ कचाटी.

पेज, स्त्री॰ तांदूळ शिजल्यानंतर जें वेळून पाणी काढितात ती; २, पुष्कळपाण्यांत थोडे तांदूळ शिजवून प्यावयाजोगें करितात ती.

पेजट, ३ लिं॰ जाभातामध्यें पेजेचा अंश बहूत असा जो भात तो; २, ला॰ पुष्टदिसून शक्तिहीन तो.

पेजपात्र, न॰ पेजट द्वितीयार्थी.

पेजवुडा, ३ लिं॰ कों॰ पेजट प्रथमार्थी.

पेजवतें, न॰ था॰ पायधूक.

पेजळी, स्त्री॰ रा॰ पावधी.
पेजवूक, स्त्री॰ रा॰ पावधूक.
पेजा, ३ लिं॰ पेजपात्र.
पेजें, न॰ रा॰ गाय, म्हैस, यांचें एकेविणीचें दुधतें तद्रूपजें फलतें; उ॰ हीगाय तूंपोस आणि व्या लीम्हणजे आवपें तूंघे आणि पेजें आम्हास दे.
पेजेंआवपें, न॰ रा॰ पेजें आणि आवपें मिळून जे दोन शब्द ते;उ॰हीपाडी मीं पेजेंआवप्याचे बोलीनें आणली आहे.
पेट, पु॰ कों॰ बंदूक, इ॰ कांच्या जो बार तो; २, बा॰ चोप; ३, स्त्री॰ पेटी.
पेटघेणें, काष्ठादिकानीं अग्निसंयोग झाल्यामुळें पेटूंलागणें; कों॰ पेटहोणें म्ह॰ क्रोधानें शरीराच्या संताप होणें.
पेटका, पु॰ पेडका.
पेटणें, अग्नीनें प्रदीप्त होणें किं॰ काष्ठादिकानीं पेटघेणें; २. ला॰ कलह, क्रोध, इ॰ कामीं अतिशय पूर्वक प्रवृत्त होणें; हटासपेटणें म्हणजे हटानें युक्त होणें; ३, भूमिचोपणें; ४, बैल, टोणगा, इ॰ नांगर, गाडा, इ॰ कांस जुंपायाजोगा शिक्षित होणें; ५, न॰ बा॰ चोपणी.
पेटवण, न॰ अग्निपेटायाचें साधन जा गोवर्याकाटक्या इ॰ तें; २, रा॰ अग्निपेटायासाठीं त्याजवर गोवरीचे तुकडे, बारीक काटक्या, इ॰ जें रचून ठेवितात तें.
पेटा, पुं॰ राजकीय व्यवहारार्थ कोणेक मोठा गांव, किल्ला, यांसमुख्य करून त्यांचे संबंधास्वाधीं लाविला असतोजो आसपासचे गांवांच्या समुदाय तो त्यामुख्य ग्रामादिकामुळां; २, आचे पोटीं अवांतरभेद अनेक आहेत अशींजीं व्यवहार संबंधी भिन्नभिन्न प्रकरणें असतात तीं प्र॰; उ॰ हासर्व वररवर्याचे पेट्यांत लिहा; हामनुष्य त्यागृहस्थाचा पेट्यांतला इ॰ स्थलीं त्याहून पृथक् लेंकरून गणनीय नव्हे केवल तदीयलेंकरूनच गणनीय असा अर्थ; ३, शाखेचें जें पिढूं; ४, पेटें.
पेटारा, पु॰ वेळू, वेत, इ॰ कांचा पेटी सारखा जो मोठा करंड करितात तो.
पेटारी, स्त्री॰ कों॰ शेत इ॰ कांतील माती उपसायाचें एक रूपासारिखें औत आहे; २, एक झाड आहे; ३, लहानजो पेटारा ती.
पेटी, स्त्री॰ बंदोबस्तानें रुपये इ॰ ठेवायाचें लांकडादिकाचें आच्छादनसहित एकपात्र आहे; २, एक भूषणावयव आहेत जा अनेक ओंवून मळ्यांत घालितात ती; ३, दंडावर बांधायाचें चतुष्कोण भूषण आहे; ४, फटाकडयांचा माळा एका कागदांत गुंडाळून जो पेटीसारिखा आकार करितात ती.
पेटूल, न॰ लहानजी काष्ठाची पेटी तीस म्ह॰.
पेटें, न॰ अनेक भोंपळे एकत्र बांधून नद्यादिकांत तरायाचें साधन करितात तें.
पेटेकरी, पु॰ माणसें पेट्यावर बसवून नद्यादिकांतून नेणाराजो तो; २, पेटें आहे ज्यापाशीं तो.
पेंठ, स्त्री॰ देशोदेशाहून अनेक जिन्नस येउन जेथे त्यांची घडामोड होती किं॰ अनेकप्रकारचीं बहूत वस्तें जेथें निर्माण होउन देशोदेशीं जातात असें

असें जें अनेक उद्मी लोकांनी वसलेलें स्थल तें; २, शहरांचे जे अनेक विभाग ते म॰ जेथें प्रायः थोडा बहुत बाजार असतो; ३, सावकार लोक पेंठेपेंठचा जिनसांचा भाव इ॰ बातमी देशांतरींचा सावकारांस लिहून पाठवितात तीं; ४, किल्याचे बाहेर जी शहरची वस्ती ती.

पेंठचलण, पेंठचलन, पेंठचलनी, पेंठचाल, पेंठचाली, ३ लिं॰ जा पेंठेंत जानाण्याची चालआहे तें तेथे.

पेंठपाड, पु॰ पेंठेंतील जिनसापानसाचा जो भाव तो.

पेंड, स्त्री॰ तीळ, खोबरें, इ॰ कांतील तेल काढून पेंडुन जो चोथा राहतो ती; २, नारळाचा किं॰ ताडफळांचा जो घडती; ३, पु॰ नारळाचा चव किं॰ निरगुंडीचा पाला इ॰ कुटून तापवून हस्तपादादिक मोडला असतां किं॰ दुखवला असतां किं॰ उठाणू इ॰ झालें असतां त्याजवर बांधितात तो; ४, हजीर किंवा रीतीनें अनुक्रमानें चालत आलें जें ओझें तो; ५, घराचे पाटणीवर किं॰ ओमणावर जो दाटचिखलाचा लेप दिला असतो तो; ६, भिजलेले चिकट मातींतून चाललें असतां पायांस किं॰ जोड्यास जो मातीचा लेप बसतो तो; ७, कों॰ शेताचा बांध बांधावा इत्यादि घर्षजें मातीचें ढेप काढितात तो; ८, धान्यादि भिजून एकत्र गोळा झाला असतां त्यास म्ह॰; पेंड टाकणें म्ह॰ नवें शेत करावयासाठीं योजिली जी भूमी तीटेंकावाचे परिधीनें चिन्हित करणें; मनुष्यादिकांचा पेंड वळणें म्ह॰ एकसमयावळें देंकरून अनेक मनुष्यादि दुखण्यांत पडणें; बा॰ पेंड वळणें म्ह॰ सावकार, सर्कार, इ॰ कानीं घरांतील सर्व मनुष्यें अडवून धरणें.

पेड, पु॰ दोरी, वेणी, यांचे पोटचे अनेक जे पदर ते म॰; २, कों॰ स्त्री॰ न॰ आंतें, घरट, यांचे जे दोन अवयव असतात ते म॰; ३, बा॰ न॰ सर्पाचें वारूळ, जाजवर प्रायः देवालय बांधितात.

पेडका, पेडगा, पु॰ वायु, मोडशी, इ॰ विकृतीमुळें पायांचे पोटर्‍यां इ॰ कांत जो गोळा येतो तो.

पेंडका, पु॰ थोरजें पेंडकें तो.

पेंडकी, स्त्री॰ पेंडकें.

पेंडकें, न॰ गवत, कडबा, इ॰ कांचें जें लहानसें ओझें तें.

पेडण, न॰ रा॰ मोदक, उंडे, इ॰ शिजवाया करितां त्यांस पाणी न लागावें म्हणून भांड्यांत कळकीचा पाचोळा इ॰ घालितात तें.

पेंडस, पु॰ रा॰ मुसळासारख्या दांड्यास लोखंडाची भाल मारून नेमखणायाचे उपयोगीं एक औत आहे.

पेंडसणें, न॰ कों॰ खणपटें.

पेंडा, पु॰ रा॰ वड, इ॰ कांचा पानांचा किं॰ ओल्या गवताचा जो भारा तो.

पेंडी, स्त्री॰ पेंढी.

पेंडुक, न॰ कों॰ पेंडकें.

पेंडें, न॰ मोत्यांचे अनेक सर एकत्र करून जें कंठभूषण करितात तें; २, दावें, दावण, यांस पशूंचा गळा बांधायाजोगा विरळपानें युक्त जो अवयव असतो तें; ३, ला॰ कों॰ एकमताचा मनुष्यांचा किं॰

किं॰ एक कुलोत्पन्न मनुष्यांचा जो समुदाय तें;४, कांहीं एक कार्याद्यर्थ एकत्र जमला जो मनुष्य समुदाय तें; उ॰ पंच, वादी, साक्षीदार, असें सगळें पेंडेंचेंपेंडेंच उठून आलें.

**पेढ**, न॰ स्त्री॰ कों॰ पोफळ, माड, यांचें जें झाड तें;२, स्त्री॰ निवडुंगाचें जें झाड ती; ३, पेड प्रथम द्वितीयार्थीं.

**पेंढकी**, स्त्री॰ कों॰ पेंढकें.

**पेंढरा**, पु॰ एक झाड आहे.

**पेंढरी**, स्त्री॰ पेंढरा.

**पेंढरें**, न॰ पेंढरीचें जें फल तें.

**पेढा, पेडा**, पु॰ दुधाचा खवा करून आंत साखर इ॰ घालून जो गोळा करितात तो.

**पेंढा**, पु॰ भाताचें तृण, किं॰ त्याची पेंढी तो.

**पेंढार, पेंडार**, न॰ पेंढारी लोकांचा जो समुदाय तें.

**पेंढारी, पेंडारी**, पु॰ स्वार असतात, जे अनेक मिळून गांव, किं॰ देश, लुटितात ते प्र॰.

**पेंढी**, स्त्री॰ तृण, कडबा, इ॰ कांचा अनेक व्यक्ति एकत्र बांधून जो आकार विशेष होतो ती; जळ्यांत पेंढी टाकणें, त्य॰ कलह करणारांस उत्तेजन कांहीं देऊन कलह वाढविणें.

**पेढी**, स्त्री॰ सराफ, हुंडीवाला, यांचें जें दुकान ती.

**पेणें**, न॰ मार्गस्थ जो कोणी त्याची प्रति दिवशीं भोजन, शय्या, इ॰ करावया साठीं मार्गी उतरून जी कांहीं काल स्थिति होते तें. किं॰ ती स्थिति करण्याचीं जीं स्थळें तीं प्र॰.

**पेंद**, न॰ कों॰ तृणादिकांचा एका बीजापासून अनेक अंकुर फुटून जो विशिष्ट समुदाय होतो तें.

**पेंदारणें**, वा॰ तृणादिकानीं पेंद होई अशा प्रकारें विस्तृत होणें, किं॰ भूमीनें तृणादिकांचा पेंदानीं युक्त होणें.

**पेंदी**, स्त्री॰ पेल्याची जी खालची बैठक ती; २, भोंपळ्याचे विण्याचा भोंपळ्यास जो काष्ठादिकांचा पदार्थ करितात तो जांत तारांचीं अग्रें गुंतविलीं असतात.

**पेंधें**, न॰ गवतांत भेद आहे.

**पेंपेरें**, न॰ कों॰ पिंपाणी.

**पेय**, ३ लिं॰ प्यावयास योग्य जें उदक, अंबीळ, इ॰ पदार्थ तो.

**पेर**, न॰ कों॰ बोट, ऊंस, वेळू, इ॰ कांचें जें कांडें तें; २ कुमात इ॰ कांतील निःशेष दाणा झडावा म्हणून, बैलांचे पायाखालीं मळायासाठीं, जें तृण पसरितात तो; ३, फुलें, धान्य, इ॰ कांची पडली जी पखळण तो; वस्त्रादिकांचा पेर घालणें. त्य॰ मनस्वी गुधडणें असा अर्थ; ४, स्त्री॰ वा॰ पेरूचें झाड; ५, न॰ पेरू.

**पेरकूट**, न॰ कों॰ निवडुंग.

**पेरण**, न॰ पेहरण.

**पेरणी**, स्त्री॰ भूमींत दाणा इ॰ बी पेरण्याचा जो व्यापार ती.

**पेरणें**, भूमीवर उगवावासाठीं बी टाकणें; २, लाक्षणिक विद्यादि गुण प्रसृत व्हावयासाठीं शिष्यादिकांस शिकविणें; ३, धनादिक व्याजाचे बोलीनें अनेकांस देउन ठेवणें; ४, न॰ पेहरण.

**पेरा**, पु॰ पेरणी.

**पेराव, पेरावा**, पु० हिं० आतिदेशादिभेदेंकरून मनुष्यांचा वस्त्रालंकार धारणकरण्याचा भिन्नभिन्न जो प्रकार आहे तो: २. क्वचित् पोषाकासही ल०.

**पेरावणी**, स्त्री० बा० कोणेकास सत्कारार्थ दिलें जें वस्त्रालंकारादि ती; २, वस्त्रालंकारानें कोणेकाचा करितात जो सत्कार ती.

**पेरू**, पु० एक झाड आहे; २, त्याचें जें फल तो.

**पेरें**, न० वरू, ऊंस, इ० कांचें जें कांडें तें; २, बोटाचे पेऱ्यास एक रोग होत असतो तें.

**पेलण**, न० पेलनें.

**पेलणें**, उ० मुद्गल, लेजीम, इ० शरीर दृढ व्हावयासाठीं हातीं धरून रुमाली, सार्धा, इ० चालीनें फिरविणें; २, ओझें, उभाकेलेला स्तंभादिक, न पडूं देतां, किं० इतस्ततः न होऊं देतां संभाळून धरणें; ३, बुद्धि, धन, शरीर, यांचा बलानें तनयोग्य संसारादि कार्यें संभाळून धरणें; ४, घर, स्तंभ, इ० एक्या अंगावर कलणें.

**पेलनें**, न० कों० गृहावरील घातलेलें गवत, इ० न उडावें म्हणून वरजे वांसे, लांकडें, इ० घालितात तीं प्र०.

**पेलवान्**, पु० कों० पहिलवान.

**पेला**, पु० धातु, कांच, मृत्तिका, यांचें आकार विशेषाचें एक पात्र आहे; २, बा० कांट्या इ० कांचें जें ओझें तो.

**पेलाव**, पु० कों० शरीरशक्तीनें साध्य जें उडी मारणें, इ० काम तद्विषयीं शरीरांतील शक्ती तोलून पहाण्याचा जो प्रयत्न तो; २, तोलून पाहून नेटानें त्या कार्या विषयीं जी शरीराची उठावणी तो.

**पेलें**, न० कों० कुंपणाकरितां जें कांट्यांचें ओझें आणीतात तें.

**पेंव**, न० जमीनींत धान्यादि ठेवाया करितां जी जागा करितात तें; भिकार, मुंग्या, इ० कांचें पेंव फुटणें, उघडणें, म्ह० त्यांचा त्यांचा अतिशय असा अर्थ.

**पेंवणी**, स्त्री० रा० नद्यादिकांचाठायीं पोंहून आण्याचा जो व्यापार ती, मार, धातुयोगीं प्र०.

**पेंवणें**, रा० उदकाचा ठायीं मनुष्य, काष्ठ, इ० कानीं तरणें.

**पेंवें**, न० एक ओषधी आहे.

**पेशा**, ३लिं० दर्बार इ० कांचा ठायीं उत्तमत्वेंकरून प्रसिद्ध जो मनुष्य तो.

**पेशजी**, अ० वर्तमान कालाचे पूर्वी, याचा व्यवहार कोणेकास पत्र लिहावयाचें असतां; उ० तुम्हास पेशजी पत्र पाठविलें होतें त्याचें उत्तर आलें.

**पेशवा**, पु० राज्याचा जो मुख्य प्रधान तो.

**पेशवाई**, स्त्री० पेशव्याचा जो अधिकार, किं० कारकीर्द, किं० राज्य ती.

**पेशवाज, पेषवाज**, पु० कळवांतिणी नृत्यसमयीं जो झगा घालितात तो.

**पेशा**, पु० कारकूनपणा, शागीर्दपणा, चाकरपणा, इ० रूप जें नातें तो.

**पेषकवज, पेशकवज**, न० एक कट्यारी सारिखें शस्त्र आहे.

**पेषणूक**, स्त्री० कों० पिशाचास कांहीं देऊंकरून दुसऱ्यावर घालण्याचा जो व्यापार ती.

**पेस**, स्त्री० कों० भोंपळा, कांकडी, इ० कांची जी फांक ती.

**पेसकळी, पेषकळी**, स्त्री० अंगरख्यास जा लहा

न

न कळ्या असतात त्या प्र°.

**पेसणें**, कों° काहीं नवस करून कोणेकास उपद्रव करण्याकरितां भूत उठविणें; २, रा° भोंपळा, कांकडी, इ° कांचा अनेक फांकी होत असें चिरणें.

**पेस्तरसाल**, न° पुढील जें वर्ष तें.

**पेहरण**, न° केवळ लहान मुलाचें आकारविशेषाचें जें अंगडें तें.

**पेहरणी**, स्त्री° कों° पेरणी.

**पेहरणें**, कों° पेरणें; २, न° पेहरण.

**पेहराव**, **पेहरावा**, पु° पेराव.

**पेहेरा**, पु° कों° पेरा.

**पेळ**, स्त्री° वा° अंगण, खळें, इ° कांचा कडेस किंचित् कंगोरा राखितात ती.

**पेळव**, स्त्री° कों° पेळू.

**पेळू**, स्त्री° कंब वळायाकरितां काथ्यास पीळ घालून जो वाती सारिखा आकार होतो ती.

**पेक्षां**, अ° जा अर्थातें अवधित्वें करून कल्पून उत्कृष्टत्व, निकृष्टत्व, गौरत्व, मूर्खत्व, इ° गुण सांगायाचे आहेत तेव्हां त्या अवधिवाचकावरून याचा प्रयोग होतो; उ° यापेक्षां हा उत्कृष्ट इ° आणावे; जापेक्षां तुह्मीं आलां त्यापेक्षां वस्तू दिली पाहिजे इ° स्थलीं पेक्षां शब्दाचा अर्थ हेतुत्व होतो याअर्थीं जो तो या सर्वनामापुढें पक्षीं असेंही अव्यय लागतें; उ° आपक्षीं त्यापक्षीं.

**पैं**, अ° ग्रं° वाक्यालंकारार्थ.

**पैकडी**, स्त्री° रा° मोहऱ्याची जी पोकी ती.

**पैका**, पु° व्यावहारिक रुपये, मोहरा, इ° नाण्यांचा जो समुदाय तो; २, रुक्याचे चतुर्थांश प्रमाण जें द्रव्य तें.

**पैकाना**, पु° रा° गोळ्यांतील शेण इ° निरपून काढायाचें साधन विरीचा किं° माडाचे पोईचा तुकडा असतो तो.

**पैकीं**, अ° काहीं पदार्थादिकांची विवक्षित समुदायांतर्गतत्वेंकरून किं° विवक्षित प्रकरण संबंधित्वें करून विवक्षा असतां तत्तत्समुदायवाचक किं° प्रकरणवाचक शब्दांपुढें याचा प्रयोग; उ° शंभर रुपयांपैकीं दाहा रुपये राहिले, मामलतीपैकीं बाकी यावयाची आहे.

**पैकेकरी**, ३ लिं° पुष्कळ पैका आहे ज्या जपाशीं तो.

**पैकेपूर**, ३ लिं° पैकेकरी.

**पैकेवान**, ३ लिं° पैकेकरी.

**पैंगळ**, पु° रा° पिंगळ.

**पैज**, स्त्री° कोणे काशीं कांहीं एक कार्याविषयीं हें या या प्रकारें निश्चय होईल किं° मी करीन अन्यथा झाल्यास मीं अमुक द्व्यादि देईन इ° रूप जी कोणेक प्रतिज्ञा करितो ती.

**पैंजण**, पु° तोरडी.

**पैजार**, स्त्री° पायपोस.

**पैजारखाउ**, ३ लिं° खेटरखाउ.

**पैजारपगडी**, स्त्री° पैजारेचा डौलानें बांधिलेंजें पागोटें तें.

**पैजेचा विडा**, पु° कांहीं एक दुर्घट काम करण्याविषयीं ज्यास अवसान असेल त्यानें करितों ह्मणून प्रवृत्त व्हावें अशा संकेतानें सभादिकांचा ठायीं मांडितात जो विडा तो.

**पैठणी**, ३ लिं° पैठण ह्मणून पेठ आहे तत्संबंधी पागोटें इ°

इ॰ तो;२, स्त्री॰ लुगड्यांत एक भेद आहे.

पैठणीआदर, पु॰ वरकर्मीजोआदर तो.

पैणा, स्त्री॰ एकरोग आहे.

पैरा, पु॰ दिवसाचे बोलीनें कामासाठीं आणिलाजो गडी तो.

पैरें, न॰ रा॰ मा॰ शेतकामास चार सा घटका दिवसा सयावें आणि सायंकाळचे चारघटिका दिवसा स घरीं यावें अशा बोलीनें जो पोर, शायको, इ॰ मजूर येतो तें.

पैरेंपण, न॰ पैर्यास घावयाची मजूरी तें.

पैल, ३ लिं॰ पलीकडच्याःतीर, थड, पार, इ॰ कांचें वि॰; उ॰ तो पैलतिरास नेईल.

पैलाड, स्त्री॰ पलीकडलें तीर.

पैलीकडे, अ॰ पलिकडे.

पैलू, पु॰ हिरा, माणीक, इ॰ कांस जे कोन पाडिले असतां दोहों कोनाचेमध्यें सपाट प्रदेश पडतात ते प्र॰.

पैवस्ती, स्त्री॰ कोणेकस्थलापासून कागद आलाअसतां कालांतरीं हा अमुकदिवशीं आला हें समजावें ह्मणून तोसमय त्या कागदावर मांडून ठेवितात ती; २, कांहींएकदिवस कोणेकमनुष्याची कोणेकगावांच्यागावीं जीवसती ती; ३, कोणेकाचीकोणेकाच्या गृहीं कांहींदिवस चाललेली जी आणें, येणें, इ॰ कांची वहिवाट ती.

पैशाचिक, ३ लिं॰ पिशाचसंबंधी जो उपद्रवादिक तो.

पैशून्य, न॰ प्रसिद्धजाली असतां अप्रतिष्ठा व्हावया जोगा जो कोणेकाचा दुराचरणादिरूप दोष असतो तें.

पैस, ३ लिं॰ विवक्षितकार्यास पुरून उरायाजोगी प्रशस्तजी जागा तो; २, अ॰ दाटी, अडचण, नहोई असें; दूर होणें, करणें, बसणें, अक्षरादिलिहिणें, इ॰ कांचें वि॰.

पैसा, पु॰ तांब्याचें नाणें आहे; २, पैकाप्रथमार्थी.

पैसावणें, उ॰ दाटीनें स्थितजे मनुष्यादि त्यांस पैस होत असें करणें.

पैसेकरी, ३ लिं॰ पैकेकरी.

पोई, स्त्री॰ मोठ्यानदीसजे लहान लहान ओहळमिळाले असतात, नदीचें पाणी वाढलें असतां त्याओहळांत जेथपर्यंत तुंबून जातें तितका त्या ओहळाच्या प्रदेश ती; २, धर्मपोई; ३, रा॰ नारळाची पोगी.

पोईड, न॰ व॰ पोई प्रथमार्थी.

पोंक, न॰ पोंग.

पोंकटी, स्त्री॰ केवल कोवळें जें पोफळ ती.

पोंकण, न॰ को॰ किडीनें धान्यांतील अंश खाऊन राहिला जो पोकळ दाणा तें; २, भाताचे शितास निंदेनें ल॰.

पोंकणें, कों॰ पोंकानें युक्त होणें.

पोकळ, ३ लिं॰ भरींवनव्हे तो; २, सईल; ३, ला॰ जामध्यें विवक्षित अर्थांश किं॰ तेजोंश किं॰ लभ्यांश, इ॰ नाहीं असाजो उद्योग, भाषण, इ॰ तो; ४, दुसर्याचादोष एकाएकीनयावा अशाजा युक्ति किं॰ यमक, प्रास, अर्थपुष्टता इ॰ जांत नाहीं असा जो ग्रंथ, भाषण, इ॰ तो; जें कामकरायास किं॰ शिकायास बहुत आयास लागतात त्यास पोकळनव्हे असें ल॰; ल॰ बडाघर आणि पोकळ वांसा.

पोकळधोंड्या, पु॰ निंदेनें ब्राह्मणास ल॰

पोकळभट, पु॰ पोकळधोन्या; २, जासंबस्थपाचा-विषयीं आधारशक्ति नाहीं असा जो ब्राह्मणत्यास म्ह॰

पोकळा, पु॰ एक पालेभाजीआहे.

पोकळापोकळी, ३ लिं॰ जामध्यें लभ्यांश इ॰ नाहीं असें भाषण व्यापार इ॰ तो.

पोकळी, स्त्री॰ पदार्थाच्या पोटीं जो पोकळपणा असतो ती.

पोक्त, ३ लिं॰ प्रौढ.

पोक्ता, ३ लिं॰ पोक्त.

पोँक्या, ३ लिं॰ कुबडा.

पोँख, स्त्री॰ कों॰ वस्त्र, ग्राम, इ॰ कांची शेवटील जीं टोकें तीं प्र॰.

पोखर, पोँखर, ३ लिं॰ आंतील अंश पोंखरून काढिल्यामुळें पोकळ झाला जो काष्ठ, धान्य, इ॰ पदार्थ तो; २, पु॰ पोंखरून काढिलेला जो काष्ठादिकांतील चूर्णप्राय अंश तो.

पोखरण, स्त्री॰ पुष्करिणी.

पोखरणें, पोँखरणें, काष्ठ, धान्य, इ॰ पदार्थ आंतील अंश कोरून काढून पोकळ करणें.

पोँग, न॰ मनुष्याची पाठ, भिंत, भांडें, इ॰ कांस बांकून मध्यें येती जी वक्रता तें.

पोँगणें, कों॰ भांडें इ॰ क पोंगानें युक्त होणें.

पोँगा, ३ लिं॰ कों॰ ज्याचे पाठीस पोंग आहे तो.

पोगाडा, पु॰ कों॰ कंसाळ्याचा मोठा जो देंट तो.

पोगी, स्त्री॰ कों॰ नारळ, करमाड, इ॰ कांचें कणीस बाहेर पडतें ती.

पोँग्या, ३ लिं॰ पोंगा.

पोँच, स्त्री॰ कों॰ पावती; २, पु॰ अमुक केलें असतां अमुक होईल इ॰ दूरचा तर्क करण्याविषयीं जें बुद्धीचें सामर्थ्य तो.

पोचट, पोँचट, ३ लिं॰ आंत पोकळ असल्यामुळें ज्याचे अंगीं ताठपणा नाहीं हस्तादिकानें आंवळला असतां चिंबतो असा जो धान्य, तृण, इ॰ पदार्थ तो; उ॰ म्ह॰ बाभळीचा कांटा पुढें तिखट आणि मागें पोंचट; २, पोंचानें युक्त जें पात्रादि तो.

पोचंडी, स्त्री॰ पुरचुंडी.

पोँचणें, पावणें प्रथम चतुर्थार्थीं; तर्कास पोंचणें म्हणजे कांहींएक चिन्हावरून एथें असें असें आहे असें जाणणें; खुणेस पोंचणें म्हणजे कोणेकानें केली जी नेत्रसंकेतानें खूण ती जाणणें.

पोँचता, ३ लिं॰ पावता.

पोँचलणें, भांडे, अलंकार पोंचानें युक्त होणें.

पोचा, पोँचा, पु॰ धातुमय पात्रास, अलंकारास कांहीं आघातादि झाल्यामुळें पडती जी खळी तो.

पोँची, स्त्री॰ पोंहची.

पोट, न॰ उरापासून बस्ती पर्यंत जो शरीराचा भाग जामध्यें अन्नोदकादि किं॰ गर्भ राहतो तें; २, पदार्थमात्राचा आंतील जो गर्भांश किं॰ पोकळी तें; उ॰ या घागरीचें पोट मोठें आहे; या लांकडाचा पोटांत शिरलों नाहीं; ३, डोळ्याचे खालचे वरचे बाजूचा पापणीचे जवळचा फुगीर भाग तें; ४, व्यवहारादिक जो विशिष्ट अवयवी त्याचा अंगभूत अनेक अवांतर व्यवहारादिरूप अनेक अवयवांस व्यापून राहतो जो संबंध तें; उ॰ वरप्रस्थान, वाङ्दान, इ॰ सर्व विवाहाचे पोटचीं कर्में

कर्में; संसाराचा खर्च सुटला ह्मणजे त्याचा पोटीं धडोती, धान्य, गवत, लांकडें, इ० खर्च येतात; ५, सदर ह्मणून जी बंदाची जागा तिला सुमार अंगुळभर जागा सोडून खालीकडील जी जागा जेथें पोटचारकमा इ० लिहितात तें; ६, पर्वत, भिंत, गंगोळी, इ० कांस मध्येंच वाढलेला जो अवयव असतो तें; ७, यत्संबंधित्वेंकरूनच जो पदार्थ किं० पदार्थसमुदाय कांहीं कार्यार्थ गणनीय आहे पृथक्त्वेंकरून गणनीय नाहीं त्याचा त्यांजवर जो संबंध तद्रूप जें अधिकरण तें; उ० यजमानाचा सत्कार झाला ह्मणजे त्याचे पोटीं आह्मीं आहोंच; ८, क्षुधाशांत्यर्थ जें खर्चाचें प्रकरण त्यास ह्म०; उ० पोटासाठीं चाकरी करितों एथें कांहीं मिळत नाहीं परंतु पोट बाहेर पडतें; ९, नदी, ओढा, इ० कांचा पात्रांत जल राहण्यास जो अवकाश असतो तें; पोटकरणें, वाढवणें, फुगवणें, ह्मणजे व्यभिचारानें गरव्हार होणें; पोटजाणें ह्मणजे ढाळ होणें; ह्म० हगलें नाहीं पोट गेलें; पोटजिरणें ह्मणजे वाढूं लागलेला गर्भ आंतले आंत नाहींसा होणें; पोटपिकणें ह्म० पुत्र, कन्या, एतद्रूप संतति होणें; पोट आळणें ह्म० दुसर्याचें द्रव्यादिहरण करून आपला स्वार्थ करून घेणें किं० करूं नयेतें करून पोट भरणें किं० निंदेनें जेवणास च ह्म०; पोटभरणें ह्मणजे पोटापुरतें द्रव्यादि मिळणें; पोटपाडणें, झाडणें, ह्म० औषधादिकें करून पोटांतील गर्भ पाडणें; पोटदुखणें ह्मणजे पोटांत वेदना होणें ह्मणजे परोत्कर्षादि पाहून वाईट वाटणें; ह्म० खरचणाराचें खरचतें आणि कोठवळ्याचें पोट दुखतें; पोट पानाळास जाणें किं० पाठीस लागणें ह्म० अन्नाद्यभावामुळें पोटास खळी पडणें; पोटीं असणें ह्म० संतति असणें असा अर्थ; पोटावर मारणें ह्म० सेवकादिकांस द्यावयाचें जें द्रव्य त्यांत कांहीं कमी करणें; पोटा आड येणें, पोटावर उठणें, पोटावर येणें ह्म० कोणेकाचें पोटिस्थ बुडवणें, पोट बांधून चाकरी, काम, इ० करणें ह्म० पोटास यथास्थित नखातां किं० ज्याचें काम करितो त्याजपासून पोटास ही न घेतां करणें; पोट मारणें, जिरवणें, ह्म० गोमहिष्यादिकानीं आपला दिसूं लागला जो गऱ्हवारपणा तो न दिसे असें करणें; पोटांत शिरणें ह्म० कोणेकाचा चित्ताभिप्राय ओळखावा इत्यार्थ केवल त्याचा आपल्यावर विश्वास होईअसें आर्जवादि द्वारा करणें; पोटाशीं धरणें ह्म० कोणेकास ममतेनें आपला सामानणें; अपराधादि पोटीं घालणें ह्म० क्षमा करणें; वा० पोट धरणें ह्म० हगवण बंद होणें; पोटफुटणें ह्म० कांहीं एक व्यवहारांत गुप्त राखलीजी गोष्ट ती उघड होणें; कोणेकाचे पोटावर पाय देणें ह्म० जेणेंकरून पोट चालतें अशी वृत्ति, चाकरी, इ० त्याचे नाशाविषयीं निमित्तभूत होणें.

**पोटकटार**, स्त्री० मरायासाठीं आपले हातानें कटारीनें पोट फोडून घेण्याचा जो व्यापार ती.

**पोटकरपी**, स्त्री० स्त्रियांस शिवी आहे.

**पोटकरीण**, स्त्री० व्यभिचारानें जी गरव्हार आली ती.

**पोटकली. पोटकुली, पोटकुळी**, स्त्री० कळोखी; २, पोट प्रथमार्थी, प्रायः निंदावृत्ति.

**पोटकूळ**, पु॰ पोटप्रथमार्थी निंद्यवृत्ति.

**पोटखराबा**, पु॰ कों॰ लागवड जमीनीच्या पोटीं जी ओसाड खराब जमीन असती तो.

**पोटखर्च**, पु॰ भोजनसंबंधी जो खर्च तो.

**पोटखर्ची**, स्त्री॰ पोटखर्चासाठीं घेतलेलें जें द्रव्यादि ती.

**पोटगडी**, पु॰ आंगगडी.

**पोटगी**, स्त्री॰ पोटखर्ची; २, पोट भरायाचें साधन जें वतन, वृत्ति, इ॰ कांहीं कोणाचें असतें त्यास ह्म॰.

**पोटगें**, न॰ रा॰ पोटगी.

**पोटघडी**, स्त्री॰ गर्हवारपणाचें चिन्ह दाखवायें ह्मणून पोटावर जी वस्त्राची घडी बांधितात ती.

**पोटघर**, न॰ सोंकट्याचे पटास जा घरांचा तीन ओळी असतात त्यांतील मधल्या ओळीचें शेवटलें जें घर तें.

**पोटचा**, ३ लिं॰ ज्यांच्या वीर्यशोणितांपासून झालें जें अपत्य तें त्या मातापितरांचें तो; २, व्यवहारादिकांचें पूर्वी सांगितलें जें पोट तत्संबंधी खर्च, रकम, बेरीज इ॰ तो.

**पोटजाळ**, पु॰ पोटच्या पुत्रादिकांच्या नाश झाला असतां जो शोक होतो त्यास ह्म॰; ह्म॰ पाठजाळापेक्षां पोटजाळ अधीक.

**पोटझांकणें**, न॰ विवाहामध्यें स्नानमुखसमयीं वरमाईनें वधूचे आईस एक लुगडें द्यावयाचा मान आहे तें लुगडें.

**पोटफुगी**, स्त्री॰ जेणें करून पोट फुगत असतें असा एक रोग आहे ती; २, ३ लिं॰ व्यभिचारानें गर्भिणि झाली जी स्त्री ती.



**पोटफूग**, स्त्री॰ कांहीं एक गोष्ट कोणाजवळ बोलावी अशी इच्छा होउन बोलावयास न सांपडतां कांहीं काळ गेल्यामुळें जी उत्कंठित दशा जाहाली असती ती; पोटफूग झाडणें ह्मणजे बोलावयाचें बोलून ती उत्कंठा शमविणें.

**पोटफोड**, स्त्री॰ कांहींएक व्यवहारादिकांतील गुह्यांशाची जी प्रसिद्धि ती.

**पोटबांधणें**, न॰ लहान मुलाचें किं॰ बाळंतिणीचें पोट बांधायाचें जें वस्त्र तें.

**पोटबाबू**, पु॰ पुखानंद.

**पोटभर**, अ॰ पोटभरे असें जेवणें, अन्नादि पर्याप्त होणें, इ॰ कांचें वि॰; २, ला॰ इच्छा तृप्त होई असें; उ॰ तुह्मांशीं मनांतून पोटभर बोलावयाचें आहे; ३, कर्तृशक्ति, भोक्तृशक्ति, यांस पर्याप्त होई असें; उ॰ हें काम मला पोटभर आहे; शेतास पोटभर पाणी मिळालें ह्मणजे असें पाहिजे तसें पिकतें.

**पोटभरणा**, स्त्री॰ रा॰ अन्नादिकानें पोटाची भरती; उ॰ गुरांची पोटभरणा होत चालली ह्मणजे दूध चढवितील.

**पोटभरू**, पु॰ पुखानंद; २, पोट भरायाच्या उद्देशानें जो प्रवासास गेला तो; ३, ज्यामध्यें रुच्यादि गुण असोत नसो परंतु ज्यांत भक्ष्यांश बहुत अतएव ज्याच्या भक्षणीं पोट भरतें असा जो फलादि पदार्थ तो.

**पोटभर्या**, ३ लिं॰ पोटबाबू.

**पोटमांडणी**, स्त्री॰ कों॰ गृहादिकांचीं पाखरीं न

द्वाचीं ह्मणून आधारार्थ पारव्याचें प्रायः मध्य प्रदेशीं अनेकस्तंभावर लग्या सांधून विशिष्ट उभें करितात तें.

**पोटमारा**, पु॰ पोटाचीजी आबाळ तो.

**पोटह्मातारा**, ३ लिं॰ पोटाचे आबाळीमुळें ह्मातार्‍यासारिखा अशक्त झाला तो.

**पोटरी, पोढरी**, स्त्री॰ पायाचे नडगीचे मागलाजो प्रदेश तो; २, बा॰ उताण्या हाताच्या मणगटापासून कोंपरापर्यंत जो भाग तो; ३, धान्य, तृण, यांचें बाहेर पडायाचे दशेस आलेंजें कणीस, कणशी, तुरा, इ॰ तो; धान्य इ॰ पोटरीस येणें ह्मणजे त्यादशेस येणें असा अर्थ.

**पोटसूळ**, पु॰ पोटांत एक रोग होतो तो.

**पोटस्थ**, न॰ पोटिस्थ.

**पोटळणें**, क्रि॰ पोटाळणें प्रथमार्थी.

**पोटळी**, दे॰ स्त्री॰ पुरचुंडी.

**पोटा**, पु॰ गव्हांत जाति आहे; २, स्त्री॰ जास्त्रीस दाढीमिशी इ॰ पुरुषचिन्हें आहेत ती.

**पोटाग**, स्त्री॰ कांहींएक कार्य करण्याविषयीं कोणेकास चिंतापासून जो अगत्यवाद ती.

**पोटाचाचाकर**, पु॰ पोटभरावें ह्मणून जो चाकरी, इ॰ उद्योग करितो तो.

**पोटाचापाईक**, पु॰ पोटाचाचाकर.

**पोटारा**, बा॰ ३ लिं॰ ज्याचे पोटाची आकृति साधारण असून आंत बहुत पदार्थ मावतो असा जो पदार्थ तो.

**पोटाळणें**, गोमहिष्यादि स्त्रीनें आंतील गर्भ वाढूं लागल्यामुळें पोटाचे वृद्धीनें विशिष्ट होणें; २, मनुष्य, वृक्ष, इ॰ कांस पोटाशीं कवळून धरणें.

**पोटाळा, पोटळा**, पु॰ पोटाच्या बाहेर पडतोजो कोथळा तो.

**पोटिस्थ**, न॰ निर्वाहसाधन जें वृत्यादि तें.

**पोट्या**, पु॰ क्रि॰ पोटाळणें प्रथमार्थी.

**पोंढ**, पु॰ क्रि॰ चोंडें कुजत घालावयासाठीं खाजणांत जी खळी खणितात ती; २, आगरशिंपायासाठीं जे दांडे करितात त्यांत पाणी राहावें ह्मणून जी खळी खणितात तो.

**पोंढळणें**, क्रि॰ उपोषणादि कारणामुळें डोळे खोलजाणें; २, माड, पोफळ, इ॰ रुजवणीचीं झाडें उपटून दुसरे ठिकाणी लावणें.

**पोंढी**, स्त्री॰ क्रि॰ मानेच्या मागले बाजूची जी खळी ती.

**पोत**, पु॰ एकावर एक चिरगुटें गुंडाळून जो मशालीसारिखा पदार्थ मुत्या हातीं घेतो तो; २, चिंध्या बांधून जी मशाल तो; ३, दांडावर्ज करून जो खण किं॰ त्यांचा अंश तो; ४, स्त्री॰ पु॰ कांचेचे किं॰ स्फटिकाचे आंतबारीक मण्याचाजो समुदाय ती, प्रायः अनेकवचनांत प्र॰; ५, स्त्री॰ पु॰ पोंत; ६, पु॰ रा॰ स्त्रियांचें कंठभूषण आहे; ७, पु॰ न॰ सूत विणल्यानें सिद्ध आलेंजें वस्त्राचें शरीर तो तें.

**पोंत**, ३ लिं॰ कांहींएक शरीरांतील रोग निघून जावा ह्मणून हस्तपादादिकांस भाजून किं॰ विषा, इ॰ लावून जो व्रण करून घेतात तो ती तें.

**पोतडी**, स्त्री॰ मोतीं, हिरा, यांचीजी पुरचुंडी किं॰ पिशवी ती; २, सोनार, सराफ, यांचाजो तन्त्र व्यवहारोपयोगि सामग्री ठेवायाचा बटवा असतो ती.

पोतडें, न॰ पोतडी द्वितीयार्थी.

पोतदार, पु॰ सर्कारांत आलेले रुपये इ॰ नाणें पारखून घ्यावयाचा अधिकारी तो.

पोतदारी, स्त्री॰ पोतदाराचा जो अधिकार ती.

पोतनिशी, स्त्री॰ पोतनिसाचा जो अधिकार ती.

पोतनीस, पु॰ सर्कारचे पोत्यावर जो अधिकारी ठेविला असतो तो.

पोतां, अ॰ सर्कारच्या पोत्याकडे.

पोतें, न॰ धान्यादि भरून आणावयाचे उपयोगीं पडम, इ॰ कांचा जो थैला करितात तें; २, सर्कारी द्रव्य ठेवण्याचें जें अधिकरण तें.

पोतेरें, न॰ गृहादिकांतील भूमी, भिंत, इ॰ शेणमातीनें सारवाया करितां जो वस्त्रादिकांचा बोळा घेतात तें; २, तेणेंकरून जें सारवण तें; वस्त्र, इ॰ दिकांचें पोतेरें करणें ह्मणजे मळवून, गुधडून, टाकणें; कोणेकास पोतेरें करून टाकणें ह्मणजे मानपान घावयाचे योग्यतेचा असतां ते मानपान इ॰ न देतां तुच्छ करून मानणें.

पोंथा, पु॰ रा॰ शेण, विष्ठा, यांचा जो पोहो तो; २, ज्याचे अंगीं कांहीं काम करण्याविषयीं त्वरा नाहीं आणि शरीर वातूळ त्यास ल॰.

पोथी, स्त्री॰ पुस्तक.

पोथीपाठ, ३ लिं॰ पोथीवरून लक्ष करवाचून ह्मणाया जोगा पाठ येतो जो ग्रंथ तो.

पोथीपुस्तक, न॰ पोथी, वही, इ॰ तें.

पोंद, न॰ वा॰ पायाच्या आंतला किं॰ बाहेरला जो तलप्रदेश तें.

पोंधा, अ॰ वा॰ वायां



पोंधा, ३ लिं॰ शरीरानें पुष्ट दिसून ज्याचे अंगीं शक्ति नाहीं तो.

पोपट, पु॰ कीर.

पोपटपंडित, पु॰ दुसऱ्यापाशीं पूर्वपक्षादि पाठ करून घेउन पांडित्य मिरवावया करितां सभादिकांचा ठायीं पुढेंपुढें होउन बोलतो त्यास ल॰.

पोपटी, स्त्री॰ कवडींत एक भेद आहे; २, कों॰ वाल इ॰ कांचा शेंगा भाजून खावयासाठीं सिद्ध करितात ती.

पोपडा, पु॰ सारवलेली जमीन, भाकरी, शरीर, इ॰ कांवरील त्वचेसारिखा किं॰ त्वचारूप अंश निघतो तो.

पोपया, पु॰ एक झाड आहे; २, त्याचें जें फल तो.

पोपली, स्त्री॰ वा॰ लहानशी भाकरी ती.

पोपी, स्त्री॰ केवल लाहानशी भाकर ती, परंतु मुलांचे भाषेंत प्र॰.

पोंपेरें, न॰ पेंपेरें.

पोफळ, स्त्री॰ सुपारीचें झाड ती; २, न॰ तिचें जें फल तें.

पोबास, पु॰ परवाश.

पोम, न॰ अंगीं विद्या, तप, इ॰ नसतां अतिरिक्त दिसाया जोगा जो डौल बाह्यत्कारीं करितात तें.

पोय, स्त्री॰ कों॰ पोगी; २, पोई.

पोयकर, ३ लिं॰ कों॰ प्रथमतः ज्यास पोय आली असा जो माड तो.

पोयें, न॰ रा॰ भूमीचे बिळांत किं॰ दगड, लांकूड, यांचे संधीस एक जातीच्या माशा आहेत त्या मोहळ करित असतात तें.

पोर, न॰ मुलगें म॰ तीनलिंगी, आ॰ निंदावृत्ति; २, पश्वादिकांचा अपत्यासही हीसंज्ञा आहे; ३, न॰ तारुण्यावस्थेस आलेलानाहीं असा अल्पवयस्क जो मनुष्य, पशु, वृक्ष, इ॰ प्राणी इ॰ तें.

पोरका, ३लिं॰ भव्य, गंभीर, प्रौढ, इ॰ दिसायाजोगें नव्हे असें भाषण, वस्त्र, अलंकार, इ॰ तो; २, ज्यास कोणी आईबाप, इ॰ नाहीं त्यास ल॰; ३, केवलमातृहीनासही ल॰

पोरकिडा, पु॰ एकक्षुद्र कीटक आहे.

पोरखेळ, पु॰ पोरांचा विटी दांडू इ॰ खेळण्याचा जो व्यापार तो; २, पोरासारिखें हांसणें, उड्यामारणें, इ॰ व्यापार तो; ३, घेणें, देणें, इ॰ व्यवहारांचा मर्यादासोडून मनस्वीजें वर्तन तो

पोरगा, पु॰ पोर; २, खिसमतगार जो पोर ठेवितात त्यास ल॰; ३, जापुरुषास नाचाया करितां स्त्रीचा वेष देतात त्यास ल॰.

पोरचेष्टा, स्त्री॰ पोरखेळ प्रथमार्थावांचून.

पोरटा, ३लिं॰ पोरका द्वितीयार्थीं.

पोरवडा, पु॰ गृह, ग्राम, इ॰ कांमध्यें किं॰ राज्यादिकारभारामध्यें कोणी प्रौढ मनुष्य नाहींसा झाल्यामुळें होतेंजें पोरांचें प्राधान्य तो.

पोरा, पु॰ रा॰ पोरकिडा; २, ३लिं॰ लावल्यावांचून आपल्या आपण उगवलेंजें झाड तो.

पोरांडी, स्त्री॰ पोरवडा.

पोरांडें, न॰ रा॰ पोरवडा.

पोरापोरका, ३लिं॰ पोरका द्वितीयार्थक जो त्यास ल॰.

पोर्णिमा, स्त्री॰ पूर्णिमेचा अपभ्रंश

पोर्या, पु॰ पोरगा द्वितीय तृतीयार्थीं; २, कों॰ पोरकिडा.

पोल, न॰ फोल,

पोलकट, ३लिं॰ कों॰ किंचित् पोलानें युक्त जो धान्यसमुदाय तो; २, वा॰ बीजरहित जो अंबा, फणस, इ॰ तो.

पोलट, ३लिं॰ वा॰ पोलकट प्रथमार्थीं.

पोलाद, न॰ तिखें.

पोलादी, ३लिं॰ पोलादाचें जें शस्त्रादि तो.

पोल्हारा, पु॰ स्त्रियांचे पायांचे बोटांत घालायाचें भूषण आहे.

पोव, पु॰ रा॰ पोहो.

पोवटी, स्त्री॰ रा॰ पोहटी.

पोवणी, स्त्री॰ कों॰ नद्यादिकांच्या ठायीं मनुष्यादिकानें गमन करण्याचा जो व्यापार ती.

पोंवणें, कों॰ पोहणें; २, तरंगणें मुख्यार्थीं.

पोंवतीपूर्णिमा, स्त्री॰ श्रावणी पूर्णिमा.

पोंवतें, न॰ श्रावणमासीं पौर्णिमादि तिथींच्या ठायीं जानव्यासारिखा सुताचा दोरा देवादिकांस अर्पितात व आपणही घालितात तें.

पोंवरी, स्त्री॰ पांथा.

पोवली, स्त्री॰ वा॰ सुपारीचीजी चिरी ती.

पोंवळपाटली, स्त्री॰ पोंवळीं सोन्यानें बांधून स्त्रियांचें एक हस्तभूषण करितात ती.

पोंवळा, ३लिं॰ पोंवळ्याचे रंगासारिखा जो रंग तो; २, तद्विशिष्ट गाय, बैल, इ॰ तो; ल॰ ढवळ्याजवळ बांधिला पोंवळा वाण नाहीं पण गूण लागला.

पोंवळ, पोंवळी, स्त्री॰ देवालयादिकांचा भोंवताली

जी भिंत असती ती.

पौंवळीं, पौंवळें, न॰ एकमणी आहे.

पौंवा, पु॰ पांवा; २, कों॰ सर्पाचें पिलूं.

पौंवाडा, पु॰ पंवाडा.

पौंवाणी, पौंवाळी, स्त्री॰ कों॰ पांयणी.

पोशा, पु॰ दत्या; २, ३लिं॰ शरीरानें पुष्ट असून तादृश ज्याचे अंगीं सामर्थ्य नाहीं तो.

पोशाक, पोशाख, पोषाग, पु॰ शोभार्थ जीं अंगावर घ्यावयाचीं वस्त्रें शेला, पागोटें, इ॰ तो; पोशाख करणें ह्मणजे तीं वस्त्रें धारण करणें.

पोशाखी, पोषागी, ३लिं॰ पोशाखाचे मात्र उपयोगीं तादृश टिकाउन व्हे असें जें पागोटें, इ॰ तो; २, ला॰ पाहण्यामध्यें स्फरेखडौलदार दिसून ज्यामध्यें तादृश सामर्थ्यादि नाहीं असें मनुष्य, भांडें, वस्त्र, इ॰ त्यास ह्म॰.

पोशिंदा, पु॰ गुणी लोक, शिपाई, घोडें, इ॰ कांचें प्रीतिपूर्वक इतमामाप्रमाणें पालन करणारा तो.

पौंशेर, पु॰ कमळांमध्यें एक जाति आहे.

पोषक, ३लिं॰ जो ज्याचा पोषणकर्ता तो त्याचा.

पोषण, न॰ भक्षणादि पदार्थ ज्याचे जीवनास पाहिजे तितका देउन कोणेकाचें जें रक्षण तें.

पोषणें, कोणेकाचें पोषण करणें.

पोषाक, पु॰ पोशाख.

पोष्णा, ३लिं॰ दत्तक; २, आपल्यास पोसायाचें सामर्थ्य नाहीं ह्मणून पोसायाकरितां दुसऱ्याचे स्वाधीन केलें जें गुरूं इ॰ तो.

पोष्य, ३लिं॰ ज्याचें ज्यानें अवश्य पोषण केलें पाहिजे तो पुत्र, स्त्री, इ॰ त्याचा; २, आपले यजमान इ॰ कांस पत्र लिहावयाचें असतां आपलें नाम एतद्विशेषणपूर्वक लिहितात.

पोष्यवर्ग, पु॰ पोष्य जे पुत्रादि त्यांचा जो समुदाय तो.

पोसगा, ३लिं॰ रा॰ दत्तक.

पोसणें, पोषणें; २, पुष्ट होणें.

पोस्त, न॰ शिमग्यांतील रेवेळे लोकांपासून द्रव्य मिळवून भोजनादि समारंभ करितात तें; २, तदर्थ जें लोकांपासून द्रव्य घेतात तें; ३, कों॰ काम करी, इ॰ कांस कामाबद्दल जें द्रव्य द्यावयाचें तें देउन श्रमपरिहारार्थ मद्यादि प्राशनार्थ अधिक जें द्रव्यादि देतात तें; ४, श्रमपरिहारार्थ प्राशितात जें मद्य तें; ५, शाईत काजळ घोटाया करितां जें फडकें घेतात तें किं॰ शाई न बोळतां, न सुकतां, टिकावी ह्मणून दौतींत जो चिरगूट इ॰ कांचा बोळा घालितात तें.

पोस्ती, ३लिं॰ पोशाद्वितीयार्थी; २, मद्यपी.

पोस्त्या, ३लिं॰ पोस्ती.

पौंहची, स्त्री॰ पुरुषांचे मनगटास बांधावयाचें सुवर्णाचें किं॰ जडावाचें भूषण असतें ती.

पोहटी, स्त्री॰ लहान जो पोहो ती.

पोहणी, ३लिं॰ नद्यादिकांचा ठायीं पोंहाया जोगें जें पाणी तो.

पोहणीस घालणें, गोमहिष्यादि पशूंस पोंहायासाठीं नद्यादिकांत घालणें.

पोहणें, हातापायांनीं पाणी तोडून नद्यादिकांचा ठायीं तरणें किं॰ तरून गमन करणें; तो शास्त्रामध्यें किं॰ कांहीं एक व्यवहारामध्यें पोहतो आहे

आहे इ० स्थलीं त्या त्या विषयामध्यें परिपूर्ण होत्सा ता त्यांतच निरंतर वर्ततो आहे असा अर्थ.

पोहा, पु० साळीवर उन पाणी घालून मृदु झाल्यानंतर भाजून कुटिले असतां जो चापट दाणा निघतो तो.

पोहो, पु० गाय, म्हैस, इ० कांचा एकवेळ हगलेल्या विष्टेचा गोळा तो.

पोहोंच, पोह्च, पु० कुळापासून सावकार. इ० कांस पावलें जें द्रव्यादिक तो; २, पोंच द्वितीयार्थी.

पोहोंचणें, पोंह्चणें, पोंचणें.

पोहोंचता, ३ लिं० पावता.

पोहोटी, स्त्री० पोहटी.

पोहोडी, स्त्री० कों० खाडीचा जो लहान फांटा असतो ती.

पोहोरा, पोह्रा, पु० विहिरींतून पाणी काढायाचें एक पात्र आहे.

पोळ, पु० पितरादिकांचा उद्देशानें जो बैल डागानें त्रिशूळादि चिन्ह युक्त करून सोडिला असतो तो; २, वृथापुष्ट मनुष्यास ल०.

पोळणें, अग्नि, सूर्य, किरण, तिखट, इ० कानें शरीर, जिव्हा, वेधनायुक्त होणें; २, ला० कांहींएक व्यवहारापासून कांहीं काल संस्कार राहाया जोग्या दुःखातें अनुभविणें, तत्सदृश कार्यांतर उपस्थित असतां म०; उ० तुझी रुपये मागतां पण मी पोळलों आहे; ३, कांहींएक शोकानें व्यथित होणें.

पोळपट, पोळपाट, पु० पोळी लाटायाचा जो लांकडाचा वाटोळा पाट तो.

पोळा, पु० श्रावणाची किं० भाद्रपदाची जी अमावास्या आदिवशीं बैलांचे शिंगांस काव इ० लावून पूजा करितात व त्यांस मिरवितात; २, गांधिणीमाशांचें किं० मधुमक्षिकांचें जें घर किं० भुंगळे साडावर अनेकपानें एकत्र करून जें घर करितात तो; ३, दाट भाजली असतां जो मध्यें मध्यें भाजल्यावांचून अंशराहतो तो; ४, गृहादि जळत असतां त्यांतून जो प्रज्वलित तृणादि समुदाय वायूनें उडतो तो.

पोळी, स्त्री० भाकरीच्या आकाराची कणीक, उकड, इ० लाटून भाजून करितात ती; २, अळित्यानें कापूस भिजवून जी भाकरीचा आकारासारिखी करितात ती; ३, मोहोळांत भाकरीचा आकाराचें जें मक्षिकेचें घर ती; पोळी पिकणें ह्मणजे कांहीं दिवस कष्टास मिळाया जोगा योग प्राप्त होणें; ल० जाचीखायाची पोळी त्याची वाजवावी टाळी; ४, रा० गलकंबल.

पोळीतुकडा, पु० पोळी इ० पक्वान्न तो.

पो, पु० पव..

पौगंड, न० सं० मनुष्याची पांच वर्षांपासून जी वयोवस्था तें.

पौंची, स्त्री० पोंह्ची.

पौत्र, पु० सं० पुत्राचा पुत्र.

पौत्री, स्त्री० सं० पुत्राची कन्या ती.

पौनःपुन्य, न० सं० कांहींएक गोष्टीचा पुनःपुनः करण्याचा जो प्रकार तें.

पौबारा, पु० पवबारा.

पौर, ३ लिं० सं० पुरसंबंधी जे जन इ० तो.

पौराणिक, पु० सं० पुराणीक.

पौरुष, ३ लिं० सं० पराक्रम; २, पुरुषसंबंधी जें कर्म इ० तो.

पौरोहित्य, न॰ सं॰ पुरोहितपणा.

पौर्णमासी, स्त्री॰ सं॰ पूर्णिमा.

पौर्णिमा, स्त्री॰ पूर्णिमेचा अपभ्रंश.

पौर्वापर्य, न॰ सं॰ पूर्वापर कांहीं एक क्रमाच्याठायीं अमुकपूर्व अमुकअपर असावा असाजो परस्परांचा संबंधतें.

पौष, पु॰ सं॰ दाहावा जो महिना तो.

पौषी, ३लिं॰ सं॰ पौषसंबंधी जीतिथि ती.

पौष्टिक, ३लिं॰ सं॰ धातूपुष्टकरणारें जेंरसायन इ॰ तो; संपत्ति, आयुष्य, इ॰ कांची वृद्धि व्हावी ह्मणून जें होमादिकर्म करितात तो.

प्याजी, ३लिं॰ एकरंग आहे; २, तद्विशिष्ट जें वस्त्र तो.

प्यादा, पु॰ पायानें चालणारा जो शिपाई तो; २, बुद्धबळांत मोहर्या बांचून जें बुद्धबळ तो.

प्यादाजबादा, पु॰ प्यादा इ॰ शिपाई.

प्यादी, स्त्री॰ बुद्धबळांतील प्यायानें केलीजी मात ती.

प्यादें, न॰ बुद्धबळांतील जो प्यादा तें.

प्यादेमात, स्त्री॰ प्यादी.

प्यार, हिं॰ स्त्री॰ प्रीति.

प्यारा, ३लिं॰ हिं॰ प्रिय.

प्याला, पु॰ پیاله पेला.

प्यास, स्त्री॰ पु॰ हिं॰ बहुतजी तहान ती तो.

प्याहा, पु॰ उदररोगांतील भेद आहे.

प्र, अ॰ हाउपसर्ग ज्याचे मागें लागतो त्यात्यापदार्थाचा प्रकर्ष बोधितो; उ॰ प्रकृष्टजो कंप तो प्रकंप प्रकृष्ट जो यत्न तो प्रयत्न इ॰ जाणावे.

प्रकट, ३लिं॰ सं॰ गुप्तदशा सोडून सर्वांस विदित व्हावया जोगा झाला तो.

प्रकटणें, उ॰ प्रकट करणें.

प्रकटित, ३लिं॰ सं॰ प्रगटित केला जो तो.

प्रकरण, न॰ सं॰ कांहींएक साध्यविषयाचे किं॰ प्रकाराचे भेदानें भिन्नभिन्न जे अनेक व्यवहार ते प्र॰ ज्याचे पोटीं एक विषयत्वें करून परस्पर संगत असे व्यापार अनेक असतात तें; उ॰ राज्य कारभाराचें प्रकरण निराळें, आणि सावकारी उदीम व्यापार वगैरे प्रकरणें निराळीं; २, कथनीयविषयांचा भेदानीं भिन्नभिन्न जे ग्रंथ विभाग केले असतात ते प्र॰ तें; ३, ज्या व्यवहारास कर्त्ताकरण इ॰ अनेक साहित्यें लागतात त्यासाहित्यास हितजो तो व्यवहार तें; उ॰ पंचाइतीचें प्रकरण येथें आलें, ४, विद्या, कुल, जाति, गुण, मत, इ॰ कें करून एकरूपत्वें करून विवक्षित जे मनुष्यादि त्यांचा जो समुदाय तें; ५, सामान्य कोटींमध्यें परिगणनीय नव्हे असाजो मनुष्यादि त्यास ह्म॰ प्रकरणपतित, प्रकरण संगति, इ॰ स॰ जाणावे.

प्रकर्ष, पु॰ सं॰ उत्कर्ष.

प्रकार, पुं॰ सं॰ सर्वपदार्थांचें भिन्नभिन्नत्वें करून ज्ञान होण्यास त्यात्यापदार्थाचे ठाईं भेदकजो धर्मविशेष असतो जो तत्तत्पदार्थ विशेष्यकज्ञानाचाठायीं विशेषणत्वें करून भासतो तो; २, प्रकारभेदानें भिन्नभिन्न जे पदार्थ ते प्र॰; उ॰ दोनचार प्रकारचीं वस्त्रें घेउं नये, घरांत चार प्रकार असले ह्म॰ उपयोगी पडतात.

**प्रकाश**, पु॰ सं॰ उजेड.

**प्रकाशक**, ३ लिं॰ प्रकाश करणारा सूर्य, दीप, इ॰ तो; २, काहींएक पदार्थानें अंगुलिनिर्देश, उपदेश, इ॰ द्वारा दाखिवणारा किं॰ समजाविणारा तो.

**प्रकाशणें, प्रकाशिणें**, उ॰ सूर्यादिकानीं प्रकाश द्वारा कांहींपदार्थ दिसे असा करणें किं॰ सूर्यादि तेजोरूप पदार्थानीं स्फुरद्रूप होणें; २, गुप्तजो विषय तो प्रसिद्धीस आणणें; उ॰ हें योगशास्त्र कपिलाचार्ययानीं प्रकाशिलें.

**प्रकाशित**, ३ लिं॰ सं॰ प्रकाशला किं॰ प्रकाशिला तो.

**प्रकाश्य**, ३ लिं॰ सं॰ प्रकाशकानें प्रकाशावयास जो योग्य तो.

**प्रकृत**, ३ लिं॰ सं॰ याकालीं वक्ता, कर्ता, इ॰ कांस विवक्षितजो विषय, इ॰ तो; २, स्त्री॰ प्रकृति शब्दाचा अपभ्रंश.

**प्रकृति**, स्त्री॰ सं॰ आदिमाया; २, आसमवायिकारणापासून जें कार्य उत्पन्न होतें त्या कार्याचीती; ३, पदार्थमात्राचा जो मूलस्वभाव ती; ४, आनामापुढें किं॰ धातुपुढें प्रत्यय होतो त्या शब्दामध्यें जोनामांश किं॰ धात्वंशती; ५, कांहींएक व्यवहाराचा सामान्यतः चाललेलाजो प्रकार ती; ६, एक छंद आहे.

**प्रकृतिविकृतिभाव**, पु॰ प्रकृति आणि विकृति यांचाजो परस्परसंबंध तो

**प्रकृतिस्वभाव**, पु॰ शरीरादिकांचा प्रकृतिरूप जो स्वभाव तो.

**प्रकृष्ट**, ३ लिं॰ सं॰ उत्कृष्ट.



**प्रकोप**, पु॰ सं॰ वात, पित्त, धातु, इ॰ कांचाजो क्षोभ तो.

**प्रक्रिया**, स्त्री॰ सं॰ कांहींएक कार्याची याया प्रकारें करावें अशीजी कृति असती ती; २, प्रकृतीपुढें प्रत्यय हिलादि विकार इ॰ रूप व्याकरणांत उक्त जी शब्दसिद्ध करण्याची कृति ती; ३, संधि, लोप, इ॰ संस्कार व्हावयाचा पूर्वींची जी शब्दाची दशा ती.

**प्रखर**, ३ लिं॰ सं॰ अतितीक्ष्ण शस्त्र, अग्नि, इ॰ तो.

**प्रख्या**, स्त्री॰ प्रसिद्धि.

**प्रख्यात**, ३ लिं॰ सं॰ प्रसिद्ध.

**प्रगट**, ३ लिं॰ प्रकटाचा अपभ्रंश.

**प्रगटणें**, प्रकटणें.

**प्रगणा**, पु॰ परगणा.

**प्रगल्भ**, ३ लिं॰ सं॰ प्रौढजो मनुष्य किं॰ भाषण तो.

**प्रगाथ**, पु॰ पा॰ प्रघात.

**प्रघट्टक**, न॰ कोणेक अर्थातें अधिकृत करून त्याचा विचार करूं लागलें असतां अनेक शंकासमाधानें, हेतु, प्रमाणोपन्यास, इ॰ कें करून त्या अधिकृत विषयाचा उपसंहार होई पर्यंत विस्तरले असतात जे ग्रंथाचे किं॰ भाषणाचे विभाग ते प्र॰.

**प्रघात**, पु॰ परिपाठ.

**प्रचंड**, ३ लिं॰ सं॰ क्रोध, पराक्रम, विद्या, बल, इ॰ गुणानें जो भारी तो.

**प्रचार**, पु॰ सं॰ प्रघात.

**प्रचीत**, स्त्री॰ प्रतीति.

प्रचुर, ३लिं॰ सं॰ पुष्कळ.

प्रच्छन्न, ३लिं॰ सं॰ गुप्त.

प्रच्छादणें, आच्छादणें.

प्रच्छादन, न॰ सं॰ आच्छादन.

प्रजा, स्त्री॰ सं॰ जाराजास करभारदेवुन त्याचेराज्यां त राहतात ती त्याची; २, संतति; ल॰ यथाराजा तथाप्रजा.

प्रजापति, पु॰ सं॰ ब्रह्मदेव; २, शिश्नास ल॰.

प्रजोत्पत्ति, स्त्री॰ सं॰ पुत्रादिरूप संततीची उत्पत्ति ती.

प्रजोत्पादन, न॰ सं॰ मैथुनद्वारा पुत्रादिसंततीचें जें जनन तें.

प्रज्वलन, न॰ सं॰ अग्निपेटविण्याचा व्यापार तें; २, तेणेंकरून होतोजो पेटलेपणा तें.

प्रज्वलित, ३लिं॰ ज्वालायुक्त झालेला जो अग्नि तो किं॰ काष्ठादि तो.

प्रणत, ३लिं॰ सं॰ नम्र; २, कोणेकानें आपल्याव र कृपाकरावी ह्मणून नमस्कारादिकें करून दि सेअसा विनय धरिला आहे जाणें तो.

प्रणति, स्त्री॰ सं॰ नम्रून जो नमस्कार ती.

प्रणय, पु॰ सं॰ प्रीति.

प्रणयकोप, पु॰ सं॰ आपल्या प्रीतीच्या मनुष्या वर त्यानें आपली समजून करावी अशाबुद्धी नें जो कोप तो.

प्रणाम, पु॰ सं॰ नमस्कार.

प्रणालिका, स्त्री॰ परिनालिका.

प्रणिपात, पु॰ नमस्कार.

प्रणीत, ३लिं॰ सं॰ ज्यानें रचिलाजो शास्त्रादिग्रंथ तो तत्प्रणीत.

प्रत, स्त्री॰ कांहींएक ग्रंथाचें पुस्तकरूपजें स्वरूप ती; उ॰ भागवताचीप्रत आह्मास पाहिजे; २, आलेखावरून लेखांतर करितात किं॰ वाचून कांहीं कर्मादि करितात तो पुस्तकादि लेख किं॰ त्याजवरून लिहिलेंजें पुस्तकादि ती; ३, चित्रा दिपाहून त्यासारखें च दुसरें चित्रादि करितात त्यास ह्म॰; ४, मासला; ५, उत्कृष्ट, मध्यम, निकृष्ट, इ॰ अनेकपक्षाश्रयणेंकरून कांहींपदा र्थाचे कांहींविधि विषयीं केलेजे अनेक विभाग ते प्र॰; उ॰ आंब्याच्या चारप्रती केल्या आहेत जसेपाहिजे तसे आहेत; ६, शिष्टांस दक्षिणा द्यावयाचीजी उत्तमप्रत ती; ७, अ॰ कांहींए क जातीचा पोटचा जा अनेकव्यक्ति त्यांच्याठायीं कांहींएक विधीची समानरूपें व्याप्ति होई अ सें; उ॰ घरास प्रत पांचपांच रुपये दिले; ८, ग मन व्यापारानें प्राप्यजें स्थलादिक त्यापुढें किं॰ वचनानें कांहींएक अर्थजाणवायाच्या तद्वाच कापुढें तत्त्कारकता बोधक याच्या प्रयोग होतो; उ॰ तेग्रामाप्रत गेलेआहेत; शुक परीक्षितीप्रत सांगताहेत.

प्रतवार, ३लिं॰ समुदायाचे पोटचे अनेकप्रतीचे जे अवयव ते त्या त्याप्रतीप्रमाणें लावून ठेवणें इ॰ कांचें वि॰.

प्रताप, पु॰ सं॰ पराक्रम; २, शत्रु, रोग, इ॰ कांचे निर्दलना विषयीं चालायाजोगा जो मनुष्य, औ षध, इ॰ कांच्याठायीं सामर्थ्यविशेष असतो तो.

**प्रतापलंकेश्वर**, पु॰ सं॰ एकमात्राआहे.

**प्रतापी**, ३लिं॰ सं॰ मोठ्याप्रतापाचा जोपुरुष, औषध, इ॰ तो.

**प्रतारक**, ३लिं॰ सं॰ प्रतारणा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**प्रतारणा**, स्त्री॰ सं॰ वास्तविकांश कपटानें आच्छादून कोणेकास ठकिवण्याचा जो व्यापार ती.

**प्रतारणें**, ठकविणें.

**प्रतारित**, ३लिं॰ सं॰ प्रतारिलागेला जो तो.

**प्रति**, स्त्री॰ सं॰ अ॰ प्रत, परंतु समानविभ्यर्थ जेव्हां याचा प्रयोग करायाचा तेव्हां तत्तज्जातिवाचकाचा मागें होतो आणि प्रतशब्दाचा पुढें इतका विशेष; उ॰ प्रतिगृहास पांच पांच रुपये दिले; २, हाउपसर्ग ज्या शब्दाचे मागें लागतो तेथें तद्रूपच परंतु दुसरा असा विशिष्टाचा अर्थ होतो; उ॰ तो आह्मण प्रतिसूर्य आहे; ३, पूर्वीं जें कांहीं झालें तद्विलोम प्रकारें अशाअर्थाचा द्योतक तत्तच्छब्दाचे मागें याचा प्र॰ होतो; उ॰ दानआणि प्रतिदान ह्म॰ ज्यानें दानदिलें त्यास जेंउलट दान.

**प्रतिकूल**, **प्रतिकूळ**, ३लिं॰ सं॰ अनुकूलाचा प्रतिपक्षी; २, न॰ विवाहादिमंगलकार्याचा निश्चय झाल्यानंतर कोणीसपिंड मरण पावला असतां तेणेंकरून सूचित जी त्याकार्यास अशुभता तें.

**प्रतिक्रिया**, स्त्री॰ आपणास उद्देशून कोणेकानें बरी किं॰ वाईट क्रियाकेली ह्मणून आपण त्यातें उद्देशून तत्सदृशजीक्रिया करितो किं॰ ज्या क्रियेपासून जें कांहीं एक फल झालें तन्निरसनार्थ जें क्रियांतर ती.

**प्रतिगृहीत**, ३लिं॰ सं॰ प्रतिग्रह केला ज्याचा तोपदार्थ.

**प्रतिग्रह**, पु॰ सं॰ दुसऱ्यानें दिलेल्या दानाचा जो अंगीकार तो.

**प्रतिग्राहक**, ३लिं॰ सं॰ प्रतिग्राही.

**प्रतिग्राही**, ३लिं॰ सं॰ प्रतिग्रह करणारा तो.

**प्रतिग्राह्य**, ३लिं॰ सं॰ प्रतिग्रह करण्यास जें दान तो.

**प्रतिघात**, पु॰ सं॰ कांहींपदार्थावर कांहींपदार्थ वेगानें आपटला असतां विपरीत वेगउत्पन्न व्हावया जोगा जो त्याजवर तडाखा बसतो तो.

**प्रतिच्छाया**, स्त्री॰ पडसावली; २, प्रतिबिंब.

**प्रतिदान**, न॰ सं॰ कोणेकापासून कांहींपदार्थ घेउन त्याबद्दल त्यास पदार्थांतर देण्याचा जो व्यापार तें.

**प्रतिध्वनि**, पु॰ सं॰ भेरी इ॰ कांचा ध्वनीपासून गुहा इ॰ कांचा ठायीं जो दुसरा ध्वनि उठतो तो.

**प्रतिनाद**, पु॰ सं॰ प्रतिध्वनि.

**प्रतिनादित**, ३लिं॰ प्रतिनादानें जो युक्त तो.

**प्रतिनिधि**, पु॰ जो पदार्थ ज्या कार्यास पाहिजे त्याचा अभावीं शास्त्रादिकांचाठायीं तत्स्वरूपच मानिलें जें पदार्थांतर तो; २, राजानें जें कार्य करावयाचें तें त्याचा अभावीं करावयाचे योग्यतेचा जो राजानें अधिकारी करून ठेविला असतो.

प्रतिपत्, प्रतिपदा, स्त्री॰ पक्षाचे आरंभाची पहिली तिथि.

प्रतिपदोक्त, ३ लिं॰ सं॰ शास्त्रादिकांच्या ठायीं तदर्थ शब्दखर्चून ज्याचें विधान केलें आहे तो विध्यादिअर्थ तो.

प्रतिपक्ष, पु॰ सं॰ वादप्रतिवादामध्यें जे दोनपक्ष ते परस्परें; २, प्रतिपक्षी.

प्रतिपक्षी, पु॰ सं॰ विरुद्धउभयपक्षाश्रित जे ते परस्पर.

प्रतिपादक, ३ लिं॰ सं॰ कांहींएक विषयाचें प्रतिपादन करणारा तो.

प्रतिपादणें, कांहींएकअर्थ साक्षि, लेखादि प्रमाणानें खराकरून देणें; २, कांहींएकपदार्थ कोणेकास स्वत्व निवृत्तिपूर्वक देणें.

प्रतिपादन, न॰ कोणेकपक्षाचें दोषनिरासकरून जें स्थापन तें; २, दानकरण्याचा व्यापार.

प्रतिपाल, प्रतिपाळ, पु॰ सं॰ अन्नवस्त्रादिद्वारा जें संरक्षण तो.

प्रतिपालन, न॰ सं॰ प्रतिपाल.

प्रतिपालित, ३ लिं॰ सं॰ प्रतिपालकेला आहे ज्याचा तो.

प्रतिपाळणें, प्रतिपालित करणें.

प्रतिप्रसव, पु॰ सं॰ कांहींकार्याचा सामान्यतः केलेलाजो निषेध त्याचा पुनः कांहीं विशेषांशीं केलाजो विधि तो.

प्रतिबंदी, स्त्री॰ प्रतिबंधाचा अपभ्रंश.

प्रतिबंध, पु॰ कांहींएक कार्य होण्याविषयीं किं॰ कोणेकास गमनादिव्यापारीं स्वच्छंदें वागण्याविषयीं शास्त्राज्ञा, राजाज्ञा, इ॰ करून असतो जो अवरोध तो.

प्रतिबंधक, ३ लिं॰ सं॰ प्रतिबंधकरणारा तो; २, न॰ प्रतिबंध जेणेंकरून होतो तें.

प्रतिबद्ध, ३ लिं॰ सं॰ प्रतिबंधआला आहे ज्यास तो.

प्रतिबिंब, न॰ सं॰ जलादिकांच्याठायीं कांहींएक पदार्थाचें जें स्वरूपांतर दिसतें तें.

प्रतिबिंबणें, कांहींएकपदार्थ काचादिकांच्याठायीं प्रतिबिंबरूपें करून दृश्य होणें.

प्रतिबिंबित, ३ लिं॰ सं॰ प्रतिबिंबलाजो तो.

प्रतिभू, पु॰ जामीन मुख्यार्थीं.

प्रतिमा, स्त्री॰ सं॰ धातुपाषाण, इ॰ कांची केलीजी मूर्ति ती; हाआणि तो एक्याप्रतिमेचे इ॰ स्थलीं एकेमूर्तीचे असा अर्थ; त्याची प्रतिमा त्यास येणार नाहीं येथें उपमायेणार नाहीं असा अर्थ.

प्रतिरोध, पु॰ सं॰ चाललेला व्यवहार पदार्थ याचा गतीस प्रतिबंध झाल्यामुळें होतो जो रोध तो.

प्रतिरोधक, ३ लिं॰ सं॰ प्रतिरोधकरणारा तो.

प्रतिलोम, ३ लिं॰ सं॰ अनुलोमाचा प्रतिपक्षी तो.

प्रतिवचन, न॰ सं॰ कोणी प्रश्नादिरूप केलेल्या भाषणावर उत्तरादिरूप जें भाषण तें.

प्रतिवादी, पु॰ सं॰ एकावादानें स्वमताचा उपन्यास केल्यावर त्याजवर उत्तरादि भाषण करितो जो वादी तो.

**प्रतिवार्षिक**, ३ लिं॰ प्रतिवर्षी करायाचें किं॰ व्हावयाचें जें कर्म तें.

**प्रतिशब्द**, पु॰ सं॰ प्रतिध्वनि.

**प्रतिषिद्ध**, ३ लिं॰ सं॰ शास्त्रादि वचनानें जो निषिद्ध तो.

**प्रतिषेध**, पु॰ सं॰ निषेध.

**प्रतिषेधणें**, निषेधणें.

**प्रतिष्ठा**, स्त्री॰ सं॰ लोकानीं श्रेष्ठत्वें करून मानायास कारणीभूत जें विद्यादि सद्गुणामुळें कोणेकाच्या ठायीं महत्त्व असतें तें; २, कोणेक अधिकारावर मनुष्याचें किं॰ देवालयादिकांत नवीन देवमूर्तीचें जें स्थापन तें; ३, कोणेकस्थलीं कोणेकाची जी स्थिति ती.

**प्रतिष्ठापन**, न॰ सं॰ प्रतिष्ठा द्वितीयार्थी.

**प्रतिष्ठावस्त्र**, न॰ सं॰ सभा, राजदर्बार, इ॰ स्थलीं प्रतिष्ठेनें घेउन जावयाचे उपयोगीं जें शालजोडी, शेला, इ॰ उंचवस्त्र त्यास म्ह॰.

**प्रतिष्ठित**, ३ लिं॰ सं॰ प्रथमार्थक प्रतिष्ठेनें युक्त जो तो; २, अधिकार, देवालय, इ॰ कांच्या ठायीं स्थापित झाला जो मनुष्य, देव, इ॰ तो.

**प्रतिस्पर्धा**, स्त्री॰ सं॰ कोणेकाबरोबर जी स्पर्धा ती.

**प्रतिस्पर्धी**, ३ लिं॰ सं॰ प्रतिस्पर्धा करणारा तो.

**प्रतिहत**, ३ लिं॰ सं॰ कांहींएक प्रतिबंधकामुळें अग्रिमकार्याविषयीं ज्याची गति कुंठित झाली तो.

**प्रतिज्ञा**, स्त्री॰ सं॰ अमुकगोष्ट अमुकरीतीनेंच घडेल किं॰ मी अमुकच करीन किं॰ मीं अमुक करीनच इ॰ रूप कोणेकानें केला जो निश्चय तो.



**प्रतिज्ञात**, ३ लिं॰ सं॰ ज्याविषयीं प्रतिज्ञा केली तो विषय तो.

**प्रतीक**, न॰ सं॰ व्याख्या करावयाकरितां मूलग्रंथाचें जें पदादिक तें; २, वाद्याचे भाषणांतील खरा करून घ्यावा किं॰ खंडून घ्यावा इ॰ घर्थ घेतला जो दुसर्यावाद्यानें कांहीं अंश तें; ३, वाद्यानें दुसर्यावाद्यावर अवश्य निर्वाह करावा जो गें जें दोषादि आणिलें तें.

**प्रतीकार**, पु॰ सं॰ प्रतिक्रिया.

**प्रतीच्य**, ३ लिं॰ जो ज्याशीं गुणादिकें करून तुल्य तो त्याचा.

**प्रतीची**, स्त्री॰ सं॰ पश्चिमदिशा.

**प्रतीत**, ३ लिं॰ प्रतीति आली आहे ज्याची तो; २, स्त्री॰ प्रतीति.

**प्रतीति**, स्त्री॰ सं॰ शब्दादिद्वारा जें विहित गुणादिक त्याचा सेवनादिकें करून तदनुरूप आला जो अनुभव ती; उ॰ या औषधाची मला प्रतीति आली आहे; या देवाची मोटी प्रतीति आहे इ॰ स्थलीं प्रतीति या वयाजोगें देवत्वादि आहे असा अर्थ; २, शब्दादिक जें ज्ञापक त्यापासून अंतःकरणाच्या ठायीं कांहींएकआकारात्मक होतें जें ज्ञान ती; उ॰ या श्लोकापासून तुह्मीं बोलता या अर्थाची प्रतीति होत नाहीं; भेर्यादि शब्दांच्या ठायीं वर्णाची प्रतीति नाहीं.

**प्रतीप**, न॰ काव्यांत एक अलंकार आहे.

**प्रतीयमान**, ३ लिं॰ सं॰ प्रतीतिविषय होतो जो तो.

**प्रतीहार**, पु॰ सं॰ राजादिद्वाराच्या ठायीं जो द्वारपाल

असतो तो.

प्रतीहारी, पु॰ प्रतीहार;२,स्त्री॰अंतःपुराचे द्वारावर अधिकृत जी स्त्री असती ती.

प्रतोद, पुं॰सं॰ अश्वादिकांस माराया चा जो चाबूक;२, छायेवरून कालसाधन करण्याचे उपयोगीं सोटया सारिखें यंत्र आहे.

प्रत्यय, पु॰सं॰ प्रतीति प्रथमार्थी; २, नाम,धातूंचा संबंधानें अर्थ विशेषवाचक जे शब्दविशेष व्याकरणांत सांगीतले आहेत ज्यांचा त्यानंत्र्येंकरून जो कामध्यें प्रयोग होतनाहींत ते प्र॰.

प्रत्यवाय, पु॰सं॰ जें अवश्य करावें तें नकेल्या मुळें किं॰ नकरावें तें केल्या मुळें जो दोष लागतो तो; २, पदार्थ,किं॰क्रियायांचा ठायीं सेवनी, करणी, पाप लागाया जोगा जो दोष असतो तो.

प्रत्यवायी, ३लिं॰ सं॰ प्रत्यवाय लागला आहे असतो मनुष्य तो.

प्रत्यहीं, अ॰ प्रतिदिवशीं.

प्रत्यक्ष, अ॰ सं॰ परोक्षाचा प्रतिपक्षी; २, साक्षात्;३, न॰ चक्षुरादि इंद्रियानें रूपादिविषयाची जी गोचरता तें; उ॰ शब्दाचें प्रत्यक्ष श्रोत्रेंद्रियांवांचून होतनाहीं; ल॰ प्रत्यक्षास प्रमाण कशास पाहिजे.

प्रत्यक्षता, स्त्री॰ समक्षता.

प्रत्यक्षदर्शी, ३लिं॰सं॰ कांहींएक गोष्टीचा अनुभव ज्याणें घेतला तो.

प्रत्यक्षसिद्ध, ३लिं॰ प्रत्यक्षानें अनुभव झाला आहे ज्याचा तो.

प्रत्याख्यात, ३लिं॰ प्रत्याख्यान जालें आहे ज्याचें तो.

प्रत्याख्यान, न॰ सं॰ निराकरण.

प्रत्याम्नाय, पु॰सं॰ मुख्यत्वेंकरून जें प्रायश्चित्तादिकर्म सांगीतलें आहे तें तसें नघडे तर द्रव्यदान किं॰ इतर कांहीं अनुष्ठान सांगितलें आहे तो त्याचा प्रायश्चित्तादि कर्माचा.

प्रत्यासत्ति, स्त्री॰ सं॰ कोणे काचा कोणेकाशीं जो सामीप्य संबंध तो; उ॰ हा लुच्चा आहे याची प्रत्यासत्ति इतकी कामाची नाही.

प्रत्यासत्तिन्याय, पु॰ कांहींएक वाक्याचा ठायीं अनुक्त अर्थ जो साकांक्ष पदांचा शक्तीमुळें अन्वित व्हावयाचा तो त्या प्रकरणांत वाक्यांतराचा ठायीं जो उपस्थित तोच अन्वित व्हावा इतरनव्हावा अशा अर्थाविषयीं उपस्थिताचाच अन्वय होतो अशा जो कवाक्याचा दृष्टांत.

प्रत्याहार, पु॰ सं॰ योगबलें करून सर्व इंद्रियांचें विषयांपासून जें परावर्तन.

प्रत्युत, अ॰सं॰ उलट आणखी; उ॰ तुह्मी हें असें करतां याणें पुण्य लागणार नाहीं प्रत्युत पाप लागेल.

प्रत्युत्तर, न॰ प्रतिवचन.

प्रत्युत्थान, न॰ वाद किं॰ युद्ध यामध्ये एकानें केलीजी उत्थिति तिजवर प्रतिपक्षी जी उत्थिति करितो तें.

प्रत्युद्गमन, न॰ सं॰ कोणीशिष्ट आपल्याकडे येतो असें समजलें असतां आदरार्थ जें अभिमुख गमन करितात तें

प्रत्युपकार, पु॰ सं॰ दुसर्यानें आपल्यावर केला उपकार फिटावा ह्मणून त्याजवर जो करितात

उप

उपकार तो.

**प्रत्युपस्थान**, न॰ आपले पराजयार्थ उत्थित किं॰ आपला पराजय आणें केला आहे असा जो कोणी त्यारि भयार्थ आपली जी उत्थिति तें.

**प्रत्यूष**, न॰ सं॰ प्रातःकाल.

**प्रत्येक**, अ॰ समुदायांतर्गत सर्वव्यक्तींच्या विधीवर पृथक् पृथक् अन्वय होई असें; २, ३लिं॰ विवक्षित विधीच्या ठायीं पृथक् पृथक् अन्वय होण्याविषयीं विवक्षित जा समुदायांतर्गत व्यक्ति ते.

**प्रथम**, ३लिं॰ सं॰ पहिला; २, अ॰ पहिल्यानें.

**प्रथमचरण**, पु॰ सं॰ कांहीं एक कार्याची जी केवल आरंभावस्था तीस ल॰.

**प्रथमतः**, अ॰ सं॰ पहिल्यानें.

**प्रथमदर्शनीं**, अ॰ कांहीं कार्याचा आरंभसमयीं.

**प्रथमदिवस**, पु॰ प्रथमचरण; उ॰ इतके दिवस वाद सांगतो परंतु आसून प्रथमदिवस आहे.

**प्रथमपुरुष**, पु॰ सं॰ संस्कृत व्याकरणामध्यें मी, तूं, एतद्‌तिरिक्त कर्त्ता किं॰ कर्मरूप जो अर्थ तद्वाचक धातूवरून होतो जो प्रत्यय जेणें करून क्रियापद होतें तो; २, प्राकृतांत कर्तृरूप किं॰ कर्मरूप क्रियापदाच्या प्रत्ययाशीं समानाधिकरण जो मी त्या शब्दाच्या अर्थ तो प्रत्यय.

**प्रथमा**, स्त्री॰ सं॰ पहिली विभक्ति, जी क्रियापदाचे अर्थाशीं समानाधिकरण जें कारक त्याची आणि संबोधनाची बोधक होती ती.

**प्रथमारंभ**, सं॰ पु॰ मुळारंभ.

**प्रथा**, स्त्री॰ प्रघात; २, प्रसिद्धि.

**प्रथित**, ३लिं॰ सं॰ प्रसिद्ध.

**प्रदर**, पु॰ सं॰ स्त्रियांस निरंतर रजस्राव होतो असा एक रोग आहे.

**प्रदर्शिवणें**, दर्शिवणें.

**प्रदक्षिण**, अ॰ सं॰ पूर्व, आग्नेयी, दक्षिण, या क्रमानें दिशा धरून गमनादि क्रियांचें वि॰, उ॰ उजवा हात पुढें करून भिंगरी फिरविली असतां प्रदक्षिण फिरती.

**प्रदक्षिणा**, स्त्री॰ सं॰ देव, ब्राह्मण, इ॰ कांस उजव्या हाता कडे करून त्यांचे भोंवतालें एक वेळ फिरण्याचा जो व्यापार ती; उ॰ लक्षप्रदक्षिणा आणि पैसादक्षिणा.

**प्रदाता**, ३लिं॰ सं॰ दाता परंतु याचा प्रयोग प्रा॰ समासीं होतो; उ॰ विद्याप्रदाता, धनप्रदाता, इ॰ जाणावे.

**प्रदान**, न॰ सं॰ दान याचा समासींच प्रा॰ प्र॰; उ॰ विद्याप्रदान, गालिप्रदान, इ॰

**प्रदीप्त**, ३लिं॰ सं॰ प्रज्वलित.

**प्रदेश**, पु॰ सं॰ कांहीं पदार्थाच्या किं॰ दिशेच्या संबंधानें परिछिन्न जो देश तो.

**प्रदेशिनी**, स्त्री॰ सं॰ तर्जनी.

**प्रदोष**, पु॰ सं॰ रात्रीचा जो केवल प्रारंभ समय तो; २, त्रयोदशीस नक्त व्रत करून प्रदोषसमयीं शिवपूजा करण्याचें व्रत आहे तो; ३, चतुर्थी, सप्तमी, आणि त्रयोदशी, या पूर्व रात्रींत

पडल्या असतां अनध्याय सांगितला आहे तो.

प्रधान, पु॰सं॰ राजकारभार करणारे जे अमात्य, सचिव, मंत्री, इ॰ जे राजांचे हस्तक ते प्र॰; २, न॰ प्रपंचोत्पत्तिविषयीं मुख्यत्वेंकरून कारणभूत जें मायास्वरूप तें; ३, ३लिं॰ मुख्य.

प्रपंच, पु॰सं॰ ईश्वरमायेपासून जीवानी मरावें, उत्पन्न व्हावें, अनेक सुखदुःखादि भोगावीं, इ॰ रूप जो व्यवहार उत्पन्न झाला तो; २, मनुष्यादिकांचा बायका, मुलें, घर, शेत, इ॰ फजो खटला तो; ३, कांहीं देणें, वाढणें, सांगणें, इ॰ क्रियांचा ठायीं एकास एक्याप्रकारचें, एकास एका प्रकारचें, एकास चांगलें, एकास वाईट, कांहींएकांस वगळून, कांहीं एकांस च द्यावें, इ॰ भेदकरण्याचा जो प्रकार तो; ४, कोणेकाशीं कोणेकानें केलीजी प्रतारणा तो; ५, ग्रंथ, पुरुष, इ॰ कांचा व्याख्या, संतति, इ॰ रूपेंकरून झाला जो विस्तार तो.

प्रपद, न॰सं॰ चवडा.

प्रपा, स्त्री॰सं॰ निर्जलमार्गादिकांचा ठायीं कोणी सत्पुरुष येणारा जाणारास पाणी प्यावयासाठीं एकस्थल बांधितात जामध्यें चांगलें गार पाणी भरून ठेविलें असतें ती.

प्रपादणें, प्रतिपादणें प्रथमार्थी, एथे प्रायः आग्रहपूर्वकता दिसती.

प्रपिता, पु॰ पणिता; २, पितामहास प्रसंगविशेषी ल॰; उ॰ एवढ्या मोठ्या मोठ्या गोष्टी कशास सांगतोस मी तुझ्या पित्यास भिणार नाहीं, प्रपित्यास भिणार नाहीं.

प्रपितामह, पु॰सं॰ पितामहाचा बाप तो.

प्रपितामही, सं॰स्त्री॰ पितामहाची आई.

प्रपौत्र, पु॰सं॰ पौत्राचा जो पुत्र तो.

प्रपौत्री, स्त्री॰सं॰ पौत्राचीजी कन्या ती.

प्रफुल्ल, ३लिं॰सं॰ चांगलें विकसित झालें जें पुष्प, मुख, इ॰ तो; २, तद्विशिष्ट वृक्ष.

प्रफुल्लित, ३लिं॰सं॰ प्रफुल्ल.

प्रबंध, पु॰सं॰ गाण्यांतील एक चीज आहे; २, श्लोकादिकांची जी रचना तो.

प्रबल, प्रबळ, ३लिं॰सं॰ अतिशयित बलवान्.

प्रबुद्ध, ३लिं॰सं॰ लेंकुरपणा जाउन प्रौढदशा पावला तो; २, निद्रा जाउन जागृतिदशा किं॰ प्रपंचादिरूप अज्ञान जाउन आत्मज्ञान पावला तो; ३, अतिशयित जो बुद्धिमान् तो.

प्रबोध, पु॰सं॰ निद्रा, माया, इ॰ संबंधी मोहाचें पटल अंतःकरणावर पडल्यामुळें प्रापंचिक किं॰ पारमार्थिक विषय यथार्थपणें नसमजाया जोगा आला असतो जो नेणतेपणा तो जाउन जागृत्यादिरूप येतो जो अंगीं जाणतेपणा तो; उ॰ धृतराष्ट्रास बहूत उपदेश उद्धवानें केला परंतु प्रबोध झाला नाहीं.

प्रबोधित, ३लिं॰सं॰ कोणेकानें प्रबोध केला आहे ज्यास तो.

प्रबोधिनी, स्त्री॰सं॰ कार्तिक शुद्ध ११

प्रबोधोत्सव, पु॰सं॰ कार्तिक शुद्ध द्वादशीस श्रीविष्णूस जागृत करण्याविषयीं कांहीं कर्म सांगीतलें आहे तो.

उ॰ गोठांच्या जोड केला होता त्याचे तीन फर्द आहेत आणि एक फर्द पोरीनें हारविला; २, जुष्का द्वितीयार्थी.

**फर्दा**, पु॰ नक्का.

**फर्मा**, पु॰ कोणेक अर्थाचे स्वरूपाची बोधक जी त्याची प्रत तो.

**फर्मान. फर्माना**, पु॰ हिं॰ ठिकाण, वतन. इ॰ संबंधी जी पातशाही सनद तो.

**फर्मावणें**, राजा. धनी, इ॰ कानी सेवकादिकांस कोणेक गोष्ट आज्ञापिणें.

**फर्माशी**, ३ लिं॰ हिं॰ पदार्थ निर्मिणारा जो कोणी त्यास याप्रकारचा पदार्थ कर अशी आज्ञा करून पाहिजे तसा करविला जो वस्त्रपात्रादि पदार्थ तो; २, ला॰ गसघटनके अस्माउनम मतीचा जो कोणेक पदार्थ त्यास म्न॰; फर्माशी मार इ॰ स्थलीं खुबपराकाष्ठेचा मार इ॰ अर्थ होतो.

**फर्मास**, स्त्री॰ हिं॰ अमुक काम कर किं॰ अमुक पदार्थ नूं पाठवून दे इ॰ रूप राजादिक सेवकादिकांस करितात जी आज्ञा ती; २, राजादि आज्ञापकाकडेस आज्ञाप्य जे सेवकादि त्यांहीं पाठविला जो कोणेक पदार्थ त्यास म्न॰.

**फल**, न॰ कितीएक ओषधि वनस्पति यांस आपल्या तारुण्यावस्थेंत आल्यावर त्यांस प्रायः पुष्पानंतर अवयवविशेष उत्पन्न होत असतो ज्यामध्यें प्रायः बीज असतें तें जेणेंकरून प्रा॰ त्यांचें जन्म सार्थक होतें; २, पदार्थ व्यापारमात्रापासून निष्पन्न होतें जें पुण्य, पाप, सुख, दुःख, द्रव्य, गुण, इ॰ कांहींएक अपूर्व तें; फलोपधान फलोपधायक, इ॰ स॰ कोणेक व्यवहारादिकानें फलासयेणें म्हणजे फलद्रूप होणें; ३, ग्रहयोग, उत्पात, इ॰ निमित्तानें सुख, दुःख, रोग, इ॰ जें भोक्त्यातें करून प्राप्त होतें तें; ४, त्रैराशिकामध्यें प्रमाण आणि इच्छा या राशींहून विजातीय जो तृतीय राशि तें.

**फलकावणें**, फरकावणें.

**फलग्रंथ**, पु॰ ज्योतिःशास्त्रामध्यें गणितावांचून शकुन मुहूर्त प्रश्न यांचीं शुभाशुभ फलें ज्यामध्यें निरूपिलीं असतात असा जो ग्रंथ तो.

**फलत्यागी**, ३ लिं॰ कांहीं एक इष्ट फल प्राप्त होण्याची वेळ आली असतां त्यासमयीं कांहीं बुद्धीस विपर्यास होऊन रागें भरावें कोठें निघून जावें आणि त्या फलाचा त्याग करावा असा स्वभाव ज्याचा तो; २, कोणी दैवयोगानें फलास अंतर तो जो तो.

**फलद्रूप**, ३ लिं॰ विवक्षित फल ज्यापासून उत्पन्न झालें असा जो कोणेक अर्थ तो.

**फलभोग्य**, ३ लिं॰ सं॰ फलद्वारा उपभोग ज्याचा घडतो असें जें वृत्ति, भूमि, इ॰ तो.

**फलम**, पु॰ हिं॰ सुवर्णाचें एक नाणें आहे.

**फलश्रुति**, स्त्री॰ व्रत, स्तोत्र, यज्ञादिकर्म, इ॰ विषयक जो ग्रंथ त्यामध्यें त्याचें त्याचें फल सांगीतलें असतें असा जो त्याचा विभाग ती; २, फल द्वितीयार्थी म्न॰; उ॰ गोष्ट झाली खरी आतां उगीच रागें भरून फलश्रुति काय.

**फलाणा बिस्तान**, न॰ हिं॰ सटरफटर.

**फलाणा**, पु॰ अमुक या अर्थी हें सर्वनाम आहे.

**फलाणा बिस्ताना**, पु॰ अमुक तमूक.

**फलाणीबिस्तानी**, स्त्री॰ फलाणेंबिस्तानें, न॰ फलाणाबिस्ताना.

**फलाहार**, पु॰ फराळ तृतीयार्थांबांभून.

**फलित**, ३ लिं॰ फल आलें आहे ज्यास असा जो वृक्ष लता, इ॰ तो; २, फलद्रूप; ३, वाक्यादिकांपासून वाच्यादिवृत्तीनें निघतो जो अर्थ तन्माहात्म्यानें जें अर्थांतर भासतें आणि त्या वाक्यार्थानें पर्यवसान होतें; उ॰ त्याची आज्ञा होईल तर मींजाईन यावरून तो त्याचे आज्ञेंत वागतो असें फलित होतें; उ॰ दिवसास येणार नाहीं या वाक्यावरून रात्रीं येईल असा अर्थ फलित होतो.

**फलितार्थ**, पु॰ कोणेक वाक्यादिकांपासून फलित जो अर्थ तो; २, फलश्रुति द्वितीयार्थी.

**फवारा**, पु॰ हिं॰ हजारा कारंजें इ॰ कांचें छिद्रान्वित जें बोंड तें.

**फशीं**, अ॰ फसून जी संकटावस्था तींत पडणें, देणें, इ॰ प्र॰; उ॰ सराईस धान्य घेतलें नाहीं यामुळें फशींपडलों.

**फसकटणें**, मसलत इ॰ कोणेक गोष्टीनें सिद्धीस जाता मध्येंच घडघडणें.

**फसकणें**, फसकटणें.

**फसकन**, –कर, –दिनी, –दिशी, –, अ॰ अनु॰ धान्यादिकांचे राशींत हात खुपसणें, पांटी, इ॰ कांतून धान्यादि ओतणें, गोणी, इ॰ कानीं अकस्मात् फाटणें इ॰ कांचें वि॰.

**फसकी**, स्त्री॰ सर्कारचा फड, पेंठ, इ॰ कांचा गावीं धान्यादिकांचें माप घेणारा जो शेट्या इ॰ अधिकारी तो मणास पसा इ॰ रूप जें हक्काचें धान्य इ॰ घेतो ती; साळें तीलघोरें उजळणीचे दिवशीं पंतोजीस ओंजळ ओंजळ पसापसा धान्य देतात ती; ३, स्त्रिया वर्षभर किं॰ श्रावणमाशीं प्रतिसोमवारीं नियमानें शिवावर ओंधान्याचा पसा वाहतात ती.

**फसगत**, स्त्री॰ व्यवहारीं संधान चुकल्यामुळें होतो जो फशींपडलेपणा ती.

**फसगपत**, **फसगयबत**, स्त्री॰ फसगत.

**फसणें**, चिखल, रेती, इ॰ विशिष्टस्थलांत मनुष्य किं॰ गोमहिष्यादि पशूंनी फसकन आंत जाणें; २, ला॰ कोणेकानें कोणेक व्यवहाराचा परिणाम प्रतिकूल झाल्यामुळें अनिष्टावस्थेंत पडणें; ३, कोणेक व्यवहारानें कर्त्याची अनवधानता इ॰ कारणामुळें प्रतिकूल परिणाम विशिष्ट होणें; ४, कोणाजवळ ठेविलेलें किं॰ कर्जी दिल्हेलें जें द्रव्यादि त्याणें आपले हातास न येई अशी अवस्थेंत पडणें.

**फसफशीत**, ३ लिं॰ मध्ये चिकणाई नाहीं असा जो पिष्टादि पदार्थ वाळवट जमीन वाळू इ॰ तो.

**फसफस**, अ॰ अनु॰ चालते समयीं वाळवेंत पाय रुतणें वाळू उडणें इ॰ वि॰

**फसफसणें**, रा॰ महिष्यादिकानीं फळफळ मुतणें.

**फसफसां**, अ॰ फसफस.

**फसल**, स्त्री॰ घोडें, मूल, इ॰ कांस पुष्ट व्हावया करितां ओला हरभरा, तूप, खारीक, इ॰ जो खुराक चारितात ती.

**फसलहंगाम**, पु॰ धान्यें पिकून सिद्ध आल्यानंतर बाहुल्येंकरून क्रयविक्रय व्यवहार योग्यता जा-

दिवसांत असल्ये असाजो काल तो.

**फसवणी**, स्त्री॰ कोणेकास फसविण्याच्या जो व्यापार तो.

**फसव्या**, ३लिं॰ दुसर्यास फसवावें असास्वभाव ज्याचा तो.

**फसाफस, फसासौं**, अ॰ फसफस.

**फस्त**, ३लिं॰ लुटणें, आवळणें, खाणें, इ॰ द्वारानिःशेष नाहींसा करून टाकला जो गांव, देश, अन्नादि पदार्थ, तो.

**फळ**, न॰ फल; २, पिठाचा एक भक्ष्य पदार्थ करित असतात तें; ३, दे॰ भाला, बरची, इ॰ कांस जें पातें बसवीत असतात तें.

**फळ -, कण, - कन, - कर, - दिनी, - दिशीं**, अ॰ अनु॰ आधार बंधस्फटल्यामुळें एकाएकी लोट बाहेर पडे असें पाणी, इ॰ सांडुणें, मुतणें, इ॰ कांचें वि॰.

**फळकर**, ३लिं॰ फळायाचे योग्यतेस आलेलीजी गाय, ह्मैस, इ॰ तो.

**फळकवणी**, न॰ अतिपातळ जो वरण, ताक, सांबारें, आंबटी, इ॰ पदार्थ त्यास निंदेनें ह्म॰.

**फळणा**, स्त्री॰ गोमहिष्यादि पशूंचे फळायाचे जे दिवस ती.

**फळणें**, कोणेकानें कोणेकास फलरूप होणें; २, गोमहिष्यादि पशु किं॰ पक्षी, इ॰ कांचे स्त्रियांनी गर्भधारणार्थ मैथुनसंस्कार विशिष्ट होणें; ३, कों॰ उघडलेलें जें कवाड, खिडकी, फडताळ, इ॰ तें लावणें.

**फळफळ**, अ॰ अनु॰ दाणे, पाणी, इ॰ गळणे, ह्मैस, इ॰ कांनी मुतणें, इ॰ कांचें वि॰.

**फळफळणें**, शब्द होई असे फळफळ मुतणें किं॰ पाणी इ॰ कानी गळणें, सांडुणें, इ॰; २, कोणेकाचे दैवानें अकस्मात् उदयास येणें.

**फळफळां**, अ॰ फळफळ.

**फळफळावळ**, स्त्री॰ अनेक जातींचीं बरीं वाईट लहान मोठीं जीं फळें ती.

**फळफळीत**, ३लिं॰ फार चमोकळा झालेला जो भात, सांजा, डाळ, इ॰ पदार्थ तो; २, फिळफिळीत.

**फळभाजी**, स्त्री॰ भोंपळा, पडवळ, इ॰ फळरूप जी भाजी ती.

**फळवला**, पु॰ कचटतप एतदादिक जे अक्षराचे पांच वर्ग ते ह्म॰.

**फळशाक**, स्त्री॰ फळभाजी.

**फळशोभन**, न॰ गर्भाधान ह्मणून जो संस्कार तें.

**फळश्रूत**, स्त्री॰ फलश्रुतीचा अपभ्रंश.

**फळाफळ**, अ॰ फळफळ.

**फळावळ**, स्त्री॰ नानाप्रकारचीं जीं फळें ती.

**फळी**, स्त्री॰ लहान मोठा जो तक्त्याचा तुकडा ती; २, आंत दुसर्याचा प्रवेश न व्हावया जोगी कटावानें अवस्थित जी मनुष्य, पशु, मेघ, इ॰ कांची पंक्ति ती; ३, परस्परस्पर्धेनें होतात जे अनेक पक्ष त्या त्या पक्षानें अवलंबून होतात जे पृथक् पृथक् समुदाय ते ह्म॰.

**फळें**, न॰ कों॰ विहिरीचे तळीं जी चौकट बसवितात तीचीं जीं लांकडें तीं ह्म॰; २, तक्त्याचा

सरासरी केला असतो जो सोंपाड्या तें; ३, मोठा आड ओबड धोबड जो नक्का तें; कोणेकाचें फळें पडणें स्त्र० पिशाचोपद्रवानें लांकडासारखें शरीर ताटून पडणें.

**फांक**, स्त्री० आंबा, खरबूज, भोंपळा, इ० फळांचा किं० सूरणादि कंद इ० कांचा पुष्पांचे पाकळीसारिखा लांबट जो तुकडा ती; २, कों० शिमग्याचे महिन्यांत बोंब मारायाचे पूर्वी जीं बीभत्स वचनें ह्मणत असतात तीं प्र०; ३, न० रा० घोणस, फुरसें, इ० कांचे आंगावर जे डाग असतात ते प्र०.

**फांकट**, ३ लिं० फांकटल्यासारिखे तिर्यक्‌ पसरत गेलेले जे पाय, लांकूड, इ० तो; २, न० फाटक द्वितीयार्थी.

**फांकटणें**, मनुष्यादिकांचे पाय किं० तत्सदृश जे दुबेळके इ० संबंधी दोन अवयव ते मध्यें ताण बसे असे दोहों कडे दोन पसरणें.

**फांकटी**, स्त्री० पादादिक दोन अवयव फांकटल्यामुळें ताणलेपणानें विशिष्ट जी स्थिति होत्ये ती.

**फाकड**, न० रा० न्याय्यरीति सोडून वितंडवादानें जें फरडूक तें.

**फांकडा**, ३ लिं० अकडबाज जो शिपाई, नायिका, नायका, वक्ता, कारकून, इ० तो,

**फाकडी**, ३ लिं० रा० अनेकप्रकारचीं फाकडें बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो आणि त्याचें भाषणादि तो.

**फांकणें**, फांकटणें; २, एकत्र जमून राहिलेला जो मनुष्यादि समुदाय, रक्त, प्रभा, इ० कांहींएकत्याणें बहूं कडेस पसरणें; दिशा फांकणें स्त्र० दिशा दिशांचे ठायीं प्रकाश फांकणें; बुद्धि, दृष्टि, इ० दिकानीं फांकणें स्त्र० एका विषयावर सूक्ष्मरूपें न राहतां बहूं कडे पसरणें; ३, पोहे, इ० पदार्थ फक्या मारमारून खाणें; ४, रा० फलादि फांकी पडत असें कापणें.

**फांका**, पु० फक्का; कोणेकानें फांके मारीत फिरणें ह्मणजे लाभादिका हीं फल नसतां व्यर्थ फिरणें; २, अन्नाचे प्रातिकूल्यामुळें भोजन न घडतां दिवस अतिक्रांत व्हावा असा जो भोजन क्रियेचा खाडा पडतो तो; ३, ३ लिं० नियमानें व्हावयाचें जें लाभादि तें न होतां अतिक्रांत झाला जो दिवस, मास, वर्ष, इ० रूप काल तो; उ० नित्य विक्री होत्ये असें च कांहीं घडत नाहीं एखादा दिवस फांका जातो.

**फांकी**, स्त्री० फकिका; २, ओगी, कांड़ार, व्याघ्र, मार्जार, इ० कांचे आंगावर जे पट्टे असतात ते प्र०.

**फाग**, पु० हिं० शिमग्यामध्यें वेश्यादिकांचीं गावयाचीं शृंगाररसप्रधान जीं गाणीं असतात तीं प्र०; २, फांक द्वितीयार्थी.

**फांज**, स्त्री० एक पालेभाजी आहे.

**फाजील**, ३ लिं० हिं० सर्कार, सावकार, इ० कांस द्यावयाचें जें इत्यादि तदपेक्षया अधिक पावलें जें इत्यादि तो.

**फाट**, पु० परस्परें ऐकमत्यानें व्यवहारीं वर्तणारे जे त्यांचें परस्परें मिळेनासें झाल्यामुळें व्यवहारीं होतो जो भिन्नभिन्नपणा तो.

**फांट**, पु० फाट; २, जुळत आलेला जो पंचाईत इ०

इ॰ कांहीं व्यवहार त्याविषयीं प्रतिकूलजो कोणी घेतो आडफांटा तो; ३, कों॰ भाषण, लेख, इ॰ कांचेठायीं पूर्वोत्तरग्रंथास विरोध दिसायाजोगें पडतें जें अंतर तो; ४, जासंस्कारानें होडी, गलबत, इ॰ जलयान चाललें असतें तें फिरवायाकरितां विपरीत वल्हें धरून त्याजलयानास विपरीतजो वल्हवणी चा संस्कार देतात तो; वल्हें इ॰ फांटधरणें म्ह॰ जलयानास फांटबसायाजोगें विपरीत धरणें.

**फांट**, न॰ औषधिपदार्थ भिजत घालून तदंशविशिष्ट काढितातजें पाणी तें.

**फाटक**, न॰ कों॰ जुनेर; २, दे॰ आवार इ॰ कांचे द्वारास फळ्याचे अभावीं आडवीं उभीं लांकडें लावून जी कवाडी करितात तें.

**फाटकर**, ३ लिं॰ ग॰ अल्पस्वल्प फाटलेलें जें वस्त्र, पर्ण, इ॰ तो.

**फाटका**, ३ लिं॰ फाटलेलाजो वस्त्र चर्म पर्णादि पदार्थ तो; २, ला॰ शरीरानें किं॰ द्रव्यसंपत्तीनें जो रोड तो; फांटक्यांत पायशिरणें म्ह॰ कांहीं एकगोष्टीविषयीं लंगडेंपडल्यामुळें वैरी इ॰ कांचा आंतप्रवेश होणें; ३, यथास्थितपणें चालायास साधनभूतजी द्रव्यमनुष्यादि सामग्री तीणेंकरून हीनजोराज्य, संसार, इ॰ पदार्थ तो.

**फाटकातुटका**, ३ लिं॰ फाटलेला तुटलेला असाजो वस्त्र, चर्म, कागद, इ॰ पदार्थ तो.

**फाटणें**, वस्त्र, कागद, चर्म, आंथरी, पान, भूमि, भिंत, इ॰ पदार्थांनी ताण बसणें इ॰ कारणानें भेदविशिष्ट होणें; २, ला॰ एकतंत्रानें चालणारे जे कोणी त्यांचा परस्परें भिन्नभाव होणें.

**फाटफूट**, स्त्री॰ रुपया इ॰ नाणें, भिंत इ॰ इमारत, इ॰ कांचे अंगीं जो फुटलेपणा, तुटलेपणा, इ॰ रूपदोष ती; २, ३ लिं॰ दे॰ फुटकातुटका जो रुपया, इ॰ नाणें तो; ३, न॰ रा॰ फटाके, बंदुका, इ॰ संबंधी जो थोडा बहुत शब्द तें; उ॰ लढाई चालू झाली म्हणतां पण फाटफूट कांहीं ऐकायास येत नाहीं तें.

**फाँटा**, पु॰ एकेरी अंगानें चाललेलें जें वृक्षाचें कांड, नदी, मार्ग, पङ्क्ति, इ॰ त्यास आडवा निडवा तत्सदृश फुटलाअसतो जो अवयव तो; २, लिहिलेलें अक्षरादि खोडायाचें असतां किं॰ कांहीं अन्यसंकेत असतां तेथें जें रेषारूप चिन्ह करितात तो; भाषणादिव्यवहारीं फांटा फोडणें म्हणजे आडफांटा घेणें; कोणेकाचें नाव, रकम, इ॰ कांस फांटा देणें म्ह॰ दूर करणें; कोणेकास फांटा फुटणें म्हणजे मंत्रचळ, पिशाच, इ॰ कानी वेड लागणें.

**फाटाफाट**, स्त्री॰ मिळून व्यवहार करणारे जे कोणी त्यांची कांहीं कारणानें एकमेकाशीं होत्येजी तुटातूट ती.

**फाटाफूट**, स्त्री॰ समुदितपणें एकत्रजमून स्थित जे मनुष्यादि कोणेक अर्थ त्यांतून एक एकीकडे गेला एक एकीकडे गेला असें झाल्यामुळें होतोजो परस्परांचा वियुक्तपणा ती; २, फाटाफाट.

**फाँटें**, न॰ जाळाउजें लांकूड तें.

**फाड**, पु॰ गळूं इ॰ उठणूं इ॰ कांस आंतील अंश बाहेर निघायाजोगा पडतोजो छेद तो आणि छेदकरण्याच्या जो व्यापार तो; २, ला॰ आंतील सर्व दर्द स्पष्ट व्हावयाजोगा कोणेक विषयाचाजो परिस्फोट तो.

**फाड;—कण,—कन,—कर,—दिनी,—दिशीं**, अ॰ अनु॰ तोंडावर मारणें, फटाका, इ॰ कानीं वाजणें इ॰ कांचें वि॰.

**फाडणें**, वस्त्र, कागद, इ॰ फाटेअसें करणें; ओढरेघ, इ॰ फाडणें ह्मणजे काढणें; डोळेफाडणें ह्मणजे वटारणें; पट्टीफाडणें ह्मणजे कुळांकडील वसूल घ्यावयाकरितां अमक्यापासून अमुक घ्यावयाचें अशी याद लिहिणें.

**फाडा**, पु॰ पाडा चतुर्थार्थी; कोणेकगोष्टीचा फाडा वाचणें ह्मणजे कोणेकापाशीं इत्थंभूत वृत्त कथन करणें.

**फाडी**, स्त्री॰ फाडें.

**फाडींव**, ३ लिं॰ विकायाकरितां किं॰ खर्चायाकरितां पाहिजेतितके फाडून काढलेलें जें वस्त्रादि तें आणि फाडून अवशिष्ट राहिलेलें तें.

**फाडें**, न॰ मेजायाकरितां आद्यादिफळें किं॰ रुपया इ॰ नाणें इ॰ कांचे जे पंचकडी, छकडी, इ॰ रूप समुदाय घेतात ते प्र॰

**फाणस**, पु॰ न॰ फानस.

**फातकील**, स्त्री॰ कों॰ फतकल.

**फानमाय**, स्त्री॰ शरीराने वातूळ अंगीं चापल्य नाहीं अशी मंदजी स्त्री तीस निंदेनें ह्म॰.

**फांद**, स्त्री॰ कों॰ किल्ला, इ॰ कांचे तटाचीं जीं भिंताडें तीं प्र॰; २, फांज.

**फांदडणें**, दे॰ काष्ठादिकाचे एके शेवटाचे दोन विभाग दोहींकडे ताणून तें काष्ठादि मध्यें चिरणें; २, कोणेकास मोह घालून बुद्धिभेद विशिष्ट करणें.

**फांदडा**, पु॰ मोटीजी फांदी तो; २, कोणेगोष्टीस नवाच फोडितात जो फांटा तो.

**फांदणें**, दे॰ अश्वादिकानी चालतेसमयीं मोठी लांब उडी मारणें.

**फांदाडणें**, फांदडणें.

**फांदाडा**, पु॰ फांदडा.

**फांदी**, स्त्री॰ खांदी; २, मेणबत्ती, उदबत्ती, इ॰ लावायाकरितां भिंत, खांब, इ॰ कांस जो आंकडा बसवितात ती.

**फांदोरी**, स्त्री॰ दे॰ लहानजी खांदी ती.

**फानस**, पु॰ न॰ कंदील.

**फांपर**, न॰ त्वचेवर पसरलेलें, चिडलेलें, जें खरूज, विचवा, इ॰ संबंधी क्षत तें.

**फांपरणें**, कों॰ शरीरावयवानें पाषाणादिकाशीं घांसलें गेल्यामुळें वरील त्वगेशीं खरचटणें.

**फांपरा**, ३ लिं॰ वा॰ तोंतरा.

**फांपा**, ३ लिं॰ रा॰ तोंतरा.

**फांप्या**, स्त्री॰ मारधा॰ यो॰ प्र॰ कों॰ धंदा, रोजगार, द्रव्य, इ॰ गेल्यामुळें दीन होउन ररकरीत असणें; उ॰ पेंढार्यानी सर्वस्व नेतांच फांप्यामारीत बसले.

**फांफर**, न॰ फांपर.

**फांफरणें**, फांपरणें.

फाँफा, १ लिं॰ रा॰ फोपा.

फाँफूं, न॰ टाणाटोणा; द्रव्य, धान्य, इ॰ कांचें फांफूं करणें ह्मणजे मनस्वीपणें अनेकप्रकारें उडवून निःशेष नाहींसें करणें.

फाँफ्या, स्त्री॰ फांप्या.

फाम, स्त्री॰ कोणेक गोष्टीविषयींचें जें अवधान ती.

फायदा, पु॰ कोणेक गोष्टीपासून जो लभ्यांश तो.

फार, १ लिं॰ पुष्कळ; २, रा॰ कांडायाचे पदार्थावर मुसळाचा जो घाव तो.

फारक, १ लिं॰ देणें, करणें, इ॰ द्वारा जाचा उलगडा झाला आहे असें जें घावयाचें कर्ज, राजकर, इ॰ किं॰ करायाचें जें कोणेक काम इ॰ तो.

फारकत, फारकती, स्त्री॰ फारखत.

फारकरून, अ॰ बहुतकरून.

फारखत, स्त्री॰ उभयतांचा देणें, घेणें, इ॰ व्यवहार संबंध तुटला असतां तद्विषयींचा जो एकमेकापासून लेखकरून घेतात ती.

फारफेर, पु॰ अन्योन्याशीं न्यूनाधिकभावकृत थोडें बहुत जें अंतर तो.

फारशी, १ लिं॰ फारस ह्मणून देश आहे तेथील जे लोक, भाषा, लिपि, इ॰ तो; २, पु॰ पारशी.

फारिखत, न॰ स्त्री॰ फारखत.

फारीक, फारीख, १ लिं॰ फारक.

फारूनफेरून, अ॰ पासंग, इ॰ कृत जें वजनांत अंतर येतें तें नयावें ह्मणून कांहीं वेळा एका पारड्यांत जिन्नस घालावा दुसर्यांत वजन घालावें कांहीं वेळा दुसर्या पारड्यांत जिन्नस घालावा आणि जिनसाचे पारड्यांत वजन घालावें असे प्रकारें तोलून देणें, घेणें, इ॰ कांचें कि॰

फारोळें, न॰ दे॰ पाभरीचे खुंट्यांस फाळासारिखे लोखंडाचे अवयव लाविलेअसतात ते प्र॰

फाल, पु॰ सं॰ फाळ

फाल्गुन, पु॰ सं॰ चैत्रापासून जो बारावा महिना तो.

फाल्गुना, फाल्गुनी, १ लिं॰ फाल्गुनसंबंधी जो वार, तिथि, इ॰ तो.

फावडी, स्त्री॰ घोड्याची लीद, गुरांचें शेण, इ॰ अमाकरायाकरितां किं॰ फकीर इ॰ कांची झोळी त्यांचा घावर अडकवायाकरितां जें लांकडाचें लहानसें फावडें केलें असतें ती; २, ला॰ कोणेक अर्थाची प्रतिकूल संबंधानें होत्येजी दुर्दशा ती स ह्म॰.

फावडें, न॰ खोरें द्वितीयार्थी; २, शेण, लीद, इ॰ काढावयाकरितां तादृशजें लांकडाचें करितात तें.

फावणें, कांहीं एक कार्य करायाविषयीं कोणेकास सवड सांपडणें.

फावती, स्त्री॰ रा॰ एका कार्याकडेस गुंतलेला जो त्यास कार्यांतराकडे लागण्याविषयीं मध्यें मिळतो जो कांहीं काल रिकामेपणा ती.

फाँशी, स्त्री॰ गोमहिष्यादिकांसवेळेस पाणी चुकल्यामुळें एक रोग होत असतो ती.

फाँस, पु॰ पाश शब्दाचा अपभ्रंश; परंतु गांठमागें पुढें होउन जो वलयाकार लहान मोठा होत असतो तद्विषयीं प्र॰; २, दे॰ बाभूळ इ॰ कांचे कांट्यांचा जो भारा तो; कोणेकास फांशीं देणें ह्म॰

ह्मणजे गळीं देणें.

**फाँसकी**, स्त्री॰ पक्षी धरायाकरितां जो केशादिकांचा फांस करितात ती.

**फाँसटणेँ**, भस्म, औषधादिपदार्थ, पात्र, अंग, इ॰ कांस सरासरी फांसणें; २, रा॰ नाचण्याचे परिश्रमानें पाय झिजविणें किं॰ कोणेकानें कोणेकास पाय झिजतअसें चालवून श्रमविणें, त्या परिश्रमास व्यर्थत्व प्रतिपादनाचा विषय असतां प्र॰; उ॰ कांहींलाभनसतां उगीच पाय फांसटीत चार कोस आतो कोण; ३, कों॰ कोणेकास भुलथापीनें मोहून कोणेकव्यवहारीं गुंतविणें.

**फाँसटाफाँसट**, स्त्री॰ रा॰ पायफांसटत गेल्या आल्यानें घडतातजे श्रम ती.

**फाँसणी**, स्त्री॰ शरीरांतील रक्त निघावें ह्मणून वस्त्रा, इ॰ शस्त्रानें जे बारीक बारीक छेद करितात ते प्र॰; दुःखावर फांसण्याटाकणें ह्म॰ दुःखावर डाग देणें.

**फाँसणेँ**, भस्म, चिखल, रंग, इ॰ पदार्थ हस्तादिकें करून घेउन तो हस्तादिक झरकन शरीरादिकावरून ओढून तें भस्मादि शरीरादिकांस लावणें; पक्षीं भस्मादिविशिष्ट हस्तादिकास ही कर्मता.

**फाँसळी**, स्त्री॰ फांसोळी.

**फाँसा**, पु॰ सोंकटीं खेळणें, शकुनपाहणें, इ॰ उपयोगी चारीअंगास जास भिन्नचिन्हें केलीं असतात असा हस्तिदंतादिकांचा चौरस तुकडा केला असतो तो; फांसा सोईचा पडणें, उरफाटा पडणें, इ॰ स्थलीं अनुकूलरूपें करून किं॰ प्रतिकूलरूपें करून घडोनयेत्से जी कोणेक गोष्ट तीस ह्म॰; २, सरी, नथ, इ॰ कांस एके शेवटास वलयकरून त्यांत अडकवायासाठीं त्याचे दुसर्‍ये अग्रीं जो आंकड्यासारिखा अवयव केला असतो तो आणि तें वलय आणि आकडा मिळून जें विशिष्ट त्यासही ह्म॰; ३, पशु पक्षी यांस धरावयाकरितां जो फांस करितात तो; फांशांतपडणें, सांपडणें, इ॰ स्थलीं एकाद्ये पेंचाटींत असा अर्थ.

**फाँसूं**, न॰ नदी, खाडी, इ॰ कांस फुटलेला जो लहान फांटा तें.

**फाँसेपारधी**, पु॰ दोर्‍याचे फांस करून पशु किं॰ पक्षी यांस धरितो तो; २, ला॰ दुसर्‍यास एखाद्या पेंचाटींत घालण्याचा स्वभाव ज्याचा त्यास ह्म॰.

**फाँसोळी**, स्त्री॰ पाठीचे कण्यापासून उरापर्यंत आडवीं लागत आलेलीं जीं हाडें तीं प्र॰.

**फाळ**, पु॰ नांगराचे अग्रास पर्णाकार जो लोखंडाचा अवयव लाविला असतो तो.

**फाळका**, पु॰ केळ, चवेण, इ॰ कांचे डांगेचे एकीकडल्या भागाचाजो तुकडा तो.

**फाळकी**, स्त्री॰ रा॰ ल्हानजो फाळका ती; २, ला॰ भूमीचीजी चिंधी ती.

**फाळणी**, स्त्री॰ कोणएक द्रव्यादिसंख्या अनेकांवर यथायुक्तपणें बसविण्याचा जो व्यापार ती.

**फाळणेँ**, रा॰ फाडणें.

**फाळा**, पु॰ शेत, इ॰ संबंधी जो सारा तो; २, धसलागणें, इ॰ कारणानें वस्त्रादिकांचा फाटोन निघतो जो मोठा तुकडा तो किं॰ तेणेंकरून त्या वस्त्रादिकास पडतो जो छेद तो; ३, रेशमाचें सूत्र रहाटावर गुंडाळून जो कोंपरी सारखा रचनाविशेष करि

तात तो.

**फाळी**, स्त्री॰ फाळकी द्वितीयार्थी.

**फाळेटूं**, न॰ नांगराचा फाळ घट्ट बसावा ह्मणून त्या अवरें जें लांकूड बसवितात तें.

**फिकट**, ३ लिं॰ यत्किंचित् जो फिका तो.

**फिका**, ३ लिं॰ हिं॰ काळेपणा पिंवळेपणा तांबडेपणा इ॰ जो गुण तो ज्यामध्यें कमी असा जो काळा, पिंवळा इ॰ रंग तो आणि तद्विशिष्ट जो पदार्थ तो; २, ला॰ विवक्षित रुचीनें कमी जो मधुरादि रस तो आणि तद्विशिष्ट जो भक्ष्य भोज्यादि पदार्थ तो; ३, ज्या तेजाचे योगानें योग्यता येत्ये शोभा येत्ये असें जें तेज तेणें करून हीन जो अधिकारच्युत मनुष्य नीरस भाषण इ॰ कोणेक अर्थ तो.

**फिकीर**, स्त्री॰ हिं॰ चिंता.

**फिक्कट**, ३ लिं॰ फिकट.

**फिक्का**, ३ लिं॰ फिका.

**फिगारणें**, दे॰ घोंडा, इ॰ भुगारणें.

**फिटणें**, आपल्यावर चढलेलें दुसर्याचें ऋण, शपथ, शंका, संशय, उपकार, सूतक, डाव, इ॰ जें कांहीं एक अवश्य निरसनीय त्याणें द्रव्यदान प्रत्युपकार, इ॰ कें करून निरस्त होणें; २, नेसलेलें जें लुगडें, धोतर, इ॰ वस्त्र, किं॰ त्याचा चुण्या, कांसोटा, इ॰ त्याणें सुटणें.

**फिटफाट**, ३ लिं॰ वि॰ फिटून निःशेष झालेंजें ऋण, डाव, उपकार, इ॰ तो.

**फिटाफीट**, स्त्री॰ ऋणादिकाचा जो निःशेष फिटलेपणा ती.

**फिटी**, स्त्री॰ रा॰ इटी.

**फिट्टू**, पु॰ रा॰ फिटी.

**फिणफिणणें**, दे॰ कुरमुरणें.

**फिणफीण**, स्त्री॰ कुरमूर.

**फितणें**, एकापक्षावर आनुकूल्य आणि तद्विरुद्ध पक्षावर प्रातिकूल्य अशा भावानें असतो जो कोणी त्याणें तद्विरुद्ध भाव विशिष्ट होणें; २, मूल, इ॰ कानें कोणी खाऊ इ॰ काचा लोभ दाखविल्यामुळें ठकणें.

**फितवणी**, स्त्री॰ कोणेकास फितविण्याचा जो व्यापार ती.

**फितवा**, पु॰ हिं॰ फितूर प्रथमार्थी.

**फितावणी**, स्त्री॰ फितवणी.

**फितावणें**, फितविणें.

**फितावा**, पु॰ फितवा.

**फितुरणें**, कोणेकातें फितूर करणें.

**फितुरी**, ३ लिं॰ आपक्षातें आश्रयून राहतो तद्विरुद्ध पक्षास मिळून स्वपक्षांत फितूर करण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, बाह्याकारीं आपक्षाचा ह्मणवितो तद्विरुद्ध पक्षाचा आंतून आप्त पक्षपात आहे तो.

**फितूर**, पु॰ हिं॰ स्वपक्षाशीं विरुद्ध होउन परपक्षास अनुकूल व्हावें असा जो राजकीय लोकादिकांचे अंतःकरणाचा धनलोभादिकामुळें होतो भेद तो; २, ३ लिं॰ वि॰ तादृश भेद विशिष्ट झाला जो तो.

**फित्यावणें**, रा॰ फितावणें.

**फिदफीद्**, अ॰ हास्य शब्दाचें अनु॰ हसण्याचें वि॰

निंदा असतां प्र॰;२, स्त्री॰ सशब्द जो हास्य व्यापार ती.

**फिदा**, ३लिं॰ हिं॰ अवि॰ यद्विषयीं आपल्या प्राणापेक्षांही हा मला प्रिय अशा भावनेनें विशिष्ट जो तो त्या नायकादि विषयावर.

**फिंदारणें**, प्रायः क्रोधावेशानें नाक, डोळे, इ॰ शरीरावयव पिंजारणें.

**फिरक**, स्त्री॰ गात्रें समर्थी घेतात जो कंप ती.

**फिरकणें**, अधिष्ठित स्थल सोडून आसपासच्या प्रदेशीं यत्किंचित संचार विशिष्ट होणें प्रा॰ निषेधविषयीं प्र॰.

**फिरकंडा, फिरकांडा**, पु॰ सोईनें कोणत्या तरी तऱ्हेस लागावें तेंन लागतां भ्रमत असावें अशी जी कोणेक कार्यास प्राप्त होत्ये गति तो आणि तदनुरोधानें कर्त्यास ही स्फटका न होतां तशीच गति प्राप्त होत्ये तो;२, मंडलाकार क्रिं॰ समूर जाउन पुनः पूर्वस्थलीं यावें इत की जी गति तो; प्रायः त्या गतीस दुःखरूपता प्रतिपादनीय असतां प्र॰

**फिरकंडी, फिरकांडी**, स्त्री॰ फिरकांडा.

**फिरकी**, स्त्री॰ फिरक;२, वेश्यादिक नृत्यादि समयीं मारितात जो गरका ती;३, मळसूत्राच्या जो नर म्हणून अवयव असतो ती, कडा, पाळणा, इ॰ कांस शोभार्थ कांतींव अनेक खुंट्या ओवीतें लाबितात त्या प्र॰;४, कांतणें इ॰ कांस गरगर फिरावा जोगा चक्राकार अवयव असतो ती; ५, सोनें इ॰ वजन करायाचा लहान ताजवा आहे.

**फिरंग**, स्त्री॰ प्रा॰ प्रे॰ तरवार.

**फिरंगाण, फिरँगाण**, न॰ ज्यांतें आधिपत्य फिरंग्याकडेस आहे असा जो मुलुख तें.

**फिरंगाणी, फिरँगाणी**, ३लिं॰ फिरंगाण संबंधी जी चाल, भाषा, वेष, इ॰ ती.

**फिरंगी, फिरँगी**, पु॰ टोपीवाल्यांत एक जाति आहे.

**फिरँगूट**, न॰ फिरंग्यास निंदेनें म्ह॰.

**फिरणें**, चक्रादिकांची मंडलाकार गति विशिष्ट होणें;२, ज्या दिशेतें लक्षून चाललेला जो मनुष्यादि जीव, मार्ग, नदी, सूत्र, रेषा, इ॰ त्याणें ती दिशा सोडून इतर दिशेकडे होणें;३, पुढें जावें, मागें यावें, तिर्यक् चालावें, इ॰ रूप अनेक प्रकारच्या गतीनी जो कोणेक स्थलीं संचार तद्विशिष्ट कोणेकानें होणें;४, कोणेक अर्थानें पालटलें जाणें; उ॰ एकपाउस पडतांच झाडांची नक्की फिरली; धुन लागतांच पागोट्याचा रंग फिरला; मामलेदार फिरला म्हणजे कांहीं शिरस्ते ही फिरतात; कोणेकानें कोणेकावर फिरणें म्हणजे विरुद्ध भाव विशिष्ट होणें; कोणेकाचें इत्यादि कोणेकाकडेस फिरणें म्हणजे हिशेबानें यावें असें होणें.

**फिरवाफिरव**, स्त्री॰ इकडलें तिकडे ने तिकडचें इकडे आण हें काढून तें लाव तें काढून दुसरें लाव असा जो व्यापार ती.

**फिरस्त**, पु॰ जो जेथला स्थायी नव्हे देशांतराहून फिरत फिरत आलेला तो तेथें.

**फिरस्ता**, पु॰ फिरस्त;२, एका स्थलीं दुकान न धालितां गावांत घरोघर हिंडून जिन्नस विकणारा जो

जो याणी, इ० उदमी तो.

**फिरून, फिरोन**, अ० पुनः.

**फिर्याद**, स्त्री० हिं० आपला कोणी अपराध केला असतां त्या अपराध्याचा शासनकर्ता जो कोणी त्यापाशीं किं० अस्मानी, सुलतानी, इ० कारणानें होतो जो तोटा त्याचा निरास करणारा जो राजा इ० कोणी त्यापाशीं करितात जें निवेदन तें; कोणेकानें फिर्याद होणें म्हणजे फिर्याद करणें; फिर्याद जाणें किं० येणें म्हणजे फिर्याद करावयाकरितां राजादिकांजवळ जाणें किं० येणें.

**फिर्यादी**, ३ लिं० फिर्याद करावयासाठीं आलेला जो कोणी तो.

**फिशारकी**, स्त्री० फुशारकी.

**फिशारखोर**, ३ लिं० फुशारखोर.

**फिशारणें**, फुशारणें.

**फिशारी**, स्त्री० फुशारी.

**फिश्श, फिश्शा**, अ० कोणेक अर्थाविषयीं हूं. यांत काय आहे असें वाटलें असतां हा उद्गार निघतो.

**फिसकटणें**, फसकटणें; २, कोणेक कार्याविषयीं अनुकूल भावें वागत असतां जो कोणी त्याणें रुसवा, तिरस्कार, इ० कारणानें विथरणें.

**फिसकणें**, फिसकटणें.

**फिसका**, ३ लिं० फुसका.

**फिसकारणें**, दे० माजर, वाघ, इ० कानें क्रोधावेशानें फिस्स अशा शब्दानें विशिष्ट होणें.

**फिसकें**, न० दे० कंसतूड.

**फिस्स**, अ० फिश्श.

**फिळकवणी**, न० फळकवणी.

**फिळफिळीत**, ३ लिं० केवळ फळकवणी झालेला जो कढी, सांबारें, दहीं, इ० पदार्थ तो.

**फीट**, स्त्री० ऋणादिकाचा जो फिटलेपणा; २, न० रा० बसलेला संधि इ० मोकळा व्हावा म्हणून त्यामध्यें जो लांबट लांकडाचा तुकडा मारावयाकरितां घेतात तें; ३, यज्ञोपवीत इ० कांचें सूत ओंथतालें गुंडाळून मोजावयाकरितां शा० रीतीचे प्रमाणाचा जो कांबीट इ० कांचा तुकडा घेतात तो.

**फीत**, स्त्री० स्फीत; २, रेशीम, सूत, इ० विणून दोरासारिखा एक पदार्थ करितात तो.

**फीर**, स्त्री० कों० कोणेकस्थलीं गेलेला जो यात्रा, फौज, इ० त्याची तेथून मागें यावयाकरितां जी परावृत्ति ती.

**फुइजी**, स्त्री० स्त्रिया सासू आणि आत यांस म्ह०.

**फुई**, स्त्री० फुइजी.

**फुंक**, पु० स्त्री० अग्नि प्रदीप्त करणें इत्यादि अर्थ मुख आकुंचित करून घालितात जो वायु तो ती.

**फुकट**, अ० कोणेकापासून कांहींएक अर्थ घेतला असतां मूल्य सेवादिरूप जें प्रतिदान करावें लागतें त्यावांचून, कोणेक अर्थ देणें, घेणें, मिळणें, इ० कांचें वि०; २, वृथा.

**फुकटखाउ**, ३ लिं० कोणेकाचे घरीं सेवादि न करितां फुकट जेवून राहतो जो तो.

**फुकटचा**, ३ लिं० फुकट दिल्हेला, मेळविलेला, जो कोणेक अर्थ तो; हें काम फुकटचें नव्हे इ० स्थलीं अनायासें सहजांत घडाया सारखें नव्हे असा अर्थ.

**फुकटचोट**, पु० कोणेक कार्यीं करावा लागतो जो खर्च वेच किं० आंगमेहनत तें न करितां त्या कार्या

विषयींचा फुकटगोष्टीमात्र सांगाव्या आणि लाभ समयीं मात्र पुढें व्हावें अशेस्वभावाचा जो त्यास ल्ह॰.

**फुकटचोद**, पु॰ पदरचा पैसा नखरचतां फुकटचे फुकट कांहीं भोग्य पदार्थ मिळाला असतां निलाजरेपणी उपभोगिण्याचा स्वभाव ज्याचा त्यास ल्ह॰.

**फुकटपसारा**, ३लिं॰ फुकट हांसण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**फुकटफाकट**, अ॰ फुकट अशाप्रकारें कोणेकअर्थ मिळणें, देणें, इ॰ कांचें वि॰.

**फुकटफुका**, अ॰ रा॰ फुकटफाकट.

**फुकटबिसनी**, पु॰ फुकटचोद.

**फुकटशाई**, ३लिं॰ फुकटचा.

**फुकटाफुकट, फुकटाफुकटी**, अ॰ फुकटफाकट.

**फुकटावारीं**, अ॰ फुकट अशेप्रकारें मिळणें, खरचणें, इ॰ कांचें वि॰.

**फुकट्या**, ३लिं॰ फुकटचोट.

**फुंकण**, न॰ रा॰ आंतील अंश किडीनें खाल्यामुळें पोकळ केवळ हलका झालेला जो नांदूळ इ॰ दाण्यानें

**फुँकणी, फुंकणी**, स्त्री॰ अग्न्यादिकांवर फुंकर घालावा किं॰ भाता इ॰ संबंधी वायु वहावा इत्यर्थ जी वेळू, ताम्रादिधातु, इ॰ कांच्या नळ्या केल्या असतात त्या प्र॰; २, गळेसरीकरावया करितां कांच, सुवर्ण, इ॰ कांचे बारीक बारीक नळ्यांचे आकाराचे करितात जे मणी ते प्र॰; ३, दे॰ फुंकण; कोणेकाचे हातापायांचा किं॰ हाडाचा फुंकण्या होणें ल्हणजे त्याणें अतिशयित कृश होणें.



**फुँकणें, फुंकणें**, मुखवायूनें किं॰ भात्याचे वायूने अग्न्यादिसंबंध करणें; २, सनई, करणा, इ॰ मुखवाद्य वाजायासाठीं मुखवायूने संबद्ध करणे; ३, भाता आंतून वायु निघाया जोगा हालविणें; ४, सर्पादिलक्ष्यावर शाबरादिमंत्र प्रयुक्त करणें; कोणेकाचे कान फुंकणें ल्ह॰ त्यास मंत्रोपदेश करणें किं॰ अंतःकरणवृत्ति वळवायासाठीं कांहीं कानमंत्र सांगणें; कोणेक गोष्ट, बातमी, इ॰ फुंकणें ल्ह॰ कोणेक विवक्षितस्थलीं पोंचे असें लेखादिद्वारा करणें; देश, गांव, भांग, तमाखू, रसायन, इ॰ फुंकणें ल्ह॰ जाळून भस्मसात् करणें; दौलत पैका, इ॰ फुंकणें ल्ह॰ उधळून निःशेष करणें; फुंकून पाय टाकणें ल्हणजे दूरवर पाहून बहुत विचाराने वागणें; पोरानीगडी फुंकणें ल्ह॰ गाल फुगवून वरबुक्यामारून फूत्कार करावा असा मित्रता तोडण्याचा मुलांचा संप्रदाय आहे त्याप्रमाणें गडी तोडणें.

**फुंकर**, पु॰ फुंक.

**फुंकरणें**, अग्न्यादिक फुंकराने संबद्ध करणें.

**फुका**, अ॰ फुकट परंतु याचा प्रयोग व्यवहारीं संकुचित ग्रंथीं सर्व होतात.

**फुकाचा**, ३लिं॰ फुकटचा.

**फुंकारा**, पु॰ दे॰ फुंकर.

**फुकी, फुंकी**, स्त्री॰ एकीबेकीचे खेळामध्यें हातांत कांहीं न घेतां मूठ वळली असतां त्यांत होतो जो द्व्याचा अभाव ती.

**फुगट**, ३लिं॰ फुगीर.

**फुगडी**, स्त्री॰ एकमेकाचे हात किं॰ दंड धरून मंडला

कार फिरावें किं॰ एकमेकासमोर बसून उडयामारीत पुढें जावें इ॰ रूप फुगडी फू असा शब्द करीत करायाच्या अनेकप्रकारच्या क्रीडा आहेत त्या प्र॰.

**फुगणें**, वायु आंत भरल्यामुळें कोणेक पदार्थानें स्थूल होणें; २, ला॰ आंत कांहीं एक द्रव्यादि भरल्यामुळें पोट, पिशवी, गांठोडें, इ॰ कानें वरील आवरण ताठलें जाई असें स्थूल होणें; ३, वायूनें किं॰ जलानें गतिनिरोध झाल्यामुळें तुंबणें; ४, रुसणें; ५, फुशारणें; ६, प्रकरणादि कोणेक अर्थ आंत विवक्षित अनेक अर्थ शिरल्यामुळें मोठा दिसायाजोगा होणें; उ॰ कांहींनाहीं ह्मणत होतां पण बेरीज करतांच पहा केवढी रकम फुगली ती; हे असे आहेत तसे आहेत ह्मणून तुह्मी उगीच फुगिवलें होतें पण आंत कांहींनाहीं.

**फुगवटी**, स्त्री॰ पोट इ॰ शरीरावयवांस वातविकृतीनें किं॰ वायु जल यांचा गतिनिरोध झाल्यामुळें त्यांस येतो जो फुगलेपणा ती.

**फुगवणी**, न॰ तुंबारा बसल्यामुळें फुगून जमलेलें जें नद्यादिकांचें पाणी तें; २, स्त्री॰ आंत कांहीं तादृश ऐवज नसतां उगीच स्तुतीनें कोणेक अर्थास फुगविण्याचा जो व्यापार ती.

**फुगवशी**, स्त्री॰ पोट इ॰ शरीरावयव संबंधी जी फुगटी ती.

**फुगा**, पु॰ कागद इ॰ कांचा पिशवी सारिखा आकार करून आंत वायु किं॰ उदक कोंडिलें असतां फुगून तटतटीत जो आकार होतो तो; २, जलादिकांचा जो बुडबुडा तो; ३, तत्सदृश शरीरादिकावर अग्निसंयोगादि कारणानें जो उंचवटा उठतो तो; ४, हजारी कारंजे इ॰ कांचा फुगीर जो मुखावयव असतो तो.

**फुगारा**, पु॰ फुगा तृतीय चतुर्थार्थी; २, जल, वायु, पोट, इ॰ कांची फुगलेपणानें विशिष्ट जी स्थिति तो.

**फुगीर**, ३ लिं॰ कांहींसा फुगलेल्या सारिखा दिसतो जो आकार आणि तद्विशिष्ट मुखादि शरीरावयव, अळंकार, भांडें, इ॰ कोणेक पदार्थ तो.

**फुगें**, न॰ बा॰ मनुष्याचे आंगावर जादेवी येतात तें.

**फुगोशी**, स्त्री॰ फुगवशी.

**फुटक**, ३ लिं॰ कों॰ फुटकें जें पात्र, रुपया, इ॰ नाणें मध्येंमध्यें फुटून पडलेला जो शेताचा बांध, किल्याचा तट, इ॰ किं॰ तद्विशिष्ट शेत, किल्ला, इ॰ तो.

**फुटकपात्र**, न॰ फुटून छिन्नभिन्न झालेलें किं॰ केवळ फुटायाजोगें झालेलें जें पात्र तें

**फुटकर**, ३ लिं॰ बा॰ फुटक.

**फुटकळ**, ३ लिं॰ विवक्षित जो विशिष्ट समुदाय तद्रूप नव्हे असा जो विभागात्मता पावलेला कोणेक अर्थ तो: उ॰ तुह्मी सगळी तसबी घ्याल तर सोईवार पडेल एकेक दोन दोन अशीं फुटकळ घ्याल तर महाग पडतील; २, मधले मधले अंश जाचे गेले आहेत अतएव अखंड नव्हे असा जो ग्रंथ, शेताचा बांध, तट, इ॰ तो.

**फुटका**, ३ लिं॰ फुटून छिन्नभिन्न झालेला जो पात्र, काष्ठ, पाषाण, नाणें, इ॰ पदार्थ तो; २, अंधत्व पावलेला डोळा, बधिरत्व पावलेला कान, आणि दुर्दशापन्न झालेलें दैव तो; ३, फुटकळ जी रकम इ॰ तो; ४, फुटरा जो कागद किं॰ शाई तो.

**फुटणें**, दगड, काष्ठ, पात्र, फोड, इ॰ मूर्तपदार्थ त्याणें किं॰ संसार, व्यापार, मसलत, इ॰ अमूर्त अर्थ त्याणें आंतील अंश उघड व्हावया जोगें भेदविशिष्ट होणें किं॰ भेदपावून अनेकखंडरूप होणें किं॰ विशिष्ट अवयवीपासून कोणेक विभागानें खंडरूपेंकरून भिन्न होणें; २, अनेक व्यक्ति एकत्र जमून झालेला जो सेना इ॰ समुदाय त्याणें विसकळीत होणें किं॰ त्याचे अवांतरावयवानीं त्यापासून निराळें होणें; ३, ऐकमत्यानें कोणकाशीं एकरूपता पावलेला जो कोणेक त्याणें तें मतसोडून भिन्न होणें; ४, कोणक अधिकरणाचे अभ्यंतरीं अव्यक्तरूपेंकरून स्थितजें कांहीं अवयवादि त्याणें व्यक्तरूपेंकरून बाहेर पडणें; उ॰, यापोरास आगोदर वाचा फुटली आणि मग दांत फुटले; ५, कागदाचे किं॰ शाईचे दोषामुळें एकाबाजूस लिहिलेलें अक्षरादि दुसऱ्याबाजूस उमटे असें होणें एथें त्या अक्षरादिकास शाईस आणि कागदास पर्यायेंकरून कर्तृता येत्ये; ६, ताक, दहीं, खीर, इ॰ कानीं अग्निसंयोगादिकारणानें नासून पाणी आणि शितड्या होत अशी अवस्था पावणें; ७, फूटम्हणून जो व्यथाविशेष तद्विशिष्ट कोणेक शरीरावयवानें होणें, गोमहिष्यादिकानीं दुधास फुटणें स॰ त्यांस दूध फुटणें, डोळे, कान, दैव, यानीं फुटणें स॰ फुटकेपणानें विशिष्ट होणें, कोणेकानें आंगीं फुटणें स॰ शरीरानें पुष्ट होणें.

**फुटफुटणें**, वा॰ पुटपुटणें.

**फुटफूट**, स्त्री॰ वा॰ पुटपूट.

**फुटरा**, २लिं॰ हेमंत ऋतूंचे वाऱ्याचा संयोग इ॰ निमित्तानें फुटावें अशास्वभावाचा जो पादादि शरीरावयव, भूमि, मृत्तिका, इ॰ तो; २, अग्निसंयोगानें फुटून लाह्या व्हाव्या अशास्वभावाचें जें भात, वरी, इ॰ धान्य. तो

**फुटवा**, पु॰ को॰ वृक्षलता यांस ऋतु माहात्म्यामुळें किं॰ खशीकेल्यामुळें नवा फुटतो जो अंकुर समुदाय तो.

**फुटळ**, स्त्री॰ रा॰ भात, हरीक, इ॰ भरडलें असतां तांदूळ फुटून बारीक निपतात जा कण्या ती.

**फुटागूळ**, पु॰ रा॰ ढेंपफुटून अनेक तुकडे झालेला असा जो गूळ तो.

**फुटाणा**, पु॰ भिजवून, भाजून, भक्षायासाठीं खुसखुशीत केलेला जो हरभऱ्याचा दाणा तो, फुटाणेफुटणें किं॰ उडणें स॰ सर्वत्री किं॰ त्वरेचें भाषण एतत्संबंधी शब्द होणें.

**फुटाणी**, ३लिं॰ फुटाण्यासारिखीं वररंगाचीं चिन्हें असतात असें जें चीट इ॰ वस्त्र तो.

**फुटाफूट**, स्त्री॰ समुदायांतून किं॰ ऐकमत्यांतून यानें फुटावें, त्याणें फुटावें असा जो व्यापार किं॰ तज्जन्यत्या समुदायाचा किं॰ ऐकमत्याचा फुटलेपणा तो.

**फुटाळ**, न॰ को॰ झाडावरून पडून फुटलेलें जें फळ तें प्रा॰ आम्रफलावर प्रसिद्ध.

**फुटीर**, ३लिं॰ आगंजाग भेगांनीं विशिष्ट झालेला

झालेला जो हात, पाय, इ॰ शरीरावयव किं॰ भिंत, भूमि, मडकें, इ॰ पदार्थ तो; २, ज्याचे पोटचें रेशीम आगोजाग उघडें दिसतें असा जो कलाबतू तो; ३, फुटरा प्रथमार्थी.

**फुडचा**, ३ लिं॰ रा॰ पुढचा.

**फुडला**, ३ लिं॰ रा॰ पुढला.

**फुडवट**, ३ लिं॰ रा॰ पहिलारू जी गाय, म्हैस, इ॰ तो.

**फुडा**. पु॰ रा॰ पुढा.

**फुडां**, अ॰ रा॰ पुढां.

**फुडार**, पु॰ रा॰ पुढार.

**फुडारी**, पु॰ रा॰ पुढारी.

**फुडील**, ३ लिं॰ रा॰ पुढील.

**फुडून**, अ॰ रा॰ पुढून.

**फुडें**, अ॰ रा॰ पुढें.

**फुणगी**, स्त्री॰ ठिणगी; फुणगी लावणें, टाकणें, इ॰ स्थलीं कज्जा इ॰ पेटविणें.

**फुणफुणणें**, क्रोधावेशानें संतापलें असतां डोळे लाल व्हावे नाक पिंजारावें वारंवार फुसकारे टाकावे, अशी जी अवस्था होत असत्ये तद्विशिष्ट कोणकानें होणें; २, हस्त्यादिकानें फुणफुणीनें विशिष्ट होणें.

**फुणफूण**, स्त्री॰ अग्नीने भाजलें असतां किं॰ वृश्चिकादिकांचा दंश झाला असतां पहिला जो दुःसह वेग तो गेल्यानंतर कांहीं काल राहत्ये जी यत्किंचित् व्यथा ती.

**फुंदणें**, स्फुंदणें.

**फुन्ना**, पु॰ मोत्यांची नसबी. कुंचडें, इ॰ कांस असतो जो रेशीम, इ॰ कांचा गोंडा तो.

**फुंपणें**, दे॰ सर्पादिकानें क्रोधाविष्ट होउन फूंफूं असा शब्द करणें.

**फुपाटा, फुंपाटा**, पु॰ चूल, आगटी, इ॰ कांचे ठायीं पेटलेला जो॰ अग्नि तो विझाल्यावर अग्निकणांनी विशिष्ट जी धगधगीत राख असत्ये ती; २, ला॰ सूर्यकिरणांनी फार तापलेली जी धूळ, वाळू, इ॰ त्यास ह्म॰.

**फुप्फुस**, पु॰ सं॰ हृत्कमलांत पिवरा सारिखा अनेक छिद्रान्वित एक पदार्थ आहे तो.

**फुयजी, फुयी**, स्त्री॰ फुई.

**फुरका**, पु॰ भुरका प्रथमार्थी.

**फुरगुटणें**, फुरगुटानें युक्त होणें; २, रा॰ रुसल्यामुळें तोंड नाक मुरडावें गाल फुगवावे कोणाशीं बोलूं नये असा जो मुद्राविशेष होतो तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

**फुरगूट**, न॰ तादृश आदरादि न झाल्यामुळें रोष येउन किं॰ कोणी स्तुत्यादि केल्यामुळें गर्व येउन कोणी बोलिवलें असतां धड बोलूं नये गाल फुगवावे, नाक मुरडावें, इ॰ व्हावया जोगा जो अंतःकरणांत धर्मविशेष उत्पन्न होतो तें.

**फुरडी**, स्त्री॰ वा॰ कसर ह्मणून जो तळें इ॰ कांचे ठायीं कंद होत असतो ती.

**फुरडूक**, न॰ रा॰ फरडूक.

**फुरण**; न॰ युद्धादि कोणेक कर्माविषयींचा जो उत्साह त्याचा आवेश शरीरांत होउं लागला ह्मणजे जो कंपसदृश शरीरांत विकार उत्पन्न होतो तें.

**फुरणें**, स्फुरणें या अर्थी कोणी ह्म॰

**फुरफुरणें**, अश्व, गर्दभ, खेचर, यांचा नाकाने जो फुरफुर शब्द होतो तद्विशिष्ट त्याणी होणें; २, तेलांश विशिष्टजें करवंटी, शिसयाचें काष्ठ, इ॰ इंधन त्याणें जळत्येसमयीं फुरफुरवाजणें या अर्थी पक्षीं त्याअग्नीसही कर्तृता; ३, लहान बालकानें ओष्ठानी जो फुर असा शब्द होत असतो तद्विशिष्ट होणें; ४, नेत्रादि शरीरावयवाने स्फुरण विशिष्ट होणें; ५, जिव्हा, हात, इ॰ जाजा इंद्रियांचा जोजो बोलणें, मारणें, इ॰ व्यापार तद्विषयींचा उत्साहानें त्यात्या इंद्रियानें स्फुरण विशिष्ट होणें.

**फुरफुराट**, पु॰ फुरफुर शब्दाचा जो अतिशय तो.

**फुरफुरी, स्त्री॰ फुरफुरें**, न॰ दे॰ हरभऱ्याचे पिठाचा तळून तोडीं लावाया करितां एक पदार्थ केला असतात ती तें.

**फुरफुर**, अ॰ अनु॰ काष्ठ, करवंटी, इ॰ कांचें जें जळतांना वाजणें इ॰ त्याचे वि॰; २, स्त्री॰ अग्नि, अश्व, इ॰ संबंधी जो फुरफुरण्याचा व्यापार ती.

**फुरसत, फुरसूत**, स्त्री॰ फावती; २, पुढें होणारें कोणेक कार्य त्याला विवक्षित अवधी पासून मध्यें असतो जो कालरूप अवकाश ती.

**फुरसें**, न॰ एक सविष जिवाणू आहे.

**फुरारणें**, फुरफुरणें पंचमार्थी.

**फुलकारी**, ३ लिं॰ जाजवर विणकरीनें विजातीय रंगाचे सूताचे फुलांचे आकार उठविले असतात ती; २, स्त्री॰ भत्स्यक्षरीं फुल या शब्दाचा उच्चार करावा अशा संकेतानें कोणेक भाषेचें करितात जें भाषांतर ती.

**फुलगोटा**, पु॰ पिठये साखरेंत एक भेद आहे.

**फुलछडी**, स्त्री॰ फुलें गुंफून हातीं घ्यावया करितां जो छडीसारिखा आकार करितात ती.

**फुलजी**, पु॰ कोणी स्तुत्यादि केल्यामुळें खुलून जें ह्मटलें तें करायाजोगा अनुकूल झाला जो त्यास ह्म॰.

**फुलझडी**, स्त्री॰ फुलबाजी.

**फुलझाड**, न॰ ज्याचें फूलच प्रधान असें जें गुलबास, कन्हेर, जास्वंद, मोगरा, इ॰ झाड तें.

**फुलणें**, पुष्पकलिकेनें पुष्परूपता येई असें विकसित होणें या अर्थी पुष्पासही कर्तृता; २, तांदूळ, जोंधळा, इ॰ कांनीं अग्नि, जल, इ॰ संयोगानें लाही इ॰ रूप परिणाम व्हाया जोगें उमलणें, ३, छिद्रादिकांत बसवायाचा जो धातूचा खिळा इ॰ त्याणें अग्रभागीं ठोकल्यामुळें रुंदावून फुलासारिख्या आकारानें विशिष्ट होणें; ४, फुलफुलणें प्रथमार्थी; ५, वृक्षलतादिकानी पुष्पविशिष्ट होणें; ६, ला॰ गाय, अश्व, इ॰ पशूनी जागोजाग फुलासारिख्या ठिपक्यानी विशिष्ट होणें; ७, घोंगडी, सखलात, पासोडी, पितांबर, इ॰ वस्त्र किं॰ कार्पासादिकांचें जें सूत्र याणी त्यांजवर वेत असतें जें फूल तद्विशिष्ट होणें; ८, भरानें वृक्ष फुलूं लागला ह्मणजे जसा केवळ पुष्पमय दिसतो तद्वत् दिसायाजोगें कोणेक स्थलाद्यधिकरणानें चित्रविचित्र वर्णविशिष्ट जे मनुष्य पशु, कीटक, इ॰ तिहीं करून निबिड व्याप्त होणें.

**फुलपगर**, न॰ स्त्रियांचें एक पुष्पसदृश शिरोभूषण आहे

आहे.

**फुलपात्र**, न० रामपात्र.

**फुलफुलणें**, क्रोधावेशानें श्वानमार्जारादिकांचें पुच्छ, केश, मनुष्यादिकांची नासिका, इ० कांनीं प्रफुल्लित होणें; २, जाणें, येणें, लढणें, इ० व्यापार करण्याविषयीं कोणेकानें उत्साहविशिष्ट होणें.

**फुलबरडा**, पु० रुपारींत एक भेद आहे तो.

**फुलबाजी**, स्त्री० पोटीं दारू घालून जी कागद इ० कांची क्रीडार्थ जाळायाकरितां नळी करितात ती.

**फुलबासन**, न० दे० फुलवासन.

**फुलबिसनी**, ३ लिं० दे० ज्याचे हातून कांहीं एक श्रम व्हावयाचा नाहीं असा पोशागी जो त्यास म्ह०.

**फुलमाळी**, पु० फुलझाडें लावून फुलें, फुलांचे हार, तुरे, इ० विकून उपजीविका करणारा जो माळी तो.

**फुलवरा**, पु० बाजरीचें कणसा भोंवता असतो जो पुष्पसमुदाय तो; २, अनेक पुष्पें एकत्र गुंफून चंद्र, पिंपळाचें पान, इत्याद्याकारक करितात जी रचना ती; ३, कों० देवावर शोभार्थ पुष्पें फळें लांबत बांधून जो रचना विशेष करितात तो.

**फुलवात**, स्त्री० फुलाचे आकाराची जी कापसाची वात करितात ती.

**फुलवासन**, न० उदमी लोकांपासून कांहीं उंचें वस्त्र घेत्येसमयीं तें नमळावें म्हणून त्याचे भोंवतें जें शुभ्रवस्त्र गुंडाळितात तें.

**फुलारी**, पु० फुलमाळी; २, स्त्री० फुलकारा इत्यर्थीं.

**फुली**, स्त्री० देंठसोडून अवशिष्ट जें पुष्प त्याचा जो कागद, इ० कांवर रेषांनी आकार काढितात ती; २, तत्सदृश जो कागद, धातूचा पत्रा, इ० कांचा आकार करितात ती; ३, रा० कागदाची जी पंचकडी ती.

**फुलेल**, न० मोगरा, चमेली, इ० पुष्पांचे सुगंधानें सुगंधित केलेले जे तीळ त्यांचें जें तेल तें.

**फुशारकी**, स्त्री० अंगीं तादृश योग्यता नसतां लोकांत अतिरिक्त दिसाया जोगी कोणी बाळगतो जी कोरडी प्रतिष्ठा जीचा डौल, बोलणें, चालणें, इ० व्यवहारीं दिसत असतो ती; २, बडिवार.

**फुशारखोर**, ३ लिं० अंगी फुशारकी बाळगण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**फुशारणें**, कोणेकानें फुशारकीनें विशिष्ट होणें.

**फुशारी**, स्त्री० फुशारकी.

**फुसकट**, ३ लिं० कों० फुसक्या पदार्थाचे कोटींत गणाया जोगा जो पदार्थ तो.

**फुस—, फण—, कन—, कर—, दिनी—, दिशीं—,** अ० अनु० फुसक्या पदार्थानें मोडणें, तुटणें, फुसकुला सोडणें, इ० कांचें वि०.

**फुसका**, ३ लिं० जी बळकटी ज्यांत असावी त्या बळकटीनें रहित जो काष्ठ, पाषाण, कागद, मनुष्य, वारा, अग्नि, ग्रंथ, भाषण, लेख, इ० पदार्थ तो.

**फुसकारणें**, सर्प इ० कानें फुसकाऱ्यानें विशिष्ट होणें.

**फुसकारा**, पु० क्रोधावेशानें सर्प, मार्जार, गुरूं, मनुष्य, इ० कांचा जो फूं असा शब्द तो.

**फुसकुली**, स्त्री० मोठ्यानें शब्द न होतां हळूच येतो जो अपानवायु ती; २, ला० दुसऱ्याचे मर्मास लागावें इ० रूप कोणी समोर न येतां आडून हळूच बोलतो जें कांहीं एक कुत्सित भाषण त्यास म्ह०.

**फुसफुशीत**, ३लिं॰ कों॰ आंचे आंगीं काठिन्य नाहीं अतएव फोडायास भेदायास विशेषबल लागत नाहीं असा जो कुजकें काष्ठ, शाडवंट भूमि, इ॰ पदार्थ तो; उ॰ फुसफुशीत जमीनीस रताळें चांगलें पोसतें.

**फुसफुसणें**, सर्पादिकानीं फुसफुस असा शब्द करणें; २, ला॰ मनुष्यानें दूर फुसफुस असा शब्द मात्र ऐकायास आवयाजोगें हळूहळू बोलणें.

**फुसलावणें**, कोणेक कार्य साधून घेण्याविषयीं कोणेकास खोटींच स्तुति करावी कांहीं आशा दाखवावी अशा अनेक कपटयुक्तीनीं स्ववश करून घेणें.

**फुस्स**, अ॰ फिस्स.

**फूं**, अ॰ सर्पादिकांचे फूत्काराचें अनु॰; कोणेकानें फूं होणें म्ह॰ पराकाष्ठेचा रोष चढल्यामुळें सर्व क्रिया सोडून नाकपुड्या फुगवून फसकारे टाकीत राहणें.

**फूग**, स्त्री॰ फुगारा हितीयार्थी; २, रा॰ वाहतें पाणी वायु, इ॰ फुगून रहायासाठीं गतिरोधार्थ ओवहाणीचे मार्गास बांध, चोंथडी, इ॰ कांहीं लावितात ती.

**फूट**, स्त्री॰ दगड, लांकूड, भांडें, रुपया, इ॰ कोणेक पदार्थास फुटल्यामुळें जी चीर पडत असते ती; २, संघीभूत जे अनेक अर्थ किं॰ एकोप्यानें स्थित जे अनेक मनुष्यादि त्यांचा तो संघ किं॰ एकोपा बिघडाया जोगा होतो जो भेद ती; ३, गुसम सलत, इ॰ कांची जी परिस्फूटती; ४, वायु किं॰ शैत्य यांचे विकृतीनें तो तो शरीरावयव फुटतो आहे असें वाटायाजोगी जी अवस्था अनुभवास येते ती; ५, फुटाण; ६, भात, हरीक, इ॰ भरडल्येसमयीं तांदूळ फुटून बारीक बारीक होतात तुकडे ते म॰

**फुटतूट**, स्त्री॰ भांडें, रुपया, इ॰ कांस फुटलेपणा, तुटलेपणा, इ॰ रूप जो दोष ती; २, फुटकीं तुटकीं पोंचललेलीं अशीं जीं पात्रें, फळें, इ॰ त्यांचा जो समुदाय ती.

**फूत्कार**, पु॰ ओठ संकुचित करून वक्त्रानें वायु बाहेर किं॰ आंत घेतला असतां जो शब्द होतो तो; २, सर्प, गोमहिष्यादि पशु, इ॰ कांनीं क्रोधावेशादि कारणानें मोठ्यानीं वायु बाहेर टाकिला असतां जो शब्द होतो तो.

**फूल**, न॰ वृक्ष, वल्ली, इ॰ भूरुहांस तारुण्यावस्था प्राप्त झाली असतां जो अवयवविशेष येत असतो तें जें प्रा॰ फलोत्पत्तीचें कारण असतें; २, ला॰ कोणेक वृक्षाचे फुलासारिखा सोनें, इ॰ धातु, कागद, हस्तिदंत, इ॰ कांचा जो भूषणार्थ पदार्थ करितात तें; ३, दारू इ॰ संबंधी जो अग्नि त्यापासून जें फुलासारिखे अग्नीचे आकार निघतात ते म॰; ४, गालिचा, सखलातूद्भवस्त्र किं॰ सूत यांवर जो केसरासारिखा अंश दिसतो तें; ५, फुललेला जो अश्वादि त्याचे अंगावर जीं चिन्हें असतात तीं म॰; ६, मडकें इ॰ कांचे डायीं उदाचा धूर जमला असतां त्याचा परिणाम होउन जो द्रव्यविशेष होतो तें; ७, अस्त्राचा अग्निसंयोगानें लाहीसारिखा होतो जो परिणाम तें; ८, डोळ्याचे बुबुळावर जो पांढरा ठिपका उत्पन्न होत असतो तें; ९, दगड, काष्ठ, इ॰ कांचे अंगास जो ढवाक सदृश

सदृश अवयव येन असतो आला दगडफूल ह्म०; १०, सुपारी पातळ बारीक कापून त्याचाजो हलकाचुरा करितात तें; ११, कोणेकपदार्थाचाजो हलकेपणा तदतिशयद्योतनार्थ त्यापदार्थास आरोपानें ह्म०; उ० हें गांठोडें हलकें फूल आहे यालान्यायला काय ह्मणें; १२, एकवन्य झाडआहे; कोणेकास फुलांत घालून नेणें, राखणें, इ० स्थलीं यत्किंचित् उपसर्ग न लागूं देतां मोठ्याजोपासनेनें संभाळूननेणें इ० अर्थ; फुलाबोलास गांठपडणें ह्म० बोलाफुलास गांठपडणें; दिव्यासफूल देणें ह्म० दिवापालवणें; फूलनाहींफुलाचीपांकळी देणें ह्म० जितकें द्यावें तितकें द्यावास सामर्थ्य नाहीं ह्मणून यत्किंचित् देउन दिल्हेसें करणें.

**फूस**, स्त्री० कांहींवाईटगोष्ट केलीअसतां तन्निमित्त शासनकरणाराजो राजा, पति, मातापितरें, इ० कोणी अधिकारी त्यांचें जें त्यावाईटगोष्टी विषयीं गुप्तरूपें अनुमत तद्रूपजें त्याअपराधकर्त्यास बल असतें ती; २, पु० मोडआलेलाजो नारळ ताडफळ यांचेपोटीं जो फुसफुशीत अंश उत्पन्न होतो तो.

**फेकणें, फेंकणें**, पाषाणादिपदार्थ दूरजाईअसा सुगारणें; पगडी, पागोटें, इ० फेंकणें ह्म० अकूडदिसायाजोगें डौलानें डोकीस घालणें; आस्वद, शिपाई, घोडा, इ० फेंकणें ह्म० विवक्षित स्थलीं वेगानें जाई असा करणें.

**फेंगडा**, ३लिं० मधल्यासांध्याजवळ धनुष्याकार वांकडा झालेलाजो पाय तो आणि तद्विशिष्ट मनुष्यादि तो आणि त्याचें चालणें तो.

**फेट**, न० रा० फीट द्वितीयार्थी.

फेटा

**फेटा, फेंटा**, पु० लहानजें पागोटें तो.

**फेड**, स्त्री० आपल्यावर चढलेलें जें ऋण, उपकार, डाव, इ० त्याचा प्रतिदानादिद्वारा फेडण्यानें जो निरास तो.

**फेडणें**, फिटेअसें करणें; नाककिं० शेंबूड फेडणें ह्म० शिंकरणें.

**फेडा**, पु० मृदंगाचाजो पुडा तो.

**फेण**, पु० फेनशब्दाचा अपभ्रंश.

**फेणी**, स्त्री० तारफेणी; २, तोंडीं लावायाचे उपयोगी पापडासारिखा एक पदार्थ आहे; ३, मोगजो बतासा ती.

**फेन**, पु० दूध, तेल, पाणी, मद्य, इ० सद्रव पदार्थांचे कांहीं अंशाचा आलोडनादि कारणामुळें जो हलकापरिणाम होतो तो.

**फेंपरी**, स्त्री० बंदकरणें किं० होणें याचे योगीं प्र० कोणेकाची चालली असत्येजी वाग्जल्पना ती दटावणी, इ० द्वारा बंदकरणें किं० होणें.

**फेंफरें**, न० अपस्मारवायूचे योगानें शरीरास कंप सुटून मुखास फेंसयावा आणि मूर्छा येउन पडावें असाजो विकार होतो तें; २, तत्सदृशजो पिशाचबाधेनें विकार होतो त्यासही ह्म०.

**फेंफें**, न० बेंबें.

**फेर**, पु० घेर; २, कोणेकपदार्थाभोंवताजो दोरी, इ० कांचा फेरा तो; ३, अंतर प्रथम द्वितीय तृतीयार्थी; ४, मार्गादिकांस ऋजुसूत्रापेक्षां दीर्घता यावयास कारणभूतजी वक्रता असत्ये तो; ५, फेरफटका प्र० प्रथमार्थी.

**फेरघोडी**, स्त्री० जाचेआज्ञेंत वागणाराजो कोणी

तो

त्यालाच उलटून गोष्टसांगावी त्यांपों एक ल० टलें असतां आपण बेक ह्मणावें असा आपले वृत्तीचा करितोजो उलट ती; २, एकदां पराजयादि होउन पराभूत झालेला जो कोणी तो पुनः ख्यातो जीउलढती.

फेरणी, स्त्री० क्रमानें कोणेक अर्थावर जो उलटापालट इ० द्वारा चालनसंस्कार होतजातो तोमुखच्या व्यक्तीपासून शेवटचे व्यक्तीपर्यंत झाला ह्मणजे होतोजो त्याक्रियेचा पर्याय ती; उ० पाहिल्या फेरणीस जितकीं अशुद्धें सांपडलीं इतकीं दुसऱ्ये फेरणीस नाहीं सांपडणार.

फेरणें, घोड्यास अनेकप्रकारचागतीनी व्यायामार्थ किं० शिक्षार्थ आसमंताद्भागीं चालविणें; २, याआंमच्या त्याआंगावर इकडचा तिकडे तिकडचा इकडे यावेळच्या त्यावेळेस त्यावेळच्या यावेळेस कांहींकाळ हा कांहींकाळ तो अशोप्रकारें कोणेकअर्थ चालित करणें.

फेरपगडी, स्त्री० फेरघोडी प्रथमार्थी.

फेरपाळीने, अ० पारगीपारगीनें.

फेरफटका, पु० घोड्यासजो फेरण्याचा संस्कार तो; २, ला० एकाठिकाणी खुडकलेलाजो मनुष्यादि तो इतस्ततः फिरल्यामुळें जो त्यासचालनसंस्कार होतोतो; ३, शास्त्रादिकांस आवृत्ति, अध्यापन, इ० द्वारा जो चालन संस्कार तो.

फेरफार, पु० फारफेर.

फेरा, पु० कोणेकपदार्थास मध्यें घेउन त्याचे भोंवतें सूर्यादि फिरून पूर्वस्थलीं आलें असतां त्यासूर्यादिकांची त्यापदार्थाभोंवती होत्येजी व्याप्ति तो; २, कोणेकपदार्थाची मंडलाकारफिरण्याने जेथून फिरायास आरंभ झाला तेथपर्यंत पुनः यावें इतकी जीगति तो; ३, फेरचतुर्थार्थी; ४, ग्रा० फेरीयाअर्थी; ५, फिरकांडा.

फेरिस्त, न० व्यवहारिक लिहिण्याचे कागदांचाजो समुदाय त्यामध्यें कोणकोण त्याप्रकरणाचे कितीकिती कागद आहेत हें समजावें ह्मणून त्यांचें टांचण करून ठेविलें असतें तें.

फेरी, स्त्री० कोणेकाची कोणेकाचे भोंवताली जिथुन निघावें तेथें फिरून यावें इतकीजी गति ती किं० कोणेकस्थलीं जाउन पुनः माघारें पूर्वस्थलीं यावें इतकीजीगतिती; २, मंडलाकार किं० इतस्ततः फिरत फिरत चालणाराजो कोणी त्याची तीतीं स्थलें आक्रांत करीत होत्येजी गति ती; उ० ती सचर्षानी शनीची पुनः त्याचराशीस फेरीयेत्ये; उ० त्यापेंठेस सहजांत तुमचीफेरी होईल तेव्हां तो जिन्नसआणा.

फेरीवाला, पु० फेरेकरी.

फेरूनफारून, अ० फारूनफेरून.

फेरेकरी, पु० फिरस्ताजो उद्मी तो; २, नित्यांत भिक्षा घेतनाहींत कांहीं विशेष भिक्षा एकदांच घ्यावयाकरितां जे घरोघर रोजफेरी घालित असतात भिकारी ते प्र०.

फेल, न० कों० ज्यांतील दाणा पोसलानाहीं असा जो वाल इ० कांची शेंग, हरभऱ्याचाघांटा इ० ते.

फेस, स्त्री० रा० पेस.

फेंस, पु० फेन.

फेंसट, ३ लिं० ज्यामध्यें फेंस आहे किं० अमळ

हालल्यानें आला फेंस येतो असाओ काकवी इ॰ पदार्थ तो.

**फेंसणें**, घृतादिपदार्थ हलका व्हावयाकरितां परात इ॰ कांचाठाई घालून हस्तादिकाने मर्दून घोटणें.

**फेसणे**, वा॰ भोंपळा इ॰ फळ अनेकफांकी होतअसा कापणें.

**फेंसळणें**, तक्रादिकाने कांहीं कारणे करून फेंसानें युक्त होणें.

**फेंसाटी**, स्त्री॰ फांस हितीयार्थी.

**फेलाव**, पु॰ मनुष्य, वृक्ष, श्लोक, इ॰ कोणेकअर्थाची पुत्र, पौत्र, शाखा, पल्लव, विवरण, टीका, इ॰ स्वस्वविस्तारद्वारा पसरून जीस्थिति तो; सावकारी, इ॰ जो व्यवहार तोही त्यात्यापुरुषाचा विस्तार असें मानून या सावकाराचा फैलाव यादेशांत पुष्कळ आहे इ॰ प्र॰ होतात.

**फैलावणी**, स्त्री॰ फैलावण्याचा जो व्यापार ती.

**फैलावणें**, सावकारी इ॰ कोणेकअर्थ फैलाव विशिष्टकरणें.

**फैसल**, स्त्री॰पु॰ विवादविषय अर्थाचाओ एकरूपनिर्णय जेणेकरून त्या वादाची समाप्तिहोती तो; २, ऋण किं॰ कोणेकपदार्थ इ॰ कांचा फिटणें खरचणें इ॰ केंकरून ओ फडशा ती तो.

**फैसलनामा**, पु॰ वादाची फैसल झाली असतां तद्विषयींचा आणें वाद जिंकला त्यास सर्कारांतून जो लेख करून देतात तो.

**फैसला**, पु॰ हिं॰ फैसल.

**फोक**, पु॰ मध्यें वांकडें तिकडें न होतां मध्यें शाखा नफुटतां नीट सरळ गेलें असतें जें वृक्षादिकाचें ओलें शाखा कांड तो.

**फोंकणें, फोकणें**, कों॰ विरळविरळ पडे असें धान्यबीआदिक हस्तादिकाने उडवून पेरणें; बातमी इ॰ फोकणे ल॰ सर्वत्र प्रसिद्ध होई असें करणें.

**फोकलण**, स्त्री॰ कों॰ ढेंढळ.

**फोकलणें**, रा॰ कोणेकास फोकानें मारणें; २, कों॰ ढेंटळणें.

**फोकाटी**, स्त्री॰ लहान जो फोक ती.

**फोकी**, स्त्री॰ गलबताच्या नाळीवर जें त्रिकोण लहानसें शीड लाविलअसतात ती.

**फोंड**, पु॰रा॰ पाट इ॰ संबंधी पाणी शिंपणें इत्यार्थ सांचावें एतदर्थ जीखळी केली असते तो.

**फोड**, पु॰ शरीरावर भाजल्यामुळें किं॰ खरूज इ॰ रोगामुळें जो बुडबुडासारिखा आकार उठतो तो; २ भाजलेला पापड, जिलबी, उंबर, इ॰ कांचें पान, इ॰ कांवर जे तसे आकार असतात यांस ल॰; ३, स्त्री॰ न॰ अम्रादिफल किं॰ सूरणादिकंद यांचे भाजी इ॰ करायासाठीं केलेले जे लहान लहान तुकडे ते प्र॰; ४, रा॰ मोठें लांकूड तोडून त्याचे पाडितात जे करांडे ते प्र॰; ५, स्त्री॰ मुग्धपणें स्थितजी कोणेकगोष्टतीचाओ परिस्फोट ती; ६, ऐकमत्यानें किं॰ समुदितपणें राहिलेले जे कोणेकअर्थ त्यांचीजीपरस्परें एकमेकाशीं भिन्नता ती; उ॰ हेच्यवयेपोर एकेजागीं बसलेअसतां कज्जाकरतील याजकरितां त्यांची

फोडकरा.

**फोडणी**, स्त्री॰ तेल किं॰ तूप तप्त करून त्यांत मोहऱ्या, हिंग, इ॰ घालून भाजी, सांभारें, इ॰ कांस मिष्ट वास लागावा म्हणून जें तें संस्कारक द्रव्य सिद्ध करितात तें; फोडणीस टाकणें म्ह॰ अग्नीवर भांड्यांत फोडणी सिद्ध करून त्यांत भाजी, इ॰ पदार्थ टाकणें; २, भोजनोत्तर मुखास सुगंध यावयाकरितां खातात जो विडा त्यास किं॰ विड्यास सुगंध लागावा म्हणून त्यांत घालितात जें लवंग, वेलदोडा, पत्री, इ॰ सुगंधिद्रव्य त्यास म्ह॰.

**फोडणें**, फुटे असा करणें.

**फोंडवळी**, स्त्री॰ रा॰ डोकीचे केंसाचे समातीस मानेचा मध्यभागीं जी लहानशी खळी असते ती.

**फोडशी**, स्त्री॰ रा॰ एक वन्य पालेभाजी आहे.

**फोंडळणें**, रा॰ पोंदळणें.

**फोडी**, स्त्री॰ देवीचा जो फोड ती.

**फोडींव**, ३ लिं॰ जाळायाकरितां उभें फोडलेलें जें लांकूड तो.

**फोदलणें**, **फोदालणें**, संवाडणें.

**फोदलपट्टी**, **फोदालपट्टी**, स्त्री॰ संवाडपट्टी.

**फोपशा**, **फोपसा**, ३ लिं॰ तादृश घटमूट नव्हे असें मेदोवृद्धीनें स्थूल झालेलें शिथिल जें शरीर तो आणि तद्विशिष्ट मनुष्यादि तो.

**फोपीस**, न॰ फुप्फुस.

**फोंपेटी**, स्त्री॰ कों॰ फोंफेटी.

**फोंपेटें**, न॰ को॰ फोंफेटें.

**फोपेणें**, रा॰ विंचवा, शेराचा चीक, इ॰ लागून विडल्यामुळें किं॰ पित्तक्षोभादि कारणानें वरील त्वचा फुगून वरयाची अशी जी विकृति होत्ये तद्विशिष्ट शरीर

शरी

शरीरावयव याणीं होणें.

**फोंफावणें**, सर्पादिकानीं फुंपणें.

**फोंफेटी**, स्त्री॰ कों॰ एक वेल आहे.

**फोंफेटें**, न॰ कों॰ फोंफेटीचें फल तें.

**फोल**, न॰ ज्याचे पोटीं कणांश नाहीं असा जो भात, इ॰ धान्याचा दाणा तें; २, आंतील कणांश वेगळा निघाला असतां जें धान्याचें नुसतें टरफल रहातें तें; ३, असावा तो तत्त्वांश ज्यांत नाहीं असें जें भाषण, व्यवहार, इ॰ त्यास म्ह॰; ४, स्त्री॰ गा॰ कागदाचें जें एक पान ती.

**फोलकट**, न॰ ज्यामध्यें कणांश स्वल्प आहे असें जें धान्य तें.

**फोलणें**, आंतील कणांश न दुखवतां बाहेर निघे असा भात, इ॰ कांचा दाणा, नख, दांत, चोंच, इ॰ कानीं सोलणें; कोणे कानें राज्यादि कांहीं एक फोलून फोलून खाणें म्ह॰ ज्याचें हरण करतो त्यास किं॰ इतरास हा हरण करतो असें न समजूं देतां युक्तिप्रयुक्तीनें निघेल तितका तत्त्वांश काढून घेणें किं॰ तादृश युक्तीनीं सर्व तत्त्वांश काढून घेउन तो राज्यादि अर्थ निस्तत्व करणें.

**फौज**, स्त्री॰ हिं॰ सैन्य.

**फौजदार**, पु॰ हिं॰ चोरी, शिंदळकी, कज्जा, मारामार, इ॰ कांचे चौकशी, इ॰ कामावर जो सर्कारांतून अधिकारी ठेविला असतो तो; २, महान.

**फौजदारी**, स्त्री॰ फौजदाराचा जो अधिकार ती.

**फौजफांटा**, पु॰ फौज, तोफखाना, इ॰ जें खटलें तो.

**फौजबंद**, ३ लिं॰ सेनाबल ज्यापाशीं यथास्थित आहे असा जो राजा, सर्दार, इ॰ कोणी तो.

ब, स्त्री॰ मुलें आपले आईस म्ह॰

बईल, पु॰ बैल.

बक, पु॰ एक पक्षी आहे; २, केवल अल्प वयस्क जें पिलूं तें; ३, स्त्री॰ आला लेख पत्रादि प्रमाण नाहीं अतएव सत्य मानितां येत नाहीं असें जें प्रतिज्ञादिविषयक तोंडचें भाषण ती; ३॰ म्ह॰ हजार बका आणि एक लिखा.

बकई, स्त्री॰ एक चाकूंन भेद आहे ज्याचा आकार बस्लयासारखा असतो ती.

बकटभेरू, ३लिं॰ दे॰ खुळचोट.

बकटमोडीचा, ३लिं॰ एक शिवी आहे.

बकटें, न॰ प्रसंगविशेषीं शिश्नास म्ह॰

बकणी, स्त्री॰ बकबक; २, पिष्टादिकांची जी फकी ती.

बकणें, अहंकारादिकानें आंत कांहीं अभिप्राय दिसायाजोगें मनस्वी बोलणें.

बकध्यान, न॰ बकाची मत्स्य धरण्याविषयीं जी ध्यानस्थ बसल्यासारखी स्थिति तें; २, ला॰ कांहीं एक कार्यसिध्यर्थ लोभादि पोटांत ठेवून बाह्यात्कारीं शांतपणें जी स्थिति कोणी धरितो तें.

बकध्यानी, ३लिं॰ बकध्यान धरून बसतो जो मनुष्य तो.

बकबक, स्त्री॰ मनस्वी बकण्याचा जो व्यापार ती.

बकमार, स्त्री॰ हिं॰ बंदूकींत एक जाति आहे.

बकरकुदाई, स्त्री॰ हिं॰ बकऱ्यास जसें बुकलून बुकलून मारितात तसें कज्या, इ॰ प्रसंगीं एका दुर्बळास अनेकांनीं मारण्याचा जो व्यापार ती.

बकरा, पु॰ हिं॰ एक ग्राम्य पशु आहे.

बकरी, स्त्री॰ हिं॰ बकऱ्याचे जातीची स्त्री ती.

बकरूं, न॰ बकऱ्याचें पोर तें; २, बकरें.

बकरें, न॰ बकऱ्याची जी साधारण जाति तदात्मक तें.

बंकवरी, स्त्री॰ रा॰ एक तृणधान्य आहे.

बकवा, पु॰ स्त्री॰ हिं॰ बकबक.

बकवाद, पु॰ हिं॰ बकबक.

बकाण, बकाणा, पु॰ निंबाचा जातींत भेद आहे.

बकाबक, अ॰ कोणेकास बुक्यांनीं मारणें, पोहे, इ॰ मुठीनीं घेऊन भराभर खाणें, भराभर सशब्द ओकणें, इ॰ कांचें वि॰

बकाल, पु॰ بقال फा॰ धान्य, कापड, किराणा, इ॰ कांचा व्यापार करणार जो उदमी तो; २, न॰ बकाल लोकांचा जो समुदाय तें.

बकाली, स्त्री॰ بقالے बकालाचें जें क्रयविक्रयात्मक व्यापाररूप कर्म ती; २, ३लिं॰ बकाल संबंधी जी रीति, जागा, इ॰ ती.

बकाळी, स्त्री॰ एक वन्यझाड आहे.

बकी, स्त्री॰ एक फुलझाड आहे.

बकुल, पु॰ एक पुष्पवृक्ष आहे; २, न॰ त्याचें जें फूल तें.

बकूळ, स्त्री॰ बकुल प्रथमार्थी; २, न॰ बकुळाचें जें पुष्प तें आणि फल तें.

बक्कर, न॰ हिं॰ चिलखत.

बक्कवार, ३लिं॰ बखतधार.

बक्कवारी, स्त्री॰ बखतवारी.

बकुशीगहूं, पु॰ गव्हांत एक जाति आहे.

बखतवार, ३लिं॰ हिं॰ ताले़वार.

बखतवारी, स्त्री॰ हिं॰ ताले़वारी.

**बरखंदणें**, रा॰ बरखांदणें.

**बरखंदी**, स्त्री॰ रा॰ बरखांदी.

**बरखर**, स्त्री॰हिं॰ प्राकृत भाषेनें राजादिकांचें गद्यरूप चरित लिहिलेंअसतें ती; २, ग्रामादिकांत कज्जा, चोरी, इ॰ झालेंअसतां तें सर्कारांत कळवायासाठीं ग्रामाधिकारी लिहून पाठवितोजें वर्तमान ती.

**बरखल**, न॰ केवळ फुटलेलें किं॰ ठेंचलेलें असें धातुमयजें भांडें त्यासह्म॰

**बरखलणें**, वा॰ मनुष्यादिकांस कुमलणें.

**बरखळ**, स्त्री॰ गावांतली गृहादिरूपजी वंदिस्त तिणें रुधलेली नव्हे अशी रिकामीजी जागा ती; उ॰ आमचे घराजवळ बरखळ मोठी आहे तींत तुह्मी घर बांधा; २, मनुष्यादि वसतीनें शून्य गृहादिसंबंधीजें विस्तीर्ण स्थल त्यासआरोपानें ह्म॰

**बरखा**, स्त्री॰ केचा द्वितीयार्थी.

**बरखांदणें**, रा॰ बाहुमूलानें दुसऱ्यास धक्का मारणें.

**बरखांदी**, स्त्री॰रा॰ बाहुमूलानें मारितातजो धक्का ती.

**बरखेडखोर**, ३लिं॰ बरखेडा करण्याचा स्वभावजाचा तो.

**बरखेडा**, पु॰ स्वस्वप्तीनें चालणाऱ्या व्यवहारास अडचण करणारेंजें कांहींएक खटलें तो आणि तेणेंकरून त्याव्यवहारांत होतोजो व्याक्षेप तो किं॰ त्याव्यवहाराची होत्येजी दुर्दशा तो.

**बरख़्शी**, पु॰ بخشی फौजेवरजो एक मुख्य अधिकारी असतो तो.

**बरख़्शीगिरी**, स्त्री॰हिं॰ बरखशीचाजो अधिकार ती.

**बरख़्शीस**, न॰हिं॰ कोणएकाचे शौर्यादिगुण पाहून राजा, इ॰ संतोषयुक्त होऊन त्यासजें इत्यादि देतात तें; २, ३लिं॰ माफ.

**बगड**, स्त्री॰ तांदळाची करड ती.

**बगणें**, पाहणें.

**बगर**, अ॰ वांचून; उ॰ मी रुपये घेतल्याबगरजाणार नाहीं; बगरहुकूम, बगर परवानगी, इ॰ स॰

**बगल**, स्त्री॰ काख.

**बगलबंद**, पु॰हिं॰ आंगरखा, इ॰कांसजो बगलेच्या सुमारें बंद लावितात तो.

**बंगला**, पु॰ हिं॰ क्रीडा, बैठक, इ॰कांसाठीं भूमीवर किं॰ दरवाजा, इ॰कांवर मजला देऊन तेथें गृहासारखी वंदिस्त करून करतात जें रम्य स्थल तो.

**बगलांट, बगलांठ**, न॰ रा॰ कुभांड.

**बगलांटी, बगलांठी**, ३लिं॰ रा॰ बगलांट करण्याचा स्वभावजाचा तो.

**बगली**, स्त्री॰ पायांचे घासण्यानें उंटास एक रोग होत असतो ती.

**बगल्या**, पु॰ जो जाचा चाकर नसतां हाताखालीं सर्वदा वागणारा तो त्याचा; २, कोणेक अधिकारांवर सर्कार, इ॰ कांतून मुख्यत्वें करूनजो नेमला असतो त्याचे हातांखालीजो दुसरा दिलेला तो त्याचा.

**बगल्याचोर**, पु॰ प्रतिष्ठेनें वागून प्रसंग पाहून

हळूच बगलेस वस्तु मारून चोरणारा तो.

**बगळा**, पु० बकप्रथमार्थी.

**बगाड**, न० देवापुढें मनुष्यास नवसाचे गळ टो-
चायासाठीं एक यंत्र करून ठेवितात तें.

**बगारणी**, स्त्री० फोडणी.

**बंगाला**, पु० एक देश आहे.

**बंगाली**, ३लिं० बंगालदेशसंबंधी जो जिन्नस.
भाषा, मनुष्य, इ० तो.

**बंगी**, स्त्री० हिं० फळें, फुलें, इ० जिन्नस वहावया
करितां दोहोंकडे शिंकीं लावूनजी कावड करि-
तात ती.

**बगीचा**, पु० باغچہ लहान जो बाग तो.

**बगुणी**, स्त्री० लहान जें बगुणें ती.

**बगुणें**, न० विस्तीर्ण तोंडाचें कढी, सांभारें, इ०
करण्याचें उपयोगी ताम्रादिधातूचें पात्र अस-
तें तें.

**बगोटी**, स्त्री० कों० नरडें.

**बगोटें**, स्त्री० कों० नरडें.

**बघणें**, पाहणें.

**बचक**, स्त्री० पिष्टादिपदार्थ राशींतून काढून
घ्यावयासाठीं केलाजो कमलाकार हस्त ती; ब-
चकेंत पाणी धरणें म्ह० एखादे दुःसाध्य गो-
ष्टीविषयीं व्यर्थ प्रयास करणें.

**बचकण**, स्त्री० रा० बचक.

**बचकणा**, ३लिं० कों० लहान मुलांचा उपयोगी
लहान जें वस्त्र तो.

**बचकणी**, ३लिं० बचकणा; २, स्त्री० मुरब्बस सं-
प्रदायापेक्षां लांबी. रुंदीस कमी जो धोतजोडा,
प्रा०

प्रा० लहान मुलांस नेसावयाचा उपयोगी ती;
३ मद्यानें भरलेला जो शिसा ती.

**बचकन**, **बचकर**, **बचदिशीं**, अ० बच असा
शब्द होई असें चिखल, इ० कांत पाय भरणें,
इ० कांचे वि०

**बचका**, पु० रा० बचक.

**बचडा**, पु० हिं० लहान जें मनुष्य, पशु, पक्षी,
इ० कांचें पुमपत्य तो.

**बचडी**, स्त्री० मनुष्यादिकांचें लहान जें स्त्र्यपत्य
ती.

**बचडें**, न० हिं० मनुष्यपश्वादिकांचें लहान जें
अपत्य तें.

**बचनाग**, पु० एक सविष कंद आहे जो संस्कारें
करून औषधोपयोगी होतो तो; २, त्याचें जें
झाड तो.

**बचबच**, स्त्री० कोणएक कार्याची व त्या कार्य
कर्त्याची जी दवदव होत्ये ती.

**बचाव**, पु० हिं० उपद्रवकारक जें कांहीं एक त्या-
पासून तो उपद्रव न बाधतां कोणेकाचे योगा-
नें सुरक्षितपणें होत्येजी स्थिति तो.

**बचावणें**, उ० कोणएकास बचावानें विशिष्ट क-
रणें.

**बचेरी**, स्त्री० उपहास्यता.

**बच्चा**, पु० हिं० बचडें; २, कवड्या, पैसे, इ० ख-
ळी, इ० करून खेळतात त्या प्रकरणीं प्रसिद्ध
एक अर्थ आहे तो; ३, गाड्याचे चाकाचें भोंक
मोठें झालें असतां त्यांत ठोकळा मारितात तो;
४, अंगरखा, इ० कांचे कळीस तुपूर आली
असतां

असतां त्याफळीस लावितातजो बजूस लहान-
सा जोड तो.

**बच्छान**, स्त्री॰ छानेचाजो विघडलेपणा ती.

**बच्छडा**, पु॰ बचडा.

**बच्छडी**, स्त्री॰ बचडी.

**बच्छडें**, न॰ बचडें.

**बजरबट्टू**, पु॰ एक वृक्ष आहे; २, त्याचें बी तो.

**बजां**, अ॰ बजाहां.

**बजाग**, स्त्री॰ कजाकजी स्त्री तिला म्ह॰

**बजाज**, पु॰ कापडाचा क्रयविक्रय व्यापार कर-
णाराजो शिंपी, इ॰ तो.

**बजाजी**, स्त्री॰ बजाजाचें कर्म ती.

**बजावणें**, तटकारणें; २, कांहीं एक दुर्घट काम
अंगावर घेऊन सिद्धीस नेणें.

**बजाहां**, अ॰ वैभवादिकृनसाधर्म्यांस्तव किं॰
सेवकादिकांचेठायीं मानिलेलेंजें स्वप्रतिनि-
धित्व त्यास्तव आरोपानें तद्रूप मानिलेला अ-
सानव्हे केवळ स्वत: तोच असा अर्थ जेव्हां वि-
वक्षित आहे तेव्हां या उक्तप्रकाराचें द्योतनार्थ
याचा प्र॰; कदाचित् वस्तुत: तादृश आरोप
असतांही आरोप मानायाजोगा भेद दिसत ना-
हीं अशी विवक्षा असतांही प्र॰; उ॰ सर्दारांचे
हातून काम रेटना तेव्हां बजाहां महाराज गेले
तथापि एक वर्ष लागलें; शिंदे ह्मणजे बजाहां
पेशवे होते.

**बजिन्नस**, अ॰ प्रा॰ प्रत्यक्ष या अर्थी सांगणें.
बोलणें, जाणें, पाहणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ ब-
जिन्नस मी पाहिलें आणि तूं नेलें नाहीं ह्मणता-
स.

**बज्रंगबली**, पु॰ हनुमंतास म्ह॰

**बट**, पु॰ स्वभावानें ठेंगणा, पुष्ट. आणि चालीस
चांगला जो घोडा तो; २, कों॰ खेळायाचे गो-
ट्यांतील जो टपलो; ३, न॰ लोखंडांत एक
जाति आहे; ४, स्त्री॰ अंबाडी, ताग, इ॰ कां-
चे रहावीस, शें पंनास, इ॰ तंतु एकत्र संबद्ध
होऊन झाला असतोजो समुदाय ती; ५, कें-
सांचीजीजटा तीस म्ह॰

**बटकुली**, स्त्री॰ निंदेनें बटकीस म्ह॰

**बटकरूं**, न॰ रा॰ बटकूर.

**बटकुन्या**, ३ लिं॰ बटक्या.

**बटकूर**, न॰ बटकुली.

**बटक्या**, ३ लिं॰ बटकीशीं रत असतो तो.

**बटछपाई**, स्त्री॰ सर्कारांतून न्यूनाधिक मापां-
ची चोकशी करून खरें मापांवर छाप मार-
ण्याचा व्यापार करितात ती; २, जाचे मापा-
वर छाप मारिला त्याबद्दल त्यापासून द्रव्य
घेतात ती.

**बटणावळ**, स्त्री॰ चालीचे नाण्यांपक्षां कमी-
जें नाणें तें वटाविलें असतां वरजो वट्टा द्यावा
लागतो ती.

**बटमोगर**, न॰ कों॰ बटमोगऱ्याचें फुल; २,
स्त्री॰ बटमोगरा.

**बटमोगरा**, पु॰ एक लहान फुलझाड आहे.

**बटमोगरी**, स्त्री॰ बटमोगरा.

**बटमोगरें**, न॰ बटमोगरीचें फूल तें.

**बटवा**, पु॰ जास पांच चार पुडें असतात आणि

झांक

झांकदार, उघडदार, लाविला असतां अशी एक पिशवी आहे.

**बटवी**, स्त्री० लहानजो बटवा ती.

**बटाई**, स्त्री० बटणावळ; २, शेताच्या भूमीचे धन्यास द्यावयाचा पेन जिनशीजो सारा ती.

**बटाऊ**, ३लिं० बटाव.

**बटाटा**, पु० बटाटें.

**बटाटें**, न० एक वर्तुल कंद आहे.

**बटाव**, ३लिं० हरामी, सोदा, तो.

**बटावणें**, आपले जवळचें नाणें विकून बाजार भावाप्रमाणें सजातीय विवक्षित नाणें घेणें.

**बटीक**, स्त्री० कुणबीण; २, मूळची गरत असून व्यभिचारीं प्रवृत्त होऊन त्याजवरच उपजीविका करत्ये अशीजी स्त्री ती आणि त्याच मार्गे वर्तूं लागली जी तिची कन्या तीही.

**बटु**, पु० मुलाची मुंज झाल्यापासून त्यास तारुण्य प्राप्त होईपर्यंत तो.

**बटुभोजन**, न० सं० मुंजीचे दिवशीं बटूंस भोजन देतात तें.

**बटुवस्त्र**, न० मुंजीमध्यें जें बटूस वस्त्र नेसावयास देतात तें.

**बटुवामन**, पु० बटूसच म्ह०

**बट्टा**, पु० हिं० विवक्षित नाण्यास सजातीय नाण्यापेक्षां मूल्यकृत जी हीनता असत्ये ती किंवा तें नाणें देऊन सजातीय दुसरें नाणें घ्यावयाचें असतां समसंख्याक देऊन मूल्यकृत समता व्हावयास वरजो द्रव्यांश द्यावा लागतो तो; २, त्या सजातीय नाण्यास मूल्यकृतजें आधिक्य त्यास, आणि तें विकलें असतां येतो जो वरताळा त्यासही म्ह०; ३, ला० लोकांनीं नाव ठेवण्यास कारणीभूत जो दोष तो; उ० असें लिहिलें म्हणून कांहीं बट्टा नाहीं; या पोरानें दुष्कर्म करून कुळास बट्टा लाविला; ४, माणीक. मोतीं, इ० रत्नें बांधायाचें जें लहानसें फडकें असतें तो.

**बट्टावणें**, रा० बटावणें.

**बट्टेखोर**, ३लिं० बट्टा आहे ज्यास असें जें कुल किं० नाणें, इ० तो.

**बट्ठु**, ३लिं० अत्यंत जड, मंद, आळशी, असा जो मनुष्यादि त्यास म्ह०

**बंड**, न० राजाज्ञा नसतां सैन्यादि जमवून एकानें धनी व्हावें, एकानें कारभारी, इ० व्हावें आणि प्रजांपासून खंडणी घ्यावी, मुलूख मारावा, असें कांहीं उत्पन्न होतें जें प्रकरण तें; २, तोतया; ३, साधुता, तपस्विता, इ० गुण अंगीं नसतां लोकवंचनार्थ त्यांचें कोणी धरितो जें सोंग तें.

**बडका**, पु० कफाचाजो दाट गोळा तो.

**बडखुळा**, पु० ग्रा० कोणेक कार्याचे ठायीं प्राधान्यें करून जो कर्मकर्ता त्याचे हाताखालीं दुसरा कोणी असावा म्हणून उगीच निमित्तास जो कोणी सहाय असतो तो.

**बंडखोर**, ३लिं० बंड करण्याचा स्वभाव ज्याचा तो

**बडगा**, पु० सोटा मुख्यार्थी; मारण्याचे प्रसंगींच प्र०; उ० त्याणें दूध पाहिलें परंतु बडगा पाहिला नाहीं; बडगा दाखविणें म्ह० स्वकार्य साधून

पूर्व हुसन्यास ठकविणें, तेथें काय वडगा आहे, इ० स्थलीं तेथें कांहीं नाहीं

**बडबड**, स्त्री० प्रयोजनशून्य जें बहुत भाषण तीं; २, असंगत निर्मूल, अशक्य, इ० दोष विशिष्ट जें भाषण, ग्रंथ, इ० ती.

**बडबडणें**, बडबड करणें.

**बडबडीन**, ३लिं० वा० पीठ अधिक झाल्यामुळें स्वादरहित जो कढी-साभारें, पातळभाजी, इ० पदार्थ तो.

**बडबड्या**, ३लिं० बडबड करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बडम**, न० पांच चार भाजा एकत्र शिजवून करितात जी एक पातळ भाजी तें.

**बडवणें**, काठी, सोटा, घण, इ० कांनीं कांहीं एक पदार्थ ठोकणें, किं० वस्त्र, इ० पाषाणादिकांवर उचलून आपटणें; २, बैल, टोणगा, इ० कांचें आंड ठेचणें किं० त्यांस तत्संस्कार विशिष्ट करणें; ३, न० बडविण्याचें साधन टोणपा, इ० तें; उ० मुडा हातानें किती ठोकशील कांहीं बडवणें घे.

**बंडवाला**, पु० बंड प्रथमार्थीत मिळालेला जो तो.

**बडा**, ३लिं० हिं० मोठा जो तो; म्ह० बडाघर पोकळ वांसा; याची प्रसिद्धि क्वचित्.

**बंडा**, पु० एका जातीचें अळू आहे त्याचा जो कांदा तो.

**बंडाळी**, स्त्री० ऐकमत्याभाव किं० द्रव्याभाव, इत्यादि अनेक निमित्तानीं जी अव्यवस्था ती; उ० त्याचे घरीं जेवणाची बंडाळी असत्ये.

**बडिवार**, पु० अतिशयोक्ति, इ० रीतीनें वर्णन विषय

षय जो कोणएकाचा मोठपणा तो परंतु तत्कथन प्रसंगीं त्या मोठपणाची निंदा असतां त्या विषयीं लोक प्रयोग करितात; उ० याची बायको सारा दिवस माहेरचा बडिवार सांगत असत्ये.

**बडी**, स्त्री० रा० फुलें, फळें, इ० उंच पदार्थ खालीं पाडावयाची जी आंकडी ती.

**बंडी**, स्त्री० कमरेपर्यंत जो आंगरखा ती.

**बडीव**, ३लिं० सूत भरावें म्हणून बडवून साफ केलेलें जें जोठ, इ० वस्त्र तो.

**बडीशेप, बडीशोप**, स्त्री० एक औषधी धान्यविशेष आहे.

**बडेजाव**, स्त्री० कोणएकाचा संपत्तिमूलक जो उत्कर्ष त्यास म्ह०; उ० त्या गृहस्थाची शिपायांचे लष्करांत बडेजाव झाली; २, राजादिकांपुढें चोबदारानीं म्हणावयाचा शब्द आहे.

**बंड्या**, पु० व्यवहारांत चतुर, धीट, तथैव लबाड इत्यादि उठावें अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**बढई**, पु० हिं० सुतार काम करणारी अशी एक जाति आहे.

**बढती**, स्त्री० हिं० संपत्ति, प्रतिष्ठा, यांची जी चढती कळा ती.

**बढाइकी**, स्त्री० बढाई.

**बढाई**, स्त्री० फा० फुशारकी.

**बढाईखोर**, ३लिं० फुशारखोर.

**बढायखोर**, ३लिं० बढाईखोर.

**बढेल**, न० बंड, इ० तळून अवशिष्ट राहिलेलें जें तेल तें.

**बढ्या**, पु० कों० एरंड, इ० कांचें जें दांडकें तो.

बणगी

**बणगी**, स्त्री० सजगुऱ्याची जी लुंगी ती.

**बनका**, पु० बदका.

**बनखल**, न०१लिं० बदखल.

**बतणें**, गोट्यांचे खेळांत एका गोटीपासून दुसऱ्या गोटीनें अमुकप्रदेशीं रहावें अशीजे मर्यादा ती रूढून ती गोटी जवळ आली असतां खेळण्याचा अनुपयोगी होन्हे अशा दशेनें तिणें युक्त होणें; गोट्यांचें बतणें, प्रा० वीत, पाऊल, चौंगा, इतक्याचें अंतरानें होतें.

**बता**, पु० रा० बत्ता.

**बताडा**, ३लिं० सामान्यरीतीपेक्षां आकारपरिमाण ज्याचें मोठें असा जो गृह, पात्र, फल, इ० पदार्थ तो.

**बताना**, पु० गुजराथी, इ० लोक पागोट्याचे आंतजें दुसरें लहानसहान पागोटें घालतात ज्याचे योगानें विशिष्ट पागोट्याचा आकार मोठा दिसतो तो.

**बतावणी**, स्त्री० ज्याचें सोंग आणिलें त्याच्या वर्तनाचें अनुकरणद्वाराजें प्रदर्शन तो सोंगाडी करितो ती; २, अल्प किं० नीरस जी काहीं गोष्ट ती श्रोत्यास नीट दिसे अशी बनावून सांगण्याचा जो प्रकार ती; ३, देणें, येणें, याची अटकळ पडावयाकरितां कीर्दीवरून खतावणीचे पूर्वी कच्ची खतावणी करीत असतात ती.

**बतासफेणी**, स्त्री० मिठाई आहे.

**बतासा**, पु० बत्तासा.

**बतेल्हा**, पु० गलबतांत एक भेद आहे.

**बत्ता**, पु० खलांत औषधादिक घालून कुटायासाठीं दगड, लोह, इ०कांचा दंडाकार पदार्थ केला असतो तो; २, गोटी बतली किं० नाहीं हें पाहायासाठीं दोन गोट्या किं० एक गोटी आणि कोंड्याचामध्यें पाऊल, वीत, चौंगा, घालितात तो.

**बत्तासा**, पु० साखरेचा एक पदार्थ आहे.

**बत्तिशी**, स्त्री० बत्तीस पदार्थांचाजो समुदाय तो; २, भाषणसाधनभूतजो बत्तीसदंतानीं उपलक्षित मुखविभाग त्यास म्ह०; याचा प्रयोग वाईट बरें बोलिला असतां प्रारब्धदशेनें खरें होतें तेथेंच; उ० तो बोलला होता कीं तुमचें कार्य होईल त्याप्रमाणें कार्य झालें तस्मात् त्याची बत्तिशी चांगली आहे; त्याची बत्तिशी वाईट आहे; बत्तिशी वठणें म्ह० कांहींएक बोलला जें अक्षरशः तदनुरूप होणें; ३, बत्तीस वर्षांचें जें वय ती; उ० आम्ही बत्तिशीमध्यें होतों त्यावेळेस पांचमणाचें ओझें उचलीत होतों; ४, बत्तीसहात लांब एक वस्त्र आहे.

**बत्तिशीमसाल्हा**, पु० बत्तीस औषधें एकत्रकरून घोड्यास चारायाचा एक मसाला आहे तो.

**बत्तिसा**, पु० बत्तिशीमसाला; २, बाळंतीण, इ०कांस खावयाचा जो बत्तीस औषधांचा समुदाय प्रसिद्ध आहे तो.

**बत्ती**, स्त्री० हिं० दारूचे बाण, फटाके, इ०कांस पेटवायाकरितां दारूंत घोळलेलें सूत, इ० जें संबद्ध करितात ती; २, दिवा, इ०कांचे वातीसही कदाचित् म्ह०; बत्ती लावणें म्ह० गृहादिकांस आग लावणें किं० कज्जा लावणें; ३, एक पागोटें उभें चिरून जीं अरुंद दोन पागोटीं करितात

लती प्र० किं० तिनक्या रुदीचेंच विणलें असतें जें पागोटें तें.

**बत्तीस**, ३लिं० संख्या आहे ३२; बत्तीस हालवीन, पाडीन, इ० स्थलीं विशेष्य संनिधानावांचूनही दांतांचा बोध होतो.

**बत्तीसलक्षणी**, ३लिं० शास्त्रामध्यें स्त्रिया, पुरुष, यांचीं उत्तम लक्षणें बत्तीस लिहिलीं आहेत तद्युक्त जो तो.

**बत्त्या**, पु० कों० बत्ता.

**बद**, पु० आडसंधीस गर्मीमुळें एक निर्मुख गळवासारखें उठाणू होतें तो.

**बंद**, पु० कांहींएक पदार्थ बांधावयासाठीं साधनभूत जो दोरी, इ० कांचा तुकडा तो; २, तेणेंकरून बांधिलें असतां पदार्थाभोंवता होतो जो रचनाविशेष तो; ३, अंगरखा, पालखीचा पडदा, इ० कांस लाविला असतो जो कसा तो; ४, ला० कोणएक गोष्टीविषयीं अमुकानें अमुकरीतीनें अमुककालीं अमुक करावें, या बाहेर वर्तूं नये असा शास्त्र, राजा, लोक, इ० कानीं केला असतो जो नियम तो; उ० ब्राह्मणानें प्रातःस्नान केल्यावांचून कांहीं करूं नये असा शास्त्रांत बंदकरून ठेविला आहे; ५, कारागृहादिकांचाठायीं जी प्रतिबद्धता तो; ६, दोन वर्खांचा जो कागदाचा तुकडा तो; ७, ३लिं० वि० गति कुंठित होऊन प्रतिबंध झाला जो मार्ग, व्यवहार, उदक, भाषण, इ० तो; कर, हो, अस, इ० धातूंचे योगीं प्र०

**बदअंमल**, पु० व्यभिचारादिक जें दुष्कर्म तो.

**बदक**, न० एक पक्षी आहे.



**बदकण, बदकन, बदकर, बददिन, बददिशीं**, अ० अनु० चिखल, इ० मृदुस्थलावर मनुष्यादिकानें पडणें, इ० कांचें किं० लोणी, शेण, इ० कांचा गोळा, पक्क अंबा, इ० मृदु पदार्थांचें पडणें, मारणें, इ० कांचें वि०

**बदकर्म**, न० बदअंमल.

**बदका**, पु० शरीरादिकांवर बुक्कीनें प्रहार तो; २, भिंत्यादिकांवर टाकणें, मारणें, इत्याद्यर्थ घेतला किं० घेण्यासाठीं उद्दिष्ट जो बचकभर चिखल, शेण, लोणी, इ० कांचा गोळा तो.

**बदखल**, न० चहूंकडे टेंप असून मध्यें खोलवट जें स्थल तें; हें स्थल वाचकाचें विशेषण होतें; उ० त्या बदखलांत दहा घरें आहेत; ती जागा बदखल आहे; २, ३लिं० थवकडें जें भांडें, इ० तें.

**बदखलास**, ३लिं० हिं० कारागृहापासून सुटला जो तो.

**बंदखाना**, पु० हिं० कारागृह.

**बंदखुलास**, पु० हिं० राजादिकानें प्रतिबंधांत ठेविलेले जे चोर, पशु, पक्षी, इ० त्यांची जी सुटका तो.

**बदनकशा**, पु० हिं० कोण एकानें कीर्त्यर्थ आरंभिला जो व्यापार तो विवक्षानुरूप सिद्धीस न गेल्यामुळें होते जी बचेरी तो; उ० सभेमध्यें त्या पंडिताचा बदनकशा झाला.

**बदनक्शा**, पु० हिं० बदनकशा.

**बदनामी**, स्त्री० हिं० युद्धाचाठायीं पलायन किं० आरंभिलेलें कार्य तडीस न गेलें, इ० कारणामुळें आब जाऊन होतो जो दुर्लौकिक ती.

**बदफेल**, ३लिं० بد فعل नीतिविरुद्ध आचार करि-णारा.

**बदफेली**, स्त्री० بد فعلی बदफेलाचें जें कर्म ती.

**बदबद**, अ० अनु० घट्ट दहीं, आंबरस, पू, इ० पा-त्रादिकांतून ओतणें, शरीरादिकांतून बाहेर प-डणें, इ० कांचें वि०

**बदबदणें**, नगारा, भांडें, इ० फुटणें, इ० कार-णामुळें विस्वर नीच वाजणें; २, पिकलेलें उ-टाणूं, इ० पुयातिरेकानें विशिष्ट होणें

**बदबदीत**, ३लिं० बदबदायाजोगा जो नगारा, भांडें, इ० ती.

**बदबोय**, स्त्री० दुर्गंध;२, ला० दुर्लौकिक.

**बदमस्त**, ३लिं० بدمست पराकाष्ठेचा जो उन्मत्त तो.

**बदमस्ती**, स्त्री० بدمستی बदमस्तपणा.

**बदमामली**, स्त्री० بد معاملی दंडेली.

**बंदर**, न० हिं० ग्राम्यादिकांचा आश्रयानें समुद्रा-चे किं० खाडीचे कांठीं जीं गलबतें लागाव्याची जागा असल्ये तें; किं० तद्विशिष्ट तो गांवही तें, २, समुद्राचाजो कांठ तो; उ० मी बंदरानें आ-लों; बंदर करणें म्ह० वायु प्रातिकूल्य भोजन, इ० कांहीं कारणामुळें गलबत अविवक्षित बं-दरीं लावणें; ३, ३लिं० दुसऱ्यास ठकल्या जाया-चा नाहीं सर्व लौकिकीं व्यवहारांत दक्ष असा-जो मनुष्य तो; वारा बंदरचें पाणी प्यालेला म्ह० अनेक देश फिरल्यामुळें चतुर झालेला बंदर वाहणें, इ० स्थलीं जलमार्ग वाहणें.

**बंदरकांठ, बंदरकांठा**, पु० समुद्रतीर.

**बंदरकिनारा**, पु० बंदरकांठ.

**बदरंग**, पु० बेरंग.

**बंदरवाट**, स्त्री० बंदरकाठानें जी वाट ती.

**बंदरसई, बंदरसही**, ३लिं० जलमार्गेकरून किं० खुशकीनें बंदरांत दाखल झाला तो पदा-र्थ.

**बंदरी**, ३लिं० देशांतराहून जलमार्गानें आलेला जो खोबरें, सुपारी, तूप, छीट, इ० जिन्नस तो; २, वा० बंदरजो मनुष्य तो.

**बंदरीजिन्नस**, पु० मासळीचा कुट्यास संकेतानें म्ह०

**बद्रा**, पु० नौकेंत एक भेद आहे.

**बदल**, अ० हिं० कांहीं आपल्याजवळील वस्तु दु-सऱ्यास देऊन त्यापासून विक्रय व्यवहाराकांचु-न तत्प्रतिनिधित्वेंकरून कांहीं दुसरें घ्यावें अ-शा संकेतानें देणें, करणें, इ० कांचें वि०; उ० या घागोट्याबदल हा शेला देतोस तो कसा घ्या-वा; २, अवश्य द्यावयाचें, घ्यावयाचें, करावयाचें, इ० जें कांहीं तदभावीं. तत्स्थानीं, तत्प्रतिनिधि-त्वेंकरून देणें, घेणें, करणें, इ० कांचें वि०; इ० ए-कादशीचें उपोषण होईना म्हणून त्याबदल ए-क गोप्रदान केलें; ३, कांहीं एक प्रयोजक जें नि-मित्त त्यामुळें; उ० चोरी बदल दंड पडला; अध्य-यनाबदल या गावांत राहणें प्राप्त; ४, न० आप-ण आपले घरची मुलगी कोणेकाकडे द्यावी, आणि त्याचे घरची आपले घरीं करावी. असें किं० आपण दुसऱ्याकडे द्यावी, दुसऱ्यानें तिस-ऱ्याकडे द्यावी, त्या तिसऱ्यानें पुनः आपल्याक-डे द्यावी, इ० अनेकस्थान संकेतानें विवाह.

करण्याचाजो प्रकार तें; को॰ बदल॰ स्त्री (खाणें) धरलेल्या संकल्पादिकापासून बदलणें.

**बदलखातर**, अ॰ हिं॰ कोणेकाची मर्जी संतुष्ट व्हावी ह्मणून ये,जा,दे,इ॰कांचें वि॰

**बदलणें**, मुळचाजो पदार्थ तो अन्यत्र नेऊन त्या ठिकाणी विवक्षितरूपानें जो तत्सजातीय तो आणणें;२, ला॰ फिरणें तृतीयार्थी;उ॰ तो वचनास बदलला; तो राजाचा प्रधान राजावर बदलतांच त्याणें सर्व राज्य बुडविलें.

**बदलमुशारा**, पु॰ بدل مشاہرہ संस्थानसंबंधी, इ॰चाकरांस मुशाऱ्याबदल जें द्रव्य देतात तो; प्रा॰ सर्चखात्याचे लिहिण्यामध्यें याचा प्र॰ होतो.

**बदला**, अ॰ बदल प्रथम द्वितीयार्थी; २, पु॰ कोण एकास रुपये, इ॰ नाणें द्यावयाचेंअसतां पारखुन देत्येसमयीं त्यांतजो वाईट ऐवज निघतो तोजो पुनः बदलून द्यावा लागतो.

**बदलाचेंलग्न**, न॰ बदलावणानें झालेंजें लग्न तें.

**बदलाबदल**, स्त्री॰ अदलाबदल.

**बदलामी**, स्त्री॰ आपण अपराध,इ॰ मुद्दांच केला नसतां किं॰ बुध्या केला नसतां जें एखादें दुर्निमित्त प्राप्त होतें ती;उ॰ त्याणें चोरी केली नसतां त्याजवर चोरीची बदलामी आली.

**बदलावण**, न॰ रा॰ बदल चतुर्थार्थी.

**बदली**, स्त्री॰ हिं॰ अधिकारादिक जीं अनेकस्थानें आणि अधिकारी, इ॰जे अनेकस्थानीं त्यांचा यास्थानीचा त्यास्थानीं, त्यास्थानींचा तिसऱ्या स्थानीं, इ॰रूपजो स्थानभेद ती.

**बदलौकिक**, पु॰ दुष्कर्माद्याचरण मूलकजो अपकीर्ति तो.

**बदल्या**, पु॰ कांहींएक कार्य करावयाकरितां आपलेस्थानीं योजिलजो दुसरा तो;उ॰ आमचा चाकर आपला बदल्या देऊन लग्नासाठीं गेला.

**बदसूरत**, ३लिं॰ कुरूप.

**बदसूर**, ३लिं॰ हिं॰ अपसूर.

**बंदा**, पु॰ आपले दासीचाजो पुत्र तो; २, ओशाळगतीमुळें दुसऱ्याचे आज्ञेंत वागतो तो त्याचा;३, ३लिं॰ खुर्दा, रुपये, कवडया, इ॰ रूपेंकरून संडरूप झालेला नव्हे असा अखंडजो रुपया. मोहर, पैसा, इ॰ तो.

**बदाबद**, अ॰ अनु॰ वृक्षादिकावरून आंबे, फणस, इ॰ पडणें किं॰ निसडया भुईवर पाय निसरून माणसें, इ॰ पडणें किं॰ शरीरावर बुक्या मारणें, इ॰कांचें वि॰

**बदाबदी**, स्त्री॰ अनेकानीं परस्पर बुक्या, इ॰कानीं बदाबद मारण्याचाजो व्यापार ती.

**बदाम**, स्त्री॰ वृक्ष आहे;२, न॰ पु॰ तिचें फळ तें तो.

**बदामी**, ३लिं॰ एक रंग आहे;२, तद्विशिष्ट शालजोडी, इ॰ वस्त्र, इ॰ तो;३, बदामाचा आकाराचाजो डबा,ठिकला, इ॰ पदार्थ तो आणि तद्वृत्ति आकारही तो.

**बंदीखाना**, पु॰ हिं॰ बंदखाना.

**बंदीवान**, पु॰ हिं॰ राजादि प्रभूनी स्वतंत्रपणें वागण्याविषयीं प्रतिबंधकरून कारागृहादिकीं

चाठायीं ठेविला असतोजो चोर, इ० अपराधी तो

**बंदिशाळा**, स्त्री० बंदिखान.

**बंदिस्त**, स्त्री० किल्ला, वाडा, चौथरा देवळ, शेताचा बांध, इ० कांची विटा, दगड, चुना, इ० कांहीं करूनजी रचना ती; २, किल्ला, वाडा, इ०जी इमारत ती; ३, हिशेबवंद, इ०कांचे बंद अधिक उणे झालेअसतां समजावे म्हणून वरील बंदावर संख्येचा अंक घालूनजो संख्यानियम करितात ती.

**बंदिस्ती**, स्त्री० बंदिस्त प्रथमार्थी.

**बंदी**, स्त्री० कांहीएक कारणानें कांहींएक कार्यास जो प्रतिबंध ती; उ० त्याचेघरीं जावयास बंदी नाहीं; २, चालताजो व्यवहार, इ० त्याची गति कुंठित होऊनजी अवस्थिति ती; उ० एखादावेळ दक्षिणा चालली होती अतां बंदी झाली; ३, पु० सं० राजादिकांपाशींजो स्तुतिपाठक असतो तो.

**बंदीजन**, पु० बंदी तृतीयार्थी.

**बंदूक**, स्त्री० दारूच्या योगानें गोळी मारावयाचें लोखंडाची नळी हत्या एतद्विशिष्ट यंत्र आहे ती.

**बंदोबस्त**, पु० चेतनाचेतन पदार्थ किं० कोणेक व्यवहार अव्यवस्थित होऊं नये म्हणून त्यांचें कांहींएक नियामक साधनानें इष्ट व्यवस्थेंत जें स्थापन तो किं० तेणेंकरून त्याची होत्येजी तादृश व्यवस्थेंत स्थिति तो किं० अव्यवस्थित नहोतां रहावें असाजो त्या व्यवहारादिकांचा स्थितिप्रकार तो.

**बंदोबस्ती**, स्त्री० प्रा० बंदोबस्त.



**बद्द**, अ० विवक्षितसंख्यापरिमाणांत इंचमात्र न्यूनता किं० आधिक्य यांचाजो अभाव त्याचें द्योतक त्या संख्यापरिमाणाचें वि०; उ० तो गांव एथून बद्द चार कोस आहे.

**बद्दल**, अ० बदल प्रथम द्वितीय तृतीयार्थी.

**बद्द**, ३लिं० व्यभिचारादि दुष्कर्म दैववशात् झाल्यामुळें लोकांनीं हा वाईट आहे असें मानावयाजोगे योग्यतेस पावलाजो तो किं० कोणेकाचा अपराध हातून हकनाक झाल्यामुळें किं० न होतां उगीच आरोप आल्यामुळें त्याणें हा दुष्ट आहे, वाईट आहे असें मानावयाचे योग्यतेस पावला तो त्याचा; उ० मी याद्दुष्टाचे संगतीस लागून त्या गृहस्थाचा मात्र बद्द झालों.

**बद्ध**, ३लिं० बंधन पावलाजो तो.

**बद्धक**, न० सं० पोटामध्यें अजीर्णादि विकृतीमुळें जी स्तब्धता तें; २, आपल्यास जाचायाजोग्या रूपानें परिणाम पावलेंजें स्वकर्मादि तें.

**बद्धकटाक्ष**, न० सं० परस्परांचें जें परम वैर तें.

**बद्धकोष्ठ**, न० सं० पोटामध्यें नित्यशः बद्धक असावें अशीजी कोठेकास विकृति जडली असत्ये तें.

**बद्धमुष्टि**, ३लिं० सं० कवडीचूस म्ह०

**बद्धमूल**, ३लिं० सं० मुळ्या भूमींत दूर गेल्यामुळें दृढसंबद्ध झालाजो वृक्ष तो; २, ला० शरीरांत पुरती व्याप्ति झाली आहे असाजो रोग तो; ३, अधिकारावर बहुत दिवस ठरल्यामुळें दृढता पावलाजो अधिकारी, इ० तो.

**बद्धवैर**, न० बद्धकटाक्ष.

**बद्रस**, स्त्री० हिं० डेग, गहुटी, इ०कांस स्वोब अ-डकावयाचें कातड्यानें मढवून करितात जें भों-क ती.

**बंध**, पु० सं० बंद परंतु तृतीय, षष्ठ, सप्तमार्थावां-चून; २, ला० जेणेंकरून गुंतला जातो असा स्नेह, माया, प्रपंच, ममता, मोह, इ० तो; ३, च-क्र, कमल, इ०कांचें अंकन करून त्यांत अक्ष-रें लिहून तीं अक्षरें आंत घेऊन श्लोकादिकर-ण्याचा प्रकार आहे तो; चक्रबंध, कमलबंध, मालाबंध, रथबंध, इ०स०प्र०

**बधणें**, कोणएक गोष्टीविषयीं वशकर्ताजो को-णएक त्यास कोणएकानें तद्विषयीं वश होणें; २, उभय साध्यजो सचदा, विवाह, इ० तो उभ-यतांस वश करून तिसऱ्यानें बनविला जाणें.

**बंधन**, न० सं० बांधण्याचाजो व्यापार तें किं० तेणेंकरून होतोजो बांधलेपणा तें किं० तत्सा-धनजें दोरी, इ० तें; २, ला० संसारादिकांत गुं-तायास कारणजे मोहादिक तें.

**बंधारी**, स्त्री० बंद प्रथमार्थी.

**बंधारण**, न० प्रा० बंद चतुर्थार्थी.

**बंधाग**, पु० कों० बांध प्रथमार्थी.

**बधिर**, ३लिं०सं० बहिरा.

**बंधु**, पु० सं० ज्याचें आईबापाचाजो पुत्र तो त्याचा; २, पितृव्य, भ्रात, मातुल, मावशी, गुरु, इ० जें मातापितृसस्थानिक त्यांचेंजे पुत्र ते प्र०; ३, धनी, गुरु, वतन, व्यवहार, इ० एक आहे ज्यां-च्या असेजे ते परस्पर ह्मणविनात; ४, आप-ला उपकारकर्ता, केवारी; जो कोणेक ईश्वरादि-क त्यास ह्म०; या अर्थी दीनाचाजो बंधुतो दीन बंधु, अनाथबंधु, इ०स०प्र०; ५, बांधव.

**बंधुत्व**, न० पराकाष्टेचेंजें सख्य त्यास ह्म०

**बंधुराज**, पु० स्तुतींनें किं० निंदेनें भावास च ह्म०

**बंधुवर्ग**, पु० भाऊ. इ० बंधूंचाजो समुदाय तो; २, रा० कांहीं निंदा, उपरोध, इ० विवक्षित असतां भा-वास ह्म०; या अर्थी नित्यें अनेक वचनांत; उ० मी चांगली गोष्ट केली तथापि आमचे बंधुवर्गा-चे मनास येत नाहीं काय करावें

**बन**, न० हिं० वृक्ष समुदायानीं विशिष्टजो भूवि-भाग तें; या अर्थी प्रा० समास होऊन प्र०; उ० चोरबन, आंबेबन, बाभुळबन, इ० ग्रंथ ह्मण, इ० कांत केवलाचाही प्र० होतो; २, पु० दशविध गोसाव्यामध्यें एक भेद आहे.

**बनकेळ**, स्त्री० केळीत एक भेद आहे.

**बनणें**, कोणेकास कोणेक कार्य करण्याविषयी काळावकाश, अंतःकरणवृत्ति, द्रव्य, इ० अपे-क्षित असत्येजी सामग्री, त्यांचे आनुकूल्यानें अनुकूल पडणें; उ० आह्मी गतवर्षीच घर बां-धणार होतों परंतु साहित्य मिळालें नवतें ह्म-णून बनलें नाहीं; मला तिकडे जावयास बनत नाहीं; २, पूर्वी तत्तद्धर्मवैशिष्ट्येंकरून असि-द्धपणें स्थितजें कांहीं त्याणें तत्तद्धर्मवैशिष्ट्यें-करून व्यवहार्यता पावावयाजोगे योग्यतेस ये-णें; उ० प्रतिष्ठिताचा पोर पण सोद्यांचे संगती-नें सोदा बनला; ३, शरीर किं० शरीरी मनु-ष्यादिक याणें बळकट आणि पुष्ट होणें; ४, अनेकांचें अनुमतानें व्हावयाचाजो देवघेव,

विवाह, इ० कांहीं व्यवहार तो नीं सर्व अनुमतें परस्पर अनुकूल होऊन घरनेस येणें; उ० हा भाडेकरी मनस्वी हांकतो त्यास तुह्मी जर बनवून घालतर गाड्याचें बनेल; ५, परस्परांचा संयोगादि संबंध झालाअसतां विशिष्टगुण उत्पन्न व्हावा कांहीं चांगलें कार्य व्हावें असा परस्परांचा अनुकूलभाव असणें; उ० याचें बाहेरच्या माणसांशीं बनतें घरचे माणसाशीं बनत नाहीं, त्या गोत्रास आणि या गोत्रास चांगलें बनतें; अंबराचें आणि गोडाचें बनतें; ६, कोणेकानें सुशोभित दिसावाजोगें वस्त्रालंकारादि रचनेनें विशिष्ट होणें; उ० अशी चट्टीपट्टीकरून बनून कोणीकडेगे चाललीस; ७, कज्जा, युध्द, इ० जुंपणें; उ० त्याची आमची लढाई बनली.

**बनतगर**, स्त्री० तगरीत एक भेद आहे.

**बनबनकीलकडी**, स्त्री० हिं० एका नियंत्याचे आज्ञेत वर्तणारे नव्हत परस्पर एकमताचे नव्हत असे कोणेक व्यवहाराचे ठायीं असतातजे अनेक कर्ते त्यांचाजो समुदाय त्यास ह्म०

**बनात**, स्त्री० प्रावरणाचेउपयोगी एक ऊर्णावस्त्र आहे.

**बनाती**, ३लिं० बनातेच्याजो बरचा. टोपी. पिशवी. इ० तो.

**बनाव**, पु० कार्य यथास्थित होण्यासजीं अनेक साहित्यें पाहिजेत त्यांचे अनुकूल्यानें तें कार्य सिद्ध झालेंअसतां त्याजवर येतोजो रूपवत्तिपणा तो; उ० हीं विलोती झाडें लावल्यानें या अराशीचा चांगला बनाव झाला; अद्यापि त्याचे आमचे सख्याचा बनाव बसत नाहीं; २, परस्परांचे संयोगानें कांहीं विशिष्टगुणादि उत्पन्न व्हावें असा कांहीं पदार्थांचा असतोजो अनुकूल भाव तो; उ० केशरी गंध आणि कस्तुरीचा टिकला याचा बनाव आहे.

**बनावणी**, स्त्री० बनावण्याचाजो व्यापार तो.

**बनावणें**, कांहीं कार्य गोष्ट, इ० तदनुकूलव्यापारानें बनावानें विशिष्ट दिसे असें सिध्द करणें; उ० गोष्ट जरीं नीरस असलीतरीं बनावून सांगितली ह्मणजे गोड लागते.

**बनोट**, स्त्री० ध्रुपद, ख्याल, इ० कांचाजो रचनाप्रकार तो.

**बंब**, पु० जलादिक उंच उडविण्याचें यंत्र आहे; २, पदार्थांचें स्थूलत्व वर्णायाचें असतां हें विशेषण करितात.

**बबब**, अ० अबब.

**बंबाळ**, ३लिं० भंबाळ.

**बंबू**, पु० संकेतानें शिश्नास ह्म०

**बंब्या**, पु० विद्यादिगुणानी रहितअसून शरीरानें जो धष्टपुष्ट आणि दांडगा त्यास ह्म०; २, बंबू.

**बभ्रा**, पु० गुप्तरूपेंकरून राखून ठेवावयाचीजी कांहींएक गोष्ट तिचीजी जनांत प्रसिद्धि तो; २, कोणेकाचें दुष्कर्मादि बाहेर पडल्यामुळेंजी लोकामध्यें त्याची होते उपहास्यता तो; ३, रा० कोणा एकाचें कांहींएक गोष्टीचें प्रत्यक्ष नसतां सर्व जनामध्यें त्या गोष्टीचें प्रचुरश्रवण होत असावें अशीजी प्रसिद्धि तो; उ० या वैद्यानें औषध दिलें असतां सर्व वांचतात एकही मरत नाहीं

असा असा आजपर्यंत बभा आहे.

**बंमहादेव**, पु० गोसाव्यांचा भीकमागायाचा बेळचा शब्द आहे; २, अगडबंब.

**बमूजिब**, १लिं० हिं० कांहींएकासदृश याचा प्रयोग कागदोपत्रीं; उ० अस्सल बमूजिब नक्कल.

**बया**, स्त्री० आईस किं० आईसारिखे वडील स्त्रीस ह्मणतात.

**बयाणा**, पु० हिं० बयाना; २, राजादि प्रभूपुढें चोबदार, इ०कांनी ह्मणायाचीं जीं वाक्यें आहेत तीं.

**बयाव**, स्त्री०पु० हिं० तपशील.

**बयादवार**, १लिं० हिं० तपशीलवार.

**बयाना**, पु० हिं० कांहींएक मोठा जिन्नस घेण्याविषयीं ठरवून नंतर जिन्नस देणारास घेणारा किंचित द्रव्य विश्वासार्थ देतो तो; २, दुसऱ्यापाशीं सांगायाची जी मोठी कांहींएक वर्तमानाची कथा ती.

**बरकत**, स्त्री० हिं० द्रव्यादि लाभार्थ आरंभिजे कांहींएक व्यापार त्याचीजी संभावितफलानुरूप फलद्रूपता तीकिं० त्या व्यवहारापासून त्याकर्त्यास होत्येजी लभ्यफलता ती; उ० ज्याचें दैव अनुकूल नाहीं त्यास कोणतेही व्यवहारांत बरकत येत नाहीं; २, कांहीं पदार्थ याप्रकारें इतका व्यय झालाअसतां संपावा अशी संभावना असत्ये तो तितका व्यय झालातरीं कांहीं अवशेष रहातोच असेंजें त्या पदार्थास आधिक्य येतें ती; ३, धान्यादि माप.इ०कानें मोजतेसमयीं प्रथमतः एक याच्यास्थानीं मंगलार्थ उच्चारितात.

**बरकत्या**, पु० कों० कापलेलें भात, इ०कांचा भारा बांधायासाठीं जो भातेण, इ०कांचा दोर करितात तो.

**बरकंदाज**, पु० हिं० बंदूकवाला जो शिपाई.इ० तो.

**बरकंदाजी**, स्त्री० हिं० बरकंदाजाचें निशाण मारणे, इ० रूपजें कर्म ती.

**बर– कण, कन, कर, दिनी, दिशीं**, अ० अनुकरण आहे; चिरवल, शेण, इ०कांत पाय,इ० भरणें इ०कांचें वि०

**बरकशी, बरकस**, स्त्री० हिं० स्पर्धा; उ० बलवंतावरावर बरकस लावणें ती विचारेंकरून लावावी.

**बरका**, १लिं० ज्याचा गरा परम मृदु असतो असाजो फणस तो व त्याचा गरा तो व त्याचें झाड तो; २, पिक्येंजें चिभूड त्यासही ह्म०

**बरकास**, १लिं० हिं० बरखास.

**बरकीण**, स्त्री० हिं० लघुनौकेंत भेद आहे.

**बरखत**, स्त्री० हिं० बरकत.

**बरखत्या, बरकत्या**, पु० कों० बरकत्या.

**बरखास**, १लिं० हिं० वि० विसर्जित; कचेरी.इ० कांचें वि०

**बरग**, पु० एक धान्य आहे.

**बरगडी**, स्त्री० फांसळी.

**बरगा**, पु० पाटणी, इ० करायासाठीं दोहों तुळयांवर आडवीं बसवितातजीं लांकडें तीं प्र०

**बरची**, स्त्री० हिं० भाल्यासारिखें एक शस्त्र आहे.

**बरज**, पु॰ रा॰ बरग.

**बरड**, पु॰ एक क्षुद्रजंतु आहे जो हरभरे, तुरी, इ॰ धान्यांत उत्पन्न होऊन तेंच धान्य पोंखरून खातो तो; २, स्त्री॰ कों॰ जेथें भाजून भाताचें आवण केलें तें उपटून घेऊन त्यास्थळांत लावणी न लाविता दुसरेवर्षी आवण करायास तसेंच राखून ठेवितात जें तें स्थल ती; ३, ३लिं॰ जेथें चांगलें पीक होत नाहीं अशीजी निकृष्ट जमीन ती: ४, बरघडलेला जो तोंड, इ॰ शरीरावयव तो.

**बरडणें**, बरड. इ॰जे किडे त्याणी धान्यादि पोंखरले जाणें; २, नितळपणा जाऊन विशोभित दिसायाजोगें देवींचे वण, इ॰कांनी मुखाद्यवयवानें युक्त होणें.

**बरडा**, पु॰ जून झालेलीं पोफळें सोलून उकडून वाळविलेली जी सुपारी तो.

**बरडीसुपारी**, स्त्री॰ बरडारूपजी सुपारी ती.

**बरणी**, स्त्री॰ मृत्तिकेचें आकारविशेषाचें पात्र आहे.

**बरतरफ**, ३लिं॰ हिं॰ अपराधादि झाल्यामुळें धन्यानें मामलत, इ॰ अधिकारावरून केलाजो च्युत तो; कर, हो, इ॰ धातुचे योगीं प्र॰

**बरदास्त**, स्त्री॰ हिं॰ पही पाहुणा, शिष्ट, संभावित, इ॰ जो कोणी त्याला पाहिजे काय. नको काय, इ॰ विचारून न्यूनता असेल तिचें पूरण करावें, इ॰ रूप त्यांचा समाचार घेण्याचाजो प्रकार ती; २, चक्र, मुलें, वस्त्र, इ॰ पदार्थांचीजी जोपा ती.

**बरबट**, न॰ पु॰ पाणी, ताक, इ॰ कांत अंबा, चिंच इ॰ पदार्थ कोळून केलाजो दाट रस तें तो; २, न॰ बकरा, इ॰कांचे मांसाचा सांभाऱ्यासारिखा करितातजो पदार्थ तें.

**बरबटणें**, चिखल, बरबट, इ॰कांनीं हस्तादिक पदार्थ लिप्त होणें

**बरबडा**, पु॰ आरण्यक एक लहान झाड आहे तो आणि त्याचें बीं तो.

**बरबरणें**, उठाणू, खरूज, इ॰ किं॰ तद्विशिष्ट शरीरावयव पूय, रक्त, अति अरक्त होऊन बाहेर सांडे अशाप्रकारें त्या पूयादिकानें विशिष्ट होणें किं॰ तसेच नाक शेंबडानें विशिष्ट होणें; २, फणस, पोपळा. इ॰ पदार्थ फार पिकल्यामुळें किं॰ कुजल्यामुळें केवळ द्रवप्राय जी दुर्दशा तीतें पावणें.

**बरबरीत**, ३लिं॰ पातळ शेण. चिखल. किं॰ कुजून द्रवप्राय झालेला फणस, नारळाचें खोबरें, इ॰ पदार्थ जामध्यें हस्तादिक घातलां असतां बस्कन आंत भरतो असा तो; २, बरबरलेलें जें नाक. इ॰ तो.

**बरमा**, पु॰ दारवेचे बाणास ठांसल्यावर तोंडाकडून पाडितात जें भोंक तो; २, तें भोंक पाडावयाचें जें शस्त्र तो.

**बरम्हा**, पु॰ सुताराचें एक औत आहे.

**बरवा**, ३लिं॰ पं॰ चांगला; उ॰ राघव माझा बरवा गे ब्रमासि जातो फिरवागे.

**बरशी**, स्त्री॰ बरची.

**बरसात**, बरसाती, स्त्री॰ हिं॰ घोड्यास झाल्यापासून एक रोग होत असतो ती.

**बरहुकूम**, अ॰ हिं॰ *निर्दिष्ट जें कांहीं एक त्याप्रमाणें*, उ॰ धनी हुकूम करील त्या बरहुकूम चालावें.

**बरळ**, स्त्री० निद्रेमध्यें कोणी करितोजी बडबड ती; २, मद्यादिकानें बेशुध्द होऊन किं० अविचारानें मनस्वीजें कोणेकाचें भाषण त्यास म्ह०

**बरळणें**, निद्रा, मूर्छा, इ०कामध्यें असंगत बडबडणें.

**बरा**, ३लिं० उत्कृष्ट चांगला असो किं० नसो परंतु हा वाईट असें नाव जाला ठेवतां येत नाहीं म्ह० विवक्षित कार्याचा निर्वाह इ० सरासरी जेणेंकरून होई अशा योग्यतेचाजो मनुष्य, गोष्ट, पदार्थ, इ० तो; उ० हा धोतजोडा केवळ चांगला नव्हे पर बरा आहे; २, थोडा आणि पुष्कळ याचें मधलेंजें प्रमाण त्याहून कांहीं अधिक तो; उ० तूप केवळ थोडें असेलसें वाटलें होतें पण् थोडें नाहीं बरें आहे; घराहून बरा लांब निघून गेलों मग आठवण झाली; ३, दुखण्यापासून मुक्त झालाजो दुखणाईत तो; बरानामी आलों, इ० वाक्यस्थलीं माझें आगमन झालें हें बरें झालें असा अर्थ; ४, वा० चांगला.

**बराडी**, ३लिं० कों० खाण्यापिण्याचे पदार्थांची चव नपाहतां अरबचरब पुष्कळ खाण्याचा स्वभाव ज्याचा त्यास निंदेनें म्ह०; २, खाण्यापिण्याचा पदार्थ पाहिलाअसतां भीड सोडून मागावा दुसऱ्यानें किती दिलेंतरीं तृप्त होऊं नये असा स्वभाव ज्याचा तो.

**बरात**, पु० चंग कांचन, गंजिफांतील जो तिसरा रंग तो.

**बराबर**, ३लिं० तुल्य; उ० हें माप त्या मापाचे बराबर आहे; २, अधिकउणा नव्हे तो; उ० त्यास एथून जाऊन बराबर पंधरादिवस झाले; ३, अ० कांहींएक कृतीविषयीं मर्यादा अवधि इ० रूपेंकरून धरिलाजो कालविभाग किं० देशविभाग, इ० त्यापासून ईषन्मात्र इकडे तिकडे नहोतां त्यातेंच अनुलक्षून; उ० भुईबराबर जों धळा कापला; मागेंपुढें म्हण् नका बराबर म्हणा; ४, सह वर्तमान; उ० माझे बराबर गडी आहे; संपति. व्यापार, इ० बराबर होणें म्ह० नाश पावून निःशेष होणें.

**बराबरचा**, ३लिं० जो ज्याचा बराबर झाला, आला, इ० तो त्याचा.

**बराबरी**. स्त्री० तौल्य; २, अधिक द्रव्यादि लाभार्थ आरब्धजे साहुकारी, इ० व्यापार त्यांत तोटा किं० नफा नहोतांजें मूलभूत द्रव्य त्याची मूल परिमाणवैशिष्ट्येंकरून जी स्थीति ती; ३, धनी आणि चाकर, इ०जे उत्कृष्ट निकृष्ट त्यांचा परस्पर स्पर्धादि संबंधझालाअसतां होत्येजी समान योग्यता ती; उ० हलक्या माणसाचा तोंडीं लागून आपली त्याची बराबरी करून घ्याची यांत विशेष काय.

**बराबरीचा**, ३लिं० जा परस्परांची विद्यादिकृत योग्यता तुल्य आहे ते परस्पर.

**बरी**, स्त्री० अंगरख्याचीजी पेसकळी ती.

**बरीक**, अ० वाक्यालंकार आहे; सजातीय पदार्थ समुदायांतून एखाद्याच पदार्थाचा कांहीं विशेष विवक्षित धर्माचे विधानार्थ जेव्हां अंगिकार विवक्षित आहे तेव्हां प्र०; उ० सगळ्या शाळेंत एवढा मुलगा बरीक चांगला आहे.

बरीगत

बरीगत, स्त्री॰ धडगत.

बरू, पु॰ ज्याची प्रा॰ लेखणी करितात असा एक तृणवृक्ष आहे.

बरें, न॰ हितरूपंकरून विवक्षितजें लाभ आरोग्य, इ॰ तें सर्व; २, अ॰ कांहींएक गोष्ट मनांत घेऊन अंगीकृतकेली अशा अर्थाचें द्योतक उद्गारसदृश अव्यय आहे; केवल वाक्यालंकारत्वेंकरूनही प्रयोग होतो; उ॰ कायबरें यास उदाहरण.

बरेंवाईट, न॰ दैवगतीनें संभाव्यमानजें दुखणें, मरण, नाश, इ॰ कांहीं अरिष्ट तें, किं॰ आरोग्यादिरूप बरें आणि रोगादिरूप वाईट तें.

बरोबर, ३लिं॰ बराबर.

बरोबरचा, ३लिं॰ बराबरचा.

बरोबरी, स्त्री॰ बराबरी.

बरोबरीचा, ३लिं॰ बराबरीचा.

बऱ्हाणपुरी, ३लिं॰ बऱ्हाणपूरह्मणून शहर आहे तत्संबंधी कापड, जरतार, इ॰ तो.

बर्फ, न॰ हिं॰ आकाशातून दहिंवरपडून थंडीचा योगानें थिजतें तें.

बर्फी, स्त्री॰ हिं॰ एक मिठाईत पदार्थ आहे.

बर्बर, पु॰ सं॰ यवनांत एक जाति आहे.

बल, न॰ कोणेक कार्याविषयीं प्रवृत्तजें कर्त्ता, इ॰ कारक त्याचेहातून स्वस्वक्रिया त्याजवर लागू पडून त्यात्याकार्याचा निर्वाह व्हावा किं॰ कोणेक अर्थ आपण ज्या स्थितीनें स्थित असतो त्याहून वेगळ्यास्थितीनें कोणी पाववूं लागलाअसतां त्याणे त्यास्थितीतें नपावतां स्वस्थितींत च रहावें अशा विषयीं प्रयोजकजो अर्थमात्राचेअंगीं शरीरदृढता, विद्वत्ता, धनिकता, इ॰ निरूपित धर्मविशेष असतो तें; २, त्यास निरूपक जे विद्याधन, सहायाश्रय, इ॰ त्यास ह्म॰; ३, ग्रहतारा, इ॰कांचा आनुकूल्यरूपजो आश्रय असतो तें; ४, सैन्य.

बलक, पु॰ कोरफड पक्ष्याचें अंडें, इ॰कांतजो बुळबुळीत केवळ पातळ नव्हे, केवळ दाट नव्हे असा द्रव्यांश विशेष असतो तो आणि तत्सजातीय कितीएक फलें, पुष्पें, पत्रें, इ॰ कांपासून निघतोजो द्रव्यांश तो.

बलकी, अ॰ शेवटचापक्षीं; उ॰ तीनशें पडोत बलकी साडेतीनशें पडोत परंतु घोडा घ्यावयाचा; २, स्त्री॰ दिवाणखाना, मखर, इ॰संबंधी खांब, इ॰कांचे कोंपरा, इ॰ कांवर शोभार्थ पन्हळासारखा आकारविशेष करितात ती.

बलकुबल, स्त्री॰ हिं॰ कांहींएक संभाव्यमानजो संकटप्रसंग ती; उ॰ हत्यार जवळ असावें बलकुबल पडलीअसतां कामाबर पडतें.

बलब, पु॰ रा॰ बलक.

बलवत्तर, ३लिं॰ अतिशयितजो बलाढ्य तो; दैव, काळ, कर्म, इ॰कांचाठायीं विशेषेंकरूनप्र॰

बलाई, स्त्री॰ बलाय.

बलागत, स्त्री॰ आपण बुध्यादिविषयीं उद्योग न करितां बळेंच प्राप्त होतेंजें कज्जा इ॰ लचांड ती.

बलांडा, पु॰ कों॰ बलगांठ.

**बलाढ्य**, ३लिं० विशेष बल आहे ज्यास तो.

**बलाणी**, स्त्री० रा० देवालयादिकांच्या ठायीं भिंतीच्या आश्रयानें ओट्यासारिखी बसायास करितात जी जागा ती.

**बलात्कार**, पु० तें तें कर्मादि होण्यास कर्त्याची प्रीति, नीतिकालमहात्म्य, इ० जीं प्रसिद्ध निमित्तें आहेत त्यांच्या अभावअसतांही तें तें कर्मादि प्रवृत्त व्हावें म्हणून त्यावर केवळ बलाच्या प्रयोग करितात तो.

**बलाबल**, न० वादप्रतिवादादि संबंधीजे अनेक पक्ष त्यांत असतेंजें एकापेक्षां एकास सबलत्व एकापेक्षां एकास दुर्बलत्व तें; उ० हे दोन पक्ष आहेत त्यांत बलाबलपाहून सबलपक्ष असेल तो घ्या.

**बलाय**, स्त्री० हिं० इडापिडा; उ० बलाय गेली तूं नाहीं आलास तर; म्ह० ब्राह्मण्याची बलाय दूर.

**बलावणें**, पाचारणें प्रथमार्थी; २, न० आमंत्रण द्वितीयार्थी.

**बलावणेकरी**, पु० आमंत्रण्या.

**बलि**, पु० देवता, पिशाच, इ० कांचे प्रीत्यर्थ अन्नाच्या गोळा, इ० किं० मांस, पशुपक्षी मारून किं० जिताच अर्पितात तो; २, बलिदान, बलिप्रदान, इ० स० देवादिकांचे पूजनार्थ जी पुष्पादिक सामग्री तो.

**बलिप्रतिपदा**, स्त्री० कार्तिकशुद्धप्रतिपदा.

**बलिष्ठ**, ३लिं० अति बलाढ्य तो.

**बली**, ३लिं० बलाढ्य.

**बलुतें**, न० गावचे वतनदार जे उपाध्या, जोशी, न्हावी, परीट, कुंभार, सुतार, इत्यादिक त्यांस चाकरीबद्दल शेतांवर यावें लागतें धान्यादितें, रतीं बाराजीं वतनें त्यांस प्रसंगविशेषीं म्ह०

**बलुतेदार**, पु० बलुत्या.

**बलुत्या**, पु० बलुतें घेणारजे महार, जोशी, इ० ते प्र०

**बलोतें**, न० बलुतें

**बलोत्या**, पु० बलुत्या.

**बल्याव**, न० लहान गलबतांत एक भेद आहे.

**बल्लम**, पु० भल्यासारखा शस्त्रविशेष आहे.

**बव**, न० सं० अकराजीं करणें त्यांतीलजें पहिलें तें.

**बशार्त**, स्त्री० कांहींएक कार्याविषयीं यत्नाची जी पराकाष्ठा ती; उ० त्याणेंत्यास बशार्तीनें वांचविलें; २, अ० प्रयत्नाची पराकाष्ठा करून, उ० या प्रांतांत बशार्त अंमल बसविला.

**बस**, अ० हिं० पुरे; २, स्त्री० यापुढें उत्कर्ष व्हावयाचा राहिला नाहीं अशी कोणक व्यवहाराची पराकाष्ठेची पूर्ति ती; उ० त्याणें गाण्याची बस करून दिली.

**बसक**, स्त्री० अनेकानी बसायासाठीं सभामंडप, कचेरी, इ० कांच्याठायीं आस्तरलेलें रुजामा, सतरंजी, इ० ती; २, पदार्थमात्राच्या आधाराशीं संबद्ध होऊन रहायाचाजो अधोभाग ती; उ० या दउतीची बसक लहानम्हणून उलटत्ये; ३, मूर्त्यादिकानी नपडतां वर रहायाजोगें त्यास करितातजें आसन ती; ४, कों० बाजारच्या रस्त्यांत विकायास बसणारे जे माळी, सराफ, इ० त्यास

स त्या भूमिसंबंधें सर्कारांत जें देय पडतें ती; ५, आंतील पाणीं बाहेर जात नाहीं असें केवळ समानजें शेत करायाजोगें स्थल ती.

**बसकट**, १लिं० थपकड; २, स्त्री० उठायाविषयीं अशक्ति किं० अनादर, इ० दिसायाजोगा हातपाय मोकळे सोडून बसण्याचाजो प्रकार ती; ३, मार, इ० धातुचेयोगीं प्र०; उ० ही म्हेस उभी आहे तों दूध काढा एकदा बसकट मारली म्हणजे उठणार नाहीं.

**बसकण**, स्त्री० रा० बसकट द्वितीयार्थी; २, ला० कोणेकानें बसकण मारणें घेणें एथें कांहींएक व्यापारांत थकून त्यापासून विरक्त होणें.

**बसकर**, स्त्री० पु० न० सभा. इ०कांचाठायीं बसायास घालायाचेउपयोगीं रुजामा. सत्रंजी. इ० ती तो तें.

**बसकल**, स्त्री० वा० बसायासजी फावती ती; उ० हा सारा दिवस फिरतो यास क्षणभर बसकल नाहीं; प्रा० निषेधार्थी प्र०

**बसका**, १लिं० बसकट प्रथमार्थी; २, स्त्री० बसक द्वितीय तृतीयार्थी.

**बसकार**, पु० रा० बसक प्रथमार्थी.

**बसकीचा**, १लिं० आधाराशीं संबद्ध होऊन रहायाचाजो अधोभाग तो विस्तीर्ण आहे ज्याचा असेंजें पात्रादि तो

**बसकूर**, न० बसकर.

**बसणें**, केवळ आडवें न पडतां पायांचे संबंधानें जी शरीरास उच्चता येत्ये तितकीमात्र नाहींशी व्हावयाजोगें पादाकुंचनानें किं० इतर अंगटें अंग टेकल्यानें जो स्थितिविशेष होतो तेणेंकरून राहणें; २, पश्यानी हस्तापाधारावर पक्षाकुंचनकरून कांहींएक काळ स्थितिविशिष्ट होणें, ३, विवक्षित कोणएक आधारीं विवक्षित कोणएक आधेयानें विवक्षानुरूप स्थित होणें; उ० पेटीस पट्टी बसली; अंमल प्रजावर बसला; अंगावर धूळ बसली; ४, चाबूक, छडी, दगड, इ० शरीरादिकावर प्रहार होई असा लागू होणें किं० तो प्रहार सपाटा मार इ० लागू होणें; ५, श्लोक कूटपद, वाक्य, हिशेब, सांधा, जवा, इ०कानी यथायोग्य योजनेनें जुळलें जाणें; ६, शरीरादिकांचाठायीं उठलेलेंजें उठाणू, इ० त्याणें ती उन्नतता सोडून त्या शरीरादि आधाराच्या बराबर होणें किं० अवयव सन्निवेशाचा शैथिल्यामुळें उन्नतत्व पावलाजो कापसाचा ढीग इ० पदार्थ त्याणें अवयवसंनिवेशीं दार्ढ्य धरून दबला जाणें; ७, ला० सावकारी, इ० व्यवहार संपत्ति, इ०कानीं अपकर्षदशेतें पावणें; ८, विवक्षित संख्या परिमाणादि विशिष्टजो खर्च दंड, तोटा, नफा, दरमूल्य, इ० तो; पुरुष, पदार्थ, इ० त्यात्या अधिकरणावर त्यात्या योग्यसंबंधानें संबद्ध होणें; उ० हीं दोन कार्येमिळून हजार रुपये खर्च बसला; हिशेबशीनें मजवर काय बसेल तें मी देईन; ९, कोणेकानें कोणेक अधिकरण धरून स्वव्यापार विशिष्ट स्थिर होणें; उ० घरीं तगादादार बसला म्हणून बाहेर पैका मागायास जावें तर एकसारखा पंधरादिवस पाऊस बसला आहे; १० लेखन व्यापारादिकांचाठायीं हाताच्या सवयीमुळें

हस्ता

हस्तादिकानें रदसंबद्ध होणें जेणेंकरून त्या ले-खनादिकांविषयीं हस्तादिकांची वृत्ति साहजिक होत्ये; ११, कांहींएक व्यापाराचाठायीं प्रवृत्तजो कोणेक त्याणें तो व्यापार सोडून उगीच राहणें; १२, कोणेकानें कोणेक विशिष्टजी स्थिति त-द्विशिष्ट असणें; उ० याला कांहीं उलीदाली पाहि-जेत क्षणभर उगाच बसावयाचा नाहीं; तो उगाच बसला; हा रडत बसला; १३, जेऊं लागणें.

**बसंती,** १लिं० वस्त्रादिकांवर छिडकावरूप देतातजो कुसुंब्याचा रंग तो; २, तद्विशिष्टजें वस्त्र, काग-द, इ० तो.

**बसफुगडी,** स्त्री० बसून घालितातजी फुगडी ती.

**बसराई,** १लिं० बसराह्मणून शहर आहे तत्संबंधी मोत्यें, रेशीम, इ० पदार्थ तो.

**बसल्याघडीचा,** १लिं० घडीबंदपणें बहुत दिवस राहिलेलेंजें कोरें सनंग तो.

**बसवण्णा,** पु० जंगमाचे देवळांत देवतारूप द-गडाचा नंदी असतो तो.

**बसवा,** पु० बा० महादेवाचे पुढचा नंदी तो.

**बसवी,** स्त्री० कसबीण, इ०कांस प्रायः निंदेनें ह्म० आणि तिचा आरोपानें निर्लज्जत्वादिगुणविशि-ष्टजी गरत तिलाही ह्म०

**बस्ता,** पु० वस्त्राचें लहान दिंडामारिखेंजें बांधिता-त गाठोडें तो; २, १लिं राजादिकाचा नेहमी बसाया-चाजो खासा घोडा इ० तो.

**बस्तानी,** स्त्री० पंतोजी एके काठीचे अग्रास दोरी बांधून पोरांस मारावयाकरितां साधन करितो ती.



**बहकणें,** कोणेकानें उद्दिष्टस्थलीं जावयाचाजो मार्ग त्यापासून भ्रष्टहोऊन केवळ भलत्याच मार्गास लागणें; उ० तोफेच्या अवाजानें घोडा बुजूनजो बहकला तो चारकोस रानांत गेला; २, ला० गृहस्थपणा, सभ्यपणा, इ० कांचा उचित जो व्यवहारमार्ग, रीति, त्यास सोडून दुर्व्यसना-दि छंद लागल्यामुळें केवळ भलत्याच रीतींत शिरणें; उ० हा पोर सोयांच्या छंदास लागून ब-हकला; ३, हिशेब, कूटश्लोक, रत्नादिपरीक्षा, इ० विषयीं कल्पना चालवयाचेजें तेंतें संधान तें रू-ढून अंतःकरणवृत्ति भलत्याच संधानाकडे लाग-णें किं० कोणतेंच संधान नलागतां भ्रमांत पडणें; ४, त्या मनुष्यानें तादृश प्रकारविशिष्ट होणें; उ० मयाची कल्पना कांहीं जवळशी होती आतां केवळ बहकली; ५, मालाची किंमत, इ० मनस्वी होकणें

**बहकावणी,** स्त्री० दुसऱ्यानें मोहांत पडावयाजो-गा दोनरुपयांचे पदार्थास शंभर रुपये किंमत सांगावी प्रत्यक्ष दरिद्री दिसत असून उद्यांमी ला-ख रुपये धर्म करणार इ० रूप जो शब्द व्यापार ती.

**बहँगी,** स्त्री० बंगी.

**बहर,** पु० स्त्री० पदार्थ उत्पन्न झाल्यापासून उत्तरो-त्तर उत्कर्ष पावत असतो त्या उत्कर्षाची पूर्णता झाली ह्मणजे अपकर्ष पावत पावत नाश पाव-तो त्यामध्यें अपकर्षाचा प्रारंभाचेपूर्वीचा उत्क-र्षाचा पूर्णतेनें विशिष्टजी त्यापदार्थाची दशा ती; २, नृत्य, गायन, इ० कांचा पराकाष्ठेचाजो रंग ती; बहर मारणें ह्म० नानाप्रकारचे उत्साहांनीं काळ घा

लविणें.

बहुळ, ३लिं० कों० उपयोगापेक्षां मोठें जें स्थल तो.

बहादुरखानी, ३लिं० दवलताबादी कागदांत एक भेद आहे.

बहादूर, बहादर, बहाद्दर, ३लिं० याद; युद्ध, इ० कांत जो शूर, तो; २, विवक्षित कला, विद्या, यांत जो पुरा प्रवीण तो.

बहाणा, पु० वास्तविक अंशाचा निन्हव करून दुसऱ्यास वंचावें ह्मणून करितात जें कांहीं मिष तो.

बहार, स्त्री० बहर प्रा० द्वितीयार्थी.

बहाल, न० तुळई; २, ला० अवेल आणि चूल, यांचे मधला जो चुलीचा अवयव तें; ३, ३लिं० कोणेकावर प्रसादोन्मुख असल्येजी कोणेकाची मर्जी तिचें वि०; मामलत, सनद, इ० कोणेकास बहाल करणें ह्म० प्रसन्न होऊन त्याचे स्वाधीन करणें.

बहाली, स्त्री० मर्जीचा जो बहालपणा ती.

बहिः, अ० सं० बाहेर; बहिःप्रदेश, बहिर्मार्ग, इ० स०प्र०

बहिणवळा, स्त्री० कों० अनेक बहिणी मिळून जात्या: अनेकवचनीं प्र०

बहिरंग, ३लिं० अंतरंगाचा प्रतिपक्षी तो.

बहिरट, ३लिं० बहिरा; २, ईषत्‌जो बहिरा तो.

बहिरा, ३लिं० ज्याला कांहीं ऐकूं येत नाहीं असा जो कान तो; आणि तद्विशिष्ट मनुष्यादिक तो; २, वाय्वादि विकृतिमुळें ज्याची स्फूर्ति गेली असा जो हात, पाय, इ० अवयव तो.

बहिरागी, पु० बैरागी.

बहिरी, पु० भैरव ह्मणून देव आहे त्यास ह्म०; २, बहिरीससाणा.

बहिरीव्यथा, बहिरीवेथा, स्त्री० एक महारोग आहे.

बहिरीससाणा, पु० एक पक्षी आहे.

बहिरोबा, पु० बहिरी प्रथमार्थी; २, बहिरा जो पुरुष त्यास कदाचित् ह्म०; त्याला बहिरोबाची सेवा आहे इ० स्थलीं तो बहिरा आहे असा अर्थ.

बहिर्दिशेसजाणें. अ० परसाकडे जाणें

बहिर्बुणगें, न० बाजारबुणगें.

बहिर्भूत, ३लिं० सं० विवक्षितकोटीहून बाहेरचा जो तो; उ० कोणी मनाची गणना इंद्रियांत करतात, कोणी त्याहून बहिर्भूत असें गणतात.

बहिर्भूमीसजाणें, बहिर्दिशेस जाणें.

बहिर्मुख, ३लिं० आत्मस्वरूपाचें स्फरणाची गोडी ज्यास लागली नाहीं अतएव संसारिकविषयांकडे ज्याचे चित्ताचें प्राबल्य आहे तो: आणि तें त्याचें अंतःकरण तो.

बहिर्लापिका, स्त्री० ज्याचे अर्थ पूरणास बाहेरचें पदादि घ्यावें लागतें असा कूटरूप कवितेचा एक प्रकार आहे.

बहिर्व्यसन, न० संकेतानें व्यभिचाराचे व्यसनास ह्म०

बहिर्व्यसनी, ३लिं० बहिर्व्यसन आहे ज्यास तो.

बहिष्कार, पु० कोणेकापासून अगम्यागमनादि दुष्कर्म घडल्यामुळें जातीचा बाहेर असी त्याची स्थिति करितात तो.

बहिष्कृत, ३लिं० पातकादिकारणामुळें जातीनें

आस बहिष्कार घातला आहे तो; २, जा विव-क्षित कोटींतून बाहेर केला जो तो तद्बहिष्कृत; उ० ज्ञाति बहिष्कृत, सत्य बहिष्कृत, इ० स०

**बहीण**, स्त्री० ज्याचे आईबापापासून जी झाली कन्या ती त्याची; म्ह० बहिणीमुळें भावोजी सोयरा; २, आईबापांचे सख्यानिकजे चुलता, मामा, मावशी, इ० त्यांचीजी कन्या तीस म्ह०

**बहिणतीज**, स्त्री० भाऊबीजेचे दुसरेदिवसचीजी तृतीया ती त्यादिवशीं भाऊ आपल्या बहिणीचा भोजन वस्त्रालंकारेंकरून गौरव करितो.

**बहीणभावंडें**, न० बहीण आणि भाऊ मिळूनजा अनेक व्यक्ति तीं.

**बहीणसाथा**, पु०रा० बहीणरूप किं० भाऊरूप कोणीजो सोदर तो.

**बहु**, ३लिं० सं० एक दोन याहून अधिक संख्याविशिष्टजें कांहींएक तो; २, पुष्कळ; बहुत आहेत पाद ज्याला तो बहुपाद, बहुभुज, बहुतांसजो प्रिय तो बहुप्रिय, बहुत भक्षितो तो बहुभक्ष, इ० स० म०; याच्य बहुरत्न वसुंधरा.

**बहुऋणी**, ३लिं० बहुतांचा देणेकरी किं० बहुत आहे ऋण ज्यास तो; म्ह० बहुउंवा त्यास खाज नाहीं बहुऋणीत्याला लाज नाहीं.

**बहुगुणी**, स्त्री० बगुणी; २, ३लिं० बहुत आहेत गुण ज्यामध्यें तो मनुष्यादिक.

**बहुगुणें**, न० बगुणें.

**बहुचक**, ३लिं० चावटजो मनुष्यतो.

**बहुत**, ३लिं० पुष्कळ.

**बहुतकरून**, अ० प्रायशः

**बहुतकाळी**, ३लिं० बहुतदिवस ज्यास झाले असा जो पदार्थ, गोष्ट, इ० तो.

**बहुतदिवशी**, ३लिं० बहुत काळी.

**बहुतावें**, न० कों० कोणेक व्यवहारावर कर्तृत्व. वक्तृत्वादिविषयीं समप्राधान्येंकरून बहुतांचा जो संबंध तें; उ० बहुतावें झालें म्हणजे एकत्याचा उपाय चालत नाहीं.

**बहुतेक**, ३लिं० यत्किंचिदंशसोडूनजो सर्व तो; उ० त्या देशांत बहुतेक मूर्ख आहेत विद्वान थोडे.

**बहुदुधी**, ३लिं० बहुत आहे दूध जीस अशीजी गाय म्हैस, इ० तो; उ० आंरवुड शिंगी अल्पमोली बहुदुधी अशी मिळणें कठीण.

**बहुधा**, अ० बहुतकरून.

**बहुधान्य**, पु० साठासंवत्सरांतील बारावासंवत्सर तो.

**बहुनायकी**, स्त्री० राज्यादिव्यवहारावर अनेक मतांचेजे अनेक मनुष्य तत्सत्ताकांतत्वजें असतें ती.

**बहुबीज**, ३लिं० बहुत आहेत बिया ज्यामध्यें तो.

**बहुभाग्य**, न० राज्य चांगलें होणें. पर्जन्यपतन, सुभिक्ष, इ० गोष्टींस कारणजें बहुतांचें भाग्य तें

**बहुभाष, बहुभाषी**, ३लिं० निष्कारण बहुत बोलतो तो.

**बहुमत**, न० कोणेक गोष्टीविषयीं असतेंजें बहुतांचें संमत तें; २, ३लिं० बहुतांचें संमत आहे ज्या विषयीं असाजो शास्त्रार्थ, इ० तो.

**बहुमान**, पु० शिष्टादिकांचा आदरपूर्वक सन्मान तो.

**बहुमोली**, १लिं० बहुत मोल पडतें ज्यास तो.

**बहुरुपी, बहुरूपी**, पु० नरामध्यें एक जाति आहे जो नाना प्रकारचीं सोंगें आणून उपजीविका करितो तो.

**बहुरूप**, न० बहुरूपी करितात जो खेळ तें.

**बहुल**, १लिं० बहु.

**बहुलें**, न० लग्न किं० मुंज, इ० कांसाठीं चतुष्कोण आकारविशेषाची वेदी करितात ती.

**बहुवचन**, न० अभिधेय अर्थास बहुत्व विवक्षित असतांजें वचन होतें तें.

**बहुवचनांत**, १लिं० बहुवचनविशिष्टजो नामरूप किं० क्रियापदरूप शब्द तो.

**बहुवस**, १लिं० ग्रं० बहुत या अर्थी; उ० पहावया बंधूचें मानस सेना पावली बहुवस.

**बहुवार**, अ० बहुत वेळां.

**बहुव्रीहि**, पु० समासांत एक भेद आहे.

**बहुशः, बहुशा**, अ० बहुधा.

**बहुश्रुत**, पु० केवळ एकाच विद्येंत निष्णात नव्हे थोड्याथोड्या सर्वविद्या जाणे पाहिल्या आहेत असा जो तो.

**बहुसाल, बहुसाळ**, १लिं० ग्रं० बहुवस; उ० बहुसाळ वाद्यें वाजती.

**बहुज्ञ**, १लिं० शास्त्र आणि लौकिक एतत्संबंधी बहुत गोष्टी ज्याला ठाऊक आहेत तो.

**बळ**, न० बल; बळास येणें ह्म० विवक्षितानुरूप होण्याविषयीं बलात्कारसापेक्ष होणें; बळ करणें ह्म० विवक्षित कर्मावर आहे तितकें बळ लागू करणें; बळ धरणें, बळ बांधणें ह्म० बलाधायक जी सर्व सामग्री तिचे पुष्टतेनें बळकट होणें; २, स्त्री० बलि प्रथमार्थी.

**बळकट**, १लिं० फार बळ ज्याचे आंगांत तो; २, पुष्कळ; उ० बळकट पाऊस पडला, त्यास बळकट मारलें, इ० कितीएक प्र०; ३, दृढ; उ० गांठ सुटे नाशी बळकट बांध.

**बळकटी**, स्त्री० बळकटपणा.

**बळकटून**, अ० दृढ होई असें बांधणें, धरणें, इ० धातुचें विशेषण.

**बळकावणें**, दुसऱ्याचा पदार्थ हातारवालीं आलातो परत द्यावा असें न्यायतः असतांही न देतां बळानें आपल्यापाशीं राखणें.

**बळगी**, स्त्री० स्त्रियांचे लुगड्यांत हलके किंमतीचें एकप्रकारचें लुगडें आहे.

**बळजोरी**, स्त्री० बलात्कार.

**बळत**, पु० रा० बळद द्वितीयार्थी.

**बळत्कार**, पु० बलात्काराचा अपभ्रंश.

**बळद**, न० दाणें इ० सांठवायाकरितां भिंतीमध्यें पोकळी राखून स्थळ करितात तें; २, सांठवण्याचे पदार्थ लोणचें, इ०क ठेवायासाठीं भोंवताला विटा, माती, इ० कांचा परिघ करून जें आवृत स्थळ करितात तें.

**बळभद्र**, पु० बळिभद्र.

**बळमोड**, स्त्री० पु० उत्तरोत्तर वृद्धिंगत होण्यास प्रयोजकीभूत वस्त्र, दुरवणें, उठाणू, पर्जन्य, इ० कानी धरिलेलें जें बळ त्याचा कांहीं कारणामुळें होतो जो भंग ती तो; उ० झाड चांगलें वाढत होतें पण गुरानें तोंड लावल्यापासून त्याची बळमोड

झाली; उ० दोनदिवस ज्वर थोडाथोडा येतो खरा पण ती माबघेतांच बळमोड जाली; २, १लिं० रा० बळमोड जाली असाजो वृक्षादि तो.

**बळस**, पु० मनुष्य, पशु, हे जन्मतात त्याचे मुखांतून जो द्रवरूप बुळबुळीत मळांश निघतो तो.

**बळाढ्य**, १लिं० बलाढ्य.

**बळाचा**, १लिं० जोमदार; २, बुदबळांमध्यें जाला दुसऱ्याचें बळ आहे तो.

**बळात्कार**, पु० बलात्कार.

**बळावणें**, उत्तरोत्तर उत्कर्षदशा पावायास प्रयोजकीभूत जें बळ तद्विशिष्ट रोग, शत्रु, पाऊस, इ०कांनी होणें.

**बळिभद्र**, **बळिभद्या**, पु० कपाळकरंटा जो त्यास ह्मणतात.

**बळी**, १लिं० बलाढ्य; ह्म० बळी तो कानपिळी; २, बुदबळें खेळण्याचा एक प्रकार आहे; ३, पु० बलि प्रथमार्थी.

**बळें**, अ० दाटून.

**बळेंचा**, १लिं० आहार्यज्ञान विषय जो कांहींएक अर्थ तो.

**बळेंबळेंचा**, **बळ्यांबळ्यांचा**, १लिं० बळेंचा.

**बक्षी**, पु० बख्शी

**बक्षीगहूं**, पु० बख्शीगहूं.

**बक्षीस**, न० बख्शीस.

**बा**, पु० बाप; २, प्रायः मनुष्य, देव, यांचा नावापुढें बहुमानार्थ हा शब्द लागतो; उ० मोरोबा, विठोबा, कान्होबा, बहिरोबा; ह्म० बाचाबा गेलानी बोंबलत्तां बोंड गेला; प्रेमानें पुत्रादिकांसही या शब्दानें व्यवहार करितात; उ० येरेबा प्रल्हादा करिकांरे भोजन, आमाझा श्रमला भक्तहितार्थी.

**बाआगळा**, १लिं० कोणेक पदार्थास विवक्षित पदार्थापेक्षां विवक्षितगुणानें पराकाष्ठेचें आधिक्य वर्णनीय असतां हें विशेषण देतात; उ० तेथें असला धोत्रजोडा मिळेल ह्मणून काय विचारितोस याचे बाआगळा मिळेल.

**बाइलबुध्या**, १लिं० बाइलेचे बुद्धीनें वागतो तो.

**बाइलबोल्या**, १लिं० जनानी ज्याचें भाषण असा जो पुरुष तो.

**बाइलवेडा**, १लिं० लोकांत वाईट दिसांया जोगें निरंतर बायलेचें वेड जास्त असा जो पुरुष तो.

**बाई**, स्त्री० मातोश्रीस किं० तत्सदृश कोणी वडील प्रतिष्ठित जी स्त्री तीस या नावानें व्यवहारितात; २, स्त्रियांचें व्यावहारिक नामापुढें आदरार्थ याचा प्रयोग होतो; उ० रमाबाई आली आणि अकाबाई गेली; ३, वडील जावेस किं० कोणी प्रतिष्ठित श्रीमंत स्त्री तीस ह्मणतात या अर्थी अनेकवचनांत प्र० एथें पक्षीं नपुंसकता येत्ये; उ० बाई आल्या; बाई कोठें गेलीं नकळे; ४, कों० जन्मात एकवार देवी ह्मणून जे अंगावर फोड येत असतात त्या; या अर्थी नित्यें अनेकवचनांत; उ० या मुलीस बाया अझून आल्या नाहींत.

**बाईल**, स्त्री० जा बरावर जिचें लग्न किं० पाट झाला ती त्याची.

**बाईलभिडंग**, न० रा० बायको, पोरें, इ० खटलें तें.

**बाईलमाणूस**, न० बायकोमाणूस.

**बाऊ**, पु० मुलास भयप्रदर्शन करत्येसमयीं भयंकर जे सर्प व्याघ्रापासून कीड, मुंगी, इ० सर्व पदार्थ त्यांस

त्यांस ह्मणतात किं० तसेंच शरीरावरील क्षत,फो- ड,यांसही ह्मणतात; बाऊकरून सांगणें, दाखवि- णें, इ० स्थलीं भयप्रदर्शनार्थ हलकी गोष्ट फुग- वून सांगणें असा अर्थ.

बाऊत, स्त्री० या० वृक्षांची किं० पर्जन्यावांचून मेघां- ची छाया ती.

बाऊल, पु० रा० मांजरासारखा एक अरण्यांत प्राणी आहे तो.

बाऊस, न० बाहुमूल.

बाऊळ, स्त्री० रा० कातळावरची जी भातजमीन जि- ला सर्वकाळ ओल असतें आणिजी जमीन भा- जून भाताची पेरणीमात्र करावी लागत्ये ती; २, न० या० नदीच्याकडेस वांग्या, मिरच्या, इ० शाक भाजीचें जें स्थळ तें.

बांक, पु० बसावयाकरितां घडोंचीसारिखा काष्टा- च्या पदार्थ करितात तो; २, काष्टादिकाचे अंगीं अ- सत्येजी वक्रता तो; ३, परस्परांच्या अंतःकरणा- च्याजो विरुद्धभाव तो; उ० त्याच्या व आमच्या आली- कडेस बांक पडला आहे; ४, एक आयुधविशेष आहे.

बाकबूक, न० कांहींएक भयानेंजें पोटांत धडधड होतेंसें वाटतें अशीजी कांहीं विकृति होत्ये तीस ह्मणतात.

बाकस, ३लिं० विवक्षितसत्वांशेंकरून जो रहित तो.

बांका, ३लिं० हिं० दुसऱ्यानें जिंकून हस्तगत करा- यास अशक्य असाजो किल्ला, शिपाई, इ० तो; २, पु० मुरयानें वाजवायाचें एक वाद्य आहे तो.

बाकाळी, स्त्री० बकाळी.

बाकी, स्त्री० कांहींएक पदार्थ गोष्ट, इ० कोंच्या देणे, घेणें, बोलणें, इ० क्रियानी निःशेष नहोतां जो रा- हिला उर्वरितांश तो; बाकी पूज्य करणें ह्म० देणें घेणें, एतत्संबंधी जी बाकी ती देऊन घेऊन नाहींशी क- रणें.

बाकीच्या, ३लिं० अंशतः कांहीं विनियोग सांगि- तला असतां त्याविनियोगावांचून राहतोजो अ- वशेष अंश तो; उ० एक शास्त्रीबाबामात्र यावया- चे आहेत बाकीचे सर्व आले.

बाकीसाकी, स्त्री० बाकी इत्यादिक.

बांकी, स्त्री० लाहनजें बांका ह्मणून वाद्य तें.

बाकुटणें, रा० वृक्षादिक कोमेजणें.

बांकेकरी, पु० देव, राजा, इ०कांपाशीं बांका वाज- विण्याची चाकरी करितो तो.

बाग, पु० स्त्री० उपवन; २, कों० बांक द्वितीयार्थी.

बागट, ३लिं० कों० ईषद्वक्रजें काष्टादिक तो; २, न० तरवारीस निंदेनें ह्म०

बांगडखार, पुं० बांगड्या, इ० करावयास कांचेचा रस करण्याचे उपयोगीं एक खार आहे.

बागडणें, कों० कुत्रीं, मांजरें, इ० कानीं आनंदांत उड्या मारणें खेळणें.

बांगडी, स्त्री० स्त्रियानी मणगटांत धारण करा- याकरितां कांचेचीं वलयें करितात तीं प्र०; २, तदाकार रूपर्णादिकांचें केलें असतां त्यास ह्म०

बागणें, काष्टादिक वक्रतेनें युक्त होणें.

बागदोर, पु० घोड्याची काढणी.

**बागबगीचा**, पु० बाग, इ० तो.

**बौंगर**, पु०रा० ओंडीलजो टोणगा, बैल, इ० तो; २, ला० तत्सदृशजो फार वाढला आणि विद्यादि गुण ज्यांत नाहींत त्यास ह्म०

**बागवान**, पु० हिं० बागेंत संरक्षण इत्याद्यर्थ ठेविला असतोजो माळी, इ० तो; २, बागेंतील भाजी, इ० पदार्थ विकत घेऊन त्यांचा उदीम करणारी एक जाति आहे.

**बागशाई**, स्त्री० हिं० गृहादिकांपुढें स्थलास रम्यता यावी ह्मणून फुलझाडें. केळी, इ० वृक्षांचा करितातजो सन्निवेश तो.

**बागाइती**, ३लिं० बागाईत ज्यांत आहे असेंजेंस्थळ. ग्राम, इ० तो; २, बागाईतसंबंधीजो पदार्थ इ० तो.

**बागाईत**, न० पाटाच्या किं० विहिरीचापाण्यानें करितातजें नारळी, पोफळी, केळी, अंजीर, पेरु, रताळीं, रवपला, वांगी, इ० जित्रब तें किं० तें जित्रब करायाजोगें सोईचेंजें स्थल तें.

**बागींघ**, ३लिं० कों० बागट प्रथमार्थी.

**बागुरडा**, पु० झुरळ.

**बागूल**, पु० मुलांस भयप्रदर्शनार्थ एक भयंकरप्राणी कल्पून त्यास हें नाम ठेविलें आहे; २, मुलानी भ्यावें ह्मणून भयंकरजें सोंग आणितात त्यास ह्म०

**बागेसरी**, स्त्री० कानडेरागाचा एक भेद आहे; २, सोनें. इ० अटवायासाठीं दागीना, इ० तापवायासाठीं ज्यांत सोनार अग्नि प्रदिप्त करितात असेंजें मृत्तिकादिकाचें पात्र असतें तें.



**वांच**, **बाच**, पु० कोणेक कर्माविषयींजी अंतःकरणाची प्रवृत्ति चालली असत्ये ती अन्यथा व्हावयाजोगाजो भयादिसंभावनेनें अंतःकरणांत धर्मविशेष उत्पन्न होतो तो; खाणें धातूचे योगीं प्र०; उ० प्रथम काम करीन असें ह्मणत होता मग काय मनांत आलें नकळे लागलाच बांच खाल्लान.

**बाचकणें**, कांहींएकगोष्टीविषयीं अंतःकरणानें धरिलें असतेंजें संधान त्यापासून कांहींकारणानें भ्रष्ट होऊन चकितप्राय होणें.

**बाचकावणें**, कोणेकास कोणेकानें बाचके असा करणें.

**बाचणें**, तंडणें.

**बाचरट**, ३लिं० रा० बाचरा.

**बाचरा**, ३लिं० रा० ज्याचे भाषणांत ताळतंत नाहीं असाजो मनुष्य तो.

**बाचुकणें**, बाचकणें.

**बाज**, स्त्री० खाटलें; २, पु० कों० फलप्रधान किं० पुष्पप्रधानजे वृक्ष त्यांस त्यात्याकालीं येतोजो फलोद्गम किं० पुष्पोद्गम तो; ३, असभ्यगुणवाचक किं० दुर्व्यसनवाचक जे शब्द त्यापुढें प्रायः तें तें आहेज्यास या अर्थी हाप्रत्यय होऊन विशिष्टशब्द विशेषणें होतात; उ० ज्याचे अंगीं कुर्रा आहे तो कुर्रेबाज, दारूचें व्यसन आहे ज्यास तो दारूबाज, इ०; ४, वचक; खाणें धातुचे योगीं प्र०; उ० ज्यापुढे मोठेमोठे वीर बाज खातात तेथें तुह्मी पामराची कथा किती; बाज खाणें ह्म० आपले महत्वाचा अभिमान सोडून कांहीं कार्य करून घ्यावयासाठीं

यासाठीं नम्रपणें आर्जवानें कोणेकापाशीं वर्तूं लागणें.

**बाजणें**, कों॰ बाज द्वितीयार्थानें विशिष्ट होणें.

**बाजत**, अ॰ शिवाय, परंतु एकेअंशीं कांहीं विधानकरून अवशिष्टांशीं विरुद्धविधानाची जेव्हां विवक्षा आहे तेव्हां प्र॰; उ॰ एक धोतर मात्र राहिलें बाजत सारें चोरानीं नेलें.

**बाजरा**, पु॰ हिं॰ बाजरीत एक भेद आहे

**बाजरी**, स्त्री॰ हिं॰ एक धान्य आहे.

**बाजलें**, न॰ खाटलें.

**बाजवट**, पु॰ कों॰ चौरंग; २, ३लिं॰ बाज बहुत येतो जास असाजो वृक्ष तो.

**बाजा**, पु॰ अनेक वाद्यांच्या गजर तो.

**बाजांगूळ**, स्त्री॰ कों॰ बादांगूळ.

**बाजार**, पु॰ दुकानें मांडून क्रयविक्रयादिव्यवहार जेथें होत असतो तो जागा; २, तो दुकानें उदमीलोक याचा जमलेलाजो समुदाय आणि व्यवहार तो; ३, ला॰ गुप्तगोष्टीचीजी सर्वत्र प्रसिद्धि तो; ह्म॰ बाजार भरला नाहीं तोंच उचल्यानीं कमरा बांधल्या; ४, अव्यवस्थेनें कोणेकाचे गृहीं चालला असतोजो संसारादिव्यवहार त्यास आणि त्या गृहासही ह्म॰

**बाजारअफवा, बाजारआफवा**, स्त्री॰ कोणेक वर्तमानाविषयीं लेखपत्रादि प्रमाणाचें प्रत्यक्ष नसतांतद्विषयीं जनमुखानें श्रवण होत असत्येजी अफवा ती.

**बाजारअवाई, बाजारआवाई**, स्त्री॰ बाजार आफवा.

**बाजारकरी**, पु॰ बाजारांतील जे दुकानदार कि॰ बाजारांत जिन्नसपानस घ्यावयास गेलेजे मनुष्य ते प्र॰

**बाजारचलन**, ३लिं॰ बाजारांत ज्याची चलन आहे असाजो रुपया, पैसा, इ॰ तो.

**बाजारचलनी**, ३लिं॰ बाजारचलन.

**बाजारचीखाट**, स्त्री॰ कों॰ कलवीण, इ॰ जा सामान्यस्त्रिया त्यांची निंदाकर्तव्य असतां त्यांस ह्म॰

**बाजारनिरख**, पु॰ बाजारांत चालला असतोजो जिनसापानसाचा दर तो; २, अ॰ सर्व प्रसिद्ध; उ॰ तो बाजारनिरख सोदा; प्रायः दुर्गुणवर्णनीय असतां प्र॰

**बाजारनिरखा**, अ॰ बाजारनिरख द्वितीयार्थी; उ॰ त्याची बाजारनिरखी फजीती केली.

**बाजारबसवी**, स्त्री॰ बसवी.

**बाजारबसव्या**, ३लिं॰ निर्लज्जजो तो.

**बाजारबातनी**, स्त्री॰ हिं॰ बाजार आवाई.

**बाजारबातमी**, स्त्री॰ बाजार आवाई.

**बाजारबुणगें**, न॰ लढाऊ फौज सोडून दुकानदार, बायकापोरें, भडंगभिकार, इ॰ जे लष्करांत खटलें असतें तें; २, ला॰ कांहींएक कार्याविषयीं उपयुक्त मुख्य मनुष्यातिरिक्त जो मनुष्य समुदाय जमला असतो त्यास ह्म॰

**बाजारभरणा**, पु॰ खोगिरभरती.

**बाजारभरती**, स्त्री॰ बाजारभरणा.

**बाजारभाव**, पु॰ बाजारनिरख प्रथमार्थी.

**बाजारमहशूर**, ३लिं॰ बाजार, इ॰ सर्व जनांत प्रसिद्ध

प्रसिद्धजो मनुष्यादि तो किं० कांहीं गोष्ट तो.

**बाजारबाडा**, पु० रा० गावांत जेथें बाजार वसला असतो असाजो गांवांचा एक देश तो; २, ला० बाजार चतुर्थार्थी.

**बाजारशिरस्ता**, पु० व्याज किती घ्यावें वजन. माप, इ० घ्यावेंकसें, द्यावेंकसें, इ० विषयीं बाजारांत प्रवृत्त असल्येजी चाल तो.

**बाजारी**, ३लिं० बाजारसंबंधी जें माप, धारा, लोक, इ० तो; २, ला० केवळ निर्लज्ज, लुच्चा, जो मनुष्य त्यास ह्म०

**बाजारीण**, स्त्री० बाजारबसवी.

**बाजिंदा**, ३लिं० हिं० असभ्यपणाचें जें शहाणपण तें पुरें ज्यामध्यें आहे असाजो मनुष्य तो.

**बाजी**, स्त्री० प्रायः गंजिफा किं० सोंगटीं यांचाजो डाव ती; २, गंजीफांतील प्रतिरंगाचे बाराबारा पानांचेजे समुदाय ते प्र०; ३, गंजीफा खेळतांना एकेकाचे वांटणीस येतोजो पानांचा समुदाय तो.

**बाजू**, स्त्री० पदार्थमात्राचे वामदक्षिण जे पार्श्वभाग ते प्र० किं० तदुपलक्षित जे दिग्विभाग ते प्र०; उ० तो पंडित राजाचे उजवेबाजूस बसतो; २, पदार्थमात्राचे सभोंवतेजेविभाग ते प्र० किं० तदुपलक्षितजे दिग्विभाग ते प्र०; उ० यालोकडाचा चारी बाजू ताशींव आहेत; ३, फार मोठी जी सबंजी ती; ४, ला० परस्पर स्पर्धेनें प्रवृत्तजे वाद, युद्ध, इ० त्यांचे उपजीव्य जे दोन पक्ष ते प्र०; उत्कर्षापकर्षवर्णनप्रसंगीं प्र०; ५, अमूक आली, सर्वस्वें नाश व्हावा असाजो कोणेकावर येतो

संकर

संकरप्रसंग ती; ६ बाजी.

**बाजूबंद**, पु० स्त्रियांचें करभूषण आहे.

**बाजेगिरी**, ३लिं० खोटें नकलीजें लुगडें, खण. इ० सलंग तो.

**बाजेखर्च**, पु० हिं० मुख्य खर्चाहून इतरजो खर्च तो.

**बाझ**, पु० कों० बाज द्वितीयार्थी; उ० या माडास चांगला बाझ आला.

**बाझणें**, कों० बाजणें.

**बाझवट**, ३लिं० बाजवट द्वितीयार्थी.

**बाट**, पु० बाटलेपणारूपजो दोष तो; पड, अस, धातूचेयोगीं प्र०; उ० एकानें दुष्कर्म केलें त्याचे संसर्गामुळें सर्व गांवास बाट पडला; अक्षरवळणशुद्ध नसलें ह्मणून कांहीं पोथीस बाट पडला नाहीं; २, ३लि० बाडगा.

**बाटगा**, ३लिं० आचार विचार शून्य भ्रष्टजो मनुष्य तो.

**बाटणें**, नीच जातीशीं योनिसंबंधादि संबंध किं० अभक्ष्य भक्षणादि दुष्कर्म केल्यामुळें स्वजातीयांशीं अव्यवहार्यताप्रयोजकजो दोष तद्विशिष्ट होणें; २, वस्त्र. पात्र, इ० कांहीं पदार्थ मद्यादि दुष्ट वस्तु संबंधादिकानें भोजनादिव्यवहारविषयीं घ्यावयास अयोग्य होई अशा दोषानें विशिष्ट होणें.

**बाटाबाट**, स्त्री० विटाळ, सोवळें, ओंवळें, यांचा कोणेकस्थळीं होतोजो संकर ती; २, व्यभिचारादिकामुळें होतोजो भ्रष्टाकार ती.

**बाटूक**, न० ओंधळ्याच्यां ओलीं लहानजीं तारें ती

बाट्या

**बाट्या**, १लिं० बाटलेलाजो मनुष्य तो; २, ला० बाटगा.

**बाँठ**, स्त्री० अंबाजून झाला-ह्मणजे त्याचे बी वर कठीणहोतेंजें फवच ती.

**बाँठळ**, ३लिं० बांठायुक्त झालाजो आंबाह्मणून फल तो.

**बाँठळणें**, आंब्याचे फळ बांठ्यानें युक्त होणें.

**बाँठा**, पु० कों० आंब्याचे फळांतील बाठीनें विशिष्टजी बी तो; २, ला० आघातादि झाल्यामुळें शरीरावरजो उंचवटा उठतो तो; ३, काथाकराचासाठीं कुजत घालितातजी चोडें त्यांत न कुजतां राहतोजो कठिनांश त्यासकिं० तत्सदृश केश, इ० कांचा जमून चट्ट गोळा होतो त्यास ह्म०

**बाँठाळ**, ३लिं० बांठळ.

**बाँठी**, स्त्री० बांठा प्रथमार्थी.

**बाँठूक**, न० कों० ठेंगणाअसून बळकटजो मनुष्यादिक तें.

**बाड**, न० हिं० वैद्यक, ज्योतिष, इ० ग्रंथाचे वेंचेवेंचे लिहून जी वही केली असत्येतें; २, विवक्षित स्थल आरत व्हावें ह्मणून मा० कनाथांचें करितातजें आवरण तें.

**बाँड**, पु० उणारव लुगड्यांत एक भेद आहे; तो तरणा बांड आहे ह्म० तो तरुण असून निरोगी बळकट असा अर्थ; २, कांदा, नागरवण, इ० किती एकांस सुन्याचा येतोजो दांडा तो; ३, न० कणीस येण्याचे अवस्थेस येऊन रोगादिकारणानें जावर कणीस आलें नाहीं आणि मेलें किं० कोंबळीं कणसें सुरें, इ० कांनीं जाचीं मोडिलीं असाजो आंधळा, सजगुरा, तें.

**बाडगा**, ३लिं० मोठा हरामीजो मनुष्यादिक तो.

**बाँडगूळ**, न० अंबा, इ० वृक्षावर उगवत असतें असें एक झाड आहे.

**बाडबिछाद**, स्त्री० हिं० चिरपूट, पांघरूण, भांडेकुंडें, इ० जो उपकरणसंघात ती.

**बाडबिशाद**, स्त्री० हिं० बाडबिछाद.

**बाँडा**, ३लिं० जाचे अंगाची मुई एका रंगाची असत्ये आणि तदितर रंगाचे पट्टे असतात असाजो बैल, कुत्रा, इ० पशु तो; २, कदाचित् तादृशवर्णाचेंजें वस्त्र त्यास ह्म०

**बाडी**, ३लिं० बाडसंबंधी वही, औषध, तो; २, दे० शास्त्र पुरतें नपढतां बाडावरूनच वैद्यपणा, इ० करणाराजो जोशी, वैद्य, इ० त्यास ह्म०

**बाण**, पु० धनुष्यानें मारायाचाजो तीर तो; २, लोखंडाचे नळीत दारू रचून त्यास काठी बांधून केला असतोजो आयुधविशेष तो; ३, तत्सदृश कागदाचे तोंड्यांत किं० कळकाचे नळकंड्यांत दारू भरून जो पदार्थ करितात तो; हातचा बाणप्रमाणिणें, इ० स्थलीं वादादिव्यवहारीं आपली विवक्षानुरूप सिद्धि होण्यास आपल्यापाशीं असतेंजें कोहीं साधन तें रवडणें; शब्दबाण, वाग्बाण, इ० स०; ४, नर्मदेंतील पाषाण, जास शिव मानून पुजितात तो.

**बाणणें**, कांहींएक गोष्ट मनांत पुरतेपणीं ठसणें; उ० ही गोष्ट माझे मनांत बाणली.

**बाणदार**, पु० लोखंडी बाण वागवणारे जे राजादिकांनी शिपाई ठेविले असतात ते प्र०

**बाणा**, पु॰ विद्वत्ता, धनिकत्ता, शूरत्व, गायकता, इ॰ गुण समुदायांतील आ गुणातें पुढेंकरून लोकामध्यें वागतोजो त्याणें त्या गुणाविषयीं मी अमुकगुणविशिष्ट आहे असा अंतःकरणांत धरिला असतो अभिमान तो; २, एक आयुधविशेष आहे; ३, वस्त्रादिकांचाठायीं आडवाजो तंतुसंनिवेश तो; प्रा॰ ताणायाचासंनियोगीं प्र॰; उ॰ या धोत्रजोड्याचा ताणा आणि बाणा सारखा आहे.

**बाणाईत**, पु॰ जाजा विद्या कलादिकांचाजो बाणा बाळगतो तो त्यात्याविषयीं; २, बाणदार.

**बाणी**, स्त्री॰ हिं॰ पठितव्य वस्तुजें ध्रुपद, ख्याल, श्लोक, इ॰ तें एकच असतां ह्मणायाचाजा अनेकचाली त्या प्र॰; २, गलबत, धक्का, भिंत, इ॰कांचीजी केवळ कड ह्मणजे जेथून ईषन्मात्रपुढें कांहीं पदार्थ गेलाअसत्तां खालीं पडतो ती; कोणेकानें बाणीवर येणें ह्म॰ निकरावर येणें; ३, जेथेंजें उद्योगादि करायाचें त्यांत ईषन्मात्र अंतरपडल्यास पूर्वप्रवृत्तजो वादादि व्यवहार तो विध्वस्त होऊन मोठें कांहीं संकट प्राप्त होतें असाजो त्यात्या व्यवहाराचा जपून संभाळायाचा समय ती; उ॰ यावेळेस जर तुह्मी जामीन रहाल तर मोठी बाणी संभाळलीजाईल; ४, बाणा प्रथमार्थी.

**बाणीचा**, ३लिं॰ बाणाईत प्रथमार्थी; २, चांगलेबाणीवर ह्मणतातजो श्लोक, ध्रुपद, किं॰ सांगतातजें पुराण, इ॰ तो.

**बाणीदार**, ३लिं॰ चांगली आहे बाणी ज्याची असेंजें गाणें, ह्मणणें, इ॰ तो; २, बाणाईत प्रथमार्थी.



**बाणेदार**, ३लिं॰ बाणाईत प्रथमार्थी.

**बाण्याचा**, ३लिं॰ बाणाईत प्रथमार्थी.

**बात**, स्त्री॰ हिं॰ गप.

**बातनी**, स्त्री॰ बातमी.

**बातनीदार**, पु॰ बातमीदार.

**बातमी**, स्त्री॰ दूर देशादि परोक्षस्थलींचें जें कांहीं वर्तमान ती; बातमी ठेवणें किं॰ राखणें ह्म॰ विवक्षित कोणेक वृत्त आपल्यास समजल्यावांचून नराही असें संधान ठेवणें.

**बातमीदार**, पु॰ परराज्यादि विवक्षितस्थलींचें वर्तमान आपल्यास समजावें ह्मणून त्या कामावर नियुक्त असतोजो दूत तो.

**बातल**, ३लिं॰ हिं॰ खोटेंजें वर्तमान, भाषण, लेख, इ॰ तो; २, तें बोलण्याचा स्वभाव ज्याचा असाजो मनुष्य तो.

**बात्या**, ३लिं॰ निर्मूल खोटेंच कांहीं वर्तमान करून सांगण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बाद**, ३लिं॰ वि॰ कोणेक गणतीचे क्रमामधें संबद्ध असून तेथें नाहीं असा केलाजो कांहींएक अर्थ तो; घाल, कर, पड, इ॰ धातूंचेयोगीं प्र॰; उ॰ पन्नासशिपायांतून दहा शिपाई बाद घातले; पंचविसांत पांच बाद घातले बाकी वीस राहिले; माझें नांव पटास होतें तें बाद पडलें.

**बादखासा**, ३लिं॰ केवळ खासा नव्हे, केवळ खर्ची नव्हे असा मध्यमप्रतीचा बांधलेलाजो घिडा, पट्टी, तो; २, केवळ पक्कें नव्हे, केवळ कच्चें नव्हे, असें मध्यम पिकलेलें जें विड्याचें पान तो.

**बादणें**, बाद करणें.

**बादबाकी**, स्त्री० باقی मोठ्या रकमेंतून लहान रकम वाटूनजी बाकी रहात्ये ती.

**बादला**, पु० بادل कलाबतू करायासाठीं किं० एरवींच वस्त्रांत विणायासाठीं वापरलेल्याजा तारा तो, २, परवालेचा एका आंरव्यासारिखें पाणीभरून ठेवायाचें चर्मपात्र आहे.

**बादली**, ३लिं० हिं० कांहीं सूत, रेशीम, यांचें तंतू आणि कांहीं वादलामिळून विणलेलेंजें पागोटें दुपट्टा, इ० वस्त्र तो.

**बादशाह**, पु० हिं० पादशाह.

**बादशाही**, ३लिं० स्त्री० पादशाही.

**बाँदा**, पु० रा० बंदा; परंतु प्रथमार्थी प्रयोग थोडा.

**बादांगूळ**, स्त्री० कों० बांडगूळ.

**बाँदी**, स्त्री० रा० दासी.

**बाँदीचा**, ३लिं० रा० लंवडीचा.

**बाँध**, पु० उदकादिकाचा प्रतिबंधार्थ दगड, चुना, किं० माती, इ० कांचाजो रचनाविशेष करितात तो; २, बंद प्रथम द्वितीयार्थी.

**बाध**, पु० शब्दादिप्रमाणानें कोणेक कर्मादिकास येत्येजी प्रतिषिद्धता तो किं० कोणेक कर्मादिकास असत्येजी प्रतिषेधार्हता तो; उ० या उत्सर्गाचा त्या विशेषविधीनें बाध होतो; रांडेस रांड म्हटलें असतां बाध नाहीं खरा परंतु म्हणूं नये.

**बाधक**, ३लिं० जा वचनादिकांचें स्वविषयीं बाध करणारेंजें विशेषविध्यादिरूपप्रमाण तो त्याचा; २, विवक्षित व्यवहारास प्रतिकूल जें लेख, पत्र, कर्म, इ० तो; उ० आह्मी मागें याला दस्तऐवज दिला तोच आतां आह्मांला बाधक झाला.



**बाँधरणें**, रा० बांठळणें.

**बाँधण**, न० कों० ओढा, डोंगराचें खोरें, इ० स्थळीं पाणी अडे असें मोठमोठे बांध घालूनजी शेतजमीन साधिली असत्ये तें; २, पर्जन्यानें शेत वाहूनये म्हणून घालितात जी ताल तें.

**बाँधणी**, स्त्री० गृह, बांध, विहीर, पागोटें, मुडा, इ० बांधण्याचाजो प्रकार ती; २, गृहादि बांधण्याचाजो व्यापार ती; ३, ३लिं० बांधणसंबंधी जी जमीन, धान्य, इ० तो.

**बाधणें**, केलेलें कर्म, सेविलेला पदार्थ किं० झालेली कांहीं गोष्ट, इ० तो उपद्रवदायकत्वेंकरून परिणत होणें; उ० मी शीतोदकानें स्नान केलों तें मला बाधलें; काल हरभऱ्याची उसळ खाल्लीती बाधली; त्याचा शाप याला बाधला; २, पिशाचानें कोणेकास उपद्रवदायक होणें; ३, कोणेक वचनादिकानें कोणेक वचनादिक बाधविशिष्ट करणें.

**बाँधणें**, सकर्म; निराळेनिराळे जे पदार्थ ते एकत्र संयुक्त करून त्याणी वियुक्त नहोतां तसेंच संयुक्तपणें रहावें म्हणून सूत्र, दोर, वस्त्र, इ० कांचेंजें वेष्टन ग्रंथि, कांहीं निकटपदार्थांशा संबंध, इ० रूपजो कांहीं अटकावतेणेंकरून विशिष्ट करणें; जेव्हां मनुष्यादिपदार्थ स्तंभादिकाशीं संबंद्ध करायाचा अशी विवक्षा आहे तेव्हां त्यामनुष्यादिकांस कर्मता आणि जेव्हां अनेक पदार्थ परस्पर संयुक्त असावे अशी विवक्षा तेव्हां त्या पदार्थसमुदायास कर्मता; २, काष्ठ, इ० एकच पदार्थ दोरी, इ० कानें घट्ट वेष्टित करणें;

३, दोरी, सूत, वस्त्र, इ॰ कोणेक पदार्थाशीं वियुक्त नहोतां राही असें ग्रंथ्यादिकानीं युक्त करणें; ४, पूल, बांध, घर, घाट, नौका, इ॰ दगड, चुना, माती, लांकूड, इ॰ पदार्थांनीं तत्तदाकारविशिष्ट रचनेनें निर्मिणें; ५, विहीर, तळें, थाट, घाट, घाटी, इ॰ बंदिस्तीनें विशिष्ट करणें; ६, एकापुढें एक, एकापुढें एक, इ॰ प्रकारें अनेक शब्द, अर्थ, इ॰ पदार्थ संनिविष्ट करून ग्रंथादिक जो विशिष्ट धर्मी तो निर्मिणें; ७, व्यवस्था, रीति, प्रमाण, इ॰ नियामकानें व्यवहारादि नियमित करणें; ८, लोभ, स्नेह, माया, इ॰ कानीं कोणेकास त्यात्या विषयाशीं गुंतविणें; ९, अटकळ, तर्क, युक्ति, कल्पना, इ॰ असें झालें असतां असें होईल, इ॰ प्रमाणाचा ऊहापोह करून त्यात्या योग्य योजनेनें तेंतें सिद्ध करणें; १०, जोडा, जुतें, इ॰ अनेक चर्म खंडें एकत्र शिवून नवें सिद्ध करणें; ११, चिखल, साखरेचा पाक, इ॰ जमून गोळा, दाणा, वडी, इ॰ आकारविशेषयुक्त पदार्थ सिद्ध होणें; १२, कणीस, शेंग, इ॰ कांचा ठायीं दाणा, नारळांत खोबरें, पोफळांत सुपारी, इ॰ काळयोगानें परिपाक होऊन सिद्ध करणें; पागोटें बांधणें ह्म॰ डोकी, गुडघा, इ॰ कांवर गुंडाळून डोकीस घालायाजोगें रचनेनें विशिष्ट करणें किं॰ कोणेकास सन्मानार्थ देणें; कोणेकाशीं वैर, द्वेष, स्पर्धा, इ॰ बांधणें ह्म॰ करणें; दरबार, इ॰ कांचा ठायीं पक्ष, संधान, इ॰ बांधणें ह्म॰ स्वविपक्षानुरूप कार्य तेथून ह्मटलें वेळेस होईं असें संधान करून ठेवणें; दिशा बांधणें ह्म॰ मंत्रप्रयोगानें भारणें; दृष्टि बांधणें ह्म॰ मंत्रप्रयोगानें एक असतां भलतेंच दिसावें अशा मोहानें विशिष्ट करणें; देवादिकांची पूजा बांधणें ह्म॰ पुष्पादिकानीं देवतादिक सुशोभित दिसाया जोग्या योग्य रचनेनें त्या देवतादिकांवर ती पुष्पादि रचित करणें; ताड माड बांधणें ह्म॰ त्यांपासून मद्य निघे असें त्याची पोई बांधून ठेवणें; घोड्यास नाल बांधणें ह्म॰ त्याचे पायांस खिळ्यानीं संबद्ध करणें; ताप, ज्वर, हींव, इ॰ बांधणें ह्म॰ त्याणें शांत व्हावें ह्मणून मंत्रप्रयोग विशिष्ट कांहीं एक कुचेड्यानें अभिसंबद्ध करणें; तो त्याचा बांधला आहे ह्म॰ ओशाळगत, इ॰ कारणानें केवळ स्वाधीन झालेला आहे; १३, न॰ रा॰ कोणेकस्थलापासून जो पाण्याचा पाट चालला असतो त्यास मध्यें मध्यें पाणी मोडून न्यावयाकरितां जीं द्वारें राखिलीं असतात तीं प्र॰; १४, त्यात्या द्वारांचा प्रतिबंधार्थ तेथें लावायासाठीं सोपें, गवत, इ॰ एकत्र गुंडाळून जो चोंथा करून ठेविला असतो तें; शेवटचे बांधण्यास पाणी मोडणें ह्म॰ तोडमोड, रदबदल, इ॰ होण्याची योग्यता न राही असें शेवटचें भाषण करणें; ह्म॰ शिकविली बुद्धि आणि बांधली शिदोरी सर्वदा पुरत नाहीं.

बांधन, न॰ कांहीं बिध्यादिक बांधण्याचा जो व्यापार तें.

बांधप, न॰ रा॰ घराचें ओंबण, इ॰ बांधायाचें साधनजें स्तंभ, दोर गुंडें, इ॰ तें.

बांधबांधोळी, स्त्री॰ शेताचे जमीनीस लहानमोठें बांधतीं.

**बांधलेकंबरेचा, बांधल्याकंबरेचा**, ३लिं० रा० कांहींएक कार्यकरण्याविषयीं ह्मटले घेळेस सिद्ध व्हावयाजोगा जो शिपाई, इ० तो.

**बांधलेकमरेचा, बांधल्याकमरेचा**, ३लिं० रा० बांधलेकंबरेचा.

**बांधव**, पु० सं० भाऊ, चुलता, इ० जे स्वगोत्रींचे किं० मामा, त्याचापुत्र, श्वशुर, इ० जे सोयरेधायरे, इ० स्वसंबंधी ते प्र०

**बांधवाट**, स्त्री० रा० दगडानीं बांधलेली जी वाट ती.

**बाधा**, स्त्री० पिशाचादिकृतजी पीडा ती.

**बांधा**, पु० शरीराचे हस्तपादादि अवयवांचा संनिवेशाचाजो प्रकार तो; २, ३लिं० कों० बंदानृती याथी.

**बांधारणें**, रा० बांधरणें.

**बांधारी**, स्त्री० ओंबण, इ० कास बळकरी यावी ह्मणून जा त्यास मध्येंमध्यें उभ्या काठ्या बांधितात त्या प्र०

**बांधाबांध**, स्त्री० अनेक ओझींपाशीं, इ० बांधण्याचाजो व्यापार ती.

**बांधाबांधी**, स्त्री० बांधाबांध.

**बांधावळ**, स्त्री० ग्रंथ, वाडा, किल्ला, पूजा, इ० कांचाजो रचनाप्रकार ती; उ० या ग्रंथाची बांधावळ चांगली आहे.

**बाधित**, ३लिं० बाध झाला आहेजाचा तो; उ० हें वचन त्या विशेषवचनानें बाधित आहे.

**बांधील**, स्त्री० कों० भाताची लाणी झाल्यानंतर त्याचे भारे बांधण्याचाजो व्यापार ती; २, ३लिं० रा० ओशाळगत इ० कारणानेंजो जाचा बंदा तो त्याचा.

**बांधींव**, ३लिं० अगोदर बेत देऊन बांधिवलाजो जोडा, जुतें, इ० तो; २, बेतापासूनही चांगल्ये बंदिस्तीचाजो जोडा, इ० तो; ३, बंदिस्त करून केलेली विहीर, तळें, इ० तो; ४, पोटीं शिसें, इ० कांहीं खोटी धातु घालून सोनें, रुपें, इ० कांचा लगड, रुपया, इ० पदार्थ केला असतो तो.

**बांधें**, न० बांडगूळ.

**बाध्य**, ३लिं० बाधकानें जाचा बाध करायास योग्य तो.

**बाप**, पु० जाचे वीर्यापासून जो उत्पन्न झाला त्याचा तो; २, दत्तकत्वादिरूपजें गौण पुत्रत्व किं० कन्यात्व तें यन्निरूपनिरूपित जास आहे त्याचा तो; ३, ग्रंथादिकांत संबोध्यजे त्यास सत्कारानें या शब्दानें संबोधन करितात; तो बापास बाप ह्मणायाचा नाहीं, इ० स्थलीं हिशेबाचे वाजवीगोष्टीस कोणाची मुरवत धरायाचा नाहीं असा खडखडीत स्वभावाचा; ह्म० बापासबाप ह्मणत नाहीं तो चुलत्यास काका कोठून ह्मणणार

**बापजन्मांत, बापजन्मी**, अ० जन्मल्यापासून एतावत्कालपर्यंत; कोणेक पदार्थादिकांचेंजें दर्शन, उपभोग, इ० द्वाराजो संबंध त्यास केवल अपूर्वत्व वर्णनीय असतां प्र०; त्या दर्शनादिकांचे नसण्याचें वि०; उ० मी बापजन्मांत कोणाचें उणेंउत्तर बोलून घेतलें नवतें तें तूं आज बोललास असो.

**बापजादे**, पु० वाड वडील नित्यें अनेकवचनांत.

**बापडा**, पु० प्रकृतीचा गरीब निरापराधअसून कांहीं संकटांत सांपडलेलाजो मनुष्यादि त्यास करुणेचा कळवळ्यानें तत्समयीं ह्म०; उ० ज्याने चोरी केली तो पळाला आणि या बापड्या वाटसराला किंहो उगीच मारितात; २, औदासिन्य विवक्षितअसतां तद्योतनार्थ याचा प्र० होतो; उ० करणारतर करा बापडें माझें काय गेलें.

**बापदादे**, पु० बापजादे.

**बापदेव**, पु० बापा.

**बापभाऊ**, पु० आपलाजो दायाद तो.

**बापभावकी**, स्त्री० रा० भाऊबंदकी.

**बापया**, पु० कों० बाप्या.

**बापरोटी**, स्त्री० बापानें मिळवलीजी वृत्ति, द्रव्य, भूमि, इ० तीस ह्म०

**बापळी**, स्त्री० कों० रानची पालेभाजी आहे; २, तिचें बी.

**बापा**, पु० कों० पिशाचदेव आहे.

**बापुड्याणा**, ३ लिं० अधिकार गेला, आईबाप मेले, इ० कारणामुळें लोकानीं बापडा ह्मणायाजोगा झालाजो पोर, पुरुष, इ० किं० त्याचें तदनुसार भाषण तो.

**बापुडा**, ३ लिं० ग्रं० बापडा.

**बापू**, पु० पुरुषास प्रतिष्ठानाम आहे.

**बापूस**, पु० कों० बाप.

**बाप्या**, पु० बाल्य जाऊन प्रौढदशा प्राप्त झालीजास तो.

**बाब**, स्त्री० हिं० कानू.

बांबट

**बांबट**, स्त्री० रा० कांहीं बारीकबारीक पाऊस मेघाची अंधारी वारा थंडगार वाहत असतो अशी. जी पर्जन्यकाळीं एखादेदिवशीं हवा होत्ये ती.

**बाबत**, अ० हिं० कांहीं एका निमित्तें; हा शब्द त्या निमित्तभूताचे पुढें लागतो; उ० याकर्माबाबत त्यास शंभररुपये दंड बसला; २, स्त्री० कांहीं गोष्ट दुसऱ्यानें सांगितली ती मनांत करायाची नाहीं विचारलेंतें नीट सांगायाचें नाहीं, इ० कारणास्तव त्यास मारायासाठीं भलतेंच कांहीं लावितातजें निमित्त तें.

**बाबता**, पु० एक वस्त्र आहे.

**बाबती**, स्त्री० देशमुख, देशपांड्ये, इ० कांचे जे मुलुकावर हक्क असतात त्या; हा शब्द नित्यें बहुवचनांत.

**बाबद**, अ० हिं० बाबत.

**बांबर**, न० घा० सर्वदा चिखल असतो जा जमीनींत तें.

**बाबरओंट्या**, ३ लिं० फार मोठे जाड ज्याचे ओंठ तो; उ० शिद्दी प्रा० बाबरओंठ्ये असतात.

**बाबरझोटी**, स्त्री० ग्रं० खालीं लोंबायाजोगे मस्तकावर वाढलेलेजे केंस ती.

**बाबलणें**, रा० पाणी, खत, इ० मिळाल्यामुळें झाडानें बलधरून पत्रशाखादिकानी पुष्ट होऊन विस्तृत होणें.

**बाबा**, पु० प्रा० बापास ह्म० किं० प्रतिष्ठार्थ कोणएका पुरुषाचे नावापुढें लावून ह्म० किं० एरवींच ह्म०; बाबापुता करणें ह्म० पुत्र, चाकर, इ० कांपासून कांहीं काम करावा यांकरितां रागें न भरतां

आर्जवानें

आर्जवानेंच बोलणें.

**बाबू**, पु० हिं० बैरागी. गोसावी. इ० गृहस्थलोकांस ह्म०; २, या० लेकरें लहान मुलांस ह्म०

**बांबू**, पु० वेळूमध्यें एक भेद आहे.

**बांबूट**, स्त्री० कों० जून न होतां पिकल्यासारखें दिसतें जें आंब्याचें फळ ती.

**बाबे**, अ० हिं० बाबत; उ० या बाबे हजार रुपये खर्च केला.

**बाब्या**, पु० लाडिकपणानें किं० निंदेनें पुरुषरूप अर्भकास ह्म०

**बाभळ**, स्त्री० बाभूळ.

**बाभूळ**, स्त्री० एक वृक्ष आहे; तुझी यांत काय बाभूळ बुडाली ह्मणजे तोटा झाला; बाभळीस कांटा लावणें ह्म० यद्दोषवैशिष्ट्येंकरून प्रसिद्ध जो पुरुष त्यावर त्या दोषाचा आरोप करणें; ह्म० ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी.

**बाम**, स्त्री० एक मत्स्यजाति आहे.

**बामण**, ३लिं० शेणव्यांत एक भेद आहे.

**बाह्मणी**, ३लिं० कांकडी, पाल, सरडा, यांत भेद आहे ज्यांचा वर्ण पांढरा असतो ती; प्रा० इहभ्रापावृत्ति.

**बायक**, ३लिं० गंजीफांचे डावांत हुकूम जें पान तो; प्रा० उत्तारीचे वेळेस प्र०

**बायको**, स्त्री० मनुष्यादिजीवजातिमध्यें अवांतर दोनदोन भेद आहेत त्यामध्यें एकाचे अंगीं गर्भनिदानभूत शुक्र उत्पन्न होतें आणि दुसऱ्याचे पोटीं तें शुक्र मैथुनादिसंबंधें गर्भता पावून प्रसव होतो त्यामध्यें जो दुसरा भेद ती; २, वृक्षादिकांत एका जातीमध्यें कितीएकांस फळें येतात आणि कितीएकास कदापि येत नाहींत्यांत ज्यांस फळें येतात त्यास ह्म०; ३, स्त्रीलिंगविशिष्ट ज्याचें नाम त्यासही ह्म०; ४, बाईल; बायकांचें शास्त्र न० जे विधिनिषेध धर्मशास्त्रीय आकरग्रंथीं प्रा० नाहींत आणि पुरुषही ज्यांजवर फारशी निष्ठा ठेवीत नाहींत असे स्त्रिया मानितात जे विधिनिषेध त्यास ह्म०

**बायकोयेल्हाळ**, ३लिं० रा० बाइलवेडा.

**बायबऱ्या**, ३लिं० चालणें, बोलणें, इ० बायकासारखें ज्याचें दिसतें असा जो पुरुष त्यास ह्म०

**बायल्या**, ३लिं० बायबऱ्या.

**बाया**, स्त्री० रा० प्रा० आईस किं० आईसारखे स्त्रीस ह्म०

**बार**, पु० हिं० तोफ, बंदूक, इ० कांत अवाज काढायासाठीं भरली असल्येजी दारू. ती किं० तेणेंकरून होतो जो अवाज तो; २, प्रसंगविशेषीं बंदूकेनें विशिष्ट जे शिपाई त्यांस ह्म०; ३, फटाका, स्फुरंग, इ० कांचा जो तत्सदृश अवाज होतो त्यास ह्म०; बार भरणें ह्म० कोणेकास विवक्षितव्यवहारीं स्वविवक्षितानुरूप वर्तण्याविषयीं एकांतीं शिकवून ठेवणें; कांहीं एक कामाचा बार उडविणें ह्म० तत्साधकसामग्रीची सिद्धता गुप्तरूपें यथास्थित करून ठेवून तें विवक्षित काम अकस्मात् आरंभून एकाएकीं संपवून टाकणें; ४, वृक्षलतादिकांस त्यात्याकालाद्यनुरोधानें फळें, पुष्पें, किं० पर्णें यांचा उद्गम होऊन तींहींतींहींकरून संमृद्ध असावें अशा ज्या वारंवार अवस्था प्राप्त

म होतात त्या प्र०;५, तीळ,पाणी, इ० कांस पुष्यादिसुगंधानें विशिष्ट करण्यासाठीं पुष्पादिमिश्रणरूपजे संस्कार करितात ते प्र०; ६, उभयतां परस्परस्पर्धेनें एकमेकांस दमधावें म्हणून चरानें म्हणतात जें श्लोकादि तो; घाल, टाक, इ० धातूंचे योगीं प्र०; ७, भार; ८, न०रा० तुळई; बार करणें म्ह० फीर्यादीवरचें कलम रखतावणीस किं० हुंडी, रोखा, चिठी, इ० जांगड, बेहडा, इ० कांवर लिहून ठेवणें किं० रोखा, चिठी, इ० बार याअक्षरानीं चिन्हित करणें.

**बारकस**, न० जिन्नसपानस भरून वहायाचे उपयोगीजें गलबत तें.

**बारका**, ३लिं० बारीक.

**बारकाई**, स्त्री० बारीकपणा; परंतु प्रा० बुद्धिकौशल्य ग्रंथ व्यापारादि इति.

**बारकावणें**, बारीक होणें; उ० पाऊस अंमळ बारकावला म्हणजे जाऊं.

**बारकावर**, ३लिं० वा० मध्यम बारीकजें सूत, धान्य, इ० तो.

**बारकावा**, पु० बारकाई.

**बारगळ**, ३लिं० कोणाएकाचा शिक्षेंत नराहतां स्वच्छंदाचारीजो पोर, गुरूं, इ० तो.

**बारगळणें**, बारगळ होणें.

**बारगा**, ३लिं० वा० बारगळ.

**बारगिरी**, स्त्री० बारगिराचें कर्म ती; २, ३लिं० बारगीरसंबंधीजें घोडें, पोशाख, इ० तो.

**बारगीर**, पु० सर्कारचे पागेचे घोड्यावर स्वाररहोऊन लष्कर, इ०कांत चाकरीकरतोजो शिपाई तो.



**बारणें**, कों० काम ओझें इ० दुसऱ्यावर ओपणें.

**बारदान**, न० हिं० तेल, तूप, धान्य, इ० जिन्नस सांठवून ठेवायाचे उपयोगींजें बुधला, कणिंग, पाटी, पोतें, इ० तें; २, कों० झाज, इ०कांवर माल मनुष्य, इ० रूप येतेंजें ओझें तें.

**बारदार**, ३लिं० कों० केवळ म्हातारे झाल्यामुळें लाग जाऊन कमी झाला असें नव्हे आणि तुकतेंच लागास आलेलें असें नव्हे असेंजें लागतें माड, पोफळ, फणस, उंडीण, इ० झाड तो.

**बारनीस**, पु० हिं० चिठी, रोखा, याद, इ० बार करण्याविषयीं सर्कारांतजो अधिकारी करून ठेविला असतो तो.

**बारबंडा**, ३लिं० बारगळ.

**बारभाई**, स्त्री० हिं० कोणेक व्यवहारीं अव्यवस्थाप्रयोजक अनेकमतांचेजे अनेक तत्तन्नाकांतजें येतें ती; २, पु० कोणेक व्यवहारीं मिळालेले अनेक मतांचेजे अनेक ते.

**बारमहां**, अ० बारा महिने.

**बारमाशीखरबूज**, न० खरबुजांत एक भेद आहे.

**बारमास**, अ० बारमहां.

**बारमाही**, ३लिं० हिं० बारामहिन्याचाजो रोजमुरा, वसूल, चाकरी, इ० तो; २, अ० बारमहां.

**बारव**, स्त्री० थोरजी विहीर ती.

**बारवरशीसोळवरशी, बारवर्षेसोळवर्षे**, ३लिं० कोणेक मोठ्या व्यवहारीं एकही आंत प्रौढ नाहीं असे एक जात अप्रौढ, नवे, मिळालेलेजे अनेक मनुष्य त्यांस म्ह०; नित्यें अनेकवचनांत.

बारस, बारशी, स्त्री० द्वादशी.

**बारसकडी, बारसखडी**, स्त्री० मूलवर्णास काना, मात्रा, वेल्हांटी, व्यंजन, विसर्ग लाऊन जो ह्रस्व दीर्घादि भेद होतो तत्बोधक कसकानादिल्याका, इ० रूप ती; या सर्व बारसकड्यांचें प्रकरण प्रसिद्ध आहे.

बारसा, पु० रा० बारसें.

बारसें, न० जन्मदिवसापासून प्रा० बारावेदिवशीं जो नामकरणसंस्कार करितात तें; तुझ्या बारशास मी जेवलोंआहे, इ० स्थलीं तुझ्यानें मी ठकला जाणार नाहीं.

बारा, १ लिं० संख्या आहे १२ बारा करणें, ह्मणणें, क्रिं० बाराचा फाडा लेखें इ० वाचणें, इ० ह्म० पळून जाणें; बाराबत्तीशा नाचणें ह्म० तीनतेरागोष्ठी सांगणें; बाराबाबू, पु० बारभाई द्विर्तीयार्थी; बारापिंपळावरचा मुंजा, पु० जाचीं स्वकार्यार्थ जाण्यायेण्याचीं स्थलें अनेक असतात अतएव स्मरलेवेळेस अमुकस्थलीं सांपडेल असा नेम करतां येत नाहीं असाजो मनुष्य त्यास ह्म०; बारा बारा होणें ह्म० जमलेलें जें सैन्य-दवलत, इ० त्याची वाताहत होणें; त्यास बाराबारा मोकळ्या आहेत ह्म० प्रसंगीं पाहिजे तें कर्म करण्यास मोकळीक आहे; ह्म० पळणारास एक वाट आणि शोधणारास बारा वाटा; उदीम करतां सोळाबारा आणि शेत करतां डोईवर भारा; बारा महिनें, अ० मधें मासपक्ष, इ० खाडा न पडतां सर्वकाल; उ० हिमाचलावर बारामहिनें थंडी असत्ये; २, पु० जा समुद्रकांठचे बंदर, किल्ला, गांव, इ० स्थला चे समोरचाजो समुद्रांतील प्रदेश तो त्या बंदर इ० कांचा; उ० मुंबईहून सकाळीं निघालों ते दोनप्रहरीं रूरनचे बाऱ्यावर आलों.

बाराखडी, स्त्री० बारसखडी.

बाराबलुतीं, न० गांवांत महार, जोशी, कुंभार, इ० संबंधी बाराजीं बलुतीं तीं.

बारावा, १ लिं० क्रमानें मेजिलें असतां बारा या संख्येचा विषयजो होतो तो; कोणेकाचा कोणेकाशीं बारावा बृहस्पति असणें ह्म० त्याचें त्याचें वद्धकटास असणें; २, पु० मृताचा बारावे दिवशीं जें कर्म करितात तो.

बारी, स्त्री० डोंगर, झाडी, याचा आश्रयामुळें जेथें चोर व्याघ्रादिकांची संभावना असत्ये अतएव मार्गस्थांस भयंकर असें जें स्थल ती; २, पालट प्रथमार्थीं; ३, वारा किं० प्रकाश याया ह्मणून गृहादिकांस जी खिडकी राखिली असत्ये ती.

बारीक, ३ लिं० विवक्षितपदार्थापेक्षां विस्तारपरिधि ज्याचा कमी असाजो स्तंभ शरीर शरीरावयव स्थूल, इ० तो किं० ज्याचा सर्वत; परिधि कमी असाजो दाणा, खडा, सुपारी, लवंग, इ० तो; २ ज्याचे सूत्र, कण, इ० अवांतर अवयव बारीक असाजो वस्त्र, पीठ, इ० पदार्थ तो; ३, केवळ बारीकजो पदार्थ तो जसा एकाएकीं इंद्रियगोचर होत नाहीं तद्वत् अंतःकरणादिकांस एकाएकीं विषय होत नाहीं असाजो कांहींएक अर्थ तो; उ० हें अक्षर आणि तें अक्षर सारखें दिसतें खरें परंतु आंत कांहींसा बारीक भेद आहे; ४, नाटश

बारीक

बारीक विषयांचेंही विषयीकरण व्हावयाजोगें अंतःकरण, नेत्र, इ॰ इंद्रिय किं॰ त्याची वृत्ति तो; बारीक दृष्टि, नजर, इ॰ म्ह॰ कार्पण्यविशिष्टस्वभाव; म्ह॰ बारीक तेथें तुटे.

बारीकमोठा, ३लिं॰ केवळबारीक किं॰ कांहीं मोठें असेंजें वर्तमान, इ॰ कांहींएक तो.

बारीकसारीक, ३लिं॰ बारीक, इ॰

बारुला, बारूला, ३लिं॰ बारा पायल्यानी मण होतो अशा संकेतानेंजें माप, मण, इ॰ तो.

बारोत्रा, पु॰ हिशेबानेंजें व्याज आकारलें त्या व्याजाचाजो बाराचा अंश तो; व्याजांत सूट घालण्याचेप्रसंगीं प्र॰; २, कों॰ वर्षास शेकडा बारा रुपये व्याज घावें असाजो व्याजाचा संकेत तो.

बाल, न॰पु॰सं॰ अर्भक; २, पु॰ पुरुषरूपजें अर्भक तो; ३, अज्ञानजो त्यास म्ह॰; ४, नुकताउदय पावलाजो सूर्य, चंद्र, इ॰ किं॰ त्याचा आतप चांदणें इ॰ तो; ५, केवळ कोंवळाजो पल्लव, अंकुर, फल, इ॰ तो; ६, सं॰ केश; बालबाल बोलणें म्ह॰ अति त्वरेनें दुसराचकभूल होईअसें बहुत बोलणें; बालबालखूप होणें म्ह॰ पराकाष्ठा खूप होणें.

बालक, पु॰न॰ बाल.

बालक्रीडा, स्त्री॰ बाळपणींचीजी क्रीडा ती.

बालगुंडा, पु॰ रा॰ बाळगुंडा.

बालग्रह, पु॰ बालकास उपद्रव करणारे देवताविशेष आहेत ते प्र॰

बालचंद्र, पु॰ शुक्लद्वितीयेपासून पंचमीषष्ठीपर्यंत जो चंद्र तो.



बालचरित, बालचरित्र, न॰ बाळपणचेंजें चरित्र तें.

बालट, बालँट, न॰ बाल्हॅट.

बालटखोर, ३लिं॰ दुसऱ्यावर बालट घेण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बालटी, बालट्या, ३लिं॰ बालटखोर.

बालंड, न॰ बालांड.

बालत्व, न॰ बालपणा; २, सं॰ सूर्याचे किरणापासून उदय पावलेलेजे गुरु, शुक्र, इ॰ ग्रह ते प्रशस्तपणें प्रकाशमान होतपर्यंत त्यांजवर पांच सहा दिवसजो बालपणा म्हणून धर्म असतो तें.

बालदी, स्त्री॰ गलबत, इ॰ कांतील पाणी उपसायाचें चर्मपात्र आहे.

बालंपेंच, पु॰ अक्कड दिसायाजोगा पागोट्यास एके प्रकारचा पेंच देतात तो.

बालंपेची, ३लिं॰ बालंपेचानें विशिष्टजें पागोटें तो.

बालफुटका, ३लिं॰ बारीक केसासारखी फूट जाला आहे असाजो रुपया, इ॰ तो.

बालबुद्धि, ३लिं॰ ज्याची बुद्धि प्रौढ नाहीं तो; २, स्त्री ती बुद्धि.

बालबोध, ३लिं॰ अज्ञान जनासही समजायाजोगा म्ह॰ अति सुगम असा ग्रंथ, भाषण, इ॰ तो.

बालब्रह्मचारी, पु॰ लहानपणापासून ज्याला स्त्रीसंग घडला नाहीं आणि लग्नही ज्याचें झालें नाहीं तो.

बालभाषा, स्त्री॰ नाटकादिकांत शूद्र स्त्रिया.

इ० हलक्या पाभानी बोलायाची संस्कृताची अपभ्रंशरूप एक भाषा आहे ती; २, गाईला हम्मा भाकरीस पापा, इ० संकेत विशिष्ट जी अर्भकांची भाषा ती.

**बालमित्र**, पु० उभयतां बाळपणांत असतां ज्या परस्परांचें मित्रत्व झालें आहे ते परस्पर

**बालमुरिवरा**, पु० दे० रिव्यांत एक भेद आहे.

**बालरंडा**, स्त्री० नहाण आल्याच्या पूर्वी जीचा नवरा मेला ती.

**बाललीला**, स्त्री० बालक्रीडा.

**बालव**, न० साताकरणांतील दुसरें करण.

**बालविधवा**, स्त्री० बालरंडा.

**बालसरस्वती**, पु० लहानपणापासून अत्यंतजो बुद्धिमान् त्यास म्ह०

**बालहत्या**, स्त्री० बालाची हत्या ती.

**बालहत्यारा**, ३ लिं० बाल हत्या केली जाणे तो.

**बालहरीतकी**, स्त्री० कोवळेच काढून वाळविले लेजे हिरडे ती.

**बाला**, स्त्री० जिलापुरती तारुण्यदशा प्राप्त झाली नाहीं अशीजी स्त्री ती; २, पु० नाण्यावरठोकायाचाजो शिक्का तो; कोणेकास कोणेकानें बाला देणें म्ह० आपण पळून जाऊन दगा देणें.

**बालाईचाफूल**, स्त्री० रवेरीज मिळवत प्रा० सर्कारी लिहिण्यांत प्र०

**बालाँट**, न० ज्याचे हातूनजें दुष्कर्मादि घडलें नाहीं त्याजवर त्यादुष्कर्मादिकाचा आरोप करावा म्हणून लबाडीच्या कल्पनेनें रचलीजी तद्विषयींची गोष्ट तें; घेणें, घालणें, धातूचेयोगीं प्र०; बालांटास येणें म्ह० केलेल्यानियमाविषयीं लबाडीस येणें.

**बालाँड**, न० बालाँट.

**बालाभ्यास**, पु० विद्या, कला, इ० का विषयीं बालपणींच केला असतो जो अभ्यास तो.

**बालाभ्यासी**, ३ लिं० ज्या विद्यादिकाविषयीं ज्याणे बालाभ्यास केला आहे तो त्या विषयीं.

**बालार्क**, पु० सं० उदय पावलेला प्रातःकालचा जो सूर्य तो; २, प्रातःकालचेंजें कोंवळें उन्ह त्यास म्ह०; उ० बालार्क घेतला म्हणजे आयुःक्षय होतो.

**बालिश**, ३ लिं० अज्ञानजो मनुष्यादि तो.

**बालेकिल्ला**, पु० पहाडी किल्याच्या इतरविभागापेक्षां अतिउंचजो विभाग असतो तो.

**बाल्य**, न० बालत्व.

**बाव**, स्त्री० विहीर.

**बावउपसणी**, **बावउसपणी**, स्त्री० कों० बावींतील चिखल, मळ, इ० काढण्याचो व्यापार ती.

**बावउपसणें**, **बावउसपणें**, न० कों० विहिरींतील चिखल, इ० काढायासाठीं साधन म्हणून जें आकारविशेषाचें वंशपात्र करितात तें.

**बावका**, ३ लिं० वा० बावलेलाजो पदार्थ तो.

**बावरवड**, न० कों० बाहुमूलाचाजो संधिप्रदेश तें; २, गाड्यावरील साठीच्या चौकटीचीं जीं चार लांकडें तीं प्र०; ३, रा० होडीचे उलंडीस दोहींबाजूंस दोन लांकडें असतात तीं प्र०.

**बावरबोल**, न० रा० मूळची बाव परंतु ती होरून तेथें कांहीं खळगा राहतो तें.

**बांवची**, स्त्री॰ एक झाड आहे; २, त्याचें बीज; ३, गोवारी म्हणून झाड आहे ती; ४, तिची शेंग.

**बावटा**, पु॰ ध्वज; २, बाहुटा द्वितीयार्थी.

**बांवट्या**, स्त्री॰ या॰ सरळ गोष्ट विचारिली असतां अनेकप्रकारचे फांटे फाडतो त्या; प्रयोग अनेक कवचनीं; उ॰ याला फोडून आलास म्हणून विचारिलें त्याणें हजार बांवट्या लाविल्या.

**बावणें**, या॰ कोमेजणें.

**बावन, बावन्न**, ३लिं॰ एक संख्या आहे ५२; म्ह॰ एक ठेंच खाई तो बावन वीर होई; आणि बावन ठेंच खाई तो गद्दा होई; एथें बावनवीर म्ह॰ पराकाष्ठेचा धीट शहाणा.

**बावनकशी**, ३लिं॰ पराकाष्ठा उत्तम सोनें तें; याची उपलब्धि प्रा॰ मनुष्यलोकीं नाहीं म्हणून व सरीं पुतळीचें कसाहून कांहीं अधिक जें सोनें त्यास आरोपानें म्ह॰

**बावरणें**, अद्भुतदर्शन, भय, हर्ष, पिशाचोपद्रव, इ॰ कारणामुळें सभ्रांत चित्त होणें; उ॰ खेडेगांवचें मनुष्य शहरांत जाऊन तें अनेक चमत्कार पाहून बावरतें.

**बावरा**, ३लिं॰ बावरला तो.

**बावला**, पु॰ रा॰ बाव्हला.

**बावली**, स्त्री॰ कों॰ बाव्हली.

**बावलें**, न॰ कों॰ बाव्हलें; २, मनुष्यादिजीवांचें प्रतिबिंब किं॰ छाया तें.

**बावलेभोरीप**, न॰ रा॰ कळसूत्री, खांबसूत्री, इ॰ बाहुल्यांचा जो खेळ तें.

**बावलेभोरपी**, पु॰ रा॰ बावलेंभोरीपकरून उपजीविका करितो तो.

**बावळा**, ३लिं॰ वेडसर मुद्राजाची दिसते तो किं॰ त्याची ती मुद्रा तो; २, रा॰ बाव्हळा.

**बावा**, पु॰ तपस्वी, गोसावी, साधु, विद्वान्, इ॰ जे थोर त्यांस हें प्रतिष्ठानाम आहे; केवलाचा किं॰ इतर नामपूर्वक प्र॰; उ॰ बावा शास्त्रीबावांचे घरीं गेले; २, बाहवा.

**बावाजी**, पु॰ गोसावी, बैरागी, इ॰ कांस महत्तार्थ म्ह॰

**बावांचे**, पु॰ रा॰ बावंट्या: अनेकवचनांत.

**बावीस**, ३लिं॰ बेवीस.

**बांचें**, न॰ गलबताचे रुकाणूत हातीं धरायासाठीं लांकूड अडकविलें असतें तें.

**बाव्हला**, पु॰ बाहुला.

**बाव्हली**, स्त्री॰ बाहुली.

**बाव्हलें**, न॰ बाहुलें.

**बाव्हळ**, पु॰ हस्ताचा जो मूलभाग तो.

**बाशा**, पु॰ बांच; २, स्त्री॰ पु॰ कों॰ अवरवा.

**बाशिंग**, न॰ विवाहांत नवरा आणि नवरी यांचे कपाळीं बांधायाचें कागदाचें भूषण आहे; २, या॰ गव्हांचे विकींत रहापाच रकतें घालून नवरानवरीचे कपाळीं बांधावयास भूषण करितात तें; कोणेक कामाचें कोणेकाचे कपाळीं बाशिंग बांधलें असणें म्ह॰ तें काम त्याणेंच करावें असा अधिकार असणें; म्ह॰ ज्याचे कपाळीं बाशिंग तो नवरा; उतावळा नवरा आणि गुडघ्यास बाशिंग; ३, घोड्याचे कपाळावर एक दुर्लक्षण असतें तें; ४, बाशिंगीचें पान तें.

**बाशिंगबळ**, न॰ कोणेकाचा विवाह होण्यास प्रयोजक जें दैवबलतें, प्रा॰ उभें रहाणें याचा योगीं प्र॰

**बाशिंगाकार**, ३लिं॰ बाशिंगाचे आकाराचें जें भूम्यादि क्षेत्र तो.

**बाशिंगी**, स्त्री॰ एक औषधी आहे जी अंबा, इ॰ वृक्षाचे कांडावर उत्पन्न होत्ये ती.

**बाष्कळ**, ३लिं॰ जाचें आचरणांत, बोलण्यांत, ताळतंत नाहीं अशा स्वभावाचाजो मनुष्य तो किं॰ त्याचें तें तदनुरूप भाषणादि तो: म्ह॰बाष्कळजमा आणि पुष्कळ खर्च.

**बाष्कळणें**, मनुष्यानें बाष्कळ होणें.

**बाष्प**, पु॰न॰सं॰ अश्रु.

**बांस**, पु॰ डोली, मंडप, इ॰कांस लावायाचें उपयोगीं विवक्षितानुरूप तोडून ठेविलेलाजो कळक तो.

**बासट**, न॰ग्रा॰ जा पदार्थावर जो पदार्थ भक्षिला असतां विकार होतो असेजे परस्पर विरुद्ध पदार्थ ते एकमेकाचें; उ॰ पुरणाचे पोळीवर ताक बासट आहे.

**बासन**, न॰ आंत वस्त्रें बांधून ठेवायासाठीं खादी, छीट, इ॰कांचाअस्तरण लाविलेलाजो चतुष्कोण तुकडा केला असतो तें, २, त्यांत वस्त्रें बांधून जें गाठोडें होतें तें; ३, धातुमय किं॰ मृन्मयजें पात्र तें.

**बासनी**, ३लिं॰ वासनी.

**बासष्ट**, ३लिं॰ संख्या आहे ६२

**बासा**, ३लिं॰ पर्युषित.



**बासुदी**, स्त्री॰ दूध आटवून मिसेकरून त्यांत शर्करादि पदार्थ टाकून भक्ष्य पदार्थ करितात ती.

**बांसरी. बांसुरी**, स्त्री॰ मुरली म्हणून जें वाद्य ती.

**बाहणें**, प्रा॰यं॰ कोणेकास शब्दानें हाक मारणें; उ॰ धेनुवत्सें तुला बाहती यादवा.

**बाहला**, पु॰गाईचें दूध काढतानां लात मारित्ये याकरितां तिचे पायांसजी दोरी बांधितात तो.

**बाहवा**, पु॰ एक झाड आहे.

**बाहवापंचक, बाहवेपंचक**, न॰ काढ्याचे उपयोगीं जीं बाहवा, इ॰ पांच औषधें प्रसिद्ध आहेत तें.

**बाहळा**, ३लिं॰ बांडा: प्रा॰जीवधनि.

**बाहाड**, न॰ कों॰ बाहु प्रथमार्थी; २, रणांगण; जांत तिवीर, इ॰ झाडें असतात तें.

**बाहाणा**, स्त्री॰ कों॰ गलबताचे बाजूची कडती.

**बाहाणा**, पु॰ बहाणा.

**बाहात्तर, बाहत्तर**, ३लिं॰ एक संख्या आहे, ७२.

**बाहात्तरखोडी, बाहत्तरखोडी**, स्त्री॰ मनुष्य, अश्व, इ॰कांस जा वाईट बाहत्तर खोडी असतात त्या.

**बाहादर, बाहादूर, बाहाद्दर**, ३लिं॰ बहाद्दर.

**बाहार**, स्त्री॰ बहार.

**बाहाल**, न॰ बहाल.

**बाहाली**, स्त्री॰ बहाली.

**बाहिरची**, स्त्री॰ बाहेरची.

**बाही**, स्त्री॰ बाहुखडापासून मणगटपर्यंत जो हात ती; २, अस्तनी; ३, दार, इ॰कांचे चौकटीचा

च्या दोहोंबाजूचे दोन उभेजे अवयव ते प्र०

**बाहीर**, अ० बाहेर.

**बाहू**, पु० भुज; बाहुभूषण, बाहुमूल, इ० स०

**बाहुटा**, पु० बाहुमूलापासून कोंपरपर्यंत जो हाताचा अवयव तो; २, स्त्रियांचें बाहुभूषण आहे.

**बाहुबल, बाहुबळ**, न० युद्धांत दुसऱ्यास जिंकावें, इ० कर्माविषयीं उपयोगीं कपट, मंत्र, फितूर, इ० साधन निरपेक्षजो केवळ अंगचा पराक्रम तें.

**बाहुयुद्ध**, न० उभयतां हातीं कांहीं शस्त्र न धरितां बुक्या, मुष्टि, इ० कांचा प्रहार कराचा. एकमेकास ओढावें, रेटावें, इ० रूपजें युद्ध करितात तें.

**बाहुला**, पु० वस्त्र, काष्ठ, मृत्तिकादि निर्मित पुतळा तो.

**बाहुली**, स्त्री० वस्त्र काष्ठादि निर्मित जी पुतळी ती; २, नेत्रांत जे दुसऱ्याचें प्रतिबिंब दिसतें ती; ३, बाहुलें.

**बाहुलें**, न० वस्त्र काष्टमृत्तिका पीठ, इ० कांनीं निर्मित जी मनुष्य, पक्ष, इ० जीवाची प्रतिमा ते.

**बाहुलेंभोरपी**, पु० बावलेंभोरपी.

**बाहुलेंभोरीप**, न० बावलेंभोरीप.

**बाहेर**, अ० विवक्षित देशकालपदार्थ, गोष्ट, इ० कांच्या जो अंतःप्रदेश त्याहून इतर प्रदेशीं; उ० तोंघरा बाहेर जाऊं नये; तो महिन्याचे बाहेर काशीस जाणार; तो आज्ञेबाहेर नाहीं; बाहेर जाणें म्ह० परसाकडे, लघुशंकेस जाणें.

**बाहेरख्याल**, पु० बहिर्व्यसन.

**बाहेरख्याली**, ३ लिं० बहिर्व्यसनी

**बाहेरचा**, ३ लिं० बाहेर म्हणून जो प्रदेश तत्संबंधी; २, परकी जो मनुष्य तो; उ० बाहेरचा मनुष्यादेखत गृहछिद्र बोलूं नये; ३, रा० कुटुंबांतील बायको, पोर, इ० अंतरंगजीं माणसें त्यांहून इतरजीं दासी किं० दासरूप माणसें असतात तीं प्र०; ४, पु० गांवाबाहेरचा; बाहेरची पीडा म्ह० उपदंशास म्ह० बाहेरची बाधा, इ० पिशाचोपद्रवास म्ह०

**बाहेरचाल**, स्त्री० आंत चालीची प्रतिपक्षी ती

**बाहेरची**, स्त्री० विटाळशी.

**बाहेरचीचाल**, स्त्री० बाहेरचाल.

**बाहेरभितर, बाहेरभीतर**, अ० बाहेरल्या किं० आंतल्या प्रदेशीं; उ० तो घोडा कोठें बाहेरभीतर असेल त्यास शोधून आण.

**बाहेरला, बाहेरील**, ३ लिं० बाहेरचा.

**बाहेरून**, अ० बाहेरुन जो प्रदेश तेथून.

**बाह्य**, ३ लिं० बाहेरचा प्रा० प्रथमार्थी.

**बाह्या**, पु० तबल्याचा धूम वाजवावयाचा जो अवयव तो.

**बाह्यात्कारीं**, अ० अंतःकरणांत भाव कांहीं निराळा राखून दुसऱ्या भावानें; उ० हे दोघे बाह्यात्कारीं गोडीनें बोलतात परंतु आंतून द्वेष आहे; २, आंतील तत्वाशी परोक्ष असतांही पदार्थ गोष्ट, इ० कांचा लोकांचे दृष्ट्यादिकांस विषय होतो जो बाहेरचा आकार त्याचाठायीं; उ० हे आंबे बाह्यात्कारीं चांगले दिसतात मग आंतकसे असतील तसे असोत.

**बाळ**, पु० न० बाल; परंतु प्रा० प्रथम द्वितीयार्थी.

**बाळक**, न० पु० बालक.

**बाळकडू, बाळकडूं**, न० लहानमुलास किराईत, इ० दहापांच औषधें उगाळून पाजावयासाठीं जें करित असतात तें.

**बाळक्रीडा**, स्त्री० बालक्रीडा.

**बाळगण**, स्त्री० रा० लहान मुलांचे संरक्षणाचा जो व्यापार ती.

**बाळगणा**, पु० रा० जो मुलाची बाळगण करितो तो.

**बाळगणावळ**, स्त्री० पोर, इ० बाळगण्याबद्दल जें मोल ती.

**बाळगणें**, पोर पक्ष इ० कांस लालन, पोषण, इ० योग्य उपचारानीं संभाळणें; २, कांहीं मूर्तामूर्त पदार्थ स्वसत्ताविषयांत ठेवणें जेणेंकरून आपण तद्वान् होतो; उ० त्याणें दोन हजार फौज बाळगली आहे; तू इतका अभिमान कशास बाळगतोस.

**बाळगळा**, पु० बाळपणचा जो वार्गीक मज्जलग्याचा ज्वर तो.

**बाळगील**, स्त्री० को० आपण श्रम भोगून पोर, इ० बाळगण्याचा जो व्यापार ती; २, जें बाळगण्यास आपणास श्रम आणि अडचण पडावी असेंजें पोर किं० परकीय वस्तू इ० ती.

**बाळगुंडा**, पु० रा० पेलवान, इ० कानीं उचलायाची जी दगडाची गोटी तो.

**बाळगोपाळ**, पु० सर्वमिळून देवादिकांजवळ कांहींएक विज्ञापितव्य असतां ग्रामादिकांतील सर्व लहानथोर जे मनुष्य त्यास स०; उ० देवा या गावांत गुरें फार मरतात यासाठीं हे सर्व बाळगोपाळ तुला शरण आले आहेत; नित्यें अनेक वचनांत.

**बाळचरित्र**, न० बालचरित.

**बाळटोंक**, न० बगला.

**बाळंत**, स्त्री० नूतनप्रसूत झालेली जी स्त्री ती; प्रा० मनुष्य इतरि; बाळंत होणें स० प्रसूत होणें.

**बाळंतकाढा**, पु० बाळंतीस द्यावयाचा वैद्यक प्रसिद्ध काढा आहे तो.

**बाळंतखोली**, स्त्री० गृहामध्यें बाळंत होण्याचे सोईचीजी खोली केली असत्ये ती किं० जींत स्त्री बाळंत आहे ती.

**बाळंतघर**, न० ज्या घरांत कोणी स्त्री बाळंत झालेली आहे असेंजें घर तें सोहेर फिटे पर्यंत; २, बाळंतखोली.

**बाळंतचुडा**, पु० बाळंतीस प्रथमतः ज्या बांगड्या भरितात तो.

**बाळंतनिंब**, पु० कडुनिंब.

**बाळंतपण**, न० बाळंतीचीजी शुश्रुषा तें.

**बाळंतबोळ**, पु० बोळांत एक भेद आहे.

**बाळंतरोग**, पु० बाळंतिणीस जो क्षयरोग जडतो तो.

**बाळंतविडा**, पु० बाळंतिणीस प्रसूत झाल्यानंतर बारावे दिवशीं किं० पुढें सोयरेधायरे, इ० विड्याचें साहित्य चोळी, इ० मुलास पेहरणें, कुंची, टोपडें, इ० देतात तो.

**बाळंतशेप, बाळंतशोप**, स्त्री० शोपेंत एक भेद आहे.

**बाळंतीण**, स्त्री० बाळंत.

**बाळंतें**, न० बाळंतीची, मुलाचीं, हंनरायाचीं इ० जीं मलिन वस्त्रें तीं प्र०; २, तत्संबंधानें मलिन झालेंजें बाळंतिणीचा अंगावरचें वस्त्र त्यासही म्ह०

**बाळंदा, बाळंधा**, पु० मुलें, इ० पदरीं असल्यामुळें निरंतर त्यांची शुश्रूषा राखिली पाहिजे, भूक तान्ह संभाळलीपाहिजे, इ० स्वरूपरीची आपल्यास जी अडचण असत्ये ती; २, ज्याचे योगें तादृश अडचण प्राप्त होत्ये असेंजे मुलें, गुरें, बायका, इ० स्वरलें तो.

**बाळदृष्टि**, स्त्री० केवळ बारीक किं० दूरस्थितजो पदार्थ तो जीणेंकरून न्याहाळतो अशीजी बाळपणची दृष्टि ती.

**बाळपरवेशी**, स्त्री० स्वामिकार्यावर कोणी मेला जो शिपाई, इ० त्यांचे पोराबाळांस जीविकार्थ निरंतर चालायाजोगें देतात जें भूमि, द्रव्य, इ० तीं; २, ३लिं० बाळपणापासून जोडलेलाजो चाकरी, मित्रत्व, आश्रितत्व, इ० कोणेकाचा संबंध तो किं० ते चाकर, मित्र, आश्रित, इ० संबंधी तो.

**बाळफूट**, स्त्री० कों० रुपया, इ० कांस केवळ बारीक जी फूट असत्ये ती.

**बाळबद**, ३लिं० न० एक महाराष्ट्रजनाची लिपि आहे; २, ३लिं० कपट क्रूरतादि रहितजो मनुष्यादिक तो किं० त्यांचाजो सरळ सर्वांस समजायाजोगा भाषणादि व्यवहार तो.

**बाळबेल**, न० कोंवळेंजें बेलाचें फळ तें.

**बाळबोध**, ३लिं० बालबोध; २, बाळबद हितीयार्थी.

**बाळब्रह्मचारी**, पु० बालब्रह्मचारी.

**बाळभूक**, स्त्री० घटकेघटकेस कांहींतरीं खालेंपाहिजे अशीजी पोर, इ० कांस भूक असत्ये ती.

**बाळभोंक**, न० बाळटोंक.

**बाळभोग**, पु० प्रातःकाळीं देवाची पूजाकरून जो अल्पपदार्थांचा नैवेद्य दाखवितात तो.

**बाळमित्र**, पु० बालमित्र

**बाळरंडा, बाळरांड**, स्त्री० बालरंडा.

**बाळलेणें, बाळल्याणें**, न० बाळपणीं घालायाचें जे बिरली इत्याद्यलंकार तें.

**बाळवतें**, न० बाळंतें.

**बाळवाटी**, स्त्री० भोजनास उशीर होईल म्हणून सकाळचे प्रहरीं जो कांहीं अल्प उपहार करितात ती.

**बाळविधवा**, स्त्री० बालविधवा.

**बाळशिरें**, न० कों० बाळंतीचा मुलास धर्मार्थ दूध व त्याचें पात्र. इ० कोणी देतात तें.

**बाळसंतोष**, पु० भिकाऱ्यांत एक जाति आहे; जे प्रा० वस्त्रें मागतात, उघडाबोडा बाळसंतोष म्ह० तो केवळ निर्धन किं० ज्यास मागेंपुढें कोणी नाहीं तो.

**बाळसरस्वती**, पु० बालसरस्वती.

**बाळसें**, न० वर्षसहामहिन्याचे आंत मुलाचे आंगावरजी पुष्टता येत्ये तें; ये, ये, धातूंचे योगीं प्र०

**बाळख्यार**, ३लिं॰ ज्या गोष्टीविषयीं ज्याचा जन्माभ्यास तो त्या गोष्टीविषयीं.

**बाळहरडा, बाळहिरडा**, पु॰ बालहरीतकी.

**बाळहरडी, बाळहिरडी**, स्त्री॰ बालहरीतकी.

**बाळा**, पु॰ बाहळा; २, स्त्री॰ ग्रं॰ स्त्री; ३॰ प्रसूत झाली बाळा बाजया ह्मणती थाळा.

**बाळंतीण**, स्त्री॰ बाळंतीण.

**बाळांबा**, पु॰ कोंवळाजो आंबा तो.

**बाळाभ्यास**, पु॰ जन्माभ्यास.

**बाळाभ्यासी**, ३लिं॰ जन्माभ्यासी.

**बाळी**, स्त्री॰ कर्णभूषण आहे; २, ग्रं॰ मुलगी; बाळ्या हकणें ह्म॰ पचबारा करणें.

**बाळीबुगडी**, स्त्री॰ बाळ्या, बुगड्या, इ॰ जें खिडुकमिडूक ती.

**बाळें**, न॰ ग्रा॰ अतिस्नातारपण झाल्यामुळें एखाद्यास केवळ वेड लागतें तें.

**बाळेणें**, रा॰ बाळ्यानें युक्त होणें; २, मिरची. वांगी, इ॰ झाड, खत, पाणी, इ॰ अधिक झाल्यामुळें माजून फल फूल नधरे अशा अवस्थेतें पावणें.

**बाळेभोंक**, न॰ रा॰ बाळभोंक.

**बाळोपचार**, पु॰ केवळ बाळकासही केलाअसतां सोसायास कठीण पडायाचा नाहीं असाजो सात्विक औषधाद्युपचार तो.

**बाळोपचारी**, ३लिं॰ बाळोपचारसंबंधीजें औषधादिक तो.

**बिकट**, ३लिं॰ अवघडजो किल्ला, वाट, गोष्ट, श्लोक, हिशेब, इ॰ तो.

**बिकलम**, न॰ खत पत्र, इ॰ कांवर हें अमक्याचे हातचें अक्षर असें समजायाकरितां एतच्छब्दपूर्वक किं॰ हस्ताक्षर शब्दपूर्वक आपल्या नावाचा लेखकानेंजो शेवटीं लेख केला असतो तें.

**बिगड**, पु॰ बिघाड.

**बिगडणें**, बिघडणें.

**बिगडाबिगड**, बिघडाबिघड.

**बगर**, अ॰ बगर.

**बिगाड**, पु॰ बिघाड.

**बिगार**, स्त्री॰ मोल नयेतां सर्कार, इ॰ कांचें काम करावें लागतें ती किं॰ तसें काम करण्याचाजो प्रकार ती; २, तशाप्रकारानें ग्रामांतरादिकांस पोहचवायाचेंजें ओझें, इ॰ त्यास ह्म॰; ३, ला॰ अनास्थेनेंजें सरासरी करितात काम त्यास ह्म॰

**बिगारी**, पु॰ बिगारीचें काम करणाराजो तो.

**बिंगें**, न॰ अपेक्षितजो साहित्यसमुदाय त्यामध्यें एखादे पदार्थाचेअभावामुळें कार्य यथास्थित शोभिवंत दिसूनये असेंजें कांहीं त्या कार्यांत उणें पडतें तें; उ॰ त्याणीं प्रयोजन चांगलें केलें परंतु तूप घाणेरें होतें एवढें बिंगें पडलें.

**बिघड**, पु॰ बिघाड.

**बिघडणें**, कोणेक पदार्थ गोष्ट, इ॰ कांचेअंगीं विवक्षित कर्मोपयोगिता प्रयोजक असतोजो गुण तद्वियोगामुळें किं॰ कांहीं विरु

द्रुगुणसंबंधामुळें तो पदार्थगोष्ट, इ० त्याकर्मा विषयीं अनुपयोगिता विशिष्ट करणें; कोणे-कानें कोणेकाशीं बिघडणें ह्म० परस्परांचीं अंतःकरणें विरुद्धभाव विशिष्ट होणें.

**बिघडाबिघड**, स्त्री० विवक्षितकार्यसाधकभूत जे अनेकपदार्थ त्यांचाजो बिघडलेपणा किं० तन्मूलककार्याभावही ती.

**बिघा**, पु० बीसपांड जें क्षेत्र तो.

**बिघाड**, पु० परस्परांचे अंतःकरणाचा किं० घडायास आलीजी गोष्ट तिचाजो बिघडलेपणा तो.

**बिघावणी**, स्त्री० हात, काठी, इ०कानीं क्षेत्र मोजून त्याचे बिघे बांधण्याचाजो व्यापार ती.

**बिचकटणें**, रा० काठी, इत्यादिकानीं किंचित् खणणें.

**बिचकणें**, अकस्मात् अद्भुत किं० भयानक कांहींपाहिल्यामुळें स्वाभाविकजो अंतःकरणाचाचा ओघचालला असतो तो परावृत्त होऊन क्षणमात्र संभ्रांतप्राय होणें.

**बिचकावणें**, बिचके असा करणें.

**बिचल**, स्त्री० पु० कों० खाणें धातूचेयोगीं प्र० अ० बदलखाणें.

**बिचलणें**, पोर, गुरूं, घोडें, इ०कानें पूर्वीचा जो योग्यरीतीचा स्वभाव तो सोडून कोणेकाचें ऐकूं नये कोणाला मागवें, शिव्याद्याव्या, पळावें, इ० रूप अयोग्यस्वभाव विशिष्ट होई असा पोर, इ०कांस कोणेकानें करणें.

**बिचवा**, पु० हिं० जाडेत्यास आश्चर्यभूतमध्ये खांब नाहीं असाजो लहान डेरा तो.

**बिचारा**, ३लिं० बापडा.

**बिचोबा**, पु० हिं० बिचवा.

**बिछाइती**, पु० हिं० पेठ, बाजार, यांत बाहेरून कांहीं माल घेऊन विकायाकरितां आलेलाजो उदमी तो; २, बंदिस्तीचें दुकान नसतां रस्त्यांत किं० कोणाचे ओट्यावर कांहीं किरकोळ माल घेऊन विकायास बसलेलाजो उदमी तो; ३, ३लिं० त्याजवळचाजो माल तो.

**बिछाईत**, स्त्री० हिं० बिछायत.

**बिछाद**, **बिच्छाद**, स्त्री० बिशाद.

**बिछाना**, **बिछोना**, पु० हिं० अंथरूण.

**बिछायत**, स्त्री० अनेकानीं बसणें इत्याद्यर्थ भूम्यादिकांवर सतरंजी, रुजामा, इ०कानेंजें आस्तरण करितात ती.

**बिछायती**, पु० ३लिं० बिछाइती.

**बिछावणें**, भूम्यादिकांवर सतरंजी, रुजामा, इ० अस्तरणें; २, ला० कोणेक मनुष्यादिकास जमीनदोस्त करणें.

**बिजली**, स्त्री० पोरांचा अकुरें दुकुरें ह्मणून खेळ आहे त्यांत एक शब्द आहे; लंगडदाई खेळतेवेळेस जी चीप किं० लांकडाचा तुकडा घेतात ती.

**बिजवट**, न० कों० उत्पत्तिकारणजें बीज तें; २, बीजोत्पन्नपदार्थाचा चांगलेपणा, वाईटपणा, इ० वर्णायाचेंअसतां त्यापदार्थासही ह्म०; उ० बिजवट चांगलें असलें तर पोर

चांगलें होतें; हा घोडा काठेवाडी घोड्याचें बिजवट आहे.

**बिजवड**, पु० जापासून बीजादिद्वाराजो उत्पन्न झाला तो त्याचा. प्रा० वृक्षलतादिवृत्ति; उ० हा आंबा वनखोडाचा बिजवड आहे.

**बिजवर**, पु० दुसरें लग्न करायासजो नवरा झाला तो.

**बिजवरा**, पु० स्त्रियांचें एक शिरोभूषण आहे.

**बिजा**, ३लिं० हिं० दुसरा.

**बिजागरें**, न० पेटी, फडताळ, इ० कांचें झांकण उघडायें पुनः मिटायें म्हणून त्या उभयतांचा संधीस सांध्याचीपट्टी मारितात तें.

**बिजेंबारें**, न० कों० द्विर्दादशक; २, ला० उभा दावा; उ० त्याचें व याचें बिजेंबारें आहे.

**बिजोरा**, पु० हिं० बिजवरा.

**बिटी**, स्त्री० खडे, इ० खेळत्येसमयीं एक खडा वर उडवून तो झेलत्येसमयीं जे दोन खडे उचलून घेतात ती; २, मका, जोंधळा, इ० दिकांचेंजें लहान कणीस ती.

**बिडती**, स्त्री० दोहोंकडूनजो संकटप्रसंग प्राप्त होतो ती; उ० पुढें वाघ मागें आरवल अशा बिडतींत सांपडलों; २, ला० दुर्निर्वहजें संकट तेथेंही प्रयोग करितात.

**बिंडा**, पु० सूत, दोरी, इ० कांचें गुंडाळून केलेंजें भेंडोळें तो; २, पर्वताचे मस्तकावर किं० भूमीवर ठेवल्यासारखा जो गोलाकार अवयव वाढला असतो तो; ३, काष्ठ, गवत, इ० कांचा जो लहान भारा तो.



**बिडी**, ३लिं० बिडाचाजो पदार्थ तोफा, इ० ती; २, बीडह्मणून पेठ आहे तेथील जें पागोटें, इ० कापड तो; ३, स्त्री० अपराध्याचे पायांत प्रतिबंधार्थ शृंखला घालितात ती; ४, शूद्रादिक शोभार्थ रुप्याचें वलय करून पायांत घालितात ती; ५, ला० स्त्रीपुत्रभमता स्नेह, इ० ज्याचेयोगानें अडकला जातो त्यास म्ह०

**बिडार, बिढार**, न० कों० बिऱ्हाड.

**बिढारकरी, बिढारकरू**, पु० कों० बिऱ्हाडकरी.

**बितणें**, कांहींएक गोष्ट मध्यें कालावकाश नाहीं अशी समीपयेऊन ठेपणें; उ० लग्नतरउद्यांवर बितलें आणि साहित्य तों झालें नाहीं कसें होतें पहावें; २, भाररूप किं० संकटरूपजें कर्मादिक तें कोणेकावर तदेकलक्ष्यहोत्सातें अवश्य निर्वाह्यलेंकरून प्रसक्त होणें; उ० तो प्राणावर बितलेंतरीं एकाएकीं खोटें बोलणार नाहीं; एथें संकटादिरूप कर्ता प्रा० अध्याहारगम्य असतो; ३, कज्जा, लढाई, इ० प्रवृत्त होणें.

**बितपशील**, अ० तपशीलवार.

**बित्तीम**, ३लिं० हिं० तहकीक बातमी सांगणें. बोलणें, इ० कांचें वि०

**बिथरणें**, कोणेक कर्माविषयीं कोणेकाशीं अनुकूलभावानें वागणारजो कोणेक त्यास प्रतिकूलभावानें विशिष्ट करणें; २, घटनेस आलेलेंजें कांहीं काम तें बिघडणें; प्रा०

अकर्मक प्र० प्रचुर; २, सोईनें वागत असतोजो कोणी त्याणें कांहीं कारणामुळें क्रुध्ध होणें; उ० हा सोईनें वागतो आहे तो बरा एकदां बिथरलातर शंभरांस ऐकणार नाहीं.

**बिंद**, पु० रा० बिंदूचा अपभ्रंश.

**बिंदडी**, स्त्री० बस्ता प्रथमार्थी.

**बिंदलें**, न० लहानमुलाचे हातांतील सोन्याचें भूषण आहे; २, रा० अनुस्वार किं० विसर्ग बोधकजें एतदाकारक चिन्ह तें; उ० माथाबिंदलें फं.

**बिदा, बिदाई, बिदागी, बिदायकी**, स्त्री० हिं० पाठवणी.

**बिंदी**, स्त्री० स्त्रियांचें शिरोभूषण आहे.

**बिंदु**, पु० टिपका; २, अनुस्वारबोधक किं० विसर्गबोधकजें चिन्ह तें.

**बिंदुकली**, स्त्री० बिंदु द्वितीयार्थी; २, कों० बांडगूळ.

**बिंदुकलें**, न० बिंदु द्वितीयार्थी.

**बिन**, अ० विनायार्थी परंतु ज्याज्या अर्थाचें राहित्य वर्णायाचें त्यात्याशब्दामागें याचायोग होउन समास होतो; ते विशिष्टशब्द क्वचित् द्रव्यविशेषण क्वचित् क्रियाविशेषण असे होतात; उ० तुह्मी बिनघोर आपल्या घरास जा; पुत्रानें संसार आटपला आतां मी बिनघोर झालों. क्व० पुढेंही प्र० होतो; मी रुपये घेतल्याबिन जाणार नाहीं: बिन अपराध मला मारलें; बिनबट्टा, बिनरूलारव, बिनदिकत, बिनकदेली, इ० किं० वांचून, शिवाय, इ० कानीं राहित्याचा बोध होत असतांही उगीच याचा प्र० मागें कोणी करितात; उ० बिनपैशावांचून मोज; क्व० पुत्र परंतु याचा प्र०; कागदोपत्रीं कोणेकाचें नाम लिहून संबंधार्थ पित्याचें नाम लिहावयाचें असतां एतत्पूर्वक लिहितात; उ० रामभट्ट बिन कृष्णभट ह्म० कृष्णभटाचा पुत्र रामभट्ट.

**बिनकदली, बिनकदेली**, स्त्री० दुफाशी खेळांत जुगल्यानंतर कदली पडावी तीन पडल्यामुळें जो पराजितपणा येतो तो; २, ३लिं० तद्विशिष्टजो खेळणारा तो; कोणेकानें बिनकदलीवर येणें ह्म० तिरगी मिरगीवर येणें.

**बिनगा**, पु० रा० ताम्रादिकांची आकारविशेषाची कळशी तो.

**बिनधोक**, अ० मनांत कायहोईल, कसें होईल, इ० धोका न बाळगतां

**बिनमणें**, बिघडणें.

**बिनाखी**, स्त्री० कोणेकपदार्थ, गोष्ट, इ० कांच्या आंत संदेहविषयता नराहे असा त्याच्या अवयवशः चौकशी, इ० उपायानीं करितात जो फाड ती.

**बिनासणें**, बिनसणें.

**बिनी**, स्त्री० सैन्यादिकांचा अग्रभाग; २, कपाळावर बांधयाचाजो पागोटें, पगडी, यांचा अग्रभाग तो; ३, द्याराचे चौकटीचाजो वरचा भाग तो.

**बिनीचा**, ३लिं० अग्रगण्य, शूर, शिपाई, लबाड

लबाड, चोर, इ०कांचें वि०

**विनीवाला**, पु० फौजेचा विनीचा जो अधिकारी तो.

**बिंब**, न० सूर्य चंद्र आणि भूभा यांचीं जीं मंडलें तीं प्र०; २, आरसा, जल, इ०कांत ज्या रूपाचें प्रतिबिंब दिसतें आहे तें मुख्यरूप; ३, सं० तोंडलें; ४, दृष्टांत इ० अलंकारविशिष्टभाषणामध्यें दार्ष्टांतिकादिरूप जो प्रतिपाद्य अर्थ तें; ५, राज्याद्यधिकारपदीं असतां जे पराक्रमादि गुण असावे ते असोत किं० नसोत परंतु ज्याचे योगानें तें अधिकारी पद शून्य दिसत नाहीं असा जो कोणी त्याच्यापदीं असतो त्यास म्ह०; उ० सर्दार लोक जाऊन लढाई देतील परंतु राजाच्या पुत्र उगीच बिंबह्मणून बरोबर घ्यावा.

**बिंबप्रतिबिंबभाव**, पु० बिंबभूत आणि प्रतिबिंबभूत असे जे अर्थ त्यांचा जो परस्परसंबंध तो.

**बिबट**, न० बा० बिबव्याचें बोंड; २, ला० व्याघ्र, मांजर, इ०कांचा आंगावर बिबव्यासारिखें ठीक असतें तें.

**बिबटा**, ३ लिं० बिबटें आहेत ज्याचे अंगावर असा जो व्याघ्र, मांजर, इ० तो.

**बिंबणें**, कांहींएक गोष्ट, इ० अर्थ, आरसा, इ०कांत जसें पदार्थाचें प्रतिबिंब पडतें तसें अंतःकरणांत प्रतिबिंब पडे असा जाणला जाणें.

**बिंबली**, स्त्री० एक झाड आहे.

**बिंबलें**, न० बिंबलीचें फळ तें.

**बिबवा**, पु० एका झाडाचें फळ आहे ज्याचे रसाचा आंगास स्पर्श झाला असतां त्वचा नासत्ये परंतु औषधी आहे; कामावर बिबवा घालणें म्ह० कांहीं प्रतिकूळकरून काम बिघडणें.

**बिबवी**, स्त्री० बिबव्याचें झाड.

**बिबळा**, पु० कों० बिबवा प्रथम द्वितीयार्थी; २, वाघांत एक जाति आहे.

**बिंबी**, स्त्री० नागरमोथ्याचें झाड ती.

**बिबी**, स्त्री० बुबू.

**बिंबूड**, न० स्त्री० पर्जन्याभावादिकारणामुळें शेत, इ०कांत बियापुरतेंही उत्पन्न होऊं नये असा जो अभाव होतो तें ती; २, ला० मनुष्यादि जाति किं० कांहीं इतर पदार्थयाचा रोगादिकारणामुळें बीजभूत ईषन्मात्रही अंश राहूं नये असा जो अभाव होतो ती.

**बिबा**, पु० बिबवा.

**बिबी**, स्त्री० बिबवी.

**बिबूव्यावाघ**, पु० ज्याचे अंगावर बिबूव्यासारखे ठिपके असतात अशी एक वाघांत जाति आहे.

**बिबूवा**, पु० रा० बिबवा.

**बिबूवी**, स्त्री० रा० बिबवी.

**बिभित्स**, ३ लिं० बीभत्सशब्दाचा अपभ्रंश प्रथमार्थी प्र० नाहीं.

**बिभूत**, स्त्री० बिभूत; म्ह० बिभतीचें मूळ

रेड्याचे गांडीत.

**बियंबी**, स्त्री॰रा॰बेहंबी.

**बियवणी**, न॰रा॰ पिकलेलीं कोकंबें फोडून त्यांतील मगजानें विशिष्टजा बिया त्याचें सार करितात तें.

**बियांचा**, ३लिं॰ बियासाठीं ठेवलेलंजें धान्यादिक तो; २, ला॰ असंकीर्ण शुद्धजी ब्राह्मणत्व शूद्रत्वादि जाति किं॰ सोदेपणा, लुच्चेपणा, शाहणपणा, इ॰ धर्म तद्विशिष्टजो ब्राह्मण, शूद्र, सोदा, लुच्चा, शाहाणा, इ॰ तो.

**बियाणें**, न॰रा॰ भूमींत घालून त्यांत्या वृक्ष, धान्य, इ॰कांची उत्पत्ति करावी ह्मणून उद्दिष्टजें धान्य, वांगी, मिरची, इ॰कांचें बीज तें; २, मनुष्य, पशु, इ॰कांचें उत्पत्तिकारणजें बीज त्यास बीजनिष्ठगुणदोषानें अधिकारून बीजोत्पन्नाची स्तुति किं॰ निंदा जेव्हां वर्णनीय आहे तेव्हां ह्म॰; उ॰ आमचे घरचे गुरांचें बियाणेंच असेंकीं जें गुरूं होतें तें दुधाळ होतें; कांहींएक पदार्थ बियाण्यास नसणें ह्म॰ अगदीं नसणें.

**बियांवळ**, स्त्री॰ वा॰ भेंड्या, कांकड्या, इ॰कांचें बीं दुसरेसालीं पेरावयासाठीं ठेवितात ती.

**बिरखडणें**, कागद, इ॰ बिरखड्यानीं युक्त करणें; २, श्लोक, वाक्य, इ॰ किं॰ काहीं मजकूर घाईघाईनें वांकड्यातिकड्या अक्षरानीं लिहिणें.

**बिरखडी**, स्त्री॰ कागद, भिंत, इ॰कांवर वांकडीतिकडी शाई, इ॰कानीं ओढलीजी रेघ ती; २, जास वळण नाहीं घाईघाईनें वांकडेंतिकडें लिहिलेलेंजें अक्षर त्यास ह्म॰

**बिरखुंड**, न॰ बोरू, जोंधळ्याचें ताट, इ॰कांचेंजें भेंड तें; २, बिरंबुटा.

**बिरखुडी**, स्त्री॰ बिरखडी.

**बिरडी**, **बिरढी**, स्त्री॰ जलानें भिजल्यामुळें जाला मोड आला आहे किं॰ अंकुर आला असाजो पावटा, इ॰ द्विदलाचा दाणा ती.

**बिरडें**, **बिरढें**, न॰ अंगरखा, दावें, इ॰कांचे गुंडीस कोणी ह्म॰ कोणीत्या गुंडीचे अडकवणास ह्म॰ कोणीं त्या दोहोंस मिळून ह्म॰; २, बिरढी.

**बिरदाईत**, ३लिं॰ कांहींएक विद्या, कला, इ॰कांमध्यें पुरा प्रवीण असोन त्याचा बाणा बाळगतो असाजो वैदिक, पंडित, पुराणीक, गायक, शिपाई, इ॰ तो.

**बिरबिरी**, स्त्री॰ ज्याचा पिंड करूं गेलें असतां होऊं नये असें पातळजें शेण, लोणी, जलादिकांत कालविलेलें पीठ, इ॰ पदार्थ ती.

**बिरबिरीत**, ३लिं॰ बिरबिरीरूप झालेलाजो शेण, इ॰ पदार्थ तो.

**बिरंबुटा**, पु॰ मक्याचे कणसाचा दाणे काढून घेतल्यावर अवशिष्टजो दांडा राहतो तो.

**बिरंबोटा**, पु॰ बिरंबुटा.

**बिरंबोळा**, पु॰ एक वन्यवेल आहे तो; २, त्याचा

त्याचा कांदा.

बिरमोटा, पु॰ बिरंबुटा.

बिरादर, पु॰ बंधु; याचा प्र॰ पादशाहीसनदांप त्रांत असतो.

बिरी, स्त्री॰ स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

बिरीद, न॰ जो जा विद्या कलादि गुणाविषयीं बाणा बाळगतो त्याचें ज्ञापकचिन्ह म्हणून हस्तादिकांचाठायीं दोरा, इ॰जें बाळगितो तें; २, बाणाप्रथमार्थी; बिरदावळी, स्त्री॰ बिरुदावलीचा अपभ्रंश.

बिरुद, न॰ बिरीद; बिरुदांचीजी आवलि ती बिरुदावलि, इ॰स॰

बिऱ्हाड, न॰ कांहींदिवस रहावयाकरितां परसत्ताकअसून आपल्याकडे घेतात जें गृह किं॰ गृहैकदेश, इ॰स्थल तें; २, तेथें रहाणारांचें त्यास्थलीं असतेंजें हांडेभांडें, वस्त्रपात्र, चीजवस्त, इ॰ स्वटलें तें; उ॰ आह्मी एथून बिऱ्हाड उचलून तिकडे नेलें; ३, कांहीं दिवस रहावयाकरितां परकीय स्थलीं करितातजी उतरून अधिष्ठिति तें किं॰ तेणेंकरून त्यास्थलावर येतोजो तदधिष्ठितपणा तें; उ॰ या खोलींत दुसऱ्याचें बिऱ्हाड आहे; तुह्मी त्या खोलींत बिऱ्हाड करा; ४, तेथें तशी अधिष्ठितिकरून रहाण्याचाजो प्रकार तें; उ॰ आह्मी तेथें बिऱ्हाडानें आहों; ५, ला॰ भाषणादिकांत स्पष्टनकरितां गुप्त राखिला असतोजो कांहीं अर्थांश तें; उ॰ घरोब्यानें बोलतअसतां आंत बिऱ्हाड ठेवणें चांगलें नव्हे; बिऱ्हाड आटोपणें म्ह॰ संकेतानें मरणें याअर्थी म्ह॰

बिऱ्हाडकरी, बिऱ्हाडकरू, पु॰ बिऱ्हाडानें राहिलेलाजो तो; अनेकवचनीं नपुंसकींही प्र॰ होतो.

बिऱ्हाडखर्च, पु॰ बिऱ्हाडसंबंधीजो खर्च तो.

बिऱ्हाडबाजलें, न॰ बिऱ्हाडसंबंधी वस्त्र, पात्र. इ॰जें खटलें तें; त्याचें बिऱ्हाडबाजलें सांगातीच आहे, इ॰ स्थलीं त्यास मागेंपुढें कोणी नाहीं असाअर्थ.

बिऱ्हाडू, पु॰ बिऱ्हाडकरू.

बिंदि, न॰ भूम्यादिकांस आंत उंदीर, सर्प, व्याघ्र, इ॰कांच्या प्रवेशस्थिति, व्हावयाजोगें असतेंजें मोठें छिद्र तें; बिलेशय, बिलद्वार, इ॰स॰

बिलग, ३लिं॰ विलग.

बिलगणें, कोणेकापासून कांहीं काढून घ्यावें किं॰ कोणेकास पराजित करावें, लुटावें, इ॰कारणार्थ त्यात्याशीं तिकडच्या येग अंगीं धरून भिडणें.

बिलंद, ३लिं॰ अट्टल.

बिलंदी, ३लिं॰ हिं॰ ताल्रांत एक भेद आहे;

बिलबिलीत, ३लिं॰ पिकणें, हस्तादिकानें चोळवटणें, इ॰ कारणामुळें आंतील घनांश मोडून चेपायाजोगा मृदुझालाजो आंबा, निंबू, गळू, इ॰ तो.

बिलवर, न॰ दे॰ बिलोर.

**बिलवरी**, ३लिं० दे० बिलोरी.

**बिलावर**, पु० गानांतील एक राग आहे.

**बिलोर**, न० उंचीजें कांच तें.

**बिलोरी**, ३लिं० बिलोराचाजो हंडी, झाड, इ० पदार्थ तो.

**बिल्याण**, पु० पैलूदार असून केवळ बसकट नव्हे अशा आकाराचा जो हिरा तो.

**बिल्व**, पु० एक शिवप्रिय वृक्ष आहे; २, त्याचें पान; ३, न० त्याचें फल; बिल्वकाष्ठ, बिल्वपत्र, इ० स०

**बिवलकरी**, ३लिं० बिवलकर ह्मणून ब्राह्मणांत एक कुल आहे त्या कुलींचा पुरुषानें प्रसिद्ध केलेलें पिशाचलिपीचें वळण आहे तें आणि त्या वळणाचें अक्षर. कित्ता, इ० तो.

**बिंबळा**, पु० गा० एक वन्यवृक्ष आहे; २, नागवेली करायासाठीं लावितात जे नागवेलीचें वेल ते किं० जुन्या नागवेलीच्या बुंदावरून उतरून पुनः त्याचे वेल चांगले वाढावे ह्मणून त्यावेलांचीं गुंडाळीकरून तेथेंच जीं पुरतात ते; २, गा० लांबट आकाराचा लहानजो मुडा ज्यांत प्रा० बियांचें धान्य असतें तो.

**बिशाद**, स्त्री० पैका किं० ज्यापासून विक्रयादिद्वारा पैका उत्पन्न होतो असाजो वस्त्र, पात्र, भूषण, इ० सर्व पदार्थ ती; उ० वडलांचे वेळची जी काय बिशाद होती ती अह्मी सर्वांनी वांटून घेतली; २, तत्तांश वैशिष्ट्यामुळें पदार्थाचे अंगीं असल्येजी गणनाहिला ती किं० तत्कारणीभूतजो पदार्थनिष्ठ तत्तांश ती, निषधविषयीं प्र०; उ० पागोट्याची बिशाद ती काय आणि भांडता कशास; शंभररुपये ह्म० बिशाद काय जातांजातां मिळवं.

**बिसनी**, पु० द्रव्यादि खाचपान करून वेश्यादिसामान्यस्त्रियांकडे उपभोगार्थ गेलेला जो पुरुष त्यास तत्समयीं ह्म०; २, नादशा द्रव्यादि जवळ नसतां दुर्व्यसनें बाळगून अब्रू जाणें सोडली आहे असाजो पुरुष तो; ह्म० फुकट बिसनी आणि तंबाखु उसनी.

**बिसाद**, स्त्री० बिशाद.

**बिहोबा**, पु० कों० बेहबा.

**बी**, स्त्री० फलांतर्गतजी बीजांशरूप व्यक्ति ती; २, अंडकोशांतर्गतजे दोन अवयव ते प्र०; ३, गळू, इ० उठाणूंत घट्ट जो पूयांश असतो ती; बी रुजणें ह्म० कोणेकापासून कांहीं कार्यकरून घ्यावें ह्मणून केला जो प्रयत्न तो लागू होणें.

**बीं**, न० राजगिरा, माठ, इ० किं० दर्भादि तृणें. वेळू, इ० कांवर येतो जो बीजसमुदाय तें; २, बियाणें; ३, कंद, शाखा, मुळी, पान, बी, इ० जांजा वृक्षलतादिकांचेंजेंजें उत्पत्तिकारण तेंतें त्याचेंत्याचें; त्यास उत्पत्तिकारणत्वेंकरून विवक्षा असतां प्र०

**बीज**, स्त्री० द्वितीया; २, न० बीज.

**बीज**, न० मनुष्य, पशु, पक्षी, वृक्ष, लता, इ० पदार्थांचें मूलभूत मुख्यजें उत्पत्तिकारण देन,

रेत, इ॰जें त्यात्यापदार्थाचें सूक्ष्मरूप होय तें; २, तत्तद्बीजोत्पन्नजो मनुष्यादिक त्यास प्रसंगविशेषीं ह्म॰; ३. कांहीं व्यवहार, कलह, इ॰कांचें जें तादृश मूलकारण तें; ४, बीजगणित; ५, भाषण, कविता, इ॰कांत सप्रसंगविस्तार पावणारजी कांहीं गोष्टति च्या कर्त्या, इ॰कानें पूर्वी तत्सूचक दर्शविला असतोजो ईषदंश तें.

**बीजक**, न॰ रेशीम, कापड, इ॰कांचे ओझ्यांतजो त्यांचेंत्यांचें वजन, संख्या, इ॰कांचा आंकडा कागदावर लिहून टाकितात तें.

**बीजांकुरन्याय**, पु॰ बीजापासून अंकुरहोतो, अंकुरापासून बीज होतें, या व्यवहाराचा पर्जन्यापासून उदक, उदकापासून पर्जन्य, इ॰ व्यवहारास घेतातजो दृष्टांत तो.

**बीजगणित**, न॰ सं॰ अव्यक्तगणित.

**बीजारोप**, पु॰ वृक्ष, मनुष्य, इ॰ पदार्थांचें किं॰ कलहादिव्यवहारांचें किं॰ विस्तारपावणारे गोष्टींचें जें तेंतेंबीज त्याचा त्यात्या क्षेत्रादि योग्यस्थळींजो निक्षेप तो.

**बीजारोपण**, न॰ बीजांचें रोप करण्याचा व्यापार किं॰ बीजारोप तें.

**बीड**, न॰ लोहासारखा एक धातु आहे; २, कांसार, इ॰कांचे साळेंत वरमोठमोठे पत्रे इ॰ ठोकून वाढवायासाठीं चौरस मोठा बिडाचा तुकडा असतो तें; ३, स्त्री॰ कोंगाड्यावर भरलेलेंजें तृणादिक त्यास आंवळावयाची जी तिहेरी, इ॰ जाड दोरीअसते ती.

**बीत**, स्त्री॰ हिं॰ कागदाचा बंद, इ॰कांवर दोहोंअंगें जागा सोडून मध्यें कांहीं लिखनार्थ काढितातजी रेघ ती.

**बीद, बीथ**, स्त्री॰ गांवांतीलजो लहानमोठा मार्ग तो.

**बीन**, न॰ पु॰ तंतुवाद्य आहे ज्यास दोहोंकडे दोन भोंपळे असतात तें तो.

**बींबियाणें**, न॰ बींबिवळा.

**बींबिवळा**, पु॰ धान्यादिकांचें बीं किं॰ ऊस, रताळीं, इ॰कांचें ज्याणें यांस सामान्येंकरून ह्म॰; उ॰ यंदा शेतभात कांहीं करणार होतों परंतु बींबिवळा कोठें मिळेना ह्मणून सोडलें

**बींबेणें, बींव्याणें**, न॰ बींबिवळा.

**बीभत्स**, पु॰ नवरसांतील एक रस आहे; २ ३लिं॰ रक्त कुजलेलें मांस, पू, विष्ठा, शिश्न, योनि, इ॰ ओंगळपदार्थ किं॰ तद्विशिष्ट स्थल किं॰ तद्वाचक शब्द इ॰ तो ज्याचे योगानें तो बीभत्स रस उत्पन्न होतो; ३, बीभत्स शब्द बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बीर**, पु॰ मंत्रसाध्य देवता आहे; कोणेकास बीर भरणें, देणें, ह्म॰ कलहादिकांविषयीं तेयानें प्रयत्न होई असा उत्तेजन व्यापार करणें.

**बील**, पु॰ कोंबडे, इ॰कांचे अंड्यांतील गिलगिलीत जो अंश तो.

**बीळ**, न॰ बिल; बीळ पाडणें स्न॰ विवक्षित कार्यार्थ दर्बार, इ॰स्थलीं प्रवेश होई असें युक्तीनें द्वार करणें; बीळ उघडणें स्न॰ पेंव फुटणें; २, रा॰ सूप, रोवळी, इ॰ करावयासाठीं वेळू, चिवा, इ॰कांची काढिलेली तजी पात तें.

**बुकटी**, स्त्री॰ औषधादिकांचें जें चूर्ण ती.

**बुकणाहत्ती**, पु॰ बाहेर दिसायाचे जे दोन दांत ते ज्यास येत नाहींत असाजो हत्ती तो; २, ला॰ शरीरानें लठ्ठ गोड, गर्दन, ज्याची एक झाली आहे असाजो त्यास स्न॰

**बुकणी**, स्त्री॰ बुकटी.

**बुकलणें**, मनुष्यादिजीवांस बुक्यानीं प्रहार करणें.

**बुकलाबुकल**, स्त्री॰ कोणेकास लाथाबुक्यानीं अनेकानींमिळून किं॰ एकानेंच पुष्कळ मारण्याचाजो व्यापार ती.

**बुका**, पु॰ सुवासिक द्रव्याचें चूर्ण आहेजें देवादिकांस अर्पितात तो.

**बुकाडा**, पु॰ वा॰ फार जोराचीजी बुकी तो.

**बुकांदा**, पु॰मोठाजो बुकीचा प्रहार तो.

**बुकांदी**, स्त्री॰ बुकांदा.

**बुकालणें**, बुकलणें.

**बुकी**, स्त्री॰ ताडनार्थ केलीजी हाताची मूठ ती; २, बुकणी.

**बुगडी**, स्त्री॰ स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

**बुचकणें**, वा॰ यथास्थित रास, इ॰ करून ठेवलेलें जें धान्य, पीठ, इ॰ त्यांत हात वारंवार घालून तो संनिवेश बिघडे असें तें धान्यादि करणें.

**बुचकरणें**, रा॰ विचकुरणें.

**बुचकरा**, पु॰ विचकुरा.

**बुचकली**, स्त्री॰ बुचकुली.

**बुचकळणें**, कांहींएक पदार्थ जलादिद्रवरूप पदार्थांत बुडवून बाहेर काढणें; तोशास्त्रांत बुचकळला आहे, इ॰ स्थलीं कांहींसा एकवार शास्त्राचा संस्कार झाला आहे; २, ला॰ कांहीएक व्यवहारादिकांत कर्तव्याचा निश्चय होईनासा झाल्यामुळें असें करावें, कीं तसें करावें, हें करावें, कीं तें करावें, अशी अनेकवार बुद्धि होई अशा दशेतें पावणें किं॰ बुद्धिनें कुंठित होऊन जडप्रायता पावणें.

**बुचकळी**, स्त्री॰ मनुष्यादिकानें उदकादिकांत पटकन बुडून वर यावें इतकाजो व्यापार ती; मारणें धातुचेयोगीं प्र॰; बुचकळ्या खाणें स्न॰ गटंगळ्या खाणें.

**बुचकुरणें**, विचकरणें.

**बुचकुरा**, पु॰ विचकरा.

**बुचकुली**, स्त्री॰ पिष्टादि पदार्थ घेण्याकरितां पालथा कमलाकार केलाजो हस्त ती; २, रा॰ मार्जारादिकांचे पुढचे पायांचाजो पंजा त्यास आणि लहान मुलांचा जो पंजा त्यास स्न॰.

**बुचकुळणें**, बुचकळणें.

**बुचकुळी**, स्त्री॰ बुचकळी.

बुचकोली, स्त्री॰ बुचकुली.

बुचटणें, न॰ दे॰ बुडडी.

बुचडा, पु॰ डोकीचे केंसाचीं अग्रें एकत्र करून गांठ घावी आणि ते केंस गुंडाळून आंतलेआंत गुंतविलेअसतां किं॰ वेणीकरून गुंडाळून तें गुडाळें केंसांत गुंतविलेंअसतां जो रचनाविशेष होतो तो; २, भूमीवर रुजलेलीं जीं तृणें, भाताचा काड्या, इ॰ त्या अनेकाचीं अग्रें एकत्रकरून गांठदिलीअसतां जो आकारविशेष होतो तो.

बुचडी, स्त्री॰ कांबळा, इ॰ कांचा चुण्या एकत्र बांधून पर्जन्य निवारणार्थ खोळेसारखी रचना करितात ती.

बुचबुचणें, कृमि, उवा, इ॰ कांचा क्षत, केश, इ॰ कांचाठायीं बुचबुचाट झाल्यामुळें कृमि इ॰ कांनीं चलनवलन विशिष्ट होणें.

बुचबुचाट, पु॰ कांहींएक पदार्थामध्यें कृमीचा, केशांत उवांचा, पलंग, इ॰ कांत ढेंकणांचा होतोजो अतिशय तो.

बुचबुचावणें, ओमळणें.

बुचबूच, अ॰ बुचुबुचू.

बुचा, ३ लिं॰ जा शरीरावयवाचाठायीं जें भूषण असावें तद्रहितजो अवयव तो.

बुचाकारभार, पु॰ लांडाकारभार.

बुचाकारभारी, पु॰ लांडाकारभारी.

बुचाटणें, बुचाडणें, आंगावरचे अलंकार, वस्त्रादिक पदार्थ, त्वरेनें तो पदार्थ मोडेल, तुटेल, हें नपाहतां बलात्कारानें ओरबडून घेणें; पक्षीं जाचे अंगावरून घेतलें ... हा कर्मला येत्ये; २, ला॰ कोणेकापासून चोर, इ॰ कानें कांहींएक विषय लुगारून घेणें.

बुचुकली, स्त्री॰ बुचकुली.

बुचुबुचू, अ॰ कांहींएक पदार्थ नासला जाई असे आंत अनेकवार हात, इ॰ घालण्याचें वि॰

बुचू, पु॰ कों॰ डोण, इ॰ कांचें भोंकाचें प्रतिबंधार्थ चिरगूट, तृण, इ॰ कांचा जो दट्टा मारितात तो.

बुजकणें, न॰ बुजगावणें.

बुजगवणें, बुजगावणें, न॰ पशुपक्षी, इ॰ कांनीं भ्यावें ह्मणून शेत, इ॰ कांचाठायीं केलें असतेंजें तृणादिकांचें मनुष्य, सिंह, इ॰ कांचे बाहुलें किं॰ ज्याला स्पर्श होतांच भयंकरशब्द व्हावा, इ॰ रूप यंत्रादिक जें कांहींएक करितात तें; २, ला॰ प्रसंग पडला असतां चोरादिकांचा पराभवकरण्याचें सामर्थ्य आंत नसतांही ज्याला बाह्याकारावरूनच ते चोरादिक भीत असावे असेंजें कांही वस्तु, क्रिया, इ॰ तें; उ॰ बाईनें चोराची गांठ पडलीअसतांही तरवार उपयोगीं पडेलसें प्रमाण नाहीं पण बुजगावणें आहे ह्मणून बाळगावी.

बुजट, ३ लिं॰ बुजण्याचा स्वभाव ज्याचा तो.

बुजणें, अपूर्व पदार्थास भयकरी असें मानून भयचकित होणें; २, कोणएक छिद्र भरलें जाणें किं॰ भरे असें करणें.

बुजबुजाट, पु॰ बुचबुचाट.

बुजरा, ३ लिं॰ बुजट.

बुजवणी, स्त्री॰ दुसरा बुजला जाई असाजो शब्दादि व्यापार ती.

बुजावणें, न॰ बुजगावणें.

बुजीर, ३ लिं॰ बुजट.

बुजू, पु॰ कों॰ बुचू.

बुझट, ३ लिं॰ बुजट.

बुझणें, बुजणें.

बुटकण, बुटकन, बुटकर, बुटदिनीं, बुटदिशीं, अ॰ अनु॰ जलादिकांत पाषाणादिक त्वरेनें बुडणें किं॰ त्यापासून बाहेर निघणें, इ॰कांचें वि॰

बुटका, ३ लिं॰ संप्रदायापेक्षां आंखूडजो लेखणी, काठी, हात, पाय, बोट, इ॰ पदार्थ तो.

बुटकुला, ३ लिं॰ घागर, इ॰ पात्र लघुत्वविशिष्ट असतां तिरेनें त्यास म्ह॰

बुटकुलें, न॰ बुडकुलें.

बुटकुळी, स्त्री॰ बुचकळी.

बुटटकी, स्त्री॰ वा॰ फुवारी.

बुटबुटीत, ३ लिं॰ वा॰ चांगला शिजला नाहीं म्हणून सटसटीतजो भात, इ॰ पदार्थ तो.

बुटबूट, स्त्री॰ अ॰ फुटफूट.

बुटा, पु॰ कों॰ बूट द्वितीयार्थी.

बुटारणा, ३ लिं॰ रवुजट.

बुटी, स्त्री॰ वस्त्रादिकांवर रंगादिकानें जीं पुष्प, पर्ण, फल, इ॰कांचीं चिन्हें केलीं असतात तीं; २, विलक्षण गुणादायक कोणेकापाशीं गुप्त असतेंजें कांहीं औषध ती; ३, प्रसंगीं त्याच्या व्यवहाराचा निर्वाहाविषयीं उपयुक्त असें आपल्यापाशीं असतेंजें विद्यारूप किं॰ द्रव्यरूप साहित्य त्यास म्ह॰

बुटीदार, ३ लिं॰ बुटीनें युक्तजें वस्त्रादिक तो.

बुटें, न॰ गाड्याचे कण्याबरजें लांकूड बसवितात तें.

बुटेदार, ३ लिं॰ बुटीदार.

बुट्टा, पु॰ बूट द्वितीयार्थी.

बुट्टी, स्त्री॰ बुटी.

बुट्टीदार, ३ लिं॰ बुटीदार.

बुट्टेदार, ३ लिं॰ बुटेदार.

बुंठण, न॰ थोंटण.

बुंठा, ३ लिं॰ थोंटा.

बुडकणें, वा॰ डुबणें.

बुडकी, स्त्री॰ उन्हाळ्यांत नदी, ओढा, इ॰कांचे कांठीं मोट, इ॰ लावायाकरितां नद्यादिकांचें पाणी येऊन सांचे अशीजी खळी खणितात ती; २, बुडी.

बुडकुला, पु॰ रा॰ शेरभर रुमार पाणी, इ॰ मावायाजोगें जें मृत्तिकेचें पात्र तो.

बुडकुली, स्त्री॰ रा॰ लहानजो बुडकुला ती.

बुडकुलें, न॰ बुडकुला आणि बुडकुली यांचें सामान्य नाव.

बुडखा, पु॰ वृक्ष, काष्ठ, पर्ण, गोष्ट, इ॰ पदार्थाचें मूल आणि अग्र असेजे दोन प्रांत असतात त्यामध्यें मूलरूप विभाग किं॰ मूलाकडील विभाग तो.

बुडऱ्या, ३लिं० तळऱ्या.

बुडणें, कोणेकानें जलादिकांत अंतर्हित होणें; २, ला० विद्या, व्यापार, देणें, घेणें, दुःख, विषय, इ०कांनीं केवळ कोणेकानें व्यापलें जाणें; ३, द्रव्य, धान्य, इ०कानीं हानीतें पावणें किं० तन्मूलकजी अपकर्षदशा तद्विशिष्ट मनुष्य, देश, इ०कानें होणें; उ० यंदा अवर्षामुळें दोनें बुडालीं ह्मणून मीच बुडालों असें नाहीं सारादेश बुडाला; ४, विवक्षित उद्योगादि केलें असतां लब्ध होईल किं० सफल होईल अशाप्रकारें संभाविलजो अर्थ त्याणें त्या उद्योगाद्यभावामुळें लब्धकिं० सफल नहोतां फुकट जाणें; उ० समयास जर तुह्मी तेथें पोंहचलां नाहीं तर तिकडील दक्षणा बुडेल आणि घरच्या कामाच्या दिवसही बुडेल; ५, पूर्वी व्यवहारांत चालत होताजो नाणें, ग्रंथ, धर्म, रीत, इ० त्यांची व्यवहार्यता नाहीशी होणें किं० तन्मूलक त्यारुपया, इ०कानीं अव्यवहार्यता पावणें; उ० रुपया कांहीं पाण्यांत बुडवावा लागत नाहीं त्याची चाल बुडाली ह्मणजे रुपया बुडतो; दिवस बुडणें, इ०स्थलीं मावळणें; ह्म० चढेल तो पडेल, पोंवेल तो बुडेल.

बुडता, ३लिं० रा० शिजावा, तळावा, भिजावा इत्यायर्थ आंत घातला भाजी, फळें, इ०पदार्थ तो बुडे इतकाजो पाणी, तूप, दूध, इ०पदार्थ तो; पक्षीं फलादिकांचेंही वि०

बुडताकाळ, पु० संपत्यादिकांच्या उत्तरोत्तर अपकर्षहोण्यास कारणजो काळ तो.

बुडतापाया, पु० बुडत्या काळाचीजी आरंभावस्था तो.

बुडबुडणें, पुटपुटणें.

बुडबुडा, पु० उदक, दूध, इ० सद्रवपदार्थाच्या मोक्तिकाकार फोकळजो क्षणिकविकार विशेष होतो तो.

बुडबूड, स्त्री० अ० पुटपूट.

बुडला, ३लिं० रा० बुडता

बुडवणी, ३लिं० वा० दोरी न लागतां हातानेंच काढायाजोगेंजें पाणीं तें व त्याचा आशय.

बुडवण्या, ३लिं० वा० व्यवहारादिकामध्यें आपण बुडवून दुसऱ्यास बुडविण्याचा स्वभावजाचा तो.

बुडव्या, ३लिं० बुडवण्या.

बुडस्थळ, न० जेथें व्यवहार कर्ता बुडेल अशी संभावना असत्ये असाजो कांहीं व्यवहारांश त्यास ह्म०; उ० समुद्रांतील व्यवहार हें मोठें बुडस्थळ आहे भल्यामाणसानें करूं नये; २, कांहीं व्यवहार बुडाल्यामुळें त्याव्यवहारकर्त्यास जी बुडालेपणारूप दुष्टअवस्था प्राप्त होत्ये तें; उ० यंदा घरीं बसलों त्यामुळें चोंहोंकडून बुडस्थळ झालें.

बुडी, स्त्री० उदकादिकांच्याठायीं प्रा० बुद्धिपूर्वक बुडण्याचा व्यापार ती; मारणें धातूचेयोगीं प्र०; याणें चारपांचदां बुडी मारली, इ०

स्थलीं बुडीमारून राहिला; रा॰ शोभर बु
ड्यामारून गांड कोरडी ठरवविणारा ह्म॰
कोणेक कर्म यथेष्टकरूनही लोकांस अ-
लिप्तपणें वागणारा.

**बुडीं**, अ॰ तळीं.

**बुडीत**, न॰ कोणेक व्यवहारीं फलावर दृष्टि न
ठेवतां केवळहें बुडालें अशा बुद्धीनें कोणेका-
स देणें, इ॰ द्वारा खर्चावें लागतेंजें द्रव्यादिक
तें; उ॰ गुहागरकरांची मुलगी तुह्मी करणा
रतर दोनशें रुपये बुडीत द्या आणि तीनशें रु-
पये कर्ज द्या ह्मणजे घडेल.

**बुडीतकूळ**, न॰ सावकार, इ॰कांचा पैका, इ॰
फेडण्याविषयीं थकलेलेंजें कूळ तें.

**बुडीतखत**, न॰ ज्याचें रुपये, इ॰ उगवतील‍ऐ
अशी संभावना होत नाहीं असेंजें कर्जखत
तें.

**बुडीतखर्च**, पु॰ ज्याचा मोबदलाऐवज आप-
ल्यापाशीं रहात नाहीं असाजो विवाहादि
व्यवहारांगत्वेंकरून होतो खर्च तो किं॰ ज्या-
पासून कालांतरीं कांहीं फल होईल तर होउ
परंतु प्रस्तुत कांहीं फलसंबंध दिसत नाहीं
अतएव हें बुडालें असें समजून कोणेकव्य-
वहाराच्या उद्देशें करितातजो खर्च तो; उ॰ल-
ग्नास हजार रुपये लागले त्यांत पांचशें रु-
पयांचे मुलीवर दागीनें आहेत बाकी पांच-
शें रुपयेमात्र बुडीतखर्च झाला; एथें शेतपा-
डीन ह्मटलेंतर अर्धीं दोनहजार रुपये केवळ
बुडीतखर्च केला पाहिजे तेव्हां बांधपालण्या-
चे योग्यतेस येईल; २, व्यवहारांत बुडालें
ह्मणून खर्चीं लिहितातजें द्रव्यादिक तो.

**बुडीतखातें**, न॰ बुडीत कुळांचेंजें खातें तें.

**बुडील**, ३ लिं॰ रा॰ बुडऱ्या.

**बुडूख**, न॰ बुडख्या.

**बुणगी**, स्त्री॰ सजगुऱ्याचे दाण्यावरजें टोप-
ण असतें ती.

**बुणगें**, न॰ बाजारबुणगें प्रथमार्थीं.

**बुतारा**, पु॰ कों॰ थोर केरसूणी.

**बुतारी**, स्त्री॰ कों॰ केरसूणी.

**बुंद**, पु॰ एक औषधीचें फल आहे; २, बिंदुप्र-
थमार्थीं; २, ३ लिं॰ लालपणाच्या अतिशय
वर्णनीयअसतां हें विशेषण; उ॰ ह्यापागो-
ट्याचा रंग लालबुंद आहे; ४, पदार्थाचा ना-
मीपणा वर्णनीयअसतां हें वि॰; उ॰ हें अ-
क्षर कसेंबुंद आहे.

**बुदकणें**, कों॰ बुकलणें.

**बुदका**, पु॰ कोणाएकास मोठ्यानीं मारलीजी
बुकी ती.

**बुंदकी**, स्त्री॰ वस्त्रादिकांवर बारीक असतें
जें रंगादिकांचें बिंदुसारखें चिन्ह ती.

**बुंदडा**, ३ लिं॰ बुंद चतुर्थार्थीं.

**बुदबळ**, न॰ राजा, वजीर, हत्ती, प्यादा, इ॰
क्रीडासाधन काष्ठादिकांचे पदार्थ केले अ-
सतात ते प्र॰

**बुंदी**, स्त्री॰ हरभरा, इ॰कांचें पीठ पातळकरू-
न झाऱ्यानें तळणींत त्याचे थेंब पाडून त-
ळून पक्वान्न करितात त्या; प्रा॰ अनेकव
चनांत

चनांत प्र०; बुदीचे लाडू इ० स्थळीं एक वचनही दिसते.

**बुद्द**, स्त्री० बुद्धीचा अपभ्रंश; २, पु० नास्तिक मत प्रवर्तक देव आहे; ३, त्रिलिं० जाणला गेलाजो कांहीं अर्थ तो; ४, बोध झालाआहे ज्यास तो.

**बुद्धि**, स्त्री० सं० निश्चयात्मकजी अंतःकरण वृत्ति ती; २, विद्या, कला, लोकव्यवहार, दुसऱ्याचें इंगित, इ० जाणणें, पाठकरणें, न विसरतां धरणें, इ० विषयीं साधनभूतजी अंतःकरणशक्ति ती; बुद्धीचा सागर म्ह० उत्कृष्टजो बुद्धिमान त्यास म्ह०; बुद्धीचा खंदक, बुद्धीचा नवसागर, म्ह० विपरीत लक्षणेनें केवळ अप्रबुद्धजो त्यास म्ह०; म्ह० ज्यास बुद्धि नाही त्यास भांडवल नाहीं; शिकविली बुद्धि आणि बांधली शिदोरी बहुत दिवस पुरत नाहीं; आधिं बुद्धि जात्ये मग येभव जातें; ३, पदार्थाचा विपर्यांकरणसमयीं हा बरा, हा वाईट, हा उंच, हा ठेंगणा, इ० रूप विशेषणविशिष्ट जे अंतःकरणाचे आकार होतात ते प्र० गुणबुद्धि, दोषबुद्धि, कपटबुद्धि, इ० स०; ४, पुण्यपापादि बरें, वाईट, इ० करण्याविषयीं प्रयोजकजो अंतःकरणाचा स्वभाव ती; म्ह० बुद्धीसारखें फळ; ५, कांहीं कर्माचाठायीं प्रवृत्त होण्यास किं० निवृत्त होण्यास प्रयोजक उठत्येजी अंतःकरणवृत्ति ती; उ० काशीहून माघारें यावें अशी मला तेव्हां बुद्धि झाली; ६, कोणेक कार्याचा निर्वाहाविषयीं दुसऱ्याचेसांगीवरून किं० स्वतः विचारानें असें असें याप्रकारें करावें, इ० रूपजें उपाय ज्ञान होतें ती; उ० चांगली बुद्धि असेल ती सांगावी; बुद्धीचा खोटा म्ह० ज्याची दुष्टबुद्धि तो; बुद्धीशीं वैर करणें म्ह० हें यावेळेस केलें असतां बरें आहे, इ० मनांत आलें असतांही उपेक्षा करणें; कोणेकाचे बुद्धीस लागणें म्ह० त्याचे अनुमतानें वागणें.

**बुद्धिकौशल**, न० तर्कादि करण्याविषयीं बुद्धीचेंजें कौशल तें.

**बुद्धिपुरःसर**, अ० सहजगतीनें असें नव्हे अंतःकरणानें तोच उद्देशलक्षून उठविलीजी प्रवर्तकवृत्ति तीणेंकरून; उ० बुद्धिपुरःसर पाप केलें आणि सहज घडलें यास अंतर आहे; हे आमचे घरीं येत नाहींम्हणतात म्हणून बुद्धिपुरःसर यांचेघरीं गेलों.

**बुद्धिपूर्वक**, अ० बुद्धिपुरःसर.

**बुद्धिबळ**, न० प्रसंगविशेषीं बुदबळास म्ह०

**बुद्धिभेद**, पु० अमुक करावें किं० अमुक करूंनये, इ० रूप प्रवृत्त झालेल्या बुद्धीच्या कांहीं कारणामुळें होतोजो विपर्यास तो.

**बुद्धिभ्रंश**, पु० कर्तव्या कर्तव्यादि विचार ज्तिणें

जिणेंकरून समजतो अशीजी बुद्धि ति- जपासून काम, लोभ, इ॰ कारणामुळें होतो जो मनुष्यादिकांच्या भ्रंश तो.

**बुद्धिमंत**, ३लिं॰ विद्याकलादि समजणें, इ॰ विषयीं ज्याची बुद्धि परम निपुण तो.

**बुद्धिमंद**, ३लिं॰ जडबुद्धि.

**बुद्धिमान्**, ३लिं॰ बुद्धिमंत.

**बुद्धिवंत**, ३लिं॰ बुद्धिमंत.

**बुद्धिवाद**, पु॰ कोणेकास कोणी तूं याप्रकारें असेंअसें कर त्यांत तुझें बरें होईल, इ॰रूप कथितोजें बुद्धीविषयीं उपदेशात्मकवाक्य तो.

**बुद्धिवान्**, ३लिं॰ बुद्धिमान्.

**बुद्ध्या**, अ॰ बुद्धिपूर्वक.

**बुद्ध्यारूढ**, ३लिं॰ बुद्धीच्याठायीं आरूढ ह्म॰ विषयीकृतजो कांहीं अर्थ तो.

**बुद्बुद**, पु॰ सं॰ बुडबुडा.

**बुद्रुख**, ३लिं॰ विवक्षितसजातीय मंडळीत वयानेंथोर, बुद्धीनें प्रौढ, असाजो मनुष्यादिक तो; २, एक प्रांत परगणा, इ॰कांत एकानावाचे दोन गांव, दोनघोतें किं॰ दोन पुरुष, इ॰ असतां त्यांतजो आगोदरचा किं॰ मोठा किं॰ प्रतिष्ठित त्याचें हें वि॰

**बुध**, पु॰ सं॰ नवग्रहांतील चवथाजो ग्रह तो; २, ज्ञानी.

**बुंध**, न॰ वृक्ष, तृण, केरसुणी, इ॰कांच्या मूलरूपविभाग तें; २, कों॰ पात्रादिकांच्याजो तळह्मणून विभाग तें.

**बुधला**, पु॰ तेल, तूप, इ॰ पदार्थ ठेवायाकरितां आंवळगळ्याचें मोठेंजें चर्मपात्र केलेंअसतें तो.

**बुधली**, स्त्री॰ मशाल, इ॰कांचें तेल घाळगायासाठीं तोटीलावून चर्माचें किं॰ धातूचें करितातजें पात्र ती; २, सुगंधि औषधी तेल, इ॰ठेवायाकरितां अंवळगळ्याचें केवळ लहानजें चर्मपात्र करितात ती; ह्म॰ तोंडी तीळ आणि गांडीस बुधली.

**बुधलें**, न॰ बुधला.

**बुधवार**, पु॰ सातांवारांतील चौथा.

**बुधवारणें**, ह्मशीनें बुधवारीं विणें.

**बुंधा**, पु॰ वृक्षादिकांच्या बुडख्याकडील जो विभाग तो.

**बुंधारणें**, कों॰ केरसुणीचे बुंध्यानें पोर. इ॰कांस मारणें.

**बुंधारा**, पु॰ बुंधा.

**बुधाष्टमी**, स्त्री॰ शुक्लपक्षींचीजीबुधवारीं अष्टमी ती.

**बुबळ**, न॰ बुबूळ.

**बुबू**, स्त्री॰ हिं॰ यवनजातीय अमीरलोकाचीजी स्त्री ती.

**बुबूळ**, न॰ नेत्रांतीलजो मांसगोलक तें किं॰ त्यांतील काळा आणि पांढरा असे जे दोनविभाग ते प्र॰

**बुभुक्षा**, स्त्री॰ सं॰ क्षुधा.

**बुभुक्षित**, ३लिं॰ क्षुधित; २, ला॰ उत्पन्नभक्षी.

**बुरखा**, पु॰ मराठे, यवन, इ॰कांचा स्त्रिया, इ॰ गमनादिसमयीं सुखाद्यवयव झांकलेंजात असें डोईवरून घेतातजें वस्त्राचें प्रावरण, तो; २, पालखी, हत्ती, इ॰कांवरचें आच्छादन वस्त्र तो.

**बुरंगट**, न॰ केवळ बारीकअसून दाटजो पर्जन्य तें.

**बुरंगाळणें**, रा॰ पोर, इ॰कानें मनस्वी वर्तलों असतां मला शिक्षा होईल अशा भयानें अंतःकरणांत धरली असत्ये मर्यादा ती शिक्षकभयाचा अभावामुळें सोडून मनस्वी होणें.

**बुरंगें**, न॰ कों॰ बुरंगट.

**बुरजी**, स्त्री॰ बुदबळांचे डावांत सारीं मोहरीं मरून राजामात्र शेष राहतो असेंजें खेळाचें पर्यवसान ती.

**बुरट**, ३लिं॰ जीस दूध थोडें अशीजे हैस किं॰ गाय, इ॰ तो; २, बुरंट.

**बुरंट**, न॰ तृणें लहानलहान झाडें यांचे दाटीनें गच्च झालेलें जें स्थल तें.

**बुरटाचोर**, पु॰ केवळ दरोडेखोर नव्हे मनुष्याची दृष्टिचुकवून निजलेलें पाहून हळूच चोरीकरून जाणाराजो चोर तो.

**बुरडी**, ३लिं॰ बुरडींव

**बुरडींव**, ३लिं॰ बुरुडानें केलाजो वेळूच्या रूप, रोवळी, इ॰ पदार्थ तो.

**बुरणुशी**, ३लिं॰ बुरणुसाच्याजो जीन, इ॰ पदार्थ तो.

**बुरणूस**, पु॰ मेंढ्यांचा लोंकरेस तंतू नवळितां खळलावून लाटूनजें ऊर्णावस्त्र करितात तो.

**बुरदंड**, पु॰ भुरदंड.

**बुरंबट**, ३लिं॰ बुरुंबजामध्यें बहुत असेंजें स्थल तो.

**बुरबुरणें**, ओला बुळबुळीतजो मळ तेणेंकरून दांत, शरीर, भांडें, इ॰ लिप्त असणें; २, क्रोधादिकामुळें कोणेकानें कुरकुरणें; ३, वा॰ चिघळणें.

**बुरबूर**, स्त्री॰ कुरबूर; २, पावसानें बुरंगटपणें पडण्याच्याजो प्रकार ती.

**बुरशी**, स्त्री॰ केनशी.

**बुरसणें**, बुरशीनें युक्त होणें.

**बुरसा**, पु॰ बुरशी; २, ३लिं॰ रा॰ ओंगळ द्वितीय तृतीयार्थी.

**बुरसावणें**, पदार्थ बुरशानें युक्त होणें; उ॰ तें दह्यांचें मडकें बुरसावलें; २, रा॰ वस्त्र, पात्र, स्थल, शरीर, शरीरावयव, इ॰ मलसंबंधानें हिडिस दिसे असें करणें; उ॰ हा पोर स्नान करतांना आंग चोळावें तें चोळीत नाहीं बुरसावूनमात्र येतो.

**बुरा**, पु॰ बुरशी.

**बुरासाकर**, स्त्री॰ साकरेंत एक भेद आहे.

**बुरुंब**, पु॰ कों॰ बुरूमप्रथमार्थी.

**बुरूज**, पु॰ तोफ, इ॰ टेवायासाठीं किल्ला, इ॰ कांची तटबंदी, इ॰ स्थलीं वर्तुलाकार वंदिस्त

स्त करितात तो; २, ला० तदाकारजो सेनासन्निवेश तो; ३, पगडडावामध्यें जा एकानें जिंकल्या एकारंगाचा सोंगट्या तो.

**बुरूड**, पु० वेळू, इ०कांचें पाट्या, रूपें, इ० करणारी एक जाति आहे.

**बुरूम**, पु० घट्टपिंडीभूत झालेला असा मृत्तिकाविशेष आहे; २, मनुष्यास तारुण्यआलें ह्मणजे मुखावयवांवर पुळ्या याव्या असा विकृतिविशेष होतो तो; ३, न० रा० त्या पुळ्या प्र०

**बुरेहाल**, पु० हिं० पराकाष्ठेचें जे हाल ते.

**बुलाख**, पु० हिं० नाकाचा मधलेपडद्यास-छिद्रपाडून जें एकमोतीं यवन, इ०कोंचा स्त्रिया घालित असतात तो.

**बुली**, स्त्री० लहान मुलाची चोंटकुली; २, ला० तदाकार रूप्यसुवर्णादिकांचें भूषण मुलाचे कमरेस करगोट्यांत बांधावयास करितात ती.

**बुवा**, पु० बावा.

**बुळक**, स्त्री० बुळकी.

**बुळकट**, ३लिं० वा० तेलादिसंबंधामुळें धरला असतां निसटायाजोगा बुळबुळीत झालेला जो पात्रादिपदार्थ तो.

**बुळकण, बुळकन, बुळकर, बुळदिनी, बुळदिशीं**, अ० अनु० कोणेक आधारापासून आधारबंधाचे शैथिल्यामुळें धक्का, वेग, प्रयत्न, इ० कारणावांचून अचळजें कोणेक पदार्थाचें स्फुरणें त्याचें वि०; उ० खुंटीवर पागोटें ठेवायास गेलों तों बुळकण खुंटीहातांत आली.

**बुळकणें**, अतिसारादिविकृतीमुळें गुदद्वाराचा बंध शिथिलहोऊन बुळकन हगणें; २, रा० सांधा, ग्रथि, इ० घट्टनबसल्यामुळें बुळकन मोकळें होणें; ३, भोंपळा, कोहळा, इ० ढगळणें.

**बुळका**, ३लिं० रा० घट्टनव्हे असाजो सांधा. गांठ, गृहादिरचना, इ० तो; २, ला० व्यवस्था, बंदोबस्त, इ० मूलक जें दृढत्व तें जांत नाहीं असाजो कारभार, व्यवहार, वचन, किं० तो कर्त्ता, इ० तो.

**बुळकांडी**, स्त्री० कों० बुळकी.

**बुळकी**, स्त्री० अतिसारादिविकृतीमुळें गुदद्वाराचा आधारबंध शिथिलहोऊन पातळ विष्ठेची धारा लागत्ये ती; २, ला० कणिंग. घागर, इ०कांस छिद्रपडल्यामुळें जी धान्य, जल, इ० कांची धारा लागत्ये तीस ह्म०

**बुळबुळाट**, पु० बुळबुळीतपणा.

**बुळबुळावणें**, क्षालन, घर्षण, इ० संस्कारानें स्वच्छ करायाचा जो वस्त्र, पात्र, शरीर, इ० पदार्थ तोतो संस्कार बरवरकेल्यामुळें बुळबुळीत मळानें विशिष्ट करणें.

**बुळबुळीत**, ३लिं० अतिस्निग्ध स्वद्रव ज्याचा स्पर्श मृदु ज्याचा भूम्यादिकांवर लेपझाला असतां तेथून हात, पाय, इ० निसरतें असा जो तेल, तूप, शेवाळ, कोरफड, भोंकर, इ० कांचा मगज, इ० तो; २, तेणेंकरून लिप्त जो

जो पात्र. वस्त्र, मार्ग, शरीर, अवयव, स्थल, इ॰ पदार्थ तो; ३, सामान्यतः नपुंसकीं विशेष्यरूपें प्रयोग करितात; उ॰ हातानें बुळबुळीत अद्यापि जात नाहीं.

बुळबूळ, स्त्री॰ बुळबुळाट.

बुळा, पु॰ नपुंसक; २, बुळका द्वितीयार्थी.

बुळी, स्त्री॰ गंजीफांतील जी नावर ती.

बू, पु॰ बाऊ.

बूच, पु॰ बुच्च; २, गुडरी.

बूज, स्त्री॰ विद्वान्, इ॰ जो गुणी किं॰ शूरादिक जो कर्मकर्ता त्यांची किं॰ तदीयगुणकर्मांची राजा, धनी, इ॰ कांजवळ त्याणीं तें गुणादिक जाणून यथायोग्य प्रशंसा पूजादिक करावें अशी असल्येजी मान्यता तीः किं॰ तादृश प्रशंसादिरूप होतोजो सन्मान ती; २, गंजिफांचे खेळांत लागतातजीं पानें ती; ३, पु॰ बुच्च.

बूट, पु॰ भांगेंच्याजो पुष्पगुच्छ तो; २, ला॰ वस्त्रादिकांवर जीं पुष्प, पर्ण, इ॰ कांची रंगादिनिर्मित अनेकचिन्हें असतात तीं प्र॰; ३, अपूर्व चमत्कारिक गोष्ट, श्लोक, वाक्य, कल्पना, स्त्री, इ॰ जो पदार्थ त्यास म्ह॰

बूड, न॰ वृक्ष, पात्र, इ॰ कांचाजो तळ तें; बूड टेकणें म्ह॰ गांड टेंकणें; २, स्त्री॰ सावकारी, कृषिकर्म, इ॰ व्यवहारांत येतोजो तोटा तो.

बूंद, पु॰ बुंद.

बूर, पु॰ अतिश्रमामुळें जो शरीराचा चुराडा तो; पड, निघ, धातूंचे योगीं प्र॰; उ॰ लिहितां लिहितां माझा बूर निघाला.

बृहत्, ३ लिं॰ सं॰ आकारानें मोठा जो द्रव्यरूप किं॰ ग्रंथादिरूप पदार्थ तो; २, मोठें ज्याचें शरीर तो; बृहच्छरीर, बृहदुदर, इ॰ स॰

बृहती, स्त्री॰ रिंगणी आणि डोरली त्यांस प्र॰; २, गांडीस म्ह॰

बृहस्पतवार, पु॰ बृहस्पतिवाराचा अपभ्रंश.

बृहस्पति, पु॰ नवग्रहांतील पांचवा ग्रह तो; जो देवांचा गुरु आहे; २, ला॰ उत्कृष्टजो बुद्धिमान् किं॰ वक्ताजो त्यास उपमा आरोप इ॰ कानें म्ह॰

बृहस्पतिवार, पु॰ गुरुवार.

बें, न॰ शेळी, मेंढी, गोवत्स, इ॰ कांचा शब्दाचें अनुकरण; बें करणें, म्हणणें, म्ह॰ अभिमान सोडून मी हरलों असें म्हणणें किं॰ दारवविणें.

बे, ३ लिं॰ हिं॰ दोन; परंतु याचा प्रयोग लेखें. इ॰ संख्या व्यवहारांत दिसतो; उ॰ बेएकें बे; बेवीस, बेचाळीस, इ॰; २, अ॰ वांचून या अर्थी याचा इतरपदाशीं पूर्वी योग होऊन विशिष्टसमास होतो; हा शब्द यवनभाषेंतील आहे म्हणून प्रा॰ यवनीशब्दाशींच योग होतो; उ॰ बेकैद, बेदर्दी, इ॰

बेअदबी, स्त्री॰ धनी, इ॰ कांशीं मर्यादा सोडून अमर्यादपणें जें वर्तन ती.

बेइमान, बेइमानी, ३ लिं॰ आपलें इमान जाणें सोडलें तो.

**बेइलाज**, पु॰ ३लिं॰ हिं॰ नाइलाज.

**बेक**, न॰ आपण दुसऱ्यापाशीं बोलतोजो कांहींअर्थ त्याशीं केवळ विरुद्ध किं॰ असंगत असाजो दुसरा बोलतो किं॰ करतोजो अर्थ त्यास ह्म॰; उ॰ मी एक ह्मटलेंअसतां तो बेक ह्मणणार तो माझेआसेंत कसा वागेल मी सांगितलें एक आणि तूं समजलास बेक त्यास मी कायकरूं; अशा एकशब्दघटितवाक्यांतच याचा प्र॰

**बेकार**, ३लिं॰ بیکار धंदा, रोजगार, नाहीं ह्मणून घरीं रिकामा बसलेलाजो कारकून. शिपाई, इ॰ तो.

**बेकी**, स्त्री॰ दोन,चार, सहा, इ॰ जी समसंख्या ती; इचा प्रयोग एकीबेकीचे खेळांत.

**बेकुबी**, स्त्री॰ हिं॰ बेकूबपणा.

**बेकूब**, ३लिं॰ हिं॰ वेडसंधा.

**बेकेद**, स्त्री॰ بیقید विरुद्धाचरणानें राजादिकानी स्थापिल्याकेदेचाजो उल्लंघ ती; २,अतद्विशिष्ट होई असें बोलणें, वर्तणें, करणें, इ॰कांचें वि॰

**बेकेदी**, ३लिं॰ بیقیدی बेकेदीनें विशिष्टजो मनुष्य, किं॰ भाषण, इ॰ तो.

**बेगड**, स्त्री॰ पिंचळा, तांबडा, इ॰ रंगाचा धूर देऊन करितातजो कथलाचा वर्ख त्या जातीचें नाव.

**बेगडी**, ३लिं॰ बेगडलावून सुशोभित केलाजो चित्र, मुकुट, जोडा, इ॰ तो.

**बेगम**, स्त्री॰ بیگم उपवर होऊन जिचा विवाह झाला नाहीं अशीजे स्त्री ती; २, मोठा प्रतिष्ठितजो मनुष्य त्याची स्त्री हा अर्थ यवनप्रसिद्ध.

**बेगमी**, स्त्री॰ कोणेक कार्यास निर्वाहक अपेक्षितजी सामग्री तिचा संपन्नतेनें होत्येजी कार्यास परिपूर्णतारूपदशा जिचे योगानें सामग्री नाहीं आतां कार्य निर्वाह कसा होईल ही काळजी फिटत्ये ती; २, संसारादिकांचे बेगमीविषयीं संपादितजो धान्यादि सामग्री समुदाय ती; उ॰ वर्षाची बेगमी सहामहिन्यांत खर्च जाली; ३, निश्चिंति; उ॰ हा एकदां निजला ह्मणजे चारप्रहरांची बेगमी.

**बेगार**, स्त्री॰ हिं॰ बिगार.

**बेगारी**, पु॰ हिं॰ बिगारी.

**बेगीं**, अ॰ झटकर.

**बेगून**, अ॰ बेगीं.

**बेचक**, न॰ स्त्री॰ हात,पाय,वृक्ष, इ॰कांस जेथें बोटें, शाखा, इ॰ दोन अवयव फुटतात त्यांचा तेथील मधलाजो संधिप्रदेश तें ती.

**बेचकुळीत**, अ॰ काष्ठादि दोन पदार्थांचीजी मिठी त्यांतील जो संधिप्रदेश त्यांत सांपड, धर, इ॰ धातूंचे योगीं प्र॰

**बेचकूल**, न॰ बेचक.

**बेचकें**, न॰ बेळकें.

**बेचरक**, अ॰ हिं॰ भय, लज्जा, संशय, इ॰रूपजी प्रवृत्तीचे संकोचास कारणें तीमनांत न

नधरितां जाणें, येणें, मारणें, इ०कांचें वि०

**बेचव**, ३लिं० निचव.

**बेचागळें**, न० बेळकें.

**बेचाळ**, ३लिं० संख्या आहे ४२ ; २, न० रा० बेचाळी.

**बेचाळी**, स्त्री० चर्वण करण्याचे मुखांतजे दोनभाग त्यांतील खालचा जो भाग ती.

**बेचाळीस**, ३लिं० बेचाळप्रथमार्थी; २, मातृवंशाकडील एकवीस, आणि पितृवंशाकडील एकवीस, असे बेचाळीस जे पितर त्यांस लक्षून शपथ, गालिप्रदानादिप्रसंगीं विशेष्या वांचूनही प्रयोग करितात; उ० तूं बेचाळीस स्मरून बोल; त्याणें त्याचे बेचाळीस उद्धरले.

**बेचाळें**, न० बेचाळी.

**बेचिराख**, अ० ‏بےچراغ‏ वस्ती मोडून दिवा न लागायाजोगी अवस्थाहोईअसें; हो, कर, बुड, इ०कांचें वि०

**बेजबाब**, अ० ‏بےجواب‏ अमर्याद भाषण करणें, बोलणें, इ०कांचें वि०

**बेजबाबी**, ३लिं० ‏بےجوابی‏ बेजबाबपणें वर्तण्याचा स्वभावजाचा तो.

**बेजमी**, स्त्री० बेगमी.

**बेजरब**, अ० हिं० बेचरक.

**बेजार**, ३लिं० ‏بیزار‏ कांहीं दुखणें किं०व्यापार, व्यवहार, इ०संबंधी परिश्रम भोगतां भोगतां पुढें कंटाळायाविषयीं असमर्थझाला जो तो.

बेट

**बेट**, न० ज्याचे भोंवता नदी, समुद्र, तळें, इ० पाण्याचा परिधि असतो असाजो गांव, शेत, इ० रहायाजोगा किं० तृणादिवृक्षायाजोगा स्थलविभाग तें; २, जा वृक्षादिकांचा मुळ्यांस अंकुर फुटून अनेक वृक्षादिक होतात असेजे केळ, वेळू, दर्भ, इ० त्यांचा एकापासून अनेक व्यक्तिहोऊन झालेलाजो समुदाय तें.

**बेटकुळी**, स्त्री० बेडकी.

**बेटणें**, विवक्षित ठसा खालीं ठेवून, वर पत्रा ठेवून ठशाच्या आकार पत्र्यावर उठेअसा ठशाशीं पत्रासंबंध करणें.

**बेटा**, पु० हिं० पुत्र; २, अ० वाक्यालंकारार्थ याचा प्रयोग करितात; जा, कर्ता, कर्म, इ०कांशीं हा संबंध होतो त्याचें लिंगवचन यास होतें; उ० कायचेटा शेत चांगलें आहे.

**बेटी**, स्त्री० हिं० कन्या; म्ह० पहिली बेटी मालाची पेटी.

**बेटीव**, ३लिं० बेटून केलेलाजो मूर्ति, दागिना, इ० तो.

**बेट्याचा**, अ० बेटाहिंतीयार्थी.

**बेंड**, न० गळू, इ०जें उठाणूं तें; २, वेंबी उंच वाढलेली असल्ये तें; ३, काजूच्या हिरवे बियेचा मागला जो देंठ किं० बेंड भोंवऱ्यांचा मूळचा जो देंठ तें; ला० बेंड फुटणें किं० बाहेर पडणें, म्ह० गुप्तपणें स्थितजो कांहींएक अर्थ तो प्रसिद्ध होणें.

**बेडकी**, स्त्री० लहानजो बेडूक ती; २, देडकिं० पोटरी

पोटरी, इ० कांचर आयात झाल्यामुळें जो तत्काळ उंचवटा उठतो ती; ३, मल्लादिकांचे दंड, पोटरी, यांतजो तालिम खेळण्याच्या योगानें घट्ट मांसगोलक होतो ती.

**बेडकुळी**, स्त्री० बेडकी.

**बेंडभोंवरा**, पु० एक वेलीचें फळ आहे.

**बेंडभोंवरी**, स्त्री० बेडभोंवऱ्याची वेल

**बेडा**, पु० या० रोंगा.

**बेंडा**, पु० रा० गलबताची वहिवाट करणारे जे तांडेल, इ० त्यांचें एक प्रतिष्ठित नांव आहे; २, ३लिं० ज्याचें बेंबीचें बेंड वाढलें आहे त्यास ह्म०

**बेडी**, स्त्री० हिं० बिडी विशेष्यार्थी.

**बेडूक**, पु० बरून उड्या मारीत देशातिक्रम करितो असा एक जलाश्रित जंतु आहे.

**बेडें**, न० कों० गुरें बांधायाकरितां निराळें जें गृह करितात तें; २, रा० बेलें.

**बेडौल**, ३लिं० हिं० ज्या पदार्थाचा डौल चांगला नाहीं तो.

**बेढंग**, पु० हिं० सोदेगिरी, इ० जा वाईट चेष्टा तो; प्रा० अनेक वचनांत प्र०; २, बेढंगी.

**बेढंगी**, ३लिं० रांडबाजी, इ० बेढंग करितो तो.

**बेढब**, ३लिं० बेडौल.

**बेणणी**, स्त्री० बेणण्याचा व्यापार ती.

**बेणणें**, शेत, इ० स्थलांतील अविवक्षितजें तृणादिक तें काढून स्वच्छ करणें.

**बेणा**, ३लिं० अदृश्यपणास कारणभूत जें कांहीं आच्छादन त्यापासून बाहेरून दिसाया जोगा बहिर्भूत झाला जो तो; उ० पाणी ओहोटलें ह्मणजे खडक बेणा पडतो; २, ला० बेणावला जो तो.

**बेणावणें**, दूरदेशीं गेल्यामुळें किं० इकडेतिकडे गैरबिल्हेस पडल्यामुळें आहे किं० नाहीं असें वाटायाजोगा झालेला जो मनुष्यादिपदार्थ त्याणें दिसायाजोगें होणें; उ० संध्याकाळीं माघारा येतों ह्मणून गेला तो पंधरा दिवसानीं बेणावला.

**बेत**, पु० कर्तव्य कार्याचा असें यायाप्रकारें करावें, इ० रूप योजनांत जो आकार तो; उ० मी बेत सांगेन त्याप्रमाणें घर बांध; २, कोणेक कार्याविषयीं अंतःकरणांत झाला असतो जो संकल्प तो; उ० यंदा काशीस जावें असा बेत आहे; ३, कोणेक व्यवहाराविषयीं व्यवस्थारूप केला असतो जो नियम तो; उ० त्याचे घरीं जेवणाखाणाचा बेत चांगला आहे; ४, कर्तव्य कार्याचा आकार विवक्षितानुरूप व्हावा ह्मणून जी त्याची आंकणी किं० काडी, इ० द्वाराजें आकारपरिमाण करितात तो; उ० तुमचे पायाचा बेत द्या ह्मणजे जोडा बांधीन.

**बेतणी**, स्त्री० अंगरखा, चोळी, इ० बेतण्याचा जो व्यापार ती.

**बेतणें**, अंगरखा, चोळी, जोडा, इ० विवक्षिताकारांत अंतर नपडावें ह्मणून त्यात्यांबेतानें अंकनादिद्वारा अन्वित करणें; २, बितणें.

**बेतवात**, पु० कांहींएक कार्याचा बेत, व्यवस्था, इ० तो.

**बेतविणें**, चारवविणें.

**बेताचा**, ३लिं० व्यवस्थानियमरूप बेत आहे ज्यामध्यें असाजो बोलणें, करणें, इ० व्यापार तो; २, विवक्षितकार्याचे बेतास उतराया जोगा जो पदार्थ तो.

**बेताल**, ३लिं० हिं० तालप्रमाणाची व्यवस्था जांत नाहीं असेंजें गाणें तो; २, तसें गाणारा जो तो; ३, क्षोभादिकारणानें पूर्वप्रकृत्यवस्थारूप मर्यादा रकडून मनस्वी झालाजो मनुष्य, त्याची प्रकृति, घोडा, रोग, इ० तो.

**बेताळीस**, ३लिं० बेचाळीस.

**बेती**, स्त्री० हिं० दुफांशी सोंगट्यांचा खेळामध्यें दोन फांशांवर तीनतीन पडले असतां जो डाव ती.

**बेतीव**, ३लिं० बेतानें करविलाजो अंगरखा, काम, इ० तो.

**बेत्या**, ३लिं० उगाच भलतेकार्याचा बेतमात्र करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बेदडा**, पु० एक मनुष्यांत जाति आहे.

**बेदम**, ३लिं० بیدم बेजार

**बेंदर**, स्त्री० एक वनस्पति आहे.

**बेदर्दी**, ३लिं० بیدرد भय संभावना न बाळगतां स्वच्छंदपणें वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बेदाणा**, पु० हिं० जांत बीं नाहीं अशी द्राक्षांत जाति आहे.



**बेदाणाडाळिंब**, न० ज्या डाळिंबाचे दाण्यांत बी नाहीं तें.

**बेदाद**, स्त्री० हिं० राज्यादिकांत कोठें दाद लागूं नये असाजो भाव होतो ती; उ० त्याचे राज्यांत बेदाद झाली; २, ३लिं० तद्विशिष्ट राज्य देशादिक.

**बेदावा**, पु० हिं० कोणेक विषयावर वादी किं० प्रतिवादी यांचे दाव्याचें होतेंजें राहित्य तो.

**बेदावापत्र**, न० यावर माझा दावा राहिला नाहीं, इ० रूप त्या मालकास पत्र कोणी दावा सांगणारा करून देतो तें.

**बेदिकत**, **बेदिक्कत**, अ० हिं० बिनदिकत.

**बेदिल**, ३लिं० ज्याचें अंतःकरण ठिकाणीं नाहीं असा खिन्न जो तो.

**बेंदूर**, पु० दे० पोळा, ज्यादिवशीं बैलांची पूजा करितात तो.

**बेधडक**, अ० हिं० बेचरक.

**बेनिसबत**, अ० हिं० बेलाशक.

**बेपरवा**, ३लिं० بی پروا जो कशाची किं० कोणाची पर्वा बाळगीत नाहीं तो.

**बेफाम**, ३लिं० بیفام गैरसावध.

**बेफिकीर**, ३लिं० بیفکر काळजीनें रहित तो.

**बेंबट**, न० मोठी उंचजी बेंबी तें किं० निदान सरीं साधारण बेंबीसही म्ह०; २, पशूची जी बेंबी तें.

**बेंबटणें**, स० बांसरूं, इ० कानें भयामुळें बें असा शब्द करणें.

**बेबंद**, ३लिं॰ بی بند जांत बंदोबस्त नाहीं असेंजें राज्य, कारभार,इ॰ तो.

**बेबा**, पु॰ एक अतिक्षुद्रपक्षी आहे.

**बेबाक**, स्त्री॰ بیباک घेणें, देणें, इ॰ व्यवहारादिकांचा देऊन घेऊन जिकडीलतिकडे उलगडूनजी निःशेषता ती; २, ३लिं॰ जिकडीलतिकडे उलगडून निःशेषता झाली ज्याची असाजो देणें, घेणें, इ॰ व्यापार तो.

**बेंबावणें**, बेंबटणे.

**बेंबी**, स्त्री॰ उदरांचमध्यें जो ग्रंथिरूप अवयव असतो जेथें नालसंबद्ध असतें ती.

**बेमान**, ३लिं॰ بی ایمان बेइमान.

**बेमालूम**, ३लिं॰ بی معلوم कोणेक अधिकरणीसंबद्ध झालेलें जें चीर, रेषा, इ॰ कांहीं एक तें नीट करणें, पुसून टाकणें, सांधणें, इ॰ संस्कारानीं त्याची खूणही राहूनये असें दूर झालेंजें तें रेषादि तो किं॰ तें अधिकरण तो.

**बेसुरवत**, अ॰ हिं॰ मुरवत नधरितां मारणें, जाणें, इ॰कांचें वि॰

**बेर**, पु॰ कों॰ तृणांत एक जाति आहे; २, स्त्री॰ रा॰ भूमीस बेरणीचाजो संस्कार ती.

**बेरकट**, न॰ बेरीनें मिश्रित अतएव दाट खिरवलासारखें झालेलें जें तेल, तूप, तें.

**बेरकटणें**, समई, तेलाचें भांडें, इ॰ बेरीचे कटानें लिप्त होणें.

**बेरंग**, पु॰ कथा, पुराण, गोष्ट, लग्नाद्युत्सव, इ॰कांत चालला असतोजो रंग त्याचा कांहीं कारणामुळें होतोजो भंग तो.

**बेरट**, न॰ बेरकट.

**बेरड**, पु॰ मनुष्यांत एकजाति आहे; प्रा॰ जे चोरीकरून उपजीवन पावतात तो.

**बेरणी**, स्त्री॰ रा॰ पेरणी, इ॰ करायाकरितां जमीन बेरण्याचाजो व्यापार ती.

**बेरणें**, एकदां नांगरलेलीजी जमीन तीपुनः आडवी नांगरणें.

**बेरी**, स्त्री॰ तेल, तूप, यांचे पोटचाजो मळ ती; २, गुळाचाजी मळी ती.

**बेरीज**, स्त्री॰ अनेक अंकराशी एकत्र मिळविल्यानें विशिष्टसंख्यात्मक सिद्ध होतें जें फल ती.

**बेरोजगार**, **बेरोजगारी**, पु॰ बेकार.

**बेरोजा**, पु॰ रंगाद्युपयोगी पदार्थ आहे.

**बेल**, पु॰ बिल्व; २, न॰ बेलफळ.

**बेलकडें**, न॰ कों॰ खेंकडा.

**बेलका**, पु॰ वा॰ दांडा नाहीं ज्यास असाजो ओळक तो.

**बेलकाचरी**, स्त्री॰ बाळबेलाचे काप वाळवून औषधार्थ ठेवितात ती.

**बेलखरूज**, स्त्री॰ रा॰ मोठेमोठे फोड येऊन चिघळून मोठींचकंदळें पडतात अशीजी ओली खरूज ती.

**बेलगाम**, **बेलगामी**, ३लिं॰ हिं॰ जाण्यायेण्याचे सोईचें नव्हे असें आडवळणीजें शेत, घर, इ॰ तो.

**बेलटी**, स्त्री॰ कों॰ डोकें; निंदार्थिं; उ॰ तूं

लवाड्या करितोस परंतु तुझी बेलटी फोडू-
न टाकीन.

बेलटें, न० कों० नारळ; निंदास्तुति; २, बेलटी.

बेलदार, पु० हिं० खाण, इ० कांतून दगड आणू-
न विकून उपजीविका करणारी अशी एक म-
नुष्यांत जाति आहे.

बेलपत्रीरुपया, पु० बिल्वपत्राचें चिन्ह ज्यावर
असतें असा अंकुशीरुपयांत भेद आहे.

बेलफळ, न० बिल्ववृक्षाचेंजें फळ तें; २, तदा-
कार काष्ठादिकांचें तपकील, इ० ठेवायास
करितातजें पात्र तें.

बेलभंडार, पु० दिव्य, शपथ, इ० करण्यावि-
षयीं उचलितातजो देवावरील बेल, भंडार,
इ० तो; २, तत्पूर्वकजी आण भाक ती.

बेलवात, स्त्री० देवाजवळ लावायाचा वातीं-
त एक भेद आहे.

बेला, पु० डहू; २, नारळाचें पात्र.

बेलाग, ३लिं० हिं० ज्यावर कोणीकडून लाग
चालत नाहीं असाजो दुर्गमकिल्ला, दुःसा-
ध्यगोष्ट, दुखणें, इ० तो.

बेलापुरीरुपया, पु० अंकुशीरुपयांत एक
भेद आहे.

बेलाशक, अ० हिं० बेधडक.

बेलिया, पु० एक मोगरींत भेद आहे; २, ति-
चींजीं फुलें तो; ३, त्याणें सुगंधित केलेल्या
तिळांचें काढितातजें तेल तो; ४, त्याफुलां-
चें अत्तर तो.

बेली, स्त्री० नारळ मध्यें फोडिला असतां
होतात जीं दोनशकलें त्यांतील खोबरें काढू-
न घेऊनजीं कवचें राहतात तीं प्र०; २,
३लिं० अनेक रंगाचीं अनेक सूत्रें विणून व-
स्त्र करण्याचा एक प्रकार आहे त्याप्रका-
रें वस्त्र विणलें असतां जो वस्त्रावर विचि-
त्र वर्ण उत्पन्न होतो तो; ३, तद्विशिष्टजें तें
लुगडें, इ० वस्त्र तो; याचा स्त्रीलिंगीं लुग-
ड्याविषयीं विशेष्यलेंकरून हा प्र० होतो.

बेलें, न० बेला; २, राजादिकांची स्वारी नि-
घाली असतां रुपये, होन, मोहरा, इ० द्रव्य
घालून जें पोतें स्वारांबरोबर घेतात तें.

बेलेबरदार, बेलेबारदार, पु० द्वितीयार्थ-
क बेलें वाळगणाराजो मनुष्य तो.

बेवकूब, ३लिं० हिं० बेकूब.

बेवाडें, न० कों० गृहासजो मजला देतात त्या-
स म्ह०

बेवारसा, पु० हिं० कोणेक विवक्षितविष-
यावर कोणेकाचे वारशाचा होतोजो अ-
भाव तो.

बेवारशी, ३लिं० बेवारशीक.

बेवारशीक, ३लिं० ज्या पदार्थावर विवक्षि-
तमनुष्याचा वारसा नाहीं तो पदार्थ.

बेवारा, पु० देणें, घेणें, इ० व्यवहाराचा, देणें
घेणें, इ० व्यापारानें जिकडीलतिकडे व्य-
वस्था करूनजो उलगडा तो.

बेवीस, ३लिं० संख्या आहे २२

बेश, ३लिं० वि०वि० विवक्षित गुणयोगा-
नें चांगला तो.

**बेशरवाश्ता**, ३लिं॰ वि॰वि॰ अनिशयितजो बेश तो.

**बेशामी**, अ॰ हिं॰ सर्कार, इ॰कांस कतबालिहून द्यावयाचा असतां मालकाचे नावामागें याचा प्र॰ होतो; उ॰ दस्तक बेशामी नारायण चोगुले.

**बेशरम**, ३लिं॰ निर्लज्ज.

**बेशिस्त**, ३लिं॰ गेरशिस्त.

**बेशुद्ध**, ३लिं॰ कामक्रोध रोगादिकांची मूर्च्छा, इ॰कानें ज्याची शुद्ध गेली आहे तो.

**बेष**, ३लिं॰ बेश.

**बेषक**, ३लिं॰ बेशरम.

**बेषरवास्ता**, ३लिं॰ बेशरवास्ता.

**बेसन**, न॰ हिं॰ हरभऱ्याचें पीठ तें; २, तें तुपांत तळून त्यांत साकर, इ॰ घालून पक्वान्न करितात तें.

**बेसनेंकड**, न॰ बेल रहाटाचे कुळकुंब्यास जें आडवें लांकूड मारलें असतें तें.

**बेसरम**, ३लिं॰ बेशरम.

**बेसावध**, ३लिं॰ गेरसावध.

**बेसुमार**, ३लिं॰ करावें किति, नकरावें किति, इ॰रूपजो सुमार तो नराखितां अतिरिक्त जें भाषण, भोजन, इ॰ क्रिया किं॰ कांहीं गुण, इ॰ तो.

**बेस्रम, बेश्रम**, ३लिं॰ बेशरम.

**बेहतनमाल**, पु॰ बेवारशीकजो माल, इ॰ तो.

**बेहद, बेहद्द**, स्त्री॰ हिं॰ कांहीं एक व्यापार गुण, इ॰कांची हद्द सुटून जी पराकाष्ठा ती; पक्षीं पराकाष्ठाशब्दासारखें क्रियाविशेषणाही होतें; उ॰ बेहद्द पाऊस पडला.

**बेहंबी**, स्त्री॰ कोंवळ्या अंब्याच्या केऱ्या काढून खारवून खायासाठीं खारांतघालून ठेवितात त्या प्र॰

**बेहया**, ३लिं॰ अवि॰वि॰ निर्लज्ज.

**बेहडा**, पु॰ एक वृक्षाचें औषधीफळ आहे; २, हिं॰ किल्ला, मुलूख, परगणा, गांव, इ॰ कांची वहिवाट करणारे जे मामलेदार, सुभेदार, इ॰ त्यांणीं भलतशी वहिवाट करूं नये ह्मणून सर्कारांतून अमुकरीतीनें वहिवाट करावी, अमुक शिबंदी राखावी, अमुक इनाम, धर्मादाय चालवावे, अमुक रीतीनें वसूल घ्यावा, इ॰ लेखपूर्वक बांधून देतात जो नियम तो; किं॰ तादृश नियमाचा करितातजो लेख तो; बेहडा पार करणें, होणें, ह्म॰ पतकरलेलें किं॰ आरंभलेलें कार्य कसेंहीकरून एकवेळ शेवटास नेणें.

**बेळ**, न॰ रा॰ अर्धा आणा; २, बीज द्वितीयार्थी.

**बेळकें**, न॰ दुबेळकें.

**बेळा**, पु॰ वा॰ भातांत एक जाति आहे.

**बेळें**, न॰ कुंपण, गडगा, इ॰कांस जाण्यायेण्याची जी वाट ठेविली असत्ये तेथें मनुष्यांस प्रतिबंधनहोतां गुरें, इ॰कांसमात्र प्रतिबंध व्हावाह्मणून दुबळकें पुरून किं॰ आडवीं लांकडें बांधून रचनाविशेषरूपजो प्रतिबंध

प्रतिबंध केला असतो तें; २, पुस्तकांतचु कलेलीं अक्षरें अन्यत्र लिहिलीं असतां त्यांचे आद्यंतीं जा फुल्या देतात त्या प्र०

बैंगणी, बैंगनी, ३लिं० वांग्याचा एकारंगासारिखा एक रंग आहे; २, तद्विशिष्ट वस्त्रादि तो.

बैठक, स्त्री० हिं० बसक पंचमार्थावांचून; २, मनुष्यादिकांचे भूम्यादिकांवर बसण्याचे जे अनेकप्रकार ते प्र०; ३, गमनाचकदेशानें प्रयत्नजो त्याचा कांहींएक निमित्तानें तो गमनादिव्यापार राहून कोणेकस्थलीं कांहींकाल होत्येजी स्थिति ती; ४, कोणेकस्थलीं कोणेकार्चा कोणेक उद्देशानें बसलेपणानें जीस्थिति ती; उ० हें काम उभ्याउभ्यानीं होणार नाहीं, तुमची आमची चार घटका बैठक झाली पाहिजे; ५, गवई, बेश्या, इ० कांनीं बसून गावें असाजो गानसमारंभ करितात ती.

बैठा, ३लिं० कों० बेकार.

बैठागुणाकार, पु० गुण्यांकाचीजी पंक्ति मांडली असत्ये तेथेंच क्रमानें गुणोत्त मिळवीत जावें अशाप्रकारेंजो गुणाकार करितात तो.

बैठापगार, पु० हिं० चाकरी नकरितांजो पगार पावतो तो.

बैठाभात, पु० पेज न काढितां बेतानें पाणी घालून केल्जो भात तो.

बैठारोजगार, पु० कोठें गेल्यावांचून घरचेघरींजो रोजगार तो.

बैठीचाकरी, स्त्री० बैठारोजगार.

बैत, स्त्री० हिं० फारशीभाषेची श्लोकाकारखी छंदोबद्ध कविता असत्ये ती.

बैदा, पु० हिं० सैन्यादिकूनजो दंगा तो; २, फंद, फितूर, चहाडी, इ० रूप कोणी करितो जे लबाडीचे खेळ तो.

बैरागी, पु० प्रपंचापासून विरक्त होऊन विष्णुसेवा करण्याचा एक संप्रदाय आहे त्या संप्रदायानें चालणाराजो तो.

बैल, पु० गोजातीतील पुरुषव्यक्ति परंतु त्याचें बाल्यजाऊन तारुण्य आल्यानंतर व्यवहार; २, ला० निरक्षर निर्बुद्ध मूर्खजो पुरुष त्यास आरोपानें लं०

बैलखोंदा, पु० गाडींत बसलेलाजो त्यापासून जुंपलेल्या दोहोंबैलांचे खांदे जीसरळींअसतात तशासरळीं कोणेकस्थलापासून ग्रामादि दोन स्थलें समांतर असतात त्यांचा तसाजो स्थितिप्रकार तो.

बैलखोंदें, न० बैलखांदा.

बैलघाट, पु० जावरून वाहते बैल जातयेत असतात असा सोपाजो घाट तो.

बैलमार्ग, पु० उदमी, इ० कांचे बैल जामार्गानें जातयेत असतात तो.

बैलरहाट, पु० बैल, इ० कांनीं फिरवायाचा तुंबैलावून जो रहाट केला असतो तो.

बैला, पु० कों० एक अणीदार लांकूड घेऊन त्यासमध्यें ओळें सांवरायाजोगेंकांहीं

ही अडकवण संबद्धकरून कांठ्या, इ॰ कांचें ओझें वहावयास साधन करितात तो.

**बेसणें**, प्रा॰ग्रं॰ बसणें; उ॰ पलंगातळीं बेसली राजबाळा पती धाकुटा हात लावी कपाळा.

**बोकड**, पु॰ बकरा.

**बोकडणें**, कों॰ बाळेणें द्वितीयार्थी.

**बोकडदाढी**, स्त्री॰ फार मोठी वाढलेली जी दाढी तीस निर्देनें म्ह॰; २, गालावर केंस नसून केवळ हनवटीवरमात्र केंस असतात अशी जी कोणेकाची दाढी असते ती.

**बोकडदाढ्या**, ३ लिं॰ बोकडदाढी आहे ज्यास तो.

**बोकणा**, पु॰ वा॰ बोकाणा.

**बोकणी**, स्त्री॰ वा॰ बोकाणा.

**बोकना**, पु॰ वा॰ बोकाणा.

**बोकलणें**, गुरें, वासरें, इ॰ कांनीं आनंदांत येऊन पुच्छें वरकरून आरडत ओरडत अनेकप्रकारच्या उडया मारायाच्या, धांवाधांव, अशाप्रकारें क्रीडा करणें; २, ला॰ पोरांनीही आनंदांत येऊन तसें करणें.

**बोकशी**, स्त्री॰ कों॰ नद्यादिकांतील मांस मारायाचें यंत्र आहे.

**बोका**, पु॰ मार्जारांतील जी पुरुषव्यक्ति तो.

**बोकांडी**, स्त्री॰ मान म्हणून जो शरीरावयव तीं; परंतु व्याघ्र, शत्रु, पिशाच, इ॰ कृत उपद्रव संबंध वर्णनीय असतां बोकांडी धरणें, बोकांडीस बसणें, इ॰ धातूंचे योगीं प्र॰

**बोकांडें**, न॰ बोकांडी.

**बोकाणा**, पु॰ पोहे, इ॰ शुष्क पदार्थांचा तोंड भरायाचा जोगा मोठा जो ग्रास तो.

**बोकांदणें**, कों॰ पोहे, इ॰ पदार्थ बोकांदे भरभरून खाणें.

**बोकांदा**, पु॰ बोकाणा.

**बोकेसन्यास**, पु॰ दंभानें लोकवंचनार्थ कोणी करितो जें वैराग्याचें सोंग तो.

**बोकेसन्यासी, बोकेसन्याशी**, पु॰ बोकेसन्यास घेतला ज्याणें तो.

**बोंखरी**, स्त्री॰ कों॰ कोंवळी लहान डिरी ती.

**बोंखा**, पु॰ कों॰ डिरा.

**बोखाडणें**, तुळशी, इ॰ कांचे बोंखे खुडून तीं झाडें सुंदी करणें; पक्षीं जे खुंटले बोंखे त्यासही कर्मता.

**बोखाडा, बोंखाडा**, पु॰ एक वृक्ष आहे.

**बोंखी**, स्त्री॰ लहान बोंखा.

**बोंगडा**, पु॰ रा॰ अर्धविकसित झाली जी कळी तो.

**बोगणी, बोघणी**, स्त्री॰ बगुणी.

**बोगणें, बोघणें**, न॰ बगुणें.

**बोंगा**, पु॰ नेसलेल्या वस्त्राचा निऱ्या खोंचायाचे ठिकाणीं वस्त्र मोठें असल्यामुळें किंवा निऱ्या चोपून न बसल्यामुळें विशोभित दिसायाजोगा त्याचा बंध येतो जो उंचवटा तो

बोगोणी, बोघोणी, स्त्री० बगुणी.

बोगोणें, बोघोणें, न० बगुणें.

बोंच, न० कंटकादिक पाय, इ०कांस बोंचल्या मुळेंजें छिद्ररूप क्षत तें; २, स्त्री० रा० कंटकादिकांचें बोंचायाजोगेंजें अग्र ती; ३, बा० पक्ष्याची चोंच ती.

बोचकडा, पु० पांचावोटानीं एकदांचजो बुचकुरा तो; २, झोंबाडा.

बोचकरणें, चिचकुरणें.

बोचकरा, पु० बुचकरा.

बोचकाडणें, बोचकडणें, कों० बोचकडयानें युक्त करणें.

बोचकाडा, पु० कों० बोचकडा.

बोचकुरा, पु० चिचकुरा.

बोचकें, न० चापचोप घडया नकरितां सरासरी वस्त्रें बांधून केलेंजें गाठोडें तें; बोचक्यांतला उंदीर म्ह० कोणेकाचे संसारादि व्यवहारांतील सर्व गोष्टींचा जो माहितगार जापुढें त्याव्यवहाराचें मर्म गुप्त ठेवितां येत नाहीं.

बोंचणी, स्त्री० ला० जाचणी.

बोंचणें, सूक्ष्म जाचें अग्र असाजो कांटा. सुई, इ० पदार्थ तो शरीर, इ० कांचेठायीं आपल्या अग्रानेंच छिद्रकरून आंत शिरेअसा करणें; २, कांटा, चोंच, इ० कांचे अग्रप्रहारानें कोणेकास सक्षत करणें; ३, ला० भत्यादिकांस शब्दप्रहारानीं टोंचणें.

बोंचरडें

बोंचरडें, न० बा० एक पक्षी आहे.

बोंचरणें, बा० बोंचरड्यानें झाडाचे बोरें खुडून झाड बोडकें करणें.

बोंचरा, ३लिं० बा० बोंथरा.

बोंचलणें, बा० शरीर, कोहळा, भोंपळा, इ० फल भोंचावणें; २, कोयती, कुदळ, इ० कांचे अग्रानीं जमीन मध्येंमध्यें डुखविणें.

बोंचा, बौंचा, पु० अपानद्वार.

बोंचाळू, ३लिं० गांडमराऊ.

बोंचू, ३लिं० बोंचाळू.

बोंचेरा, ३लिं० कों० बोंचायाजोगता साग्रजो कंटकादिपदार्थ तो.

बोज, पु० हिं० लोकांनीं हा सभ्य आहे, विद्वान आहे, असें म्हणायाजोगें विद्या विनयादि कृत कोणेकाचे अंगीं असतेंजें महत्व तो.

बोजड, ३लिं० आटोपसार बेतावातानें जितक्यासतितकें असें नव्हेजें शरीर, शरीरावयव, पागोटें, इ० वस्त्र, ओझें, नकासकाम, इ० तो.

बोजवार, पु० भाजीपाला, लोणचें, इ० कांस घालावयाचा, हिंग, जिरें, मिरें, हळद. इ० मसाला तो.

बोजा, पु० हिं० ओझें.

बोझा, पु० हिं० ओझें.

बोट, न० अंगुलि; २, अंगुल; बोट दाखविणें म्ह० अंगुलिनिर्देश करणें; बोट शिरकणें म्ह० चंचुप्रवेश होणें; बोट मोडणें म्ह० ईर्ष्यादिकारणामुळें कोणेकाले उद्देशून अंगु-

लिभंग

लिंगन करणें; तोंडांत बोटें घालणें ह्म॰ आ-श्चर्यानें थक झालेपणाचा अभिनय करणें.

**बोटकीचिंच**, स्त्री॰ जिजवर लहानलहान बो-टकें येतात अशीजी चिंच ती.

**बोटखत**, न॰ हिं॰ एका कागदावर अनेक खा-त्यांचें जें टांचण तें; आणि तो कागद.

**बोटचेपा**, ३लिं॰ बोटानें चेपलाअसतां चेपला जावा इतपत शिजलेलाजो तांदूळ, इ॰ दा-णा, भाजीची फोड, इ॰ किं॰ पक्व झालेला-जो आंबा, इ॰ फल तो; २, ला॰ प्रसंगी ई-षत्प्रयत्न केलाअसतां सिद्ध व्हावें अशा द-शेस आणून ठेवलेलेंजें काम तो.

**बोटधारी**, ३लिं॰ पुढें यत्किंचित् कांठसोडून मागें बोटभररुंदीची रंगीत रेशमाची किं॰ रूनाची धारी घातली असत्ये असा धोत्र-जोडा, पातळ, इ॰ तो.

**बोटलणें, बोटळणें**, फलादिक बोटाचा व्या-पारानें चिपळून पाहणें.

**बोटवा**, पु॰ गव्हांचा पिठाचा तंडुलाकार क-रितात तो.

**बोटवात**, स्त्री॰ कापुस बोटावर घेऊन वळू-न देवापुढें जाळावयासाठीं जी वात करि-तात ती.

**बोटी**, स्त्री॰ कुक्कुटादि पक्ष्यांचे पक्व केलेलेंजें मांस ती.

**बोटूक**, न॰ आंखूडजें चिंचेचें फळ तें; २, एक चिंचोका आहेजामध्यें इतकाजो चिंचे-चा तुकडा तें.



**बोंठण**, न॰ बुंठण.

**बोंठा**, ३लिं॰ बुंठा.

**बोंठूक**, न॰ बुंठण.

**बोड**, न॰ डोकें; निंदाद्दष्टि; बोड करणें ह्म॰ खरडपट्टी करणें.

**बोंड**, न॰ कापूस, तीळ, अफू, इ॰ कांस फल-भूतजो अवयव येतो तें; प्रा॰ त्यांत बीअ-सत्ये; २, बिबा, काजू, यांचे फलामागें जो असतो अवयव तें; ३, तदाकार हरभरा, इ॰ कांचे पिठांचें तळून पक्वान्न करितात तें; ४, तदाकारच संध्येची पळी, समई, इ॰कांचा अवयव असतो तें; ५, या॰ केळफूल; ६, मक्याचें कणीस.

**बोडका**, ३लिं॰ पागोटें, टोपी, इ॰जें शिरोवे-ष्टन तद्रहितजें शिर, किं॰ मनुष्य तो; २, आ-चेयोगानें त्यात्यापदार्थाचे शिरोभागीं शो-भा दिसत्ये असेजे शृंगे, कळस, टिकशा, इ॰पदार्थ तद्रहित अतएव कांहीं विशोभि-तजो पशु, गृह, वृक्ष, इ॰ तो; ३, पु॰ कों॰ कोथिंबिरें भात.

**बोडकी**, स्त्री॰ वैधव्यामुळें केश भादरीतअ-सत्येजी स्त्री ती; ह्म॰ बोडकी आरशांत पा-हे सहादेव ह्मणे तेथें कांहीं आहे.

**बोडफूल**, न॰ बोड; २, बोडकी निंदाद्दष्टि.

**बोडकें**, न॰ बोडफूल.

**बोडकेंभात**, न॰ कोथिंबिरें भात.

**बोंडग**, स्त्री॰ रा॰ एक झाड आहे.

**बोडण**, न॰ कुलदेवताप्रीत्यर्थ पांचसवा

सिनी बलावून एकापरातेंत दहीं, दूध, वडे, कढी, इ० एकत्र कालवितात तें; भरणें धातूयोगीं प्र०; २, तो समारंभ; उ० त्याचा घरीं आज बोडण आहे; ३, न० स्त्री० ह्मेरी बसायाच्याजो चिरवल पाणीयानें युक्त खळगा तें ती.

**बोडणी**, स्त्री० दुसऱ्याची खरडपट्टी.

**बोडणें**, क्रोणेकास वपनसंस्कारानें विशिष्ट करणें; पक्षीं डोईस किं० त्या केशांस कर्सता; प्र० निंदार्थी; २, द्रव्यापहारद्वारा मुंडणें.

**बोडंती**, स्त्री० बोडणी.

**बोडद**, न० गलबताचीं वाम दक्षिण दोन अंगें तीं प्र०; २, कज्जा, तर, इ० कांतील परस्पर स्पर्धमानजे दोनपक्ष त्यांस प्र० स्न०

**बोंडफळ**, न० विवाहादिकांमध्यें जेथें वस्त्रादि द्यावयाचें तेथें नारळ दिलाअसतां त्यानारळास निंदेनें स्न०; तुझा हातास काय बोंडफळ लागायाचें आहे स्न० कांहींएक लाभ नाहीं.

**बोंडलें**, न० मुलांस दुग्धादि पाजायाचें अर्घ्यासारिखें एक पात्र आहे.

**बोडबिरकळणी**, स्त्री० बा० बोडणी.

**बोडसें**, न० रा० लांकडें तोडायाचें शस्त्र आहे.

**बोडा**, पु० शिश्न.

**बोंडी**, स्त्री० नाक, शिश्न, स्तन, यांचाजो अग्रभाग ती; २, तत्सदृशजो मोदक, इ० कांचा अग्रभाग असतो ती; ३, मागील पाऱ्या झडून झडून पुढें लहान राहिलेंजें केळफूल ती.

**बोंडू**, पु० रा० काजूचें बोंड.

बोंडूक

**बोंडूक**, न० नाक, इ० कांची लहानजी बोंडी किं० तीळ, कापूस, इ० कांचें लहानजें बोंड तें.

**बोडेफकीर**, पु० निर्धन किं० ज्याचे मागें कुटुंबादि कांहींएक नाहीं तो.

**बोड्या**, पु० कों० मुलगा.

**बोढण**, न० स्त्री० बोडण.

**बोंथ**, स्त्री० कों० सर्व अंगाभोंवतालें गुंडाळून घेतातजें वस्त्राचें प्रावरण ती; २, रा० चित्र, इ० कांस रंग द्यावयासाठीं काडीस कापूस, पीस, इ० संबद्धकरून करितातजें कलम ती.

**बोंथट**, ३ लिं० तलवार, इ० कांची बसलीजे धार ती; २, ज्याची धार किं० अणी बसली तें शस्त्रादिक.

**बोंथटणें**, शस्त्रादिकांची धार किं० अणी बोंथट होणें.

**बोंथणें**, बोंथटणें.

**बोंथरखंड, बोंथरखंडा, बोंथरखंडी**, ३ लिं० रा० बोंथऱ्यास निंदेनें स्न०

**बोंथरखिंड**, स्त्री० मधलेमधले दांत पडल्यामुळेंजी खिंड पडत्ये ती.

**बोंथरखेंडें**, न० बोंथरखिंड.

**बोंथरा**, ३ लिं० ज्याचे दांत मधलेमधले किं० अवघे पडले आहेत तो.

**बोंथा**, ३ लिं० फारजो बोंथट तो.

**बोंथाटी**, स्त्री० स्वारीपुढें चालावयासाठीं किं० खेळायासाठीं अग्रास चेंडूसारखा वस्त्रादि-

कांचा

कांचा गोळा संबंद्ध करून करितात जी काठी ती.

**बोंथाटीबरदार, बोंथाटीबारदार**, पु॰ हिं॰ बोंथाटी हातांत घेऊन स्वारीपुढें चालतो तो.

**बोंथारणें**, कों॰ बोंथरूप प्रावरणप्रकारानें युक्त होणें.

**बोंथारा**, पु॰ कों॰ बोंथप्रथमार्थी.

**बोंथरी**, स्त्री॰ कों॰ बोंथारा.

**बोंथी**, स्त्री॰ पदार्थमात्राचाजो सूक्ष्म अग्रभाग ती; २, बा॰ भांडे, इ॰ कांस छिद्र पडलें असतांजो चोंथा मारितात ती; ३, रा॰ तव्यावर कांहींएक पदार्थ जो करावयाचा तो लवकर उलथावा ह्मणून तव्यास तेल तूप लावायासाठीं जी नारळाची शेंडी, इ॰ घेतात ती.

**बोद**, स्त्री॰ चार कांबळ्यांचाजो समुदाय ती; उ॰ आह्मीं कांबळ्यांची एक बोंद विकत घेतली; २, ३लिं॰ खणखणित नव्हे असाजो विणा, पखवाज, इ॰ कांचा ध्वनि तो; ३, तद्विशिष्ट विणा, इ॰ वाद्य तो.

**बोंद**, न॰ जुगाराचे खेळांत द्रव्यस्थानापन्न हस्तिदंताचे तुकडे, इ॰ संकेतानें करून ठेविले असतात तें.

**बोद्धा**, ३लिं॰ कोणेक अर्थातें शब्दादिज्ञापकद्वारा जाणणाराजो तो.

**बोध**, पु॰ कोणेक विषयाचें हा असा आहे, इ॰ रूप शब्दादिप्रमाणानें होतेंजें ज्ञान तो; २, कोणेक गोष्टीविषयीं अन्यथा ग्रह झाला असतो तोजाऊन जसें समजायाचें तसेंच समजावें असाजो बुद्धीचा परिणाम तो; आत्मबोध, निजबोध, शाब्दबोध, इ॰ स॰

**बोधक**, ३लिं॰ कोणेक अर्थाचा बोध करणाराजो शब्द, चिन्ह, इ॰ तो किं॰ उपदेशादिद्वारा बोध करणारा गुरु, इ॰ तो.

**बोधकशक्ति**, स्त्री॰ दुसऱ्यास कोणेक गोष्टीचा बोधकरून देण्याविषयीं कोणेकाचे अंगीं जी शक्ति असते ती.

**बोधणें**, ग्रं॰ गुरु, इ॰ कानें कोणेक गोष्टीविषयीं शिष्यादिकांस बोधानें विशिष्ट करणें.

**बोधन**, न॰ बोधकरण्याचाजो व्यापार तें.

**बोधविणें**, कोणेक अर्थ कोणेकास कोणेकानें अनुमान, अर्थापत्ति, लक्षण, इ॰ द्वारा जाणविणें; उ॰ मी तेथें नव्हतों हें वाक्य, मला ती गोष्ट ठाऊक नाहीं, इ॰ अनेक अर्थातें बोधवितें.

**बोधित**, ३लिं॰ बोधिला किं॰ बोधविला तो.

**बोनें**, न॰ रा॰ मंगळागोरीचे भोंवताली मंडपाकार पक्वान्नें मांडून दुसरेदिवशीं खावयासाठीं मुलीं तीं पक्वान्नें राखून ठेवितात तें.

**बोंब**, स्त्री॰ मुखविकासकरून कंठानें ध्वनि होतअसून मुखावर हस्तप्रहार केला असतां जो विलक्षण शब्द होतो, तो शब्द शिमग्यांत किं॰ महत्संकट प्राप्त झालें असतां

करितात ती; मारणें, ठोकणें, इ० धातूचे योगीं प्र०; धान्य, पर्जन्य, इ० कांची बोंब होणें, पडणें, वाजणें, इ० स्थलीं ततत्पदार्थाचे दुर्भिलतेमुळें त्याची हाकाटी पडणें; कोणेकानें कोणेकाचे नावें बोंब मारणें ल० झालेंजें कांहीं वाईट तद्विषयीं हें वाईट त्या अमक्यानें केलें असें लोकांत सांगत राहणें; कोणेकाचे नावाची बोंब पडणें ल० कोणेक दुष्कर्माविषयीं हें कर्म अमक्यानें केलें असा बोभाट होणें; ग्रा० बोंच पाडणें ल० निधाव पाडणें; ल० मृगाअधीं पेरावें आणि बोंबे आधी पळावें.

बोव, स्त्री० रा० बोंब.

बोबडा, ३लिं० सर्व वर्ण ज्याचानें स्पष्ट उच्चारले जात नाहींत असेंजें वागिंद्रिय किं० तद्विशिष्ट पुरुष, इ० किं० तत्कृतभाषण, शब्द, इ० तो; २, पु० दूर्वेसारिखें एक तृण आहे.

बोबडी, स्त्री० वळणें धातुचे योगीं प्र० भयादिकानें घाबरून जिव्हा आंखडून स्पष्टशब्दोच्चार नहोई अशी अवस्था कोणेकाची होणें.

बोंबलणें, बोंब मारणें; २, कांहींएक कार्य व्यापारादिक विवक्षित तड नयेतां मध्येंच फसणें.

बोंबलभिक्या, ३लिं० कफाळफरंदाजो मनुष्य तो.

बोंबळ, न० रा० बुबूळ.

बोंबाडा, पु० रा० धुडबडा.

बोंबाबोंब, स्त्री० अनर्थप्रयुक्तजो ओरडाआरडा ती.

बोंबी, स्त्री० बेंबी.

बोंबील, पु० एक मत्स्यांत जाति आहे.

बोंब्या, पु० एक गयेमध्ये अधिकारी आहे. जो यात्रेपुढें प्रा० बोंबा मारीत चालतो.

बोभाट, पु० न० गुप्तगोष्टीची जी लोकांत प्रसिद्धि तो तें; २, कागाळी.

बोभाटणें, कोणेक गुप्तगोष्टीनें बहुतांश कळावयाजोगें प्रसिद्धीस येणें.

बोभाटा, पु० बोभाट.

बोम, पु० तांदूळ, इ० कांचा मुडयांतील परिक्षार्थ धान्य काढायाचें अणीदार लोखंडी खोबळीचें एक आऊत आहे.

बोय, स्त्री० रा० रत्नांतीलजो यद्द अंश ती; २, वा० लसणेची बी ती; वास; परंतु मुख्यार्थी प्रा० प्र० नाहीं; भाषा, रीति, गान, इ० पदार्थावर सजातीयपदार्थाचे तादृश्यामुळें जो ईषन्मात्र भास होतो तद्विषयीं लक्षणेंकरून प्र०; उ० याचे गाण्यांत दक्षणी गाण्याची कांहीं बोय येते.

बोर, स्त्री० एक वृक्ष आहे; २, न० त्याचें फळ; ३, ३लिं० एक घोडयाचा रंग आहे; ४, तद्विशिष्ट घोडें तो; ५, न० रा० गवतांत एकभेद आहे.

बोरकांटी, स्त्री० बोरीचे झाडाची जी कांटी ती.

**बोरकूट**, न० सार करणें, इत्याद्यर्थ बोरें वाळवून त्यांचें कूटकरून ठेवितात तें.

**बोरद**, न० बोडद.

**बोरपी**, पु० भोरपी.

**बोराँटी**, स्त्री० दे० बोरीचीजी कांटी ती.

**बोराँतर्ली कीड**, स्त्री० अत्यंत सुंदर आणि सुकुमार, अशीजीस्त्री तिला वर्णनप्रसंगीं ह्म०

**बोरीप**, न० रा० भोरीप.

**बोरू**, पु० बरू.

**बोऱ्या**, ३लिं० दरिद्री; २, रा० शिंदी, ताड, इ० कांचे पात्यांचीजी ओंथरी तो; कोणेकाचा बोऱ्या उडणें, वाजणें, इ० स्थलीं फटफजीती होणें.

**बोल**, पु० भाषणाचे अवयवभूतजे शब्द किं० वाक्यें ते प्र०; २, भृत्यादिकांवर अन्यायलागू करण्याविषयीं धनी, इ० कानें प्रयुक्तजें तूं हें असेंकांकेलेंस, इ० रूप वाक्य, इ० तो; बोलाफुलास गांठ पडणें ह्म० सहजबोलल्याप्रमाणें कांहींएक गोष्ट काकतालीय न्यायेंकरून घडणें.

**बोलका**, ३लिं० चांगलें आणि बहूत बोलतो तो.

**बोलघेवडा**, ३लिं० बोलायाचें प्रयोजन असो किं० नसो परंतु पुष्कळ बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बोलणें**, वाग्व्यापारजन्य शब्दप्रयोग करणें; २, धनी, इ० कांना चाकर इ० कांस बोल लावणें; ३, रावो, सारंगी, इ० कांनीं व्यक्तशब्दासारिख्या शब्दानीं विशिष्ट होणें; ४, कोणेक अर्थ तत्तत्संज्ञाभूत शब्दानें व्यवहरणें; उ० पोथीला संस्कृतभाषेनें पुस्तक बोलतात; बोलून स्रुघड, भला, इ० स्थलीं बोलणें ह्मणूनजो व्यापार तन्निरूपितजो चांगलेपणा, भलेपणा, इ० गुण तद्विशिष्ट

**बोलपुतळी**, स्त्री० बोलमाणकी.

**बोलबाला**, पु० हिं० चढती कमान.

**बोलभांड**, ३लिं० मनांत कुत्सितपणा नसतांही जा भाषणानें शेवटीं भांडण व्हावें असें आग्रहानें बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**बोलमाणकी**, स्त्री० आंगीं भाषणानुरूप करणी असो किं० नसो परंतु बोलण्याचा डोलमात्र चांगला अशीजे स्त्री तिला ह्म०

**बोलवा**, स्त्री० पु० लेखपत्रादिप्रमाण उपलभ्यमान नाहीं असेंअसतांही अमुक गोष्ट अमुकस्थलीं झाली किं० अमुक दिवशीं अमुक होणार असाजो जनांत विरल विरल भाषणप्रचार चालला असतो ती.

**बोलाचाली**, स्त्री० हर्षामर्ष होईअसा परस्परांचाजो वाग्व्यापार ती.

**बोलाबोली**, स्त्री० बोलाचाली.

**बोलावणें**, बलावणें; २, न० बलावणें.

**बोलावणेकरी**, पु० बलावणेकरी.

**बोली**, स्त्री० देशभेदेंकरून, जातिभेदेंकरून, व्यवस्थितवाचकशब्दांचेभेदेंकरून भिन्नभिन्नजे बोलण्याचेप्रकार अनेक आहेत ते प्र०; २, दुसऱ्याशीं कांहीं करायाचाजो व्यवहार त्याचे वर्तनाविषयीं तूं असें कर, मी असें करीन, इ० रूप केला असतोजो नियम ती; उ० आमची कोरे रुपये घ्यावयाची बोली आहे; ३, कोणेक अर्थाविषयीं उगीच तदर्थक शब्दप्रयोग करण्याविषयीं तरींजी अर्हता ती; निषेधविषयीं प्र०; उ० अशा पावसांत बाहेर पडावयाची बोली नाहीं.

**बोलीचाली**, स्त्री० कोणेक व्यवहारसंबंधी वर्तनाचेजे अवांतर भेद ते सर्व उजरूनजी बोली ती.

**बोलूनचालून**, अ० आंत कांहीं गुस्तांदा न ठेवितां शब्दादिव्यापारानें उघडपणें; गुणाचें किं० क्रियेचें वि०; उ० तो बोलूनचालून सोदा आहे ह्म० दुसऱ्यानें सोदा ह्मटलेंअसतां मी सोदा आहेंच असें उघड ह्मणायाजोगा; उ० लागलेअसतां बोलूनचालून दोन रुपये मागून घ्यावे परंतु चोरून एक पैसादेखील घेऊ नये; २, बोलणें आणि वर्तन याव्यापारानें; चांगला, भला, इ० गुणांचें वि०

**बोवण**, न० बोहोण.

**बोंघा**, पु० रा० लसणीची बी.

**बोवाळ**, पु० वा० कांहींएक विवाहादिनैमित्तिकामुळें घरांत असत्येजी गडबड तो.

**बोहणी**, स्त्री० उजाडल्यावर दुकानदाराचे-दुकानांतून प्रथमतः होत्येजी विक्री ती; जिला दिवसभर होणाराजो उदीम त्याचे आदीचें मंगल असें मानितात.

**बोहणें**, बाहणें.

**बोहनी**, स्त्री० बोहणी.

**बोहरी**, पु० छिटें, सफेत कापड, सरवलाद, चाकू, कातर, घोड्याचा सरंजाम, इ० विलायती, बंदरी, इ० मालाच्या उदीम करणारी यवनांत एक जाति आहे.

**बोहारी**, पु० बोहारी.

**बोहोगणी**, स्त्री० बगुणी.

**बोहोगणें**, न० बगुणें.

**बोहोण**, न० मृदंगाचे धुमाचे पुडास कालिवलेली कणीक किं० मृदुभात, इ० लावितात तें.

**बोहोरपी**, पु० भोरपी.

**बोहोरीप**, न० भोरीप.

**बोहोरूप**, न० भोरीप.

**बोळ**, पु० केवळ अरुंदजी गल्ली तो; २, झाडांचे औषधोपयोगीं चीक आहेत ते प्र०; तुझा बरोबर बोलायास बोळ घातला पाहिजे इ० स्थलीं तुझाबराबर बोलतांनां उरांतर क्त पडेल.

**बोळक**, पु० कों० कुपणास पडत्ये किं० पाडितात जी मनुष्यादिक जावयाजोगती खें डुकली तो.

**बोळकें**, न० लहानजें मृत्तिकादिकांचें थालीचे आकाराचें पात्र तें; २, ला० दंतहीनजें मुख-

रव त्यास म्ह०

**बोळणें,** शाई कांहीं विकृतिझाल्यामुळें बुळबुळीत आणि घट्ट अशी होणें; २, बोंथरणें; ३, स० दहीं, शाई, पाणीं, इ० सद्रव पदार्थांत भाकर, लेखणी, हात, इ० बुडविणें.

**बोळवण,** स्त्री० विवाहोत्तर नववधूच्या भर्त्यासहवर्तमान भर्तृगृहीं शुभमुहुर्तानें प्रवेश करण्याकरितां जो गमनसमारंभ करितात ती; २, विवाहोत्तर वरपक्षीय वऱ्हाड्यांची जी सत्कारपूर्वक पाठवणी करितात ती; ३, गांवांत आलेलीं जीं भुतें त्यांस सर्व ग्रामस्थ मिळून अन्नादि बली देऊन वाजतगाजत गांवचे शिवेवर पोंहचिवण्याचा व्यापार ती.

**बोळवणी,** स्त्री० आपल्याजवळून स्थलांतरीं जाणाराजो शिष्टादिक त्यास बोळविण्याचा व्यापार ती.

**बोळविणें,** आपल्याजवळून स्थलांतरीं जाणाराजो कोणी आप्त, शिष्ट, अतिथि, इ० त्यास सत्कारार्थ किंतीएक मार्गप्रदेशपर्यंत आपण समागमें जाऊन पोंहोचविणें; २, भूषणादिकांचा फांसा, इ० कांचीं तोंडें न निघत, हातास, वस्त्रास, न लागत अशीं साफ, घट्ट बसविणें.

**बोळा,** पु० शाई घोंटणें किं० छिद्र बुजविणें किं० रंगादि भित्त्यादिकांस सारविणें; इत्याद्यर्थ गुंडाळीकरून घेतातजें चिरगूट, इ० तो; २, कागद, इ० कांवर शाई, इ० कांचा पडतोजो टिपका तो; ३, वस्त्राचें अस्ताव्यस्त झालेंजें गुंडाळें त्यास म्ह०

**बोळावा,** पु० ग्रामांतरीं जाणाराजो कोणी त्यासमार्गीं संरक्षणार्थ विवक्षितस्थलपर्यंत बरोबर कोणी सोबतीस देतातजो शिपाई, माणसें, इ० तो.

**बोळीहोन,** पु० होनाचे नाण्यांत एक भेद आहे.

**बोळूं,** न० भाकर, पोळी, वडा, इ० कांस कोरडेशास घेतातजें तूप, लोणी, दहीं, इ० तें.

**बोद्ध,** पु० सं० विष्णूचे दहा अवतारांतील नवा अवतार तो; २, एक नास्तिकांत भेद आहे; बोद्धावतार घेणें, धरणें, म्ह० भृत्यादिकांनें बरें, वाईट, इ० कांहीं केलें असतां ही उपेक्षेनें मौन धरणें; ३, ३लिं० वस्तुतः नसतां बुद्धीनेंच कल्पिलेला किं० बुद्धीनें धरलेला असा बुद्धिसंबंधीजो कांहीं पदार्थ तो.

**बोद्ध्य,** पु० बोद्धशब्दाचा अपभ्रंश; प्र० प्रथमार्थीं

**ब्यांचा,** ३लिं० बियांचा.

**ब्याणा,** पु० हिं० बयाना; प्रथमार्थीं; ब्याणा बांधणें म्ह० विकायास आलें जें कांहीं रत्न किं० रत्नखचित अलंकार तो अमुक किंमतीस हामीं घेतों याहून अधिक किंमत आल्यास तूं अन्यत्र द्याबा नाहीतर हा माझा झाला, असा मालधन्याशीं संकेतकरून त्या पदार्थावर आपली मुद्राकरणें

रणें

ब्याणें, न० ऊंस, बांग्या, भिरचा, राताळें, इ०कांचें लावितात जें वाढ, रोप, इ०तें.

ब्र, पु० चकारशब्द.

ब्रह्म, न० सं० जेथें सत्व, रज, तम, हे गुण नाहींत जेथें माया अविद्या हे उपाधि नाहींत जाला उत्पत्तिविनाशादि विकार नाहींत अतएव शब्दास मनास विषय होत नाहींत परंतु आहे खरें असें कांहीं पदार्थमात्राच्चे निषेधास अवधिभूत चैतन्य आहे तें; २, वेद; ३, हें कांहीं अद्भुत आहे असें कधीं झालें नाहीं आणि होणार नाहीं याचे गुणाच्या अंतपार लागायाचा नाहीं असाजो कोणेक पदार्थ, गोष्ट, यांच्याठायीं कोणेकास महत्वांश वाटतो तें; उ० याचेच गाण्यांत तुह्मांस काय ब्रह्म वाटलें आहे नकले असे गाणार बहुत आहेत; ४, सोवळें, ओंवळें, इ० विषयांच्या झाला असतोजो घोळंकार तें; ब्राह्मण याअर्थी ब्रह्मद्वेष, इ० स० प्र०; कोणेकानें ब्रह्मीं मिळणें ल० ब्रह्मानंदात अंतःकरणवृत्तीच्या लय होई अशा अवस्थेतें पावणें; ला० गाणें, ईश्वरभजन, इ० रसांच्याठायीं तल्लीन होणें.

ब्रह्मकपट, न० निर्वाह करण्यास परम दुःशक, एकाएकीं सुटत नाहीं, असें कोणेकाचे पाठीमागें जडतें जें लचाड तें.

ब्रह्मकपाट, न० ब्रह्मकपट.

ब्रह्मकर्म, न० ब्राह्मणाचेंजें स्नानसंध्यादिकर्म तें.

ब्रह्मग्रह, पु० ब्रह्मराक्षस.

ब्रह्मघातक, १लिं० ब्रह्महत्यारा; २, ब्रह्मद्वेषी.

ब्रह्मघातकी, १लिं० ब्रह्मघातक.

ब्रह्मघोष, पु० वेदघोष.

ब्रह्मघोळ, पु० आचारविचारादिविषयीं जी अव्यवस्था तो; उ० त्या प्रयोजनांत सोवळें ओंवळें याचा विचार राहिला नाहीं सर्व ब्रह्मघोळ झाला; २, सभादिकांच्याठायीं एकानें बोलावें अनेकानीं ऐकावें, इ०रूप व्यवस्था सुटून सर्व बोलूंलागल्यामुळें होतोजो कोलाहल तो.

ब्रह्मघ्न, १लिं० ब्रह्मघातक प्रथमार्थी.

ब्रह्मचर्य, न० जामध्यें मैथुनाभाव हा नियम प्रधान असें एक व्रत आहे कोणी मुख्यत्वेंकरून आचरितात कोणी इतर व्रतांगत्वेंकरून आचरितात; २, मुंज झाल्यापासून मुंज सुटे पर्यंत जो आश्रम तें.

ब्रह्मचारी, पु० ब्रह्मचर्य जास आहे तो.

ब्रह्मघोंटली, स्त्री० फारच लहान पंचपात्र, इषी, गिंडी, इ० पात्र त्यास ह्म०

ब्रह्मझोंट, न० शप्प; परंतु मुख्यार्थी प्र० नाहीं कांहींएक देणार नाहीं, मिळणार नाहीं, अशा अर्थाची विवक्षा असतां देणें, मिळणें, प्राप्त होणें, इ० धातूंचेयोगीं प्र०

ब्रह्मतेज, न० ब्राह्मणावर पाहतांच हा ब्राह्मण असें समजायाजोगें जें इतर जाति विलक्षण कांहीं तेज असतें तें किं० विद्या, तप, यांचे योगानें ब्राह्मणाचे अंगीं जो प्रभावविशेष होतो तें.

ब्रह्मदंड, पु० प्रायश्चित्त, श्राद्ध, तीर्थविधि, इ०कांचे अधिकारार्थ सभ्य ब्राह्मणास द्रव्यात्मक जो दंड द्यावा लागतो तो.

ब्रह्मदंडी, स्त्री० एक औषधी आहे.

ब्रह्मदिन, न० ब्रह्मदेवाचा दिवस तें; २, वर्षप्रतिपदेचे दिवशीं प्रायः श्रवण करितात अमुक मनु झाले, अमुक मनु होणार, इ० भूत भव्य वर्तमान तें

ब्रह्मदेव, पु० सं० विश्वाची उत्पत्ति करायासाठीं रजोगुण प्रधान ईश्वरानें जें स्वरूप धरलें आहे तो; २, स० ब्राह्मणदेव.

ब्रह्मद्वेष, पु० ब्राह्मणाबराबर जो द्वेष तो. व० ब्रह्मद्वेषात् कुलक्षयः

ब्रह्मद्वेषी, ३लिं० ब्रह्मद्वेष केला आहे जाणें किं० करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

ब्रह्मनिष्ठ, ३लिं० सं० निर्गुण ब्रह्मस्वरूपीं ज्याची सर्वकाळ निष्ठा आहे तो.

ब्रह्मपुरी, स्त्री० जेथें विद्वान्, तपस्वी. अशा ब्राह्मणाची वसती आहे असा जो ग्राम, क्षेत्र त्यास ह्म०

ब्रह्मपुरुष, पु० ब्रह्मराक्षस.

ब्रह्मप्रलय, पु० ब्रह्मदेवाचीं शतवर्षें झालीं ह्मणजे ब्रह्मदेवासकट सर्व विश्व नाहींसें होतें असा जो प्रलय तो.

ब्रह्मप्राप्ति, स्त्री० ज्ञानानें अविद्योपाधीचा निरास झाल्यामुळें जीवास होतो जो स्वस्वरूप साक्षात्काररूप लाभ तो.

ब्रह्मबीज, न० ब्राह्मणवीर्यापासून उत्पन्न झाला जो त्यास ह्म०

ब्रह्मरंध्र, न० सं० मस्तकावरचें जें तालुस्थानचें छिद्र तें.

ब्रह्मरस, पु० कथा, पुराणादिकें करून ईश्वरगुण श्रवण केल्यानें किं० गाइल्यानें अंतःकरणांत होतो जो रसविशेष तो.

ब्रह्मराक्षस, पु० विद्वान् असून अभिमानी अतएव मेल्यावर क्रूर पिशाच झाला तो; २, क्वचित् साधारण

ब्राह्मणमात्र मरून पिशाच झाला जो तो.

ब्रह्मरेखा, स्त्री० ब्रह्मरेषा.

ब्रह्मरेषा, स्त्री० उत्पन्न होत्येसमयीं प्राण्याचे कपाळीं भोक्तव्य सुख दुःखाचा लेख केला असतो जो कदापि खोटा होत नाहीं तो; २, ला० कदापि खोटें व्हावयाचें नाहीं असेंजें भाषणादिक त्यास ह्म०; उ० माझें बोलणें हें ब्रह्मरेषा आहे कधींही खोटें होणार नाहीं.

ब्रह्मलिखित, न० ब्रह्मरेषा.

ब्रह्मलेख, पु० ब्रह्मरेषा.

ब्रह्मलोक, पु० सत्यलोक.

ब्रह्मवेत्ता, ३लिं० ब्रह्मज्ञानी.

ब्रह्मसूत्र, न० सं० इश्वरसूत्र; २, यज्ञोपवीत.

ब्रह्मस्व. न० कर्ज; २, ब्राह्मणस्वत्वाकांत जो द्रव्यादि पदार्थ तें; ३, अधमर्णावर भाररूप झालेलेंजें ब्राह्मणादिकांचें ऋण त्यास ह्म०; उ० मी ब्रह्मस्वांत बुडालों आहें यांतून काढाल तर फार पुण्य लागेल.

ब्रह्महत्या, स्त्री० ब्राह्मणाचीजी हिंसा ती; २, तेणेंकरून लागलेंजें पातक ती.

ब्रह्महत्यारा, ३लिं० ब्रह्महत्या घडली आहे ज्याचे हातून तो.

ब्रह्मज्ञ, ३लिं० ब्रह्मज्ञानी.

ब्रह्मज्ञान, न० सं० ब्रह्मविषयकजें ज्ञान तें; २. ला० ईश्वरसत्ता, देव यास पुढें करून प्रयत्न, लोकव्यवहार, यांची निंदा, अशा तात्पर्याचा ज्या कोणी गोष्टीसांगतो त्यास ह्म०

ब्रह्मज्ञानी, ३लिं० ब्रह्मविषयक ज्ञान झालें आहेंज्यास तो; २, ब्रह्मज्ञानाचा गोष्टी सांगतो तो.

ब्रह्मा, पु० ब्रह्मदेव; २, सत्तावीस योगांतला पंचविसावा योग तो; ३, रुत्ताराचे विंधण्यांत एक भेद आहे; ज्यास सामता ह्मणतात; ४, होमादिकामध्यें एक ऋत्विज वरिला असतो तो; ५ ला० कांहीं अघटित घटना करावयाचें सामर्थ्य ज्याचे अंगीं असतें त्यास स्तुत्यवसरीं कलियुगचा ब्रह्मा असें ह्म०

ब्रह्मांड, न० चतुर्दश भुवनात्मक अंडाकार जे ईश्वरानें रचनाविशेष केले आहेत तेप्र०; २, देहाचा मुखापासून वर मस्तकाचे कवचीनें आंवृत जो भाग तें.

ब्रह्मानंद, पु० ब्रह्म प्राप्तीनें होतोजो आनंद तो; २, ला० अतिशयित जो मित्रसमागमादिजन्य आनंद त्यास ह्म०

ब्रह्मी, स्त्री० कों० खडसांबळी ह्मणून एक वेल आहे ती.

ब्रह्मोपदेश, पु० सं० ब्रह्मज्ञान विषयकजो

उपदेश तो.

**ब्राह्म**, ३ लिं० ब्रह्मदेवसंबंधी किं० ब्राह्मण संबंधीजें शास्त्र, तेज, मंत्र, इ० तो; उ० दुसरा वेष घेऊन जरीं ब्राह्मणपणा लपविला तथापि ब्राह्मतेज झांकायाचें नाहीं.

**ब्राह्मण**, ३ लिं० हिंदुजातींत श्रेष्ठ जाति आहे.

**ब्राह्मणकासोटा**, पु० रा० शूद्र स्त्रियांनीं ब्राह्मणाच्या स्त्रियांसारखें नेसणें नेसण्याचा जो प्रकार तो.

**ब्राह्मणजन**, पु० दुसऱ्याचे घरीं पाणीं भरावें, वस्त्रें धुवावीं, इ० कामावर उपजीविका करणारा जो ब्राह्मण तो.

**ब्राह्मणजनकी**, स्त्री० ब्राह्मणजनाचें जें कर्म तीं.

**ब्राह्मणजाई**, ३ लिं० ब्राह्मणापासून शूद्रीच्याठायीं झाला तो.

**ब्राह्मणदेव**, पु० रा० एक ग्रामदेव आहे ज्याचा पुजारी ब्राह्मण असतो.

**ब्राह्मणभोजन**, न० धर्मार्थ जें ब्राह्मणास भोजन घालितात तें.

**ब्राह्मणसंतर्पण**, न० ब्राह्मणभोजन.

**ब्राह्मणी**, ३ लिं० ब्राह्मणसंबंधी जी चाल, वेष, भाषा, इ० तो.

**ब्राह्मण्य**, न० ब्राह्मणपणा.

**ब्राह्ममुहूर्त**, पु० पहांटेचे चार घटका रात्रीपासून दोन घटका रात्रपर्यंत जो काल तो.

**ब्राह्मविवाह**, पु० वरापासून कांहीं न घेतां कन्येचे अंगावर यथाशक्ति अलंकार घालून कन्यादान करावें अशा विधीनें जो विवाह तो.

**ब्राह्मी**, स्त्री० एक ओषधी आहे.

**ब्रीद**, न० बिरुद.

**भ**, न० सं० नक्षत्र; २, मेषादिक जे राशि ते भ०

**भकणें**, बहकणें.

**भकाकों**, अ० रा० अनु० कोण्हडें जें कांहीं एक चूर्ण त्यांत आघातादि झाल्यामुळें, उधळणें. नाकातोंडांत जाणें, इ० धातूचें वि०.

**भकाटी**, स्त्री० पोटांत कांहींच अन्नांश नाहींसा झाल्यामुळें जी पोटास खळी पडते ती. वस. पड, धातुयोगीं प्र० पोट भकाटीस जाणें म्ह० भकाटीनें युक्त होणें.

**भकाभक**, अ० अनु० अनेकवार धूळ इ० चूर्ण उधळणें, बकाबक ओकणें, किं० कांहीं एकापासून भग्नि ज्वाला धूर. याचे कल्लोल बाहेर निघणें इ० कांचे वि०

**भकारी**, स्त्री० रा० भाकरी किं० भांगयांस संकेतानें म्ह०.

**भकावणी**, स्त्री० बहकावणी.

**भकाळणें**, रा० पोट किं० तद्विशिष्ट मनुष्यादि भकाळीनें विशिष्ट होणें.

**भकाळी**, स्त्री० भकाटी.

**भकूण, भकूदिशीं, भकून. भकूर**, अ० भकाभक परंतु एकवार कल्वविवक्षित असतांच प्रयोग.

**भक्कम**, ३लिं० सामान्यरीतीपेक्षां दिढा दुपटीनें मोठा. आणि बळकट, दृढ, असा जो भाकर, ओझें, घर, मनुष्यादि शरीर. इ० पदार्थ तो; २. रगड होईअसा पुष्कळ.

**भक्त**, ३लिं० जो जा देवादिकाची प्रीतिपूर्वक सेवा करितो तो त्याचा; भगवद्भक्त. गुरुभक्त. पितृभक्त. हरिभक्त. इ० स०.

**भक्तकाजकैवारी**, ३लिं० आपले भक्तांचे कार्याविषयीं आहे पक्षपात ज्यास असा जो ईश्वर. गुरु, साधु, इ० तो.

**भक्तवत्सल**, ३लिं० आपल्या भक्तांवर दयाकरावी असा स्वभाव ज्याचा असा जो ईश्वर तो.

**भक्ति**. स्त्री० आवड; २, तत्पूर्वक ईश्वर, गुरु, इ० कांस भजण्याचा जो प्रकार तो; ३, ईश्वर प्राप्तीचे जे धर्म सांगितले आहेत त्यांच्याठायीं जी अंतःकरणाची निष्ठा ती.

**भक्तिभाव**. पु० ईश्वरादि भक्तिविशिष्ट जो अंतःकरणाचा भाव तो; उ० भक्तिभावें शरण गेलें म्ह० ईश्वरकृपा करितो.

**भक्तिमंत, भक्तिमान्**. ३लिं० ईश्वर विषयक भक्ति आहे ज्यास तो किं० ज्याविषयाची ज्याला आवड तो तद्विषयीं.

**भक्तिमार्ग**, पु० ईश्वरप्राप्तीविषयीं ईश्वर भक्तिरूप जो उपाय तो; २. विधीची आज्ञा असो किं० नसो परंतु मी करतो येणेंकरून ईश्वर प्रीति होईल असें मनांत ठसून त्याप्रकारें भक्तांनें कर्म करण्याची जी रीति ती.

**भक्त्या**, पु० देवभक्त्या.

**भग**, न० उपदंशादि कारणानें शरीरास पडतें जें छिद्र तें; २, सं० ऐश्वर्य; ३, स्त्रियेचें उपस्थ तें.

**भंग**, पु० कांहींएक पदार्थ, गोष्ट, इ० कांचा जो ध्वंस तो; २, भृकुटी, अंगुली, काष्ठ, इ० कांचा जो मोडलेपणा तो, मनोभंग, उत्साहभंग इ० स०; ३. कोणेक पदार्थाचा कालांतरीं भंग होईल असें सम्भाव्यमान

मान जें भय तो, निषेध विषयीं प्र० उ० लांकडी का मकरावें त्यापेक्षां दगडी कामास भंग नाहीं हें का मकरायास तुला काय भंग झाला म्ह० तुला काय जर झाला असा अर्थ, संसार इ० भंगास जाणें म्ह० भग्नावस्था पावणें; ४, स्त्री० एक मादक औषधी आहे ती.

**भंगट, भंगड**, ३लिं० भांगखाणी, ओढाळी, असें व्यसन आहे ज्यास तो.

**भगण**, पु० मेषादि बारा राशींचा जो समुदाय तो; २, सूर्यादिकानीं मेषादि बारा राशी भोगून पुनः पूर्वस्थानीं यावें इ० रूप जो त्यांचा फेरा तो.

**भंगणें**, भंगास जाणें

**भगत**, ३लिं० देवभक्त्या.

**भगतकी**, स्त्री० देवभक्त्याचें कर्म ती.

**भगदड, भगदाड**, न० भगाड.

**भगंदर**, पु० जेणेंकरून गुद आणि वृषण यांचे मध्यें शिरेवर भोंक पडतें असा एक रोग आहे तो.

**भगभग**, स्त्री० मिरची इ० तिखट पदार्थांचा संयोग इ० कारणामुळें हस्तपादाद्यवयवांस सुटले जी आग ती.

**भगभगणें**, भगभीनें युक्त होणें.

**भगभगाट**, पु० भगभगीचा जो अतिशय तो.

**भगभगीत**, ३लिं० बहूत तिखट झाला जो भाजी इ० पदार्थ तो.

**भगभाग्य**, न० स्त्रीनें द्रव्यवानाशीं रतून किं० पुरुषानें आपली बहीण, बायको, इ० तालेवाराचे अंगाखालीं घालून मिळविलेली जी संपत्ति ती स म्ह०.

भगरा,

**भगरा**, पु० आंत काहीं स्निग्धांश नाहीं सा झाल्यामुळें पिंड करूं लागलें असतां होऊं न ये, गिळूं लागलें असतां गिळूं न ये, असा भाकर, लाडू, चुरमा, इ० कांचा कोरडा होतो जो चूर तो.

**भगल**, न० स्त्री० लोकांस ठकवायासाठीं केलें में ढोंग तें, ती, कोणे काची भगल उडणें म्ह० केलेलें ढोंग बाहेर फुटल्यामुळें त्याची बचेरी होणें.

**भगलभावार्थी**, ३लिं० पोटांत लबाडी असून बाहेर भावार्थ दाखवितो तो.

**भगली, भगल्या**, ३लिं० ढोंगी.

**भगवंत**, पु० ईश्वर; २, ईश्वरप्रसादानें अलौकिक सामर्थ्य ज्याचें असे जे साधु, ऋषि, इ० त्यांस म्ह० भगवंताची जी कृपा ती भगवत्कृपा, भगवत्सत्ता, भगवदिच्छा, भगवद्रूप, भगवन्माया, भगवद्भक्त, भगवद्भक्ति, इ० समास.

**भगवती**, स्त्री० देवी; २, आंत मीठ इ० पदार्थ न घालितां, काहीं उपचार न करितां, केवळ वाळलेल्या तांबड्या मिरच्यांची करितात जी पूड ती.

**भगवा**, ३लिं० कावेचे रंगासारखा जो रंग तो; २, तद्विशिष्ट जें वस्त्र इ० तो, कोणे कानें भगवें करणें म्ह० संन्यासी होणें.

**भगवान्**, पु० भगवंत.

**भंगसाळी**, पु० गुजराथी वाण्यांत एक जाति आहे

**भगाड**, न० भिंत, कुंपण, शेत, इ० कांचा बांध इ० कांस आरपार दिसायाजोगें पडतें जें मोठें भोंक किं० खिंडार तें; २, गोळी, गोळा, इ० लागल्यामुळें किं० रोगादिकानें शरीरास मोठें पडतें जें भोंक तें.

भगास,

**भगास**. न० तोफ इ० कांचे गोळ्यानें पडलेलें जें मोटें भोंक तें; २, ३ लिं० उद्धस जें गृहद्० तो.

**भगिनी**, स्त्री० बहीण.

**भंगी**, ३ लिं० भंगट; २, पु० हलालखोर; ३, स्त्री० एकाच अर्थाविषयीं वाक्यप्रयोगाचे जे अनेक प्रकार ते प्र०; उ०, तो आऊ आणि त्याणें जावें या भंग्यामात्र दोन परंतु अर्थ एकच; ४. गणितानुगत ग्रहणादिकांची उपपत्ति समजावी ह्मणून त्या बिंबादिकांचें चित्र रेखितात ती.

**भगीरथप्रयत्न**, पु० भगीरथाचा जो भागीरथी आणायाकरितां प्रयत्न तो; २, ला० पराकाष्ठेचा प्रयत्न तो; उ०, ही वस्तु मला भगीरथ प्रयत्नानें मिळाली.

**भगेंद्र**, न० भगंदरादि रोगामुळें जें शरीरास मोठें छिद्र पडतें तें.

**भग्न**, ३ लिं० ज्याचा भंग झाला तो; २, ला० युद्धादिकांत पराजय पावला तो.

**भंग्या**, ३ लिं० भंगट.

**भचक्र**, न० सं० नक्षत्रमंडल किं० राशिमंडळ तें.

**भजक**, ३ लिं० सं० ईश्वरादिकांचें निष्ठेनें भजन करितो तो.

**भजणें**, ईश्वर, गुरु, इ० कांस प्रीतिपूर्वक श्रद्धेनें नामग्रहण, स्तवन, शुश्रूषा, इ० द्वारा सेवणें; २, कोणेक अर्थ स्वसंबंध विषय करणें, या अर्थी प्रा० ग्रं० प्र०

**भजन**, न० सं० भजण्याचा जो व्यापार तें; २, कोणेक इष्टदेवतेच्या नामाच्या जो घोष तें; ३, ईश्वराचे नामानें घटित जीं वाक्यें कोणा साधूनीं रचिलीं असतात तीं प्र०; ४, अंक भागण्याचा व्यापार.

**भंजन**, न० भग्न करण्याचा जो व्यापार तें. २, जा पदार्थाचे संयोगानें जा पदार्थातील दुर्गुण जाऊन विशेष गुण प्राप्त होतो तो त्याचें; उ०, कडवे सुरणास गोडा करण्यास भंजन राख.

**भजनी**, ३ लिं० नामघोषरूप जें भजन त्याचा ठायीं निष्ठा ज्याची असा जो संत, गोसावी इ० तो; २, कोणी किमयागार, कोणी साधु, कोणी मांत्रिक. इ० पाहिला असतां त्याचे नादीं लागावें अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**भजनीय**, ३ लिं० सं० ज्याचें भजन करण्यास योग्य असा जो ईश्वर, गुरु, राजा, इ० तो.

**भजें**, न० हरभऱ्याची डाळ इ० कांचें पीठ उदकादिकांत पातळ कालवून वांगें इ० कांची चकती इ० त्यांत बुडवून तेल, तूप, यांत तळून काढितात तें किं० तसेंच पातळ पीठ थोडें थोडें तळून गोळी करितात तें.

**भट**, पु० ब्राह्मण, परंतु प्रायः भिक्षा करून उदरनिर्वाह करितो त्यावरच व्यवहार, ह्म० भटास दिली ओसरी आणि भट हळू हळू पाय पसरी; २, भिक्षुक ब्राह्मणाचे नावापुढें हा प्रतिष्ठा शब्द लागतो; उ०, रामभट, तुझे कामांत भट पडो इ० स्थळीं तुझें काम भयाभंगास जाओ; ३, सं० योद्धा.

**भटकणें**, कांहीं एक कारणामुळें स्वग्रामादि स्थलापासून भ्रष्ट होऊन कोणतेच एके स्थलीं स्थैर्य नाहीं अशा दशेतें पावणें, जेणेंकरून देशोदेश, गांवोगांव फिरतो.

**भटक्या**, स्त्री॰ मारणें किं॰ मारीतफिरणें यांचायोगीं प्र॰अ॰ भटकतफिरणें, नित्यें अनेकवचनांत प्र॰

**भटजी**, पु॰ भटासगौरवानें म्ह॰.

**भटपण**, न॰ यामादिसंबंधीजें उपाध्येपण तें.

**भटारखाना**, पु॰ भंडारखाना.

**भटी**, १लिं॰ भटजोत त्संबंधी संप्रदाय, आचार, वेष, इ॰ तो; २, स्त्री॰ भट्टी.

**भटोबा**, पु॰ भटासच भटपणामुळें राजकीयादि व्यवहारांविषयीं अनभिज्ञता वर्णनाचे प्रसंगीं म्ह॰.

**भटोरा**, पु॰ भटासनिंदेनें म्ह॰.

**भट्ट**, पु॰ विद्वान् भिक्षुक यांचे नावापुढें प्रतिष्ठा शब्द लागतो. क्वचित् केवलाचाही प्र॰

**भट्टाचार्य**, पु॰ दिग्विजयीजो महापंडित त्यास हें नाम देतात.

**भट्टी**, स्त्री॰ त्यात्या पदार्थांस अग्निसंस्कार होऊन रसायनादि सिद्ध व्हावें म्हणून त्यात्या पदार्थांचा काष्ठादिसहवर्तमान करितात जो रचनाविशेष ती; २, रसायनादि यावत् कृतीची जी इतिकर्तव्यता ती; ३, विड्याचीं पानें केळीं इ॰ आंतर्उब धरून पिकावीं इ॰ कारणास्तव जो त्यांचा तृणादि वेष्टनानें रचनाविशेष करितात ती; ४, भडभुंजा, हलवाई, लोहार, कांसार, इ॰ कांचें तेते पदार्थ अग्निसंस्कारानें सिद्ध करण्याविषयीं अग्नीस केलें असतें जें स्थान ती; ५, त्यात्या द्रव्यादिकांवर कृतीनें संस्कार होऊन त्याचा विवक्षित कार्यरूपें करून होतो जो परिणाम ती,



उ॰, पागोटें बांधलें सखरें पण चागली भट्टी उतरली नाहीं.

**भंड**, न॰ कांहीं दुष्टकर्म बाहेर पडणें इ॰ कारणामुळें जो कांत होतें जें हंसें तें.

**भडक**, १लिं॰ लालपणाचे अतिशयाचें द्योतक रंगाचें किं॰ तद्विशिष्ट वस्त्राचें वि॰; २, रंग, कलाबतू इ॰ कांचे योगानें भव्य, तेजः पुंज, दिसतें जें वस्त्रादि तो; ३, स्त्री॰ रंगीत वस्त्र इ॰ कांची जी चकाकी ती, मारणें धातुयोगीं प्र॰.

**भडकणें**, अग्नीनें किं॰ अग्निविशिष्ट काष्ठादिकानीं मोठ्यानें सवेग पेटणें; २, भटकणें; ३, सूर्यादिकांचे तेजानें आपले प्रकाशकतेनें विवक्षित देश व्यापे अशा प्रकारें प्रसृत होणें; ४, घोडा, फौज, इ॰ कानीं उपळणें.

**भडकण, भडकन, भडकर, भडदिनी, भडदिशीं**, अ॰ झडकन अग्नि अकस्मात् मोमोठा जाळ होई असें पेटण्याचें वि॰.

**भडका**, पु॰ गृहादिकांस अग्नि लागला असतां मोठी होत्येजी आग तो; २, तिखट, खाजरी, कुयली, इ॰ अंगास लागल्यामुळें किं॰ पित्तक्रोधादिकांचे अतिशयामुळें अंगाची होतीजी अतिशयित आग तो.

**भडकावणें**, चारवविणें.

**भडक्या**, स्त्री॰ भटक्या.

**भडंगभिकार**, न॰ **भडंगभिकारी**, पु॰ फकीर, गोसांवी, इ॰ जे भिकारी तें तो.

**भडगा**, पु॰ रा॰ भडका प्रा॰ द्वितीयार्थी.

**भडडड**, अ॰ तोफ इ॰ कांचा शब्दाचें अनु॰ वाज,

उड, इ० धातूंचें वि०

**भंडपुराण**, न० लांबचलांब मा० अप्रमाणजी कोणी गोष्ट सांगतो तीस निंदेनें म्ह०.

**भडभड**, अ० अनु० सशब्द मोठयानें ओकणें, पाणी ओतणें, इ० क्रि० मोठया स्वरानें कोणी रागें भरेल, आणें ऐकूनयें तो ऐकेल, इ० विचार न करितां बोल, इ० धातूंचें वि०.

**भडभडणें**, अग्नि क्रि० गृह इ० मोठयानें पेटणें.

**भडभडां**, अ० भडभड.

**भडभडाट**, पु० अग्नीचा अतिशयित जो भडका तो; २, तोफा इ० कांचे भडभड शब्दांचा जो अतिशय तो.

**भडभडावणें**, भडभडे असा करणें.

**भडभडीत**, अ० भणभणीत द्वितीयार्थी.

**भडभड्या**, ३ लिं० भडभड बोलण्याचा स्वभाव असून अंतःकरणाचा निष्कपट तो.

**भडभुंजा**, पु० फुटाणें, पोहे, लाह्या, इ० करून विकाव्या हा उदीम करून उपजीवन करितो तो.

**भंडमा**, स्त्री० कों० उभस्वना.

**भडमार**, पु० कोणेकावर पराभवार्थ तोफा, धोंडे, इ० कांचा किं० शब्दांचा अतिशयितजो मार तो.

**भडवळ**, स्त्री० कों० जमीन चाळल्यावर जी भेग पडती ती.

**भँडवा**, स्त्री० कों० भंडमा.

**भडवा**, पु० वेश्या, कसबीण, यांचा साजींदेपणावर उपजीविका करितो जो पुरुष तो.

**भडस**, स्त्री० कों० भडभुंजा पोहे इ० करायाचा समयीं चुलीखालीं जें घालितो जळण तें; २, शेताची जमीन भाजावासाठीं शेतांत भरितात जें कवळती, तें कवळओलेपणींच शेतांत पसरायाचें असतां प्र०.

**भडाका**, पु० भडका.

**भडाग**, स्त्री० रा० अंगाचा अतिशयित जो भडका तो.

**भडाग्न**, स्त्री० प्रेतास अमंत्रक जो अग्नि देतात तो.

**भडाग्नि**, पु० भडाग्न.

**भडाड**, पु० भडभडाट.

**भंडाडणें**, भडकणें प्रथमार्थी.

**भडाडों**, अ० भडाभड.

**भडाभड**, अ० भडभड; २, एकाचे पाठीमागून दुसरा, दुसऱ्याचे मागून तिसरा, अशा प्रकारें त्वरेनें कोणेकानें देणें, घेणं, बाहेर काढणें, पडणें, इ० कांचें वि०.

**भंडार**, पु० हळदीची पूड; २, न० आमदारखाना; उ०, भंडार भरपूर कालकंटक दूर.

**भंडारखाना**, पु० जेथें सोंवळें, ओंवळें, शिष्ट, अशिष्ट, इ० कांची तादृश व्यवस्था नाहीं असा जो कोणी एकस्थलीं जेवणारखाण्याचा कारखाना असतो तो.

**भंडारमाड**, पु० कों० मद्य काढायासाठीं राखलेला जो माड तो.

**भंडारवडा, भंडारवाडा**, पु० कों० गांवांत भं

भंडाऱ्यांनीच घरांची आळीवसली असल्ये तो.

**भंडारा**, पु॰ गोसांवी, किं॰ बैरागी, आसपासचे सर्व सजातीय मिळवून करितात जो भोजनसमारंभ तो; २. भंडारखाना.

**भंडारी**, पु॰ मद्य काढून उपजीविका करणारी एक जाति आहे; २. स्त्री॰ लहानफडताळ; ३. धाप्याची भंडार ठेवावयाची कातड्याची पिशवी आहे.

**भंडारडा**, पु॰ मद्य काढणारा जो भंडारी त्यास निंदेने ह्म॰.

**भंडावणें**, एकाद्यास अनेक उपद्रव देऊन त्रासणें.

**भंडी**, स्त्री॰ अंत्याक्षरी.

**भडीमार**, पु॰ भडमार.

**भडेराक्षस**, पु॰ कोण एकाचें राक्षसापेक्षां ही उग्रत्वें करून वर्णन करावयाचें असतां त्यास ह्म॰.

**भडोळ**, स्त्री॰ कों॰ भडवळ.

**भणंग**, पु॰ भिकारी.

**भणंगभिकार**, न॰ भडंगभिकार.

**भणंगभिकारी**, पु॰ भडंगभिकारी.

**भणभण**, स्त्री॰ भणभणाट प्रथमार्थी; २, अ॰ स्थळाचे अनावृतपणामुळें रुक्षपणें मोठ्यानें शब्द होईल असें वाऱ्याचे वाहण्याचें वि॰, भणभण करणें ह्म॰ घर इ॰ कानें भणभणीत दिसणें, माथा इ॰ कानी घोंघों करणें.

**भणभणणें**, मक्षिका समुदायानें भणभण अशा शब्दानें युक्त होणें; २, तिखट भक्षिणें, किं॰ ताप येणें, किं॰ चाखविणें, इ॰ कारणानें कानशिलानीं आंत भणभण शब्द होतो असें वाटे अशा ज्य येणें येणें पावणें; ३, सूर्योदय झाल्यामुळें किं॰ चंद्र जोन लावल्यामुळें स्वच्छ दिसावयाजोगें दिशांस प्रकाश वैशिष्ट्य येणें.

**भणभणविणें**, कानशील भणभणे असें चाखविणें किं॰ मस्तकास चोळणें इ॰ करणें.

**भणभणाट**, पु॰ मक्षिकासमुदायकृत जो अतिशयित भणभण शब्द तो; २, धा॰ घरांतील माणसें बाहेर गेल्यानें किं॰ मेल्यानें गृहादि स्थलास येतो जो भणभणीतपणा तो.

**भणभणीत**, वि॰लिं॰ शोभेस कारण जी मनुष्यादिकांची वसती तिचें अल्पत्व किं॰ केवळ अभाव झाल्यामुळें ओंके दिसतें जें गृह, बंगला, इ॰ स्थल तो २, भणभणल्या जा दिशा त्यांचें किं॰ स्वच्छ उजेडण्याचें वि॰; ३, न॰ दिशांस येत्ये जी भणभणीतपणा रूप अवस्था तें.

**भणाण**, पु॰ भणभणाट प्रथमार्थी; २, सैन्यग्राम इ॰ कांस कांहीं अकस्मात् मोठें भय प्राप्त झाल्यामुळें चवघानीं चोंहीकडे पळत सुटावें अशी जी अवस्था होत्ये तो.

**भणाणणें**, भणभणणें.

**भदकन, कर, दिशीं**, अ॰ बदकन.

**भद्भद्, भद्भदां**, अ॰ बद्बद्.

**भदरणें**, कों॰ भादरणें.

**भदाभद्**, अ॰ बदाबद्.

**भदाभदां**, अ॰ बदांबदां.

**भदें**, न॰ गोंधळी, गोसांवी, इ॰ आंत अग्नि पेटवून तळहातावर घेतात जें खापर तें; २, झिजल्यामुळें, आपटल्यामुळें, ज्याचे कांठ मोडले, पोंचे पडले,

ले, असेंजें मडकें, तांब्या, इ० भांडें, चूल, इ० तें; ३, फुटणें, शिथिल होणें इ० कारणामुळें आपासून स्वरबोद येऊं लागावा अशा दशेनें विशिष्ट झालेंजें कंठ, मृदंग, इ० कांचें स्वरूप तें; ४, कोणेक व्यवहार, मनुष्य, इ० कांची उत्कर्षदशा जाऊन केवळ दुर्दशेनें विशिष्ट झालेंजें त्यांचें स्वरूप तें; उ० त्याचे एकदां लाखरुपये फसले त्यामुळें त्याचे व्यवहारानें भदें-झालें.

**भद्र**, न० सभामंडप, देवालय, इ० कांचे खांब, तुळई, इ० व्यवच्छेदकानीं भिन्न भिन्न जे स्थल विभाग ते प्र०; २, सं० शुभ.

**भद्रमोथा**, पु० नागरमोथा.

**भद्रा**, स्त्री० करणामधलें सातवें करण त्या ० प्र० अनेकवचनांत; २, द्वितीया, सप्तमी, द्वादशी, या तिथी प्रत्येकीं; ३, कोणेकाचे कपाळीं भद्रा ह्म० जो दैवहीन, परंतु लाभसंभावना असतां दैवयोगानें लाभाचा विघात होतो तेव्हां प्र०.

**भद्रासन**, न० सं० सिंहासन.

**भद्राक्ष**, पु० रुद्राक्षासारिखा एक मणि आहे.

**भद्या**, ३ लिं० कपाळकरंटा.

**भपका**, पु० भबका.

**भपकारा**, पु० भबकारा.

**भपकी**, स्त्री० भबकी.

**भबका**, पु० अकस्मात् अग्निमोठ्यानें पेटल्यामुळें किं० तप्तपदार्थावर उदकादि पडणें इ० कारणामुळें अग्निशिखांच्या किं० वाफांच्या एकदांच वेगानें उठतो जो पुंज तो; २, कोरड्या मिरच्या इ० कांचे कोरडे चूर्णावर आघातादिशात्यामुळें तसाच त्याचे सूक्ष्मांशांच्या वेगानें उठतो जो पुंज तो; ३, अग्निसंयोगानें गुलाबपाणी, अर्क, इ० काढायाचें जें यंत्र त्यास नळानें आंत वाफ उतरायाचें संबद्ध असतें जें पात्र तो.

**भबकारा**, पु० भबकार प्रथम द्वितीयार्थी.

**भबकी**, स्त्री० भबका प्रथम द्वितीयार्थी.

**भंबाळ**, ३ लिं० सामान्यरीतीपेक्षां मोठा भव्य जो वस्त्याचा रेशीम इ० निर्मित कांठ, पदर, इ० किं० चित्राची रेषा, अक्षर, इ० किं० तद्विशिष्ट वस्त्र, चित्र, इ० तो; २, फारच मोठें जें गृह, स्थल, पात्र, मंचक, कारभार, इ० पदार्थ त्यास क्वचित् ह्म०.

**भंबेरी**, स्त्री० बचेरी.

**भंब्या**, ३ लिं० बंब्या प्रथमार्थी.

**भंभाळ**, ३ लिं० भंबाळ.

**भंभेरी**, स्त्री० भंबेरी.

**भंभ्या**, ३ लिं० भंब्या.

**भय**, न० कोणेकापासून आपल्यास कांहीं मरणादि अनिष्टप्राप्त होईल अशी संभावना झाल्यानें दुःखरूप अंतःकरणांत जो भाव विशेष उत्पन्न होतो तें; २, जापासून अनिष्ट होईल अशी संभावना असते त्याचें अखिलरूप जें भ्यावयास निमित्त तें; उ०, या वाटेंत कांहीं भय नाहीं खुशाल जावें; ३, नाशास किं० दुर्दशेस निमित्त जें कांहीं एक तें लागू व्हावयाजोगा जो कोणेक अर्थाचे अंगीं योग्यता विशेष असते ती तें; उ०, या घरास लागवानी बांसे घातला ह्मणजे शंभर वर्षे भय नाहीं. भय दाखविणें ह्म० भय निमित्ताचे प्रदर्शनानें तो भिईल असें करणें.

**भयंकर**, ३ लिं० ज्याचे दर्शनादिकें करून भय उत्प-

न होतें असा जो उग्ररूपी व्याघ्र, राक्षस, क्रूर शा
ब्द, रूप, स्मशानादि घोरस्थळ, इ० तो.

भयचकित, ३ लिं० भयेंकरूनच कित झाला जो
तो.

भयप्रदर्शन, न० भिऊन प्रवृत्त किं० निवृत्त व्हावें
इतक्याच्या उद्देशानें भय दाखविण्याचा जो व्या
पार तें; २. कोणेकानें भ्यावें ह्मणून करून ठेविता
त जें बुजगावणें तें.

भयभीत, ३ लिं० भयनिमित्ताचा योग झाल्यामुळें
जो भ्याला तो.

भयाण, न० ३ लिं० भयान.

भयान, न० उजाडीमुळें भय वाटायाजोगा गृहादि-
स्थळावर जो विशेषिनपणा उत्पन्न होतो तें; २.
३ लिं० तद्विशिष्ट जें उजाड गृह, इ० स्थळ तो.

भयानक, ३ लिं० भयंकर; २, पु० शृंगारादि नवरसां
तील एक रस आहे.

भयाभंगास, अ० जाणें, धातुयोगीं प्र० अ० जमले
ला जी संपत्ति, संतति, संसार, इ० तें अनेकप्रका
रें नाशहोऊन नाहींसें होणें.

भयाँ भयाँ, अ० करणें, करीत, जाणें, फिरणें,
इ० यांचा योगीं प्र० अ० अन्नाची, जाग्याची,
इ० सोई नाहीं ह्मणून दैन्य पावून दीनशब्द करी
त दशदिशा फिरणें.

भयाभीत, ३ लिं० भयभीत.

भैय्या, पु० पूर्भय्या.

भर, पु० बहरप्रथमार्थी; २, सर्वविषयांपेक्षां हेंच
गोड अनएव सर्वदा हेंच करावें हेंच भोगावें इ० रू
प कोणेक विषयाविषयीं अंतःकरणांत भाव अस
तो तो; उ०, पोरांचा मा० खेळाकडे जसा भर अस
तो तसा विद्येकडे असत नाहीं कोणेकानें कोणेक गो
ष्टीविषयीं भर घेणें स्न० अतिशयानें ती गोष्ट करूं ला
गणें, कोणेकानें कोणेकाचे भरीं भरणें स्न० मी कोण,
करतों काय, इ० विचार न ठेवतां त्याचे छंदीं लागणें
कोणेकानें कोणेक गोष्टीचे किं० मनुष्यादिकांचे भरीं प
डणें स्न० दुसऱ्याची सांगी किं० दैवयोग इ० कारणानें
विचार करून त्या त्या विषयीं प्रवृत्त होणें, भरीं घालणें
किं० देणें स्न० भरीं पडे असा करणें; ३, भारचतुर्थांश;
४, गोमहिष्यादि पशूंस पास होते जी कामुकावस्था-
तो; ५, स्त्री० संख्या, परिमाण, इ० कांची न्यूनांशाचे पू
रणानें जी पूर्णता ती; ६. त्या न्यूनतेचा पूरणार्थ जो
आंत घालितात द्रव्यांश ती; ७. भरगत प्रथमार्थ; ८,
खचा, ओतें, बाप, इ० कांचे मधला अवकाश, झाडा
चें अळें, इ० भरलें जावें ह्मणून आंत घालितात जें मा
ती, धोंडे, इ० ती, कोणेकानें कोणेकाची भर करणें स्न०
आपलें अहित करून घेऊन सर्वस्व दुसऱ्यास देणें; उ०,
आजपर्यंत आपणही कांहीं खालें नाहीं दुसऱ्यास ही
कांहीं दिलें नाहीं शेवटीं चोरांची भर केली, कोणेका
स कोणेक गोष्टीविषयीं भर घालणें किं० देणें, ह्म० सं
माननादिद्वारा उत्तेजन देणें, भरीस पडणें स्न० इत्यादि
विषय कोणेक व्यवहारादिकांची पूर्णता करायासाठीं
तिकडे खरचला जाणें किं० कांहीं एक गोष्ट, कोणेका
चें वचन, अंगीकारून आपण तत्संबंधाक्रांत होणें
जेणें करून तदनुरोधानें वागावें लागतें, भरीस घा
लणें स्न० भरीस पडे असा करणें; ९, ३ लिं० परिमा
णलेकरून विवक्षित जो कांहीं अर्थ तद्वाचक शब्दा
च्या पुढें याचा योग होऊन विशिष्टाचा अर्थ त्या त्या
परिमाणानें

परिमाणानें परिमित असा होतो, किं० कचित् द्रव्या दिगत परिभाषीं तात्पर्य असतें, कचित् तद्यापिगत परिभाषी तात्पर्य असतें; उ०, तोळाभर सोनें, पाय लीभर धान्य, कोसभर वाट, इ० हें वर्तमान गांवभर झालें. पृथ्वीभर चोरांचा उपद्रव आहे, कितीएक शब्दांचेमागें याचा योग झाला असतां विशिष्टापासून ईषन्न्यूनता रहित परिपूर्णावस्थापन्न अशा वस्तु दर्थाचा बोधक तो; उ०. भरकचेरी, भरअमदानी, भरदौलत, भरमूठ, इ०.

भरअमदानी, स्त्री० भरावस्थेस आली जी अमदानी ती

भरअम्मल, पु० अमलाची जी भरावस्था तो.

भरकचेरी, स्त्री० मनुष्यांनी भरलेली जी कचेरी ती

भरकटणें, भरकडणें, यथाकथंचित्‌ तीनी क्रियाविवक्षित असता लिहिणें, नांगरणें, रेघाटणें मारविणें. इ० कितीएक धातूंचे अर्थ याचा प्र०

भरकण, कन, कर, दिन, दिनी, दिशीं. अ० वेगानें, पक्ष्यानें. उडणें. तृणादिकानी पेटणें इ०कांचेवि० २. भरकन.

भरकुंब. १लि० रा० लोभ, काम. क्रोध, इ० हृदयांत झाले असतां ही त्यांची अभिव्यक्ति लोकांत एकाएकी होऊं देत नाहीं आणि ज्यांचे योगानें हलकेपणा येतो अशा जा हंसणें, उड्यामारणें, इ० चेष्टा त्या करीत नाहीं असा गंभीर प्रकृतीचा जो पुरुषादिक तो.

भरकूम, १लि० वा० भरकुंब.

भरकौंडा, पु० वा० तूस.

भरगच्ची, १लिं० अर्धी कलाबतू आणि अर्धे इतर सूत मिळून. विणून केलेला जो किनखाप, शेला, पा

गोटें इ० वस्त्र तें.

भरगत, स्त्री० न० कों० मलबत, गाडा, संसार, पोट, इ० जें तत्तत्पदार्थांचे समावेशाविषयी पात्र केंकरून विवक्षित त्याची त्यातत्पदार्थांनी जी पूर्णता ती; २, भरपंचमाथा; २, कों० न० गलबत, गाडा, इ० कांवर भरगतीसाठीं भरतात जो जिन्नस तें.

भरगांव, पु० भरवस्ती किं० भरवस्तीनें विशिष्ट जो ग्राम तो

भरघोंसानें, अ० कों० लोकांनमिळविलेली जी मळिशाती नगमाविना देशांतरास जाणें. भरणें, इ० कांचेवि० २, ड्थानिशी

भरचक्का, १लि० चिरकंदीमे भोजन तो; २, लड्डुकादि उत्तमपदार्थांचें जें भोजन तो.

भरजमा. स्त्री० बुडीत. पड. गयाळ, मपत, इ० वजा न पडतां भरवसूल घेऊन होते जी गाव, देश, इ० सवथी इत्यादिकांची जमा ती.

भरजरी, १लि० भरगच्ची, २, केवळ जरीनेंच काढिलेला जो काशिदा. वेलबुट्टी, इ० तो किं० तद्विशिष्ट जो न. पालखाचा गोंडा, इ० तो.

भरजवानी, भरजानी, भरज्वानी, स्त्री० तारुण्याची जी भरती.

भरड, १लि० विवक्षिताहून मोठें जें पिठादिचूर्ण किंवा सूत तो किं० त्या सूताने निर्मित जें वस्त्र इ० तो; २, पु० कों० पिठांतील मोठा जाडा जो अंश तो; ३, द्विदलधान्य दाळ करायासाठीं एकवार भरडलें असतां होतो जो डाळ तो; ४, न० रा० जांत वृक्ष. तृण. शेत. इ० चांगले होत नाहीं असा जो लहान सा माळ तें ५, स्त्री० कों० पापा. सेव्य, इ० कांची जीरव ती.

**भरडण**, न० कों० भरडायास घेतलेंजें धान्य तें, किं० तो व्यापारतें.

**भरडणें**, जांत्यानें धान्यादिकांचें केवळ बारीक पीठ नहोऊं देतां विवक्षित द्विभाग, त्रिभाग, इ० जितपत पाहिजे तितपत दळणें ; २, कों० ना० भरकटणें. काशाभरडणें ख० एखाद्याची खरड काढणें.

**भरडा**, पु० वडे, उंडे, इ० करायासाठीं तांदूळ, डाळी, एकत्र करून भरड दळितात जें पीठ तो ; २, कों० भरडनृतीयार्थं.

**भरडाव**, पु० रा० जोंपर्यंत राजे, वजीर. किं० त्यांचे सालचे हुकूम बहुतकरून पडले नाहींत अशा अवस्थेंतला जो गंजिफांचा डाव तो ; २, बहुतकरून मोहरांनशींचींनशींच आहेत अशा अवस्थेंतील जो बुदबळांचा डाव तो.

**भरण**, न० भरवण प्रथमार्थं ; २, सं० अन्नादिकेंकरून कोणेकाचें पोषण तें कुटुंबभरण इ० स० ; ३, धान्यादिकेंकरून पात्रादिकांचें जें पूरण तें, उदरभरण, पात्रभरण, इ० स० ; ४, स्त्री० बा० भरपंचमषष्ठार्थं.

**भरणा**, पु० विवक्षित संख्येचें किं० परिमाणाचें रुपये इ० द्रव्यादिकानें जें पूरण तो ; उ०, सर्कारचे मखत्याचा भरणा झाल्यावर मग वर मिळेल तें वांटून घेऊं ; २, सर्कार, दुकान, इ० जें व्यवहाराधिकरण त्याच्या ठायीं विवक्षित संख्याक रुपये इ० द्रव्याचें जें घालणें तो ; उ०, तुह्माकडे ऐवज यावयाचा आहे त्याचा शेटजीचे दुकानीं भरणा करून पावती आणून द्या ; ३, कोणे एक सजातीय अनेक पदार्थांचा जो समुदाय तो ; उ०, यागांवांत आह्मणांचा भरणा भारी आहे ; ४, कोणेकापाशीं मोहरा होन, भांडी, पाट, श्लोक, ध्रुपदें, इ० एकजातीय पदार्थांचा असतो जो संग्रह तो ; उ०, त्या हरदासापाशीं ध्रुपदांचा भरणा चांगला आहे.

**भरणी**, स्त्री० सत्तावीस नक्षत्रांतील दुसरें जें नक्षत्र त्या ; २, भर अष्टमार्थं. भरणीचा ख० बांध, जोतें, इ० पाडून भरणी टाकून गृहादिक रावयास उंच केलें जें स्थळ तो.

**भरणें**, पात्रभूत जो कांहीं पदार्थ त्यांत कांहीं एक पदार्थ समाविष्ट करणें ; २, पदार्थांचा समावेश होण्यास जें पात्रादिस्थळ तें त्या त्या पदार्थाचे समावेशानें निरवकाश करणें ; ३, स्पर्शमात्रें करून चिकटणारा जो तेल, तूप, चिखल, इ० सद्रव किं० धूळ, काजळ, इ० पदार्थ तेणें करून शरीर, भूमि, पात्र, वस्त्र. इ० लिप्त करणें किं० कोणेकाचे मतें लिप्त होणें ; ४, चित्र, कोष्टक, इ० कांबशलाकादिकानें रंग संबद्ध करणें किं० सर्कार, सावकार, इ० संबंधीं जी कोठी, पोतें, दुकान, इ० व्यवहाराधिकरणें त्यांचा ठायीं तत्तद्व्यवहाराचे अनुरोधानें द्यावयाचें जें द्रव्यादिक तें प्रविष्ट करणें ; ५, खर्चवेच, नागवणूक, इ० झाल्यामुळें होते जी कोणेक अधिकरणी द्रव्यादिकांची न्यूनता ती आपल्या पदरचें द्रव्यादिक त्या अधिकरणीं घालून पूर्ण करणें या अर्थं पक्षीं द्रव्यादिकांस ही कर्मता ; ६, कोणेकानें कुचित्स्थळीं शिरणें ; ७, अंग, धान्य, इ० कांतील अंश वृद्धिंगत होऊन पुष्ट होणें ; ८, कांहीं एक परिमेय संख्येनें किं० परिमाणानें मोजलें असतां कोणेक संख्येशीं किं० परिमाणाशीं तुल्य पडणें ; उ०, तांदूळ चार पायली भरले, नारळ शंभर भरले, ९, विवक्षित जें देश कालादि निष्ट परिमाण तें त्या तितक्या देश कालातिक्रमानें पूर्ण होणें ; उ०, महिना भरला ख० पगार मिळेल या अर्थं कदाचित् सकर्मक

भर

कप॰ हा होतो; उ॰, चारदिवस कमीआहेत ते भर मग-चाकरी सोड, नियम भरणें इ॰ स्थलीं तत्संबंधी कालादिरूपपरिमाण भरणें; १०, पाय, मांड्या, इ॰ अवयव बहुतचाल पडणें, ओळंघणें, इ॰ कारणानें उचलाया-स कठिण पडायाजोगे जड होणें, शस्त्रादिकांची धार भरणें स॰ वाळणें, छनभरणें स॰ विवक्षितस्थलीं काष्टादिकानीं निर्मिणें, खांच, क्षत, इ॰ भरणें स॰ मृत्तिका, मांस, इ॰ कानीं बुजणें, कोणेकाचें भरणें स॰ आयुष्यकिं॰ उर्जितदशा यांची परममर्यादा होणें, भरून देणें स॰ आपल्या अपराधामुळें दुसऱ्याचें गेलें, नष्ट झालें, बिघडलें, जें कांहींवस्तू, तें मूल्य, वस्त्वंतरदान, इ॰ द्वारा त्यास देणें, भरूनपावणें स॰ दुसऱ्यापासून आपल्यास अवश्य पावयाचें कर्ज, खंडणी, इ॰ इत्यादि तें त्यापासून आपल्याकडे आल्यामुळें त्याकडे तद्विषयीं आपला कांहीं संबंध राहिला नाहीं असें आपण होणें; भरलेपायांचा भरल्यापायांचा भरल्येपायांचा, त्य॰ ग्रामांतरादिकांपासून बाहेरून आलेला जो त्याणें पादप्रक्षालन, इकडे तिकडे बसून विश्रांति इ॰ नकरितां जसा आला तसाच घरांत जाणें, शिरणें, येणें, इ॰कांचें वि॰; उ॰ घरांत बाळंतीण आहे, भरलेपायांचा घरांत येऊं नका; भरलेपायांनीं भरल्यापायानीं, भरल्येपायानीं त्य॰ भरलेल्यापायानीं शिरणें, इ॰कांचें वि॰; भरलेपोटीं, भरल्यापोटीं भरल्येपोटीं, त्य॰ जेवल्यानें पोटभरलें असतां, कांहीं काम करणें, जाणें, येणें, इ॰कांचें वि॰; उ॰ भरलेपोटीं माझ्यानें काम करवत नाहीं; भरलेबंदांत, भरल्याबंदांत भरल्येबंदांत, त्य॰ सहस्त्र बंदाखालीं, त्य॰ भरलीमूठ सवालक्षाची स॰ भररेपोटा आणि आरेदिसा.

**भरणेवाईक**, पुलिं॰ विवक्षितवस्तूचा भरणा ज्यापाशीं बहुत आहे तो.

**भरण्याचा**, पुलिं॰ भरतीचा, २, आपल्यास उपयोगी पदार्थांचा भरणा ज्यापाशीं आहे तो.

**भरतखंड**, न॰ हिमाचलापासून समुद्रपर्यंत दक्षिणेकडील जो भूमिभाग तें.

**भरतशास्त्र**, न॰ गावें कसें, नाचावें कसें, अभिनय कसे कसे करावे, इ॰ नाट्यविषय ज्या शास्त्रांत आहे तें शास्त्र.

**भरतशास्त्री**, पु॰ भरतशास्त्र जाणणारा तो.

**भरताड**, स्त्री॰ माल भरून आली जी वैल, गलबतें, इ॰ कांची खेप ती; २, रा॰ ज्या पेठ, बंदर, इ॰ कांकडे स चाललेली जी वैल, गलबतें, इ॰ कांची खेप ती त्या पेठ बंदर इ॰ कांची; ३, कों॰ रहाटाचे माळेचे भरून ओतायाकरितां धरचाललेले जे लोटे ते; ४, रा॰ भरगत.

**भरती**, स्त्री॰ चंद्राचे उदयास्तसमयीं समुद्राचे उदकास जी वृद्धिंगतता होते ती; २, ला॰ दौलत, दुरवणें, दारिद्र्य, इ॰ कांची उत्तरोत्तर वृद्धि होत असावी अशी जी दशा ती; ३, भरगत प्रथम हितीपा थं.

**भरतीचा**, पुलिं॰ जे गुण असावे ते ज्यामध्यें नाहींत तरासरी विवक्षित संख्यापरिमाणादिकांची भरती करण्याविषयीं मात्र उपयोगी असा जो कांहीं पदार्थ तो.

**भरतें**, न॰ चिरकाल थोडें बहुत, अपथ्यसेवन, पापाचरण, इ॰ घडत गेलें असतां रोग, दंड, भय, इ॰ उत्पन्न करण्यास प्रयोजकरूप होते जी पूर्णता तें;

ते ; २. समुद्राची जी भरती ते.

**भरतोंडली**, न॰ कां॰ निरनिराळ्या फांकी न करितां तोंडली चिरून आंत मसाला भरून जी भाजी करितात ती.

**भरदवड**. अ॰ एकाएकीं त्वरेचे वेगानें, धांवणें. पळणें. इ॰ धातूंचें वि॰. उ॰ तो घोडा भरदवड पळतो आहे.

**भरदार**. ३लि॰ भरींवपणानें बळकट, पुष्ट, जें शरीर, शरीराचे अवयव, इ॰ तो.

**भरदोनप्रहर**. पु॰ ऐनदोनप्रहर.

**भरदौलत**. स्त्री॰ दौलतीची जी भरावस्था ती.

**भरधांव**. **भरधूम**. अ॰ भरदवड.

**भरनकशी**. **भरनक्षी**. ३लि॰ जरीचा कांठविणायाचा एक प्रकार आहे त्याप्रकारें विणलेला जो कांठ तो आणि तद्विशिष्ट जें लुगडें. खण. पीतांबर. इ॰ वस्त्र तो ; २. सर्वांगास नकशीनें व्याप्त जो स्तंभ, छत, चवकट, इ॰ तो.

**भरनवती**, स्त्री॰ भरजवानी.

**भरपाई**. स्त्री॰ हुंडी इ॰ कांचा पैसा पदरांत घेऊन त्याच हुंडी इ॰ कावर भरून पावलों इ॰ रूप जो लिहून देतात लेख ती ; २. कोणे कगोष्टीविषयीं तो लाभ हीनको आणि तो कटकट हीनको असा त्रास आला असतां आतां याची भरपाई झाली भरपाई लिहून दे तों इ॰ प्र॰ करितात.

**भरपूर**. ३लि॰ जितका पाहिजे तितका व्हाया जोगा पुष्कळ जो पदार्थ तो ; २. आंत कांहीं हलकेपणा, पोकळपणा आहे असें न दिसतां भरलेला. पूर्ण, पुष्ट, असा दिसाया जोगा जो सेना. सभा, ध्वनि, इ॰ पदार्थ तो.

**भरभर**, स्त्री॰ संपत्तीचा व्यवहार मोठे भरानें चालत असावा असा जो कोणेकाचे उर्जितदशेचा कांहीं काल भर असतो ती २, अ॰ झरझर,

**भरभरणें**, कोणेकाचें दैव भरभरीनें युक्त होणें श॰ भावकर्तरि प्र॰ कदाचित् दौलत इ॰ कांस कर्तृत्व मानितात ; २. भरभर शब्द होई असें तृणादिकांनी पेटणें ; ३. डोकें बहुत वारा लागणें इ॰ कारणामुळें आंत भरभर शब्द होतोसें वाटाया जोगे विकृतीनें युक्त होणें.

**भरभरां**, अ॰ झरझरां.

**भरभराट**, पु॰ अतिशयित जी भरभर तो.

**भरभरीत**, ३लि॰ भरड जें वस्त्र. पीठ इ॰ तो ; २. जांत चिकणाई नाहीं अतएव ज्याची भाकर इ॰ करूं गेलें असतां वळणीस येत नाहीं असें जें रुक्ष. पीठ, इ॰ चूर्ण तो किं॰ जांत स्निग्धता नाहीं अतएव जें एकाशीं एक जुळून बसत नाहींत असे रुक्ष, जे केश, तृण. इ॰ तो.

**भरम**, पु॰ भ्रमशब्दाचा अपभ्रंश.

**भरमजल**. स्त्री॰ चालणारानें दिवसास दाहा, बारा, कोसांची मजल करावी इ॰ रूप संप्रदाय त्याप्रमाणें पूर्ण जी मजल ती.

**भरमजलस**, स्त्री॰ भरकचेरी.

**भरमजला**, पु॰ खालचे मजल्याचे माडणावळीचें उंची इतकी किंबहुना अधिक उंच माडणावळ ज्याची असा जो वरचा मजला तो ; २, ३लिं॰ तो भरमजला आहे ज्यास असें जें गृह इ॰ तो.

**भरमजालस**, स्त्री॰ भरमजलस.

भरमभोंपळा, पु॰ आंत कांहीं ऐवज माप्ति इ॰ नसून बाहेर लोकांस उगीच्च आबमात्र दिसावा असा जो कोणी पुरुष, किं॰ व्यवहार, कांहीं गोष्ट, इ॰ तो.

भरमाचा भोंपळा, पु॰ भरमभोंपळा.

भरमूठ, स्त्री॰ धान्य इ॰ कानें पूर्ण भरलेली जी मूठ ती

भररास, स्त्री॰ कों॰ उभारास.

भरवण, न॰ कों॰ एकवार जळायासाठीं किं॰ तळायासाठीं घातलेंजें दिवा, कढई, इ॰ कांत तैलादिक तें; २, तळायासाठीं किं॰ उकडायासाठीं एकवार घातलेजे वोडें किं॰ मोदकादिपदार्थ तें; ३, एकवार दिव्यांत तेल घालून तें जळे पर्यंत काजळ पडलें तें, इ॰ भरवणें आणावीं

भरवणें, मूल, दुखणेंकरी, इ॰ कांचे मुखांत अन्नादिकांचे ग्रास घालून त्यांस जेववीणें किं॰ खाववीणें, त्या अन्नादि भक्ष्यास आणि भक्षणकर्ता जो मूल इ॰ त्यांस पर्यायें करून कर्मता; २, ला॰ ज्याला बहुत सांगितलें असतां येत नाहीं त्याला कांही ग्रंथादिक थोडथोडा सांगून घेववीणें.

भरवसा, भरंवसा. पु॰ कोणेकापासून आपलें विवक्षित इष्टकार्य खामाखाय होईल असा जो तद्विषयीं अंतःकरणांत दृढभाव धरिला असतो तो; उ॰, वरकडांचे हातून काम होणें हें समजलेंच आहे आतां कायतो भरंवसा तुमचा आहे; २, आपले अंतःकरणांत वाटतें तसेंच यापासून होईल तसेच गुण यामध्यें असतील असा जो कोणेकाविषयीं अंतःकरणानें निश्चय धरिला असतो तो; उ॰, हाशिपाई युद्धांत पळणार नाहीं असा मला भरवंसा होता पण तें कांहीं नाहीं; ३, कोणेकाविषयीं यापासून अमुक काम होईलच, अमुक प्रकारेंच होईल, अमुक कालींच होईल, किं॰ नाहींच होणार असा जो एकरूप निश्चय असतो तो, या अर्थी मा॰ निषेधविषयीं प्र॰; उ॰, पर्जन्य कधीं पडेल याचा भरंवसा नाहीं, भरंवशाचा स॰ जा कोणेकानें चिरकाल मोटे कांहीं गोष्टीविषयीं ज्याचा भरंवसा धरिला असतो तो त्याचा; उ॰ भरंवशाची म्हैस, भरंवशाची मोट, भरंवशाचें कुळ इ॰ म॰ म्ह॰ भरंवशाचे म्हशीस टोणगा.

भरवसूल, पु॰ पडीत, बुडीत, इ॰ कांहीं वजा न पडतां शिरस्त्या प्रमाणें यावयाचा तितका येतो जो शेत, ग्राम, इ॰ संबंधी वसूल तो.

भरवसूली, ३ लिं॰ भरवसूल ज्याचा येतो असा जो गांव, शेत, इ॰ तो.

भरवांगीं, न॰ कों॰ निरनिराळ्या फोडी न करितां चिरून आंत मसाला भरून करितात जी वांग्याची भाजी ती.

भरशाई, स्त्री॰ परवाज भरपूर व्हावा म्हणून जी त्याजवर दाटशाई घालितात ती.

भरा, पु॰ या॰ एकशें साठ पायली जें धान्य परिमाण तो.

भराड, न॰ दे॰ भराडी घालितात जी गोंधळ तें.

भराडी, पु॰ डौऱ्ये गोसांवी.

भराभर, अ॰ झरझर; २, स्त्री॰ अनेक पदार्थ किं॰ अनेक पात्रांत भरण्याचा जो व्यापार तो; उ॰, तुह्मीओझ्यांची भराभर करा तों मी तट्टें घेऊन

ऊन घेतें; २, गृहांत नित्याचें खर्चाचें पाणी भरून ठेवण्याचा जो व्यापार तो; उ०, चलबाई मला आऊंदे अजून घरांत भराभर करायाची आहे.

भरारणें, भरभरणें; २, पक्ष्यानीं भरकन उडणें; ३, कोणेक कर्तव्याविषयीं हुरळणें.

भरारां, अ० झरारां.

भरारी, स्त्री० भरशब्द होई असा पक्ष्यांचे उडण्याचा व्यापार ती मारणें धातुयोगीं प्र०.

भरावण, स्त्री० कों० भरावळ.

भरावळ, स्त्री० ग० शेताची भूमि भाजायाकरितां आंत काट, कचळ, तृण, इ० भरायाचा व्यापार ती.

भरित, ३लिं० सं० जो जेणेंकरून भरलेला तो तद्भरित; उ०, जलानें जो भरित तो जलभरित, दयाभरित, इ० स० प्र०.

भरीचा, ३लिं० विवक्षित परिमाण पात्र जेणेंकरून भरलें जाई इतका जो तांदूळ, इ० पदार्थ तो; २, निमेंशिमें भरलेलें जें पात्रादिक तें पूर्ण व्हावयासाठीं अपेक्षित जो अन्यांश तो.

भरीत, न० भरगत प्रथमार्थ३२ वांगें, घोंसाळें, इ० भाजून किं० शिजवून आंत तिखट, मीठ, दहीं, इ० घालून तोंडिल्यावायास पदार्थ करितात तें.

भरींव, ३लिं० ज्याचे पोटीं पोकळी नाहीं असा जो काष्ठ, अलंकार, इ० पदार्थ तो.

भरेकरी, पु० पेठे पेठेचें कापड आणून दुकानदारांस विकीत असतात अशी उदमयांत एक जाति आहे तो.

भरीभरी, अ० कोणेक पदार्थाशीं मापानें बराबर, पदार्थांतर देणें, घेणें, इ० कांचें वि०; उ०, गहूं दिले आणि भरीभरी तांदूळ घेतले.

भरोंसा, पु० भरवंसा.

भर्जन, न० सं० धान्यादि भाजण्याचा जो व्यापार तें; २, तेणेंकरून त्या धान्यादिकांवर होतो जो संस्कार तें.

भर्जित, ३लिं० सं० भर्जन केलें ज्याचें तो.

भर्ता, पु० सं० पति.

भर्ताड, स्त्री० भरताड.

भर्तार, पु० दादला.

भर्त्सणें, भर्त्सित करणें, प० भा० ग्रं०.

भर्त्सन, भर्त्सना, न० स्त्री० तूं ह्मणजे पदार्थ काय, तुझानें काय होणार, हो एकीकडे, तोंड दाखवूं नको, इ० हलक्यावाक्यानीं कोणेक मनुष्य, इ० कांचा करितात जो तिरस्कार तें ती.

भर्त्सित, भर्त्सना केली ज्याची तो.

भऱ्याचा, ३लिं० दिवस, रात्र, वर्ष, महिना, इ० जे कालविभाग वाचक शब्द त्यांपुढें याचा प्र०.

भऱ्याभरीं, अ० रा० अमुक भाताचे अमुक तांदूळ उतरावे असें जें प्रमाण त्याप्रमाणें उतरणें, इ० धातूंचें वि०.

भलतसला, ३लिं० भलतसा असा जो तो.

भलतसा, ३लिं० भलते प्रकारचा; २, अ० भलत्या प्रकारें.

भलता, ३लिं० अमुक अशारूपें करून विवक्षित नव्हे असा अर्थ त्याचा परामर्शक हा सर्वनामा उ०, आह्मांला अमुकच पदार्थ भोजनास पाहिजे त असें नाहीं भलतें कांहीं असलें तरीं चालतें; २,

ज्या गोष्टीचा प्रसंग चालला असतो त्यागोष्टीशीं कांही संबंध नाहीं असा निराळाच जो कांहीं अर्थ तो, किं॰ ज्या अर्थास औचित्य असतें त्याहून केवळ विलक्षण जो अर्थ तो, या अर्थी प्रा॰ च्याचा योग असतो; उ॰, मी रुपयांची गोष्ट काढली ह्मणजे आपण भलतेंच बोलून तें उडवितो; उ॰, धनी झाला ह्मणून काय भलतेंच बोलावें. तो शब्दापासून जसे तिकडचा, तिकडे, तेवढा, तिथे, इ॰ शब्द झालेत तद्वत् या शब्दापासून ही भलतिकडचा, भलतिकडे, भलतेवढा, भलतिथे, इ॰ अनेक शब्द होतात तेथें तो शब्दाच्या अर्थाचे स्थानी भलता या शब्दाचा अर्थ संबद्ध करून विशिष्ट शब्दाचा अर्थ तद्वत् जाणावा.

**भलतासलता**, ३ लिं॰ भलता इ॰ तो.

**भलभलता**, ३ लिं॰ अनेक प्रकारें करून जो भलताच तो: उ॰, सभामध्यें योग्य असेल तेंच बोलावें. भलभलतें बोलूं नये.

**भला**, ३ लिं॰ ज्याचे अंगीं लबाडी नाहीं आणि आपल्यापासून दुसऱ्यास एकाएकीं अपकार होऊं देऊं नये अतएव दुसऱ्यानें आपलें वाईट केलें तथापि सोसून रहावें असा स्वभाव ज्याचा तो; २, जसा असावा तसा, जेवढा असावा तेवढा, अतएव वाहवा ह्मणायाजोगा जो कांहीं अर्थ तो, प्रा॰ अभिनंदन कर्तव्य असतां प्र॰: उ॰, त्यावेळेस तुला भलें उत्तर सुचलें; ३, बराया अर्थी क्वचित् ग्रंथादिकांत प्र॰ होतो; ४, अब्रूचा, सभ्यरीतीनें वर्तणारा जो तो; उ॰, भल्यानें या कामांत पडूं नये.

**भलाइकी**, **भलाई**, स्त्री॰ भलायकी.

**भलामाणूस**, पु॰ अब्रूचा, प्रमाणिक, सभ्यपणें लोकांत वागणारा, जो मनुष्य तो.

**भलायकी**, स्त्री॰ भलेपणा.

**भलावण**, स्त्री॰ कोणी कांहीं कार्यार्थ देशांतरीं किं॰ ग्रामांतरीं जाऊं लागला असतां त्यास कोणी तेथें ज्याजवळ आपली पत असल्ये त्याजवर यास गरज लागली असतां अमुक पर्यंत किं॰ मागेल तितका ऐवज देऊन आमचे नावें ल्याहावा असें जें पत्र लिहून देतात तो; २, कोणेकाचें कार्य व्हावें ह्मणून देतात जें साहित्य पत्र किं॰ सांगून पाठवितात निरोप त्यास ह्म॰; ३, कोणेक कार्याची कोणेकावर असल्ये जी भिस्त ती.

**भलावणी**, स्त्री॰ कों॰ भलावण प्रथमार्थावांचून.

**भलीभलाई**, स्त्री॰ परोपकारादि केल्यामुळें लोकानी भलाभला ह्मणावें अशी जी योग्यता येल्ये ती; २, भलीभलाय.

**भलीभलाय**, स्त्री॰ कों॰ कोणा एकाकडील कुशल तेचें जें वर्तमान ती प्रश्न असतां प्र॰.

**भलीभलायकी**, स्त्री॰ भलीभलाई.

**भले**, अ॰ कोणेकाचें गाणें इ॰ कर्म पाहून चित्तास आनंद वाटला असतां तत्प्रशंसार्थ हा उद्गार निघतो; उ॰ भले मृदंगी भले.

**भलेरी**, स्त्री॰ कों॰ शेत वेणणें किं॰ रोप उपटणें इ॰ काम जेव्हां अनेक मिळून करितात तेव्हां तोंडानें भलेरे दादा भलेरे भाई असा जो शब्दघोष करीत असतात ती; घालणें धातुयोगीं प्र॰; २, कों॰ आरंभल्यापासून मध्यें विसांवा न घेतां एके दमानें कांहीं एक काम करण्याचा प्रकार ती; ३, कोणेका

चे गाणें इ० कसबाचें मर्म नजाणतां उगीचजें भले भले ह्मणणे ती.

**भलेलोक**, पु० राजे, सर्दार, इ० कांचे पदरीं जे मान करी, शिपाई, इ० लोक असतात ते.

**भव**, पु० जन्ममरणरूपजो संसार तो. भवसागर, भवदुःख, भवबाधा इ० स० ; २. उत्पत्ति. देहापासू न उत्पत्तिजाची तो देहभवदुःख इ० मनो भवका- म इ० समुद्रभवलवण इ० स०

**भवई**, पु० तमाशाकरून उपजीविका करणारे जेगु जराथी लोक ते. प०.

**भँवई**, स्त्री० प्रा० मनुष्याचे डोळ्याचे ऊर्ध्वभागीं ध नुष्याकार असते जी केशपंक्ति ती.

**भँवडणें**, भोंवडणें.

**भँवणें**, भोंवणें.

**भँवता**, अ० भोंवता.

**भँवताल्चा**, ३लिं० भोंवताल्चा.

**भँवताला**, अ० भोंवताला.

**भवतिनभवति**, स्त्री० कोणेकशास्त्रार्थादिकांचा नि र्णयकरण्याविषयीं जो परस्पर वादप्रतिवाद होतो तो ; काय हो कालतुमची त्यांची भवतिनभवति चा लली होती मग पुढें काय ठरलें.

**भँवतीं**, अ० भोंवतीं.

**भँवरगांव**, पु० न० भोंवरगांव.

**भवन**, न० सं० गृह ; २. होण्याच्या किं० असण्याचाजो व्यापार तें.

**भँवरा**, पु० भोंवरा.

**भंवरी**, स्त्री० भोंवरी.

**भँवाडा**, पु० दे० प्रा० वभ्रायार्थं.

**भवानी**, स्त्री० पार्वती ह्मणून जी देवी ती ; २, बोहणी.

**भवितव्य**, न० अवश्य होणारजें कांहीं एक तें.

**भविष्य**, न० वर्तमानकालाहून उत्तरकालीं होणारजें कांही एक तें ; २, तद्विषयीं आपले बुद्धीनें किं० ज्योतिः शास्त्रादिप्रमाणानें असें असें होईल असा कोणी कर्तीजो सिद्धांत तें ; ३, भावी.

**भविष्या**, ३लिं० कों० कोणेक काम आतां कर्तों ह्मणू न सांगावें परंतु महिना, दोनमहिने इ० बहुत काळ गेला तथापि होऊं नये पुनः विचारलें असतांही त सेंच सांगावें पण त्वकर करूं नये अशा स्वभावा चा चेंगट जो मनुष्य तो आणि त्याचा तसा कारभा र, बोलणें ; इ० तो ; २, मागें केलें काय पुढें करावा चें काय इ० जास अवधान रहात नाहीं पदोपदीं अनेक भ्रांतिउत्पन्न व्हाव्या अशा स्वभावाचा जो तो.

**भव्य**, ३लिं० पोरकेपणा, हलकेपणा, किरकोळपणा, नदिसतां सुशोभितपणा दिसावा जामें मोठें आ- कार परिमाण ज्याचें असाजो शरीर, वस्त्र, पात्र, गृ ह, अक्षर, इ० पदार्थ तो.

**भसकण**, कन, कर, दिशीं, अ० अनु० टोंचणें, भोंसकणें, ओतणें, इ० धातूंचें वि० उ० त्याचे पा यांत भसदिशीं कांटा भरला.

**भसकणें**, शरीरादिकांत भाला इ० भसकण शिरक विणें.

**भसका**, पु० भिंत, वस्त्र, इ० कांस मोठें पडतें भोंक तो.

**भसकापुरी**, स्त्री० जी भस मशीत वाईट तपकीर ती ; २, भगवती द्वितीयार्थं.

**भसकावणें**, शरीर, कूड, इ० कांत शस्त्र, शिंग, इ० घु पसून.

पसून भसक्यानें तें युक्तकरणें ; २, भसकणें

**भसभशीत**, ३लिं॰ ज्याचे अंगीं दमदारपणा नाहीं अ तएव भसभस उडायाजोगा तपकीर इ॰ चूर्ण तो.

**भसभस**, अ॰ अनु॰ धूळ अनेकवार उडणें, रेती, चिखल, इ॰ कांत पायरुपणें, इ॰ धातूंचें वि॰.

**भसभोंगळ**, ३लिं॰ ढिलें जें ओझें, शरीर, कारभार, इ॰ तो.

**भसरा**, पु॰ दे॰ भसरें प्रथमार्थी.

**भसरें**, न॰ संग्रहणी इ॰ विकृतीमुळें मुलें इ॰ कांस अपक्कमळ पडतो तें ; २, रा॰ गळसूत्रांत फोडयाचें, तोंडाचें आंतील भाग कुजावा, इ॰ रूप उष्णतेनें विकृति होते तें.

**भसाडा**, ३लिं॰ भारी मोठें जें सूत, वस्त्र, अक्षर, इ॰ तो.

**भसाभस**, अ॰ अनु॰ कापणें, फोडणें, फुटणें, तोडणें, तुटणें, इ॰ कांचें वि॰ शस्त्रादिकाचे प्रखरते मुळें - किं॰ त्यापदार्थाचे अंगीं तादृश दार्ढ्य नाहीं म्हणून विशेष प्रयास न होतां ती ती क्रिया होत्ये अशी वर्णन विवक्षा असतां प्र॰ ; २, भसभस.

**भसासां**, अ॰ भसाभस.

**भस्म**, न॰ गोमय, काष्ठ, धातु, पाषाण, इ॰ सर्वपदार्थ निःशेष अग्नीनें जळला असतां त्याचा पुन्हा जळायाचा नाहीं असा होतो जो परिणाम तें.

**भस्मणें**, कांहीं पदार्थ जळून भस्म होणें.

**भस्मरोग**, पु॰ कितीही भक्षिलें असतां क्षुधा शांत होतच नाहीं असा एक रोग आहे.

**भस्मरोगी**, ३लिं॰ भस्मरोग आहे ज्यास तो.

**भस्मसात्**, अ॰ करणें, होणें, यांचा योगीं प्र॰ जाळून भस्मरूप करणें किं॰ जळून भस्मरूप होणें.

भस्मस्नान.

**भस्मस्नान**, न॰ जलाचा अभाव किं॰ स्नान करण्याचे शक्तीचा अभाव इ॰ कारणा मुळें स्नान करावें त्याचे स्थानीं शास्त्रांत सांगितल्या प्रमाणें अंगास जें भस्म लेपन करितात तें.

**भस्मासुर**, पु॰ एक दैत्य होता ; २, ला॰ ज्याचें करणें अचाट, खाणें बहुत, असा जो मनुष्य त्यास म्ह॰.

**भस्मी**, ३लिं॰ सोनेरी वर्खाचे बूट ज्यावर असतात असें शेला, पागोटें, इ॰ वस्त्र तो.

**भस्में**, न॰ भसरें.

**भळभळ**, अ॰ अनु॰ बाहेर पडून वाहण्यास प्रतिबंधक असतें जें कांहीं त्याचा अभाव झाल्या मुळें अकस्मात् बाहेर पडोन रक्त, उदक, इ॰ कांचें वाहणें, सांडणें, इ॰ त्याचें वि॰ किं॰ तसें नेत्रोदक वाहे असें जें रडणें त्याचें वि॰

**भळभळणें**, भरभरणें प्रथमार्थी.

**भळभळां**, अ॰ भळभळ.

**भळभळीत**, ३लिं॰ मोठा भव्य दिसायाजोगा जो वस्त्राचा कांठ किं॰ तद्विशिष्ट वस्त्र तो ; २, भणभणीत द्वितीयार्थी.

**भळू**, ३लिं॰ व्यवहार इ॰ कांत साधारण युक्तीनें कोणीं ठकविलें असतां ठकला जावा असा जो भोळसर तो प्र॰ त्याचे अंगीं वस्त्र, पात्र, धारण करणें इ॰ विषयीं ठाकठिकी असत नाहीं.

**भक्ष**, पु॰ जो पदार्थ ज्यास खावयास योग्य तो त्याचा.

**भक्षक**, ३लिं॰ भक्षणारा.

**भक्षण**, न॰ भक्षण्याचा जो व्यापार तें ; २, भक्षितात जें अन्नादिक तें ; उ॰ पशूचें भक्षण गवत, मनुष्याचें भक्षण अन्न,

भक्षणीय.

**भक्षणीय**, ३ लिं० भक्षायास योग्य जो पदार्थ तो.

**भक्षणें**, खाणें.

**भक्ष्यस्थानीं**, अ० पडणें किं० घालणें इ० कांचा योगी प्र० अ० कोणेकाचें द्रव्यादिक कोणेकाचे भक्षासारिखें होणें किं० त्याणें आपले भक्षासारिखें करणें ह्म० ग्वाईनटाकणें.

**भक्षित**, ३ लिं० भक्षिलेला.

**भक्षी**, ३ लिं० जो जातें भक्षितो तो तन्द्रक्षी; उ०, वायू तें भक्षितो तो वायुभक्षी, अन्नभक्षी, मांसभक्षी, इ० समासीं प्र०.

**भक्ष्य**, ३ लिं० भक्षायास योग्य जो पदार्थ तो; २. न० भक्ष.

**भक्ष्यभोज्य**, न० भक्षायास आणि भोजनासहि योग्य पदार्थ तें.

**भाई**, पु० भाऊ, याचा व्यवहारीं प्रयोग थोडा.

**भाईचारा**, पु० एकामेकानीं एकमेकांचें हित करीत असावें नित्यें एकमेकाचे घरीं जात येत असावें असा जो परस्परांचा सख्यभाव चालतो तो.

**भाईदारी**, स्त्री० भाईचारा.

**भाईबंदकी, भाईबंदी**, स्त्री० भाऊबंदकी, कोणेकास काही गोष्ट भाईबंदीनें मागणें, विचारणें, इ० म्ह० आपली सत्ता दाखीन दाखविता बाबा पुता इ० करून मागणें, विचारणें, इ०

**भाईपणा**, पु० बंधुत्व.

**भाईभाई**, अ० भयां भयां

**भाईराज, भाईराय**, पु० बधुराज.

**भाऊ**, पु० बंधु प्रथम द्वितीय तृतीयार्थ; २, हें भक्तिचा नाम आहे हें वडील बंधु इ० कांस व्यवहारांत सन्मानार्थ ह्म० किं० त्यांचे त्यांचे नामापुढें ही याचा योग होतो; उ० हरीभाऊ, बाबाभाऊ.

**भाऊगर्दी**, स्त्री० भाऊसाहेब ह्मणून पेशवे होते त्यांचे पाणिपतचे युद्धांत मोठी गर्दी झाली होती तद्वत् जी आतां युद्धादि प्रसंगीं मोठी पराकाष्ठेची गर्दी होते तीस ह्म०.

**भाऊपणा**, पु० बंधुत्व.

**भाऊबंद**, पु० बंधुआदिकरून जो दायाद तो.

**भाऊबंदकी**, स्त्री० भाऊबंदपणा.

**भाऊबीज**, स्त्री० कार्तिक शुद्ध द्वितीया त्यादिवशीं बंधु आणि बहिणी परस्परें एकमेकाची वस्त्रालंकारादिकें करून पूजा करीत असतात.

**भाओ**, पु० भाओजी; गोष्ट ह्मणी इ० कांत याचा प्र०.

**भाओजी**, पु० ननिंदाचा नाम आहे मेहुणा, किं० दीर यांस ह्म०.

**भाक**, स्त्री० काहीं एक कार्याविषयीं कोणेकास हें कार्य मी खचित करीन इ० रूप देतात जें वचन ती.

**भाकड**, ३ लिं० विईन बहुत दिवस झाल्यामुळें दूध देईना अशी झालेली जी गाय, किं० म्हैस, इ० ती; २, वा० वृद्ध झाली किं० तुरार झाली अशी जी गाय, किं० म्हैस, इ० ती; ३, पौंड दिवस रूप जो प्रतिपदादि तिथि किं० तद्विशिष्ट जो दिवस त्याचें वि०.

**भाकडकथा**, स्त्री० एका कथेचें अनुसंधान चालले असतां मध्यें दुसरी कथा निघते तीस किं० उगीच निरुपयोगी निकामपणें सांगतात त्या गोष्टी त्यांस ह्म०.

**भाकणें**, पुढें होणार जें काहीं एक तें अमुक अमुक कां होईल असें शास्त्रानें निश्चित करणें, करुणा भाकणें ह्म० दुसऱ्यास करुणा यावी ह्म० दीन शब्दें बोलणें.

**भाकर**, स्त्री० बाजरी, जोंधळे, इ० कांचें पीठ भिजवून त्याचा गोळा थोपटून त्याचाच कासारिख्या आकार करून तवा इ० कांवर भाजिता ती.

**भाकरखाऊ**, २लिं० ज्याचे भोजनांत प्रा० भात असतां हीं प्राधान्य करून भाकरच असते असा जो कोणी त्यास निंदेनें म्ह०.

**भाकरबडव्या**, पु० दुसऱ्याचे घरीं आचारीपणा करून उपजीविका करणारा जो त्यास निंदेनें म्ह०.

**भाकरतुकडा**, पु० भाकर, पोळी, वडा, इ० जो भक्ष्य-पदार्थ तो.

**भाकरमोड्या**, २लिं० भाकरखाऊ; २, तुकडमोड्या.

**भाकरी**, स्त्री० भाकर.

**भाकीत**, न० भाकून ठेविलेला जो होणार कांहीं एक अर्थ तें.

**भाग**, पु० एका अर्थाचे अनेक जे अंश ते प्र०; २, भागाकारानें येतें जें फळ तो; ३, भागण्याचा संस्कार तो, कोणक गोष्ट भागास येणें म्ह० करण्याविषयीं उचिता सयेणें किं० आंगीस येणें; ही गोष्ट करणें भाग आहे इ० स्थळीं उचित आहे असा अर्थ. भाग तुटणें म्ह० दुसऱ्याशीं आरब्ध जो कांहीं एक व्यवहार तो, कोणत्ये तरी एके तडीस जाणें.

**भांग**, पु० स्त्रिया इ० कांचे मस्तकावरचे केश दोहोंकडे सारखे करून मध्यें सारखी करितात जी रेषा ती; २, समुद्रास उधानाचे दिवस जाऊन कमी पाणी भरण्याची जी अवस्था प्राप्त होत्ये ती; ३, भंग तृतीयार्थं.

**भांगट**, २लिं० भंगट.

**भांगटिळा**, पु० भांग नीटनेटका करणें, काजळ कुंकू लावणें, वेणी घालणें, इ० रूप जो व्यापार तो.

**भांगणें**, भांग द्वितीयार्थ युक्त समुद्रानें होणें.

**भागणें**, कोणक संख्यांकानें विवक्षित संख्या स्वपरिमित भाग पडत अशी विभक्त करणें; उ०, चोहोनीं चोवीस भागले असतां सहा सहा असे चार विभाग होतात; २, कांहीं एक श्रम केल्यामुळें दमणें; ३, घराची तुळई, आढें, किं० सगळें घर, इ० चिरकाल वर भार असल्यामुळें दबूं लागाया जोगें अशक्त होणें; ४, रा० उपटणें, काटणें, इ० द्वारा नाहींसें केलें तरीं पुनः पुनः जाणीं उत्पन्न होतच असावें असें जें केंस, तृणें, ढेंकूण, इ० त्याणीं कितीएक कालानें पहिल्यासारखी उत्पत्ति न होई असें होणें; ५, विवक्षित द्रव्यानें विवक्षित जो खर्च तो निर्वहित होणें; उ०, आम्हास पगार येतो इतक्यानें बिराडखर्च मात्र भागतो ६, वा० शरीरानें कृश होणें.

**भांगभुरका**, पु० भांग तमाखू, मेवामिठाई, इ० संबंधें अव्यवस्थितपणें जो खर्च तो.

**भांगलणें**, कों० शेत वेणणें; २, रा० आंत तृणादि रुजलें असतें आणि इकडचा काड्या तिकडे, तिकडचा काड्या इकडे, झाल्या असतात असें जें शेत तें आंतील तृणादि काढून जिकडचा तिकडे काड्या होत असें करणें.

**भागलीक**, स्त्री० वा० भागवटा.

**भागवटा**, पु० फार श्रम केल्यामुळें शरीरास फारच येतो जो भागलेपणा जेणें करून ज्वरादिक विकृति होत्ये तो.

**भागवणीची गोष्ट**, स्त्री० रा० दमवणीची गोष्ट.

**भागवत**, २लिं० भगवत्संबंधी मत संप्रदाय इ० तो; २ पु० त्या मतानें, त्या संप्रदायानें, वागणारा जो मनुष्य तो.

तो ; २, न॰ अष्टादशपुराणांतील एकपुराण आहे.

**भौंगवळ**, स्त्री॰ कों॰ भांगोळी.

**भौंगसळई, भांगसळय**, स्त्री॰ स्त्रियांचे मस्तकावरील भांगकरण्याची एकरुपें इ॰ कांचीसळई असत्येती

**भौंगा**, पु॰रा॰ शेत इ॰ भूमींतील जो लहान विभाग तो.

**भागाकार**, पु॰ अंकभागण्याचा जो व्यापार तो ; २, तेणें करून येतें जें फल तो.

**भागाळी**, स्त्री॰ कों॰ एक अनेक विभाग्यानीं विभागकरून घेतलेले जे शेत, गृह, इ॰ कांचे अंश ते प॰.

**भागिनेय**, पु॰सं॰ बहिणीच्या जो पुत्र तो.

**भागिनेयी**, स्त्री॰ सं॰ बहिणीची जी कन्या ती.

**भागी**, स्त्री॰ अनेक मिळून कांहींएक केला जो व्यापार-त्यामध्यें अनेकांच्या अंशतः अंशतः असतो जो संबंध तो ; २, पु॰ भागीदार.

**भागीदार**, पु॰ जा व्यवहारांत जाची भागी आहे तो त्याव्यवहाराचा किं॰ तें अनेक व्यवहार कर्ते एकमेकांचे.

**भागीरथी**, स्त्री॰ सर्वांमध्यें श्रेष्ठ अशी एक महानदी आहे.

**भागीलदार**, पु॰ कों॰ भागीदार.

**भागूबाई**, स्त्री॰ केवळ अपराक्रमी नाकर्ता जो पुरुष त्यास ह्म॰.

**भागेली**, पु॰ कों॰ भागीलदार.

**भौंगोळी**, स्त्री॰ कों॰ स्त्रियांचे कर्णोजवळचे केश प्रा॰ वेणी घालते समयीं न॰.

**भाग्य**, न॰ दैव ; २, ऐश्वर्य. भाग्याचा ह्म॰ दैववान्, भाग्याचा ओंपळा ह्म॰ कपाळकरंट्यास ह्म॰ भाग्योदय इ॰ स॰.

**भाग्यपुरुष**, पु॰ घरचा खुशाल कठोर भाषणादिकानें कोणास दुखवायाचा नाहीं, पद्महस्ती, लहान मोठीं धर्मकृत्यें जाचे हातून बहुत घडतात, असा जो पुण्यात्मा पुरुष त्यास ह्म॰.

**भाग्यवंत**, ३लिं॰ भाग्य आहे जास तो ; उ॰ भाग्यवंत ह्मणून या शरण गेले पंढरिराया.

**भाग्यवान्**, ३लिं॰ भाग्यवंत.

**भौंग्या**, ३लिं॰ भंगट.

**भाचरूं**, न॰ भाचा आणि भाची यांस सामान्यतः ह्म॰.

**भाचा**, पु॰ पुरुषास आपले बहिणीचा मुलगा तो ; स्त्रियेस आपले भावाचा किं॰ आपले नणंदेचा किं॰ आपले बहिणीचा जो मुलगा तो.

**भाची**, स्त्री॰ जांचा पुत्र आपला भाचा होतो त्यांची जी कन्या ती.

**भाचेजौंवई**, पु॰ भाचीचा नवरा.

**भाचेसून**, स्त्री॰ भाचाची जी बायको ती.

**भाजक**, ३लिं॰ जा अंकानें कांहींएक संख्या भागायाची तो अंक.

**भाजकट**, ३लिं॰ तांदूळ इ॰ पदार्थ किंचित् भाजल्यामुळें विलक्षण त्याची लागते जी गोडी ती किं॰ त्याचा वास तो.

**भाजका**, ३लिं॰ भाजलेला जो तांदूळ, जमीन, इ॰ तो.

**भौंजगड**, स्त्री॰ भानगड.

**भौंजगडणें**, भानगडणें.

**भाजण**, न॰ खापर इ॰ कांत भाजायासाठीं घेतलें जें धान्यादिक तें ; २, आणि तो व्यापार ; ३, खापरांत भाजायासाठीं एक एक वार वैरिलात जें धान्यादिक तें.

**भाजणी**, स्त्री॰ दोन चार प्रकारचीं धान्यें भाजून मिश्रित

श्रित करून जें पीठ करितात ती.

**भांजणी**, स्त्री॰ कोणी एक अंकराशींतून कोणं कअं कराशी उणा करण्याचा व्यापार ती परंतु जे अंक- उणें करायाचे ते वर मांडून तिसरी पंगत न मांडितां तथचे तेथें उणें करून शेष मांडावें असा प्रकार- असतां प्र॰; २, ला॰ समुदायरूपें करून स्थित जीं कांहीं कामें कांहीं द्रव्यें इ॰ त्यांचे व्यक्तीचा अनेक स्थलीं विनियोग करून जी विल्हेवाट ती ;उ॰, मी इ कडे येऊं लागलों तेव्हां दाहा कामें तुंबून राहिलीं हो तीं मग एक काम याला एक काम त्याला अशीं चौ घांस चार कामे सांगून सरासरी भांजणी केली आ णि निघून आलों.

**भांजणें**, कों॰ भांजणीनें विशिष्ट करणें.

**भाजणें**, अग्नींत घालून किं॰ अग्नीवर तवा, खापर, इ॰ विरुद्ध कपाच ठेऊन त्यांत घालून फळ, भाकर, दाणा, इ॰ पदार्थ पक्क करणें; २, पोळणें, ३, कों॰ जाळणें ;४, ला॰ कोणे कास अनेक प्रकारें गांजणें ;५, न॰ रा॰ भाजण तृतीयार्थी.

**भाजन**, न॰ पात्र मान-भाजन, सुखभाजन, दुःखभा जन, इ॰ समास जाणावे; २, अंक भागण्याचा व्यापा रतें.

**भाजप**, न॰रा॰ भाजण प्रथम द्वितीयार्थी.

**भाजपी**, पु॰ पोहे, लाह्या, इ॰ करायासाठीं धान्य भाजि तो तो.

**भाजपीण**, स्त्री॰रा॰ पोहे, लाह्या, इ॰ भाजणारी जी- स्त्री ती.

**भाजपोळ**, स्त्री॰ शेतजमीनीस भाजणें इ॰ संस्कार क रण्याचा व्यापार ती ; २, चोर इ॰ कानीं घरें जाळावीं, मनुष्यांस भाजावें इ॰ रूप जो व्यापार ती.

**भजलेलें**, न॰ भाजून केलेलें जें पोहे, पीठ, इ॰ उपहा र पदार्थ तें.

**भाजवट**, स्त्री॰ कों॰ शेत भाजण्याचा व्यापार ती ; २, भाजलेली जी भूमि ती.

**भाजा**, पु॰ कों॰ भाजण तृतीयार्थी ; २, ग्रं॰ स्त्री॰ भा र्या.

**भाजाणा**, पु॰ कों॰ खायासाठीं भाजलेला जो हरभरा इ॰ दाणा तो.

**भाजाणी**, स्त्री॰ कों भाजणी.

**भाजावळ**, स्त्री॰ कों॰ शेत भाजण्याचा व्यापार ती; २, भाजून पेरायास सिद्ध केली जी भूमि ती.

**भाजित**, ३ लिं॰ कोणे क अंकानें भागला जो अंक तो.

**भाजी**, स्त्री॰ भात, भाकर, इ॰ मुख्य जें अन्न त्यासह वर्तमान रुच्यर्थ भक्षायासाठीं फल, मूल, इ॰ शिजवू न त्यांत तिखट, मीठ, घालून तोंडिलावणें करितात ती २, तदुपयोगी फल, पत्र, कंद, मूल, पुष्प, त्वक्, अंकुर, इ॰ ती; ३ कों॰ विटीदांडूचे खेळांत एक शब्द आहे, तुझी भाजी काची या वाक्याचा प्रयो ग नावडतीचें मीठ अळणी या प्रयोगासारखा दि सतो.

**भाजीपाला**, पु॰ फळभाजी. पाले भाजी, इत्यादि क, त्याचें बोलणें भाजीपाला हा॰ त्यांत कांहीं एक ऐवज नाहीं असा अर्थ.

**भाज्य**, न॰ भाजकानें भागायाचा जो अंक तो.

**भाट**, पु॰ राजादिकांची स्तुति करून उदर निर्वाह करणारी एक जाति आहे ; २, न॰ कों शेतजमीनी चे आसपास सपाट उंच वट्याची जी जमीन अस ते

ले जथें पाणी ठरत नाहीं आणि शेत नहीं चांगलें होत नाहीं तें; २, स्त्री॰ न॰ नदी, समुद्र, इ॰ कांत जो सपाट उंचवट प्रदेश असतो जो कदाचित् ओहोटी इ॰ कानें पाणी कमी झालें असतां उघडा पडतो तें.

भाटजांबूळ, भाटजांभूळ, स्त्री॰ एक औषधी झाड आहे.

भाटलें, न॰ रा॰ डोंगरवट जमीनीत सपाट दोन विघे, चार विघे, इमार जो भूविभाग असतो तें.

भाटवळ, ३लिं॰ कों॰ जेथें भाटें बहुत अशी जे जमीन तो.

भाटी, स्त्री॰ कों॰ समुद्रादिकांतील जें भाटती; २, खाडी, नदी, इ॰ कांचे कांठची चांगली, दमदार, ऊंस इ॰ जिचव व्हावयाजोगी जी जमीन ती; ३, मार्जार जातीय जी स्त्री तो.

भाटया, पु॰ गुजराथ्यांत एक जाति आहे.

भाड, स्त्री॰ कोणी आपली बहीण, बायको, इ॰ किंविकत घेतलेली, बाळगलेली, अशी जी स्त्री ती दुसऱ्यास मैथुनार्थ देऊन त्यापासून येतात जें द्रव्य तें.

भांड, पु॰ पक्ष्यादिकांचे शब्दाचें अनुकरण करावें, नकला कराव्या, इ॰ कला करून उपजीविका करणारी एक जाति आहे; २, कज्जेदलाल, ह्मरांड, भांड, हिंसा, विघडे तो होय केसा.

भांड, न॰ सं॰ भांडें प्रथमार्थी.

भांडकडबोळें, न॰ दे॰ थालीपीठ.

भाडकण, कन, कर, दिन, दिनी, दिशीं, अ॰ अनु॰ शब्दहोई असें तोंडावर मारणें, वृक्षादिकानें किं॰ वृक्षादिकांवरून फलादिकानें पडणें इ॰ कांचें वि॰; २, करावें, न करावें, कसें करावें, काय करावें, इ॰ विलंब न लावितां तत्काल बोलणें, करणें, सांगणें, इ॰ कांचें वि॰.

भाडखाऊ, ३लिं॰ भाड खातो तो.

भांडखोर, ३लिं॰ भांडण्याचा स्वभाव ज्याचा तो.

भांडगा, ३लिं॰ भांडखोर.

भांडण, न॰ कलह.

भांडणें, कलह करणें.

भाडभीड, स्त्री॰ भीडभाड.

भांडरा, ३लिं॰ भांडखोर.

भांडवल, न॰ सावकारी, इ॰ व्यवहारास साधनत्वें करून त्या त्या व्यवहारकर्त्यानें योजिलें असतें जें द्रव्यादिक तें; २, ला॰ वादयुद्धादिप्रसंगीं त्या त्या व्यवहाराचे निर्वाहास साधनभूत आपले संग्रहास असतें जें लेखपत्र, श्लोकवाक्य, बुद्धीची कल्पना, दारूगोळा, इ॰ तें.

भांडागार, न॰ भांडार.

भांडार, न॰ श्रीमंत लोकांचें द्रव्यादिसंग्रहाचें जें गृह तें.

भांडारगृह, न॰ भांडार.

भांडारी, पु॰ भांडारावर जो अधिकारी केला असतो तो.

भांडें, न॰ धातु, मृत्तिका, काष्ठ, पाषाण, इ॰ कांचें जें पंचपात्र, मडकें, पडगा, द्रोण, इ॰ पात्र तें; २, तोफ; ३, कांहींएक विकृतीनें योनिद्वारा मांसगोलक बाहेर येतो तें.

भाडें, न॰ दुसऱ्याचें घर, भूमि, इ॰ कांचा उपभोग करीत

करीत असतां तन्निमित्त जें त्याधन्यास द्रव्य द्यावें लागतें तें ; २, कांहीं माल, मनुष्य, इ॰ घोडें, मनुष्य, बैल, इ॰ कानीं वाहून ग्रामांतरादि स्थळांतरीं पोंहोचऊन जें द्रव्य घेतात तें ; ३, तसें भाडें कबूल करून माल, मनुष्य, इ॰ स्थळांतरीं पोंहचविण्याचें पतकरून घेतात जें काम तें.

भाडेकरी, पु॰ घोडें, बैल, इ॰ कानें दुसऱ्याचा माल किं॰ मनुष्य, स्थळांतरीं पोंहचविण्याचें भाडें पतकरितो जो मनुष्य तो ; २, पु॰ न॰ दुसऱ्याचे गृहादि स्थळांत भाडें कबूल करून राहिला जो कोणी तो ; ३, ला॰ कोणेक व्यवहारांत जाणें कष्टमात्र करावे परंतु फलोपभोग कर्त्ता किं॰ धनी दुसरा असतो असा जो त्यास म्ह॰.

भाडोत्री, पु॰ भाडेकरी द्वितीयार्थं.

भाण, पु॰ न॰ नाटकासारखी एक काव्यांत जाति आहे.

भाणवशी, स्त्री॰ रा॰ एके लांब फळीस चार पाय लावून नाक इ॰ कांचीं भांडीं ठेवायास साधन केलें असतें ती.

भाणवसा, पु॰ भानवसा.

भाँत, स्त्री॰ बोलणें, चालणें, इ॰ व्यवहारांचा किं॰ कांहीं द्रव्याचा भेदक जो प्रकार ती ; भांतीं भांतीनीं बोलणें, छळणें, इ॰ म्ह॰ अनेक युक्तीनीं अनेक प्रकारानी कडो विकडीनें बोलणें इ॰ ; २, रा॰ फार दाट उंच वाढलेलें, जून झालेलें जें कुसळाचें गवत ती, पण तें जेथें रुजलें तेथें तसेंच असतां म्ह॰

भात, न॰ शालिधान्य ; २, पु॰ तांदूळ शिजवून करितात जो भोज्य पदार्थ तो.

भातकण, न॰ पु॰ साळीचा एक दाणा.

भातकोंडेतोंदूळ, पु॰ रा॰ भात कांडून सद्यः केलेले जे तांदूळ ते.

भातकुली, स्त्री॰ लाहान मुली क्रीडार्थ स्वैंपाक करितात ती.

भातकूण, पु॰ रा॰ भातकण.

भातकें, न॰ रा॰ विवाहामध्यें नवरीकडून फराळाचें सामान नवऱ्याकडे नेतात तें.

भातखाऊ, ३ लिं॰ भातच जामध्यें प्रधान असें नित्यें भोजन करणारे जे त्यांस प्राधान्येकरून भाकर खाणारे जे ते उपहासानें म्ह॰.

भातगोटा, पु॰ भातकण.

भातभोंकण्या, ३ लिं॰ भातखाऊ, म्ह॰ कोंकण्ये आणि भात भोंकण्ये.

भातभोंक्या, ३ लिं॰ भातखाऊ.

भातवडीरुपया, पु॰ अंकुशी रुपयांत एक भेद आहे.

भातशेत, न॰ रा॰ भात व्हावया जोगें जें शेत तें ; २, भात पेरून केलें जें शेत तें.

भातशेती, ३ लिं॰ भातशेत संबंधी जी जमीन, वसूल, लोक, इ॰ ती.

भातळ, ३ लिं॰ कों॰ जींत भात पुष्कळ राहिलें अशी जी भाताची करड तिचें वि॰.

भाता, पु॰ तांबट, लोहार, इ॰ कांचें अग्नीस वारा घालायाचें एक चर्माचें यंत्र आहे ; २, तीरबाळगायाचें शिपाई लोकांचें चर्मपात्र आहे तो ; ३, शिपाई लोक इ॰ भांडेकुंडे इ॰ वाटेचा सरंजाम बाळगायाकरितां जी कातड्याची पिशवी बाळगितात तो ;

४, भाजल्यामुळें जो शरीरावरचा कळपानिघतो तो.

भाँतीभाँतीं, अ॰ भांतो भांतीं.

भाँतीभाँतीचा, २लिं॰ पशीप्रकारचा.

भातुकली, स्त्री॰ भातकुली.

भातुकें, न॰ अं॰ भोजनाहून इतर पीठ, पोहे, लाडू, मेवा, मिठाई, इ॰ भक्ष्य मुळें इ॰ भक्षितात तें; उ॰, सहस्रखंडी नरमांसकाचें हें भातुकें नित्य दशग्रिवाचें.

भातें, न॰ दरमहा करून ठेविलेला जो चाकर इ॰ त्यास दूरदेशीं जाणें इ॰ कांहीं जडकाम करायाचें असतां पोटासाठीं रोजमुऱ्याहून अधिक जें द्रव्य देतात तें; २, सावकार, सर्कार, इ॰ संबंधीं मनुष्य आपलेकडे कांहीं कामाकरितां आलाअसतां त्याचाआपल्याकडून खोळंबा झाला इ॰ कारणामुळें जें त्यास पोटास देतात तें; ३, वांकेरी इ॰ कितीएक औषधींचे कंदांस हें नाव आहे; ४, कों॰ उरीं फुटलेल्या माणसास किंवा गुरास पाजायासाठीं एक औषध करितात तें.

भातेण, न॰ भाताचें तृण तें.

भाँतोभाँतीं, अ॰ तऱ्हेतऱ्हेनें बोलणें, करणें, इ॰ धातूंचें वि॰.

भात्या, पु॰ भाता प्रथमा र्थे.

भात्याण, भात्येण, न॰ रा॰ भातेण.

भादरणी, स्त्री॰ भादरण्याचा व्यापार ती.

भादरणें, चर्मावरील किं॰ केस इ॰ कांचे अंगावरील केशकिं॰ सचंजी इ॰ कांचे अंगावर विणतांना राहतात जे सूक्ष्मांश ते वस्त्रा, कर्ता, इ॰ कानें अंगाबरोबर कापणें, पशीं त्याचर्मादिकांस कर्मतां; २, हजामत करणें याअर्थी डोकीभादरणें, केशभादरणें, इ॰ म॰ निंदाघ्यसरीं करितात.

भादवड, स्त्री॰ भाद्रपदसंबंधी जो काळ ती; उ॰ भादवडींत वांसे तोडले ह्म॰ लागत नाहींत.

भादवडीचा, २लिं॰ भादवडींत तोडलेला जो वांसा, इ॰ काष्ठ, तो.

भादवा, पु॰ भाद्रपद.

भादवातीळ, पु॰ भादव्यामध्यें पिकतो अशीतिळांत एक जाति आहे.

भादवी, २लिं॰ भादवडीचा; २, भाद्रपदसंबंधी जी तिथि इ॰ तो.

भादा, २लिं॰ कों॰ वडविलेला असा जो टोणगा, बैल, इ॰ तो; २, एकदोनवार मसून होऊन निभावलेला केवळ नव्यानेंच प्रसवलेला असा नव्हे जो गोमहिष्यादि जीव तो.

भाद्या, २लिं॰ भादा.

भाद्रपद, पु॰ चैत्रादि बारामासांतील जो साहवा मास तो,

भाद्रपदा, भाद्रपदी, २लिं॰ भाद्रपदसंबंधी जी तिथि, वार, इ॰ तो.

भान, न॰ अंतःकरणाची जागृतपणें जी स्थिति जेणें करून देहास विषयसंबधादि झालेलें समजतें तें; २, जिच्यायोगानें तत्तत्समयीं जेंजें करायाचें जेंजें नकरायाचें तें तत्तद्रूपें करून स्फुरतें अशी जी ज्ञानवृत्ति तें; उ॰, तुम्हाशीं बोलतां बोलतां घरीं भोजनास आण्याचें भान

न राहिलें नाहीं; ३, कोणेक विषयाकडे चित्ताचें जें अनुसंधान असतें तें: ४, शब्द,अनुमानादि साधनानें विषयाचें तत्तदाकार वैशिष्ट्यें करून होतें जें ज्ञान तें.

**भानगड**, स्त्री॰ कोणेक अर्थ जास्थलींचा त्यास्थलीं असला ह्म॰ सोईनें उमज पडत असतां ती सोय न लागाया जोगा इकडचें तिकडे, तिकडचें इकडे, ह्या त्यामुळें कोणेक व्यवहारादिकांत होतो जो गोंधळ ती; उ॰, मी पोथ्या नीट लावून ठेविल्या होत्या या पोरानें काय भानगड केली ती न कळे ती पोथी सांपडत नाहीं; त्यापाशीं दोनशें रुपये कापड घ्यावयास दिले त्याची त्याणें काय भानगड केली न कळे; त्याची आमची दहारुपयांची भानगड पडली आहे.

**भानगडणें**, उ॰, कोणेक अर्थ सोईनें न उमगे अशा भानगडींत पाडणें.

**भानगड्या**, ३लिं॰ भानगड करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**भानवसा**, पु॰ चुलीचा मागें मातीं, चुना, इ॰ कांचा जो ओटा करितात तो.

**भानामती**, स्त्री॰ असावें एक आणि दिसावें एक इ॰ कौतुकें दाखविण्याची एक मंत्रविद्या आहे; २, या विद्येनें खेळ करणारे जे तमासगीर त्यामध्यें या विद्येतें जाणणारी एक स्त्री असत्ये ती; ३, ला॰ दुसऱ्यास फसवायासाठीं आंत असावें एक आणि बाहेर दाखवावें एक असें जें कोण्ही कपट करितो त्यास ह्म॰.

**भानु**, पु॰ सूर्य.

**भानुवार**, पु॰ रविवार.

भानुसप्तमी,

**भानुसप्तमी**, स्त्री॰ रविवारीं पडत्ये जी सप्तमी ती.

**भाँबटया**, पु॰ भामट्या.

**भाँबवणें**, **भाँबावणें**, भय, हर्ष, इ॰ कारणामुळें घाबरून करावें कोणतें, न करावें कोणतें, हा विचार स्फुरे असें भ्रमविशिष्ट होणें; उ॰, चारपैसे मिळाले ह्मणून भांबावून भलतेंच करूं नको.

**भाँब्या**, ३लिं॰ पराकाष्ठेचा विसराळू, आवरशक्ति, दक्षता, कांहीं मात्र नाहीं असा आर्त जो मनुष्य तो.

**भाँभळ**, **भाँभळ्या**, ३लिं॰ कों॰ भांब्या; २, त्याच्या तसा कारभार तो.

**भाँभावणें**, भांबावणें.

**भामटया**, पु॰ दृष्टी चुकावून दुसऱ्याची वस्तु चोरणारा जो तो.

**भाय**, स्त्री॰ कों॰ खांदी.

**भायटी**, स्त्री॰ कों॰ लहान खांदी.

**भायताड**, पु॰ कों॰ जास भाई असतात अशी एक ताडाची जाति आहे.

**भार**, पु॰ पदार्थांचे अंगीं जडता समानाधिकरण असतो जो धर्मविशेष तो ज्याचे योगानें तो पदार्थ निराधार झाला असतां अधोदेशाकडे येतो; २, तो भार ज्याचे अंगीं आहे असा जो पाषाणादि पदार्थ त्यास ही ह्म॰; उ॰, कागद वाऱ्यानें उडतात त्याजवर कांहीं भार ठेव; ३, शैत्यादि विकृतीनें मस्तक इ॰ कांचे ठाईं भारासारखा अनुभूयमान होतो जो विकृतिविशेष तो; उ॰ आज माझे मस्तकास भार चढला आहे; ४, ला॰ आपल्यावर निर्वाह ज्यांचे करून स्थित जो राज्य, संसार, इ॰ कांहीं व्यवहार किंवा प्रतीकार न होतां राहिलेला जो उपकार इ॰ कांहीं

हीं त्याचे योगानें भारवाहकासारखें आपलें मनथ कनें, दबतें, तत्परतंत्र असतें, ह्मणून त्या व्यवरादिकांस भारविशिष्ट पाषाणादि पदार्थासारिखें मानून तत्संबंधी भार असें ह्मणतात आणि त्या व्यवहारादिकांस ही भारत्वेंकरून व्यवहार करितात; ५, रुपयाचे वजना इतकें जें वजन तो; उ०, ही वाटी पंचवीस भार आहे; ६, भारप्रमाणत्वेंकरून विवक्षित जो पैसा, टबू, दगड, इ० कांहींएक तत्तुल्य भार जो कोणेक पदार्थ तो तद्भार; उ० पैसाभार लोणी आणि टबूभार साखर प्रतिदिवशीं खात जा; ७, सं० तुला ह्मणून एक उन्मान आहे त्याचें-वीसपट जें उन्मान तो.

**भारकस**, पु० उंट, हत्ती, इ० कांवर ओझें कसणें एतदर्थ केला असतो जो मोठा सोल तो.

**भारंग**, स्त्री० भार्ङ्गीशब्दाचा अपभ्रंश.

**भारंगमूळ**, न० भारंगीचें जें मूळ तें.

**भारंगी**, स्त्री० भारंग.

**भारणी**, स्त्री० भारण्याचा जो व्यापार ती सर्पादिकांवर भारणी टाकणें ह्म० मंत्रप्रयोग करणें.

**भारणें**, शाबरादिमंत्रानें अक्षता, पाणी, शस्त्र, इ० कांहीं एक अभिमंत्रित करणें; २, मंत्रफलजें मोहवशता इ० तेणें करून कोणेकास अभिसंबद्ध करणें; ३, ला० आपल्या तंत्राबाहेर नवनें असें कोणेकानें गुप्तरूपें भयलाभादिविषयक कांहीं कानमंत्र करून स्ववश करून ठेवणें.

**भारत**, न० एक इतिहासरूप व्यासकृत ग्रंथ आहे २, ला० लांबचलांब जी प्रपंचादिविषयक कोणेक गोष्ट तीस ह्म०.

भारती,

**भारती**, स्त्री० वाणी; २, वाणीची अभिमानिनी देवता जी सरस्वती ती; ३, पु० दशविधगोसाव्यांत एक भेद आहे.

**भारतीवीर**, पु० ला० मोठा कीर्तिमान् आणि युद्धांत कधीं ही पराङ्मुख व्हावयाचा नाहीं असा जो वीर तो.

**भारदस्त**, ३लिं० वजनदार जो मनुष्य तो किं० त्याचें भाषण इ० तो.

**भारदस्ती**, स्त्री० भारदस्तपणा; २, भारदस्तास-ह्म०.

**भारद्वाज**, पु० कुकुडकुंभा ह्मणून एक पक्षी आहे तो.

**भारंभार**, ३लिं० विवक्षित वजनाशीं जो तुल्य तो; उ०, हे रुपये द्यावे आणि भारंभार चांदी घ्यावी; माझे तांब्याचे भारंभार तुझा तांब्या आहे.

**भारवाहक**, पु० ओझें वाहणारा जो गडी, घोडें, उंट, इ० तो; २, ला० जो विद्यादि व्यवहाराचें विनय, धनलाभ, इ० रूप जें फल त्याचा लाभ न सतां उगीच भारप्राय ती विद्या किं० व्यवहार वाळगणारा जो त्यास ह्म०.

**भारशिंग**, न० सांबराचें जें शिंग तें.

**भारा**, पु० डोकीवर वाहून न्यावयाजोगें जें तृण, काष्ठ, पानें, इ० कांचें रचून बांधून केलेलें ओझें तो; २, पालेभाजी, ओलें तृण, इ० कांची बांधलेली जी पेंढी तो.

**भारावणें**, शरीर किं० शरीरावयव ज्ञेत्यादि आंत शिरल्यामुळें आपलें आपणासच जड वाटाया जोगें भारानें विशिष्ट होणें; २, कंगाळ, गांठोडें, इ० जें ओझें तें भिजणें, आंत कांहीं ओझें अधिक

पडणें,

पडणें. इ॰ कारणामुळें पूर्वापेक्षां अधिक जड होणें.

भारी, स्त्री॰ कों॰ लांकडांची जी मोळी ती; २, विद्या, शौर्य, बल, भार, किंमत, इ॰ गुणानीं विवक्षितापेक्षां जो अधिक तो; उ॰, नारायण पंडितापेक्षां हरिपंडित भारी; ३, आलाजाची गांठ पडली असतां निर्वाह करणें अडपडतें तो त्यास; उ॰, हाशिपाई दाहांस भारी आहे; हें काम त्यास कांहीं भारी नाहीं; ४. फार.

भारीपणा, पु॰ थोरपणा, छचारपणा, रूप जो हलकेपणा तत्प्रतिपक्षी जो थोरपणा ह्मणून अंगीं गुण असतो तो.

भारूड, न॰ सांगूं लागलें असतां एकाएकीं संपायाचें नाहा आणि समजोन घेणारास ही एकाएकीं पूर्वापर संधान जुळून आकलन होऊं नये असें जें लांबच लांब सांप्रत झालेलें वर्तमान किं॰ पुरातन कवीनीं बांधलेली कथा, शास्त्र, गोष्ट, इ॰ तें.

भारेभात, न॰ कों॰ उतरणें किं॰ होणें यांचा योगीं प्र॰ अ॰ प्रतिभाऱ्यास अदमण भात उतरावें इ॰ रूप असतो जो प्रायिक नेम त्याप्रमाणें ते भारे झोडले असतां भात उतरणें.

भारोभार, क्रि॰ भारंभार.

भार्गव, पु॰ गुजराथी ब्राह्मणांत एक जाति आहे; २, परशुराम. भार्गवजयंती इ॰ स॰.

भार्ङ्गी, स्त्री॰ सं॰ एक औषधी झाड आहे.

भार्या, स्त्री॰ बाईल.

भाल, स्त्री॰ भाला, बर्ची, सांग, इ॰ कांचे अग्रभागीं जें लोखंडाचें फळ लाविलात ती; २, कों॰ विटीदांडूचे खेळांत दुसऱ्यानें फेंकली जी विटी ती माघारी फिरायासाठीं दांडूनें वरचेवर मारितात जी टोला ती; ३, न॰ सं॰ भाळ.

भालकाठी, स्त्री॰ भाला करायाचे उपयोगीं जी चिवा इ॰ कांची काठी ती.

भाॅलगड, स्त्री॰ रा॰ भानगड.

भाॅलगडणें, रा॰ भानगडणें.

भालगौंजा, पु॰ एक वनस्पति आहे.

भालदार, पु॰ राजादिक जे मुद्राधारी त्यांपाशीं एक सेवक असतो आणें हातीं छडी धारण करून सर्दार, प्रधान, इ॰ कांस बलावणें, ताकीद, इ॰ काम करावें.

भालदारी, स्त्री॰ भालदारपणा.

भालदोरी, स्त्री॰ पिशाचाद्युपद्रव निरसनार्थ मंत्रानें अभिमंत्रित करून जो हस्तादिकांचे ठायीं दोरा बांधितात ती.

भाला, पु॰ चिवा इ॰ कांच्या लांब काठीस अग्रभागीं लोखंडाचें फळ लाउन जें शस्त्र करितात तो ह्म॰ त्यांचावर भाला आणि जे वायास घाला; २, गाईचें दूध काढते वेळेस तिचे मागले पाय बांधायास जी दोरी घेतात तो, भाला घालणें ह्म॰ भाल्यानें गाईचे पाय बांधणें.

भालू, स्त्री॰ वन्यपशु विशेष आहे.

भालेकरी, पु॰ भाला बाळगणारा जो शिपाई तो.

भालेराई, स्त्री॰ भालेराव ह्मणून पुर्वीं कोणी पुंड होता त्याणें केली होती जी पुंडाई ती; २, ला॰ कांहीं कारणानें जास जसें मनास वाटेल तसें वर्तावें अशी होत्ये जी पुंडाई ती.

भाव, पु॰ अंतःकरणाचे जे अनेक वृत्तिभेद तींहीं

करून होतात जे अंतःकरणाचे अनेक स्थितिभेद ते प्र०; उ०, मी त्याला बंधुभावानें पाहतों आणि तो मला शत्रुभावानें पाहतो, मला जो क्रोधभावानें पाहत होता तो आज स्नेहभावानें पाहूं लागला : २, देव, गुरु, औषध, मंत्र, इ० कांच्या ठायीं कोणेकाचा हा ईश्वरच, यापासून माझें बरें होईलच, अतएव सर्वथा याला च सेवावें, इ०रूप किं० यांत काय आहे, याचे सेवनानें कांहीं व्हावयाचें नाहींच नाहीं, किं० वाईटच होईल, इ०रूप अंतःकरणाचा होतो निश्चय तो; उ०, जसा भाव तसें फळ ३, ग्रंथ, भाषण, इ० कांतील जो आशय तो; उ०, या लिहिण्याचा भाव कळत नाहीं : ४, श्लोक वाक्य इ० कांचा सारांशभूत जो अर्थ तो किं० सामान्यतः जो अर्थ तो ; उ०, या श्लोकांतील सर्व पदांचा अर्थ समजला पण भाव काय तो समजला नाहीं; अह्मास प्राकृत श्लोकांचा भाव समजतो परंतु संस्कृत श्लोकांचा भाव कळत नाहीं; ५, शृंगारादि रसांचा अभिव्यंजक जीं स्वेद, रोमांच, इ० लक्षणें होतात ती प्र०; ६, वेश्यादिक जो त्यात्या रसाचा अभिनय करितात तो; ७, कोणेक अर्थाचें जें अस्तित्व तो; उ०, जेथें धनाचा भाव तेथें विद्येचा अभाव असें प्रा० असतें; ८, केवळ धातूचाच वाच्य जो अर्थ तो; उ०, चाल इ० धातूं पुढें णें हा प्रत्यय भावीं होतो; ९, अर्थमात्राचे बोधीं विशेषण ते करून भासत असतो जो त्यावरील धर्म तो; उ०, ब्राह्मणावरील जो भाव तो ब्राह्मणपणा; १०, पदार्थमात्राची उत्पत्ति, नाश, वृद्धि, क्षय, इ०रूप ज्या अनेक अवस्था त्या प्र०; ११, तनु, धन, इ० जे बारा विषय त्यांचे विचार करण्याचीं लग्नकुंडलीगत जीं बारा स्थानें तीं प्र०; १२, कों० बाजार, पेंठ, इ० कांत जिनसपा-

नस, इ० घेण्यादेण्याचा असतो जो दर तो. भाव सोडणें व्रज० अंगात संचरित जें पिशाचादि त्याणें अंगांतून जाणें किं० कोणेकानें मरणें किं० नाश पावणें किं० नाश पावण्याचा किं० मरण्याचा रंगास येणें.

**भावई**, स्त्री० भावयी.

**भावकुंडली**, स्त्री० कोणता ग्रह विचलित झाला हें पहायासाठीं मांडितात जी कुंडली ती.

**भावचलित**, ३लिं० तन्वादि स्थानीं असून अंशें करून चलित झाला जो भान्वादि ग्रह तो.

**भावजई**, स्त्री० भावजय.

**भावजय**, स्त्री० आपले भावाची जी बायको ती आपल्यास.

**भावंड**, न० बहीण किं० भाऊ यांचें सामान्य नाव.

**भावणें**, कोणेक अर्थ हा बरा, हा वाईट, हा गुरु, हा ईश्वर, इ० अशा भावानें मानणें; २, कोणेक पदार्थ किं० कांहीं एक गोष्ट शरीरास किं० अंतःकरणास मानणें; उ०, इथली हवा मला भावत नाहीं, असलीं कुजकीं भाषणें तुह्माला बरीं भावतात.

**भावना**, स्त्री० कोणेक पदार्थास अस्तित्वें करून किं० विवक्षित गुणवैशिष्ट्यें करून मानण्याचा जो अंतःकरण व्यापार ती; उ०, ईश्वरास मूर्ति नाहीं खरी परंतु पूजेसाठीं मूर्ति आहे अशी भावना करावी लागते; हा साधु आहे अशी भावना करून तुह्मी त्याला वंदा; २, वातपित्तादि न्यूनाधिक्यामुळें शरीर प्रकृतीचे जे अवस्थाभेद होतात ते प्र०; ३, भावार्द्र तीयार्थं २ : ४, रसायनादिकांस औषधी रसाचीं पुटें, अग्निपुटें, इ० जे संस्कार करितात ते प्र०; ५, बीजगणितांत

तांत गुणनाचा एक प्रकार आहे याचे अवांतर भेद अंतर्भावना, समासभावना, तुल्यभावना, असे आहेत; ६, कों॰ कोणेक पदार्थाचा जो प्रकृतिस्वभाव तो; उ॰, या अंब्याची भावनाच अशी कीं कोईपाशीं अंबट असावें.

**भावभगत**, स्त्री॰ मनुष्यादि पदार्थांचा किं॰ कांहीं एक गोष्टीचा कांहीं दिवस असतो जो भरभराट ती प्रा॰ तिची अचिरस्थायितावर्णायाची असतां प्र॰ ; २, कों॰ बाजारांतील दरदाम इ॰ संबंधी किं॰ कोणकाचे संसार इ॰ संबंधीं जें अधिक उणें वर्तमान तें.

**भावभक्ति**, स्त्री॰ भावभगत.

**भावयी**, स्त्री॰ ज्येष्ठी अमावास्या.

**भावला**, पु॰ बाहुला.

**भावली**, स्त्री॰ बाहुली.

**भावलें**, न॰ बाहुलें.

**भावशाबल**, न॰ अंतःकरणांत एकच रस पूर्णतांत होतां अनेक शृंगारादि रसांचा जो मिश्रीभाव होतो तें.

**भावसंधि**, पु॰ जो एक शृंगारादि रस हृदयांत होत असतां तो पूर्ण नाहीं झाला तों त्याचा उपमर्द करून दुसरा भयानकादि रस उठतो पुनः त्याचा उपमर्द करून पूर्वींचा शृंगारादि उठतो किं॰ तिसराच उठतो असा जो रस प्रकार तो.

**भावळ**, पु॰ कों॰ अनेक जे भाऊ ते प्रा॰ अनेकवचनांत प्र॰; उ॰, हे घे भावळ रोजगारी आहेत.

**भावा**, पु॰ भ्रताराचा जो वडील भाऊ तो.

**भावार्थ**, पु॰ श्लोकादिकांतील सारांशभूत अर्थ तो ; २, भाव द्वितीयार्थ ; ३, अंतःकरणाचा निष्कपट जो भाव तो प्र॰ ख॰ च सांगणें, बोलणें, इ॰ कांचें वि॰ उ॰, तो भावार्थ गांवास गेल्या मी आपल्यापाशीं खोटें सांगेन?

**भावार्थी**, ३ लिं॰ ज्याचे अंतःकरणांत कपट नाहीं दुसराजें सांगेल बोलेल तें खरें वाटतें अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**भावांचे**, पु॰ कों॰ बाचांचे.

**भावित**, ३ लिं॰ मनानें भावना ज्याची केली किं॰ ज्यास भावना दिली असें औषधादिक तो.

**भावी**, ३ लिं॰ भविष्यकाळीं होणार जें कांहीं तो.

**भावीक**, ३ लिं॰ देव, गुरु, औषध, इ॰ कांपासून बरें होतें इ॰ जें त्याचें माहात्म्य लोक शास्त्रांत सांगतात त्याजवर ज्याचा मनःपूर्वक विश्वास असतो तो

**भावीण**, स्त्री॰ आपला दादला सोडून कोठें देवस्थानी जाऊन देवाचे नंदादीपांतील तेल आपले डोईवर घेऊन देवाची दासी ह्मणवून राहते जी स्त्री ती ; २, रा॰ भावणीचा कांसोटा ह्म॰ धण्याला न पुसतां पाहिजे त्याणें घ्यावा उपभोगावा असा जो वस्तु, पात्र, इ॰ पदार्थ असतो त्याला ह्म॰.

**भावुक**, ३ लिं॰ सं॰ भावीक.

**भावो**, पु॰ भाओ.

**भावोजी**, पु॰ भाओजी.

**भाष**, स्त्री॰ भाक.

**भाषण**, न॰ बोलण्याचा व्यापार तो ; २, तेणें करून वाणीपासून निघतो जो शब्दसमुदाय तें.

**भाषा**, स्त्री॰ बोली प्रथमार्थं.

**भाषांतर**, न॰ एका भाषेनें लिहिलेला जो ग्रंथ इ॰ त्याचा दुसऱ्या भाषेंत जो अर्थ केलेला तें.

भाषित, १लिं० कोणेकानें उक्त जो कांहीएक शब्द किं० अर्थ तो; २, न० कोणेकाची जी उक्ति तें.

भाषी, १लिं० बोलणारा, परंतु प्रा० स० प्र०; उ० मित बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो मितभाषी. अल्पभाषी, बहुभाषी, मधुरभाषी. इ०.

भाष्टाण, स्त्री० भाजलेल्या पदार्थास जो विलक्षण वास येतो ती.

भाष्य, न० कोणेक मूलग्रंथ धरून त्याची व्याख्या करीत असतां व्याख्येंत जे शब्द वाक्यादिक कठिन पडतें त्यांची निर्णय तेथें आरणाच व्याख्या करावी असा प्रकारचा जो व्याख्या ग्रंथ तें.

भास, पु० कोणेक अधिष्टानीं हा अमुकच अशी निश्चयात्मकता पावलेलें नव्हे हा अमुक असेल काय इतकें कांहींएक अर्थाविषयीं होतें जें ज्ञान तो उ०, बाहेर कोणी आला असा मला भास झाला, शरीरांत ज्वराचा भास होतो.

भाँस, स्त्री० कों० भात भरडलें असतां त्याचा कांहीं कणांश, कांहीं तुषांश असें मिश्रित जें बारीक चूर्ण निघतें ती.

भाँसकटणें, कों० गळफटणें.

भाँसकणें, कों० गळफटणें.

भासणें, कोणेकास कोणेक अर्थ भासविषय होणें

भाँसळ, १लिं० कों० भोशानें विशिष्ट जी करड, तांदूळ, इ० तो.

भाँसळणें, कों० करड, तांदूळ, इ० कानीं भांसळ होणें; २, भिसळणें या अर्थी ह्म०.

भास्कर, पु० सूर्य.

भास्करी, स्त्री० भाकरीस ह्म०.

भास्वर, १लिं० प्रकाश ज्याचा पडतो असें जें रूप किं० तद्विशिष्ट अग्नि, सूर्य, हिरा, इ० तो.

भाळ, न० कपाळ प्रथमार्थीं.

भाळणें, कोणेकानें कोणेक विषयाचा मोहानें किं० दुसऱ्यानें केला जो प्रार्थनाद्युपाय तेणें करून तें बरें में वाटून अंतःकरण वृत्तीनें तिकडे वळणें.

भाळी, स्त्री० अनेक कामटींचे तुकडे आडवे मांडून त्यांसमध्यं मध्यें गांथण घेऊन जो साटीसारिखा पदार्थ करितात ती.

भिकटणें, रा० वृक्ष, वृक्षाची खांदी, इ० ओरबडणें.

भिकणी, स्त्री० हांतरुणावर आलेले ढेंकूण दुसरे दिवशीं बाहेर टाकायास सांपडावे ह्मणून आंत ढेंकूण रहाया जोगा छिद्रें पाडलेला जो लांकडाचा तुकडा हांतरुणाजवळ बाळगतात ती.

भिकणें, न० भीक मागून मिळवलेलें जें धान्यादिक तें; २, देणारानें धर्म ह्मणोन दिलें तरच मिळाया चें नाहीं तर घेणाराच्या जोराचा ज्याचा नाहीं असें जें उपाध्या, जोशी, संत, भिक्षुक इ० कांस यजमान इ० कांपासून मिळत असतें तें.

भिकबाळी, स्त्री० भिक्षेनें स्वर्णादि मिळवून त्याचें बाळीसारखें भूषण करून मुलग्याचे उजवे कानांत घालितात ती; २, कोणी भिक्षा न मागतां एरवींच करून शोभार्थ कानांत घालितात ती.

भिकार, न० भिकाऱ्यांचा जो समुदाय तें; २, ला० १लिं० संपत्तिमान् लोक जेथें नाहींत किं० वि

वक्षित वस्तु पाहिजे तेव्हां मिळत नाहीं किं० उत्पन्न होत नाहीं असा जो देश, ग्राम, इ० त्यास ह्म० उ०, येथें भाजी देखील मिळत नाहीं अशा भिकारगावांत कशास राहिलां.

भिकारखोड, स्त्री० भिकारच्याळा.

भिकारच्याळा, पु० वस्त्रें फाटलीं तथापि दंड घालून नेसावीं धातुमय पात्राच्या अनादर करून काष्ट, मृत्तिका यांचींच पात्रें करावीं अध्ययनादि चांगले उद्योग सोडून सोंगटीं इ० खेळावीं इ० शिष्ट संभावित जनास अयोग्य दिसाया जोगी जी खोड कोणेकास लागल्ये ती.

भिकारचोंट, पु० दरिद्र्यास किं० कृपणास निंदेनें ह्म०; २, किमत, बळकटी, पुष्टता, इ० गुणानीं हीन जो पदार्थ त्यास किं० विवक्षित कार्यास पुराया जोगा नव्हे असा जो उणा पदार्थ त्यास निंदेनें ह्म०.

भिकारडा, पु० भिकाऱ्यास निंदेनें ह्म०.

भिकारभोंपळा, पु० कपाळकरंटा जो त्यास ह्म०.

भिकारलक्षण, न० भिकारच्याळा.

भिकारी, पु० भीक मागून पोट भरतो तो; २, भिकारचोंट; ३, दुसऱ्यानें हिताची गोष्ट सांगितली असतां ऐकूं नये, त्या विषयीं पराङ्मुख असावें, ज्या कामांत तोटा, नाश, त्या विषयीं सादर असावें, अशा स्वभावाचा जो मनुष्यादि त्यास ह्म०.

भिकाळ, स्त्री० भिक्षाळ.

भिकुटणें, भिकटणें.

भिकूट, ३लिं० भिचा.

भिकूण, पुं० टेंकूण.



भिंग, न० अरसा, उपनेत्र, इ० करायाचें उपयोगीं पड्यासारखा सपाट जो कांचेचा पदार्थ करितात तें.

भिंगरी, स्त्री० चातीसारखें परंतु आंखूड दांड्याचें एक मुलाचें खेळणें आहे ती; २, भोंवरी ह्मणून वेल आहे; ३, तिचें फळ; कोणेकाचे पायांस भिंगरी असणें ह्म० सारा दिवस फिरत असावें असा स्वभाव असणें.

भिंगोरी, स्त्री० भिंगरी.

भिजकट, ३लिं० थोडेसें भिजलेलें जें लांकूड, गवत, वस्त्र, इ० तो.

भिजका, ३लिं० भिजलेलें जें लांकूड, तृण, वस्त्र, इ० तो त्या भिजलेपणास जेव्हां दोषरूपता आहे तेव्हांच म्ह० प्र०.

भिजणें, श्रु०क० जो काष्ट, भूमि, वस्त्र, पात्र, धान्य, इ० पदार्थ तो, उदक, दुग्ध, इ० सद्रव पदार्थानें ओला होणें, भिजत पडणें ह्म० कोणेक काम तडीस न लागतां लांबणीवर पडणें, याच अर्थी भिजत कांबळें पडणें, भिजत घोंगडें पडणें इ० प्रयोग करितात, कर्ता अन्य असतां भिजत कांबळें घालणें, ठेवणें, इ० प्र०.

भिजवण, न० खरकटीं भांडीं इ० कांस वाळून घट्ट चिकटलेलें जें खरकटें इ० तें भिजून शिथिल व्हावें ह्मणून त्यास भिजलेली माती, राख, इ० जें लावून ठेवितात तें; २, भात, पीठ, इ० भिजवायाचें साधन जें ताक, पाणीं, इ० तें.

भिजाणा, पु० भिजल्यामुळें मृदु झाला जो हरभरा, इ० दाणा तो.

**भिडणें**, कालरूप किं० देशरूप अंतर मध्यें ईषन्मात्र नराहीअसें कोणेकानें कोणेकाचे जवळ येऊनसंबद्ध होणें :उ०,अवकाश होतातों घरनीटकरावें तें केलें नाहीं आतां पावसाळा येऊन भिडलाआतां कसें होईल. दूरबैसअंगाशीं भिडूंनको ;२, स्थळांतरीं पाठवायाकरितां कागद इ० कांचा सिद्ध केला जो लाखोटा. पुडकें. इ० त्यांतच दुसराएकादा मागून समाविष्टकरणें ;उ०, तुह्मी आपले लाखोट्यांतच येवढा माझा कागद भिडून पाठवा.

**भिडती**, पु० रा० भेडत्.

**भिडसरू, भिडसारू**, ३लिं० भिडस्त.

**भिडस्त**, ३लिं० कांहीं एक कर्म करण्यास. किं० बोलण्यास, जाला दुसऱ्याची भारी भीड वाटल्ये तो - किं० दुसऱ्याच्या मुखसंकोच जाला भारी तो.

**भिडावणें**, कोणकानें कोणेकाचे भिडेनें विशिष्ट होणें.

**भिणाभिणणें**, भणभणणें द्वितीयार्थी.

**भिणें**, भीतीनें विशिष्ट होणें, ह्म० भित्यापाठीं ब्रह्मराक्षस.

**भिंत**, स्त्री० गृहादिस्थळास आवरणावें इत्याद्यर्थ दगड, विटा, चुना, माती, इ० कांच्याओरचनाविशेष करितात ती ;२, नेत्रांस कांहीं कारणामुळें जें केवळ आंध्य येतें त्यास ह्म०.

**भितर**, अ० आंत.

**भितरसवाई**, स्त्री० कोणेक व्यवहाराच्याठायीं संभावित असतो जो नफा तो आणी तसउलटीजी नुकसानी होती ती.

भितरा, **भितरा**, ३लिं० भयनिमित्त थोडें असतांही फार जाणें भ्यावें अशास्वभावाचा जो तो.

**भिंतळा**, पु० कों० लांकूड फोडून काढिलेला जो मोठा टलपा तो.

**भिंताड**, न० जिजवर आच्छादन नाहीं अशीजी भिंत तें.

**भिंताळा**, पु० भिंतळा.

**भित्ति**, स्त्री० सं० भिंत प्रथमार्थः.

**भित्रा**, ३लिं० भितरा.

**भिनणें**, शरीर. वस्त्र. इ० पदार्थाचे ठायीं तेल. दूध, जल, इ० पदार्थांनीं स्वरूपतः किं० विष. औषध, इ० कांनीं स्वशक्तिद्वारा सकलावयवावच्छेदें करून व्याप्त होणें :२.ला० दुसऱ्यानें सांगितलेलें जें बरें किं० वाईट तें पुरतेपणीं मनांत ठसणें.

**भिनारणें**, कों० भिनणें.

**भिन्न**, ३लिं० भेदप्रथमार्थानें जो विशिष्ट तो :२. निराळा ;३, फुटका जो पात्रादि पदार्थ तो.

**भिन्नभाव**, पु० दुजाभाव.

**भिंबिरटें**, न० कों० उजाड लागलें ह्मणजे होतें जें संजुक मुंजुकतें.

**भिंभिरकटें, भिंभिरडें**, न० कों० भिंबिरटें.

**भिरकांडी**, स्त्री० झोकांडी :२, ला भावाचून निरर्थक परिभ्रमण त्या, मार, ग्या, इ० धातूयोगीं प्र०.

**भिरकावणें**, झुगारणें.

**भिरड**, स्त्री० क्रोधाच्या आवेश ;२, पु० रोपगा, आंबा. इ० वृक्षांस एक कृमिरूप रोग लागत असतो

काती; उ०, तुला बापाचे देखत बायकोशीं बो लावयास कांहीं भीड वाटत नाहीं, भीडचेपणें स्म० परिचय पडतां पडतां हळूहळू भीड जिंकणें; भिडेच्या स्म० जाणें कांहींएक गोष्टीविषयीं भीड यातली असतां सहसा मोडवत नाहीं ती; ३, अल्प अवकाशांत बहुत पदार्थ समाविष्ट झाल्यामुळें होत्ये जी दाटी ती; उ०, आज देवळांत मनुष्यांची फार भीड झाली उभें रहायास जागा सांपडेना.

**भीडभाड**, स्त्री० भीड, मुखसंकोच, इ० ती.

**भीडमुरवत**, स्त्री० भीडभाड.

**भीत**, ३ लिं० भयपावला तो.

**भीतरीं, भीतरी**, अ० भितर.

**भीति**, स्त्री० भय; प्रा० प्रथमार्थ३, प्र०.

**भीम**, ३ लिं० भयंकर; २, पु० भीमसेन.

**भीमसेन**, पु० एक पुराणप्रसिद्ध बलाढ्य राजा होता; २, ला० शरीरानें धष्टपुष्ट बळकट त्याणेंही बहुत असा जो पुरुष त्यास स्म०.

**भीमसेनी कापूर**, पु० कापुरांत एक भेद आहे

**भीषण**, ३ लिं० भयंकर.

**भीष्म**, पु० मोठा योद्धा, ब्रह्मचारी, सत्यप्रतिज्ञ, प्रौढ, असा पुराणप्रसिद्ध एक क्षत्रिय होता-तो; २, ला० बुद्धीनें गंभीर, सत्यप्रतिज्ञ, इंद्रिय निग्रही, शूर, असा जो पुरुष त्यास स्म०; ३, टेंकणास स्म०.

**भीष्मप्रतिज्ञा**, स्त्री० कधींहीं टळायाची नाहीं अशी कोणी केली जी प्रतिज्ञा ती.

**भींस**, स्त्री० रा० हजामत न केल्यामुळें मुठींत सांपडायाजोगे वाटतात जे केश ते; २, कुत्रा, शेळी, मेंढा, इ० कांचे अंगावर मुठींत धरायास सांपडे इतकी मोठी असत्ये जी लोंकर ती.

**भुइकोट, भुईकोट**, पु० पर्वताचा आश्रय न सतां भुईवरच तट बांधून करितात जो किल्ला तो.

**भुइकोव्हाळा, भुइकोहळा, भुइकोहाळा, भुइकोहोळा**, पु० एक अरण्य औषधीचा-कंद आहे.

**भुइकोंव्हाळा, भुइकोंहळा, भुइकोंहाळा, भुइकोंहोळा**, पु० भुइकोव्हाळा.

**भुईकोंव्हाळा, भुईकोंहळा, भुईकोंहाळा, भुईकोंहोळा**, पु० भुइकोव्हाळा.

**भुईकोव्हाळा, भुईकोहळा, भुईकोहाळा, भुईकोहोळा**, पु० भुइकोव्हाळा.

**भुइकोव्हाळी, भुइकोहळी, भुइकोहाळी, भुइकोहोळी**, स्त्री० भुइकोहळ्याची वेल ती.

**भुइकोंव्हाळी, भुइकोंहळी, भुइकोंहाळी, भुइकोंहोळी**, स्त्री० भुइकोव्हाळी.

**भुईकोंव्हाळी, भुईकोंहळी, भुईकोंहाळी, भुईकोंहोळी**, स्त्री० भुइकोव्हाळी.

**भुईकोव्हाळी, भुईकोहळी, भुईकोहाळी, भुईकोहोळी**, स्त्री० भुइकोव्हाळी.

**भुइकोहळें, भुइकोहाळें**, न० भुइकोहळा.

**भुइचांपा, भुइचांफा, भुईचांपा, भुईचांफा**, पु० पानें फुटायाचे अधीं भुईतून जाला फुलें येतात असें एक फुलझाड आहे.

**भुईचार**, स्त्री० रा० ओलें गुरें इ० कानीं भक्षायाचें

याचें तृण तो.

**भुइँठाकूर**, पु० रा० केवळ खुजा जो मनुष्यादि-त्यास ह्म०.

**भुइतरवड**, पु० एक औषधी झाड आहे ज्याचे पाल्यास सोनामुखी ह्मणतात तो.

**भुइनळा**, पु० मुईवर ठेऊन लावायाचा असा दारु भरून नळा करितात तो.

**भुइपारणें** न० पात्रावांचून भूमीवरच अन्नादि वाढून भोजन करावें असें जें कोणी चातुर्मास्यादिकांत व्रत करितात तें.

**भुइभाडें**, न० दुसऱ्याचे भूमीवर गृह इ० बांधिलें असतां तन्निमित्त जें भूमीचे धन्यास भाडें प्रतिवर्षी द्यावें लागतें तें.

**भुइमाडा**, पु० कों० आपल्या आपण बीज पडून रुजला जो माडा तो.

**भुइँमूग**, **भुइमुग**, पु० ज्याला भुईंतच मुळ्यांस शेंगा लागतात असा एक वेल आहे.

**भुइँसर्पट**, **भुइसर्पटा**, अ० कों० भूमीशीं सर्पटत असे असें भूमीपासून उंच असावी-जी वृक्षाची खांदी, घराचें पाखें, इ० त्यांचें जें भूमीबराबर असणें किं० तीर, गोळी, इ० कांचें जाणें इ० कांचें वि०.

**भुइँसांड**, **भुइसांड**, ३लिं० रा० जमीनसांड

**भुई**, **भुंई**, स्त्री० जमीन.

**भुक्**, ३लिं० जातें जो भोगणारा किं० भक्षिणारा तो तद्भुक्; उ०, पृथ्वीतें भोगितो तो पृथ्वीभुक्, राजा, दासीभुक् ह्म० दासीतें भोगणारा, वायूतें भक्षणारा तो वायूभुक् सर्प, आखु भुक्, भुजंगभुक्, इ० समासीं प्र०.

**भुकटी**, **भुकणी**, स्त्री० बुकणी.

**भुँकणें**, कुत्र्यानें आवेशपूर्वक ओरडणें.

**भुका**. पु० भुकणी.

**भुकाळू**, ३लिं० क्षुधा जाला वरचेवर लागत्ये आणि लागली असतां कंठवत नाहीं अशा स्वभावाचा जो तो.

**भुकिस्त**, ३लिं० भुकेबंगाल.

**भुकी**, स्त्री० बुकणी; २, ईषन्मात्र क्षुधा राखून जेवितां तो; ह्म० भुकी तो स्करवी, प्रा० या ह्मणींतच प्र०.

**भुकेकंगाल**, ३लिं० भुकेबंगाल.

**भुकेणें**, भुकेनें विशिष्ट होणें; २, ला० कोणे कपदार्थाविषयीं आशा सयेणें; उ०, मी त्याचे भेटीविषयीं भुकेलों आहे.

**भुकेबंगाल**, ३लिं० खावयास मिळणें ही ज्याला कठीण असा जो परकाष्ठेचा दरिद्री तो.

**भुकेला**, ३लिं० क्षुधित; २, ज्या विषयावर ज्याची सर्वभावें प्रीति तो त्याविषयीं.

**भुक्त**, ३लिं० भोगिला किं० भक्षिला जो पदार्थ इ० तो.

**भुक्ति**, स्त्री० भोजनव्यापार; २, सूर्यादिग्रह, चक्र, काळ, यांची जी गति ती.

**भुगा**, पु० बुकणी.

**भुंगा**, पु० भ्रमर; २, स्त्रियांचें तदाकार शिरोभूषण असतें तो.

**भुगी**, स्त्री० बुकणी.

**भुज**, पु० बाहुल्यापासून अंगुल्यग्रपर्यंत जो.

जो हात तो; २, चतुष्कोण, त्रिकोण, इ॰ जीं क्षेत्रें त्यांचीं एकेकोणापासून दुसरे कोणापावेतों जीं सूत्रें तीं प्र॰; ३, राशिचक्रामध्यें नव्वद अंशांहून न्यून किं॰ पराकाष्टा नव्वद अंश जें प्रमाण तो.

भुजंग, पु॰ ज्याचे शिरीं दशांक चिन्ह असतें असा जो सर्प तो प्रा॰ मोठा असतां ह्म॰.

भुजणें, क्रि॰ भाजणें, शूद्र भाषेंत प्र॰.

भुजपत्र, न॰ भूर्जपत्र; २, ला॰ फार पातळपणामुळें किं॰ केवळ जुनें झाल्यामुळें जें निर्जीव वस्त्र, कागद. इ॰ त्यास ह्म॰.

भुजबल, न॰ सं॰ बाहुबल.

भुजा, स्त्री॰ ग्रं॰ भुज.

भुजारी, भुंजारी, पु॰ भडभुंजा.

भुजिपत्र, न॰ भुजपत्र.

भुटा, भुट्टा, पु॰ मक्याचें कणीस.

भुटेचोर, भुट्टेचोर, पु॰ जो प्रसिद्धपणें दरवाडा घालीत नाहीं घरचे मनुष्यांची असावधता लक्षून हळूच युक्तीनें लहान सान वस्तु चोरून नेतो असा जो चोर तो; २, ला॰ यजमानाचे संसाराची पोटा गजांस नाहीं तोंडावर गोड बोलून आपलें कार्य साधावें असे मिळाले असतात जे भोजनभाऊ त्यांस ह्म॰.

भुडकी, स्त्री॰ बुडकी प्रथमार्थं.

भुडभूड, अ॰ अनु॰ शब्द होई असें ओंवळगळ्याचे पात्रांत पाणी भरणें किं॰ त्यांतून ओतणें इ॰ कांचें वि॰.

भुंडा, १ लिं॰ माघारीं मुरडलीं आहेत शृंगें ज्याचीं असा जो गोमहिष्यादि पशु तो; २, बोडका द्वितीयार्थं.

भुतखान, न॰ रा॰ केंस टयामोकळ्या सुटलेल्या, राख, धूळ, इ॰ कांनीं अंगजावें मळलेलें, असें उच्छृंखल, विद्रूप, जें पोर इ॰ त्यास ह्म॰.

भुतखाना, पु॰ अनेक पिशाचांनीं अधिष्ठित जें स्थल तो; २, दुसऱ्याचे मानेस बसावें, दुसऱ्यास उपद्रव करावा. इ॰ रूप जो पिशाचसंबंधी व्यवहार तो; उठणें माजणें इ॰ कांचे योगीं प्र॰ उ॰ जिकडे तिकडे भुतखाना उठला आहे दुपारची बाहेर जाऊं नको; ३, भुतखान.

भुता, रा॰ पु॰ भुत्या.

भुताटकी, स्त्री॰ कोणाचें वाईट करण्याविषयीं किं॰ बरें करण्याविषयीं भुतास कांहीं देऊं करून त्याजवर उठवावें किं॰ बसवावें इ॰ रूप जो भूतसंबंधी व्यवहार तो.

भुताटणें, मनुष्यादिकानें क्रोधादिकामुळें भूत आंगी आल्यासारखें अनावरपणें चाळे करूं लागणें; उ॰, या गाईनें काल चांगलें दूध दिलें आज कां भुताटली न कळे हात लावूं देत नाहीं. वांसराला ही जवळ येवूं देत नाहीं.

भुतारणें, रा॰ भुताटणें.

भुतावळ, स्त्री॰ पिशाचांचा जो समुदाय तो; ह्म॰ वेताळाचे मागें भुतावळ आहेच.

भुतावळें, न॰ दारूचा अनेक चिंधुंद्या. तोटे, इ॰ एकत्र भुईवर मांडून त्याजवर थोडी

शी दारूघालून एकदांच पेटवितात त्यास्चना विशेषासस्र०.

**भुताळा, भुताळ्या**, ३लिं० दुसऱ्याचा नाश व्हावाह्मणून त्याजवर भुतें घालितो तो.

**भुत्या**, पु० अंगावर कवड्यांची भूषणें, तेलकटवस्त्रें, हातांत पोतधारणकरून भीकमागणारा असा भवानीच्या भक्त आहे तो.

**भुदकन, कर, दिशीं**, बुदकन.

**भुदगा**, पु०रा० भाजी, भांडें, इ० कांचा करपल्यामुळें राखुंडीसारखा होतोजो परिणाम तो.

**भुपकार**, पु०भुभुःकार.

**भुपाळी**, स्त्री० भूपाळी.

**भुभुःकार**, पु० वानरांच्याजोउत्साहाचा शब्द तो.

**भुभुक्षित**, ३लिं० बुभुक्षिताचा अपभ्रंश.

**भुमका**, स्त्री०रा० ग्रामाभिमानिनी.जी भूरूपदेवता ती.

**भुमखान**, न०रा० टोळ, गोचीड, चांचड, भिकार, इ० कांचा एकदांच अतिरिक्तपणें प्रवृत्तहोतोजो समुदाय तें, उठणें धातुयोगीं प्र०.

**भुम्या**, पु० आठिकाणी ज्याचे वाडवडील नांदत आले तो त्याठिकाणचा; २, ला० कोणेकस्थलाचा किं० कांहींएक व्यवहाराच्या बहुतपरिचयामुळें पुरा माहितगार झालेलाजो त्यास स्र०.

**भुयार**, न० पर्वतादिकांत भुईचेपोटीं असले जी गुहेसारखी पोकळजागा तें किं० गृहादिकांचे भूमीचे पोटीं कांहींवस्तु ठेवायाकरितां जी होदासारखी बांधूनजागा केली असल्ये तें.

**भुरकट**, ३लिं० इषत्भुरका जोवर्ण तो आणि तद्विशिष्टजो तो; २, अ० स्वच्छपणें नव्हे असें दृष्टिदोष, अंधकार, किं० दूरस्थितत्व इ० कारणामुळें अंधक अंधक दिसण्याचें वि०.

**भुरकणं**, न०रा० व्याघ्राच्या शब्द; २, रडण्याचा वेगबलानें जोआटोपून धरिला असतो तोअकस्मात् बाहेरपडल्यामुळें जो मोठा शब्दहोतो तें.

**भुरकणें**, कढी, खीर, इ० पातळपदार्थ भुरकामारीत खाणें; २, रा० व्याघ्रानें स्वजातीय शब्दकरणें; ३, न० केवळ कोवळें अंशाहाळें तें.

**भुरकन, कर, दिशीं**, अ० भरकन प्रथमार्थ.

**भुरका**, पु० कढी, खीर, इ० पातळपदार्थाचें हस्त, चमच्या. इ० कांपासून शब्दहोईअसें मुखानें जें आकर्षण तो, मार, घे, धातुयोगीं प्र०; २, भगवतीद्वितीयार्थ; ३, संकेतानें एकजो रुपया त्यास स्र०; ४, ३लिं० एक वर्णआहे; ५, तद्विशिष्टजें जल, केश. इ० तो.

**भुरकाड**, न० दे० जेथें पाणी टिकत नाहीं अशी जीमाळजमीन तें.

**भुरकाडी**, स्त्री० दे० कावळकाठी प्रा०अनेकवचनांत प्र०

भुरकी, स्त्री० घोड्याचे नेत्रादि सर्वांग झाकाया जोगें जें शिंवून आच्छादन वस्त्र केलें असतें तें.

भुरँगुली, स्त्री० भुरँगुलैं, न० कों० भात, इ० कांची लाही.

भुरदंड, पु० दुसऱ्याचा कांहीं जिन्नस आपणापासून हारवला किं० जामीनगत, इ० व्यवहार कांहीं अंगास आला इ० कारणामुळें नाहक जें द्रव्यादि भरावें लागतें तो.

भुरभुरा, ३ लिं० भुरभुरीत.

भुरभुरीत, ३ लिं० भुरभुर जळायाजोगें हलकें जें लांकूड, गोंवरी, तृण, इ० तो.

भुरभूर, अ० अनु० हलका, तत्वांशरहित, जो तृण, काष्ट, इ० पदार्थ त्याचें जें झराझर जळणें त्याचें वि०२; एकत्र जमलेल्या मनुष्यांनीं अकस्मात् तळ मोकळा पडायाजोगें एकाचे मागून दुसरा निघाला, दुसऱ्याचे मागून तिसरा निघाला, अशाप्रकारें अन्यत्र जाण्याचें किं० कोणेक तळ भरला जावयाजोगें अन्यस्थलापासून तादृश येण्याचें वि०; उ०, पत्रावळीचा फड मांडतांच भोजन भाऊ भुरभूर निघोन गेले आणि पात्रें माडतांच भुरभूर जमले- काय सांगावें.

भुरली, स्त्री० रा० एक चिमणीसारखें परंतु मोठें असें पांखरूं आहे ती.

भुरलें, न० कों० भात बहुत दिवस ठेविलें असतां आंत सपक्ष क्षुद्र प्राणी उत्पन्न होतो तें.

भुरवणें, न० कों० जमीन चोपायाचें मोठें जें चोपणें तें.

भुरशी, स्त्री० कों० बुरशी२; भूयसीचा अपभ्रंश.

भुरळणें, छिद्र मोठें होण्यासाठीं आंत खिळा इ० घालून त्याचे फिरविण्यानें भोंताल च्या परिधि घांसणें.

भुरळ, स्त्री० भुरळें.

भुरळैं, न० कोणी आपल्यावर मंत्रप्रयोग किं० गोडगोड भाषण, आर्जव, इ० केल्यामुळें केवळ तत्परवश व्हावें असा पडतो जो मोह तें.

भुरा, ३ लिं० कों० भोरा.

भुरी, स्त्री० कों० लांकूड, गोंवरी, इ० कांची सफेत राख ती.

भुरुभुरू, अ० भुरभूर.

भुऱ्यावणें, रा० हुरळणें.

भुऱ्योभुऱ्यो, अ० रा० करणें धातुयोगीं प० भुऱ्यावणें.

भुलणें, कैफ, संपत्ति, इ० कांचा योगानें बेशुद्ध होणें; २, कांहीं पदार्थ चांगला असा वाटल्यामुळें कर्तव्याकर्तव्यादिविचार सुटून त्याजवर केवळ लुब्ध होणें.

भुलताप, भुलथाप, स्त्री० दुसऱ्यास निश्चय आपलें कार्य होईल इ०रूप भरंवसा यावयाजोगा कोणी करता जो खोटें भाषण, खोटा लेख, इ०रूप कपटाचारती, देणें धातुयोगीं प०; उ०, तुह्मी पुढें चालूं लागा ह्मी आलों अशी मला भुलथाप देऊन निघोन गेला.

ला.

**भुलवण**, स्त्री॰ रा॰ भुरळ.

**भुँवई**, स्त्री॰ भंवई.

**भुवन**, न॰ भूलोकादि चतुर्दश किं॰ वैकुंठ, कैलास, इ॰ जे देवतांचे जे पृथक् पृथक् अनेक लोक आहेत ते प्र॰, इंद्रभुवन, कैलासभुवन इ॰ स॰.

**भुँशी**, स्त्री॰ कों॰ भुसकट.

**भुँसकट, भुसकट**, न॰ धान्यराशींत त्याचेंच अंशाचें बारीक असतें जें चूर्ण तें तेथून पृथक् केलें असतांही प्र॰ होतो; २, तत्सदृश काष्ठ, तृण, इ॰ कांचें परस्पर घर्षण, किडा, भुंगा, इ॰ कानीं कोरणें इ॰ कारणामुळें पडतें जें चूर्ण तें.

**भुसकटा**, पु॰ कों॰ भुसकट.

**भुसकण, कन, कर, दिन, दिनी, दिशीं**, अ॰ अनु॰ बसविलेला सांधा किं॰ छिद्रांत बसविलेली खुंटी इ॰ विशेष बळ न लागतां झपकण निघणें किं॰ छिद्र इ॰ अडचणीचे जाग्यांत विशेष प्रयास न लागतां कोणे कानें झपकन शिरणें इ॰ कांचें वि॰.

**भुँसकूट, भुसकूट**, न॰ भुसकट.

**भुसडा**, पु॰ बहुत घुसडल्यामुळें किं॰ बहुत श्रम पडल्यामुळें शरीर, वस्त्र, इ॰ कांचा चुरा झालासा वाटायाजोगा होतो जो जर्जरपणा तो, पडणें धातुयोगीं प्र॰.

**भुसभुशीत**, ३ लिं॰ ज्यामध्यें चिक्कणता, काठिण्यांश, नाहीं असा जो जमीन, माती, ढगड, इ॰ पदार्थ तो.

**भुँसा, भुसा**, पु॰ भुसकट; २, भुसडा.

**भुसाडा**, पु॰ भुसडा.

**भुँसार, भुसार**, न॰ क्रयविक्रय व्यवहारीं धान्य, आणि तृण, एतद्रूप जो माल तें; २, भुसारी लोकांचा जो समुदाय तें.

**भुसारमाप**, न॰ अधोली, पायली, इ॰ जें मापायाचें साधन तें भरलें भरलें नाहीं अशा प्रकारें कोणी धान्याचें घालितो जें माप तें.

**भुसारी**, पु॰ धान्याचें दुकान घालून किरकोळ धान्य विकणारा जो उदमी तो; २, कों॰ भोंवरगांवीं धान्य खरेदी करून पेंठेंत नेऊन विकतो किं॰ भात, तुरी, इ॰ धान्य विकत घेऊन त्याचें तांदूळ, डाळ, इ॰ करून विकीत असतो असा जो उदमी तो; ३, कांदा, लसूण, गूळ, तूप, इ॰ अनेक किरकोळ जिनसाचें दुकान घालून विकणारा जो उदमी तो.

**भुळभुळां**, अ॰ साखर, माती, वाळू, इ॰ शिथिल होऊन वाहणें, गळणें, इ॰ कांचें वि॰; २, भिळभीळ.

**भुळभूळ**, अ॰ भुळभुळां.

**भू**, स्त्री॰ सं॰ पृथ्वी; भूपति, भूलोक, भूचर, भूदान, इ॰ स॰; २, जापासून जो उत्पन्न झाला जो तद्; उ॰, अग्नीपासून उत्पन्न तें अग्निभू स्वर्ण, पद्मभू ब्रह्मा, मनोभू काम, इ॰.

**भूक**, स्त्री॰ जठराग्नीस आंत पचन करायास कांहीं अन्नादि नाहींसें झाल्यामुळें अन्नादि भक्षा

वें

वें से वाटायाजोगा जो दुःखरूप कल्पनाविशेष उत्पन्न होतो ती; २, उा॰ कोणेकपदार्थ येणें मिळविणें इ॰ विषयीं इतका, किं॰ एवढा, मिळाला ह्मणजे मलापुरे अशी कोणेक अवधि पर्यंत असल्येजी इच्छेची धांव ती; ३लिं॰ भुकेचा मोटला; पु॰ भूक लागली असतां ज्याच्यानें कंठवत नाहीं तो, ह्म॰, भुकेस कोंडा आणि निद्रेस धोंडा, भुकेंमरणें ह्म॰ उपाशीं मरणें.

भूकंप, पु॰ धरणीकंप.

भूकलाडू, पु॰ प्रवासाचे मार्गीं क्षुधानिवारणार्थ जे लाडू इ॰ फराळाचें घेतात ते या चा गोष्ठ इ॰ कांमध्यें प्र॰; उ॰, तो राजपुत्र भूकलाडू, ताव्हलाडू आईनें दिले ते घेऊन परदेशास निघाला.

भूगोल, भूगोळ, पु॰ पृथ्वीरूप जो हा गोळा आहे तो.

भूज, स्त्री॰ भुज प्रथमार्थीं.

भूत, पु॰ देवयोन्यंतर्गत एक जातिविशेष आहे; २, न॰ पिशाच द्वितीय तृतीयार्थीं: ३, पृथ्वी, उदक, तेज, वायु, आकाश, हीं प्र॰; ४, विश्वांतःपाती जे चेतनाचेतन सर्वपदार्थ ते प्र॰; उ॰, सर्व भूतीं ईश्वर भरला आहे; ५, दुफोशी सोंगट्याचे खेळांत उठून गेलेली सोंगटी पुनः जी जिवंत होत्ये तें; ६, ३लिं॰ पूर्वीं होऊन गेलेला जो काळ तो किं॰ त्या काळच्या व्यवहार, गोष्ठ, इ॰ तो; उ॰, गेला एथें लाप्रत्ययांत क्रियेनें भूतकाळाचा बोध होतो; उ॰, भूतगोष्टी कशास सांगतां आतां करून दाखवाल तर मौज; ७, यदात्मलें करून जो विवक्षिला तो तद्भूत; उ॰, कार्याचे उपादान भूत द्रव्याचे अंगीं जे जे गुण असतात ते ते कार्यावर अनुवृत्त होतात.

भूतखेत, न॰ संबंध, झोटिंग, इ॰ तें.

भूतचेष्टा, स्त्री॰ मनुष्यादिकांस शारीर बाधा व्हावी, अंतःकरणास भ्रम व्हावा, ठेवल्या जाग्यावरून पदार्थ अकस्मात् नाहींसा व्हावा, नासावा, इ॰ होण्याविषयीं कारणीभूत जी त्या त्या कार्यावरून अनुमेय पिशाचाची कृति ती.

भूतदया, स्त्री॰ प्राणिमात्रावर जी दया ती.

भूतपूर्व, ३लिं॰ विद्यमानकाळीं विवक्षित स्वरूप नव्हे परंतु पूर्वीं विवक्षित स्वरूप होता जो तो; उ॰, सांप्रत तुमची फडणिशी गेली परंतु फडणीस असें भूतपूर्व नाव चालतें आहे.

भूतप्रेत, न॰ भूतखेत.

भूतबाधा, स्त्री॰ मनुष्यादिकांस भूतकृत जी बाधा ती.

भूतल, भूतळ, न॰ पृथ्वीची पाठ.

भूतवैद्य, पु॰ देवभक्त्या.

भूतसृष्टि, स्त्री॰ वस्तुतः ते ते पदार्थ नसतां कोणेक पिशाच आपले सामर्थ्यानें ग्राम, हत्ती, घोडे, बाजार, इ॰ कितीएक पदार्थ जे क्षणमात्र दाखवितो ती; २, या सृष्टींतील पिशाचें ह्मणून जें एक प्रकरण ती; ३, पंचमहाभूतांची किं॰ त्यापासून मनुष्यादि देहाची जी ईश्वरानें केली उत्पत्ति ती; ४, भूतचेष्टेनें अकस्मात् अतिरिक्त उत्पन्न होतें आणि तसेंच अकस्मात् नाश पावतें असें जें गोचीड, पिसू, इ॰ कांहीं त्यास ह्म॰.

भूदेव, पु॰ ब्राह्मण.

भूधर,

भूधर, पु॰ पर्वत; २, शेषह्मणून सर्प तो.

भूप, पु॰ राजा; २, भूपकल्याण.

भूपकल्याण, पु॰ कल्याणरागामध्यें एक भेद आहे.

भूपाल, भूपाळ, पु॰ राजा.

भूपाळी, स्त्री॰ एक रागिणी आहे; २, त्यारागावर पहांटेस ह्मणायाचीं गाणीं असतात तीं प्र॰.

भूभा, स्त्री॰ भूमीची छाया ती जी चंद्रावर पडली असतां चंद्रास ग्रहण लागतें.

भूभार, पु॰ पातकीजन बहुत झाले असतां त्यांचा या भूदेवतेस होतो जो भार तो.

भूमंडल, न॰ पृथ्वीचें जें हें गोलाकार शरीर तें.

भूमि, स्त्री॰ पृथ्वी; २, भुई.

भूमिका, स्त्री॰ सं॰ भूमि; २, नाटकामध्यें राजादिकांचीं येतात जीं सोंगें तीं प्र॰; ३, कर्मयोग इ॰ जे भगवत्प्राप्तीचे मार्ग त्यामध्यें उत्तरोत्तर चढत्या जा अधिकार पदवी आहेत त्या प्र॰; उ॰, आपण या कर्म भूमिकेंत आहों तोंपर्यंत सर्व कर्म केलें पाहिजे.

भूमिशयन, न॰ भूमिशय्या, स्त्री॰ खाटलें, पलंग, माचा, इ॰ कावांचून केवळ भूमीवरच जें करितात शयन तें तो कंबलादि अल्पस्वल्प आस्तरण असतां हा प्र॰ होतो.

भूय, स्त्री॰ भुई.

भूयसी, स्त्री॰ पुण्याहवाचनादि कर्म केले असतां तत्सांगतार्थ एकदांच उत्सर्ग करून अनेकब्राह्मणास जी दक्षणा वांटितात ती.

भूर, स्त्री॰ कों॰ नेत्राचे बुबुळावर येतो जो सारा-ती.



भूर्ज, पु॰ एक वृक्ष आहे.

भूर्जपत्र, न॰ भूर्जवृक्षाची कागदासारखी जी साल नियत असत्ये तें.

भूल, स्त्री॰ मादक पदार्थाचा मद चढल्यामुळें अंतःकरणास येतो जो वेशुद्धपणा तो; २, कोणेक प्रसंगीं बरे कोणतें, वाईट कोणतें, करावें कोणतें, नकरावें कोणतें, इ॰ विचार नस्फुरतां अन्यथा प्रवृत्तिनिवृत्ति व्हावयाजोगें बुद्धीवर पडतें जें अज्ञानाचें आच्छादन तो, घाल, पड, इ॰ कांचे योगीं प्र॰.

भूलोक, पु॰ भूमिरूप जो हा लोक तो.

भूषण, न॰ शोभार्थ शरीरादिकांचाठायीं धारण करितात जो सुवर्णरत्नादिनिर्मित अलंकार तो; २, जें लोकामध्यें स्वतः शोभतें आणि स्वसंबंधी जो त्यासही शोभवितें, प्रतिष्ठेस चढवितें, अतएव भूषण सदृश मानले जें विद्या, कला, विनय, इ॰ गुण, पराक्रमादिक र्म, इ॰ जें कांहीं एक त्यास ह्म॰; उ॰, विद्या हें पुरुषाचें भूषण आहे; पुत्राचा पराक्रम मातापितरांस भूषण होतें; ३, त्याविद्यादिभूषणानें येतें जें भूषितत्व तें; उ॰, तुह्मास लोकानी चांगलें ह्मटलें असतां तेणें करून आह्मास भूषण आहे; ४, ग्रंथ, वाक्य, इ॰ कांचा विवक्षित गुणाचा आधानानें कोणी करितो जें मंडन तें; उ॰, सज्जनापुढें कसें हा वाक्य बोललें असतां तो त्याचें भूषण करितो.

भूषविणें, कांहींएक अर्थ अलंकारादिकें करून सुशोभित करणें.

भूषा, स्त्री० सं० भूषण.

भूषित, ३लिं० भूषविला तो.

भूस, भूँस, न० भुसकट ;२, भुसडा ;३, भसा रप्रथमार्थं.

भृकुटी, स्त्री० भ्रूमध्यांत क्रोधादिकारणामुळें पडत्येजी आटी ती ;२, भिवईस कोणी ह्म०.

भृंग, पु० भ्रमर.

भृंगराज, पु० माका ह्मणून औषधी आहे ती.

भृंगिराज, पु० भृंगराजाचा अपभ्रंश, कोणेकानें भृंगिराज होणें ह्म० एकपिसानें मोर होणें.

भृंगी, भृंगा, स्त्री० ज्ञानवल्ली.

भृगु, पु० सं० ऋक्षप्रथमार्थं ;२, पर्वतादिकांचा उंचतुटलेला जो कडा तो.

भृगुपात, पु० सं० डोंगरावरून करून घेतातजो कडेलोट तो.

भृगुवार, पु० शुक्रवार.

भृति, स्त्री० सं० वेतन.

भृत्य, पु० चाकर.

भें, न० भय.

भेंकड, ३लिं० भित्रा.

भेंकर, भेंकरें. न० एकमृगविशेषआहे.

भेंकाड, न० कों० भोंकाड.

भेंकूड, ३लिं० भेंकड.

भेग, स्त्री० भूमी, काष्ट, पाषाण, पाय, हात, इ० कांसपडत्येजी चीर ती.

भेगलणें, भूम्यादिकांनीं भेगानी विशिष्ट होणें.

भेजूड, ३लिं० कों० चौघांत बोलायास चालायास जाला धैर्य नाहीं तो.

भेट, स्त्री० गमनानें कोणेकाचा कोणेकापाशीं परस्पर बोलणें, चालणें, इ० व्हावयाजोगा होतो जो सामीप्य संबंध तो ; प्रा० चेतनवृत्ति. अचेतन विषयीं कचित् प्र० होतो ; उ०, लोहचुंबकाची आणि लोखंडाची भेट झाली ह्मणजे लोखंड त्यास चिकटतें ;२, भिन्न भिन्न दिकांची चिरकालें करून गांठ पडली असतां परस्पर देतात जें आलिंगन तो ;३, प्रभु सुभेदार इ० कांस भेटावयास गेलें असतां भेटतेसमयीं जें फळ, द्रव्य, वस्त्र, यान इ० कांहीं अर्पितात तो किं० प्रभु, शिष्ट, मित्र, आप्त, इ० कांस स्नेहाभिवृध्यर्थ जो फलादि कांहीं अपूर्वाईचा पदार्थ पाठवितात तो.

भेटणें, कोणेकानें कोणेकाशीं भेट ह्मणून जो संबंध तद्विशिष्ट होणें ;२, चिरकालें करून गांठपडल्यामुळें एकमेकाचे आलिंगनानें परस्परविशिष्ट होणें ;३, धनी, चाकर, सावकार, कूळ, वादी, प्रतिवादी, दादला, बायको, इ० जे परस्पर संबंधी त्याणी त्या संबंधिरूपें करून स्वसंबंध्यास उपलब्ध होणें ; उ०, मला जेव्हां कोणी विचारणार भेटेल तेव्हां सांगेन, मला जेवढें कूळ भेटतें तेवढें स्वष्ट ह्म० अज्ञास तसा भेटे आणि मनचा संशय फिटे.

भेटबकरा, भेटबकरें, पु० न० सुभेदार, मामलेदार, इ० कोणी आपले गांवीं आला असतां त्यास गांवचे अधिकारी पाटील

पाटील, खोत, इ॰ जी द्व्यादिरूप भेट देतात ती तें; २, लग्नांत रास न्हाण्याचे वेळेस वरमाईस द्यावयाचा मान आहे.

**भेटाभेट**, स्त्री॰ अनेकांचा परस्परें भेटण्याचा जो व्यापार ती किं॰ एकाचाच कोणेकाशीं आलिंगन कुशलप्रश्न इतकाजो व्यापार ती; २, स्पर्शास अयोग्यता इ॰ कांहीं विवक्षित असतां केवळ स्पर्शमात्रीं ही प्र॰ करितात; उ॰, त्यासुतक्याची माझी भेटाभेट झाली आतां स्नान केलें पाहिजे.

**भेंड**, न॰ भोंस, थोरू, औधळ्याचें तांट इ॰ कांचे पोटीं केवळ मृदु असतो गर तें; २, ला॰ केवळ हलकें आंत तव्हांश नाहीं असें जें लांकूड त्यास ह्म॰; ३, रा॰ नेत्रसंबंधी जो मळ नेत्रकोणांत जमत असतो तें.

**भेडणें**, आट्यापाट्या इ॰ खेळांत भेडतू निघावयाचे जे गडी त्यांणी आपल्यामध्यें दोन विभाग करून त्यास नामादि संकेत ठेऊन भेड तूकडे जावयास दोघा दोघांनी मिळणें.

**भेडतू**, पु॰ विटीदांडू, आट्यापाट्या, इ॰ खेळांत प्रथम गडी वांटून घेते समयीं जे दोन फळ्यांत दोन नायक होतात ते प्र॰.

**भेडसावणें**, भिवविणें.

**भेंडा**, पु॰ भिंत इ॰ कांचे उपयोगीं चिखलाचाव रंबा रचून त्याचे जे अनेक तुकडे पाडितात ते प्र॰; २, एक भाजी करायाचे उपयोगीं फळ आहे तो, आणि त्याचें झाड.

**भेडावणें**, भेडसावणें.

**भेंडाळें**, न॰ भेंडोळें.

**भेंडी**, स्त्री॰ भेंडा द्वितीयार्थ; २, एक वृक्ष आहे; ३, यानावाच्या आरंण्यक दोन चार प्रकारचा औषधी आहेत त्या प्र॰.

**भेंडोळें**, न॰ सूत, दोरी, कागद, इ॰ गुंडाळून केलें जें मोठें गुंडाळें तें.

**भेणें**, अ॰ प्र॰ भयानें; उ॰, तो व्याघ्राचे भेणें लपाला.

**भेत**, न॰ स्त्री॰ रा॰ फणस, भोंपळा, पेरू, इ॰ फळ किं॰ लांकडाचा ओंडा इ॰ उभा फाडिला असतां होतात जा अनेक फांकळ्या त्या प्र॰.

**भेतळणें**, रा॰ फणस, भोंपळा, लांकूड, इ॰ उभ्या भेगानीं विशिष्ट होणें.

**भेतळा**, पु॰ रा॰ भितळा.

**भेतूक**, न॰ रा॰ फणस इ॰ फळाची लहानशी जी भेत तें.

**भेद**, पु॰ परमाण्वादिरूप जे अनेक अवयव ते परस्पर संबद्ध होऊन झालेला जो विशिष्ट अवयवी त्याचा आंत शस्त्रादिकांचें शिरणें इ॰ कारणानें होतो जो त्या अवयवांचा ठायीं परस्परें वियोग तो; उ॰, योग्याचा प्राण मस्तकाचा भेद करून जातो; २, अर्थमात्रावर परस्परें भिन्नभिन्नत्वें करून भान होण्यास कारणीभूत जें वैधर्म्य असतें तो; उ॰, हीं दोन पागोटीं सारखीं ह्मणतां पण कांहीं यास त्यास भेद आहे, कालचे बोलण्यास आणि आजचे बोलण्यास फारच भेद दिसतो; ३, कोणेक भेदकाचे योगानें

योगानें विशिष्टापासून विशेषाचा होतोजो नि- राळेपणा तो;उ०,एकानावाचे अनेक असले तरी उपनामे भेदरावविनातमणूनविशेषाचा बोधहोतो ;४, सामान्य धर्माकांताचे पोटचेजे अवांतर विशेष असतात ते भ०;उ०, ब्रा- ह्मणामध्यें दहा भेद आहेत ;५, कोणेक का- र्याकडे प्रवृत्त असल्ये जी कोणेकाची अंतःक रण वृत्तिकिंवा भयलोभादि प्रदर्शनानें करि तातजो अन्यथाभावतो ;उ०, हामजपाशी चाकरीसराहण्याविषयीं कबूलझाला होता परंतु तुह्मी याचा भेद केला ह्मणून राहीना- सा झाला; ६, कोणेकाव्यवहाराचे आंतील गुप्त बारीकजें वर्तमान तो ;उ०, हाशाह्मणा आहेयास पाठविलें असतां त्याराज्यांतला भेदकाढून आणील.

भेदक, ३लिं० भेदकरणारें जें शस्त्र इ० तो किं० मनुष्यादिकांचे अंतःकरणाचा भेदकरणा रा मनुष्य इ० तो किं०सामान्याचे पोटचेजे अवांतर विशेष अर्थ त्यांची पृथक्त्वें करू नउपस्थिति होण्यास कारणजो गुणसंज्ञा खूण, मुद्रा, इ० तो.

भेदड, ३लिं० दे० भेंकड.

भेदणें, काष्ठ,पाषाण, इ०पदार्थ शस्त्रादि- कानें भेदविशिष्ट करणें;२, मनुष्य इ० - कास बुद्धिभेद विशिष्टकरणें;उ०, किल्ला चा हवालदार भेदतांच किल्ला आला ;३, औषधादिक शरीरादिकांत भिनणें.

भेददृष्टि, स्त्री० हेंमाझें, हेंदुसऱ्याचें, इ०किं० कार्यनिराळें,कारणनिराळें, इ० भेदविशि- ष्ट जी बुद्धि ती.

भेदन, न० भेदण्याचा जो व्यापार तें.

भेदबुद्धि, स्त्री० भेददृष्टि.

भेदरणें, चिरकाल अंतःकरणांत संस्कार रहायाजोगें भयानें विशिष्ट होणें.

भेदरा, पु० कोणेक गोष्टीचे परिणामाविष यीं कसेंहोईल, कायहोईल, इ०रूप पोटां त असतेंजें भय तो ;२, भेदरल्यामुळें रा हलेजो भयसंस्कार तो.

भेदवादी, पु० द्वैतवादी.

भेदाभेद, पु० अनेकपदार्थ भिन्नभिन्नत्वें क रून मानण्याविषयीं प्रयोजकजी जात्या दि धर्माची विद्यमानता तो ;उ०, ब्रह्मस्व रूपीं कांहीं भेदाभेद नाहीं.

भेदी, पु० विवक्षित व्यवहारांतील गुह्मम र्मादिभेद जोलाठाऊक आहे तो त्याव्यव हारांतील.

भेद्य, ३लिं० भेद्यायास योग्य किं०शब्दजो कांहींएक अर्थ तो.

भेद्या, पु० भेदी.

भेर, स्त्री०रा० भेग ;२,दे० देर.

भेरकट, ३लिं० रा० बहिरट.

भेरड, पु० भिरडद्वितीयार्थः.

भेरलामाड,भेरलीमाड, पु० कों० सुरमा ड.

भेरळ, भेरळीमाड, पु० कों० सुरमाड.

भेरा, ३लिं०रा० बहिरा.

भेरी,

**भेरी**, स्त्री॰ मोठा जो नगारा.

**भेल**, स्त्री॰ कोणेक पदार्थांत पदार्थांतराचा असतोजो मिश्रितपणा तो;२, भेलण.

**भेलकंड**, न॰ उपोषणादिकानें शरीराच्या तोलसंभाळेनासा झाल्यामुळें जात्येजी शरीराची झोकांडी तें.

**भेलकंडा**, पु॰ भेलकंड.

**भेलकंडी**, स्त्री॰ भेलकंड.

**भेलगा**, पु॰ (उतरणें) वातादिविकृतीनें वृषण मोठा होऊन खालीं लोंबूंलागे असा वृषणाच्या आधारबंधशिथिल होणें.

**भेलण**, न॰ रा॰ कोणेकपदार्थांत मिश्रित-होतेंजें पदार्थांतर तें.

**भेलणें**, कों॰ कोणेकपदार्थांत पदार्थांतर मिसळणें.

**भेली**, स्त्री॰ गुळाचा लहान लहान बांधिल्या असतात जा वड्या, गोळे, इ॰ ती.

**भेश**, पु॰ कों॰ वेष.

**भेष**, पु॰ वेष.

**भेषज**, न॰ सं॰ औषध.

**भेस**, पु॰ कों॰ वेष.

**भेसूर**, ३लिं॰ भयंकर.

**भेळ**, स्त्री॰ कों॰ भेल.

**भेळणें**, कों॰ भेलणें.

**भैरव**, पु॰ एकदेवआहे, भैरवाचीसेवाह्म॰ बहिरोबाचीसेवा;२, गाण्यांतएकराग आहे;३, एकस्त्रियांचें कर्णभूषण आहे; ४, भयंकर.

**भैरवजोगी**, पु॰ कानफाटागोसावी.

**भैरवी**, स्त्री॰ एकरागिणी आहे.

**भैरवीयातना**, स्त्री॰ काशींत जो मरण पावला त्याचे पदरीं असतेंजें पातकत्याचे निरासार्थ रुद्रपिशाच्चयोनीपासून जी यातना भोगावी लागत्ये ती.

**भैरीवेथा**, स्त्री॰ रा॰ बहिरीव्यथा.

**भैरीससाणा**, पु॰ बहिरीससाणा.

**भोई**, पु॰ डोली, पालखी, इ॰ यानवाहूनउपजीविका करणाराजो पुरुष तो;२, एकजाति आहे तिचीहि पालखी इ॰ यान वहावें पेट्यानें माणसें नदीपारउतरावीं, मासेमारावे. इ॰ वृत्तिआहे:३, घोडेपाळण्याचे घोड्याचे जे दोहोंकडचे दोनविभाग ते प्र॰;४, घोडेपाळणा टांगावयाकरितां उभीं करितात जीं चारकाष्ठें तीं प्र॰.

**भोईखाना**, पु॰ पालखी, पालखीचेभोई, इ॰रहायाचें जें घर असतें तो.

**भोईराज**, पु॰ पालखी इ॰ वाहणारे जे भोई त्यांस गौरवानें ह्म॰.

**भोंक**, न॰ छिद्र मुख्यार्थः, सावकारी इ॰ कोणेक व्यवहारांचें उपजीव्यजे द्रव्यादि पदार्थ त्यांची त्याव्यवहारांत लोकांचेबाहेर लक्ष्यांतन यावयाजोगी असतेजी उणीव तें;उ॰, याचीबाहेर सावकारी मोठीदिसत्ये परंतु आंतसारें भोंकआहे;२, ला॰ राज्यादि व्यवहाराचेठायीं प्र-वेशासकेलेंजें द्वारतें;उ॰, याणें त्याद

खारांत कोणी कडून भोंकपाडलें नकळे; ३ कों० कुत्र्याचा जो स्वजातीय शब्द तें; उ०, एथून तो गांव कुतऱ्याचे भोंक भरलांब आहे; ४, रा० बहुत प्रयत्नानें रडें आटोपित असतां ही आटपेनासें होऊन जो भों असा मोठा शब्द होतो तें; उ०, या पोरानें रडें गिळलें होतें पण आई दृष्टीस पडतांच भोंक फोडलें.

भोंकण, न० रा० भोंक चतुर्थार्थ १.

भोंकणें, कट्यार, भाला, बर्ची, इ० कांचे अग्र प्रहारानें कोणेकास छिद्रविशिष्ट करणें; २, कुत्र्यानें भुंकणें.

भोंकर, स्त्री० एक झाड आहे; २, न० तिचें फळ; ३, तोंगल.

भोंकरबाळी, स्त्री० तोंगलानें विशिष्ट एकबाळी ह्मणून स्त्रियांचें कर्णभूषण आहे.

भोकसणें, रा० वृक्षाची डहाळी, शरीराचे हातपाय, इ० अवयव मुळापासून मूलाधाराचाही कांहीं त्वगाद्यंश निघोन येईअसें उपटणें.

भोकसा, पु० रा० भोकसल्यामुळें किं० वर दोरी इ० कांचे घर्षण झाल्यामुळें वृक्ष, शरीर, इ० कांचा निघून गेला जो त्वगंश तो; २, ला० कोणेक व्यवहारांत बट्टा यावया जोगें जातें जें कांहीं पदरचें द्रव्यादि तो; ३, भोंसका.

भोंकसा, पु० भिंत, वस्त्र, शरीर, इ० कांस पडतें जें मोठें भोंक तो, स्वतःसिद्ध किं० कांहीं कामासाठीं वेतानें पाडलें जें भोंक त्याविषयीं प्रा० प्र० नाहीं.

भोका, पु० कों० बोका.

भोंकाड, न० रुदनादि प्रसंगीं तोंडाच्या मोठा पसरतो जो आ त्यास निंदेनें स०; उ०, कोणी मारलें नसतां उगीच भोंकाड पसरून रडतो सक शाला

भोंकू, पु० कों० डोळू.

भोक्तव्य, ३ लिं० भोगायास योग्य जें सुखदुःख किं० तज्जनक कांहीं विषय तो.

भोक्ता, ३ लिं० कोणेक विषयाचा भोग घेणारा जो तो; २, भक्ष्य भोज्य पदार्थ जाला बहुत आवडतात आणि भक्षायाविषयीं शारीर शक्ति अनुकूल असल्ये असा जो पुरुषादिक तो; उ०, आज चार पदार्थ चांगले केले आहेत कोणी भोक्ता ब्राह्मण भोजनास सांगा; ३, विद्या, कला, इ० कांचा जो ग्राहक तो.

भोक्तृत्व, न० प्रारब्धयोगानें दुःख किं० सुख अवश्य भोगलेंच पाहिजे असा जो भोगणारावर योग्यता विशेष असतो तें.

भोग, पु० सुखविषयक किं० दुःखविषयक आत्म्याच्याठायीं जो अनुभव तो; उ०, श्रीमंताचे योगानें सुखाचा भोग पुष्कळ घेतला; २, आत्म्याचाठायीं सुखदुःखात्मक अनुभव व्हावयाजोगा तत्तद्विषयकर्मक खाणें, पिणें, नेसणें, पांघरणें, लेणें, देणें, इ० यथायोग्य जो व्यापार

पार तो किं॰ त्याव्यापारापासून जन्य आत्म्याचाठायीं अनुभूयमान होणारेंजें सुखात्मक किं॰ दुःखात्मक फल तो ;उ॰, यावतनाच्या मी आजपर्यंत भोग केला, तुह्मी याशालजोडीच्या आजपर्यंत भोग घेतलात;२, अवश्य भोक्तव्यत्वेंकरून मानजें प्रारब्ध कर्माचें फल तो;उ॰, कावकरावें भोग असेलतितका भोगून सारला पाहिजे ह्म॰ भोगफिटे आणि वैद्य भेटे ; ४, उत्तरोत्तर गतिविशिष्ट जे सूर्यादि ग्रह किं॰ कोणेक व्यवहार तत्कर्तृक देशरूप किं॰ कालरूप जो विषय त्यातें स्वगतीनें आक्रमून मागें टाकण्याचा जो व्यापार तो ;उ॰, सूर्यप्रा॰ तीसदिवसांत एकराशीचा भोग करितो, कोणेकगोष्ट भोगास येणें ह्म॰ दैवदशेनें भोगायास उपस्थित होणें, भोगदेणें ह्म॰ पुरुषानें स्त्रीस किं॰ स्त्रीनें पुरुषास मैथुन सुख देणें.

**भोगणें**, कोणेक अर्थ भोगविषय करणें;उ॰, प्रारब्धकर्म भोगल्यावांचून सुटत नाहीं, कर्मास कर्तृत्वमानिलें असतां त्या कुळाकडून पंचवीसरुपये व्याज अह्मास भोगलें इ॰रूप प्र॰ होतात.

**भोगवटा**, पु॰ क्षेत्र,ग्राम, इ॰ कोणेक विषयाचे भोगाची कांहीं काळ कोणाकडेचालली असल्येजी वहिवाट तो, आलाविवाद प्रसंगीं साधन चतुष्टयांत गणिताता.

**भोगविडा**, पु॰ मकरसंक्रांतीस स्त्रिया नईन ईपानें, नईनईरूपान्या, इ॰ यावरून नईविडे नईब्राह्मणांस किं॰ नऊरूपासिनीस प्रतिवर्ष देतात ते प्र॰.

**भोंगळ**, ३लिं॰ जामध्यें असाया नसायइपणा नाहीं असेंजें नेसणें, पागोटें, बांधलेलें ओझें, इ॰ तो किं॰ नेसणें, पागोटें, इ॰सईल जाचें असाजो मनुष्य तो किं॰ तादृश त्याचा सईल जो कारभार तो.

**भोंगळणें**, कों॰ गांठोडें, तृणाचा भारा, इ॰ ढिलावणें.

**भोंगळभट**, पु॰ पोकळभट.

**भोंगळी**, स्त्री॰ स्त्रियांसही शिवी देत असतात.

**भोगळी**, स्त्री॰ कों॰ बाहेरचें पाणी शेतांत घ्यावयाकरितां किं॰ शेतांतील पाणी बाहेर दवडायाकरितां पोखरलेला माड इ॰ कांचा नळकरून जो शेताचे बांधांत यातला-असतो ती.

**भोगी**, ३लिं॰ निरंतर पुष्पें, चंदन, स्त्रिया, वस्त्रालंकार, इ॰ विषयांचा उपभोग करीत असावा असाजो पुरुषादिक तो!२, पु॰ सर्प ;३, स्त्री॰ मकरसंक्रांत आणि कर्कसंक्रांत यांचे जे अदलेदिवस ते प्र॰ ;४, नरकचतुर्दशीचा जो अदला दिवस त्यासही क्वचित् ह्म॰.

**भोग्य**, न॰ भोगवटा;२,३लिं॰ ग्रहादिकानें भोगायाचा राहिलेला जो चक्रांश, दशा

शा इ० तो; ३, स्वरूपतः किं० फलद्वारा भोगायास योग्य जो वस्तु, क्षेत्र, इ० पदार्थ तो ३०, कांहीं भोग्यवस्तु जर गहाण ठेवशील तर व्याज हलकें पडेल.

**भोग्या**, पु० अंधळी कोशिंबिर, इरगीमिरगी इ० खेळांत सर्वांनीं येऊन त्यास शिवावें असा जो मनुष्य, दगड, खांब, इ० संकेतित केला असतो जो पदार्थ तो.

**भोजन**, न० जेवण. भोजनखर्च, भोजनवेळ, इ० इष्टभोजन, आम्रभोजन, ब्राह्मणभोजन, इ० म०.

**भोजनभाऊ**, पु० संसारसंबंधी कामकाज न करितां काळजी न वाहतां केवळ भोजनार्थच जो मिळाला असतो त्यास म्ह०.

**भोजनीय**, ३ लिं० ज्यांस अवश्य भोजन द्यावें अशीं जीं मातापितरें, मुलें, अतिथि, इ० तो.

**भोजन्या**, पु० भोजनभाऊ.

**भोजी**, ३ लिं० जो जा पदार्थाचें भोजन करितो तो तद्भोजी, कदन्नभोजी, अमृतभोजी, इ० स० प्र०.

**भोज्य**, न० भोजनास उपयोगीं भात, पोळी, लाडू, पक्वान्न, इ० जो पदार्थसमुदाय तें.

**भोंड**, स्त्री० भोंवळ; २, न० जो थळ्यावरील जें गोड तें.

**भोंडगा**, पु० कों० निंदनें भंडाऱ्यास म्ह०.

**भोंडला**, पु० मुली आश्विनमासीं भिंतीवर शेणाचें देवालय देवविचें काढितात तो; २. आणि त्यापुढें जें नित्य गाणें गात असतात तो.

**भोंडा**, ३ लिं० कों० ध्यानारडा.

**भोंडाग**, न० कों० ध्यानारखंड.

**भोत**, पु० धान्यादिक आंत भरून ठेवायाकरितां गाणपाट इ० कांचा जो मोठा थैला करितात तो; २. भाजल्या पोळल्यानुळें शरीरावरील निघोन जातो जो त्वगंश तो; ३, कों० केतकीचें जें डांग निघायाजोगें कोवळें मूळ तो.

**भोंदणें**, कपटानें आर्जवून किं० लोभवून किं० आपणांत मंत्रविद्या किमया इ० अद्भुत सामर्थ्य आहे असें दाखवून कोणेकास आपण म्हटल्याप्रमाणें वर्तायाजोगा स्ववश करणें.

**भोंदू**, पु० दुसऱ्यास भोंदण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**भोंपळदेवता**, स्त्री० रा० भोंदरशापन्न असून कांहीं ठेकरासारिखें खेळ करिते जी स्त्री—तिला निंदावसरीं म्ह०.

**भोंपळसुती**, ३ लिं० ज्ञान बंदोबस्त तादृश नाहीं आणि वारकावा नाहीं असा जो कोणेकाचा राज्य, सावकारी, व्यवहार, कारभार, इ० तो.

**भोंपळा**, पु० यानावाचीं दोन प्रकारचीं फळें आहेत तीं प्र०, हातीं भोंपळा येणें म्ह० भिक्षा मागून पोट भरायाजोगी दारिद्र्यदशा पावणें; २. विण्याचा जो डेरा तो.

**भोंपळी**, स्त्री० दोहों प्रकारच्या ज्या भोंपळ्याचा वेली त्या प्र०.

भोंपळीखरबूज,

**भोंपळीखरबूज**, न० खरबुजांतएक भेद- आहे.

**भोपी**, पु० ग्रामदेवता इ० कांचें पूजेसाठींजो पुजारी अधिकृतकेला असतोतो प्रा० शूद्र वृत्ति.

**भोप्या**, पु० भोपी.

**भोंबा**, पु० रा० वागूल, भोंबाकरणें ह्म० बाऊकरणें.

**भोबा**, पु० कों० भोभा.

**भोबी**, स्त्री० कों० धणा, शूद्रभाषावृत्ति.

**भोंबूल**, पु० गं० भुंगा.

**भोभा**, पु० कों० उंडिणीचें किं० मोगलीएरंडाचें त्वचेसहित जें फळ तो ; २, ला० केवळ कोंवळें ल्हान जें भोपळा, कोहळा, इ० फळ त्यासह्म०.

**भोम**, न० कों० वारूळ.

**भोमवार**, पु० भौमवाराचा अप०.

**भोमाड**, न० कों० भोम.

**भोय**, स्त्री० दे० भुई, भुईशब्दपूर्वक जसे जितके शब्द झाले आहेत तसे तितके एतच्छब्दपूर्वक भोयकोट, भोयमूग, इ० शब्दहोतात.

**भोयार**, न० भुयार.

**भोंर**, २लिं० डोहे इ० कांतील जें पाणी किं० डोकी, मिशी, इ० संबंधी जे केश किं० कांहीं पदार्थ त्याचे काळेपणाचें अतिशयद्योतकविशेषण.

**भोंरकडी**, स्त्री० भोंवरकडी.

**भोरपी**, पु० कोल्हाटी; २, कळासूत्री, खांबसूत्री, दशावतार, इ० भोरीपकरूनउपजीविका करणारा तो.

**भोरा**, २लिं० गौर आणि रक्त हेवर्ण एकत्र झाले असतां जो एकनिराळाच्या वर्णहोतो तो किं० तद्विशिष्ट जे केंस, गढूळपाणी, हेला इ० पशू इ० तो.

**भोरीप**, न० कळासूत्र, खांबसूत्र, इ० कानीं बाहुली नाचवून किं० नाड्यावरचढणें इ० केंकरूनकिं० दशावतारादिसोंगें आणून जो खेळ करितात तें; २, ला० पोरें इ०-कानीं मनस्वीपणें खेळावें, नाचावें, उड्या माराव्या, असा जो व्यापार चालला असतां त्यास ह्म०.

**भोरूप**, न० भोरीप.

**भोंवई**, स्त्री० भुंवई.

**भोंवड**, स्त्री० भोंवळ.

**भोंवडणें**, कांहींएक पदार्थ मंडलाकार-फिरविणें ; २, कों० कोणेक मनुष्यादिकास अनेकमार्गांनी इकडूनतिकडे तिकडूनइकडे अशाप्रकारें हिंडायासलावणें ; उ०, यायोड्यानें मला पाठीमागून चारकोस भोंवडलेन तेव्हां सांपडला.

**भोंवणें**, कोणेक पदार्थानें मंडलाकारफिरणें ; २, पित्तादिकामुळें डोळे, कपाळ, इ० भोंवतें असे वाटाया जोगे विकृतीने विशिष्टहोणें; उ०, या पर्वतावरून खालीं पाहिलें असतां डोळे भोंवतात ; ३, दुखणें,

मरण, इ० संकट किं० तत्कारणी भूत-
जें अपथ्य दुष्कर्म इ० तें भोगद्वारा अवश्य
निस्तारायास पडे अशारूपें कोणेकावर
पडणें; उ०, तीचोरधाड वरकडांस सोडून
त्यागरिबास भोंवली, कालदहीं खालें ते
मला भोंवलें लागलेंच पडसें आलें. तें संक
टादि अनेकांस भोंवण्याची संभावना अ
सून कांहीं एकास सोडून कांहींकास भों
वलें असतां भोंवतां या अर्थी व्ययाचाप
क्षीं योगहोतो; उ०, सर्वांनीं व्यवहारके
ला पण मज भोंवला मात्र भोंवला.

भोंवता, अ० कोणेकपदार्थाचें जें परिधिसू
त्र त्याचे अनुलक्ष्यें करून; कोणेकानें को
णेकाचे भोंवताला गणें ह्म० उपद्रवदाय
कलेंकरून पाठीसलागणें.

भोंवताल्चा, ३लिं० कोणेकपदार्थाचे भों
वताजो स्थित तो.

भोंवताल्ला, अ० भोंवता.

भोंवती, स्त्री० रा० देवळाचे मुख्य गाभाऱ्या
चे भोंवताली बाहेरचे भिंतीचे आंत प्रद
क्षिणादिक रायाजोगी जी जागा ठेविली
असत्ये ती.

भोंवनीं, अ० भोंवता.

भोंवर, पु० कों० भुंगा.

भोंवरकडी, स्त्री० दावें. इ० कांचे दोन अव
यव दोहींकडे बांधले असतां ते अवयव-
भोंवडले असतां ही पीळ नपडायाजोगी
जी लोहादिकांची कडी मध्यें बांधायास
करितात

करितात ती.

भोंवरगांव, पु० विवक्षित पत्तनादि ग्रामाचे
भोंवतालचे जे गाव ते प्र०.

भोंवरा, पु० काष्ठादिकाचा वर्तूळ फिरविला
असतां भोंवत रहायाजोगा एक क्रीडासा
धन पदार्थ केला असतो तो; २, नद्यादि-
कांचाठायीं उदकांचें जेथें मंडलाकार भ्र
मण होतें तेथें जो आकार विशेष होतो तो
३, शरीरावरील केंसांचा जो मंडलाकार
तो; ४, भोंवरी ह्मणून वेल आहे तिचें फळ
तो; ५, धुळींत वाटोळी खळी करून त्यांत
राहतो असा एक क्षुद्रप्राणी आहे तो; ६,
शेंडीचे भोंवता राखितात जो केंसांचा घेरा
तो, कोणेकाचे पायावर भोंवरा पडणें ह्म०
त्याणे एकत्र नबसतां सर्वकाळ हिंडत अ
सणें; ७, क्वचित् भ्रमरास ह्म०; ८, गोमहि
ष्यादि पशूंचे त्वचेस तृणादिस्पर्श झाला अस
तां त्याम्छलीं होतें जें स्फुरण तो.

भोंवरी, स्त्री० यानावाचा दोनवेली आहेत
; २, पायांचातळवा इ० कांचाठायीं कां
टा लागणें इ० कारणामुळें कातडी जाड
होऊन जो मंडलाकार होतो ती; ३, रा० क
णेकडाची अग्रें रुखावर जास्छलीं टेंक
लीं असतात तीं स्छलें प्र०; ४, खेळे इ०
नृत्य करित असतां मंडलाकार जें भ्रमण
करितात ती, या अर्थी मारणें, येणें, इ०
कांचे योगी प्र०.

भोंवळ, स्त्री० पित्तादिविकृतीनें येत्ये जी
घेरी

घेरी ती, कोणकाची भोंवळ निरणें ह्म० को हीं शिक्षादि मात्र झाल्यामुळें बलादिकरून द पीचा परिहार होणें.

**भौंवाडा**. पु० कों० मार्गाचे वांकडेपणामुळें वि वक्षितस्थळीं जावयास जो फेरा तो.

**भौंवार**. स्त्री० कों० तेल्याचा घाणा, बैल, रहा ट, इ० कांस जुपलेला बैल. टोणगा, इ० कां चा फिरायाची जी मंडलाकार वाट पडली असते ती.

**भौंवारगाव**, पु० कों० भोंवरगाव.

**भौंशाऊंस**. पु० कों० उंसांत एक भेद आहे

**भौंस**, पु० भोंशाऊंस ;२. बरूसारखा एक तृ णविशेष आहे.

**भौंसकट**. **भौंसकटें**, न०ग० भोंकसा मध्य महिलायार्थे.

**भौंसकणें**, तरवार, भाला. इ० कांहीं एक पदार्थांत खुपसणें.

**भौंसकणें** ग० भोंकसणें.

**भौंसका**, पु०रा० भोंकसा.

**भौंसका** पु० भोंकसा.

**भौंसकें**, न०रा० भोंसकट.

**भौंसकू**, पु०कों० भोंकू.

**भौंसडणें**, फोदलणें.

**भौंसडपट्टी**. स्त्री० फोदलपट्टी.

**भौंसणें**, भोंसकणें.

**भौंसा**, पु०रा० भोंशाऊंस.

**भौंळ**, स्त्री० भोंवळ.

**भोळवट**, २लिं० सुमाराचा जो भोळा मनु ष्य तो.

**भोळसर**, २लिं० भोळवट.

**भोळसावणें**, रा० भोळावणें.

**भोळा**, ३लिं० ज्याचे मनांत कपट नाहीं आणि कोणक गोष्ट पदार्थ बाह्यात्कारें जारूपें क रून दिसतो तें चरूप त्याचें खरें अभ्यंतरीं कांहीं अन्यथाभाव असावा असें वाटत ना हीं अशा अंतःकरणाचा जो मनुष्यादिक-तो.

**भोळानाथ**, पु० महादेवास ह्म० ;२. प्रभुत्वा दिथोरपणा अंगीं असून निष्कपट जो म नुष्य तो.

**भोळाभाव**, पु० सर्वांवर विश्वास ठेवून निष्क पटपणें वर्तण्याचा जो कोणेकाचा स्वभाव असतो तो ह्म० भोळाभाव सिद्धीस जाव.

**भोळावणें**. रा० कोणेकास लाभादि प्रदर्श नानें आपल्यावर विश्वास धरून आपण ह्मटल्याप्रमाणें वर्ते असा कांहीं स्वकार्य साधायाविषयीं करणें ;उ०, त्या मुलानें पो थीचें पत्र घेतलें आहे तें खाऊचा कांहीं दाख वून त्यास भोळावून घे.

**भोळाशंकर**, पु० भोळानाथ.

**भोळें**, न० क्रयविक्रयादि व्यवहारीं गणती हिशेब इ० कांत दृष्टिचुकल्यामुळें एकमे काचें एकमेकाकडे अन्याय्य अधिक येतें-जें द्रव्यादिक तें ;उ०, हिशेब चुकत अस ला तर भाणखी करून पहा मला तुझें भो ळें नको ;२, भुरळें ;उ०, एकगोसांवी का

ल आला होता त्याणें भोळें घालून दोन रुपये आणि पागोटें नेलें.

भोक्ष्यमाण. ३लिं० पुढें भोगायाचा जो काळ सुखदुःख इ० तो.

भौतिक, ३लिं० भूतसंबंधी तो ;उ०, यामुला ला कांही भौतिक उपद्रव आहे ह्म० पैशाचिक; हासर्व प्रपंच भौतिक आहे ह्म० पांच भौतिक.

भौम, पु० मंगल ह्मणून जो ग्रह तो ;२,३लिं० भूमिसंबंधी ;उ०, भूकंपादिक जे उत्पात ते भौम जाणावे.

भौमवार, पु० मंगळवार.

भ्याड, ३लिं० भित्रा.

भ्यासूर, ३लिं० भयंकर.

भ्रतार, पु० दादला.

भ्रम, पु० पदार्थाचें वस्तुतः जें स्वरूप असतें तें नस्फुरतां त्या पदार्थाचें पदार्थांतरत्वें करून जें ज्ञान होतें तो ; उ०, रज्जूच्याठाई जसा हा सर्प असा भ्रम होतो तसाच ब्रह्मी हा प्रपंच असा भ्रम होतो ; २, असावें एक, आणि भासावें एक. किं० कांहींचस्फुरूनये अशीजी पित्त, कैफ, इ० कारणामुळें अंतःकरणाची अवस्था होत्ये तो ; उ०, ज्वरानें वस्त्रेवर भ्रम पडतो ह्मणून भलभलतेंचं दिसूं लागतें ;३, कोणेकाचा ठायीं विद्या कला धिकता इ० जो गुण- किं० कोणेकापासून झालेलें किं० होणारें जें दान, पराक्रम, चोरी, इ० वाईट वरें कर्म इ० रूप जो अप्रत्यक्ष अर्थ तद्विषयीं को हीं लक्षणादि दर्शनामुळें केवळ निश्चयात्मकतेस पावलेलें नव्हे असें संभावनात्मक जें कोणेकास ज्ञान असतें तो ; उ०, यापाशीं लाख रुपये असावे असा सान्या गांवास भ्रम होता पण तें कांहीं नाहीं ; ज्याचाअशी भ्रम धरला होता तोच शेवटीं चोर ठरला ;४, संशय ;उ०, हा ब्राह्मण किं० शूद्र याविषयीं अह्माला भ्रम आहे ;५, सूत्रचक्रादिकाची मंडलाकार जी गति तो किं० त्या गतीनें होतात जे फेरे ते भ्र० किं० तशी गति होण्यास कारणीभूत जो मंडलाकार फिरविण्याचा संस्कार तो.

भ्रमण, न० सूत्र, चक्र, इ० कांचें मंडलाकार जें चलन तें ;२, परिभ्रमण.

भ्रमणें, चक्रादि मंडलाकार फिरणें ;२, कोणेकानें परिभ्रमण करीत असणें ; ;३, एक असतां भलतेंच वाटावें अशा दशेतें अंतःकरणानें पावणें.

भ्रमर, पु० पुष्पादिकांचे सुवासास अतिलंपट असा एक सपक्ष सहापायांचा क्षुद्र जंतु आहे.

भ्रमाच्या भोंपळा, पु० भरमभोंपळा.

भ्रमित, ३लिं० भ्रमिष्टाचा अपभ्रंश.

भ्रमिष्ठ, ३लिं० कैफ, शोक, ज्वर, पित्तक्षोभ, इ० कारणानें किं० स्वभावतः ज्याचे अंतःकरणास भ्रम पडला आहे असा जो पुरुष इ० तो.

भ्रमिस्त,

**भ्रमिस्त**, ३लिं० भ्रमिष्टाचा अपभ्रंश.

**भ्रंश**, पु० अधिकारादि स्थानाचा ठायीं स्थित जो मनुष्यादिक त्याचा त्यास्थानापासून जो वियोग जेणें करून त्या मनुष्यादिकास प्रा० निराधारतारूप दुर्दशा प्राप्त होत्ये तो; उ०, राज्यपदापासून भ्रंश झाल्यापासून हा राजा भडकत फिरतो आहे; २, शोकादि कारणामुळें बुद्धीस होतो जो चळ तो; राज्यभ्रंश, बुद्धिभ्रंश इ० स०.

**भ्रंशणें**, कोणेकास भ्रंशविशिष्ट करणें.

**भ्रंशित**, ३लिं० कोणेकानें राज्यादि पदापासून भ्रंशिला.

**भ्रष्ट**, ३लिं० राज्यपदादिकापासून भ्रंश पावला जो तो; २, आचारविचारादि हीन अतएव अपवित्र जो मनुष्य किं० स्थल इ० तो; राज्यभ्रष्ट, आचारभ्रष्ट, इ० स०.

**भ्रष्टाकार**, पु० सोंवळें, ओंवळें, व्यभिचारादि दोष यांचा व्यवस्था नाहींशी झाल्यामुळें सर्व एकवट झाल्यानें गृह, ग्राम, इ० कांचा ठायीं होत्ये जी भ्रष्टता ती.

**भ्रष्ट्या**, पु० आचारविचारहीन अतएव भ्रष्ट जो मनुष्य तो.

**भ्रांत**, ३लिं० कांहीं एक पदार्थाचे ज्ञानाविषयीं भ्रमजास झाला तो; २, भ्रांतिष्ट; ३, स्त्री० भ्रांतीचा अपभ्रंश.

**भ्रांतखोर**, ३लिं० भ्रांतिखोर.

**भ्रांतवट**, ३लिं० भ्रांतिवट.

**भ्राता**, पु० भाऊ प्रथमाथः, भ्रातृपुत्र, भ्रातृप

**भ्रांति**, स्त्री० भ्रम, परंतु प्रा० प्रथ० द्वि० चतुर्थार्थः, ग्रंथादिकांत वर्णादिकाविषयीं एथें शकार असावा किं० सकार असावा अशी भ्रांति पडायाजोगें जें स्थल तें भ्रांतिस्थल इ० स०.

**भ्रांतिकर**, ३लिं० स्पष्ट हें अमुकच असे एकरूपें करून निश्चय न होतां हें असें असेल, किं० असें असेल, हें अमुक होय, किं० नव्हे अशी भ्रांति उत्पन्न व्हावयाजोगें जें वाक्य, अक्षर, भाषण, इ० तो; उ०, आन्हीं तर येईन असें भ्रांतिकर सांगून का कायतें स्पष्ट सांगा.

**भ्रांतिखोर**, ३लिं० दिकतखोर.

**भ्रांतिवट**, ३लिं० भ्रांतिकर.

**भ्रांतिष्ठ**, ३लिं० आपणच केलें तें न केलेंसें वाटावें, न केलें तें केलेंसें वाटावें, पूर्वापर अनुसंधान जास राहू नये आणि हें किं० हें अशी वारंवार भ्रांति जाला होत असावी अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**भ्रांत्या**, ३लिं० भ्रांतिष्ठ.

**भ्रामक**, ३लिं० स्वविषयीं हें अमुकच असेंच असा एकरूप निश्चय होऊं देतां अंतःकरणास अनेकप्रकारें भ्रम उत्पन्न करणारें असें जें संदिग्ध भाषण, अक्षर, वाक्य, इ० तो; उ०, हा रुपया भ्रामक दिसतो केवळ खरा ह्मणवत नाहीं, केवळ खोटा ह्मणवत नाहीं.

**भ्रुकुटी**, स्त्री० भृकुटी.

**भ्रू**, स्त्री० सं० भुंवई, भ्रूभंग इ० स०.

**भ्रूणहत्या**, स्त्री० गर्भस्थ प्राण्याची जी हिंसा ती

**भ्रूणहत्यारा**, ३लिं० भ्रूणहत्या घडली आहे ज्यापासून तो.

**मउ**, ३ लिं० शिथिलावयव जो पदार्थ तो, २, खरख-शीत नव्हे तो, ३, ला० ज्याचें भाषणादि कठोर नव्हे तो च त्याचें भाषणादि तो, म्ह० मउ सापडलें म्हणून कोपरानें खणूं नये ·

**मकडी**, स्त्री० माकड म्ह० लकडीवांचून मकडी वठणीस येत नाहीं, प्रा० याचा प्रयोग या म्हणीतच

**मकर**, पु० एक जलजंतु आहे, २, बारा राशींतील दाहावी जी राशि ती, ३, न० दुसऱ्यास ठकवायाचा जो अनेक प्रकारचा युक्ति तें ·

**मकरकुंडल**, न० सं० मकराकार जें कुंडल तें ·

**मकरंद**, पु० सं० पुष्पांत जो मद असतो तो ·

**मकरसंक्रांति**, स्त्री० सं० धन संक्रांतीपासून मकर राशीस जें सूर्याचें गमन ती ·

**मका**, स्त्री० पु० एक धान्य आहे ·

**मकाण**, न० मकेचे तांटांचा जो समुदाय तें.

**मकाणा**, पु० मकेचा कणसांचे दाणे भाजून जी लाही करितात तो २, एक कमलबीज आहे ज्याचा भाजून लाह्या करितात तो ·

**मकान**, न० مكان हिं० राहायाची जागा तें, २, टप्पा द्वितीय चतुर्थ्यर्थी, कांहींएक गोष्ट मकानांत येणें म्ह० टप्यांत येणें ·

**मक्ता**, पु० مقطع हिं० कांहींएक कार्याची केली जी उक्ती बोली तो, २, रा० अ० जितक्यास तितकें परिमित ·

**मक्तेकरी**, ३ लिं० हिं० मक्त्यानें जो कांहींएक काम पतकरितो तो ·

**मक्तेदार**, ३ लिं० مقطعدار हिं० मक्तेकरी ·

**मक्तेवाला**, ३ लिं० हिं० मक्तेकरी ·

**मख**, पु० सं० यज्ञ ·

**मखमल, मखमाल**, स्त्री० مخمل हिं० एक फुलझाड आहे, २, न० तिचें फूल तें, ३, अति मृदु वस्त्र आहे ·

**मखमली, मखमाली**, ३ लिं० مخملی हिं० मखमल वस्त्र निर्मित जो पदार्थ तो ·

**मखर**, न० देवब्राह्मण इ० कांचा समारंभार्थ जाळ्या, वस्त्रें, इ० त्याचा सभोंवतें लावून जें सुशोभित स्थल करितात तें, २, जाळ्यां सहित जी ताटी तें ·

**मखलाशी**, स्त्री० خلاصی हिं० सर्कारी कांहींएक गोष्टीचे ठरावाचा जो कौल इ० कागद त्याजवर जें त्या ठरावानें जाणविणारें चिन्ह असतें ती, २, विवादविषय गोष्टीचा सिद्धांत होऊन जी समाप्तिदशा ती, ३, बहुत देणें घेणें असतां सर्कार इ० कांपासून थोडया द्रव्यानें करून घेतली जी तोड ती ·

**मखी**, स्त्री० हिं० श्लोक, भाषण, पदार्थ इ० कांमध्यें जें गुप्त मर्म असतें ती, २, कांहींएक पदार्थ सिद्ध करण्याविषयीं जी युक्ति किं० पद्धति ती ·

**मखूख**, ३ लिं० कों० ज्याचा मनांतलें कांहींच कोणास एकाएकी कळत नाहीं असा जो गूढाशय मनुष्य तो ·

**मखूखम**, ३ लिं० कों० खस्माल ·

**मग**, अ० उत्तरकालीं, वाक्यालंकारक; उ० जाईन मग तुझें काय जातें ·

**मगज**, पु० सं० फलादिकांतील जो गीर तो, २, अस्थींतील जो स्नेह तो

**मगजी**, स्त्री० हिं० अंगरख्या इ० कांस शोभार्थ कडेस

किं० विवक्षितप्रदेशीं तापना इ०कांची पट्टी लावितात तीं ·

**मगदूर**, पु० مقدور हिं० खुदरत

**मगर**, पु० एक जलजंतु आहे ·

**मगरमिठी**, स्त्री० मगराची जी मिठी ती, २, ला० मगरासारिखी भाषणादि द्वारा जी सदृढमिठी ती ·

**मगरूरी**, स्त्री० مغروری हिं० मगरूरपणा तो ·

**मंगरूळी**, ३ लिं० मंगरूळ ह्मणून शहर आहे तत्संबंधी जो पदार्थ तो ·

**मगरूर**, ३ लिं० مغرور हिं० द्रव्य विद्या इ०कानीं जो गर्विष्ट तो ·

**मंगल**, न० कल्याण, २, शुभकार्य, ग्रंथारंभ इ०स्थलीं जो ईश्वरादिकाचें स्तुतीचा श्लोकादिक असतो तें, ३, कांहींएक कार्याचे आरंभीं जें ईश्वराचें भजन स्मरणादि करितात तें, ४, पु० एक ग्रह आहे ·

**मंगलकार्य**, न० लग्न, मुंज, इ० जें कार्य तें ·

**मंगलदायक**, ३ लिं० सं० कल्याणकारक जो व्यापार किं० पदार्थ इ० तो ·

**मंगलवाद्य**, न० वाजंत्रें, मृदंग, इ० जीं कल्याणकारक वाद्यें तीं प्र०

**मंगलागौरी**, स्त्री० एक देवी आहे ·

**मंगलागौरीव्रत**, न० जा कन्येचा विवाह झाला ती पहिल्या श्रावणमासापासून पांचवर्षपर्यंत श्रावण मासांत जितके मंगळवार येतात तितक्या मंगळवारीं देवीचें पूजनादि करिती तें ·

**मंगलाचरण**, न० सं० मंगलद्वितार्थी, २, पुराण, कथा, इ० कथनाचे आरंभीं जें देवस्तुतीचें श्लोकादिक ह्मणतात तें, ३, ला० कांहींएक गोष्टीचा जो आरंभ तें ·

**मंगलाष्टक, मंगळाष्टक**, न० सं० लग्न, मुंज, इ० लावतेसमयीं अंतःपट धरून आशीर्वादार्थ अथवा मंगलार्थ जें श्लोकादि ह्म० तें ·

**मंगळ**, न० मंगल; मंगळ माजणें ह्म० विवाहादि मंगल कार्यांत सोवळें, ओवळें, इ० कांचा विशेष विचार न राहाणें ·

**मंगळणें**, तंतरणें ·

**मंगळभारणी**, स्त्री० एकास निजवून त्याचे पाय आपले पायांत सांपडवून श्रमपरिहारार्थ दाबण्याचा जो प्रकार ती ·

**मंगळमाठ्या**, ३ लिं० मूर्ख ·

**मंगळमूर्ति**, स्त्री० गणपति मुख्यार्थी ·

**मंगळवार**, पु० तिसरा जो वार तो ·

**मंगळसूत्र**, न० सं० विवाहामध्यें नवरीचा गळ्यांमध्यें नवरामण्यानें युक्त जें सूत्र सौभाग्यचिन्हार्थ बांधितो तें ·

**मंगोडें**, न० पोरांचे भाषेनें मांजरास ह्म०

**मग्न**, ३ लिं० सं० पाणी, इ० कांत बुडाला तो, २, ला० व्यसन, ईश्वरभजन, गाणें, इ० व्यापारामध्यें जो चूर तो ·

**मघा**, स्त्री० सत्तावीस नक्षत्रांतील दाहावें जें नक्षत्र, प्र० अने० व०

**मघां**, अ० वर्तमान दिवसांत कांहींएक विद्यमानकालाचा अव्यवहित पूर्वकालीं ·

**मघाशीं, मघासीं**, अ० मघां

**मंच**, पु० सं० पलंग ·

**मंचक**, पु० सं० मंच ·

**मचमचीत**, ३ लिं० पचपचीत ·

मचवा

**मचवा**, पु० लाहान गलबतांत एक भेद आहे ·

**मच्यावणें**, मोर्दगिरी, लुच्चेगिरी, दांडगाई, दंगा, इ० उत्कृष्ट माजिवणें ·

**मचूळ**, ३ लिं० खारें नव्हे गोड नव्हे असें जे पाणी तें·

**मध्या**, ३ लिं० कांहींएका पदार्थाचा मध्यस्थित जो तो·

**मध्यामध्यें, मद्येमध्यें**, अ० हानि, मृत्यु, लाभ, इ० जनक जी मुख्यत्वेंकरून परस्परांची क्रिया तज्जन्यफलाचा त्या परस्परांशी अन्वय व्हावा तो न होतां तदितरावर होई असें; उ० ते दोघे भांडले आणि सोडवायास जो गेला त्याणें मद्येमध्यें शिव्या खाल्या, २, जा कार्याविषयीं ज्याचें अनुमत अवश्य असावें तें न घेतां; उ० तुलामध्येमध्यें हा कारभार कोणी सांगितला·

**मच्छर** न० एक क्षुद्र प्राणी आहे·

**मच्छरदानी**, स्त्री० मच्छरानें उपद्रव न करावा म्हणून खपरपलंगास भोंवतें जें बारीक वस्त्र लावितात ती·

**मजकुरी**, ३ लिं० हिं० कांहींएक मजकूर ज्यांत लिहिला आहे असा जो कागद, भाषण, तो·

**मजकूर**, पु० हिं० कांहींएक प्रकरणाचे कागदांत लिहिलेले किं० ज्ञात जें वर्तमान तो, २, ज्याचें विशेषरूपेंकरून वर्ते नाव लिहिलें असतें असे जे किल्ला, मनुष्य, मोजे, इ० पदार्थ, त्याचाच पुनः उल्लेख करावयाचा असतां सामान्यनावापुढें या शब्दाचा प्रयोग होतो; उ० किल्ले मजकुरीं, मोजे मजकूरचा पाटील गेला, इ० साल मजकूर म्ह० विद्यमान वर्ष, त्याचा मजकूर काय म्ह० त्याची कथा काय ·

**मजबुती, मजबुदी**, स्त्री० مضبوطی हिं० खंबिरी ·

**मजबूत, मजबूद**, ३ लिं० مضبوط हिं० खंबीर मुख्यार्थी, २, अ० दृढ होईअसें, बांध, इ० वि० ला० ३ लिं० न हालायाजोगें जें भायणादिक तो·

**मंजरी**, स्त्री० सं० तुलसी इ० काचें जे केसर ती, २, लाहान वाजवायाचा जो टाळ ती·

**मजल**, स्त्री० हिं० गतीनें आक्रमणविषय जो मार्गावधी ती; उ० आम्ही प्रहरांत चारकोस मजल आटोपिली, २, एका दिवसांत साधारणरीतीनें चालले असतां आक्रमित होतो जो मार्ग ती; उ० पुणे एथून चार मजला आहे, ३, ला० कांहींएक कार्याची जी केवल परिणामावस्था किं० विवक्षित दशा ती; उ० तें कार्य इतक्या मजलेस आलें आहे परंतु मजलेस पोहोचेल तेव्हां खरें

**मजला**, पु० हिं० भूईघरावर फळीसारिखीं घालून वर माती घालून राहायाजोगी खालच्या घरा सारखी जागा करितात तो, २, वस्त्रास कांहीं रेशमाचा मध्यें मध्यें खुणा करून बाकी सारें जरीचें काम करितात ते प्र० उ० त्या पातळास चार मजले आहेत, ज्या घरास वर मजला नाहीं त्यास प्रसंग विशेषीं एक मजली ज्या घरावर एक मजला चढला आहे त्यास दुमजली असा व्यवहार, यारीतीनें तिमजली, चौमजली इ० जाणावे·

**मजा**, स्त्री० مزا हिं० मौज·

**मजाल**, स्त्री० مجال हिं० खुदरत ·

**मजालस**, स्त्री० مجلس हिं० कचित्स्थलीं राजादि लोकांची जमली जी कचेरी ती·

**मंजिरी**, स्त्री० मंजरीचा अपभ्रंश·

**मंजिष्ट** पु० औषध आहे·

**मजीत**, ३ लिं० हिं० ज्या रंगास नकाकी नाहीं असा जो रंग तो, व तद्विशिष्ट वस्त्रादि तो, २, मळल्यामुळें किं० -चोळल्या

चोळवटल्यामुळें जाची नवेपणाची टवटवी गेली अ-
साजो वस्त्र, कागद, इ० तो, ३, ला० चांगली उपस्थित
नव्हेशी झालेली जी विद्या, कला ती ·

**मजुरा**, पु० हिं० रा० कांहींएक लक्ष्य करून त्या लक्ष्याक-
डे नेमस्त, दृष्टि, बंदूक, इ० कांचें संधान धरण्याचा जो
प्रकार तो ·

**मजूर**, ३ लिं० مزدور हिं० एक दिवसास अमुक देईन
तूं अमुक काम कर अशी रीतीची बोली करून ठेविला जो
मनुष्य इ० तो; म्ह० दिवस बुडे आणि मजूर उडे ·

**मंजूर**, ३ लिं० हिं० कबूल ·

**मजूरकर**, ३ लिं० हिं० मजूर ·

**मजूरदार**, ३ लिं० हिं० मजुरी करितो तो ·

**मजूरा**, अ० مجرا हिं० देण्याघेण्याचा व्यवहारांत दस्त द्र-
व्यादिक मुख्य रकमेंत वजा होई असें दे, पड, हो, इ० वि०

**मजूरादास्त**, स्त्री० مجرا داشت हिं० वाडी, शेत, इ० संबंधी
सर्कार देणें द्रव्य द्यावयाचें असतें त्या ऐवजीं सर्कारांत
कुळाकडून माल पोहोंचला असतो त्याच्या ऐवज स-
र्कार, मुख्य जें वाडी, इ० कांचें देणें त्यांत वजा देतें तो ·

**मजूरी**, स्त्री० हिं० मजूर मनुष्यास देय जें द्रव्य तो, २, मजूराचें
कर्म तो ·

**मंजूळ**, ३ लिं० कर्णास गोड वाटे असा जो ध्वनी तो ·

**मज्जन**, न० सं० पाणी इ० कांत बुडण्याचा व्यापार तें ·

**मज्जा**, स्त्री० सं० जीपासून रेत उत्पन्न होतें अशी एक श-
रीरांतील धातु आहे ·

**मट, कन, कर, दिनी, दिशी**, अ० कांहीं एक व्यापारीं प्र-
वृत्त जो त्याणें तद्विषयीं आकुंचीभाव पावून उगे राहा-
णें, नगणें, इ० कांचें वि०, २, अकस्मात् धरणें इ० कांचें
वि० ·



**मटका**, पु० हिं० मटकींत एक भेद आहे ·

**मटकावणें**, पळून जाणारास किं० खालीं पडणारास
मटकन धरणें ·

**मटकी**, स्त्री० एक धान्य आहे ·

**मटगोळा**, पु० अन्न खाऊन जी नि शेष ता तो, याचा प्र-
योग मुलांच्या भोजनादि प्रसंगीं; उ० त्या पोरानें टिपरी-
चे भाताचा मटगोळा केला ·

**मटमट**, अ० असा शब्द होई असें खाण्याचें वि०

**मटमटां**, अ० मटमट ·

**मटमटावणें**, मटमट शब्द होई असें त्वरेनें खाणें ·

**मटामट**, अ० मटमट ·

**मट्ट**, अ० कांहीं न बोलतां, राहा, हो, बस, इ० वि०

**मट्यास येणें** बहुत चालण्यानें किं० फार श्रम केल्या-
मुळें थकणें ·

**मठ**, पु० एक धान्य आहे, २, गोसावी, बैरागी, सन्यासी, इ०
कांचें राहायाचें स्थान तो, ३, बुद्धिमंद ·

**मठारणें**, जखम इ० भरत भरत येणें, २, नव्या भांड्याचे
ठोके हत्यारानें ठोकून साफ होई असें करणें, ३, दे० कां-
हींएक कार्यास जो प्रवृत्त नाहीं त्यास त्या कार्याविषयीं
अनेक युक्तीनें अनुकूळ होई असें करणें ·

**मठी**, स्त्री० हिं० घरास लाहानपणानें नाव घ्यावयाचें अ-
सतां म्हणतात, २, को० लाहान जो मठ ती ·

**मठ्ठ**, ३ लिं० मंद जो टोणगा, बैल इ० तो, २, बुद्धिमंद ·

**मठ्ठा**, पु० कालवण इ० द्यर्थ पाणी न घालितांदहीं घुसळू-
न लोणी न काढितां घट्ट करितात तो ·

**मठ्ठया**, ३ लिं० मठ्ठ ·

**मंड**, पु० सं० भाताचे लाव्यांचें कढवून पाणी औषधार्थ
देतात तो ·

**मड**, ३ लिं० दे० कांहींएका कार्यादिकाचाठायीं विघ्न करणारा मनुष्य तो ·

**मंडई**, स्त्री० हिं० शहर इ० कांचेठायीं समुदायेकरून भाजी, मेवा, इ० विकला जातो ती जागा ·

**मंडक**, पु० सं० मांडा ह्म० एक पक्कान्न आहे ·

**मडकूल**, न० लाहानजें मडकें तें ·

**मडकें**, न० मृत्तिकेचें केलेजें पात्र तें ·

**मंडण**, न० वा० मनुष्यांचा जो समुदाय तें ·

**मंडन**, न० सं० भूषण, २, खंडित पूर्वपक्षादिकांचें जें स्थापन तें ·

**मंडप**, पु० सं० लग्नाद्युत्साहादिक करायाचे असतां द्वारादिकांपुढें छायार्थस्तंभादिक पुरून सांवळ्या इ० कानीं आछन्न, किं० पडवळी, द्राक्षा, इ० कांचें वेल चढायाकरितां, किं० देवालयादिकांपुढें सभामंडपादिक करितात तो, २, ला० सूर्यादिक न दिसायाजोगी जी मेघाची निबिड छाया तो ·

**मंडपदेवता**, स्त्री० सं० विवाहादिकामध्यें मंडपसंबंधी जी देवता ती ·

**मंडपप्रतिष्ठा**, स्त्री० सं० मंडपदेवतांचें जें स्थापन ती ·

**मंडपशोभा**. स्त्री० सं० विवाहादिकांचाठायीं मंडपादिक शोभावाह्मणून कांहीं लोकांकडली वस्तवानी आणून, किं० कोणी प्रतिष्ठित विद्वान इ० कांनीं जी शोभा करितात ती ·

**मंडपी**, स्त्री० देवादिकावरती कांबीचा फुलवरा इ० टांगायासाठीं लाहान मंडपाकार करितात ती ·

**मंडपोद्वासन**, न० सं० विवाहादि मंडपदेवतांचें जें उत्थापन तें ·

**मंडल**, **मंडळ**, न० सं० वृत्ताकारजो घेरा तें, २, मनुष्यादिकांचा जो समुदाय तें, ३, राजसत्ताक्रांतजें भूखंड तें, मंडळावर धरणें, ह्म० घोड्यास मंडळाकार धरविणें ·

**मंडली**, **मंडळी**, स्त्री० सं० मंडल द्वितीयार्थी, २, एक प्राणी आहे, जास स्पर्श केला असतां वर्तुळाकार होन असतो ·

**मंडवळी**, स्त्री० नवरामूल किं० मुंजामूल इ० कांचे कपाळावर फुलादिकांची शोभार्थ जी बांधित असतात ती ·

**मंडळवत**, न० वा० एका पेश्याची जी पत्रावळ तें ·

**मंडाई**, स्त्री० हिं० सावकारापासून ज्यानें पैसा घेतला असतां हीनत्वंतोपार्थ अणखी कांहीं द्रव्य कबूल करितात ती ·

**मंडावण**, स्त्री० हिं० मंडाई ·

**मंडावळ**, स्त्री० मंडवळी ·

**मंडित**, ३ लिं० सं० भूषित ·

**मंडूक**, पु० सं० बेडूक ·

**मंडूर**, पु० सं० लोखंडाचा किटाची कांहीं भट्टीकरून रसायण तयार करितात तो ·

**मडें**, न० प्रेत, मड्याचा ताळघेचें लोणी खाणारा, ह्म० अतिशयित लोभ्यास ह्म०, ह्म० केंस उपटल्यानें का मडें हलकें होतें

**मडेकळा**, स्त्री० प्रेतकळा ·

**मडेंपंचक**, न० वैशाखमासामध्यें जीं धनिष्ठादि पांच नक्षत्रें येतात तें ·

**मंडोदरी**, स्त्री० बेटकुळीमध्यें एक भेद आहे ·

**मढणें**, चर्मानें किं० वस्त्रादिकानें कांहींएक पदार्थ संबद्ध होई असें चिकटविणें ·

**मटयळ**, पु० वा० धोबी ·

**मटें**, न० दे० मडें ·

**मण**, पु० बारा पायल्यांचें किं० सोळा पायल्यांचें जें माप तें २, चाळीस शेर प्रमाण जें वजन तें ३, त्याणें मापलें किं० वजन केलें जें धान्य, घृतादिक तें ·

**मणका**, पु० ज्यांत मणभर धान्य राहातें तें माप, किं० मण वजनाचा दगड, इ० असतो तो, २, मण प्रमाण धान्य राहातें असें जें मडकें, पाटी, इ० तें किं० मणाचे वजनाचा धोंडा इ० तो, ३, मोठा जो मणी तो, ४, पाठीचा कण्याचा हाडाच्या ज्या गांठी त्या प्र० ·

**मणकी**, स्त्री० मणाचे वजनाचा धोंडा, इ० ती ·

**मणगट**, न० हाताचें पंजाच्या आणि कोपराचे मधला जो भाग तें परंतु पंजाच्या जो संधिप्रदेश तेथें व्यवहार बहुत, मनगटांत जोर असणें. म्ह० कांहींएक कृत्याविषयीं शारीरद्रव्यादि बळ असणें, त्याचे मनगटावर तेल घातलें पाहिजे, एथें कांहींएक विषेविषयीं तो अज ·

**मणगटी**, स्त्री० मण्यानीं निर्मित जें मणगटांत घालायाचें भूषण ती ·

**मणदोरा**, पु० वटव्याचें तोंड आवळावें उघडावें म्हणून जो त्या बटव्याचे तोंडास दोरा घालितात तो, २, गाड्यावर कडब्याचा किं० गवताचा हेल बांधावयाचा जो दोर तो ·

**मणि**, पु० हिरकादिकरत्न २, तत्सदृश पाषाणादिकाचे कृत्रिम करितात तो, ३, रुद्राक्षादिक, ज्याचा माळा इ० करितात तो, ४, ला० ज्यामध्यें कांहींएक विशेष गुण आहे त्याचें वर्णन कर्तव्य असतां त्यास म्ह० ५, दे० गाड्याचे हेल आंवळायास, किं० नावेस शिडकाठी बांधायाच्या इ० रूप दोर ओढायाकरितां पोटांत चाक करून काष्ठाचा अवयव विशेष केला असतो तो, हाडाचे मणी करणें, म्ह० हाडें झिजायाजोगा कांहींएक कार्याविषयीं बहुत श्रम करणें, ते एका माळेचे मणी आहेत, म्ह० एका प्रतीचे जे दोन मनुष्य त्यास निंदेने म्ह०

**मणिकर्णिका**, स्त्री० एक काशीमध्यें क्षेत्र आहे २, एक धातुमय पात्र विशेष आहे ·

**मणिबंध**, पु० सं० मणगट ·

**मणेर, मण्यार**, पु० एक जाति आहे २ एक किरडूं आहे ·

**मत**, न० कांहींएक गोष्टीविषयीं मनांतला जो निश्चय तें २, वादादिकांतील जे अनेक पक्ष ते प्र० ३, कांहींएक गोष्टीविषयीं कोणा एकाचें घेतात जें अनुमत तें ·

**मतरणें**, अश्मा इ० मंत्रानें युक्त करणें २, ला० एखाद्यास कांहीं कानांत सांगून त्यानुकूल बुद्धि विशिष्ट करणें ·

**मतलब**, पु० مطلب हिं० कांहींएक गोष्ट सिद्ध करण्याविषयीं जो मनांतील आशय तो, २, तदर्थ कपटानें बांधिलीं जी मसलत तो ·

**मतलबदार**, ३ लिं० مطلبدار हिं० मतलबी ·

**मतलबी**, ३ लिं० مطلبی हिं० अनेक यत्नांनीं आपला मतलब सिद्धीस नेतो असा जो मनुष्य तो ·

**मतवादी**, ३ लिं० सं० कांहींएक मत स्वीकारून त्याचा सदसद्विचार न करितां त्याविषयीं हेंच खरें असा वाद सांगण्याचा स्वभाव ज्याचा तो ·

**मताभिमान**, पु० सं० कांहींएक मत स्वीकारून तद्विषयीं धरिला जो अभिमान तो ·

**मति**, स्त्री० सं० बुद्धि ·

मतिमंद, ३ लिं० सं० बुद्धिमंद ·

मत्कुण, पु० सं० ढेकूण ·

मत्त, ३ लिं० मद्यलक्ष्मी इ०कांचा मदानें उन्मत्त जो तो ·

मत्ता, स्त्री० हिं० स्वीयजी द्रव्यादि संपत्ति ती. स्न० काडीची मत्ता आणि लाखाची मत्ता बरोबर होत नाहीं ·

मंत्र, पु० ज्याची काहीं विलक्षण शक्ति असती असें जें कांहीं ऋष्यादिकृत वाक्य तो, २, ला० खलबत ·

मंत्रप्रयोग, पु० मंत्राचा जो प्रयोग तो ·

मंत्रमुख, ३ लिं० कांहीं स्वकर्मापुरते मंत्र ज्यास येतात असा जो ब्राह्मण तो ·

मंत्रवादी, ३ लिं० मंत्री ·

मंत्रसाधन, न० मंत्र सिद्ध व्हावा म्हणून जें पुरश्चरणादिक करितात तें ·

मंत्रसिद्धि, स्त्री० मंत्रेंकरून जी सिद्धि ती ·

मंत्री, पु० प्रधान, २, सर्पादिकांचे विष उतरायाचे इ० मंत्र जाणतो तो, ३, अष्टप्रधानांतील एक प्रधान आहे, ४, ला० जो कोणी एखाद्यास बुद्धिवाद सांगतो तो त्याचा ·

मत्सर, पु० कोणा एकाचें बरें झालें असतां देखूं सकूं नये असा जो कांहीं धर्म उत्पन्न होतो तो, २, दे० न० एक क्षुद्र प्राणी आहे ·

मत्सरी, ३ लिं० मत्सर उत्पन्न होण्याचा स्वभाव ज्याचा तो ·

मत्स्य, पु० मासा याचा अपभ्रंश जो त्यावांचून, २, एका वृत्ताचे शेजारीं दुसरें वृत्त पूर्ववृत्त परिधीचे आंत जाई असें रेखिलें असतां दोहोंचे संयोगामध्यें जो आकारविशेष पडतो तो ·

मत्स्यजयंती, स्त्री० मत्स्यावतार ज्या तिथीस झाला ती तिथी ·



मत्स्यावतार, पु० ईश्वराचा दाहा अवतारांतील जो पहिला तो ·

मथणें, कांहीं एक कार्य करण्याविषयीं कोणीएकानें बोधादि केला असतां अनुकूल होणें, २, दध्यादिक घुसळणें, ३, ग्रं० एखाद्यास जिवें मारणें, ४, ग्रंथादिकांतील आशय मनांत पावयाकरितां त्याचें विवेचन करणें ·

मथन, न० दध्यादिक घुसळण्याचा जो व्यापार तें ·

मथन, न० मथणें प्रथमार्थावांचून अर्थांचा जो व्यापार तें ·

मंथा, पु० सं० रवीचा जो माथ्या तो ·

मथित, ३ लिं० मथिलें जें दध्यादि तें किं० मथून काढिलें जें नवनितादि तें ·

मथितार्थ, पु० सं० विचारानें सिद्ध झाला जो अर्थ तो ·

मथुरा, स्त्री० एक क्षेत्र आहे ·

मंद, ३ लिं० जड बुद्धि तो, २, ज्याचे अंगीं चांचल्य नाहीं तो मनुष्य घोडा बैल इ० तो, ३, नवग्रहांतील शनैश्चर जो ग्रह तो, ४, किंचित अंधक जी दृष्टि ज्योति इ० तो, तुमचें कामाचें मंद पडलें आहे, स्न० मंदगतीनें चालतें आहे, दुखणें जरीमरी इ० कांचें मंद पडणें स्न० कमीपणा होणें ·

मद, पु० उन्मत्तता, २, हत्तीचा गंडस्थळांतून उन्मत्ततादशेंत जो द्रव निघतो तो, ३, पुष्प, फल, इ० कांतून जो उदकासारिखा असतो तो, धन मद, विद्या मद इ० समास होतात ·

मदगर्दी, स्त्री० मधघडी ·

मदत, स्त्री० ११ हिं० सहायता, २, ३ लिं० सहाय, उ० तो त्यास मदत आहे, ३, स्त्री० एक ओढाऱ्याचा अंमल

आहे.

**मदतगार**, उ॰लिं॰ مددگار हिं॰ दुसऱ्याची सहायतारूप मदत करितो तो.

**मदतगारी**, स्त्री॰ مددگاری हिं॰ मदतगाराचें कर्म तें.

**मदन**, पु॰ कामदेव २, स्त्रीसंभोगाची इछा उत्पन्न होते जेणें असा जो शरीरांत विकार उत्पन्न होतो तो.

**मदनकामेश्वर**, पु॰ एक रसायन आहे.

**मदनबाण**, पु॰ एक मोगऱ्यामध्यें भेद आहे.

**मदनाचापुतळा**, पु॰ अत्यंत सुंदर जो त्यास म्ह॰

**मदनी**, पु॰ एक झाड आहे.

**मंदर**, **मंदराचल**, **मंदराचळ**, पु॰ एक पर्वत आहे.

**मंदवार**, **मंदवासर**, पु॰ सानवाजोवार तो.

**मदविव्हल**, **मदविव्हळ**, उ॰लिं॰ कामादिकाचा मदानें जो परवश झाला तो.

**मंदवेळ**, **मंदवेळा**, स्त्री॰ जा काळावर कार्य आरंभिलें असतां लवकर तडीस जात नाहीं असा जो काळ तो.

**मंदाई**, स्त्री॰ मंदपणा या अर्थांनें प्रा॰

**मंदाग्नी**, अ॰ मंद अग्नि लावून सावकाशपणीं, शिजव, भाज इ॰ धा॰ वि॰, उ॰ ती भाजी मंदाग्नीं शिजूं दे.

**मंदाग्नि**, पु॰ प्रदीप्त नव्हे जो जठराग्नि तो २, उ॰लिं॰ ज्याचा जठराग्नि मंद तो.

**मदांध**, उ॰लिं॰ द्रव्यादि मदानें ज्याचा विचार नष्ट झाला तो.

**मंदार**, पु॰ स्वर्गीं एक कल्पवृक्ष आहे, २, एक पुष्पवृक्ष आहे.

**मदार**, स्त्री॰ हिं॰ भिस्त, २, उंटाचे पाठीवर जो उंच अवयव असतो तो.

**मंदावणें**, भरानें प्रवृत्त जो युद्ध, कलह, रोग, इ॰ त्याणी मंदगतीनें चालू असणें.

**मंदवा**, पु॰ दे॰ मंदाई.

**मंदिर**, न॰ सं॰ गृह, राजमंदिर, देवमंदिर, इ॰ समास होतात.

**मदिरा**, स्त्री॰ सं॰ मद्य

**मंदी**, स्त्री॰ सं॰ मंदाई

**मंदील**, न॰ हिं॰ जरीचे काडीचें जे लाहान पागोटें असतें तें.

**मदोत्कट**, उ॰लिं॰ सं॰ मद झालेला हस्ती.

**मदोन्मत्त**, उ॰लिं॰ द्रव्यादिमदानें जो उन्मत्त तो.

**मद्य**, न॰ सं॰ प्यायाची जी दारू तें.

**मद्यपी**, उ॰लिं॰ मद्यपान करितो तो.

**मद्राशी**, उ॰लिं॰ मद्रास संबंधी जा पदार्थ.

**मध**, स्त्री॰ पु॰ मधुमक्षिका आपलें पोळ्यांत पुष्परसाच्या संचय करून ठेवितात तो तो, २, कित्येक पुष्पांत मधुर द्रव असतो तो तो, ३, फणसाचे गऱ्यांत जो उदकरूप द्रव असतो तो, ४, गव्हांचीं सातें एक दिवस वाळवून एकत्र रचून ठेविलीं असतां जो द्रव निघतो तो तो, कोण एकास मधाचें बोट लाऊन ठेवणें. म्ह॰ कांहीं एक गोष्टी विषयीं आशा दाखविणें.

**मधघडी**, स्त्री॰ दौलताबाद, व अमदाबाद इ॰ संबंधी जे कागद त्याची जे मध्यम प्रतीची घडी ती.

**मधल्या**, उ॰लिं॰ मधला.

**मधल्येमधीं**, अ॰ मध्येमधीं

**मधपिंपळी**, स्त्री॰ मध आणि पिंपळी ती.

**मधपुळी**, स्त्री॰ काळपुळीसारखी एक पाठीवर पुळी होत असती ती.

**मधलंड**, उ॰लिं॰ कांहीं एक कार्यादिकामध्यें जो उत्कृष्ट नव्हे

**मुलना**, पु० हिं० यवनानें पढविणारा जो यवन असतो त्यास म्ह०

**मुलाइम**, ३ लिं० मृदु, नाजुक, खरेरव, असा जो पदार्थ तो.

**मुलाखत**, स्त्री० ملاقات हिं० कोणाएकास कोणाएकाची जी भेट होती ती.

**मुलाजा**, पु० हिं० अपराधादिकांचि जी क्षमा ती.

**मुलाणा**, पु० हिं० मुलना.

**मुलामा**. पु० ملمع हिं० सोनें रुपें यांचाजी इतर धातुमय पात्रास रंग, किं० धूर, इ० देतात तो.

**मुलामी**, ३ लिं० हिं० मुलाम्यानें युक्त केलाजो पात्रादि पदार्थ तो.

**मुलूक, मुलूख**, पु० हिं० विवक्षितजो देश तो.

**मुलूकमैदान**, न० हिं० शहर, इ० कांतील यसाहात मोडून झालें जें मैदान तें.

**मुलूखमैदान**, न० हिं० मुलूकमैदान.

**मुशाकील**, स्त्री० हिं० कांहीं एक कार्य करण्याविषयीं किं० होण्याविषयीं जी संकटावस्था प्राप्त होती ती; २, ३ लिं० दुर्घट.

**मुशाफर**, ३ लिं० مسافر हिं० प्रवासी.

**मुशाफरी**, स्त्री० हिं० मुशाफराचें जें पर्यटनादि कर्म.

**मुशारखोर**, ३ लिं० मुशारा देऊन ठेविलाजो चाकर तो.

**मुशारा**, पु० हिं० कांहीं एक कामासाठीं ठेविलाजो चाकर त्यासजें तत्संबंधी देय देतात तो.

**मुशाहिरा**, पु० مشاهره हिं० मुशारा.

**मुष्टि**, पु० स्त्री० सं० हाताच्या अंगुली एकत्र आकुंचित केल्या असतांजो आकार होतो तो ती; २, तत्परिमितजें धान्यादिक तो ती; ३, तरवार इ० शस्त्रास हातीं धरायाकरितां जी केली असती तो ती.

**मुष्टिप्रयोग**, पु० कोणाएकास मारायाकरितांजो मंत्रप्रयोग करितात तो.

**मुष्टिमोदक**, पु० कोणाएकास प्रहार करायाकरितां केलाजो मुष्टि त्यास म्ह०

**मुसकट, मुसकड**, न० मुखप्रदेशास निंदेनें म्ह०

**मुसकटणें**, मुसकडावर मारणें.

**मुसकल**, न० मुसकट.

**मुसकाड**, न० मुसकट.

**मुसकी**, स्त्री० कोणाएकाचे हात मागें आंवळून बांधण्याचाजो प्रकार ती: प्रयोग अनेक वचनांत.

**मुसकील**. स्त्री० हिं० मुशाकील.

**मुसकूट**, न० मुसकट.

**मुसकें**, न० बैल. इ० कानीं धान्यादि न खावें म्ह० मुखास प्रतिबंधक जें दोरीचें आळ्यासारिखें वळून बांधितात तें; २, मुसकट.

**मसज्जर**, पु० مشجر हिं० कलाबतूचे वस्त्राचा एक भेद आहे.

**मुसंडी, मुसांडी**, स्त्री० दाटी इ० कांत प्रवेश करायासाठीं किं० त्यांतून पार पडायासाठीं तोंड पुढें करून किंचित् वांकून केलाजो शरीराचा आकार ती; मार, दे, इ० धा० प्र०

**मुसमुसणें**, शरीरांत तारुण्यादिकाचा भर होणें किं० त्या तारुण्यादि भरानें मनुष्यादिकांनी युक्त होणें; २, दे० क्रोधानें संतप्त होणें.

**मुसल**, न० कंडनार्थ एक दीर्घ वर्तुलकाष्ठकरून त्यास लोखंडाची मांडळ बसवून करितात तें ·

**मुसलमान**, पु० स्त्री०ईण, हिं० यवनांत एक भेद आहे ·

**मुसलमानी**, ३लिं० हिं० मुसलमानसंबंधी जी भाषा, वेश, इ० तो ·

**मुसळ**, न० मुसल, मुसळ नेसणें म्ह० आपली अबरू सोडून निर्लज्जपणाचे आचार करूं लागणें: मुसळास अंकुर फुटणें, म्ह० रोग, थंड, इ० कारणानीं मनुष्यांतून केवळ उठला जो त्याणें पुनः मनुष्यपणांत येणें; म्ह० सगळें मुसळ केरांत -

**मुसळकंद**, पु० ला० जो दांडगेवर त्यास तिंदेनें म्ह०

**मुसळकांडा**, पु० निमसडा जो तांदुळ तो. याचा प्र० बहुवचनांत ·

**मुसळधार**, स्त्री० मुसळासारिखी मोठीजी पर्जन्याची धार तो; २, ३लिं० तद्विशिष्ट जो पर्जन्य. सर, इ० तो·

**मुसळसळ**, स्त्री० मुसळ करायासाठीं तयार करितात जें काष्ठ तो ·

**मुसळसळई**, स्त्री० मुसळसळ ·

**मुसळी**, स्त्री० एक औषधी आहे ·

**मुसळेकोनफळ**, न० कोनफळांत एक जाति आहे ·

**मुसांडा**, पु० पर्वतादिकांवरून पडतीजी मोठी पाण्याची धार किं० नळ, इ० कांतून उडतीजी पाण्याची धार तो; २, ला० कांहींएक प्रतिबंधकांतून पार व्हायासाठीं जमून धांवत चालला जो मनुष्यादि समुदाय तो ·



**मुस्तकीम**, ३लिं० काईम; २, स्त्री० हंगाम; ३, न० डोंगराचें शेवटचें टोंक तें ·

**मुस्तकीम**, ३लिं० काईम·

**मुस्ता**, पु० नागरमोथा ·

**मुहूर्त**, पु० घटिकाद्वयात्मक जो काल तो; २, लग्नादिकार्याविषयीं योजिला जो उत्तम समय तो; ३, कांहीं एक कार्यास जो आरंभ तो; ४, मूर्तिशब्दाचा अपभ्रंश·

**मुहूर्तमणी**, पु० विवाहामध्यें नवऱ्ये मुलीचे गळ्यांत जें मंगळसूत्र बांधितात तो ·

**मुहूर्तमेढ**, स्त्री० विवाहादिकांच्या मंडपप्रारंभीं, किं० गृहादिबांधायाचे प्रारंभीं जी स्त मुहूर्तावर मेढ पुरितात ती ·

**मुळकंड**, **मुळखंड**, न० वृक्षादिकांच्या मूलप्रदेश भाग तें ·

**मुळखंडी**, स्त्री० लहान मूळखंड ·

**मुळमुळीत**, ३लिं० पळपळीतजें भाषण, इ० तो ·

**मुळमुळणें**, गुळमुळणें ·

**मुळमूळ**, स्त्री० दुसऱ्यानें लौकर न समजाया जोगें हळूहळू जें चेंगट भाषण ती; २, पावसाची जी पिरपीर ती; अ० हळूहळू बहुतवेळ रडण्याचें अनु० व वि० हा त्याचेंच ·

**मुळव्याध**, **मुळव्याधि**, स्त्री० अर्श म्हणून जो रोग ती ·

**मुळा**, पु० भाजीचे उपयोगी लाहान झाड आहे तो व त्याचा कंद तो ·

**मुळी**, स्त्री० मुळखंडी ·

**मुळेमाठ**, पु० माठाचे भाजींतील एक भेद आहे

**मुळ्हारी**, पु० मुन्हाळी·

**मुश्खूद**, स्त्री० मुरवशञ्चान्धा अपभ्रंश·

**मूक**, ३लिं० ज्यास वाणी नाहीं तो मनुष्य·

**मूग**, पु० एक द्दिदल धान्य आहे तो; मूग खाणें, मूग गिळणें, मुगांचें करणें, इ० स्थलीं कोणी आपल्यास शिव्या दिल्या किं० कांहीं अपराध केला इत्याद्यनेक कारणें झालीं असतांहीं न बोलतां उगीच राहणें·

**मूठ**, स्त्री० मुष्टि; २. कोणाएकास मारायाकरितां जो मंत्रप्रयोग करितात तो; ३, घोडा, हत्ती, उंट इ० पशूंस चंदी देतात, त्यांतील कां . . . जे त्याचे त्याचे खासदारादि असतात त्यांस देतात ती; ४, पु० बैल इ०कांचे पाठीवर जो खोगिरासारिखा घालीत असतात तो; ५, आंबणाची जी त्यांचे अग्रानीं बांधून जुडी करितात तो . . . मूठ पेरणें, टाकणें, स्व० भात मुठींत घेउन पेरणें; मूठ चांगली लागणें, स्व० पेरलेलें भात अविछिन्न पणीं चांगलें रुजणें; मूठ दाबणें, चेपणें, इ० स्थलीं कांहींएक कार्यार्थ कोणाएकास गुप्त द्रव्यादि देऊन स्ववश करणें; स्व० झाकली मूठ सवा लक्षाची·

**मूठमरदाई**, स्त्री० एकमताचे अनेक मिळून केलीजी दांडगाई ती·

**मूठमाती**, स्त्री० मेलेल्ये मनुष्याची जी जमीनीत पुरणें, इ० रूप क्रिया ती

**मूढ**, ३लिं० अज्ञजो मनुष्य तो·

**मूत**, न० गुह्येंद्रियद्वाराजें शरीरांतील उदकासारिखें पडतें तें·

**मूत्र**, न० मूत·

**मूत्रकृच्छ्र**, पु० न० मूततेसमयीं वेदना व्हायाजोगा एक रोग आहे·

**मूद**, स्त्री० ओगराळ्यांत भात इ० घालून चेपून ठोकून पाडिल्यानें पदाकारविशिष्ट होती ती; २, एक स्त्रियांचें शिरोभूषण आहे·

**मूर**, स्त्री० शेत इ०कांतील कोंडलेलें पाणी बाहेर झरून जावयाजोगीं जीं बांध, इ०कांस गुप्त छिद्रें पडलीं असतात तीं; २, दे० तूप कढून थिजलें स्व० त्याचे खालीं मळ बसतो ती·

**मूर्ख**, ३लिं० मूढ·

**मूर्खवाद**, पु० कांहींएक गोष्टीविषयीं मूर्खपणानें केलेंजें भाषणादि तो·

**मूर्च्छना**, स्त्री० पित्तवात इत्याद्यनेक विकृतीमुळें ज्ञप्तिबुद्धिही न व्हायाजोगी जी मनुष्यादिकोस अवस्था प्राप्त होती ती; २, गाण्यांतीलजे ससस्वर त्यामध्यें प्रथम स्वरापासून द्वितीय स्वर होईपर्यंत जे सूक्ष्म तीन स्वरांश होतात ते प्र०

**मूर्च्छा**, स्त्री० मूर्च्छना प्रथमार्थी·

**मूर्च्छागत**, ३लिं० मूर्च्छा जास प्राप्त झाली तो·

**मूर्च्छित**, ३लिं० मूर्च्छागत·

**मूर्त्त**, ३लिं० मूर्तिमत् जो पदार्थ तो·

**मूर्ति**, स्त्री० देवादिकांची जी प्रतिमा करितात ती; २, ला० प्रसंगविशेषीं मनुष्यावरही व्यवहार होतो·

**मूर्तिमंत**, ३लिं० मनुष्याद्याकारविशिष्टजो पदार्थ तो; उ० त्यास देवी आज मूर्तिमंत येऊन भेटली उ० अरे तुला मूर्तिमंत शंभर रुपये दिले असतां नाकबूल जातोस·

**मूर्धन्य**, ३लिं० ऋ, टवर्ग, रेफ, आणि षकार या

वर्णांचें मूर्धास्थान होय ह्मणोन यांस मूर्धन्य असें ह्म०

मूर्धा, पु० सं० मस्तक ·

मूर्धाभिषिक्त, ३ लिं० सं० राज्याचाठायीं अभिषिक्त जो राजा तो; २, ला० ज्या व्यवहारांत जो मुख्य तो ·

मूळ, न० सत्तावीस नक्षत्रांतील एकुणिसावेंजे नक्षत्र तें; २, ३ लिं० मुलगा, मुलगी, मुलगें, तें; ३, वृक्षादिकांचें जे पाळ तें; ४, कांहींएक व्यवहाराचा किं० पदार्थाचा आदिभूत किं० कारणीभूत जो अवयवादिक तें, ज्यापासून त्याच्या व्यवहाराची व पदार्थाची वृद्धि होती तें ·

मूलक, पु० सं० मुळा; २, कांहींएक निमित्त मागें लावून एतन्मूलक, तन्मूलक, पापमूलक दुःख, इ० समास होतात ·

मूस, स्त्री० सवर्ण, रुपें, इ० कांच्या रस करायाचें एक पात्र आहे ती; २, ओतींव मूर्तिपात्र, इ० करायासाठीं जें विवक्षित आकारविशिष्ट मृत्तिका मेण, इ० कांचें करितात ती ·

मूसमारग, पु० मागमूस ·

मूळ, न० मूल, द्वितीयार्थावांचून सर्वार्थी; २, सासरें, माहेर, आजोळ, इ० कांकडील कोणएकास घेतेंजें बलावणें तें; तो पोर त्याचे मुळावर आला आहे बसला आहे, इ० स्थलीं तो त्याच्या संपत्ति, इ० कांच्या नाशास कारण आहे ·

मूळगांव, पु० न० विवक्षित मूळपुरुष वृत्ति संपादनपूर्वक ज्या गांवीं राहात आले तो ·

मूळपत्र, न० अस्सलपत्र ·

मूळपीठिका, स्त्री० कांहींएक व्यवहाराचें मूलभूत जें वर्तमान ती; २, कांहींएक व्यवहाराची जी परिभाषा इ० ती; उ० अनुष्ठानाची मूळपीठिका ठाऊक असल्यावांचून करायास येत नाहीं ·

मूळपुरुष, पु० वंश विस्तारास कारणभूतजो विवक्षित प्रथम पुरुष तो ·

मूळबांध, पु० शेत बांधण इ० कांस पाण्याचा नेट संभाळायासाठीं मोठा मजबूद जो बांध बांधितात तो ·

मूळबंद, पु० मूळबांध ·

मूळवास, पु० वाडीचाजो केवळ पिछाडीकडला प्रदेश तो ·

मृग, पु० सं० पाचवें जें नक्षत्र तो; २, हरिण; ३, शास्त्रीय व्यवहारांत साधारण पशूंसही ह्म०; ह्म० मृगाचे आधीं पेरावें आणि बोंबेच्याआधीं पळावें ·

मृगजल, न० सूर्यकिरणाच्याठायीं जलाची भ्रांति होती ती ·

मृगतृष्णा, स्त्री० सं० मृगजल ·

मृगया, स्त्री० सं० पारध मुख्यार्थी ·

मृगशितळाई, स्त्री० मृगाचा पाऊस पडल्यानंतर जो थंडावा होतो ती ·

मृगशीर्ष, पु० सं० मृग प्रथमार्थी ·

मृगेंद्र, पु० सं० सिंह ·

मृणाल, न० सं० कमलाचा जो देंट तें ·

मृत, ३ लिं० सं मरणपावलाजो तो ·

मृतपत्र, न० शरीर अनित्य हें जाणून आपल्यासंपत्ति आदिकांची व्यवस्था असुकानें असुकरीतीनें करा-

वा असें जें पत्र करून ठेवीत असतात तें·

मृतप्राय, ३लिं० मेल्यासारिखा तो·

मृतलेख, पु० मेल्या मनुष्याचे हातचा प्रमाणार्थ लेख काढितात तो·

मृतवंध्या, स्त्री० मरतवांझ·

मृति, स्त्री० सं० मरण्याचा जो व्यापार ती·

मृत्तिका, स्त्री० सं० माती·

मृत्यु, पु० सं० मरण; २, यम·

मृत्युगोदान, न० ला० रोगादिकानें अत्यंत अशक्त झाला जो मनुष्य, पशु, इ० तें; २, मेलतोंड्या·

मृदंग, पु० पखवाज·

मृदंगी, ३लिं० पखवाजजी·

मृदंग्या, ३लिं० मृदंगी·

मृदु, ३लिं० सं० मऊ·

मृन्मय, ३लिं० मृत्तिकेचें जें पात्रादि तो·

मृषा, ३लिं० सं० मिथ्या·

मेकाड. न० शिरीस इ० भाजीपाल्यावर जो रोगरूप क्षुद्रजंतु उत्पन्न होत असतो तें·

मेकाडा, पु० मेकाड·

मेकी. स्त्री० एक वेल आहे·

मेकूड, न० पु० नाकांतील मळाचा जो खरपुड्या निघतात तें तो·

मेकें, न० मेकीचें जें फल तें·

मेख, स्त्री० अश्व, रावटी, डेरा, इ० कांचा बंधनार्थ जो हात दीड हात काष्ठाचा तुकडा गाधदून तासून करितात ती; २, ला० बलाढ्य मनुष्य, पशु, इ० त्यास म्ह०; खिळा, चुका, इ० कांसही समय विशेषीं मेखा म्ह०; मेखा उपटणें, खांद्यावर देणें इ० स्थलीं कोणाएकास स्थानच्युत करणें; मेखमारणें म्ह० चाललेला किं० चालू होणारा जो व्यापार तो अटकून पडे असें करणें; मेखेवर बसविणें म्ह० कोणाएकाबरोबर मसलतेनें चालायाचें असतां तें सोडून वांकडी गोष्ट सांगणें; म्ह० सोन्याची मेख आणि तमाशा देख·

मेखलणें, अ० वादिक मेखेस गुंतविणें; २, ला० चालते किं० चालू होणारें कार्य कांहींएक प्रतिबंधें करून अटकून पडे असें करणें·

मेखला, स्त्री० सं० कटिसूत्र·

मेखस, पु० रावटी, इ० कांचा मेखा ठोकायाचा मोगर असतो तो·

मेख्या, ३लिं० शरीरानें किं० बुद्धिनें ०कानें जो खबरदार तो·

मेँग, स्त्री० सर्पादिकांची जी कात ती·

मेँगा, मेँग्या, ३लिं० अपराक्रमी जो मनुष्यादि तो·

मेँगावणें, सर्पादिकांनीं मेंगेस येणें; कांहींएक कार्याचे आरंभीं मोठें शौर्य दाखवून मग मागें सरणें·

मेँग्यामारवाडी, पु० बाहेर गरीबीची मुद्रा दाखवून पोटांत ज्याचे लबाडी बहुत असती तो·

मेघ, पु० उदकवृष्टि करणारा जलद तो·

मेघमंडल, न० मेघांचा समुदाय तें किं० तो समुदाय जा ठिकाणीं राहतो तें स्थान तें·

मेचट, ३लिं० मिचमिचित·

मेचणें, कांहींएक व्यापारीं प्रवर्त्त जो मनुष्य त्याणें भयादि कारणानें कुंठित गति होउन माघार घेणें किं० स्तब्ध राहाणें·

मेज. न० वजनी, केली इ० मेजायास साधनभूत जीं

जीं अधोली. मणका. गज. इ० प्रमाणें असतात तीं प्र०;२, धान्यादि मेजण्याच्या व्यापार तें व त्या व्यापारानें झालेंजें इयत्तारूप फल तें ·

**मेजणें**, अंकसंख्येनें, किं० अधोली, इ० प्रमाणादि संख्येनें धान्य मनुष्य इ० पदार्थ संख्यात करणें:२ ला० गणणें , याच्या लाक्षणिकार्थी ·

**मेजबान, मेजवान**, ३लिं० मेजवानी करायास योग्य मनुष्य तो ·

**मेजबानी, मेजमानी, मेजवानी**, स्त्री० हिं० सोयरे धायरे किं० संपत्तिमंतजे लोक त्यांस आदरपूर्वक जेमिष्टान्नभोजन घालण्याच्या व्यापार तें ·

**मेट**, न० किल्याचे बाहेर जागोजाग नाक्यानाक्यास जी चौकी असती तें; मेटें बसणें, स० भय, दुर्वार्ता वार्धक्य, इ० कारणामुळें कोणाएकाचें अवसान जाणें; अ० अतिशयित काळोख अंधार याचे वि०

**मेटकरी**, ३लिं० किल्याचे मेटावरील जे चौकीदार ते प्र०

**मेटेखुंटी**, स्त्री० दोंपरखुंटी ·

**मेंडकी**, स्त्री० दे० पायांतील किं० हातांतील जी बेडकी ती·

**मेढ**, स्त्री० प्रायः नांगें असतें जा खांबास ती; स० हातीं लागली चेड आणि धर मांडयाची मेढ ·

**मेंढका**, ३लिं० मेंढरें राखितो तो ·

**मेढकी**, स्त्री० लाहानजी मेढ ती ·

**मेंढकें**, न० मेढकी ·

**मेंढक्या**, ३लिं० मेंढका·

**मेंढरूं**, न० एक पशु आहे; स० मेलें मेंढरूं आगीस भीत नाहीं

**मेंढवाडा**, पु० दे० मेंढराच्या जो कळप तोच तो कळप बांधायाचें जें स्थान तो·

**मेंढा**, पु० एडका;२, ३लिं० सरळ रूलांत सांपडायाजोगा नव्हे असाजो काष्ठादिकांच्या दबलेला अंश तो व तद्विशिष्ट काष्ठादि तो; ३, बैल इ० कांचीं मागल्ये बाजूस दबलेलीं शिंगें तीं व तद्विशिष्ट बैल, इ० तो ·

**मेढा**, पु० कुपणादिकास जो एरंड, चिकाडा, इ०कांच्या डांभा पुरतात तो;२, मनुष्यादिकांच्या प्रतिबंधार्थ जवळजवळ लांकडें उभीं पुरुन कुडासारिखा भारी बळकट करितात तो;३, ला० कांहीं एक गोष्टीविषयीं कोणाएकासजो आश्रयभूत तो त्यास·

**मेढावणें**, कुपणादिक मेंढयानीं युक्त करणें ·

**मेंढी**, स्त्री० मेंढरातील जी स्त्रीजाति ती ·

**मेंढीगरव्हार**, स्त्री० प्रसूतझाल्यानंतर पुनः विटाळशी न होतां जी गर्भिणी झाली ती ·

**मेढेकोट**, पु० मेढा द्वितीयार्थी ·

**मेढेजोशी**, पु० दाकोता ·

**मेढेदाई**, ३लिं० आपल्ये वाडी,शेत, इ० कांचे अंतरवही इ०कांच्या जो धनी तो ·

**मेढेदाईक**, ३लिं० मेढेदाई ·

**मेण**, न० मधीच्यापोळ्यांत जो चिकट अंश असतो तें; २, तरवार, इ० शस्त्र आच्छादनार्थ पोटीं काष्ठ आणि बाहेरून चर्मादि लावून जें करितात तें ·

**मेणकट**, ३लिं० तेल,तूप, इ०कांचे चिकटपणानें. किं० मळानें युक्तजो समर्चा, इ० पदार्थ तो;२,न० तो मळ किं० चिकटपणा तें ·

मेणकरणें, तेलादिकांचा मेणकटानें समयीं इ०कानीं युक्त होणें.

मेणकापड, न० मेणानें युक्त करितात जें कापड तें.

मेणगट, न० केवळ मऊ झालाजो भात तें.

मेणचोंट्या, ३लिं० मेंग्या मारवाडी.

मेणबत्ती, स्त्री० जा वातीच्या सभोंवार मेण बसवून जी दीप लावायाकरितां करितात ती.

मेणबाजार, पु० प्रा० शहरचे रस्त्यांत पालें देऊन जो कापडाचा बाजार असतो तो.

मेणवणें, मेण,तेल,इ० कांची बेरी इ०कानें सूप, टोपली, इ० पदार्थ सर्वावयवीं लिप्त करणें.

मेणवात, स्त्री० मेणबत्ती.

मेणा, पु० डोलीसारिखें एक वाहन आहे तो.

मेण्या, ३लिं० मेणचोंट्या.

मेण्यामारवाडी, ३लिं०मेण्या.

मेतकूट, न० तांदूळ. दोन चार प्रकारच्या दाळी. मोहोऱ्या, मेथ्या, इ० अनेक पदार्थ एकत्र करून दळून जें तोंडी लावायाकरितां करितात तें; मेतकूट मिळणें म्ह० कोणाएकाचें कोणाएकाशीं सख्य होणें.

मेथकूट, न० मेतकूट.

मेथा, पु० मेथीमध्यें एक जाति आहे.

मेथी, स्त्री० एक उपधान्य आहे व त्याचें जें झाड तें.

मेथोडा, पु० बाळंत इ०कांचे साठीं जे मेथ्यांचे पिठाचे लाडू करितात तो.

मेद, पु० शरीर संबंधी जा रक्तादि धातू त्यांतील एक धातू आहे.

मेदगी, स्त्री० मेंढ्या शेळ्या यांचा लेंड्या व माती व आणिक कितिएक पदार्थ घालून करून भिंत, इ० कांस साफी यावी म्ह० करून ठेवितात ती.

मेदिनी, स्त्री० सं० भूमि.

मेंढी, स्त्री० एक झाड आहे.

मेंढा, पु० मेंढीतलाजो नर तो.

मेंढू, पु० अंग ठेचलें असतां त्यांतून मांसासारिखा जो अंश निघतो तो.

मेधा, स्त्री० धारणाशक्ति जा बुद्धिमध्यें आहे ती बुद्धि; २, अभिरुचि; ३, त्या मुलावर त्याची मेधा आहे तितकी याजवर नाहीं.

मेध्य, ३लिं० सं० पवित्र.

मेना, पु०मेणा.

मेमण, पु० मनुष्यांत एक जाति आहे.

मेमणचोट्या, ३लिं०दे० मेणचोंट्या.

मेमुलगाडा, पु० शरीरानें जो केवळ अशक्त तो.

मेर, स्त्री० शेत, वाडी, डोंगर, इ० कांची जी कड तीस धनी नाहीं मेरे आणि शेत भरलें बेरें.

मेरु, पु० पुराणप्रसिद्ध एक पर्वत आहे; २, गुडगुडीचा छिद्रांत मध्यभागीं जें सछिद्र काष्ठ बसवितात तो; ३, माळेचीं दोन्हीं शेवटें जा मण्यांत ओवितात तो मणी.

मेलतोंड्या, ३लिं० मुखदुर्बळ.

मेवा, पु० हिं० द्राक्ष, अंजीर, पेरू, अनार, खजूर, खारीक, इ० जे मिष्ट पदार्थ तो; म्ह० बाजारचा मेवा बापलेंकानी खावा.

मेवाडी, ३लिं० मेवाड संबंधी जो मनुष्य, इ० तो.

मेवाती, पु० हिं० एक हिंदूत जाती आहे.

मेशपात्र, मेषपात्र, न० अपराक्रमीजो त्यास म्ह०

मेशा, ३लिं० मेशपात्र·

मेष, पु० सं० बारा राशींतील जो प्रथम राशि तो;२,मेंढा प्रथमार्थी·

मेस्तक, न० हिं० मुलें,इ०कांस हिशेब शिकायासाठीं तन्हेतन्हेंचे हिशेब जा वहींत लिहिले असतात तें·

मेस्तरी, पु० सुनार, गवंडी,इ० जे शिल्पशास्त्र प्रवीण त्यास म्ह०

मेह,पु० एक रोग आहे·

मेहनत, स्त्री० कांहींएक कार्यकरण्याविषयीं श्रम व्हावयाजोगा जो व्यापार तो·

मेहनतमशागत, स्त्री० मेहनत इ०

मेहनती, ३लिं० मेहनत करण्याचा स्वभाव ज्याचा तो·

मेहरब.मेहराब, स्त्री० हिं० कोनाडा,भिंत,मरबर इ०कांस शोभेकरितां जी कमान करितात ती·

मेहरवान,मेहरबान,३लिं० हिं० सुप्रसन्न·

मेहरवानी,मेहरबानी, स्त्री० हिं० कृपा·

मेहरबानगी, स्त्री० मेहरबानी·

मेहरी, स्त्री० मेहेरी·

मेहुणा, पु० बायकोचाजो भाऊ,किं० बहिणीचाजो दादला तो·

मेहुणी, स्त्री० बायकोची जी बहीण ती·

मेहूण, न० दादला आणि बायको उभयतां मिळून तें त्या उभयतांस भोजनादिकांस बलावयाचें असतांच प्रा० प्र०

मेहेता,पु० गुजराती लिहिणाराजो कारकुन तो·

मेहेरणें, थंडी, इ० कारणानें शरीर किं० तदवयव जड होऊन रखरखीनें युक्त होणें, किं० कठिन स्वर्श व्हावयाजोगें बधिर होणें·

मेहेरी, स्त्री० मेहेरायाजोगी जी शरीर किं० तदवयवांस अवस्था प्राप्त होती ती·

मेळ, पु० वाजंत्र्याचा जो ताफा तो;२, मैथुनासक्त जें सर्पमिथुन तो;३, कों० कळंक,बेळू, इ०कांस जें बीज येतें तो;४, विशेष गुण उत्पन्न व्हायाजोगा जो परस्पर अनेक पदार्थांचा मिलाफ तो; ५,हिशेबादिकांचा जो ताळा तो·

मेळवण, न० मिळवण·

मेळवणी, स्त्री० मिळवणी·

मेळवणें, मिळवणें·

मेळा,पु० मनुष्यादिकांचा जो समुदाय तो;२,दे० न्याय: उ० आमचा मेळा निवडा·

मैत्र, ३लिं० मित्र प्रथमार्थी;२, न० अश्विन्यादि नक्षत्रांतील अनुराधा नक्षत्र तें·

मैत्राणी, पु० एक ब्राह्मणांत जाति आहे·

मैत्रिकी, स्त्री० मैत्रपणा·

मैत्री, स्त्री० मैत्रिकी·

मैथिल, पु० एक ब्राह्मणांत जाति आहे·

मैथुन, न० स्त्रीपुरुषांचा संगमार्थजो मिथुनीभाव तें·

मैंद, ३लिं० आळशी किं० बुद्धिमंद जो तो;२,पु० एक मनुष्यांत जाति आहे;३, नांगरलेल्या जमीनींत धान्य पेरून मग ती जमीन सारखी व्हावी आणि दाणा लपला जावा म्ह० जो झोंपा फिरवितात तो·

मैदा, पु० ओजवलेली जी कणीक तो·

मैदान, न० डोंगर,झाडी, इ०कांची अडचण ज्या ठिकाणीं नाहीं अशी जी सपाट सारखी जागा तें·

**मेदालकडी**, स्त्री० एक काष्ठौषधी आहे.

**मेना**, स्त्री० साळोंखीमध्यें एक भेद आहे.

**मेलखोर**, ३लिं० कितीही मळ बसला असतां केवळ मलिन दिसत नाहीं असा जो रंग तो किं० तद्विशिष्ट जें वस्त्रादि तो.

**मेलागर**, पु० एक चंदनांत भेद आहे.

**मेलागीर**, पु० मेलागर.

**मोकलणें**, मुख्य लाक्षणिक बंधनानें बांधलेला जो पदार्थ त्याणें स्वेच्छेनें वागावें, म्ह० त्या त्या बंधनापासून त्यास मुक्त करणें; हेल मोकलणें, धाय मोकलणें, म्ह० कंठ संकोच न करितां मोठ्यानें रडणें.

**मोकळ**, स्त्री० अनेक अवयव एकत्र करून बांधला जो लाडू, गोयला, इ० पदार्थ त्यांचें जें अवयव वैशकल्य ती; २, अ० प्रतिबद्ध न करितां अथवा न होतां फीर, सोड, इ० धा० वि०.

**मोकळा**, ३लिं० विवक्षित जो मुख्य किं० लाक्षणिक प्रतिबंध, इ० त्यानीं गुंतला नाहीं तो; २, परस्पर संयुक्त नव्हत जीं भाताचीं शितें, अक्षर, इ० तो.

**मोकळाढाकळा**, ३लिं० विवक्षितप्रतिबंध शून्य तो.

**मोकळीक**, स्त्री० कांहींएक प्रतिबंधापासून जी मुक्तता ती.

**मोकाट**, अ० मोकळ द्वितीयार्थी.

**मोकार**, अ० मोकाट.

**मोकाशी**, ३लिं० हिं० ग्राम, देश, इ० जास इनाम आहेत, किं० चाकरीबद्दल दिल्हीं आहेत, तो मनुष्य. २, गांवांची खोती जाणें केली आहे तो त्यां गांवांचा.



**मोकासा**, पु० हिं० इनाम जो ग्राम, भूमि, इ० तो; २ कोणा एकास सर्कारच्या चाकरीबद्दल देतात जो ग्रामादि तो; ३, एक दोन गांवांची खोती पत्करितात तीसही म्ह०

**मोख**, पु० धान्यादिकांच्या आंत जो बीजभूत अंश असतो तो; २, कोंवळे नारळादिकांचे शेंड्यास जो अंश खावयाजोगा असतो तो.

**मोखर**, ३लिं० दे० फुटायास कठीण नव्हे जो पदार्थ तो.

**मोगर**, पु० मेख, इ० जमीनींत दृढ बसावी म्ह० त्यांजवर मारायासाठीं काष्ठादिकांचा करितात तो; २, सोन्याचे रुप्याचें शेवटास हिरवे कांचेचे वाटोळं बारीक लावितात तो.

**मोगरा**, पु० एक सुवासिक फुलझाड आहे व त्याचें जें फूल तो.

**मोगरी**, स्त्री० मोगऱ्याचें झाड; २, लाहान जो मोगर ती.

**मोगरें**, न० मोगऱ्याचें जें फूल ते.

**मोगरेल**, न० हिं० मोगऱ्याचे पुष्पांचें जें तेल तें.

**मोगल**, ३लिं० हिं० यवनांत एक भेद आहे.

**मोगलाई**, स्त्री० हिं० मोगलाचीजी कारकीर्द ती; २, ३लिं० मोगलसंबंधी भाषा, वेष, इ० तो.

**मोगलाण**, न० हिं० मोंगलाचा अंमल ज्या देशांत आहे तें; २, मोंगलाचा जो दंगा तें; उठ, मार, या धा० योगीं प्र०

**मोगली**, ३लिं० हिं० मोगलाई द्वितीयार्थी.

**मोगलीएरंड**, पु० एक एरंडांत भेद आहे.

**मोगलीबेदाणा**, पु० एक औषधोपयोगी पदार्थ आहे.

**मोगलीमिरची**, स्त्री० वांग्यासारिखी आडजी मिरची तीस म्ह०

**मोघम**, ३लिं० ज्याची फोड झाली नाहीं किं० केली नाहीं असें जें भाषण, व्यवहार, लेख, जमाखर्च, इ० तो ·

**मोघा**, पु० रहाटाचे माळेस बांधायाचें उपयोगी एक आकारविशेषाचें मृत्तिका, इ०कांचें पात्र करितात तो ·

**मोच**, स्त्री० एक भाजी आहे ·

**मोचणें**, ग्रं० कांहींएक प्रतिबंधापासून मुक्त करणें ·

**मोचन**, न० कोणएक पदार्थास कांहींएक प्रतिबंधापासून मुक्त करण्याचा जो व्यापार तें ·

**मोचरस**, पु० एक औषधी पदार्थ आहे ·

**मोचा**, पु० पायपोस ·

**मोची**, पु० चर्मकार विशेष तो ·

**मोज**, न० मेज ·

**मोजणें**, मेजणें ·

**मोजदात**, स्त्री० एक, दोन, तीन, इ० रीतीनें मोजण्याचा जो व्यापार ती किं० त्या व्यापारानें झालें जें सिद्ध फळ ती ·

**मोजदाद**, स्त्री० मोजदात ·

**मोजदास्त**, स्त्री० मोजदाद ·

**मोजप**, न० बा० संख्या ·

**मोजबा**, पु० मोसबा ·

**मोजा**, पु० पायांचे पाऊल व हाताच्या पंजा झांकायासाठीं तदाकार वस्त्रादिकांचा जो शिवून करितात तो ·

**मोट**, स्त्री० विहीर, नदी, इ०कांतील पाणी काढायासाठीं जें चर्माचें मोठें पात्र करितात जीस बैल, इ० लावून ओढीत असतात ती; २, धान्य, वस्त्र, तृण गोवऱ्या, इ०कांचें बांधलेलें जें मोठें ओझें ती; ३, पुरुष, इ०कांची प्रकृति समयीं जी पाणमोटली बाहेर येत असती ती ·

**मोटकुळें**, न० दुमोटलें ·

**मोटली, मोटळी**, स्त्री० लाहानजी गांठोडी ती ·

**मोटलें**, न० लाहानजी मोट तें ·

**मोटसूती**, ३लिं० जाडसूतीजें वस्त्र तो ·

**मोटा, मोठा**, ३लिं० विवक्षित मनुष्यादिकापेक्षां अवयवस्थौल्यानें किं० अधिक वयानें जो युक्त तो; २, ला० विवक्षितापेक्षां द्रव्य, विद्या, इ०कानीं जो अधिक तो ·

**मोटाधाटा**, ३लिं० लहानमोठाजो पदार्थ तो ·

**मोटया**, ३लिं० मोटा वाहण्याचें कसब करून उपजीवन पावतो तो ·

**मोड**, पु० पराजय; २, बीजादिकापासून मूलभूत अंशजो उत्पन्न होतो तो; ३, स्त्री० कागद, इ० मोडल्यानें जें रेषारूप चिन्ह होतें ती; ४, फुटकीं मोडकीं जीं कावलीं भांडीं, अलंकार, इ० ती; ५, चित्राच लीपी; ६, हिशेब, गुणाक, मेळवणी, पोहणें, झापवळणें, इ०कांची जी रीति ती; ७, पर्जन्योदकाचा जो मोठा पूर ती ·

**मोडकळीस**, अ० कांहींएक गृहादि पदार्थ किं० देणें, घेणें, इ० व्यापार, अथवा तादृश व्यापारकर्ता मनुष्य, इ०कानीं क्षीणदेशेस ये० धा० यो० प्र०

**मोडका**, ३लिं० मोडल्यामुळें निरुपयोगी झाला किं०

क्रिं० अधू झालाजो पदार्थ तो·

**मोडणी**, स्त्री० मोड पञ्चार्थी·

**मोडणें**, उ० कांहींएक पदार्थ फुटणें, तुटणें, चिरणें, यावांचून इतर व्यापारानें भग्न करणें; २, कांहींएक गोष्ट करूनये, किं० कांहींएक गोष्ट करावी, इ० कांविषयीं जी लोकशास्त्र राजा, इ० कानीं केली जी मर्यादा तिचा उल्लंघ करणें; ३, युध्यादिकामध्यें पराजित करणें; ४, कलह, दंगा, बंड, अहंकार, गर्व, निद्रा, इ० नाहीं असें करणें; ५, रुपया, रवुरदा, इ० हलकें नाणें घ्यायासाठीं मोहोर, पुतळी, इ० नाणें देणें किं० खर्च करणें; ६, तालुका, माहाल, किल्ला, इ० जे प्रसिद्ध त्याच्या नावाखालीं तत्तदासनजे इतर ग्रामादिक त्याणीं ओढले जाणें; उ० सुवर्णदुर्गाखालीं मुरुड मोडतें; ७, देशसंबंधानें किं० स्वतः उत्तमत्वेंकरून प्रसिद्धजो पदार्थ त्याचे नावाखालीं तत्सजातीय इतरानीं ओढलें जाणें; उ० शिवर्द्दनीं सुपारीचे नावाखालीं मुरूडचीही मोडती; ८, मोट, पाट, इ० कांचें पाणी विवक्षित वृक्षादिकांस शिंपायासाठीं तत्तत्स्थलीं नेणें; ९, शहर. संपत्तिमान्, इ० कानीं त्यांचीत्यांची संपत्ति क्षीण झाल्यामुळें त्याणीं क्षीणत्व पावणें; १०, कोणेएकामनुष्यानें गलत्कुष्ट रोग विशिष्ट होणें; ११, कांहीएक होणारें जें कार्य त्यास कांहींएक प्रतिबंधकरून तें तें कार्य होऊन देणें; उ० त्याचें लग्न त्याणें मोडलें; १२, कांहींएक कार्याकडेस घटी, मास, दिन, इ० रूप काळ लागला जाणें; गांव, रान, इ० मोडणें, स० कांहींएक कार्यार्थ फिरणें; पाठ मोडणें, बोटें मोडणें,



इ० स्थलीं तो तो अवयव कडूशब्द व्हावयाजोगा ओढणें; नाक, अंग, डोळे, अंरव, इ० मोडणें धातूच्यायोगीं संप्रदाय तत्तच्छब्दावर प्रायः गेले आहेत·

**मोडती**, स्त्री० कांहींएक कार्य होऊन देण्याविषयीं केलाजो भाषणादिव्यापार ती; उ० मी जाणार होतों परंतु त्याणीं मोडती घातली, स० राहिलों·

**मोडतोड**, स्त्री० मोडले तुटलेल्ये दागिन्याचा जो समुदाय ती; २, कांहींएक देणें, घेणें, इ० व्यवहाराची जी तोड मोड ती·

**मोडवशी**, स्त्री० मोडशी·

**मोडवांक**, स्त्री० आकारविशेषाची एक वांक स० भूषण आहे·

**मोडशी**, स्त्री० मनुष्यादिकांस हगओक सुटायाजोगा प्रायः अजीर्णामुळें एक रोग होत असतो ती; मोडशी जिरणें जिरविणें स० कोणाएकाची खोड मोडणें·

**मोडा**, पु० कांहींएक कार्य होउन देण्याविषयीं केला जो प्रतिबंधक व्यापार तो; २, त्या व्यापारानें झाली जी तत्तकार्याची कुंठितावस्था तो; उ० पर्जन्यानें चारदिवस आंवतेचा मोडा केला·

**मोडावणें**, श्रम, दुखणें, इ० कामुळें ग्लान होणें; २, धान्यादिकानीं मोडयुक्त होणें·

**मोढ**, पु० मोड द्वितीयार्थी·

**मोढा**, पु० दे० खोल जोओढा तो·

**मोढावणें**, मोडावणें द्वितीयार्थानें युक्त होणें

**मोतद्दार**, स्त्री० हिं० खासदार·

**मोतरिंगणी**, स्त्री० एकरिंगणींत भेद आहे·

**मोतार**, स्त्री० متار हिं० इयत्ता.

**मोतारि**, ३लिं० متاري हिं० मोतार बांधून केलाओ कांहीं एक व्यापार तो.

**मोताळा**, पु० गुजराथी ब्राह्मणांत एक भेद आहे.

**मोतिया**, पु० मोगऱ्यांत एक भेद आहे.

**मोतीं**, न० समुद्रामध्यें शिंपीचापोटीं उत्पन्न होतें जें रत्न तें;२, तदाकार कृत्रिम केलेजें पारदादिकांचें तें;३, नथीचास्थानीं सुवर्ण मोतीं एकच जडून नाकांत घालायासाठीं जो अलंकार करीत असतात तें.

**मोतीचूर**, पु० बुंदीच्या लाडवांत एक भेद आहे;२, धोत्रजोडा, लुगडें, इ० वस्त्रांच्या तन्हेवाईक एक कांठ असतो तो.

**मोतीबिंदु**, **मोतीबिंब**, पु० एक नेत्ररोग आहे.

**मोत्याबिंदु**, **मोत्याबिंब**, पु० मोतीबिंदु.

**मोथ**, स्त्री० नागरमोथा.

**मोथा**, पु० मोथ.

**मोद**, पु० आनंद.

**मोदक**, पु० पक्वान्न आहे.

**मोदणें**, प्र० आनंदणें

**मोदी**, ३लिं० हिं० सर्कारी खाणें, पिणें, इ० कांचा सर्व सरंजाम ज्याचा स्वाधीन असतो तो;२, ला० सर्व जिन्नस संग्रहीं बाळगतो असा जो वाणी त्यासही म्ह०.

**मोदीखाना**, पु० हिं० सर्कारी भोजनादि सर्व सामग्रीचा जो ठिकाणा तो किं० तो सर्व सरंजाम.

**मोधळा**, ३लिं० शरीरानें अति पुष्ट असूनजो आळशी त्यास निंदेनें म्ह०;२, पु० घरादिकांचीं कवलें न पडावीं म्ह० आश्रयभूत मोहोटीच्या ठिकाणीं लांबलांब झिज्यांच्या मुठया बांधून बांधीत असतात तो;३, पु० धान्य झोडून घेऊन निराळ्या पेंड्या न बांधितां त्या तृणाचें बांधिलेंजें ओझें तो.

**मोधळीपेंढी**, स्त्री० संप्रदायापेक्षां थोरजी तृणादिकांची पेंढी ती.

**मोंधागोळा**, ३लिं० ज्याचे हात पायांच्या खोडा मोडा होऊन जो चलनवलनादि व्यापारासमर्थ तो.

**मोनवा**, पु० मुनवा.

**मोना**, पु० मोनवा;२, ३लिं० मुकाजो मनुष्य तो.

**मोप**, ३लिं० उमोप, प्र० प्रा० शूद्रभाषेंत;२, न० कच्चीजी वीर ती.

**मोबदला**, पु० हिं० एक वस्त देऊन त्याचेबदल दुसरें वस्त घ्यावें अशा रीतीचाजो व्यापार तो.

**मोबादला**, ३लिं० हिं० मोबदला.

**मोमिनी**, ३लिं० मोमिनानें निर्मितजें वस्त्र तो.

**मोमीन**, पु० हिं० मुसलमानांत एक जाति आहे.

**मोर**, पु० न० मयूर; म्ह० मोर नाचतो म्ह० लांडोरानें नाचू नये.

**मोरचंग**, पु० तोंडानें वाजवायाचें चंग म्ह० एक वाद्य आहे.

**मोरचा**, पु० लढाई करायाकरितां लकडकोट, इ० आश्रयभूकरितात तो;२, तरवार इ० कांसजो जंग लागतो तो.

**मोरचूत**, न० एक ओषधी खार आहे.

**मोरचेबंदी**, स्त्री० مورچه हिं० मोरचा बांधण्याच्या जो व्यापार ती;२, त्याणे सिद्ध झालाजो मोरचा ती.

**मोरचेल**, न० हिं० देव, राजा, इ० कांचे डोकीवर वारायासाठीं जो मयूरपिसांचा कुंचा करितात तें·

**मोरणी**, स्त्री० स्त्रियांचे नाकांतील मोतीं ह्मणूनजो अलंकार त्यांत भेद आहे·

**मोरली**, स्त्री० शाकभाजी चिरायाचें एक शस्त्र आहे·

**मोरघा**, पु० मोघा; २, गृहादिकांचे माळ्यावर उभे स्तंभ बसवितात जांवर पाटेस असतो ते प्र०

**मोरविडा**, पु० जावर मोराचा आकार केला असतो असाजो विडा करितात तो·

**मोरा**, ३ लिं० जा गुराचा तोंडावर चित्र विचित्र वर्ण असतो तो·

**मोरांगीघार**, स्त्री० एक घारींत भेद आहे जिचे आंगावर चित्र विचित्र ठिपके असतात ती·

**मोरी**, स्त्री० घर, इ० कांतील पाणी बाहेर जावें, इ० कांसाठीं जी नाहाणी करितात ती·

**मोर्तब**, न० हिं० सर्कारसंबंधी कागद, इ० कांवर चिन्ह करायाचा एक ठसा आहे जांत मोर्तबसूद हीं अक्षरें असतात तें. व त्याणें उठलेलें जें कागद, इ० कांवर चिन्ह तें·

**मोल**, न० कांहींएक पदार्थ, किं० व्यापार यास पडती जी किंमत तें·

**मोलकरी**, पु० या कामास असुक मोल घेईन असें ह्मणून जो काम करितो तो·

**मोलमजूरी**, स्त्री० मोलकरी, मजूरकरी, यांचा जो व्यापार ती, किं० त्या व्यापारानें लब्धजें द्रव्य ती·

**मोवा**, पु० एक रोग आहे जो प्रायः धान्यादिकांवर पडत असतो·

**मोवागी**, **मोवारी**, **मोवाळी**, स्त्री० मवागी·

**मोवागीत**, ३ लिं० मंद मंद जो जाळ तो·

**मोसबा**, पु० [Persian script] हिं० कोणा एकास कांहींएक व्यवहारसंबंधी द्यावयाचा जो हिशेब तो·

**मोह**, पु० सं० पुत्रादिकांची जी ममता तो; २, कांहीं एक कार्यामध्यें चित्तास भ्रम व्हायाजोगा धर्मविशेष उत्पन्न होतो तो·

**मोहक**, ३ लिं० सं० मोह उत्पन्न करणारा जो स्त्री, श्लोक, इ० पदार्थ तो·

**मोहगम**, ३ लिं० मोघम·

**मोहजाल**, न० सं० मायाजाल·

**मोहटी**, स्त्री० माहुटी; २, मोहाचे झाडाचें जें फळ ती·

**मोहणें**, मोह पडे असें करणें

**मोहतर**, **मोहतूर**, पु० शूद्र जातीचीजी स्त्री तिचाजो पाट लावितात तो·

**मोहतरफा**, पु० गवंडी, सुतार, इ० कांस जें त्या त्या कसबासंबंधी सर्कारास देय द्यावें लागतें तो·

**मोहतरफी**, ३ लिं० मोहतरफा जा कुळांस द्यावा लागतो तीं कुळें तो·

**मोहन**, ३ लिं० मोहक; २, न० मोह द्वितीयार्थी; ३, कणीक, इ० कांत मार्दवार्थजो घृतादि स्नेह घालितात तें·

**मोहनभोग**, पु० एक पक्वान्न आहे; २, एक तांदुळांत भेद आहे·

**मोहनमाळ**, स्त्री० एक कंठांतील भूषण आहे·

**मोहनी**, स्त्री० भूल; २, भ्रम उत्पन्न व्हायाजोगा जो

जो मंत्रारिकृत व्यापार ती, किं० तो मंत्रादिक ती; ३, एक स्त्री देवतारूप आहे ·

**मोहपाश**, पु० मोहरूपजो पाश तो ·

**मोहबद**, स्त्री० हिं० मुरबत ·

**मोहर**, पु० ‍ हिं० आंबा, इ० कित्येक वृक्षांस जो पुष्पगुच्छ येतो तो; २, स्त्री० एक सोन्याचें नाणें आहे; ३, काजी इ० कांची मोर्तबासारिखी कागदावर मुद्रा करायाची असती ती; ४, रुपया, पैसा, इ० कांवर जें चिन्ह असतें ती; ५, कांहींएक पदार्थावर खुणेकरितां केलेंजें कांहींएक चिन्ह ती ·

**मोहरकी**, स्त्री० बैल, घोडा, इ० कांचे मुखास आकारविशेषाची जी दोरी बांधितात ती ·

**मोहरक्या**, ३ लिं० कोणेक समाजामध्यें जो अग्रसर तो ·

**मोहरपी**, ३ लिं० दे० मोहरक्या ·

**मोहरम**, पु० ‍ हिं० यवनी महिन्यांतील प्रथम मास तो ·

**मोहरा**, पु० सर्पाचा मस्तकसंबंधी जो मणी तो; २, मृदंगाचे वाजविण्यांत प्रकार आहे; ३, मनुष्यादिकांचा जो चेहरा तो; ४, चेहरेदार, किं० संपत्तीनें अथवा गुणादिकानें जो श्रेष्ठ तो; ५, बुदबळांमध्यें राजा अथवा प्यादा यां वांचून जी सर्व बुदबळें तीं प्र०; ६, वस्त्र, कागद, इ० कांवर घोटणीनें जी तेजगी येती ती ·

**मोहरी**, स्त्री० एक उपधान्य आहे ·

**मोहरे**, अ० पुढें ·

**मोहरें**, न० बुदबळांतील जो मोहरा तें ·

**मोहा**, पु० एक वृक्ष आहे ज्याचे फळास मोहटी म्ह०

**मोहाचा**, ३ लिं० नारळांत व सुपारींत, एक भेद आहे ज्यांचा इतर नारळसुपारीपेक्षां गोडी विशेष असती तो ·

**मोहित**, ३ लिं० सं० मोहानें जो व्याप्त तो ·

**मोहिनी**, स्त्री० सं० मोहनी ·

**मोहीम**, स्त्री० हिं० कांहींएक देशादि ग्रहणार्थ जी राजादिकांची स्वारी ती ·

**मोहो**, पु० न० मधुमक्षिका मधुसंचयार्थ जें पोळें करीत असतात तो तें ·

**मोहोळें**, न० मोहो ·

**मोळ**, न० गवतांत एक भेद आहे; २, गृहादिकांचीं जीं पारवीं तीं प्र०; ३, एक रोग आहे जो प्रायः लहानपणीं पोरांचे पोटरीवर होत असतो तें ·

**मोळविक्या**, ३ लिं० लांकडांची मोळी विकून उदर निर्वाह करितो तो ·

**मोळा**, पु० अध्ययन संसारादिव्यवहारांचा कृति, इ० व्यापार करण्याविषयीं कोणएकास संगतीमुळें किं० शिकल्यामुळें लागलीजी रीति तो; उ० लहानपणीं मुलांस जसा मोळा लाविला तसा लागतो

**मोळी**, स्त्री० लांकडें, ऊंस, गवत, इ० कांचा जो मोठा भारा ती ·

**मोळें**, न० वत्सानें आपल्ये आईस न प्यावें म्हणून त्याचे तोंडास काष्ठादिकांनें करून बांधितात तें ·

**मोक्ष**, पु० सं० मुक्ति ·

**मौक्तिक**, न० सं० मोतीं ·

**मौज**, स्त्री० संतोषजनक जो व्यापारादिक ती, किं० त्याणें वाटलाजो आनंद अथवा चमत्कार ती ·

मोजा, ३ लिं० नानाप्रकारच्या मोजा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

मोजा, पु० माहाल, कसबा, इ० विशेषसंज्ञा जास नाहींत असा जो गांव तो.

मोजे, अ० मोजा जो गांव त्याचें नाव लिहितेसमयीं त्या नावाचे मागें हें अव्यय लागतें; उ० मोजे वाडेगव्हाण, मोजे करंजगांव, इ०

मौन, न० विवक्षितकालपर्यंत भाषण न करितां राहाण्याचा जो व्यापार तें; २, ३ लिं० भाषणव्यापारशून्य जो मुका तो.

मौनी, ३ लिं मौन ज्याणें धारण केलें तो.

मौर्वी, स्त्री० सं० धनुष्याची दोरी ती.

म्यान, न० हिं० तरवार, इ० कांचें मेण तें.

म्याना, पु० मेणा.

म्लान, ३ लिं० सं० कोमेजला जो पुष्प, मनुष्य, इ० पदार्थ तो.

म्लेच्छ, पु० सं० यवन.

म्हण, स्त्री० परंपरेनें लोक बोलत आले असें जें नीतिबोधक, किं० दृष्टांतरूप यांगीं जें प्राकृत वाक्य असतें ती; उ० कोणाचें वाईट करूं नये अशी वडिलांची म्हण आहे.

म्हणजे, अ० कांहींएक शब्दवाक्यादिकांचा अर्थकर्तव्य असतां त्याचापुढें प्रश्नद्योतक याचा प्रयोग होतो; उ० अश्व म्ह० घोडा; २ पूर्वोत्तरक्रियांचा कार्यकारणभाव असतां कारणक्रियावाचकापुढें या अव्ययाचा योग होतो; उ० पाऊस पडला म्ह० पीक चांगलें होईल; तुम्ही बोललां म्ह० माझें कार्य होईल.



म्हसासूर, पु० म्हैसासूर.

म्हसोबा, पु० एक पिशाच आहे; म्ह० म्हसोबाला नाहीं बायको आणि सटवाईला नाहीं दादला.

म्हणणें, पढणें; २, शब्दादिकांचा उच्चार करणें.

म्हणून, अ० पूर्वोत्तरक्रियांचा कार्यकारणभाव असतां कारणक्रियावाचकापुढें याचा प्रयोग होतो; उ० नदीस पूर आला म्हणून मी आलीकडे अडकलों; तो दे म्हणून म्हणाला, घे म्हणून म्हणाला; म्ह० दे असें म्हणाला, घे असें म्हणाला, किं० या प्रकारें करून म्हणाला असे अर्थ म्हणून या अव्ययाचे होतात.

म्हशागुगूळ, पु० एक गुगुळांत भेद आहे.

म्हातारखंड, ३ लिं० निंदेनें म्हाताऱ्यास म्ह०.

म्हातारचळ, पु० म्हातारपणीं जो बुद्धिभ्रंश होतो तो.

म्हातारडा, ३ लिं० म्हातारखंड.

म्हातारा, ३ लिं० वयानें जो वृद्ध तो.

म्हातारी, स्त्री० ला० थोडकी; म्हातारी मेलीसें होणें, म्ह० अतिशयित दुःख होणें.

म्हार, ३ लिं० महार.

म्हारपोर, ३ लिं० महारपोर.

म्हाळुंग, न० महाळुंग.

म्हाळू, पु० महाळू.

म्हेतर, पु० एक वतनदार आहे; २, चांभाराचा नावापुढें याचा प्रयोग होतो; उ० हिरम्हेतर चांगम्हेतर.

म्हेतरकी, स्त्री० ग्रामादिसंबंधी एक वतनदारी आहे.

**म्हेशा**, ३लिं० ज्याचें शरीर पुष्ट असून जो आळशी त्यास निंदेनें म्ह०

**म्हेस**, स्त्री० टोणग्याचे जातीचीजी स्त्री ती ·

**म्हेसा**, पु० टोणगा ·

**म्हेसासूर**, पु० एक पिशाच आहे ·

---

**यःकश्चन**, ३लिं० सं० यःकश्चित् ·

**यःकश्चित्**, ३लिं० सं० मुख्यकोटीमध्यें गणनीयनव्हे असाजो साधारण मनुष्यादिक तो; उ० त्याचेघरीं कोणी यःकश्चित् आलातरीं सन्मान होतो मग सभ्याचा होईल यांत सांगायाचें काय आहे ·

**यकृत्**, न० सं० मनुष्यांच्या उजव्येकुशीस एक रोग होत असतो ·

**यच्चयावत्**, अ० सं० झाडून; उ० आज गांवांतील यच्चयावत् लोक देवापाशीं गेले आहेत ·

**यजन**, न० सं० देवतेच्या उद्देशानें अग्नींत होम करण्याचा जो व्यापार तें ·

**यजमान**, पु० सं० स्वर्गादि फल आपल्यास प्राप्त व्हावें म्ह० तें तें यज्ञादिकर्म आपलें म्हणून करणारा जो मुख्य कर्त्ता असतो तो त्यात्या कर्माचा ठायीं; २, ज्याकडील उपाध्येपण, जोशीपण, इ० अधिकार ज्याकडे चालतात तो त्याचा; ३, संसारादि व्यवहाराचा जो मुख्य धनी तो; ४, चाकरी, आश्रितपणा, इ० संबंधानें ज्याचे पदरीं जो राहातो तो त्याचा ·

**यजमानकृत्य**, न० सं० यजमानाचे घरीं उपाध्याय, जोशी, इ० कानीं विवाह इ० चालविणें, इ० जें काम तें; २, तत्संबंधें उपाध्यायादिकांस यजमानाकडून होत्ये जी प्राप्ति त्यासही म्ह०

**यजमानी**, पु० रा० विवाहादि संस्कारं भार्याजो मुख्य यजमान तो; वृद्धभाषारति ·

**यजीतजाणें**, दे० भजीतजाणें ·

**यजुर्वेद**, पु० सं० चार वेदांतील दुसरा ·

**यजुर्वेदी**, पु० सं० ज्याचे कुळांत यजुर्वेदानें कर्मे होतात तो; २, विशेषेंकरून माध्यंजनास म्ह०

**यजुःशाखी**, पु० सं० यजुर्वेदी ·

**यजू**, पु० माध्यंजनास म्ह०

**यति**, पु० सं० यती; २, स्त्री० पद्याचे चरणामध्यें यत्किंचित् अवसान घ्यावयाचा जागा असतात त्या प्र०; उ० पृथ्वी वृत्ताचे चरणाचा यति दोन असतात पहिली आठवे अक्षरावर आणि दुसरी चरणांतीं ·

**यतिभंग**, पु० सं० पदाचे अवसानींच यति असावी ती तशी न पडतां पदाचेमध्येंच कदाचित् यति पडत्ये तद्रूपजो काव्यास दोष तो ·

**यती**, पु० सं० सन्यासी ·

**यत्किंचित्**, ३लिं० सं० किंचित्; २, सर्वया अर्थी ·

**यत्न**, पु० सं० प्रयत्न, यत्नसाध्य, इ० समास जाणावे ·

**यत्नी**, ३लिं० उद्योगी ·

**यंत्र**, न० सं० कालपरिगणन चित्र निर्माण, इ० विवक्षित कार्य सौकर्यानें सिद्ध व्हावें म्हणून युक्तीनें करून ठेविलेलें घड्याळ, चक्र, सांचा, इ० जें साधन असतें तें; उ० दिक्साधनाचें यंत्र मी तुम्हास करून देतों ·

**यत्रकुत्रचित्**, अ० सं० क्वचित् एखादे स्थलीं ·

**यंत्रित**, ३लिं० सं० विवक्षितानुरूप न वर्ते इतस्तत; नहोई असा कोणेक नियमानें नियमितजो कोणेक अर्थ तो ·

**यंत्री**, पु० सं० त्यात्या कर्माच्याठायीं यंत्रानें वर्तविणारा जो कोणी तो; उ० देह हें ईश्वरनिर्मित यंत्र आहे, ईश्वर यंत्री आहे तो चालवील तसें चालेल ·

**यथा**, अ० सं० जसा; उ० यथाराजा तथाप्रजा, याच्या संस्कृत शब्दाशीं समास होतो तेथें याचा अर्थ त्या त्या प्रमाणें त्याचें उल्लंघन न करितां असा प्रायः होतो आणि विशिष्टशब्द क्रियाविशेषण होतें; यथान्याय. यथारुचि, इ० लोकांत विशेष प्रसिद्ध आहेत ते क्रमानें लिहितों ·

**यथाअनुक्रमें**, अ० सं० जो अनुक्रम धरिला आहे तो न सोडितां वांटणें, देणे, घेणें, इ० कांचे वि०

**यथाकथंचित्**, अ० सं० कोणेक अर्थाचा केवळ अभावमात्र जिच्या योगानें बोलतां येत नाहीं अशाप्रकारची त्या अर्थाची विद्यमानता वर्णनीय असतां असणें, इ० क्रियांचें वि० होतें; उ० आह्मांला वळण हरूद अक्षर असावें सांचा, कागद चांगले असावे असें कांहींनाहीं यथाकथंचित् पोथी असली ह्मणजे झालें; २, न्यूनपणवयसंसोडून बोबडले ग्रां भरावेपर्शी; उ० हा प्रायः वांचणार नाहीं यथाकथंचित् वांचला तर बेश होईल; ३, कार्यसाधनभूतजे प्रयत्नादिक त्यांचे पराकाष्ठेनें कार्याचे होण्याची वसकाश झाल्यास; उ० त्याणें दिवसभर लखेन लिहिलें तर यथाकथंचित् दोनशें ग्रंथ लिहील ·

**यथाकालीं**, **यथाकाळीं**, अ० जा कर्मास जो योग्य काल त्याचा अतिक्रम न होऊं देतां त्याच काळीं तें कर्म करणें, होणें, इ० वि० उ० पेरणी यथाकाळीं झाली ह्मणजे पीक चांगलें येतें ·

**यथाक्रम**, **यथाक्रमानें**, **यथाक्रमें**, अ० सं० धरलेला क्रम न सोडितां; उ० यथाक्रमें शब्द लिहावे ह्मणजे लोकर सांपडतात ·

**यथातथ्य**, अ० ३लिं० सं० वस्तुतः जसें आहे तसें कोणेक गोष्ट सांगणें, बोलणें, इ० कांचें वि०; उ० मी तुह्मापाशीं खोटें बोलणार नाहीं यथातथ्य बोलेन; यथातथ्य वर्तमान सांगेन ·

**यथातृप्त**, **यथातृप्ति**, अ० सं० आतृप्ति ·

**यथानुक्रमें**, अ० सं० यथाअनुक्रमें ·

**यथानशक्ती**, **यथानशक्त्या**, अ० यथानुशक्ति ·

**यथानुशक्ति**, **यथानुशक्त्या**, अ० सं० यथाशक्ति ·

**यथान्याय**, अ० सं० नीतीनें अनुलक्षून; उ० ही मनसुबी त्याणें यथान्याय केला

**यथापद्धत**, अ० यथापद्धतीचा अपभ्रंश ·

**यथापद्धति**, अ० सं० कोणेक कर्मकरण्याचीजी लोकांमध्ये प्रसिद्ध पद्धति आहे तीतें अनुलक्षून ·

**यथापूर्व**, अ० सं० पूर्ववत्प्रमाणें; उ० आमचें काम यथापूर्वच चाललें आहे; अपथ्य होतां च दुखणें पुनः यथापूर्व झालें ·

**यथाप्रत**, अ० सं० यथाप्रतीचा अपभ्रंश ·

**यथाप्रति**, अ० सं० लिहाण्यास किं० वाचाण्यास घेतलेल्या प्रतीप्रमाणें; उ० ही पोथी मी यथाप्रति केली आहे ·

**यथामति**, अ० सं० आपल्या बुद्धीच्या सामर्थ्याप्रमाणें; करणें, बोलणें, सांगणें, इ० कांचे वि०

**यथामार्ग**, अ० सं० नीतीप्रमाणें वर्तणें करणें, इ० कांचे वि०

वि०; उ० तो गृहस्थ यथामार्गे वागतो.

**यथायुक्त**, अ० सं० जसें असावें तसें; उ० तुम्ही चोरास शासन करणें तें यथायुक्त करा.

**यथायोग्य**, अ० सं० यथायुक्त.

**यथारुचि**, अ० सं० आवडीप्रमाणें रोग्यानें पथ्याचेच पदार्थ खावे यथारुचि खात फिरों नये.

**यथार्थ**, १ लिं० सं० तथ्य; २, अन्वर्थ; उ० कायहो हा सूर्य तापवितो अतएव तपन हें नांव याला यथार्थ आहे.

**यथालाभ**, अ० प्रसंगानुरूप जितकें मिळेल तितक्यानें निर्वाह करणें, कार्य करणें, इ० कांचे वि०

**यथाविधि**, अ० कोणेक कर्माविषयीं शास्त्रानें सांगीतला जो अनुष्ठानप्रकार त्याप्रमाणें; तें कर्म करणें, होणें, घडणें, इ० कांचे वि०

**यथाविभागें**, अ० सं० यथांशतः

**यथाशक्ति**, अ० सं० आपल्ये शक्तीप्रमाणें.

**यथांशतः** अ० सं० विभागानुरूप वांटणी करून घेणें, देणें, इ० धा० वि०

**यथाशास्त्र**, अ० शास्त्रमर्यादेतें न उल्लंघितां.

**यथाश्रुत**, अ० सं० त्यात्या पदापासून उघडपणें जसा अर्थ दिसतो त्याचप्रमाणें स० व्यंग्य इत्यादि द्वारा अलंकार पूर्वपक्ष समाधान, इ० रूप जो चमत्कारिक कांहीं अंश त्यावांचून श्लोकादिकांचा अर्थ सांगणें, ग्रंथ लावणें, इ० कांचे वि०; उ० मूलावरून यथाश्रुत ग्रंथ लागेल परंतु आंतील भाव, व्यंग्यें, इ० पाहाणें तर टीका पाहावी; २, ३ लिं० ग्रंथांत जा युक्ति लिहिल्या असतात, किं० गुरूजा सांगतो तितकेंमात्र जाणतो परस्वे युक्तीनी अनेक तांडवे करण्यास जाणत नाहीं असा जो पंडित, ज्योतिषी, इ० तो; २, त्याचें तें पांडित्य, बोलणें, इ० तो.

**यथासंख्य**, न० सं० अनेक जे उद्देश्य आणि विधेय, इ० त्यांचें समसंख्यत्व असतां पहिल्याचा पहिल्याशीं, दुसऱ्याचा दुसऱ्याशीं, अशा क्रमानें जो संबंध योजनेचा प्रकार तें.

**यथासंप्रदाय**, अ० सं० संप्रदायानुरूप.

**यथासांग**, अ० सं० जाजा क्रियेला जीं जीं अंगें सांगीतलीं आहेत त्यात्या अंगामध्यें यत्किंचित् न्यूनता न पडतां ती क्रिया घडणें, होणें, इ० कांचे वि०

**यथासामर्थ्य**, अ० सं० यथाशक्ति.

**यथासामर्थ्यानें**, अ० यथाशक्ति.

**यथास्थानीं**, अ० सं० जाचें जें स्थान त्या स्थानीं त्याणें जाणें, बसणें, इ० कांचे वि०; उ० भरो पंगतींत उगीच हिंडू नका यथास्थानीं बसा.

**यथास्थित**, अ० सं० जसें पाहिजे होतें तसें; उ० आज भोजन यथास्थित मिळालें; २, पूर्वकुशलावस्था न पालटतां; उ० आजपर्यंत इकडील वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें; ३, यथायोग्य; उ० पोथी नीट चांगली यथास्थित बांधून ठेव नाहींतर भिजेल.

**यथाज्ञानें**, अ० सं० यथामति.

**यथेच्छ**, अ० सं० इच्छेस येईल तितकें: प्रायः लोकामध्यें वैपुल्य विवक्षा असतां प्र० होतो; उ० रात्रीचा विषय आहे यथेच्छ जेवूं नका कांहीं कमार पाहा; २ इच्छेस येईल तसें; बोलणें, वर्तणें, इ० कांचे वि०; उ० यथाशास्त्र वर्तावें उगीच यथेच्छ वर्तूं नये.

**यथेष्ट**, अ० यथेच्छ; उ० असे यथाशास्त्राचे योगानें

यथेष्ट अ० अर्वाडी समास होतो ठ ·

**यद्**, ३लिं० सं० जो ह्मणूनजें सर्वनाम तदर्थक हें संस्कृत सर्वनाम आहे लोकांत याचा प्रयोग समासीं होतो आणि दकारास पुढील अक्षरांचे अनुरोधें करून, नकार, चकार, टकार, नकार, इ० विकृति होतात; उ० यत्कथा ह्म० ज्याची कथा; यदंश ह्म० याचा अंश, यत्कृत ह्म० जाणे केलेला; यच्चित,यन्नाम, इ० जाणावे ·

**यंदा**, अ० वर्तमानवर्षी ·

**यदाकदाचित्**, अ० सं० कदाचित् ·

**यदीय**, ३लिं० सं० यत्संबंधी ·

**यद्यपि**, अ० सं० जरी; उ० यद्यपि यंदा पाऊस पडला तरी शाइमणावर धारण होत नाहीं ·

**यद्यपिचेत्**, अ० सं० यद्यपि ·

**यद्वा**, अ० सं० अथवा ·

**यःपलाय**, न०   करणें, ह्मणणें, यांचा योगी प्र० अ० पळून जाणें ·

**यम**, पु० सं० मनुष्यादिकांस पापानुसार शिक्षा करणारा देव आहे; २, ला० निष्करुण अथवा भयंकर दिसतोजो मनुष्यादिक त्यास आरोपानें ह्म०; ३,इंद्रियनिग्रह; यमाजीपंत, यमाजीभास्कर, यमाजीबाजी, इ० यमासच ह्म०

**यमक**, पु० न० सं० श्लोकाचे प्रथम चरणाचे अंतीं, किं० पूर्वार्धाचे अंतीं जीं अक्षरें आलीं असतात तींच एक दोन तीन चार पाहिजे तितकीं अक्षरें दुसऱ्ये चरणाचे किं० अर्धाचे अंतीं असतात असाजो शब्दालंकार तो तें; प्रायः त्या अक्षरांचे अर्थ दोन होत असतात ·

**यमदंष्ट्रा**, स्त्री० सं० आश्विनमासाचे शेवटचे आठ दिवसांपासून सर्व कार्तिकमास समाप्तिपर्यंत जे दिवस त्या,प्र० अ० वचनी ·

**यमदूत**, पु० सं० प्राण्याचे प्राण हरण करायाकरितां नियुक्त जो यमाचा दूत तो; २, उग्र भयंकर जो शिपाई,प्यादा,इ० त्यास आरोपानें ह्म०

**यमद्वितीया**, स्त्री० सं० कार्तिक शुद्ध द्वितीया जीस भाउबीज ह्म० ती ·

**यमन**, पु० कल्याणरागांतील एक भेद आहे यास यमनकल्याण ही ह्म०

**यमनबिलावर**, पु० बिलावररागांत एक भेद आहे ·

**यमनीबिलावर**, पु० यमनबिलावर ·

**यमपाश**, पु० सं० काळपाश ·

**यमयातना**, स्त्री० सं० पापीजनास जें यमलोकीं नरकवासादि दुःख भोगावें लागतें ती; २, ला० मोठें कांहीं सारूरवास.इ० जें दुःख भोगावें लागतें त्यासही ह्म०

**यमरूप,यमरूपी**, ३लिं० काळरूपी ·

**यमस्वरूप,यमस्वरूपी**, ३लिं० काळरूपी ·

**यमल**, ३लिं० सं० जावळा ·

**यमलोक**, पु० सं० जेथें पातकीजन मरणोत्तर पापानुसार यातना भोगायास जातात तो; यमलोकाची वाट धरणें ह्म० मरणें; किं० मरणोन्मुख होणें ·

**यमुना**, स्त्री० सं० एक महानदी आहे ·

**यमुनी**, स्त्री० अंगठीवर बसवायाचा कृष्णवर्ण खडा आहे ज्यावर सोनेरी अक्षरें करितात ती ·

**यव**, पु॰सं॰ एक धान्य आहे जास सातू म्ह॰ तो; २, तदाकार मनुष्याचे हाताचे बोटावर रेषांकित चिन्ह असतें तो ·

**यवन**, पु॰सं॰ म्लेच्छ ·

**यवनी**, ३लिं॰ यवनसंबंधी भाषा, वेष, इ॰ तो ·

**यश**, न॰सं॰ कीर्त्ति; २, हातीं धरलेलें काम यथास्थितपणें तडीस जात असावें अशीजी कोणेकास दैवानुकूलता असत्ये तें; उ॰ हा वीर आहे पण याला यश नाहीं म्हणून जेथें जातो तेथें पराभूत होऊन येतो; ३, जाची आपण सेवा केली किं॰ जासहवर्तमान सावकारी, इ॰ कांहीं व्यवहार केला असतां त्याणें त्याचे योगानें आपलें कांहीं हित झालें असें मानून सन्मानाचा शब्द बोलल्यानें आपल्यास आनंदजनक जो उत्कर्षविशेष मिळतो तें; उ॰ तुह्मी याचें कितीबरें करा परंतु हा तुह्मास यश देणार नाहीं भांडून जाईल; ४, कांहींएक दुर्घटकर्म आपलेहातून सिद्धीस गलें असतां जो उत्कर्ष प्राप्त होतो तें; उ॰ याला बहुत वैद्यानीं औषधें दिलीं परंतु गोसांव्याचे हातास यश आलें; यशाला भासपेणें म्ह॰ कांहींएक व्यवहार किं॰ गाय, म्हैस, मूल, इ॰ पदार्थ त्याणें यथास्थितपणें नांदोन जाचेपदरीं असतें त्यास तें तें फल पावयाजोगे दृष्टीस येणें ·

**यशस्वी**, ३लिं॰सं॰ युद्धादिकांचा ठायीं जय होऊन जास यश आलें आहे तो किं॰ दुष्करकर्म जाचेहातून तडीस जाऊन जास यश मिळत असतें असा जो पुण्यवान् असतो तो; २, जाचे संबंधानें संबंधकर्त्यास उत्तरोत्तर कल्याण होत असतें असा जो भृत्य, हत्ती, अश्व, मणी, पक्षी, गुरु, द्रव्य, इ॰ तो ·

**यष्टि**, स्त्री॰सं॰ काठी

**यष्टिका**, स्त्री॰सं॰ यष्टि ·

**यक्ष**, पु॰सं॰ उपदेवविशेष एक जाति आहे ·

**यक्षिणी**, स्त्री॰सं॰ मंत्रसाध्य एक देवता आहे ·

**यज्ञ**, पु॰सं॰ अग्निहोत्र्यानें करायाचें असें एक मोठें वेदोक्त कर्म आहे; २, ला॰ ईश्वरपरायण जें कर्म त्यासही म्ह॰ याचे समास यज्ञमंडप, यज्ञशाळा, यज्ञकुंड, इ॰ होतात ·

**यज्ञवृक्ष**, पु॰सं॰ समिधादिद्वारा यज्ञोपयोगी जे पिंपळ, उंबर, पळस, इ॰ वृक्ष ते प्र॰

**यज्ञशाला**, **यज्ञशाळा**, स्त्री॰ सं॰ होमशाळा ·

**यज्ञोपवीत**, न॰सं॰ ब्राह्मणादिक मुंज झाल्यापासून निरंतर जें सूत्र कंठांत धारण करीत असतात तें ·

**याकुती**, स्त्री॰ भांगेचा रांधा करून एक मादक द्रव्य करीत असतात ती ·

**याकूत**, न॰ माणीक ·

**याग**, पु॰सं॰ यज्ञ ·

**याचक**, पु॰ धान्य, द्रव्य, इ॰ भिक्षायास आलेला जो कोणी भिक्षुक, गोंसावी, इ॰ तो ·

**याचकवृत्ति**, स्त्री॰सं॰ भिक्षुकी ·

**याचणें**, सं॰ मागणें परंतु जापाशीं मागायाचें त्यासही पक्षीं कर्मता येत्ये ·

**याचन**, न॰सं॰ मागण्याचा जो व्यापार तें ·

**याचना**, स्त्री॰सं॰ प्रार्थनापूर्वक विनयानें मागण्याचा व्यापार ती ·

**याचित**, ३लिं॰सं॰ जाविषयीं याचना केली तो पदार्थ; २, जापाशीं याचना केली तो मनुष्य तो ·

**याञ्चा**, स्त्री० सं० याचना.

**याजक**, पु० सं० दुसऱ्या यजमानाचें यज्ञादिकर्म करणारा जो उपाध्याय ऋत्विज इ० तो.

**याजन**, न० सं० उपाध्याय ऋत्विज यांचें जें यजमान संबंधानें होमादिकर्म तें.

**याजुष**, पु० सं० यजुःशाखी; २, ३ लिं० यजुर्वेदसंबंधी जो मंत्रादि तो.

**यांञ्चा**, स्त्री० यांज्ञा शब्दाचा अपभ्रंश.

**यात**, स्त्री० ब्राह्मण, क्षत्रिय, इ० जी जात ती; २, ३ लिं० सं० गत जो काळ इ० तो.

**यातना**, स्त्री० सं० दारिद्र्य, नरक, गर्भवास, इ० संबंधी भोगावें लागतें जें तीव्र दुःख ती.

**यातायात**, स्त्री० जाणें, येणें, इ० रूप क्लेशप्रद जी अनेकप्रकारची खटपट ती.

**याती**, स्त्री० सं० यात प्रथमार्थी.

**यात्रकरू**, पु० यात्रेकरी.

**यात्रा**, स्त्री० देवतादर्शन, तीर्थस्नान, इ० पुण्यकर्माचा उद्देशानें निघून त्या त्या स्थलीं जाऊन तेथें करावयाचा जो क्षौर, तीर्थस्नान, देवदर्शन, ब्राह्मणभोजन, इ० विधि तो सर्व करावा इतकें जें कर्म ती; २, यात्रेकरूजनाचा जो समुदाय ती; ३, कोणेक देशांतरीं किं० ग्रामांतरीं जाऊन कांहींकाम न होतां येणें इतकाजो फुकट व्यापार जाचें फळ तेथें जाऊन आल्या इतकेंच होतें त्यास ल०; उ० जा कामाचे उद्देशानें मुंबईस गेलों होतों तें काम कांहीं झालें नाहीं उगीच यात्रामात्र पडली; ४, जत्रा; उ० आज ज्या देवाची यात्रा आहे ह्मणून सारीं दुकानें तिकडें गेलीं; ५, सं० देशांतरास, किं० ग्रामांतरासजें गमन ती.

यात्रे

**यात्रेकरी**, पु० तीर्थादि यात्रेचा उद्देशानें जो बाहेर निघाला तो घरीं येई तों पर्यंत; अनेकवचनींपक्षीं नपुंसकीं प्र० होतो.

**यात्रेकरू**, पु० यात्रेकरी.

**याथातथ्य**, न० सं० वर्तमान इ० दिकांचा जो वास्तविक खरेपणा तें.

**याद**, स्त्री० یاد हिं० स्मरण; २, वर याद अशीं अक्षरें लिहून अनेक मनुष्यादि पदार्थांचा क्रमानें स्मरणार्थ लिहितात जो लेख ती, किं० तसें जावर लिहितात तो कागद इ० ती.

**यादगारी**, स्त्री० یادگاری हिं० प्रा० याद प्रथमार्थी.

**यादगिरी**, स्त्री० हिं० यादगारी.

**याददास्त**, स्त्री० हिं० गाणाऱ्या लोकांपाशीं ध्रुपद, ख्याल, इ० कांचा जो थोडा बहुत भरणा असतो तीस ल०

**यादवान**, न० जन्मकालीन तिथिवारादि जा कागदावर लिहिलें असतें तो कागद तें.

**यान**, न० सं० जाजवर, किं० जांत बसून जातात असें जें अश्व, पालखी, गाडी, गलबत, इ० तें; जलयान, नरयान, इ० स०; २, गमन.

**याम**, पु० सं० प्रहर.

**यामार्ध**, न० सं० वारपरत्वें नित्य एक अर्धा प्रहरपर्यंत दुर्मुहूर्त पडत असतो तें.

**यायी**, पु० कोणेक स्थलीं चिरकाल रहायाचा नव्हे कांहीं कालानें स्थलांतरीं जाणारा जो तो त्या पूर्वींच्या स्थलींचा

**यार**, पु० मित्र; २, धगड मुख्यार्थी.

**याररा, यारदी**, ३ लिं० ओझापाझाचे उपयोगी लहानसहान जें घोडें तो; २, ला० त्या त्या समुदायांत

अग्र

अग्रगण्य नव्हेत सरासरी त्यासमुदायाचे भरती-चे उपयोगी असेजे गोण, मनुष्य, बैल, इ॰ त्यांस म्ह॰

**यारी**, स्त्री॰ परस्परांचाजो अत्यंत सख्यभाव ती·

**यावत्**, अ॰ सं॰ यच्चयावत्; उ॰ आज गावांतील यावत् मनुष्य कथेला गेलें आहे; २, जोंपर्यंत; उ॰ त्यांची आमची यावत् मैत्री आहे तावत् काम करून घ्यावें; यावत् नदी लागे तावत् तुम्हास पाचावयास येईन; ३, जितका; उ॰ तुम्ही पुण्यास जा म्ह॰ यावत् सुवर्ण तुम्हास अपेक्षित असेल तावत् मिळेल, यावत्काल, यावत्संख्याक, इ॰ स॰

**यावत्तावत्**, अ॰ सं॰ विशेष गांगायाजोगें नव्हे तितक्यास तितकें होई असें कांहींएक असणें, बोलणें, इ॰ वि॰; उ॰ आमचे घरीं दुभतें यंदा यावत् तावत् आहे; २, बीजगणितामध्यें अस्पष्टसंख्येचाजो अंक त्यासही संज्ञा ठेविली असत्ये; उ॰ यावत्तावत् ५ रूपें·

**यावनाल**, पु॰ सं॰ जोंधळा·

**यावनी**, ३ लिं॰ सं॰ यवनी·

**याज्ञिक**, पु॰ सं॰ विवाह, मुंज, व्रतोद्यापन, देवप्रतिष्ठा, इ॰ कर्माचें अनुष्ठान चालवायास जाणतो जो ब्राह्मण तो·

**याज्ञिकी**, स्त्री॰ सं॰ याज्ञिकाचें जें कर्म ती; २, ३ लिं॰ याज्ञिकसंबंधी जो संप्रदायादि तो·

**युक्**, ३ लिं॰ जो जाशीं युक्त तो तद्युक्; तैलयुक्, जलयुक् इ॰ स॰

**युक्त**, ३ लिं॰ ज्याचा ज्याशीं योग झाला आहे तो तेणेंशीं, चिंतायुक्त शर्करायुक्त इ॰ स॰ प्र॰; २, लोकव्यवहार आणि शास्त्रव्यवहार यांस अनुगुण अतएव त्या त्यास्थलीं चांगला दिसायाजोगा जो कांहींएक अर्थ तो; उ॰ गरीबांचा समाचार घ्यावा हें थोरांस युक्तच आहे; ३, स्त्री॰ युक्तीचा अपभ्रंश·

**युक्तायुक्त**, न॰ सं॰ ग्रंथादिकांतील विचारणीय बरावाईट अंश तें·

**युक्ति**, स्त्री॰ कोणेक कार्य जाप्रकारें केलें असतां सिद्ध होतें आणि चांगलें लौकर, इ॰ विवक्षितानुरूप होतें असा जो करण्याचा प्रकार त्यातें समजायाजोगी कोणेकाचे अंगीं बुद्धि असत्ये ती; उ॰ याचे अंगांत काम करण्याची युक्ति चांगली आहे; २, कोणेक कार्य करण्यास बळाचा, आणि बुद्धीचा, असे दोन प्रयोग करावे लागतात त्यांतजो बुद्धीचा प्रयोग ती; उ॰ पायांतील कांटा काढणें हें बळाचें काम नव्हे यास युक्ति पाहिजे; ३, शब्दादिरूप जे कांहीं अर्थ त्यांचे स्वभाव, शक्ति, संयोग, वियोगादिजन्य गुण, इ॰ जाणून त्या अर्थांची जाप्रकारें विवक्षित कार्यावर योजना केली असतां तें कार्य विवक्षितानुरूप सिद्ध होतें असा जो सूक्ष्मबुद्धीनें बसवायाचा तो योजनाप्रकार ती; उ॰ घड्याळ करायाची युक्ति मला समजली; कोणेक गोष्ट कोणेकाचे युक्तीस येणें म्ह॰ युक्त असी वाटणें; कांहींएक युक्तियुक्तीनें करणें, घेणे, इ॰ स्थलीं त्वरा दांडगाई न करितां मोईनें करणें; युक्तीचा म्ह॰ जामध्यें युक्ति आहे असें भाषण, कृति, इ॰ तो; युक्तीचे वाटेनें म्ह॰ युक्तीचे मार्गानें करणें, इ॰ कांचें वि॰

**युक्तिमान्, युक्तिवान्**, ३ लिं॰ अनेक युक्ती जाणतो तो·

**युक्तिवता**, अ० कों० युक्तीच्या वाटेनें.

**युक्त्या**, अ० युक्तीनें; २, ३लिं० शत्रुपराजयादिरूप स्वकार्याची युक्ति जाणणारा जो तो.

**युग**, न० सं० कृत, त्रेता, द्वापर, आणि कलि, हे जे चार कालविभाग ते प्र०, किं० चार मिळून एक तें; युगधर्म, युगमाहात्म्य, इ० स० जाणावे; २, द्वय; कर्णयुग, वस्त्रयुग, इ० स० जाणावे; ३. जोखड.

**युगादि**, पु० कृतायुगाचे प्रारंभदिवस जे प्रतिवर्षी येतात ते प्र०

**युगुल**, न० द्वय.

**युगूत**, स्त्री० युक्तीचा अपभ्रंश.

**युग्म**, न० सं० द्वय; २, स्त्रीपुरुषरूप जें मिथुन तें.

**युत**, ३लिं० सं० युक्त प्रथमार्थी.

**युद्ध**, न० सं० झूंज; वाग्युद्ध, द्वंद्वयुद्ध, बाहुयुद्ध, इ० स०

**युद्धकंडू**, स्त्री० सं० वीरपुरुषांचे बाहूंस युद्धाचा उत्कंठेनें जी कंडू ति सदृश व्यथा होत्ये ती.

**युद्धवीर**, पु० सं० युद्धाविषयीं जो वीर तो.

**युवति, युवती**, स्त्री० सं० तरुणी.

**युवराज**, पु० सं० राजा राज्यपदीं असतांच आपल्या हातारवाली सर्व राज्याचा कारभार करावा आणि आपले पाठीमागें मुख्य राज्यपदीं बसावें ह्मणून जो पुत्रादिक अधिकारी केला असतो तो.

**युवराजा**, पु० युवराजाचा अपभ्रंश.

**युवराज्य**, न० यौवराज्याचा अपभ्रंश.

**युवा**, पु० सं० तरुण; २, साठ संवत्सरांतील नववा जो संवत्सर तो.

**युष्मद्**, सं० तुह्मी; तुमचें गृह, तें युष्मद्गृह, युष्मत्पुत्र, युष्मद्देश, इ० स० प्र०

युष्मा-

**युष्मादिक**, तुह्मी; दुसऱ्यास लावून बोलावें ओपरोधिक बोलावें असा कांहीं डौल असतां प्र०; एथें क्रियापदाचें रूप तृतीयपुरुषवत् होतें; उ० आतां शौर्याच्या गोष्टी सांगतां पण ते दिवशीं चोर आले तेव्हां युष्मादिकच पळाले.

**यू**, अ० कुत्र्यास बलावयाचा शब्द आहे.

**यूका**, स्त्री० सं० ऊ.

**यूथ**, पु० सं० समुदाय, प्रायः पशुपक्षी एतद्वृत्ति.

**येऊनजाऊन**, अ० वरकड कांहीं नाहीं कायतें एवढेंच असा अर्थ विवक्षित असतां याचा प्र० करितात; उ० वरकड सारी दौलत संपली आतां येऊनजाऊन वतन राहिलें आहे तेवढें विका म्ह० झालें; तूं येऊन जाऊन मारशील आणखी काय करणार आहेस; कोणेकस्थळीं नेहमी न असतां कधींबिधीं यावेंजावें अशाप्रकारें असण्याचें वि०; उ० मी येथें नेहमी राहणार नाहीं येऊनजाऊन असेन.

**येक**, ३लिं० एकशब्दाचा अपभ्रंश; एकशब्दपूर्वक समासादि होऊन जे शब्द व्यवहारांत प्रसिद्ध आहेत ते एकशब्दापुढें लिहिले आहेत ते प्रा० येकशब्दपूर्वकही कोणी उच्चारितात, जसें एकंदर, एकमेक, एकीबेकी, एकुणात, एकत्र, तद्वत् सर्व एथें जाणावे.

**येडका**, पु० एडका; याप्रकारेंच जे एकारादिक शब्द एकाराचे क्रमांत जितके लिहिले आहेत तितके प्रा० येकारादिक उच्चारितात, जसें येथें, येथला, येवढा, इ०

**येजा**, स्त्री० कोणेकस्थळास जावें, आणि पुनः माघारें यावें, अशाजी खटपट ती.

**येणी**, स्त्री० दुसऱ्याकडून यावयाची जी गंजीफांचा

तलफ

तळफती.

**येणें**, विवक्षित अवधीपासून आपल्यांकडील असा मानलेलाजो प्रदेश त्याप्रति कोणेकानें गतिद्वारा प्राप्त होणें; उ० पुण्याहून घरीं येत्येसमयीं त्यास भेटलों; २, वक्त्याचाजो संबोध्य त्याणें अधिष्ठित झालेला, किं० अधिष्ठित होणाराजो प्रदेश तिकडे त्या वक्त्यानें गमन करणें; उ० अरे नाऱ्या जा रामाजीपंतासह्मणावें मी तुह्मांकडे येतों कोठेंजाऊं नका; तुह्मी पुण्यासजात असलां तर मी येतों; ३, कोणेक कालांश, देशांश, किं० अनुक्रमेंकरून स्थितजो ग्रंथ, व्यवहार, इ० त्याचा कोणेक अंश त्याणें गतिविशिष्ट जो कोणी त्याची आपल्यापर्यंत गति झाल्यामुळें त्यासप्राप्त होणें; उ० दोन घटकाजर चांगला वारा लागतातर बंदर आलें असतें; ज्येष्ठमास आला आतां गलबतांतून जाण्याची सोय नाहीं; या तिहीं लक्षणांचा तात्पर्यार्थ किं येणें, आणि जाणें, या दाहों धातूंचा गति विशिष्ट होणें असा अर्थ परंतु प्राप्य अधिकरणाचे प्राप्तीस जेव्हां प्राधान्य विवक्षित आहे तेव्हां येणें याचा प्र०, आणि जेव्हां अधिष्ठित अधिकरणाशीं जो वियोग त्यास प्राधान्य विवक्षित आहे तेव्हां जाणें याचा प्र० अशी व्यवस्था आहे; ४, कोणेक विद्या, कला, इ० बुद्धीनें धरलें जाणें; उ० याला लिहिणें येतेंपण पढणें येत नाहीं; ५, राग, लोभ, दया, ज्वर, स्वरूप, फल, पुष्प, पान, लोणी, बाळवी, इ० याणीं अंतःकरण, शरीर, वृक्ष, भूमि, इ० जीं आपलालीं उत्पत्त्यधिकरणें त्यांचाठायीं उत्पन्न होणें; ६, कांहीं एक प्रमेय वस्तु कोणेक परिमाणाशीं तुल्य भरणें; उ० ही अंगठी तोळाभर वजन येईल, तो गांव एथून चारकोस येईल; ७, कांहीं एक कृतीनें निर्मित जो आकारविशिष्ट भिंत, इ० पदार्थ त्याणें चांगला वांकडा, इ० आकारवैशिष्ट्येंकरून सिद्ध होणें; उ० हें पागोटें चांगलें आलें नाहीं अणखी बांध; ८, अवस्थादिरूप जो कोणेक धर्म त्यानें कोणेकानें पावणें, किं० तो अवस्थादिरूप धर्म कोणेकाप्रति प्राप्त होणें; उ० घर अगदीं मोडकळीस आलें आहे; तूं शिवी दिलीस तर तो क्रोधास येईल; तां, आयास, आवयास, एतत्प्रत्ययांत सर्व धातूंपुढें याचा योग होतो तेव्हां तत्तद्धात्वर्थ कर्तृशक्तीनें करायास किं० घडायास शक्य होणें असा अर्थ; उ० ते धनी पडले त्याशीं उत्तर करतां येत नाहीं; प्रसंग पाहून बोलावयास येईल; त, इत, एतत्प्रत्ययांत जे सर्व धातु त्यांपुढें याचा योग झाला असतां त्या त्या धात्वर्थाचें कांहीं काळ सतत असणें अशा अर्थाचें द्योतन होतें; उ० वडील वर्तत आले त्याप्रमाणें आह्मीं करीत आलों; प्रवासाद्यर्थ कोणी निघाला असतां त्याचें जेंजाणें त्या अर्थीं; मंगलाद्यर्थ येणें याचा प्रयोग करितात; उ० आतां आह्मीं येतों कृपा असों द्यावी; ९, न० दुसऱ्याकडे आपलें पावयाचें असतें जें ऋणादि तें.

**येणेंजाणें**, न० कोणेकस्थळीं कोणेकाचा यावें जावें असा असतो जो राबता तें; उ० श्रीमंताकडे त्यांचें येणेंजाणें आहे; तुह्मीं आमचे कडलें येणेंजाणें अगदीं सोडलें हें काय; २, घेणेंदेणें; उ०

उ॰ येथें आमचें येणेंजाणें होतें तें उकळायास आलों होतों·

**येणेंप्रमाणें**, अ॰ एणेंप्रमाणें·

**येतांजातां**, अ॰ सर्वदा अनेकवार; उ॰ तो येतांजातां बापकोस शिव्या देतो·

**येताजाता**, पु॰ मार्गानुरोधास्तव विवक्षितस्थलीं प्राप्त होणाराजो कोणी वाटसरू, इ॰ तो; उ॰ मार्गावरच्या आंबा हा येत्याजात्याचा त्याजवर धण्याची सत्ता चालत नाहीं·

**येतापाया**, पु॰ द्रव्यादि चोहोंकडून येऊन एकत्रजमून समृद्धि होत असावी अशाविषयीं अनुकूल असतो जो काळ तो·

**येतेकरी**, ३लिं॰ रा॰ विद्या, कळा, इ॰ अनायासानें लोकरजास पाठ येतें तो·

**येरजार, येरझार**, स्त्री॰ कोणेकस्थलीं कांहीं कार्योद्देशानें जी खेप ती: तद्विषयीं आलस्य, अनादर, इ॰ असतां प्र॰; उ॰ दहावेळ गेलों पण गांठ पडत नाहीं आतां माझानें येरझारा करवत नाहींत·

**येरधार**, स्त्री॰ येरझार·

**येरू**, ३लिं॰ ग्रं॰ पूर्ववाक्याच्याठायीं ज्याचा नामनिर्देश केला असतो त्याचा परामर्शकर्तव्य असतां या सर्वनामानें करितात, याचा प्र॰ प्रथमांतच आढळतो; उ॰ सीता ह्मणे लक्ष्मणा धांव, येरू ह्मणे राक्षसी माव·

**येवाजावा**, पु॰ येणेंजाणें·

**येश**, न॰ यशशब्दाचा अपभ्रंश·

**येशवंत**, ३लिं॰ यशस्वी;

**योग**, पु॰ कोणेक पदार्थ पदार्थांतराशीं लागला असतां त्यांचा परस्परें होतोजो संबंध तो; उ॰ लोहास परिसाचा योग झाला असतां सुवर्ण होतें; सुंठीस शर्करेचा योग झाला असतां समधात होल्ये; २ कोणेक अर्थाचा कोणेक अर्थाशीं सामीप्यसंबंधादिरूपजो संबंध तो; उ॰ तो चांगला होता पण त्या दुष्टाचायोगानें नासला; ३, कार्यमात्र होण्यास निमित्तभूतजो ईश्वर संकल्प, जो जीकांस कार्यावरून अनुमित होतो तो; उ॰ तिला नहाण यावें आणि तिचा दादला मरावा असा कांहीं योग होता; हा अर्थ घेउनच कालयोग, दैवयोग, प्रारब्धयोग, इ॰ स॰; ४, कोणेक कार्य सिद्ध्यर्थ कोणेक वस्तूची तत्कार्यसाधक व्यापारीं जी योजना तो; उ॰ आमवायूवर एरंडेलाचा योग प्रशस्त आहे; ५, प्राणवायूच्या निरोधानें अंतःकरणाची एकाग्रता करावी असा एक शास्त्रोक्त ईश्वरप्राप्तीचा उपाय आहे तो; योगसाधन, योगमार्ग, इ॰ स॰; ६, ईश्वर प्राप्त्यादिकार्याविषयीं उपायभूतजें भक्त्यादिक त्यास स॰ भक्तियोग, कर्मयोग, ज्ञानयोग, इ॰ स॰; ७, पंचांगाचे अवयव विष्कंभादिकजे सत्तावीस ते प्र॰

**योगनिद्रा**, स्त्री॰ ईश्वराचीजी निद्रावस्था ती·

**योगमाया**, स्त्री॰ ईश्वराचीजी मायारूप शक्ति ती·

**योगराजगुग्गुल**, पु॰ एक रसायन आहे·

**योगराजगुग्गुलु**, पु॰ योगराजगुग्गुल·

**योगरूढ**, ३लिं॰ प्रकृति प्रत्ययाचा किं॰ इतर अनेक पदांचा परस्पर योग होऊन सिद्ध झाला होत्सातां त्या अवयवार्थानुरोधानें सामान्यार्थीं रूढ नसून अर्थ विशेषींमात्र लोकांत रूढ असतो असाजो शब्द तो; जसें

जसें अंगरखा या शब्दापासून अंग राखलें जातें जेणेंकरून या व्युत्पत्तीनें अंग रक्षणोपयुक्त पदार्थमात्राचा बोध व्हावा तो हा शब्द योगरूढ आहे ह्मणून वस्त्रविशेषाचा मात्र बोध होतो ·

**योगशास्त्र**, न॰ सं॰ ज्यामध्यें प्राणायामादिद्वारा अंतःकरणाचे एकाग्रतेचा उपाय सांगितला आहे, असें सहा शास्त्रांतील एक शास्त्र आहे ·

**योगक्षेम**, न॰पु॰ सं॰ अन्नाच्छादनादिद्वारा आपले प्रपंचाचा जो निर्वाह तो तें; उ॰ आजपर्यंत त्या सत्पुरुषाचा आश्रय होता तेणेंकरून योगक्षेम बराच होत होता आतां कठीण ·

**योगिनी**, स्त्री॰ सं॰ देवता विशेष आहे ·

**योगी**, पु॰ प्राणनिरोधादिद्वारा योग ज्याला सिद्ध झाला आहे तो ·

**योग्य**, ३ लिं॰ उचित; उ॰ पालखी जी आहे ही श्रीमंतास योग्य; या स्त्रीस हा नवरा योग्य आहे; २, विद्यादिद्वारा प्रतिष्ठित, सभ्य, असा जो मनुष्य तो; उ॰ या गांवांत चार ब्राह्मण योग्य आहेत, चार अयोग्यही आहेत; ३, सजातीय पदार्थ समुदायामध्यें तत्तद्गुणवैशिष्ट्येंकरून इतर सजातीय पदार्थापेक्षां जो प्रशंसार्ह तो; उ॰ अवघ्या मंडळींत बापूजीबाबांचें अक्षर योग्य आहे ·

**योजक**, ३ लिं॰ कांहीं एकाची योजना करणारा जो तो ·

**योजणूक**, स्त्री॰ योजना ·

**योजणें**, कोणेक अर्थानें कोणेक अधिकार, पद, किं॰ शत्रुपराजयादिरूप काम, इ॰ कांवर नेमणें; उ॰ त्यामामलतीवर रामाजीपंतांस योजलें; त्याजकडे तगाददार जर चांगला कणख्या योजाल तर पैक्याचा उगावा होईल; २, कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं संबद्ध करणें परंतु जे पदार्थ परस्पर संबद्ध होऊनच विवक्षित कार्योपकारक होतात त्यांचा तो संबंध वाच्य असतां प्र॰; उ॰ रथाशीं घोडे योजले; धनुष्याशीं बाण योजला; ३, कोणेक गोष्ट अशी अशी या प्रकारें करावी; इ॰ रूपें संकल्पिणें; उ॰ आह्मी काम योजलें तें जर सिद्ध झालें तर तुह्मासही कांहीं प्राप्त होईल; ४, कोणेक अर्थ कोणेक कार्यावर किं॰ कोणेक अधिकार पद, इ॰ कांवर नेमावा अशा प्रकारें अंतःकरणाने धरणें, उ॰ तुह्मीवर योजला होतात त्याचें रासकूट मिळत नाहीं; ५, आठवेनासा, किं॰ सुचेनासा झालेला जो कांहीं शब्द किं॰ अर्थ तो चित्ताचें एकाग्र्य करून मनांत आणणें ·

**योजन**, न॰ स॰ चार कोश रूप जें अध्वप्रमाण तें ·

**योजना**, स्त्री॰ सं॰ योजण्याचा जो व्यापार ती ·

**योजित**, ३ लिं॰ सं॰ योजिला तो ·

**योद्धा**, पु॰ सं॰ युद्ध करण्याविषयीं जो समर्थ तो ·

**योनि**, स्त्री॰ सं॰ स्त्रीव्यक्तीचें जे उपस्थ ती; २, ला॰ त्या त्या जाती मध्यें उत्पन्न होणें, वास करणें, इ॰ विषयीं विवक्षित जी ती ती जाति ती; उ॰ चवऱ्यांयशीं लक्ष योनि भोगाव्या तेव्हां नरदेहाची प्राप्ति होत्ये; ३, तत्तत्पदार्थाचें जें समवायिकारण ती; उ॰ मेघ हा धूमयोनि आहे; ४, जगाचें निमित्तकारण जे ईश्वर, काल, इ॰ त्यासही ह्म॰; उ॰ ईश्वर हा जगद्योनि होय ·

**योनिसंबंध**, पु॰ विवाहद्वारा जो परस्पर संबंध तो ·

**यौगिक**, ३ लिं॰ सं॰ प्रकृति, प्रत्यय, किं॰ इतर अनेक

अर्थ

अर्थवंत शब्द यांचा परस्पर योग होऊन अवयव शक्त्यनुरोधानें अर्थ व्हावयाजोगा सिद्ध झालेला जो विशिष्टशब्द तो·

**योनसंबंध**, पु॰सं॰ योनिद्वारकजो परस्परांचा संबंध तो·

**योवन**, न॰सं॰ तारुण्य·

**योवराज्य**, न॰सं॰ युवराजाचाजो अधिकार, किं॰ कर्म·

---

**र**, करणें याचा योगी.प्र॰; अ॰ रडणें याअर्थी संकेतानें स्म॰

**रंक**, पु॰ लोकानीं मानायास कारणभूतजें धन,विद्या, पराक्रम, इ॰ कृतमहत्व तें जापाशीं नाहीं अतएव केवळ तुच्छ हलकाजो पुरुषादिक तो; उ॰ साधुपुरुषास राजा आणि रंक बरोबर दिसतात·

**रकटा**, पु॰ रा॰ आगवळ·

**रकटें**, न॰ जुनें,फाटकेंजें कांबळें तें·

**रकत**, न॰ रक्तशब्दाचा अपभ्रंश, प्रथमार्थी प्र॰

**रकतओद**, स्त्री॰ रक्तओद·

**रकम**, स्त्री॰ यावत्संख्याक द्रव्यावर एकदां देणें,घेणें, ठेवणें, इ॰ व्यापार विवक्षित असतो तावत्संख्याक जेतें रुपये, इ॰ द्रव्य ती एक; २, हिशेब, इ॰ करायासाठीं लिहितातजो अंकराशिती; कोणेकानें रकमेस येणें स्म॰ जेर येणें, किं॰ डबघाईस येणें; उ॰ तो इतका उद्दाम घोडा होता पण त्याचा बुकस्वाराचे हातीं जातांच दोनदिवसांत रकमेस आला: अहो हें तुमचें घर रकमेस आलें आहे आतां मोडून नवें बांधलें पाहिजे·

**रकमाला**, पु॰ कांहींएक कारणार्थ अनेक रकमा जा कागदावर मांडिल्या असतात तो कागद; प्रायः राजकीय व्यवहारीं प्र॰

**रकमी**, ३लिं॰ जाविषयीं एकवेळ नेम ठरला असतो त्यांत वारंवार अधिक उणें व्हावयाचें नाहीं आणि त्या अधिकाऱ्याकडून एकाएकी निघायाचेंही नाहीं असेंजें शेत, चाकरी, इ॰ किं॰ तत्संबंधी धारा, इ॰ किं॰ तेंकूळ,चाकर.इ॰ अधिकारी तो·

**रकाना**, पु॰ लिहावयाचे कागदास उभ्यामोडी पाडून जे अनेक विभाग पाडितात ते प्र॰

**रक्त**, न॰सं॰ शरीरांत एक द्रवरूप धातु आहे जीचा रंग तांबडा असतो तें; रक्ताचाजो स्त्रावतो रक्तस्त्राव.इ॰ स॰ होतात; २, ३लिं॰ रंगानें रंगलेलाजो पदार्थ तो; ३, अनुरक्त; ४, तांबडा·

**रक्तओद**, स्त्री॰ हगतांना रक्त पडतें अशीजी हगवण लागते ती·

**रक्तचंदन**, पु॰ एक वृक्ष आहे·

**रक्तचंदनी**, ३लिं॰ रक्तचंदन संबंधीजो पदार्थ तो·

**रक्तपरमें**, न॰ रक्तप्रमेह·

**रक्तपिती**, स्त्री॰ एक कुष्ठरोग आहे·

**रक्तपित्या**, ३लिं॰ रक्तपिती रोग झाला आहे जास तो·

**रक्तप्रमेह**, पु॰ शिश्नद्वारानें रक्त स्त्रवतें असा एक प्रमेहांत भेद आहे·

**रक्तबाळू**, पु॰ रा॰ एक रोग आहे·

**रक्तबीज**, पु॰ टेंकणास स्म॰

**रक्तबोंबाळ**, ३लिं॰ कापणें, फुटणें, इ॰ कारणामुळें

मुळें आंतून रक्त निघून कांहीं त्याला वरवटलें आहे कांहीं खालीं गळतें आहे अशा अवस्थेंतें पावलाजो हस्तपादाद्यवयव तो; २, पु॰ कों॰ त्या अवयवाचीजी ती तशी अवस्था तो; उ॰ हाताचा रक्त बोंबाळ झाला.

**रक्तबोळ**, पु॰ ओषधोपयोगी एका वृक्षाचा चीक आहे तो.

**रक्तमोक्षण**, न॰ सं॰ शरीरांतील रोगांश बाहेर पडावा ह्मणून जळू लावणें, फांसण्या, शिराच्छेद, इ॰ द्वाराजें कांहीं रक्ताचें निष्कासन करितात तें.

**रक्तरोडा, रक्तरोहिडा**, पु॰ एक झाड आहे.

**रक्तवान**, पु॰ शाई विकून उपजीविका करितो तो; २, श्रीमंत लोकांचेंघरीं पानें, द्रोण, आणि शाई, यांचे कामावर जो ठेविला असतो तो.

**रक्तवानी**, स्त्री॰ रक्तवानाचेंजें कर्म ती.

**रक्तसांड**, स्त्री॰ कों॰ रक्तमोक्षण.

**रक्तांबर**, ३ लिं॰ रा॰ रक्तानें भरल्यामुळें लाल झालाजो शरीरावयव, वस्त्रें, भूमि, इ॰ तो.

**रक्तावणें**, रक्ताळणें.

**रक्ताळणें**, पोंतगळूं, जखम, इ॰ आंतून रक्तस्रवे अशा दशेतें पावणें.

**रक्ताक्षी**, पु॰ साठांसंवत्सरांतील अठ्ठावन्नावा संवत्सर तो.

**रक्तिमा**, पु॰ सं॰ लालपणा.

**रत्न्याबोळ**, पु॰ रक्तबोळ.

**रखडणें**, रा॰ कांहींएक कार्याचे उद्देशानेंजो प्रवृत्त झाला त्याणें तें कार्य धडपणें नहोई आणि आपलीही सुटका नहोई असें झाल्यामुळें कांहीं काल त्या कार्याखालीं कंठाव्या येई अशी विपत्ति भोगीत असणें; २, कोणेकानें दुखण्यात खितपत पडणें.

**रखमंडळ**, न॰ रा॰ चांगल्ये चागल्यावर राखउडविल्यामुळें होत्येजी त्याजाग्याची घाण तें.

**रखरख**, स्त्री॰ कांहींएक रोगादिविकृतीनेंजी कोणाएकास खारखा सुटाया जोमी पोटांत आग होत्ये ती.

**रखरखणें**, रखरखीनें युक्त होणें.

**रखरखाट**, पुं॰ ग्रामादिस्थलावर असतो रखरखीतपणा तो; २, पोटांत अतिशयित होत्येजी रखरख तो; पड, हो धा॰ प्र॰

**रखरखीत**, ३ लिं॰ वृक्षांची छाया, ओलें तृणादि, पाणी, इ॰ कृत जो थंडावा, आणि स्निग्धपणा तो; जेथें नाहीं असेंजें देश ग्रामादि स्थल तो, किं॰ आर्द्रांश स्निग्धांश जामध्यें नाहीं असेंजें रुक्ष अन्नादि भक्ष्य तो.

**रखवाली**, स्त्री॰ कोणेक अर्थ कोणी नेईल, खाईल, किं॰ जाईल, इ॰ नव्हावें ह्मणून त्याचें रक्षण करण्याचेंजें काम ती.

**रखा**, स्त्री॰ गोंवरी, लाकूड, इ॰ जळलें असतां होतें जें भस्म ती.

**रग**, स्त्री॰ मनुष्यादिकांचा बलादिकृत जो ताठा ती; २, रोग, विकृति, इ॰ कांची उत्तरोत्तर चढ व्हावी अशीजी बलावस्था ती; प्रा॰ मोड, उत्तर, धा॰ प्र॰; उ॰ यागळवाचें रक्त काढतांच रग मोडली; ३, हात, पाय, पाठ, इ॰ शरीरावयवांसजी एकसारखी कळ लागत्ये ती.

रंग, पु० चक्षुरिंद्रियानेंमात्रजाणलेंजातात असेजे नीलत्व, पीतत्व, शुक्लत्व, इ० पदार्थनिष्ठ गुण तेप्र०; २, वस्त्र, चित्र, इ० पदार्थरंगवायासाठीं विवक्षितजो हिंगूळ, पेवडी, नीळ, सफेता, इ० पदार्थ तो, किं० तींहींकरून सिद्ध केलेंजें द्रव्य तो; ३, गान, कीर्तन, तमाशा, भाषण, इ० कांचा लोकांचीं अंतःकरणें रमायाजोगा पडतोजो शोभाविशेष तो; उ० आजचे गाण्यास रंग चांगला आला; ४, मनुष्य, वृक्ष, बाग, शेत, इ० पदार्थ, किं० संसार, व्यवहार, इ० गोष्ट, इ० कांची मध्यें परिपूर्ण शोभा येत्ये अशीजी दशा तो; उ० नुगतासा संसार रंगास आला तों बायको मेली; हा बाग चांगली मेहनत झाली तर दोनवर्षांनीं रंगास येईल; ५, कोणेक गोष्ट केलीअसतां शोभायाजोगा प्रसंगानुरूप त्या गोष्टीचा येतोजो समय तो; उ० शालजोडीचा गोष्ट महजांत निघाली आहे, जरतूं शालजोडी मागशील तर पहा, मागण्याचा रंग आहे; ६, कोणेक परोक्ष गोष्ट, इ० कांची कांहींएक चिन्हावरून एथें पूर्वीं अमुक गोष्ट झाली असावी, किं० अमुक स्थलीं अमुकगोष्ट एव्हां होत असावी, किं० उद्यां प्रा० अमुक गोष्ट व्हावी, इ०रूप, किं० हा चोर असावा, इ०रूप मनात येत्येजी संभाव्यता तो; उ० आज गर्मी होत्ये तेव्हां पाऊस पडेलसा रंग दिसतो; हें पोर फार खोडया करतें आहे आतां मारखाण्याचे रंगास आलें असें वाटतें; ७, बरेपणा, वाईटपणा, हितावहपणा, इ० यद्यत्प्रकारवैशिष्ट्येंकरून त्यात्या वर्तमान, व्यवहार, इ० गोष्टीचें स्वरूप ध्यानांत येतें ते ते प्रकार प्र०; उ० कां, आज तुमचे घरचा कसा काय रंग आहे; एव्हां तुह्मी चला मग तेथें जसा रंग दिसेल तसें करतां येईल; ८, शिमगा, विवाह, इ० कांचे अंगत्वें एकमेकाचे अंगावर रंगाचें पाणी टाकावें असा करितातजो समारंभ तो; ९, गंजीफांतील जे राजे ते आपल्याआपल्या पानाशुद्धां प्र०; १०, खेळायाचे सोंगट्यांतजीं चार चतुष्टयें असतात तीं प्र०; रंग सई होणें, किं० रंग होणें ह्म० पक्क्या रंगाच्या चारी सोंगट्या आपले पुढील पटावर येऊन बसणें; ११, सोदेगिरी, मत्तपणा, इ० दिसायाजोग्या मनस्वीजा चेष्टा तो; ह्म० भंगकरी रंग अफूकरी चाळा, तंबाखू बापडा भोळा; १२, सं० नृत्य, नाटक, मल्लयुद्ध, इ० पहायासाठीं करितातजी सभा तो; कोणेकानें रंगांत येणें, ह्म० कोणेक विषयसुखाचे ठायीं मग्न होऊन इतर विषयांकडे भान न राही अशा अवस्थेतें पावणें; रंगाची मोट बांधणें, ह्म० विवादिकांमध्यें ईषन्मात्र आपला जय झाला असतां आणखी दुसऱ्याचे अधिक पराजयार्थ प्रवृत्त न होतां तितक्यांत आटोपून घेणें; रा० याच अर्थीं रंगाचा मोटा बांधूनयेत असा अनेक वचनांत निषेधगर्भित ही प्र० होतो; उ० त्याणें मी चुकलों ह्मटलें झालें आतां काय रंगाचा मोटा बांधावयाचा आहेत.

रगड, स्त्री० चंगळ.

रगडणें, कोणेक पदार्थ दोहों पदार्थांचे दाटींत सांपडवून, किं० वर भार घालून निष्पीडित करणें; २, दपटणें; उ० याणें पंचवीस लाडू रगडले;

भल

भल त्याचेंच पागोटें रगडलेंनीं चालला ·

**रगडपट्टी**, स्त्री॰ चंगळपट्टी; २, रगडमल्लाचें जें कर्मतें; उ॰ नीट विचार करून अर्थ लिहीत जा उगीच रगडपट्टी करूं नका ·

**रगडमल्ल**, पु॰ ज्याचे अंगीं काम करण्याची युक्ति नाहीं आणि काम कोणत्या रीतीनें केलें असतां नीट नेटकें होईल, इ॰ विचार न करितां केवळ आंगबळानें काम करण्याचा स्वभाव ज्याचा त्यास म्ह॰; उ॰ बारीक काम असेल तें यास सांगूं नका हा आपला रगडमल्ल आहे नासून टाकील; २, ज्याचे आंगीं सुरेखपणा, नाजुकपणा, नाहीं आणि सामान्यरीतीपेक्षां आकारानें मोठा असा जो दागिना, पात्र, वस्त्र, भाकर, इ॰ पदार्थ त्यास म्ह॰

**रगडमल्ली**, स्त्री॰ रगडमल्लपणा ·

**रगडा**, पु॰ संकुचित स्थलामध्यें अनेक मनुष्यादि जमले असतां होत्ये जी अतिशयित दाटी ती; २, करणारांचे, किं॰ करायास पाहिजे जो अवकाश त्याचे अल्पत्वामुळें संसारादिसंबंधी कामाची होत्ये जी दाटी, जिचे खालीं करणारा थकून जातो तो; उ॰ सारे कामाचा रगडा एकावरच पडतो त्याणें काय करावें; आज कामाचा रगडा आहे आह्माला यावयाला फावणार नाहीं ·

**रंगडाव**, पु॰ गंजिफा खेळण्याचा एक प्रकार आहे ·

**रगडून**, अ॰ कडकाऊन; उ॰ रगडून पाऊस पडेल तेव्हां गर्मी मोडेल; रगडून दोन जाबसाल करावे म्ह॰ काम होईल; २, तगटून; उ॰ रगडून जेव चाला याचें आहे; रगडून बांध नाहींतर सुटेल ·

**रगडया**, ३ लिं॰ रपट्या ·

**रंगडया**, स्त्री॰ नाना प्रकारचे रंग त्या, अनेकवचनीं प्र॰

**रंगण**, न॰ भोंवरा खेळायाकरितां मंडलाकार रेषेनें आवृत जो प्रदेश करितात तें; रंगणात येणें म्ह॰ कोणेकातें उद्देशून त्याचे परोक्ष निंदा, कज्जा, इ॰ करणारा जो कोणी त्याणें प्रसिद्धपणें तें निंदादि करायास त्याचे समक्ष येणें; उ॰ पाठीमागें बडबडून फळ काय अवसान असलें तर असा रंगणांत ये मग पाहीन ·

**रंगणें**, वस्त्रादिक विवक्षित रंगानें विशिष्ट होणें; २, गान, ईश्वरभक्ति, इ॰ कांची गोडी लागून तदितर कोणताच विषय रुचूं नये असा जो सुख संस्कार अंतःकरणावर होतो तद्विशिष्ट अंतःकरणानें किं॰ त्या मनुष्यादिकानें होणें ·

**रगत**, न॰ रकत ·

**रगतओढ**, स्त्री॰ रकतओढ ·

**रगदार**, ३ लिं॰ रगेल

**रंगदार**, ३ लिं॰ ज्याचे आंगीं रंग चांगला आहे तो पुष्पादि पदार्थ; २, रंगेला ·

**रंगदेवता**, स्त्री॰ गाणें, कीर्तन, पुराण, भाषण, इ॰ कांस जिचा प्रसादानें रंग येतो अशी एक रंगाभिमानिनी देवता मानितात ती ·

**रंगपंचमी**, स्त्री॰ फाल्गुनवद्य पंचमी ·

**रंगबाजी**, स्त्री॰ रंगडाव ·

**रंगमहाल**, पु॰ नाना प्रकारचे विलास करायाकरितां

रितां आरसे, चित्रें, इ० कांनीं सुशोभित जी श्रीमंतलोक जागा करितात ती ·

रंगमूर्ति, स्त्री० सं० कीर्तन, गायन, इ० कांस रंग येण्यास कारणभूत जे सभ्य रसिकजन त्यांस स्तुतीनें स्म०

रंगलूट, स्त्री० गंजीफाचे डावांत सर्वांचीं पानें एक रंगाचींच पडलीं असतां तो हुकूम फुकट जातो आणि पानें सर्वांनीं लुटून घ्याचीं असा एक प्रकार आहे ती ·

रंगविणें, कोणाएकाचे तोंडावर चारवविणें ·

रगाडा, पु० रगडा; २, चरक रस कादायाचा ·

रंगामेजी, स्त्री० दिवाणखाना, इ० स्थलांस नानाप्रकारचे रंगानीं चित्रें, वेलबूट, काढून शोभार्थ चितरण्याचा जो संस्कार ती ·

रंगारी, पु० वस्त्रें रंगवून उपजीविका करितात अशी एक जाति आहे ·

रंगी, ३ लिं० रंगेला जो मनुष्य तो ·

रंगीत, ३ लिं० कुसुंबा, हिंगूळ, इ० रंगानें रंगविलेला जो वस्त्र, काष्ठ, इ० पदार्थ तो ·

रंगीन, रंगील, ३ लिं० दे० रंगेला ·

रंगीला, ३ लिं० रंगीन

रगेल, ३ लिं० ज्याचे आंगीं रग बहुत असा जो मनुष्य, अश्व, इ० तो ·

रंगेल, रंगेला, ३ लिं० गाणें, तमाशा, स्रक्चंदनादि विषयांचा उपभोग, थट्टा, मस्करी, या विषयांवर ज्याची फार रुचि असा जो आनंदी, रसिक, मनुष्य तो ·

रंगेली, ३ लिं० रंगेला ·

रग्या, ३ लिं० रगेल ·

रघत, न० दे० रगत ·

रघतरोडा, पु० रक्तरोडा ·

रचणी, स्त्री० दे० रचण्याचा जो व्यापार ती ·

रचणें, दगड, विटा, किं० वाक्यें, पदें, पदार्थ, इ० जे अवयवभूत पदार्थ ते एकावर एक, एकापुढें एक, इ० विवक्षित प्रकारें परस्पर संबद्ध करून भिंत, गंज, श्लोक, मसलत, इ० अवयविभूत पदार्थ निर्मिणें; २, विवक्षानुरूप आकार होई, असें दगड, भांडीं, इ० पदार्थ एकावर एक एकावर एक मांडणें ·

रचना, स्त्री० भिंत, गंज, श्लोक, इ० किं० त दवयव जे दगड, पदें इ० त्यांचा रचण्याचा जो व्यापार, किं० प्रकार ती; उ० मी पदें योजलीं आहेत आतां श्लोकाची रचना मात्र करायाची आहे; अनेक पदांची एकापुढें एक एकापुढें एक अशी रचना केली असतां श्लोक होतो; या किल्याची रचना चांगली आहे; २, अवयव रचून सिद्ध होतो जो अवयवी ती; उ० भिंत, हा एक रचनाविशेष आहे ·

रचित, ३ लिं० रचलेला जो तो ·

रज, न० सं० धूळ; २, पुष्पसंबंधी जो पराग तें; ३, स्त्रियांचें ऋतुसंबंधी जें रुधिर तें; ४, रजोगुण ·

रज, पु० सुवर्णादि धातूंचा जो केवळ बारीक कण तो; रजाचा गज करणें, स्म० पोषण पालनादिकें करून कोणएकास लहानाचा मोठा करणें ·

रजई, स्त्री० वस्त्राचे पोटीं कापूस घालून शिंवून निजते समयीं पांघरायास जें पांघरूण करितात ती

रजक, पु॰ परीट.

रंजक, ३ लिं॰ भाषणादिद्वारा दुसऱ्याचें अंतःकरण रंजवितो तो; याचे समास मनोरंजक, सभारंजक, जनरंजक, इ॰ जाणावे.

रंजक, स्त्री॰ बंदूक, तोफ, इ॰ पेटवायाकरितां त्याच्या कान्यावर घालितात जी दारू ती; २, फटाका, तोटा, बाण, इ॰ कांमध्यें जी दारवेची वात करून भरित असतात ती; रंजक पिणें स॰ तोफ, इ॰ कांचा कान्यावरची मात्र दारू जळून बार न होतां राहणें, रंजक उडणें, झडणें, इ॰ स्थलीं चकमक झडणें.

रजःकण, पु॰ सं॰ धूळ, पराग, इ॰ कांचा जो बारीक कण तो.

रंजकदाणी, स्त्री॰ रंजकेची दारू ठेवायाचें जें आकारविशेषाचें पात्र असतें ती.

रंजणें, कोणेक शब्दादिविषय गोड लागल्यामुळें अंतःकरण सुखरूप होत्सातें उद्वेगादि दुःखें विसरून त्या विषयावर लागून राहणें पक्षीं तादृश अंतःकरण विशिष्ट मनुष्यादिकांसही कर्तृत्व होतें.

रजत, न॰ सं॰ रुपें प्रथमार्थी.

रंजन, न॰ गान, सुभाषित, इ॰ विषय सेवित असतां उद्वेगादि दुःखाचा विसर पडून अंतःकरणास होत्ये जी सुखरूपता तें; मनोरंजन, सभारंजन, इ॰ स॰

रजनी, स्त्री॰ सं॰ रात्रि.

रजपूत, पु॰ एक हिंदुलोकांत हिंदुस्थानांत जाति आहे.

रजब, पु॰ رجب हिं॰ यवनी महिन्यांतील सातवा मास तो.

रजस्वला, स्त्री॰ सं॰ ऋतुमती जी स्त्री ती.

रजा, स्त्री॰ رضا हिं॰ कांहीं एक कार्याविषयीं जें कोण एकाचें अनुमत ती; २, चाकरास चाकरीवरून कांहीं काल किं अगदीं देतात जो निरोप ती; ३, कोणी कोणास आपल्याजवळून इतरत्र जाण्यास देतात जो निरोप ती.

रजावंतीनें, अ॰ कोणा एकाचा अंतःकरणाचा संतोषानें; उ॰ त्याचे रजावंतीनें हें वस्तु मी आणिलें.

रंजित, ३ लिं॰ सं॰ अनुरंजित.

रंजीस, ३ लिं॰ उत्साह मनोरथ याचा भंग झाल्यामुळें खिन्न झाला जो मनुष्यादि तो; कोणेकानें रंजीस येणें स॰ मत्यास येणें; उ॰ या दुखण्यानें मला रंजीस आणलें; हें किडबीड लिहिणें यानें तर मी रंजीस आलों बा.

रजोगुण, पु॰ सत्त्वादिक जे प्रकृतीचे तीन गुण आहेत त्यांतील एक जो गुण ज्याचे योगानें विषयादि प्रीति, काम, इ॰ उत्पन्न होतात तो.

रजोगुणी, ३ लिं॰ ज्यामध्यें रजोगुण बहुत आहे तो.

रजोदर्शन, न॰ सं॰ ऋतुदर्शन.

रज्जब, पु॰ हिं॰ रजब.

रज्जु, स्त्री॰ सं॰ दोरी.

रझळणें, ज्या कामास विशेष खेपा, इ॰ प्रयत्न नको हें मनांत असतां तेथें फेरा खावयाजोग्या तादृश प्रयत्नानें युक्त होणें.

रटमट, अ॰ भात, इ॰ कानें सशब्द शिजणें, वाजणें, इ॰

इ॰ वि॰ रटमट होणें, करणें, स्न॰ भात, इ॰ कानें शिजतानां रटमट वाजणें

**रटमटणें**, भात, इ॰ कानें शिजत्येसमयीं रटमट असें वाजणें ·

**रटरट**, अ॰ रटमट ·

**रटरटणें**, रटमटणें ·

**रटाला**, ३लिं॰ लठ्ठ दांडगा जो मनुष्य, किं॰ मृत्, वस्त्र, भाकर, दागीना, इ॰ पदार्थ तो ·

**रट्ट**, पु॰ मनुष्यादिकांचा दाट जमलेला जो समुदाय तो; २, जाड जी भाकर तीस निंदेनें स्न॰

**रट्टा**, पु॰ मुष्टि, इ॰ कांचा जो दृढ टोला तो; २, रटाला जो पदार्थ त्यास स्न॰; ३, कामाचा रगाडा तो; ४, मनुष्यादिकांचा जो सुसांडा तो ·

**रड**, स्त्री॰ काहींकाल सतत रडत असावें अशी जी पोर इ॰ कांस अवस्था होत्ये ती; घे, लाग, इ॰ धा॰ योगीं प्र॰; २, शोक, दुःख, इ॰ संबंधी जा गोष्टी ती; उ॰ मला अन्न नाहीं, वस्त्र नाहीं, सारखं गांजत्ये, अशी रड दिवसभरही लोकांपाशीं सांगत फिरत्ये; ३, कोणेक गोष्टीचे धरगतीचे प्रतिपक्षीचा जो भाव तो; उ॰ यंदा पावसाची रडच दिसत्ये; रड गाणें, स्न॰ रड सांगणें; कोणाकानें रडीस येणें, स्न॰ कोणेक कामांत अति त्रासल्यामुळें, किं॰ थकल्यामुळें, किं॰ चिरडीस आल्यामुळें, आतां रडेल असें वाटाया जोग्या दशेस येणें ·

**रडका**, ३लिं॰ निरंतर रडण्याचा स्वभाव ज्याचा तो मुलगा, इ॰ किं॰ कोणएक कार्याविषयीं ज्याला उत्साह नाहीं, निरंतर रडगात असावें अशा स्वभावाचा जो मनुष्य, किं॰ तसा त्याचा कारभार, बोलणें, इ॰ तो; २, रडत्येसमयींचें सारखें जें मुख, ती मुद्रा, तो शब्द, भाषण, इ॰ तो ·

**रँडका**, पु॰ विधुर ·

**रंडकी**, स्त्री॰ विधवा स्त्रीस निंदेनें किं॰ दुर्बलत्व वर्णन प्रसंगीं स्न॰

**रंडकीमुंडकी**, स्त्री॰ दे॰ केवळ निराश्रित अतएव दुर्बळ जी विधवा ती ·

**रडकुंडा**, ३लिं॰ रडण्याचे पूर्वदशेस आल्यामुळें आतां रडेल अशी ज्याची मुखश्री दिसों लागली तो; किं॰ त्याचें तें तसें तोंड तो ·

**रडकुंडीस**, अ॰ येणें, किं॰ परतणें, याचा योगीं प्र॰; कांहीं कामांत अति त्रासल्यामुळें, किं॰ कांहीं दुःख सोसवेनासें झाल्यामुळें आतां रडूं लागावें अशा दशेतें पावणें ·

**रडगाणें**, न॰ रड द्वितीयार्थीं ·

**रंडगोलक**, पु॰ विधवेचा ठायीं जारापासून उत्पन्न होऊन एक जाति झाली आहे तो ·

**रडणें**, शारीर व्यथा शोक, हर्ष, प्रेम, इ॰ कांचे योगें अंतःकरण शिथिल झाल्यामुळें बाष्पोद्गम होऊन मुख विकास व्हावा, कंठांतून ध्वनि निघावा अशी जी क्रिया होत्ये तद्विशिष्ट कोणकानें होणें; २, कोणेक गोष्टीविषयीं रडगाणें; ३, कोणाकातें उद्देशून शोक करणें; उ॰ मी तुम्हाला कशाला शब्द लावूं आपले कर्मास रडतों; स्न॰ सदां मरे त्याला कोण रडे; ४, कोणेक व्यवहार दुर्दशारूप परिणामास पावणें; उ॰ चार दिवस मामलत होती तीही रडली, आतां लागले भीक मागायाला; ५, उद्योगाची निष्फलता

लता वर्णनीयअसतां कांहीं एक व्यापार करणें याअर्थी निंदेनें प्र० करितात; उ० आजपर्यंत मामलत रडत होती तेव्हां काय आह्माला दिलेंत तें आतां देणार; तुह्मी काम कराल रडाल. गाऊक आहे; ६, कोणेक कर्माचा परिणाम अनिष्ट झाल्यामुळें खेदविशिष्ट होऊन राहणें; उ० तूं लोकर जा ह्मणून तुला सांगतों तूं जात नाहींस मग रडशील; या अर्थी रडत जाणें, बसणें, येणें, असे प्र० प्रा० होतात; रडतराऊत घोडयावर बसविणें ह्म० जास जा कामाविषयीं उत्साह नाहीं आणि नाहीं नाहीं ह्मणतो त्यास त्या कामाविषयीं प्रार्थनादिकें करून दुसऱ्यानें प्रवृत्त करणें·

**रडतखडत**, अ० करणारास जें उत्साहादि असावें आणि कार्यामध्यें जी त्वरा, समृक्षपणा. इ० असावें त्यावांचून मंदपणें सरासरी कांहीं एक काम होणें, करणें, चालणें, इ० वि०

**रडतरडत**, अ० रडतखडत·

**रडतलक्ष्मी**, स्त्री० सर्वकाल जास उत्साह नाहीं आणि रडगाण्याचा स्वभाव जाचा असा जो पुरुषादिक त्यास किं० रडकें जें पोर, इ० त्यास ह्म०

**रडतोंडया**, ३लिं० सर्वकाल रडगाण्याचा स्वभाव जाचा तो; किं० रडतोच आहे काय अशी जाची मुद्रा दिसत्ये तो·

**रडवा**, ३लिं० रडका; रा० रडवा परतणें ह्म० रडें आल्यामुळें मुखश्री पालटे अशा अवस्थेतें कोणेकानें पावणें·

**रंडा**, स्त्री० सं० रंडकी·

**रडारड**, स्त्री० कोणी मेला, गेला, इ० कारणानें मोठें दुःख झालें असतां अनेकांनीं रडूं लागावें असा जो व्यापार चालतो ती·

**रडारोई**, स्त्री० रा० शोकादिकानें अतिशयित रडणें, ऊर बडवून घेणें, इ० रूप जो आकांत ती·

**रडिवणें**, कोणेकानें कोणेकास दुःख देऊन रडीस आणणें; उ० मला या कामानें दोन वर्षें रडिवलें तेव्हां एकदां शेवटास गेलें·

**रडी**, स्त्री० रा० रडी; रडीस येणें ह्म० रडीस यणें·

**रंडी**, स्त्री० वेश्या, कसबीण, दासी, इ० रूप जी सामान्य वनिता ती; २, दे० गंजीफांतील जी नारर ती; ३, रडी·

**रंडीखोर**, ३लिं० दे० रडीवाल·

**रंडीबाज**, ३लिं० वेश्या, इ० रंडीचें व्यसन जास आहे तो·

**रंडीबाजी**, स्त्री० रंडीबाजाचें कर्म ती·

**रंडीवाल**, **रडीवाल**, ३लिं० रडीखाण्याचा किं० रडीस येण्याचा स्वभाव जाचा तो·

**रडूं**, न० रडें

**रडूंरडूं**. अ० करणें याचा योगीं प्र० कोणेका कामाविशीं कोणेकास प्रवर्तवीत असतां त्याणें अनुत्साहामुळें अनेकप्रकारचीं रडगाणें·

**रडें**. न० शोक, भय, दुःख, प्रेम, हर्ष, इ० कारणानें अंतःकरण शिथिल होऊन बाष्पोद्गम, मुखविकास, कंठध्वनि, इ० व्हावयाजोगा जो विकार विशेष होतो तें·

**रडी**, स्त्री० दे० खेळामध्यें जो लबाडीनें खोटें खेळण्याचा प्रकार ती; खाणें, घेणें, या धातूंचा योग होतो; रडीस येणें ह्म० आपल्यावर डाव लागल्या

गल्यामुळें चिरडीस येणें.

**रडीरवोर, रडीवाल.** ३ लिं० रंडीवाल.

**रडया,** ३ लिं० सर्वकाल रडण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, ला० केवळ मंद चालणारा राहाट्या बैल. इ० त्यास म्ह०

**रण,** पु० सं० युद्ध; रणवीर, रणधीर, रणशूर, रणगंभीर, रणवाद्य, रणतूर्य, रणभूमि, रणांगण, इ० समास जाणावे; रण घुमणें म्ह० पूर्वी ज्या ठिकाणीं रण झालें होतें त्या ठिकाणीं पिशाचादिकांचा शब्द होत असणें.

**रणकंदळ,** न० रा० परस्पर आवेशानें जें पराकाष्ठेचें युद्ध तें; २, ला० जांत हाणामारी, अरेतुरे होत्ये असें जें पराकाष्ठेचें कज्जा, भांडण, इ० तें.

**रणखांब,** पु० युद्ध करायाचें असतां उभय सेनेच्या मध्यें मर्यादार्थ जो स्तंभ पुरितात तो.

**रणंग,** स्त्री० फोड येतात आणि आग होत्ये असा एक रोग आहे ती.

**रणगाडा,** पु० ओझें वहायाचे उपयोगीं जो मोठा गाडा तो; २, रा० बैल, घोडें, यानीं ओढायाचा जो तोफेचा गाडा असतो तो.

**रणतुंबळ,** न० तुमुल जें युद्ध तें; २, ३ लिं० अतिशयित जें भांडण, मारामार, कज्जा, इ० त्यास म्ह०

**रणनेफरा,** पु० जो बाहेर चालला असतां पुढें होलारानीं वाद्यें वाजवीत असावें आणि पागोट्याचे समले फरफले असावेत, इ० डौल बाळगणारा जो शिपाई तो.

**रणधीट,** ३ लिं० युद्धांत ज्यास भय वाटत नाहीं असा जो शूर, मनुष्यादि तो.

**रणरण,** स्त्री० मध्यान्हादिसमयीं सूर्याचे उन्हाचे संतप्तपणाचा होतो जो अतिशय जेणेंकरून बाहेर पहायासही कठीण पडतें ती; रणरण करणें म्ह० मध्यान्हसमय, ऊन, निखारे, ज्वरविशिष्ट शरीर, इ० कानीं स्पर्शन, दर्शनादि करण्यास अशक्य पडायाजोगी अति संतप्तता पावणें.

**रणरणणें,** मध्यान्हादिसमयीं उन्हाची उष्णता अतिशय दशेतें पावणें; उ० ग्रीष्मर्तु लागतां चरण रणूं लागलें; २, ऊन, निखारे, इ० कानीं अतिशयित संतप्त होणें; उ० चुलींत निखारे रणरणतात.

**रणरणीत,** ३ लिं० अतिशयित संतप्त जें शरीर, निखारे, ऊन, इ० तो.

**रणवाद्य,** न० रणांत वीरांस ज्याचा नादानें उत्साह प्राप्त होतो अशीं जीं शंख, दुंदुभि, इ० वाद्यें तीं म्ह०

**रणशिंग,** न० वाजवायाचें जें पितळेचें शिंगासारिखें वाद्य असतें तें.

**रणस्तंभ,** पु० रणखांब.

**रणाग,** पु० रणंग.

**रत,** ३ लिं० सं० ज्या विषयावर ज्याची प्रीति तो त्या विषयीं; उ० विषयरत, स्त्रीरत, कामरत, कर्मरत, इ० समास जाणावे; २, न० मैथुन.

**रतणें,** रमणें प्रथम तृतीयार्थी; उ० चित्तवृत्ति रतली हरिपायीं.

**रतन,** न० रत्नाचा अपभ्रंश.

**रतनजोत,** स्त्री० डोळ्यांत घालायाचे उपयोगीं औषध आहे.

**रतनपारखी**, पु० रत्नपारखी ·

**रतनबाव**, स्त्री० ग्रा० लहानजें पाटाचें पाणी वाहात असतें तें शिंपायाकरितां सांचवूनठेवायासाठीं जीहवदासारखी खळी करितात ती ·

**रतल**, पु० रत्तल

**रताळी**, स्त्री० रताळ्याची जीवेल ती ·

**रताळुं, रताळें**, न० एक भक्षणोपयोगी मूळ आहे तें ·

**रति**, स्त्री० कांहींएक विषयाचाठायीं प्रीतिपूर्वक जीआसक्ति ती; २, मैथुन; ३, कामदेवाचीजी स्त्री ती; ४, शृंगाररसाचाजो स्थायी भाव होतो ती·

**रती**, स्त्री० पुं० मोत्यें, हिरे, इ० वजन करण्याचें एक वजन आहे, जा चारगुंजा भार तीन भरतात; २, देवदशा ·

**रतीब**, पु० उकाडा तृतीयार्थी; २, खुराक ·

**रत्तल**, पु० स्फर्ती छत्तीस रुपयेभारजें वजन तो ·

**रत्न**, न० हिरा, माणीक, मोतीं, इ० तें; रत्नपरीक्षा, रत्नशाला, इ० स०; २, समुद्रमथनापासून उत्पन्न झालेजे चंद्र, अमृत, लक्ष्मी, इ० चतुर्दश पदार्थ ते प्र०; ३, ला० सामान्यरीतीपेक्षां विशेषगुणेंकरून विशिष्टजो त्यास इतरापेक्षां उत्कृष्टता वर्णनीय असतां आरोपानें स्म०; उ० हा घोडा एक रत्न आहे; ४, संसार, सभा, इ० अधिकरण ज्याचे योगानें शोभतें आणि ज्याचे अभावीं विशोभित दिसतें असाजो मूल, पंडित, दीप, इ० पदार्थ तें; उ० संसारांत मूल हें रत्न आहे ·

**रत्नखचित**, ३ लिं० हीरकादिक रत्नें अनेक ज्यास जडलीं आहेत असाजो सिंहासन, अलंकारादिक तो ·

**रत्नजडीत**, ३ लिं० रत्नखचित ·

**रत्नदीप**, पु० सं० दीपकार्य निर्वाहक प्रकाशकजें रत्न तो; पाताळादिलोकीं कथा प्रसिद्ध आहे ·

**रत्नपारखी**, ३ लिं० रत्नांची पारख आहे ज्यास तो·

**रत्नाकर**, पु० सं० रामेश्वरापासून आलीकडील पश्चिमेचे आंगचाजो समुद्र तो; २, सामान्यसमुद्रासही स्म०

**रथ**, पु० प्रा० घोड्यानीं ओढीत न्यावयाचें चक्रानीं विशिष्ट असें एक राजादिकांचें वाहन आहे ·

**रथकार**, पु० शास्त्रप्रसिद्ध एक हिंदूत जाति आहे ·

**रथसप्तमी**, स्त्री० माघशुक्ल सप्तमी ·

**रथी**, पु० सं० मुख्यस्थानीं रथावर बसलेला असतोजो योद्धा तो; २, रथावर बसून एका रथस्थासहवर्तमान एकटा युद्ध करणाराजो वीर तो ·

**रथोत्सव**, पु० सं० वाजत गाजत देवाचा रथ मिरवनआवा असाजो उत्सव करितात तो ·

**रथोत्साह**, पु० सं० रथोत्सव ·

**रद**, ३ लिं० रद्द ·

**रदकर्ज**, न० हिं० घेतल्या कर्जाचीजी फेड तें; २, मागील रहात आलेलें जें जुने कर्ज त्यास कोणी स्म०

**रदबदल**, स्त्री० कोणेकानें स्वेष्टकार्याविषयीं प्रश्न व्हावें, किं० त्यानिष्टापासून निरत्त व्हावें एतदर्थ त्यासभीड घालण्याचाजो व्यापार ती

**रदबदली**, स्त्री० हिं० रदबदल ·

रद्द, ३लिं० तत्तद्व्यवहारीं अनुपयुक्त कोटींत गणनी-य झालाजो तो; होणें,पडणें,असणें, इ०धा०प्र०;उ० ही चांगली पोथी मिळाल्यापासून ती पहिली रद्द पडली·

रद्दा, पु०दे० माती,शेण, इ०कांचाजो गारा तो·

रद्दी, स्त्री० रद्द झालेलेजे कागद,त्यांचा समुदाय ती

रंधणें, लांकूड रंध्यानें साफ करणें·

रंधन, न० भात, इ० शिजविण्याचाजो व्यापार तें·

रंधप, न० कों० रांधप·

रंधपी, पु० रांधपी·

रधवणें, ग्रा० रुधेअसा करणें·

रंधा, पु० सुतारांचें लांकूड साफ करायाचें एक आऊत आहे तो व त्यानें करितात जो लांकूड साफ करण्याचा संस्कार तो·

रंध्र, न० सं० छिद्र; रंध्रान्वेषण, रंध्रान्वेषी. इ० स०

रप,कण,कन,कर,दिशीं, दे० अनु० तळहातानें शरीरावर मारणें; चिखल, इ०कांत पाय, इ० जाणें, भरणें, इ०कांचें वि०

रपका, पु० दे० धपाटा·

रपटणें, दे० रपाटणें·

रपाटखान, पु० सामान्यप्रमाणापेक्षां मोठा असून नाजूक नव्हे असा जो पदार्थ त्यास ह्म०

रपाटणें, रपटणें प्रथमार्थावांचून·

रपाटा, पु० चपराकेचाजो मोठा प्रहार तो; २, पिशाचबाधा या अर्थावांचून झपाटा तो; ३, रपाटखान; उ० केवढी थोरली रपाटा भाकर; या अर्थीं आरोपानें प्रयोग होत असतांही पक्षीं विशेषणवत् लिंगकार्येंही होतात; उ० केवढी रपाटी भाकर·



रपाटून, अ० रगडून·

रफू, स्त्री०पु० वस्त्राचें छिद्रादि बुजवायाकरितां युक्तीनें सूतें भरून संधान करण्याचा एक प्रकार आहे; २, तेणेंकरून उत्पन्न होतो जो वस्त्रभाग तो·

रफूगार, पु० रफूचें कसब करून उपजीविका करितो तो·

रफेदफे, अ० दफेरफे·

रफूत, पु० कोण्हेक कर्माचा नेहेमीजो व्यासंग तो; उ० आलीकडे घोड्यावर बसण्याचा माझा रफूत मोडला; २, कोणेकस्थलीं कोणेकाचा जावें यावें असा असतो जो परिपाठ तो·

रबक, न० एक तंतुवाद्य आहे·

रबकण, रबकन, अ० रपकन·

रबकर, रपदिशीं, अ० रबकण·

रबडगा, पु० अनेक कामाचाजो दबडगा तो·

रबरब, अ० शब्द होई असें चिखल, इ०कांत गमनादिप्रसंगीं पाय जाणें, किं० ते पाय वाजणें. इ० क्रियांचें वि०

रबरबां, अ० रबरब·

रबरबीत, ३लिं० पिंड करूं गेलें असतां होऊं नये इतका पातळ झालाजो चिखल, पीठ, इ० पदार्थ तो·

रबाब, न० एक तंतुवाद्य आहे·

रबिलाखर, पु० ربيع الآخر हिं० यवनी महिन्यांतला चवथा मास

रबिलावल, रबिलोवल, पु० ربيع الاول हिं० यवनी महिन्यांतील तिसरा महिना·

रबी, स्त्री॰ हिं॰ पर्जन्यकाळ समाप्त झाल्यानंतर पिकणारें जें द्दिदल गहूं, शाळू, इ॰ धान्य ती·

रबी, स्त्री॰ ربیع हिं॰ रबी·

रंभा, स्त्री॰ सं॰ एक अप्सरा स्वर्गी आहे; २, कदलीवृक्ष; ३, पु॰ गवत कादायाचें एक आऊत आहे·

रमजान, पु॰ رمضان हिं॰ यवनी महिन्यांतील नववा महिना तो·

रमण, न॰ कांहीएक विषयाचेठायीं चित्ताचा रमण्याचाजो व्यापार तें; २, पु॰ जा स्त्रीचा उपभोक्ता जो पुरुष तो तिचा; उ॰ राधारमण, सीतारमण, इ॰

रमणकद्वीप, न॰ सं॰ एक द्वीप आहे·

रमणा, पु॰ भोंवता कांहीं भिंत, इ॰ रूप आधारकरून अनेकांस दक्षिणा दियावयाकरितां जें रमणीय स्थल करितात तो·

रमणी, स्त्री॰ सं॰ कांता·

रमणीक, ३लिं॰ रमणीयजें स्थल तो·

रमणीय, ३लिं॰ दर्शनादिद्वारा ज्याचे साक्षात्कारानें चित्त समाधान पावून जाजवर बसतें असा शोभिवंत जो जागा, मूर्ति, देवालयादिरचना, काव्यादिप्रतिपादित अर्थ, इ॰ तो·

रमणें, कांहींएक विषयाची गोडी लागल्यामुळें तेथें चित्तवृत्तीनें आसक्त होउन राहणें; उ॰ पुष्पाचे सुगंधावर भ्रमर रमतो; २, बागबगीचा, चांदणें, इ॰ उपभोग्य जे विषय तदुपभोगद्दारा कोणेकानें चित्तवृत्तीस विनोद करीत काळ घालविणें; उ॰ लवकर जा वाटेस रमूं नको; ३, कोणेकानें कोणेकाशीं मैथुनार्थ संगत होणें·

रमतरमत, अ॰ हिं॰ बाग, बगीचा, चांदणें, वायु, इ॰ कांचे उपभोगद्दारा कर्मणूक करीत करीत जाणें येणें, चालणें, इ॰ कांचे वि॰; उ॰ एकदा पुढें कशाला जातोस एकमेकाचे सोबतीनें रमतरमत जाऊं·

रमतेरमते, अ॰ हिं॰ रमतरमत·

रमल, पु॰ رمل हिं॰ पंचरशी फांसे करून तद्दारा मुहूर्तादि पाहायाचें एक यवनी शास्त्र आहे तो·

रमली, ३लिं॰ हिं॰ रमल जाणणारा तो; किं॰ रमल संबंधी फांसे, मत, इ॰ तो·

रमा, स्त्री॰ सं॰ विष्णूचीजी स्त्री ती·

रमारम, रमारमी, स्त्री॰ हिं॰ परस्पर एकमेकांत यजाकरायाची जमा, आणि खर्च, एतद्रूप कोणेक व्यवहारसंबंधी जीं दोन प्रकरणें त्यांची बरोबरी ती; उ॰ यंदांचे व्यवहारांत तोटा नाहीं, नफा नाहीं, रमारमी झाली; हिशेब केला असतां आमची बाकी त्याजकडे निघणार नाहीं, त्याची आमचेकडे निघणार नाहीं सरासरी रमारमी होईल असें वाटतें·

रम्य, ३लिं॰ सं॰ रमणीय·

रयत, स्त्री॰ हिं॰ राजा, पाटील, कमावीसदार, इ॰ जे भूमीचे धनी त्यांचे भूमीची वसती, कृषि, इ॰ द्दारा वहिवाट करून त्यांचे सत्तेंत राहणारा जो लोक तो त्या राजादिकांची··

रयतावा, पु॰ रयतपणा; २, कों॰ रयतेचा जो समुदाय तो; उ॰ त्या राज्यांतील रयताचा खुशी आहे·

रयाळ, पु॰ एक रुप्याचें नाणें आहे·

रर, अ॰ करणें याचायोगीं प्र॰; रर करणें·

रव, स्त्री॰ एकापाठीमागून दुसरा त्याचेमागून तिसरा, अशा क्रमानें गमन करणारे मनुष्यादिकांची

किं॰

किं॰ उत्पन्न होणारांची सतत लागलीजी ओळ ती; २, पु॰ सं॰ व्यक्ताव्यक्त जो साधारण शब्द तो; कंठरव, मेघरव, इ॰ स॰

**रवका**, पु॰ रा॰ कांहींएक रवाळ पदार्थाचा जमलेला, किं॰ तोडून काढलेला जो लहानसा गोळा, तुकडा, तो; उ॰ कलिंगड चांगलें असलें ह्मणजे त्याचे रवके तोडतोडून खावयास बरें॰

**रवरवौंब**, पु॰ रा॰ घराचे रवीस ज्या रवांचण्या देतात त्या प्र॰

**रवण**, न॰ दे॰ मुंग्यांचा जो समुदाय तें॰

**रवणें, रंवणें**, रोंवणें याअर्थी॰

**रवंथ**, न॰ पु॰ गोमहिष्यादि द्विशफ पशु एकदां सरासरी चाऊन गिळलेला चारा पुनः बारीक करायासाठीं मुखांत बाहेर आंणून चघळण्याचा करितात जो व्यापार तें तो॰

**रवंथणें**, रा॰ रवंथ करणें; २, ला॰ कोणेक पदार्थ चघळीत चघळीत पुष्कळ वेळ खात बसणें॰

**रवंदळणें, रवंदाळणें**, ढवळणें, इ॰ द्वारा पाणी, इ॰ तळचा मळ वर येऊन गढूळ होई असें करणें॰

**रवंदाळा**, पु॰ रवंदळण्यामुळें झालीजी पाणी, इ॰ कांची दुर्दशा तो॰

**रवंधें**, न॰ रा॰ अनेक प्रकारचें उष्टें माष्टें अन्न एकत्र कालवलेलें जें गोमहिष्यादिकांस खायासाठीं ठेविलें असतें तें॰

**रवरव**, स्त्री॰ शेल्यादिकानें शरीरास, किं॰ अकलकारा, पिंपळी, इ॰ भक्षिल्यामुळें जिव्हेस जी वेदना विशेष उत्पन्न होते ती.

**रवरवणें**, शरीर, किं॰ तदवयव रवरवीनें युक्त होणें॰

**रवरवी**, स्त्री॰ रवरव; २, एक ओषधी आहे जीचें पुष्प खाल्लें असतां जिव्हेस रवरव स्फुरत्ये ती॰

**रवळनाथाचें कूळ**, न॰ रा॰ जाचे घरीं धान्यादिकाची आठचार दिवसांची देखील बेगमी नाहीं, असा जो उत्पन्न असी दरिद्री त्यास ह्म॰

**रवळी, रंवळी**, स्त्री॰ रोंवळी॰

**रवा**, पु॰ कणीक, तांदळाचें पीठ, इ॰ कांतील केवळ बारीक अंश निराळा काढिला असतां जो जाडा कणांश राहतो तो; २, गूळ, साकर, कणेदार तूप, इ॰ जे, तत्संबंधीजो कणांश तो; ३, गुळाचीढेंप, किं॰ गूळ, साकर, इ॰ कांचाजो खडा तो; ४, सोनें, रुपें, इ॰ कांचाओ रज तो; किं॰ अलंकारादिकांस जोडणें, इ॰ विषयीं उद्दिष्ट जो त्यांचा तुकडा तो; कोणेकानें रवा काढणें ह्म॰ तप्त तेलांतील धांतूचा तुकडा दिव्यार्थ बाहेर काढणें; ५, कुंकुमाद्यर्थ तासून रंगवितात जें हळकुंड तो; ६, रहाटाचे कणेकडास, किं॰ गाडी, इ॰ संबंधी चाकाचे मारव्यास सभोंवताले उभे मारिले असतात जे लांकडाचे तुकडे ते प्र॰

**रवानगी**, स्त्री॰ हिं॰ पाठवणी; २, विवक्षित कार्योद्देशें करून देशांतरीं फौज, किं॰ दारुगोळा, इ॰ द्रव्य गलबत, इ॰ पदार्थांचें जें प्रेषण ती॰

**रवाना**, ३ लिं॰ हिं॰ करणें किं॰ होणें याचा योगीं प्र॰ अ॰; कागद, इ॰ पदार्थ, किं॰ मनुष्यादि त्यांस स्थलांतरीं जावयाकरितां मार्गस्थ करणें, किं॰ त्याणीं होणें; रवानाचंद्र, रवानामिती, ह्म॰ जा दिवशीं कागद रवाना होतो त्या दिवसचा चंद्र, मिती, असा अर्थ॰

**रवास्फदगी,** स्त्री॰ रोखे, सनदा, चिठ्या, इ॰ जाजवरवार करितात तो कागद ती॰

**रवाळ,** ३ लिं॰ दाणेदार जी साकर, गूळ, इ॰ पदार्थ तो॰

**रवि,** पु॰ सं॰ सूर्य; २, रुई ह्मणून झाड तो.

**रविवार,** पु॰ आदितवार.

**रविवासर,** पु॰ सं॰ आदितवार.

**रवी,** स्त्री॰ दधि घुसळायाकरितां जें काष्ठाचें यंत्र करितात ती; २, रा॰ घराचा तुळयांवरच इंद्रकर दिलें असतां मांडावळ ठेंगणी होत्ये ह्मणून त्या तुळयांवर हात दोन हात लहान खांबण्या देऊन जो उंचीकडला भाग वाढवितात ती॰

**रवेकड,** न॰ रहाट, चाक, यांमरयाच्हावयाजोगें जें लांकूड तें॰

**रवेस,** पु॰ स्त्री॰ संसारादिका विषयीं उत्तम जी रीति तो ती॰

**रशीक,** ३ लिं॰ रसिकाचा अपभ्रंश॰

**रश्मि,** पु॰ सं॰ किरण॰

**रस,** पु॰ जिव्हेनें ज्याचें प्रत्यक्ष होतें असा जो भक्ष्यादि पदार्थनिष्ठ, खारटपणा, तिखटपणा, तुरटपणा, मधुरपणा, इ॰ जो गुण तो; २, ज्याचा अंतःकरणांत संचार होऊं लागला ह्मणजे रति, उत्साह, कारुण्य, विस्मय, हास्य, भय, कंटाळा, क्रोध, हे भाव उत्पन्न होतात, असे जे नायक, नायिका, वीरपुरुष, इ॰ कांचा हृदयांत अंतःकरणवृत्तीचे भेदक शृंगारादि भाव होतात ते प्र॰; ३, भाषणादि व्यवहारामध्यें जी गोडी असत्ये तो; उ॰ आतां याचा बोलण्यांत अगदी रस नाहीं, आतां या व्यवहारांत कांहीं रस राहिला नाहीं; ४, पदार्थांचा ठायीं जो द्रवांश असतो तो; उ॰ धोत्र्याचा रस काढून धोवऱ्यास लावावा ह्मणजे बरें होतें; ५, औषधादि कोणेक पदार्थांत मिसळल्यामुळें त्यांतील कांहीं अंश घेऊन निघतें जें पाणी तो; ६, रुप्यसुवर्णादि धातूंचा जो अग्निसंयोगानें द्रव होतो तो; ७, तेल, तूप, गूळ, मीठ, इ॰ जे शास्त्रपरिगणित आहेत ते प्र॰; ८, सं॰ पारद; ९, गंधक; १०, उदक॰

**रसकणें,** रा॰ कांहींएक विषयावर लक्ष्य लागल्यामुळें कांहींएककाल तिकडेच रमणें; उ॰ त्या मुलाला कांहीं खेळणें देऊन अंमळ सारसकीव आणि तूं जेवून घे॰

**रसकापुर,** पु॰ एक औषधोपयोगी पदार्थ आहे॰

**रसद,** स्त्री॰ हिं॰ गांवचा कमाविसदार, महालकरी, इ॰ अधिकारी प्रजांपासून घेऊन सरकारांत भरितो जें द्रव्य ती, किं॰ गांव, इ॰ संबंधी मामलत, इ॰ अधिकार पतकरून तत्संबंधी पूर्वींच जें सर्कारांत द्रव्य भरितात ती.

**रसदभरणा,** पु॰ मामलतीसंबंधी रसदेचा जो भरणा तो; २, फौजेचे बरदास्तीकरितां ग्रामांतरादिकांपासून पाठवितात जें धान्य, दारू, गोळा, इ॰ सामान ती॰

**रसदी,** ३ लिं॰ हिं॰ सर्कारांत रसद देऊन पतकरून घेतलेला जो गांव, महाल, इ॰ तो॰

**रसना,** स्त्री॰ सं॰ जिव्हा रस जाणायाचा विषय असतां प्र॰

**रसनेंद्रिय,** न॰ सं॰ रसनारूप जें इंद्रिय तें॰

**रसवाळ, रसवेळ, रसवेळी,** स्त्री॰ केळींमध्यें

एक जाति आहे, तिचें वि०

रसबाळ, रसवेळ, न० रसवेल केळीचें जें फळ त्याचें वि०

रसभंग, पु० गानादिसंबंधी श्रोते, इ० कांचे चित्तवृत्तीनें ग्रह्यमाणजो प्रवर्तमान रस असतो त्याचा मध्यें कांहीं विषयांतर प्रसक्ति, इ० कारणामुळें होतोजो विघात तो·

रसभरित, ३ लिं० रसानें भरलेलाजो फल, भाषण, इ० तो·

रसभरू, ३ लिं० रसानें भरलेलाजो फलादि पदार्थ तो·

रसभोजन, न० आम्ररस प्रधानजें ब्राह्मणभोजन करितात तें

रसरंग, पु० मकरसंक्रांतीचे दिवशीं कुंकुम आणि गूळ हे दोहों पात्रांत भरून ब्राह्मणास देतात तो·

रसरसणें, निखारे, अग्नि, इ० कानीं प्रखरपणें संतप्त असणें, क्रि० ज्वर, अग्नि, सूर्याचें ऊन, यांचे योगानें शरीर, चूल, पाणी, तवा, इ० अग्निवत् तापणें; २, शरीराचाठायीं तारुण्यानें भरावस्थेस येणें·

रसरशीत, ३ लिं० रसरसलेलाजो शरीर, चूल, निखारे, इ० पदार्थ तो·

रसवडी, स्त्री० एक तोंडीं लावायाकरितां मसाल्याचे रसानें युक्त हरभऱ्याचे पिठाचा वड्या करितात त्या प्र०

रसवंती, स्त्री० एक ओषधी आहे; २, भाषणाचाठायींजी गोडी तीनें लक्षून वागिंद्रियास स्तुतीनें स्न०

रसवांगें, न० मसालेदार रसानें युक्त जें शिजवून सगळें वांगें करितात तें·

रसविक्रय, पु० तेल, तूप, इ० रसांचा जो विक्रय तो·

रससिंदूर, पु० एक रसायन आहे·

रसज्ञ, ३ लिं० सं० पदार्थमात्राचाठायीं जो रस त्याचें मर्म जाणणाराजो तो; उ० गाणें चांगलें असलें तरी रसज्ञावांचून फुकट जातें; पुष्पाचे मकरंदाचा रसज्ञ भ्रमरासारिखा दुसरा कोणी नाहीं·

रसा, पु० भुरका मारून खावयाजोगा तोंडी लावायाकरितां मसालेदार एक रस करीत असतात तो·

रसाणें, न० रा० रसरशीत निखाऱ्यांचाजो समुदाय तें·

रसातल, रसातळ, न० सप्त पाताळांतील एक आहे; २, कोणेक व्यवहारादि रसातळास नेणें, जाणें, इ० स्थलीं निःशेष होई असा बुडलाजाणें; पोट रसातळास जाणें स्न० क्षुधेनें पाठीशीं लागणें·

रसाभास, पु० काव्य, नाटक, भाषण, इ० कांचाठायीं प्रवर्तमानजो शृंगारादि रस असतो तो पुरता न होतां कांहीं विरुद्ध रसाचा आंत संक्रम झाला, इ० कारणामुळें होत्येजी रसाची दुर्दशा तो·

रसायण, न० रसायनाचा अपभ्रंश·

रसायन, न० सं० पारद, गंधक, इ० कांचा रांधा, इ० करूनजें मात्रादि निर्मितात तें·

रसासणें, रसरसणें.

रसाळ, ३ लिं० ज्यामध्यें रसपुष्कळ आहे असाजो फळादि पदार्थ तो; २, बरकाजो फणस तो.

रसिक, ३ लिं० गान, काव्य, इ० रसावर प्रीति विशेष असून त्यांतील मर्म जाणतो तो; २, थट्टा मस्करी, गोडभाषण, इ० द्वारा दुसऱ्याचें आणि आपल्या अंतःकरणवृत्तीस ज्याप्रकारें विनोद होई त्याप्रकारें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा तो.

रस्ता, पु० मार्ग.

रस्सा, पु० मोठी जाड जी दोरी तो.

रस्सी, स्त्री० दोरी.

रहदारी, स्त्री० हिं० कोणा एकाचा घरीं किं० मार्गादिकाच्याठायीं येण्याजाण्याचीजी वहिवाट चालली असत्ये ती; उ० या मार्गानें मध्यरात्रपर्यंत माणसांची रहदारी चालली असत्ये.

रहंवर, पु० ग्रं० श्रेष्ठ जो रथ तो.

रहवास, पु० दे० रफूत; २, रहिवास.

रहस्य, न० सं० विवक्षितेतरांस समजूं द्यावयाची नव्हे, अशीजी गुप्त गोष्ट तें; उ० तुमचें कांहीं रहस्य बोलायाचें असलें तर मी पलीकडे जातों; २, परस्परांचाजो परमसख्यभाव तें; उ० तुमचें आमचें रहस्य जिथवर होतें तों तुह्मीं आमचें काम करीत होतां आह्मीं तुमचें करीत होतों; ३, परस्पर मित्रभावानें मिळून थट्टा, मस्करी, वागडणें, बोलणें, इ० रूप आनंदानें जी क्रीडा, तें, किं० वाक्यादिकांतील जो तात्पर्यांश तें; उ० तुह्मीं बोलतां यांतील रहस्य माझे ध्यानांत आलें नाहीं; ४, कोणएक कार्य केलें असतां त्यापासून विवक्षितानुरूप फल व्हावें असाजो तत्कार्याच्याठायीं योग्यताविशेष असतो तें; निषेधअसतांच प्र०; उ० सराफीचे व्यवहारांत आतां कांहीं रहस्य राहिलें नाहीं; रहस्यांत येणें, ह्म० मोठ्या आनंदांत येणें.

रहा, स्त्री० कोणेक व्यवहारीं वर्तणुकेचीजी रीत ती; उ० चवघांची रहा जशी असेल ती प्रमाणें तुह्मी चाला.

रहाट, पु० ज्याचे परिभ्रमणानें कूपादिकांतून जलादि निघतें, कतास पीळ पडतो, दोऱ्या वळल्या जातात, इ० अनेक कार्यें होतात अशीं जीं चक्राकार त्या त्या सोईचीं काष्ठादिकांचीं यंत्रें केलीं असतात तीं प्र०

रहाटगाडगें, न० ज्याला लोटें बांधलेली माळ लाविली असत्ये असा जो पाणी काढायाचा रहाट तें; २, ला० ज्यामध्यें एकवेळ बरें व्हावें, एकवेळ वाईट व्हावें अशी परंपरा चालली असत्ये असाजो हा जन्ममरणरूप प्रपंच, सावकारी, इ० व्यवहार त्यास ह्म०

रहाटणें, कोणेक कामांत कोणेकानें बहुत दिवस पडल्यामुळें अभ्यस्त होणें.

रहाटवड, स्त्री० कों० बैलरहाट, किं० पायरहाट, एतत्संबंधीजें प्रकरण जांत कणा, रवे, खापेकड, लोटे, तुंबे, इ० सामग्री लागत्ये ती.

रहाटपाणी, न० कों० आगर शिंपणें इत्यायर्थ रहाटगाडग्यानें काढिलेलें जें पाणी तें; उ० या एवढे मोठे आगरास पाट असता ह्मणजे ठीक, रहाटपाण्यानें किती ह्मणून शिंपाल.

रहाटागर, पु० न० कों० रहाटपाण्यानेंच शिंपला जातो

जातो आगर तो तें ·

**रहाटी**, स्त्री॰ अंबे, बाभळी, करमाड, इ॰ कांचीजी निबिड राई असल्ये ती; २, कों॰ पायरहाट; ३. पूर्वीपासून चालत आलाजो कोणेक गोष्टी विषयीं प्रघात ती ·

**रहाटया**, ३ लिं॰ कों॰ रहाट वहायाचे उपयोगींजो ढोणगा, बैल, इ॰ तो; २ पु॰ गोटया, इटीदांडू, इ॰ खेळांत उभयपक्षाकडेही खेळत असतो जो गडी तो; ३, ला॰ दोहों मांडवंचा वऱ्हाडी तो ·

**रहाड**, स्त्री॰ कों॰ राड ·

**रहाण**, न॰ कों॰ ऐरवाद्याचे अंगीं पिशाच्च खेळवायासाठीं अनेक देवभक्त्ये मिळून जो वाद्यादि समारंभ करीत असतात तें; घालणें, माजविणें इ॰ कांचा योगीं प्र॰; २, ला॰ कोणीं मरूं लागला, किं॰ कोणी मेला, इ॰ निमित्तानें अनेक मनुष्य मिळून रडूं ओरडूं लागल्यामुळें जो एकच घोळ पडतो तें ·

**रहारास्त**, ३ लिं॰ न्यायानुरूप जें भाषणादिक तें ·

**रहासाळी**, स्त्री॰ कों॰ परस्परामध्यें ईर्ष्या मत्सरादि विरुद्धभाव न यावयाजोगी असल्ये जी गोडी ती ·

**रहित**, ३ लिं॰ जा कोणेक अर्था मध्यें जो अर्थ नाहीं तो तेणें करून; प्रा॰ समासीं प्र॰; उ॰ दशमी भाजायास जलरहित दुग्ध असावें: विद्यारहित पुरुष शोभत नाहीं:

**रहिवास**. पु॰ कोणेएक मनुष्यादिकांचीजी कोणेएक स्थलीं वसति तो; उ॰ साधुजन भगवच्चरणी रहिवास प्रार्थितात ·

**रहिवासी**, ३ लिं॰ जो जा स्थलीं वसति करून राहतो तो तेथील ·

**रहू**, पु॰ कों॰ पेरायाकरितां भिजवून मोड आणिलेलें जें धान्य तो ·

**रळी**, स्त्री॰ जापाशीं आपला लडिवाळपणा चालतो त्यापाशीं हें अमुक मला पाहिजेच अमुक मला करून द्या, इ॰ कोणेक गोष्टी विषयीं लडिवाळपणानें धरितात जो आग्रह ती; २, ग्रं॰ वक्रोक्त्यादिकें करून जी थट्टा ती ·

**रक्षक**, ३ लिं॰ जो जाचें रक्षण करितो तो त्याचा ·

**रक्षण**, न॰ कोणेक अर्थाच्या नाश, अपहार, इ॰ दुष्ट परिणाम न होऊं देतां यथास्थितपणें राही असें करण्याचा जो व्यापार तें, किं॰ तेणें करून त्या अर्थाची नाशादि दुष्ट परिणाम न होतां यथास्थितपणें होत्ये जी स्थिति तें; उ॰ या समयीं जर तूं जागत बसेनास तर आज पर्यंत शेताचें रक्षण केलेंस तें फुकट जाईल; तुमचा आश्रयानें आज पर्यंत माझें रक्षण झालें; २, रक्ष्य पदार्थास रक्षण कर्ता जो मनुष्यादि तें; उ॰ तुम्ही बाहेर जाऊं लागाल तेव्हां घरास कोणी रक्षण ठेवा मग जा ·

**रक्षणीय**, ३ लिं॰ रक्षावयास योग्य जो तो ·

**रक्षणें**, रक्षित करणें; रक्ष रक्ष होणें, स॰ त्राहि त्राहि भगवान् अशी अवस्था होणें ·

**रक्षा**, स्त्री॰ सं॰ रक्षण प्रथमार्थी; २, राख; ३, षष्ठी पूजन समयीं सटीलाजीं सूत्रें वाहून मुलाचे आणि बाळंतिणीचे गळ्यांत बांधायास ठेवितात तीं प्र॰; रक्षाबंधन; रक्षासूत्र, इ॰ स॰; ४, राख ·

**रक्षित**, ३ लिं॰ रक्षण केलें ज्याचें तो.

**रक्ष्य**, ३ लिं॰ सं॰ रक्षणीय.

**राई**, स्त्री॰ मोहरी ह्मणून जें बीज ती; २, आम्रादिकांचे झाडांचा जो निबिड समुदाय ती.

**राऊत**, पु॰ घोडेराऊत.

**राऊळ**, न॰ राजाचें किं॰ देवाचें जें ग्रह तें; २, पु॰ शूद्रांत एक जाति आहे.

**रांकट**, ३ लिं॰ शरीरानें बळकट आणि नाजूकपणा, किं॰ कांहीं एक कार्याविषयीं बारीक युक्ति, इ॰ गुण ज्याचे आंगीं नाहींत असा जो तो; २, घात पात होईल, इ॰ विचार न करितां अंगधटाईनें कोणेक कामाचाठायीं प्रवर्तण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्यादि तो, किं॰ त्याचें शरीर तो.

**रांकटाई**, स्त्री॰ रांकटपणा.

**राख**, स्त्री॰ रखा; २, वस्तुतः सामान्या असतां आपण एकल्यानेंच उपभोगावी ह्मणून कोणेकानें बाळगली असत्येंजी वेश्यादिरूप सामान्या स्त्री ती.

**राखडी**, स्त्री॰ एक स्त्रियांचें शिरोभूषण आहे

**राखण**, स्त्री॰ न॰ कों॰ रखवाली; २, रक्षण द्वितीयार्थीं; ३, पिशाचाद्युपद्रवापासून आपल्यास राखावें ह्मणून जें ग्रामदुर्गादिकांस प्रतिमासीं, किं॰ प्रतिवर्षी नारळ, इ॰ देतात ती; ४, मनुष्यादिकांस जो पिशाचाद्युपद्रव, किं॰ शेत, इ॰ कांस जो मूषकाद्युपद्रव त्याचा मंत्र, तंत्र, मानता, इ॰ उपायानें करितात जो बंदोबस्त ती; लावणें, लागणें. या धातूंचायोगीं प्र॰; कोणेक गोष्टीचीराखण लागणें ह्म॰ त्या गोष्टीपासून आपणास उपद्रव न बाधे असा बंदोबस्त होणें; उ॰ या रिवस्तीचे एकदां रुपये भरले ह्म॰ चार महिन्याची राखण लागली; ५, गुरें, हस्त, इ॰ कांचे रक्षणार्थ नियुक्त जो गुराखी, इ॰ त्यास रक्षण निमित्त जें द्रव्य द्यावें लागतें ती; ६, जें ग्रहाद्यधिकरण धान्यादि द्रव्यानें केवळ शून्य असूं नये ह्मणून अल्पस्वल्प जें त्याचाठायीं तें धान्यादिद्रव्य राखितात त्यास ह्म॰; उ॰ सगळे दाणें खर्चूं नका परास राखण ह्मणून दोन पायली तरीं राखून ठेवा.

**राखणदार**, पु॰ शेत, ग्रह, इ॰ कांचे रखवालीकरितां जो कोणी नियुक्त असतो तो.

**राखणमंडळ**, न॰ राखमंडळ.

**राखणा**, पु॰ रा॰ गुराखी; ह्म॰ राखण्यानें गुरें टाकलीं ह्मणून धनी कांहीं टाकीत नाहीं; २, राखणदार; ३, एक क्षुद्रजंतु आहे.

**राखणावळ**, स्त्री॰ रक्षण निमित्त जें गुराखी, इ॰ कांस देय ती.

**राखणें**, रक्षणें; २, क्रमाद्यनुरोधानें ज्या अर्थावर कांहीं क्रिया संस्कारादि होण्याचा प्रसंग आला असतो तो अर्थ ते संस्कारादि न होऊं देतां तसाचे तसाच ठेवणें; उ॰ कोनाड्याची जागा तेवढी राख आणि अवघी भिंत सारीव; तुझ्या मनांत असेल तें सारें बोल, कांहीं राखूं नको; त्या रानांतील गवत यंदा राखलें आहे; मुसलमान लोक डोईचे केंस काढितात आणि दाढीचे राखतात; आज तुज करितां पोळ्या राखून ठेविल्या आहेत; ३, लांब, आंखूड, मोठा, लहान, इ॰ रूप ज्या पदार्थाचा स्थिति त्या स्थितींत कोणेक पदार्थ

पदार्थ स्थित्यंतर न पावूं देतां ठेवणें; उ० ही भिंत फार रुंद राखली म्हणून जागा अडली; कांहीं इतकी लांब कशाला राखलीस त्या रखणांत राहील कशी; ४, स्त्रीनें पुरुषास, किं० पुरुषानें स्त्रियेस, उपभोगार्थ स्त्रीयत्नेंकरून ठेवणें; हुंडीपत्रामध्यें अमुकापासून रुपये घेतले या अर्थीं राखले एतच्छब्दपूर्वक त्याचें नाव लिहावें अशी चाल आहे; त्या हुंडीमध्यें माझी राखले घेतली होती, इ० स्थलीं स्त्रीलिंगत्वेंकरून ही राखले शब्दाचा व्यवहार होतो; राखून करणें, बोलणें, इ० स्थलीं बोलणें, इ० विषयांचा कांहीं अंश शेष राही असें वगळून बोलणें किं० करणें.

**राखरांगोळी**, स्त्री० दे० देश, गांव, घर, मनुष्य, शरीर, इ० कांची जळून राखकहोई अशीजी अवस्था होत्ये ती.

**राखमंडळ**, न० कों० रखमंडळ.

**राखाडी**, स्त्री० पसरलेली किं० एकेठिकाणीं सांचली अशी बहुत जी राख ती; २, कों० रखा.

**राखांदुळी**, स्त्री० कों० बायको बाळंत झाली म्हणजे तिसरे दिवशीं भूतादिबाधानिरसनार्थ दारीं राखेनें भरून एक मडकें ठेवीत असतात तीं.

**राखी**, स्त्री० श्रावणी पूर्णिमेचे दिवशीं हस्तादिकांत जो रेशीम, इ० कांचा दोरा गोंडालाऊन बांधितात ती.

**राखीपुनव**, स्त्री० श्रावणी पूर्णिमा.

**राखीपूर्णिमा**, स्त्री० राखीपुनव.

**राखीपौर्णिमा**, स्त्री० राखीपूर्णिमा.

**राखीळ**, स्त्री० कों० गुरारख्यासजें गुरें, इ० राखण्यानिमित्त द्रव्य द्यावें लागतें ती; २, गुरें, ढोंन, इ० राखण्याचें जें काम ती.

**राखुंडा**, पु० राखेचा जो ढीग तो; २, ३ लिं० जन्मतः वरचा ओंठ ज्याचा विदीर्ण झालेला असतो असा जो मनुष्यादि तो.

**राखुंडी**, स्त्री० गोंवरीचा निखारा विझविला असतां जो काळा अंगारा होतो ती; २, गोंवरी निःशेष जळून होतो जो राखेचा ढेंपसा त्यास दांत घांसण्याविषयीं साधनत्वेंकरून विवक्षा असतां क्वचित् म्ह०; ३, ला० भात, भाकर, भाजी, इ० करपून काळीं झालीं असतां त्यांस म्ह०

**राखूळ**, स्त्री० राखील प्रथमार्थीं.

**राखोडा**, पु० राखुंडा प्रथमार्थीं.

**राखोंडी**, स्त्री० राखुंडी.

**राखोळ**, स्त्री० राखूळ.

**राग**, पु० अनेकवर्ण पौर्वापर्यादिक्रमानें एकत्र जुळले असतां जसे अनेक प्रकारचे अनेक शब्द होतात तद्वत् षड्जादिस्वरांची परस्पर जुळणी केल्यानें जे गावयास योग्य अनेक रचनाविशेष होतात ते प्र०; २, क्रोध; रागें भरणें म्ह० कोपणें; कोणे काला रागें भरणें म्ह० क्रोधपूर्वक शिवी गाळ, इ० करणें; रागास येणें, भरणें, पेटणें, चढणें, म्ह० कोपणें; म्ह० अतिरागा आणि भीक मागा; रागरखाई आपल्यास आणि संतोष रखाई दुसऱ्यास; ३, सं० अनुराग; ४ काळेपणा, पिंवळेपणा, इ० रूपजे रूपाचे भेदक रंग ते प्र०; उ० तुझे हृदयांत कांहीं काळजी आहे, हें तुझे मुख रागावरून मी जाणलें.

**रांग**, स्त्री॰ अनेकपदार्थ एकापुढें एक एकापुढें एक असे लागत गेले असतां होत्ये जी ओळ ती·

**रांगडा**, पु॰ एक देश आहे तो; २,३लिं॰ तद्देशीय मनुष्य,भाषा,इ॰ तो·

**रांगणें**, मूल,इ॰कानीं भूमीस हात गुडघे टेंकून चालणें·

**रागमाला**, स्त्री॰ रागमालिका·

**रागमालिका**, स्त्री॰ अनुक्रमानें थोडेथोडे रागांचे अंश घेऊन बांधिला असतो जो गीनविशेष ती; २,किल्लीदिल्ली ह्म॰ अनेक रागांचे स्वर निघतात, असें एक यंत्र असतें ती.

**रागमाळा**, स्त्री॰ रागमाला·

**रागमाळिका**, स्त्री॰ रागमाळा.

**रागरंग**, पु॰ पुढें होणार किं॰ मागें झालेली,किं॰ देशांतरस्थ,इ॰रूप अप्रत्यक्ष जी कोणेक गोष्ट तिचें त्यात्या लक्षणावरून ही गोष्ट यायाप्रकारें होईल,किं॰ असें केलें असतां असें होईल,इ॰ रूप अनुमित होतें जें बरें वाईट स्वरूप तो; उ॰ पावसाच्या रागरंग पहा तसे निघा.

**रांगरारांगूस**, स्त्री॰रा॰ स्थलांतरीं आणावें जो कोणी त्याणें,पूर्वस्थलादिकांचा लोभ किं॰ जाण्याचा अनुत्साह,इ॰ कारणामुळें झटकर न जातां अनेक निमित्तें उपस्थित करून तेथच्या तेथें घोटाळण्याचा जो व्यापार ती.

**रागवणें**, रागावणें·

**रागावणें**, क्रोधावणें·

**रागिणी**, स्त्री॰ मंजुल ज्याचे स्वर असतात असा जो गानांतील राग त्यास ह्म॰



**रागीट**, ३लिं॰ कोपिष्ट·

**रागणें**, रागावणें·

**रांगोळी**, स्त्री॰ शिरगोळ्या,कुपा,इ॰ कुटून देवादिकांपुढें चित्रादिकाढाया करितां करितात जी पूड ती,किं॰ तदर्थ जी करितात तुसाची राख ती; २, त्यानें काढिलें जें चित्रादिक ती.

**रांगोळें**, न॰ आंत रांगोळी भरून भूमीवरून ओढिलें असतां अनेक चित्रविचित्र आकार उमटतात असें ताम्रादिकाचें नलिकारूप यंत्र करितात तें.

**राघू,राघो**, पु॰ पोपट; २, शृंगारी लावणी,इ॰कांत नायकास ह्म॰

**राजअंबीर**, पु॰ गंभीरस्वभावाचा सभ्य जो नायक त्यास शृंगारांत ह्म॰

**राजकडी**, स्त्री॰ एक कर्णभूषण आहे·

**राजकारण**, न॰ दरबारीं प्रवेश व्हावा,परराज्यादि आत्मसात् करावें,इ॰ कार्यसिध्यर्थ गुप्तपणें अनेकयुक्तींनीं बांधितात जी मोठी मसलत ती; २,कोणेक गोष्टीचें प्रयोजक गुप्त असतें जें निमित्त त्यास ह्म॰; उ॰ या भिंतीस किती सारविलें, लिंपिलें,तरी याच जाग्यावर चीर पडत्ये याचें राजकारण कांहीं समजत नाहीं·

**राजकारणी**, ३लिं॰ राजकारण करणारा जो मोठा आटोकाट मसलती तो·

**राजकी**, ३लिं॰ राजमाहात्म्यामुळें राज्यांत जें कांहीं बरें वाईट होतें तो; उ॰ दुसऱ्या राज्यांत गेल्यानें राजकी उपद्रव टाळायास येईल, पण दैवकी उपद्रवापुढें उपाय चालत नाहीं·

**राजकीय**, ३लिं० राजसंबंधीजो व्यवहार,कारभार,मनुष्य,इ० तो.

**राजकुमर,राजकुँवर**, पु० प्रा०ग्रं० राजाचाजो पुत्र तो.

**राजकुमरी राजकुँवरी**, स्त्री०ग्रं० राजाचीजी कन्यका ती.

**राजकेळ**, स्त्री० केळींत एक जाति आहे.

**राजकेळें**, न० राजकेळीचें जें केळें तें.

**राजक्रांत**, स्त्री०न० राजक्रांतीचा अपभ्रंश.

**राजक्रांति**, स्त्री० परस्पर राजादिकांचा कलह लागल्यामुळें प्रजांस उपद्रव व्हावयाजोगा होतोजो राज्यांत दंगा ती.

**राजगिरा**, पु० माठासारखी एक ओषधी आहे तो;२, त्याचें जें बीज तो.

**राजगोंडा**, पु० पालखीचे दांडीस मध्यभागींजो मोठा एक गोंडा बांधितात तो.

**राजघोळ**, स्त्री० घोळींत एक भेद आहे.

**राजचिन्ह**, न० राजानेंच धारण करावीं, किं० राजानें दिलीं तरच दुसऱ्यानें धारण करावीं, अशीजीं छत्र,चामर, मोरचेल, अबदागीर,इ० तीं प्र०;२,राज्यपद प्राप्त होण्याचीं लक्षणें मनुष्याचे अंगावरजीं अजानुबाहुता,इ० असतात तीं प्र०;३,पत्र,नाणें,इ०कांवरजो राजाचा शिक्का असतो तो.

**राँजण**, पु० रांझण.

**राँजणवाडी**, स्त्री० रांझणवाडी.

**राँजणी**. स्त्री० रांझणी;२.कों० नित्याचे ओयत्याचे तांदूळ जा मडक्यांत ठेविले असतात त्या मडक्यास तेव्हां मात्र स्त्र०;३, एक झाड आहे.

**राजतुरा**, पु० एक फुलझाड आहे.

**राजदंड**, पु० अपराधीजनास राजा करितोजो ताडन,द्रव्यापहार,इ०रूप दंड तो;२,अपराधीजनापासून दंडार्थ राजा घेतोजें द्रव्य तो.

**राजदरबार**, न० प्रजांचा कल्याणार्थ न्यायान्याय विचार,खंडदंड,इ० व्यवहार जेथें चालला असतो असाजो राजसत्ताक अधिकरण विशेष तें.

**राजद्वार**, न०रा० राजदरबार.

**राजधानी**, स्त्री० सं० राजा जेथें नांदत असतो असें जें नगर ती.

**राजनीति**, स्त्री०सं० राजादिकानीं राज्यादि व्यवहारीं यायाप्रकारें वर्तावें असाजो शास्त्रकर्त्यानीं लोकव्यवहारमार्ग सांगीतला आहे ती.

**राजन्य**, पु०सं० क्षत्रिय.

**राजपद**, न०सं० राज्य करण्याचाजो अधिकार तद्रूपजें स्थान तें.

**राजपसंत**, ३लिं० राजादि सर्व थोरथोर लोकानीं पसंत करायाजोगाजो कांहीं पदार्थ,गोष्ट,इ०तो.

**राजपुरुष**, पु० राजानें राजकार्याविषयीं कांहीं एक अधिकार जास दिल्हा आहे तो पुरुष.

**राजपिंडा**, पु० राजबिंडा.

**राजबिंडा**, पु० शरीरानें अतिशयित सुंदर असून नाजुकजो पुरुष त्यास स्तुतीनें स्त्र०

**राजमंडल**, न० सं० राजाचे खासगीचें प्रकरण तें; २,राजेरजवाडे यांचा एक झालाजो समुदाय तें.

**राजमंडळ**, न० राजमंडल.

**राजमंदिर**, न०सं० राजाचेंजें मंदिर तें, २, ला० शृंगा-

शृंगारप्रसंगीं रंगमहाल, इ० क्रीडाभुवनास म्ह०

**राजमान्य**, ३ लिं० राजादि महान्‌महान्‌ पुरुषांस माननीय जो पुरुष, गोष्ट, इ० तो; २, आज्ञापत्र पाठवायाचें त्याला हें विशेषण सन्मानार्थ कागदोपत्रीं देतात.

**राजमार्ग**, पु० अनेक लोक, घोडे, गाडया, इ० ज्या मार्गानें जात असतात असा जो मोठा मार्ग तो; २, ला० सर्वलोक प्रशस्तपणें ज्या रीतीनें चालत असतात अशी जी रीति ती.

**राजमुद्रा**, स्त्री० सं० शिक्का, मोर्तब, इ० रूपजें राजचिन्ह ती.

**राजमोहरा**, पु० विद्या, शौर्य, इ० गुणानें अनेक राज्याच्या ठायीं प्रसिद्ध असा तेजस्वी जो कोणी पुरुष असतो त्यास म्ह०; उ० या राज्यांत नाना-फडणीस एक राजमोहरा होता; २, राजबिंडा.

**राजमोहोरा**, पु० राजमोहरा.

**राजयक्ष्मा**, पु० एक क्षयरोगांत भेद आहे.

**राजयोग**, पु० ज्यानें प्राण निरोधादि न करितां भगवत्स्वरूपीं अंतःकरण एकाग्र करून लावण्याचा एक उपाय आहे तो; २, उपजल्या प्राण्यानें राजा व्हावें असा जो जन्मकालीं ग्रहयोग पडला असतो तो.

**राजरोस**, अ० लपून छपून चोरून नव्हे असें उघडपणीं, उ० मी कांहीं ती वस्तु चोरून नेली नाहीं तुमचे देखत राजरोस नेली.

**राजर्षि**, पु० सं० ज्ञानी जो क्षत्रिय असून जो तपस्वी तो.

**राजवटा**, पु० कों० गृहसंबंधी मुख्य संसारकर्त्या मनुष्याची जी कारकीर्द तो; प्रा० प्रथमांत प्र० नाहीं; उ० मामाजीच्या राजवट्यांत आम्ही पंचवीस रुपयांखालीं लुगडें नेसलों नाहीं, तुमचे राजवट्यापासून दोन रुपयांचें मिळणें मुसकील; २, अ० राजवट्यांत; उ० वडिलांचे राजवटा ही गोष्ट घडली नाहीं.

**राजवाडा**, पु० राजाचा जो वाडा तो.

**राजविलाशी**, ३ लिं० राजविलास करितो तो.

**राजविलास**, पु० राजांचे विलासासारिखा जो विलास तो.

**राजविलासी**, ३ लिं० राजविलाशी.

**राजवैद्य**, पु० वैद्यशास्त्रज्ञ, यथायोग्य उपचार प्रत्युपचार जाणणारा, जो उत्तम वैद्य तो.

**राजव्रत**, ३ लिं० रा० बागडयांत एक भेद आहे त्याचें वि०

**राजश्रियाविराजित**, ३ लिं० लक्ष्मीनें राजासारिखा सुशोभित असा याच्या अर्थ परंतु बरोबरीच्या नात्यानें कोणेक गृहस्थास पत्र लिहायाचें असतां मान्यांत हें विशेषण लिहितात.

**राजश्री**, पु० सत्कारपूर्वक बोलायाचें असतां राजास जे राजश्री या शब्दानें व्यवहार करितात तो; उ० एव्हां राजश्रीची स्वारी कचेरीस आहे; २, दुसऱ्यास कागदपत्र लिहायाचें असतां राजश्री हीं अक्षरें साधारणासही त्याचे नामापूर्वीं लिहितात, किं० कोणाएकास विनोदानें बोलायाचें असतां त्या पुरुषास या शब्दानें व्यवहार करितात.

**राजस**, ३ लिं० रजोगुणविशिष्ट जो मनुष्यादि पदार्थ तो, किं० रजोगुणसंबंधी तो.

**राजस**, ३लिं० प्रा० ग्रं० रुकुमार असून जो सुंदर पुरुषादिक तो.

**राजसबाणा**, ३लिं० राजस.

**राजसूय**, पु० सं० यज्ञांत एक भेद आहे.

**राजहंबीर**, पु० राजअंबीर.

**राजहंस**, पु० चोंच, आणि पाय, हे ज्याचे तांबडे आणि शरीरानें पांढरा असा जो हंसपक्षी तो; २, लावण्यामध्यें नायकास ह्म०

**राजा**, पु० प्रजांपासून करभार घेऊन त्यांचें पालन करितो असा जो पृथ्वीपति तो; या अर्थी संस्कृत शब्दांशीं समास; उ० राजाचा जो पुत्र तो राजपुत्र, राजकन्या, राजकुमार, राजसभा, राजपत्नी राजाश्रय, राजगुरु, राजपुरोहित, राजोपाध्याय, इ०; कितीएक प्राकृतशब्दांशीं समास होतात; उ० राजकुमर, राजकुंवर, राजकुमरी, राजबाळा, इ० राजदरबार, राजपसंत, इ० पूर्वी कितीएक लिहिले आहेत, एथें संस्कृताशीं समास झाला असतां ग्रंथ तालव्य ज होतो, इतरत्र कदाचित् ज होतो, कदाचित् ज होतो; २, ज्या समुदायाचा आज्ञा करणारा जो नायक तो त्यासमुदायाचा; उ० देवांचा राजा इंद्र; ३, सजातीयपदार्थ समुदायांत श्रेष्ठत्वें करून जो विवक्षित तो; उ० आह्मालाजो चाकर मिळतो तो अळशांचा राजा; तीर्थराज, मृगराज, ग्रहराज, इ० समास जाणावे; ४, ज्याचा अनुग्रह बलानें तोतो शरीरावयवादिपदार्थ समुदाय स्वस्वव्यवहारीं वर्ततो असा जो जीवात्मा, इ० तो त्या समुदायाचा; उ० शरीरामध्यें धातुहा राजा आहे तो नीट आहे तों शरीर यथास्थित चालतें; ५, अन्न, वस्त्र, स्थल, इ० पदार्थाविषयीं यथास्थित सोय आहे तदर्थ कष्ट, काळजी, आज्ञा करावी लागत नाहीं असा जो कोणी त्यास ह्म०; उ० आह्मी पहा या गळक्या घरांत कसे हाल भोगतों, तुह्मी आपले चार मजल्याचे घरांत राहिलां आहां तुह्मी राजे आहां तुह्मास कांहीं काळजी नाहीं; ६, असुक केलें असतां आपला कांहीं तोटा होईल, घात होईल, इ० विचार जाला समजत नाहीं त्यास ह्म०; उ० त्याला काय समजतें तो राजा आहे मी सांगतों तसें करा; आपल्या घरचा राजा ह्म० आपल्या विषयावर मात्र आपण स्वतंत्र, अशी विवक्षा असतां सर्वांस ह्म०; ७, जायहाचे वारीं संवत्सर प्रतिपदा पडत्ये तो ग्रह त्या संवत्सराचा.

**राजांगण**, न० श्रीमंत लोकांचे वाड्यापुढें जें मोठें स्थल रिकामे राखिलें असतें तें; २, चौसोपी घरास जें चतुष्कोण मध्यें अंगण पडतें तें.

**राजांगण**, न० राजांगण.

**राजाधिराज**, पु० अनेक मांडलिक राजांवर जो एक मुख्य राजा असतो तो.

**राजापुरी**, ३लिं० राजापूर ह्मणून एक बंदर आहे तत्संबंधी जो गूळ, हळद, भाषा, इ० पदार्थ तो.

**राजाभिषेक**, पु० राजास राज्यपदीं अधिकृत करते समयीं महानद्या, समुद्र, इ० कांचें पाणी आणून अमात्य पुरोहितादि मिळून विधिपूर्वक त्याजवर करितात जो अभिषेक तो.

**राजावळ**, स्त्री० भातांत एक जाति आहे; २, पंचांगाचे प्रारंभीं राजा, प्रधान, मेघेश, इ० संवत्सर फल जें लिहितात ती; ३, एक लुगड्यांत भेद आहे.

राजा

**राजासन**, न० अधिकारस्थ राजाचें बसायाचें जें सिंहासन तें.

**राजाळूं**, न० अळवांत एक भेद आहे.

**राजाज्ञा**, स्त्री० कोणेक कार्याविषयीं कोणेकाम राजाची होत्येजी अनुल्लंघनीय आज्ञा ती; २, ला० सर्वथा अनतिक्रमणीय जें विधिवचनादिरूप प्रमाण ती; ३, पु० राजाज्ञा.

**राजाज्ञा**, पु० अष्टप्रधानांतील एक अधिकारी आहे तो.

**राजी**, ३ लिं० कांहीं एक करणें, देणें, घेणें, इ० विषयीं अंतःकरणापासून कबूल झालाजो तो; २, गंजीफांचे डावांत गजसंबंधी जी तर्फ तिचें चि०

**राजीक**, न० राजकान.

**राजीनामा**, पु० तुह्मीसांगाल तसें वर्तायास, किं० कोणेक गोष्ट करायास मी राजी आहें, असाजो लेख कोणीकोणास करून देतात तो.

**राजीरजावंतीनें**, अ० हिं० रजावंतीनें.

**राजू**, पु० अनेक पेड एकत्र वळून केलेलाजो फार मोठा दोर तो.

**राजेंद्र**, पु० राजाधिराज; २, राजअंबीर.

**राजेरजवाडे**, पु० देशोदेशींचे लहानमोठे जे राजे, आणि देशमुख, देशपांडे, इ० मोठमोठे लोक ते.

**राजेळ**, **राजेळी**, स्त्री० केळींत एक जाति आहे तिचें चि०

**राजेळें**, न० राजेळीचें जें केळें तें.

**राजोपचार**, पु० वर छत्र धरावें, चवरी, मोरचेल, वारावें, इ० राजास उचितजे उपचार ते प्र०; २, प्रकृतीनें नाजूकजो मनुष्यादि त्यास सोसायाजोगाजो औषधाद्युपचार तो.

**राज्य**, न० प्रजांपासून कर घेऊन त्यांचें पालन करावें असाजो राजाचा अधिकार, किं० कर्म तें, किं० तें करण्याचाजो प्रकार तें; उ० सांप्रतचे राज्यांपेक्षां पहिलीं राज्यें चांगलीं असत; २, एकेका राज्याचे सत्तेखालचे जेजे देश ते प्र०; ३, संसारादि व्यवहारीं दुसराकोणी आपल्यास विचारणार आहे, हें मनांत न बाळगतां स्वातंत्र्यपणें वर्तायाजोगेंजें कोणाएकाचें आधिपत्य असते तें; उ० घरचा पुरुष प्रवासास गेला, आतां त्याचे घरांत सारें बायकाचें राज्य झालें आहे; आतां तुह्मी राज्य करा, इ० स्थलीं खुशालनिर्भयपणें स्वस्व व्यापारीं वर्ता.

**राज्याभिषिक्त**, ३ लिं० राज्याभिषेक झाला आहे ज्यास असाजो राजा तो.

**राज्याभिषेक**, पु० राजाभिषेक.

**राज्यासन**, न० राजासनाचा अपभ्रंश.

**रांझण**, पु० मृत्तिका, इ० कांचें आकारविशेषाचें मोठें पात्र आहे तो.

**रांझणवाडी**, स्त्री० उष्णविकृतीमुळें डोळ्याचे पापण्यास पुटकुळी येत असत्ये ती.

**रांझणी**, स्त्री० लहानजो रांझण ती.

**रांठ**, ३ लिं० ज्याचे अंगीं नाजूकपणा, किं० मंजूळपणा नाहीं, असाजो मनुष्य, शब्द, इ० तो.

**राड**, स्त्री० आंत पाणी घालुन चिखल करून खेळायाकरितां शिमग्यांत मोठी खळी खणतात ती; २, ला० मार्ग, किं० गृहादिकांची भूमि यांवर पाणी, इ० पडल्यामुळें तेथें चिखल व्हावा अशी

अशी होत्येजी दुर्दशा ती.

**राँड**. स्त्री० रंडा; २, दासी; ३, मैथुनवृत्तीनें उपजीविका करणारीजी स्त्री ती; ४, निंदा किं० दुर्बळता वर्णनप्रसंगीं स्त्रीमात्रास ह्म०; ह्म० रांड भांड ह्मेसा बिघडे तो होय कैसा; ईर्ष्याशून्य नामर्दजो मनुष्य त्यास आरोपानें ह्म०; ५, कोणेक व्यवहार पदार्थयांचा बुडणें, इ० कारणामुळें होता, किं० नहोता असें व्हावयाजोगी होत्ये जी दुर्दशा ती; होणें, करणें, उडणें, यांच्या योगीं प्र०; उ० यंदां शेतें चांगलीं आलीं होतीं पण आंत पाणी शिरून अवघी रांड झाली.

**राँडका**, पु० रंडका.

**राँडकी**, स्त्री० रंडकी.

**राँडखोंड**, स्त्री० शिवीयावयाकरितां उच्चारितात जो रांड, इ० अभद्रशब्द ती; उ० मी याचा कांहीं गोष्ट बोलिलें नसतां उगीच मेला मला रांडखांड ह्मणतो.

**राँडगळा**, पु० पुरुषाचे कंठध्वनीहून बारीकपणा, नाजूकपणा, इ० धर्मांनीं विलक्षणजो स्त्रियांचा कंठध्वनि असतो तो; २, तादृश पुरुषाचा असतां त्यास ह्म०

**राँडगा**, ३ लिं० रा० रंडीबाज.

**राँडगाँठ**, स्त्री० गांठोडें, इ० कांसजी दुहेरी गांठ देतात त्यांत एक भेद आहे.

**राँडछंद**, पु० रांडेचेंजें व्यसन तो.

**राँडछंदी**, ३ लिं० रांडगा.

**राँडपोर**, न० ग्रामादिकांतील स्त्रिया, पोरें, इ० यथा यावन्मनुष्य समुदाय तें; उ० आज कथेस झाडून रांडपोर आलें होतें; २, कोणेकाचे पदरीं बायको मुलें, इ० जें खटलें असतें तें.

**राँडबाज**, ३ लिं० रंडीबाज.

**राँडबाजी**, स्त्री० रंडीबाजी.

**राँडभाषण**, न० मर्दास योग्य नव्हे असेंजें भयादि कारणामुळें दीनवाणें भाषण तें.

**राँडमाणूस**, ३ लिं० दुर्बलत्ववर्णनप्रसंगीं स्त्रीमात्रास ह्म०; २, केवल अपराक्रमी ईर्ष्याशून्य असाजो मुरदाडपुरुष त्यास आरोपानें ह्म०

**राँडमामी**, स्त्री० कों० रांडकीजी स्त्री तिची गरीबी वर्णावयाची असतां ह्म०

**राँडमुंड**, स्त्री० रंडकीमुंडकी.

**राँडरळी**, स्त्री० रांडपोर प्रथमार्थीं.

**राँडरूं**, न० रांडेस निंदेनें ह्म०

**राँडलेंक**, **राँडल्योंक**, पु० एक शिवी आहे जी पुरुषास देतात ती.

**राँडवडा**, पु० गृहादिकांचाठायीं सत्ताधारी पुरुष नाहींसा झाल्यामुळें होतेंजें स्त्रियांचें प्राधान्य तो; २, कों० रांडेमुंडे, इ० शिव्यांचाजो कांहींएक काल अतिशय तो; गाणें, गाजविणें, उठविणें, इ० कांच्यायोगीं प्र०

**राँडवला**, पु० रांडवडा द्वितीयार्थीं; गाणें याचाठायीं प्र०

**राडा**, पु० संसारादिसंबंधी निर्वाह्य जीं अनेक कामें त्यांचा पडला असतोजो पसारा तो.

**राँडापोरें**, न० घर, गांव, देश, यांतील मुख्य व्यवहार कर्तेजे पुरुष त्यांहून इतरजीं बायका मुलें, इ० सर्व माणसें तीं.

**राँडावणें**, स्त्रीनें विधवात्वरूप दुर्दशा पावणें; २,

चांगलेपणीं चालत असतोजो कांहीं एक व्यवहार त्याणें मोडकळीस येणें, किं॰ बुडणें; उ॰ त्याणीं मागें संसार चांगला थाटला होता पण थोरला भाऊ मेल्यापासून रांडावला.

**रॉंडेच्या**, ३लिं॰ रांडलेंक. परंतु स्त्री पुरुष साधारण; हाच शब्द संबोधनांत आश्चर्याचा उद्गार होतो; उ॰ अगरांडेचे पांचावर्षाचा पोर पहा किंग कशी पोथी वाचितो.

**रॉंडोळी**, स्त्री॰ रांडमामी.

**रॉंडया**, ३लिं॰ रांडबाज; २, बाइलबुध्या; ३, जनानी जो मनुष्य तो; ४, रांडया रायोबा.

**रॉंडयारायोबा**, पु॰ दे॰ सर्वकाल स्त्रियांशीं गोष्टी सांगाव्या, त्यांचीं कामें एकावीं, त्यांचें मागून फिरावें अशा स्वभावाचा जो मनुष्य त्यास ह्म॰

**रॉंढरूं, रॉंढूं**, न॰ रांदुरूं.

**राण**, न॰ दे॰ रान; रानशब्दातें घेऊनजे समास होतात ते या शब्दास घेऊनही होतील असें जाणावें.

**राणा**, पु॰ ग्रं॰ राजा; उ॰ वैकुंठींचा राणा कोणी पाहुनियां आणा.

**राणी**, स्त्री॰ राजाची जी स्त्री ती.

**रात**, स्त्री॰ रात्र; २, पु॰ को॰ उष्णता, इ॰ विकृतीनें नेत्रांत जी आरक्तता येत असत्ये तो.

**रातंजन**, न॰ दे॰ एक ओषधी आहे.

**रातड**, ३लिं॰ यत्किंचित् राता जो तो; प्रा॰ तांदळावर प्रसिद्धि.

**रातब**, पु॰ दे॰ खुराक.

**रातंबा**, पु॰ कोकंबीचें जें फल तो; रातंबे पिकणें ह्म॰ गोरें नाजूक मनुष्य उन्हांत गेल्या मुळें त्याचे गाल रक्तवर्ण होणें.

**रातंचाव**, स्त्री॰ रतनचाव.

**रातबिरात**, स्त्री॰ गमनादि कोणक कर्माविषयीं कदाचित् प्राप्त होईल असाजो संभावित रात्र, इ॰ लहान मोठा विषमसमय ती; उ॰ रातबिरात आहे चार जिन्नस घरांत बाळगून ठेवावे; २, अ॰ त्या विषमसमयाचाठायीं; उ॰ घरांत जिन्नस असल्यानंतर रात बिरात उपयोगीं पडेल.

**रातंबी**, स्त्री॰ रातंब्याचें झाड ती.

**रातंबेल**, न॰ रातंबीचे बियांचें जें तेल तें.

**राता**, ३लिं॰ यत्किंचित् काळसरजो तांबडा रंग तो, किं॰ तद्विशिष्टजो तांदूळ, अंबा, इ॰ तो; २, पु॰ एक भातांत जाति आहे.

**रातांधळा**, ३लिं॰ रातांधळें जास प्राप्त झालें आहे तो.

**रातांधळें**, न॰ रात्रीं दिसूं नये असाजो मनुष्यादिकांस नेत्ररोग प्राप्त होतो तें.

**रातावणें**, कों॰ रात्र होणें; उ॰ रातावलें आतां जाउं देबाईघरास.

**राताळी**, स्त्री॰ रताळी

**राताळूं**, न॰ रताळूं.

**राताळें**, न॰ रताळें.

**रातोरात**, अ॰ दिनापेक्षा न धरितां घाईनें रात्रीच्या ठायींच; जाणें, येणें, कांहीं काम करणें, इ॰ कांचे वि॰; उ॰ मारुतीनें रातोरात जाऊन द्रोणागिरी आणिला.

**रात्र**, स्त्री॰ रात्री शब्दाचा अपभ्रंश; रात्र ओरडणें, इ॰ स्थलीं रात्र ह्मणून क्षुद्रज जंतु आहे तो

रात्रींशब्द करीत असतो त्याशब्दानें विशिष्ट रात्री-
नें होणें; म्ह० रात्र थोडी आणि सोंगें बहुत.

**रात्रंदिवस, रात्रंदीस,** अ० अहर्निशी या अर्थीं.

**रात्रि,** स्त्री० सं० सूर्यास्तापासून सूर्योदयपर्यंत
जो काल ती; एकरात्र, द्विरात्र, इ० स्थलीं रात्रिश-
ब्दाचा अर्थ अहोरात्र असा होतो.

**रात्रौ,** अ० रात्रीच्या ठायीं.

**रांधणें,** तांदूळ, भाजी, इ० पदार्थ शिजविणें; म्ह०
सारी रात्र जागली आणि शेंगावांगीं रांधलीं.

**रांधप,** न० रांधण्याचा जो व्यापार तें; २, शिजण्या-
साठीं चुलीवर घातलेला जो तांदूळ, भाजी, इ० द्र-
व्य समुदाय तें; उभयत्रही रसोंपाकाविषयीं प्र०

**रांधपी,** पु० स्वयंपाक रांधणारा जो पुरुष तो.

**रांधवणीं,** न० रांधल्ये समयीं खरकटें मरकटें हात
पात्र, इ० विसळलेलें जें पाणी तें

**राधा,** स्त्री० नाचायासाठीं स्त्रीचा वेष धारण करि-
तो जो पुरुष तो.

**रांधा,** पु० औषध, रंग, इत्यादि अर्थ जो गंधक, इ० कां-
चा पाक करितात तो, किं० ती क्रिया तो.

**रान,** न० अरण्य; २, मळा, शेत, इ० कांत लावाया-
चा आणि मनुष्यास उपभोग्य जो भाजीपाला,
धान्य, नारळ, पोफळ, वृक्ष, इ० वनस्पति ओष-
धी त्याहून इतर जें तृणादिक तें; प्र० किं० त्यांचा स-
मुदाय तें; उ० भाजीचे वाफ्यांत कोठें कोठें रान रु-
जलें आहे तें उपटून टाक; ३, कोणेक स्थलीं एक
जातीय वृक्ष ओषधींचा निबिडपणें स्थित जो
समुदाय तें; उ० बंदर किनाऱ्यास सारें नारळीचें
रान; ४, हजामत मोठी वाढली असतां तीस म्ह०;

५

५, जो पदार्थ जा देशीं अनायासें बहुत होतो
किं० असतो, मिळतो, तो देश त्या पदार्थाचें; उ०
मारवाड देश, म्ह० उंटांचें रान तेथें उंटांचा काय
तोटा; ६, कोणेक पदार्थाचे स्थित्यधिकरणत्वें
करून, किं० उत्पत्त्यधिकरणत्वें करून, विवक्षित
जो देश त्यास म्ह०; उ० त्या तुमच्या रानचें मनुष्य
गोरें असतें; कोंकणचा माणूस हें रान मान-
त नाहीं; रान खवळणें म्ह० प्रकरणोपस्थित जो
कोणेक त्याणें कोधायावेशानें कावरेंबावरें होणें;
रान बदलणें, पारखें होणें, इ० स्थलीं प्रकरणोपा-
त्त जो मनुष्य, किं० मनुष्यसमुदाय त्याच्या पूर्वींचा
वर्तनप्रकार, किं० अंतःकरणस्थिति असा कांहीं
अर्थ दिसतो; उ० तो पहिल्यानें आमचे पक्षाचें बो-
लत होता पण त्याजकडला लांच खातांच रान ब-
दललें; आगोदर गोड गोड गोष्टी बोलत होता, रु-
पयांची गोष्ट काढितांच तें रान सोडलें; रानांत शि-
रणें किं० रान घेणें म्ह० कोणेकानें बोलण्याचा मा-
र्ग सोडून अडरानांत शिरणें; रान काढणें किं० रा-
न हाकणें म्ह० पारधी लोकांनीं रानांत शिरून मो-
ठ्या मोठ्यानीं शब्द करणें, झाडें हलविणें, इ० व्यापा-
रानीं श्वापदें उठविणें; ग्राम्य जे पशु पक्षी वृक्ष, इ०
तत्सदृश जे आरण्यक पश्वादि आहेत त्यांचा ग्रा-
म्य पश्वादिकांचे नावानेंच व्यवहार होतो ते हा भे-
दकत्वें करून हा रान शब्द त्यात्या शब्दांचा पूर्वीं
लागतो, असे जे विशिष्ट शब्द होतात त्यांत जे प्र-
सिद्ध आहेत ते किती एक लिहितों; रानतीळ,
रानउडीद, रानगांजा, रानघोळ, रानडुक्कर, रानतूर,
रानकेळ, रानतुळस, रानपडवळ, रानमाशी,

रान

रानमसूर, रानमांजर, रानमाठ, रानमाणूस, रानमूग, रानशेण, रानहरभरा, इ० जाणावे.

**रानकरी**, पु० तृण, काष्ठ, इ० आणावयाकरितां रानास गेलेला जो मनुष्य तो.

**रानकाढ्या**, पु० पारधीकरितां रान काढण्याविषयीं नियुक्त जे मनुष्य ते प्र०

**रानगोंवरी**, स्त्री० रानशेण.

**रानजेवण**, न० वनभोजन.

**रानट**, ३ लिं० जेंत भात, गहूं, इ० चांगलें शेत होत नाहीं आणि तृणादि भारी उगवतें अशीजी भूमि तो; २, केवल आडगांवींच राहणारा जो शहर, दरबार, इ० कांत वर्तला नाहीं अतएव अडाणी जो मनुष्य तो; ३, रानटी.

**रानटी**, ३ लिं० रानसंबंधी जो वृक्ष, काष्ठ, पुष्पें, फळें, भाजी, इ० तो.

**रानभरी**, अ० होणें याचा योगीं प्र० अ० गाय, बैल, इ० कानीं मागील वत्सादिकांचा ओढा न बाळगितां रानोरान फिरूं लागणें, किं० मनुष्यानें बायको, पोर, इ० अनुषंग सोडून कोणेक छंदानें भडकत फिरणें; २, कोणेकानें भयादिकारणामुळें कांहीं सुचेनासें होई असें घाबरें होणें.

**रानभाजी**, स्त्री० रानटी जी कुडयाचा शेंगा, टांकळा, कोला, इ० भाजा त्या प्रत्येकीं.

**रानमाणूस**, न० केवल मनुष्य नव्हे, केवल वानर नव्हे अशी एक उभयमध्यवर्ती एक जीवयोनि आहे; २, रानट जो मनुष्य त्यास म्ह०

**राणवट**, ३ लिं० रानट.

**रानवन**, न० रा० केळ, वड, इ० कांचींजीं भोजनोपयुक्त प्रसिद्ध पानें तदतिरिक्त जें कुडा, किंजळ, इ० रानवृक्षाचें पान तें

**रानवा**, पु० ग्रामादिस्थलांस तृणकाष्ठवृक्षादिविशिष्ठ जें रान तेणेंकरून असते जी विशिष्टता तो; उ० गांवाला रानवा असल्यावांचून तृणकाष्ठाची सोय होत नाहीं.

**रानवाट**, स्त्री० मार्गापासून फुटलेली रानास जावयाची असते जी वाट ती; उ० पुढचे अंब्याजवळ वाट उजवी फुटली आहे ती रानवट आहे तिणें गेलास तर रानांत जाशील.

**रानशेण**, स्त्री० अरण्यादिकांच्या ठायीं गुरें हगून तसाच जागचे जागीं वाळलेला जो शेणाचा पोहो ती.

**रानोमाळ**, अ० गृहादिक जें रहायाचें विवक्षित एक स्थल तें सरून चोहोंकडे; उ० पोथीचीं पत्रें वाऱ्यानें रानोमाळ झालीं; या गांवचीं पूर्वीं गुरें रानोमाळ फिरत होतीं.

**रांप**, पु० फल, पुष्प, पर्ण, इ० कांचे द्रवाचे अंगीं जो कालिमादिरूप रंग विशेष, किं० तत्संबंधादिकारणामुळें येतो तो किं० तद्विशिष्ट जो तो द्रव तो; उ० केळफूल चिरून फार वेळ ठेवलें म्ह० रांप चढून काळें मिचकुट होतें; सुपारीचा रांप धोत्रावर पडला तर धोतर खराब होईल.

**रांपणें**, फलादि चिरून फोडून कांहीं काल ठेविलें असतां यात, लोहादिसंबंध झाल्यामुळें त्याणें रांपानें विशिष्ट होणें; २, नीरक्त झालेलें जें शरीर त्याणें आंत रक्त येऊं लागल्यामुळें रंगविशिष्ट होणें; ३, रायतें, लोणचें, इ० पदार्थांत घातलें

ल्लेंजें मीठ, मोहरी, मस्माला, इ० तो आंत पुरना भिने अशारशांनें विशिष्ट होणें, किं० लोणचें, इ० कांत मोहरी, मीठ, इ० किं० शरीरादिकांत ज्वर, शैत्य. इ० भिनून जाणें; कांहीं एक वर्तमान, बातमी, इ० रांपणें म्ह० गरासरी संशयात्मकत्वें करून विदितपणास आलेलें जें वर्तमानादि त्याणें स्पष्टपणें लोकांत समजायाजोगें दृढ होणें; ४, रा० कोणेकपदार्थाचें अंतःस्थित जो कठिनांशादि पदार्थ तो स्पर्शानें जाणायाकरितां हस्तादिकानें तो पदार्थ चेपून पहाणें; उ० मी याचें पोट रांपून पाहिलें, पोटांत कवळ आहे; ५, ला० आंतील गुप्तांशादि सर्व विदित व्हावयासाठीं कोणेक व्यवहारादि विषययुक्तीनें च्यांचपून पहाणें.

**रॉंपा**, पु० रा० पोफळें निसायाचें एक आऊत आहे.

**रॉंपी**, स्त्री० चर्मकाचें एक शस्त्र आहे; २, रा० लहान जो रांपा ती.

**राब**, स्त्री० काकवीपेक्षां कांहीं दाट जो उंसाचे रसाचा रांधा करितात ती; २, पु० कोणेक कर्मानें, किं० गृहादिस्थलाचाठायीं मनुष्यादिसंबंधी जाणें, येणें, निजणें, बसणें, उठणें, इ० क्रियाद्वारा जो वर्तनव्यापार चालला असतो तो; उ० अताशीं घरांत मनुष्यें थोडीं म्हणून पुढला दरवाजा बंदकरून मागील दरवाजानेंच राब घातला आहे; तुमचा राब मोठा तुम्हाला एवढें घर पुरणार नाहीं, इ० स्थळीं राबणारे मनुष्यादिकांचें खटलें मोठें म्हणून तदीयतो वर्तनव्यापारही मोठा असा अर्थ; ३, कों० शेताचीजी दाढ तो; ४, रा० शेताची भूमि भाजायाचे उपयोगीजो गोंवर, केरकचरा, इ० तो; उ० मणाचीदाढ भाजायापुरता घराभोंवता राब पडला आहे.

**राबडी**, स्त्री० दूध आटवून, आंत शर्करादि मसाला घालून, एक भक्षायाचा पदार्थ करीत असतात ती.

**रॉंबणावळ**, स्त्री० कों० नवेंच आणलेलें गुरूं कळपांत रांबत नाहीं म्हणून तें रांबवायाकरितां जें गुराख्यास द्रव्य द्यावें लागतें ती.

**राबणी**, स्त्री० कों० शेत राबण्याचा जो व्यापार ती; उ० दहा बिघे जमीनीची राबणी करायास शंभर रुपयेतरी खर्चास पाहिजेत.

**राबणूक**, स्त्री० कों० राबणी.

**राबणें**, कोणेक मार्गानें किं० गृहादि कोणेकस्थलीं जाणें, येणें, बसणें, उठणें, इ० यथायोग्य क्रियाद्वारा मनुष्यादिकानीं वर्तणें; उ० चोरांचे भयानें त्या घरांत कोणी राबत नाहीं आणि याबोळानेंही राबत नाहीं; २, शेत, घर, इ० संबंधी कामावर शारीरकष्टद्वारा खपणें; उ० पंचवीस माणसें महिनाभर राबत होतीं तेव्हां हा बांधचांगला झाला; ३, रा० रांबणें प्रथमार्थीं; ४, कों० शेत. वाडी, इ० कांचाठायीं तें तें धान्यादिफल उत्पन्न होण्याविषयीं प्रतिवर्षीं जें नांगरणें, पेरणें, शिंपणें, वेणणें, राखणें, इ० क्रियाद्वारा संस्कार करावे लागतात त्या संस्कारानीं तें शेत, इ० संस्कृत करणें; उ० आह्मी वर्षास दहा बिघे शेत घरीं राबतों.

**रॉंबणें**, कों० गोमहिष्यादि पशु, पोर, सासुरवाशीण, इ० कानीं कळप, पंतोजीची साळ, सासरें

सरें, इ० अधिकरणींनपळतां टिकणें; २, मार्ग जाण्यायेण्याचे वहिवाटीमुळें मळलाजाणें, क्रिं० खरडे, इ० कागद अनेकवार तोच तोच पुनःपुनः लिहिल्यामुळें शाईनें सारिखल्यासारिखा लिप्त होणें.

**राबता**, पु० मार्ग, गृह, इ० कांचाठायीं मनुष्यादिकांचीं जाणें, येणें, बसणें, उठणें, इ० जी वहिवाट चालत असत्ये ती; २, दे० महारानें सरकारांत चाकरी करावी असाजो त्यावर कर असतो तो; ३, राबत्या.

**राबत्या**, पु० दे० सरकारांत राबत्याबदल काम करायासाठीं जो महार येत असतो तो.

**रांबडा**, ३ लिं० रा० उनाडजें गुरूं, मनुष्य, इ० तो.

**रांबाडकी**, स्त्री० रा० रांबडपणा.

**राम**, पु० विष्णूचे दशावतारांतील सातवाजो अवतार तो; राम म्हणणें, क्रिं० राम होणें, म्ह० मरणें; दुष्टवार्तादि श्रवण झालें असतां किं० दुसऱ्यानें बोललेल्यादोषादिकांचा निषेध कर्तव्य असतां या शब्दाचा उच्चार करतात; २, संकेतानें एका रुपयास म्ह०; रामाचें राज्य करणें म्ह० रामराज्य करणें; रामाचें नाव म्ह० रामचर्चा.

**रामकल्ली**, स्त्री० रागिणी आहे.

**रामचर्चा**, स्त्री० कोणेक अर्थाची त्याचें नावही नाहीं अशाप्रकारें अभाव वर्णायाचा असतां याचा प्र० करितात; उ० तो तुह्माला किती सांगोपण मी त्याला रामचर्चा एक अक्षरही बोललों नाहीं.

**रामजन्म**, न० रामनवमीचे दिवशीं रामाचा जन्म रूपजो उत्सव विशेष करितात तें.

**रामजयंती**, स्त्री० सं० रामनवमी.

**रामटेंकी**, ३ लिं० रामटेंक म्हणून ग्राम आहे, तत्संबंधीजीं नागवेलीचीं पानें इ० तो.

**रामदोला**, पु० रामरट्टाप्रथमार्थी.

**रामदासी**, पु० रामदास म्हणून एक साधु होता त्याचे संप्रदायानें चागणारे जे हरदास, इ० तो.

**रामदूत**, पु० वानरास म्ह०

**रामनगरी**, ३ लिं० रामनगर संबंधीजो रायू. इ० तो.

**रामनवमी**, स्त्री० चैत्रशुक्लनवमी.

**रामनामी**, ३ लिं० रामनामजावर लिहिलें आहे अशी आंगठी, इ० तो.

**रामपहारा**, पु० दिवसाचाजो प्रथमप्रहर त्यास शपथ घेणें, इ० विषयीं म्ह०; उ० रामपहाऱ्यांत खोटें बोलूं नको खरें सांग.

**रामपात्र**, न० पाणी प्यावयाचे उपयोगीं प्रा० पितळचें आकारविशेषाचें एक पात्र आहे.

**रामफळ**, न० एक फल आहे; २, स्त्री० त्याचें झाड ती.

**रामबाण**, पु० प्रतिज्ञावचन, इ० कधीं टळायाचें नाहीं असें वर्णन कर्तव्य असतां आरोपानें म्ह०; उ० त्याचा प्रश्न म्हणजे रामबाण कधीं खोटा व्हावयाचा नाहीं.

**रामरगाडा**, पु० मोठाजो रगडा तो

**रामरट्टा**, पु० दे० बुक्का, सोटा, इ० कांचाजो मोठा तडाखा तो; २, प्रयोजनादिकांचा जो रामरगाडा तो.

**रामरक्षा**, स्त्री० रामाचें एक स्तोत्र आहे ती; २, तीणेंकरून अभिमंत्रित केलेलें जें भस्म त्यास म्ह०; ३, लाख्यांचे पिठास निंदेनें म्ह०

**रामराज्य**, न० ज्या राज्यांत राजादिकून उपद्रव नाहीं-त आणि सुखानें प्रजा नांदतात असें जें राज्य तें; कोणेकानें रामराज्य करणें ह्म० भयकारण नाहींसें झाल्यामुळें निर्भयपणें वर्तणें.

**रामराम**, पु० शूद्रादिक दुसऱ्यास सत्कारार्थ एके हातानें हा शब्द उच्चारून जें वंदन करितात तें.

**रामरामी**, स्त्री० परस्परांचा रामराम करण्याचा जो व्यापार ती; २, परस्परें भेटले असतां एकमेकास रामराम करावा इतकी असल्येजी ओळख ती.

**रामाठा**, पु० एक औषधी आहे.

**रामानुज**, पु० वैष्णवांत एक भेद आहे.

**रामायण**, न० रामाचे चरित्राचीजी कथा तें; २, ती कथा ज्यांत वर्णिली आहे असाजो काव्यपुराणादि प्राचीन ग्रंथ तें; ३, ला० प्रपंचादि व्यवहारसंबंधी जी लांबट गोष्ट तीस ह्म०; उ० आमचें एकदां रामायण संपूंद्या मग तुह्मी दुसरी गोष्ट काढा.

**रामेठा**, पु० रामाठा.

**राय**, पु० राव.

**रायऑवळा**, पु० एक फळ आहे.

**रायऑवळी**, स्त्री० रायऑवळ्याचें झाड ती.

**रायकेळ**, स्त्री० दे० केळीचे झाडांत एक भेद आहे; २, न० तिचें जें केळें तें.

**रायतें**, न० काळें, आंबे, आवळे, इ० पदार्थांस दहीं, मोहरी, इ० पदार्थ घालून तोंडी लावणें करितात तें.

**रायदिंडा**, पु० दिंडयांत एक भेद आहे.

**रायपुरीसाकर**, स्त्री० पिठीसाकरेंत एक भेद आहे ती.

**रायपुरीसाखर**, स्त्री० रायपुरीसाकर.

**रायभोग**, पु० एक भातांत जाति आहे.

**रायवळ**, ३ लिं० साया, शिंसव, खैर, फणस या वृक्षांवांचून गृहाचेउपयोगीं इतर वृक्षांचीजी लांकडें तो; २, कोणाचे मतें साया, आणि शिंसव, यांवांचून इतर वृक्षांचीं लांकडें तो; ३, लावणीचा नव्हे, दरसाल नव्हे, असा खव्याजो आंबा, आंवळा, जांभूळ, इ० तो.

**रायवळी**, ३ लिं० रायवळ लांकडाचें जें गृहादिक तो.

**राया**, पु० फकडजे पुरुष ते डौलानें आपल्यास ह्मणवितात.

**राव**, पु० राजा; याचा मुख्यार्थी ग्रंथादिकांत प्र०; उ० ह्म० राव नेणें रुकवळ दुकळ; २, लोकांत प्रा० कारकुनी, किं० शिपायगिरी, या गुणानें प्रसिद्धजे पुरुष त्या पुरुषांचे नामापुढें प्रतिष्ठानाम हें लागत असतें; उ० बळवंतराव, माधवराव, इ० कदाचित् केवलाचाही प्र० होतो; उ० कायराव सांगावें तुह्मी काल नवतां मोठी मौज झाली; ३, शूद्रामध्यें मराठे ह्मणूनजी जाति आहे तो.

**रावकी**, स्त्री० रावपणा; उ० याला हणमंतराव ह्मणून सारे हाक मारितात याला रावकी कोणी दिली.

**राववडा**, ३ लिं० उपजतच ज्याचा ओंठ विदीर्ण झाला असतो तो मनुष्यादि तो; किं० त्याचा ओंठ; २, ला० मंडळ, चतुरस्र, इ० विवक्षिताकार जें क्षेत्रादिक त्याचा यत्किंचिदंश कमी झाल्यामुळें जें विशोभित दिसूं लागतें त्यास ह्म०; उ० या पारव्यास कवलें लावलीं तीं चार ओळी कमी आलीं त्यामुळें पारवें राववडें दिसतें; सगळें सारखून थोडेसा

कोंपरा बगव्यास त्यामुळें रावखंडे दिसतें.

**रावजी**, पु॰ पुरुषाचें एक प्रतिष्ठा नाम आहे.

**रावटी**, स्त्री॰ राजादिक मार्गादिकांचा ठायीं रहायाकरितां जें वस्त्र निर्मित गृह करितात ती.

**रावण**, पु॰ पुराणप्रसिद्ध एक राक्षस होता; म्ह॰ रावणास भिकेचे डोहळे; २, ला॰ शरीरानें मोठा जो टोणगा, बोका, इ॰ त्यांस निंदेनें म्ह॰

**रावणफळ**, न॰ एक फळ आहे.

**रावणाचीखाई**, स्त्री॰ जो पदार्थ मिळवावा तितका खपला जातो आणि पूर्तता होत नाहीं असा जो संसार, इ॰ त्यास म्ह॰; उ॰ संसार ही रावणाची खाई आहे जो पदार्थ आणावा तो गर्क होतो.

**रांवा**, पु॰ राघू; २, संकेतानें रावखंडयास म्ह॰

**रांवेरी**, स्त्री॰ तांबडये रंगाचें एक वस्त्र आहे.

**राव्हटी**, स्त्री॰ रावटी.

**राश**, स्त्री॰ राशिशब्दाचा अपभ्रंश.

**राशघटित**, न॰ राशिघटित.

**राशि**, पु॰ सं॰ नक्षत्रचक्राचे मेषादि जे द्वादश ते प्र॰; २, धान्यादिकांचा जो ढीग तो; ३, गुणन, भजन, इ॰ करण्याविषयीं विवक्षित संख्याबोधक मांडिलेला जो अंक तो; राशीस लागणें, राशीस बसणें, इ॰ स्थलीं कोणा एकाचा खणपटीस बसणें; किं॰ हात धुऊन पाठीस लागणें.

**राशिकूट**, न॰ घटित पाहण्याचे उपयोगीं जो वधूवरांचे परस्पर राशींचा अनुकूल, प्रतिकूल, भाव तें.

**राशिघटित**, न॰ वधूवरांचें जें घटित तें.

**राशिचक्र**, न॰ सं॰ मेषादि द्वादश राश्यात्मक जें चक्र तें.



**राशी**, ३ लिं॰ रासवट, ढंडास म्ह॰

**राशीसुंजीस**, अ॰ रा॰ येणें याचा योगीं प्र॰ अ॰; वरचेवर उत्पन्न होतें, मिळतें, जें द्रव्यादि तेणेंकरून अवश्य कर्तव्य खर्च भागून तें द्रव्यादि कांहीं सांठ्यास पडणें.

**राष्ट्र**, न॰ राज्यभेदानें किं॰ कोंकण, मध्यदेश, करनाटक, इ॰ संज्ञाभेदानें भिन्न भिन्न जे देश ते प्र॰, किं॰ विवक्षित सीमेनें परिछिन्न जो भूमिभाग तो; उ॰ यंदा आमचा तिकडल्या त्या राष्ट्रांत पाऊस पुष्कळ पडला; पहा त्या पोरानें सगळ्या राष्ट्रभर खरकटें उडिवलें; नदीपासून डोंगरपर्यंत सारें राष्ट्र आह्माकडे आहे; २, कोणेक स्थलीं जमलेला सैन्यादिरूप जो संघात तें; उ॰ साकरेचा भोंवतीं पहा कसे मुंग्याचें राष्ट्र जमलें आहे.

**रास**, स्त्री॰ राशि प्रथम द्वितीयार्थीं; २, चांगला आणि वाईट अशा विभागाची निवड न करितां सरमकट जो कोणेक पदार्थाचा ढीग ती; उ॰ तुह्मी अंबे निवडून घेणार तर सवा दोन रुपयानीं मिळतील, आणि रास घ्याल तर रुपयानें; ३, पु॰ सं॰ एका पुरुषानें अनेक स्त्रियांसहवर्तमान करायाची एक शृंगार क्रीडा आहे.

**रासकर्दन**, न॰ एक दागिना. इ॰ मोडून दुसरा दागिना, इ॰ कांहीं केलें असा व्यवहार झाला असतां मोडेलें तें खर्चीं लिहून नवें केलें तें जमेस धरावें असें एक जमाखर्च लिहिण्याचें प्रकरण आहे तें.

**रासकूट**, न॰ राशिकूटाचा अपभ्रंश.

**रासघटित**, न॰ राशघटित.

**रासनाहणें**, न॰ विवाहामध्यें वरपक्षीय स्त्रियां

सजें समारंभपूर्वक नहाणं-म्हालीत असनात तें.

रासन्हाण, रासन्हाणें, न० रासनाहणें.

रासभ, पु० सं० गर्दभ.

रासमाथां, अ० शेतांची मळणी काढून रास सिद्ध झाली त्य० अव्यवहित उत्तरकाळीं सावकार, इ० कांचे रुपये, इ० देणें, वारणें, घेणें, इ० वि०; उ० तुह्मी आज मला रुपये द्या हे रासमाथां सव्याज देऊं.

रासमाथ्यास, अ० रासमाथां.

रासवट, ३ लिं० केवळ निवडक चांगला असा नव्हे आणि केवळ निकृष्ट नव्हे असा मध्यमप्रतीचा जो पदार्थ तो; उ० केवळ इरसाल आंबे नकोत रासवट असले तरीं चालतील; ही मुलगी आपली रासवटच आहे.

रास्त, ३ लिं० न्याय्य जें भाषण, कृति, व्यवहार, इ० तो. किं० प्रामाणिक जें वजन, माप, इ० परिमाण तो.

रास्ता, पु० लुगडयांत एक भेद आहे.

रास्ती, ३ लिं० रास्त.

रास्ना, पु० एक औषधी आहे.

राहणें, मनुष्यादिअर्थानें कोणेक अधिकरण स्वस्थितीनें आक्रमून त्याचाठायीं स्थिर होणें; उ० अह्मी सांप्रत काशींत राहतों; एका बोटावर काठी करवी राहील; २, पात्रादिरूप जें समावेशस्थान त्याचाठायीं कोणेक पदार्थानें समाविष्ट होणें; उ० या दोनींत अच्छेर शाई राहील; ३, सतत चाललें जें कांहीं एक त्याणें बंद होणें; उ० पाऊस राहिला त्य० तुझ्या पोटांतील तिडीक राहील; कपाळ राहिलें, पोट राहिलें, इ० स्थलीं त्यांतील वेदना राहिली असा अर्थ; ४, कोणेक कामानें अंशतः होऊन अवशिष्ट अंशानें किं० सर्वांशानें भवितव्यतावस्था जें त्य० हें व्हावयाचें आहे अशीजी अवस्था त्या अवस्थेंत पडणें; उ० वाडयाचें काम अर्धें झालें अर्धें राहिलें; यंदा त्यांचें लग्न होणार होतें पण राहिलें; ५, उरणें; उ० शंभर रुपयांतून चार रुपये राहिले; ६, कोणेक कार्याचेठायीं प्रवृत्त होण्याचा प्रसंग असतांही कोणेकानें कांहीं कारणामुळें प्रवृत्त न होतां तसेंचेंतसेंच असणें; उ० तूं शिवी दिलीस तर तो तोंडांत मारल्याशिवाय राहणार नाहीं; हातराहणें, पायराहणें, तोंड राहणें, इ० स्थलीं तें तें इंद्रियादि स्वस्वव्यापारीं असमर्थ होणें; शक्ति राहणें, इ० स्थलीं शक्तिक्षीण होणें; अन्न राहणें, इ० स्थलीं अन्न जाईनासें होणें.

राहित्य, न० रहितपणा.

राहु, पु० नवग्रहांतील आठवाजो ग्रह तो; राहुग्रस्त, इ० स० जाणावे.

राहुटी, स्त्री० राबटी.

राहुपर्व, न० ग्रहणरूपजें पर्व तें.

राहूनराहून, अ० एकसारखा सतत नव्हे मध्यें कुंठित होतहोत; कोणेक क्रियेनें करणें, होणें, इ० क्रियाचें वि०; उ० या नक्षत्राचा पाऊस एकसारखा लागत नाहीं राहूनराहून पडतो.

राहोटी, स्त्री० राहुटी.

राळ, स्त्री० डिकासारिखा एक औषधी पदार्थ आहे जो अग्निसंयोगानें फारत्वरित पेटतो ती; २, एक क्षुद्रप्राणी आहेजो रात्रीस फिर्रे असा सतत ओरडत असतो ती; ३, फरफजीती.

राळा, पु० एक धान्य आहे.

**राक्षशी**, ३ लिं० राक्षसी प्रथमार्थी.

**राक्षस**, पु० देव,मनुष्य, यांचा स्पर्धा करणारा तामस उग्रस्वभावाचा एक देवयोनींत भेद आहे तो; २, क्रूर, भयंकर, साहसिक, फार खाणारा, असा जो मनुष्यादि त्यास आरोपानें म्ह०; ३, साठ संवत्सरांतील जो एकुणपन्नासावा तो.

**राक्षसगण**, पु० जन्मनक्षत्रावरून पतिनाक्षत्रयोगी गण म्हणून कांहीं फलविशेष येत असतो त्यामध्यें भरणी, कृत्तिका, आश्लेषा, मघा, चित्रा, विशाखा, ज्येष्ठा, मूल, शततारका, यां नऊ नक्षत्रांवर जो जन्मला त्याचा जो गण तो.

**राक्षसगणी**, ३ लिं० राक्षसगण आहे ज्याचा तो.

**राक्षसवेळ**, स्त्री० केवळ तिनसांजाची जी वेळ तीस म्ह०

**राक्षसवेळा**, स्त्री० राक्षसवेळ.

**राक्षसी**, ३ लिं० राक्षससंबंधी जी माया, योनि, इ० तो; २, ला० घोर साहसविशिष्ट जें कर्म, उपाय, तामस जें खाणें, इ० तो.

**राक्षसीवेळ**, स्त्री० राक्षसवेळ.

**राक्षसीवेळा**, स्त्री० राक्षसवेळा.

**राज्ञी**, स्त्री० सं० राणी.

**रिकबी**, स्त्री० रिकिबी

**रिकवणें**, कोणेक पदार्थानें भरल्यामुळें अनवकाश झालेलें पात्र रिकतें त्या पदार्थाचा वियोगानें सावकाश करणें.

**रिकामका**, ३ लिं० रिकामा.

**रिकामचावडी**, स्त्री० रिकामचोर मनुष्यांची चकाट्यापिटीत बसायाची जी जागा ती, अथवा तो समुदाय ती.

**रिकामचेष्टा**, स्त्री० करावयाचा उद्योग सोडून रिकामा कोरडा जो व्यापार त्या.

**रिकामचोंट**, पु० निरुपयोगी मनुष्यादिकांस निंदेनें म्ह०; २, कार्याचाठायीं विनियुक्त न होतां उगीच पडलेला जो पदार्थ तो.

**रिकामटवळा**, ३ लिं० रिकामचोंट

**रिकामपण**, न० एका कार्याखालीं न गुंतल्यामुळें कार्यांतरीं अन्वित होण्यास मनुष्यादिकांस जी कालकृत सावकाशता असत्ये तें.

**रिकामपणा**, पु० रिकामपण.

**रिकामवेळ**, स्त्री० अवश्य कर्तव्य कार्याखालीं गुंतलेली नव्हे अशी रिकामी जी वेळ ती.

**रिकामा**, ३ लिं० कोणेक कामावर गुंतलेला नव्हे अतएव कार्यांतरीं लागण्याविषयीं जो मोकळा तो; उ० चोयाला चाकरी लागली मी मात्र रिकामा आहें; तुमचा चाकू रिकामा झाला म्ह० मला अंमळ द्या; २, आधेयाचा संनिवेशानें गुंतलेलें नव्हे कि० निरवकाशपणें भरलेलें नव्हे अतएव आधेयांतराचा सन्निवेशास उचित जें अधिकरणभूत पात्र, स्थल, वाहन, काल, इ० तो; उ० हीं दोन रिकामींच आहेत ईंत शाई घाल; विहीर अजून चार हात रिकामी आहे; ३, जा कार्याविषयीं प्रवृत्त व्हायाचें त्या कार्याचे साधनभूत जे द्रव्यादि पदार्थ तद्रहित जो मनुष्य तो; उ० जवळ पैसा नाहीं रिकामा बाजारांत जाऊन काय करूं; रिकामा जाणें कि० येणें, म्ह० उद्दिष्ट कार्य केल्यावांचून जाणें, येणें; उ० मी तुला न्यायाला आलों तो घेतल्याशिवाय रिकामा जाणार नाहीं;

यजमानाकडे गडी पाठविला होता पण तें भेटले नाहींत तेव्हां गडी रिकामा माघारा आला; ४, प्रयोजन शून्य किं० फळशून्य, जो भाषणादिव्यापार; खर्च वेच, इ० तो; उ० तूं मध्यें रिकामें कशाला बोलतोस; रिकाम्या हातानें किं० रिकामेहातीं स्त्र० जें कार्य करायाचें त्यास जें साधन पाहिजे असतें तें हातीं असल्यावांचून तें कार्य करणें किं० कार्यार्थ जाणें, येणें, इ० कांचें वि० किं० रिक्तहस्तपणें राजा, देवता, इ० कांचे दर्शनार्थ जाणें, येणें, इ० कांचे वि०; उ० मी आजपर्यंत रिकाम्याहातीं संसार केला, स्त्र० हातीं द्रव्य नसतां; उ० रिकामे हातानें कां देवास जातोस फुलें वा कांहींतरी घेऊनजा रिकामे पोटीं स्त्र० भोजन न केल्यामुळें पोट रिकामें असतां कांहीं काम करणें इ० कांचे वि०; उ० जेवल्यावर चालावें यापेक्षां रिकामें पोटीं चालावें हें बरें.

**रिकिबी**, स्त्री० घोडे किं० सांड, यांजवर बसलें असतां पाय अडकवायासाठीं लोहादिकांचीं आकारविशेषाचीं दोन वलयें दोहींकडे बांधित असतात तीं प्र०

**रिकीब**, स्त्री० रिकिबी.

**रिकीबदाल**, पु० हिं० तंगास रिकिब्या बांधायाचें रज्जुरूप साधन असतें तो.

**रिकीबी, रिकेबी**, स्त्री० हिं० रिकिबी.

**रिक्त**, ३ लिं० सं० रिता.

**रिक्तकोष्ठ**, न० सं० आंत अन्नांश, मलांश, नाहींसा झाल्यामुळें रिकामा जो पोटाचा कोठा तो.

**रिक्तपाणि**, ३ लिं० सं० ज्याचे हातांत फल, पुष्प, द्रव्य, इ० कांहीं नाहीं असा जो मनुष्य तो; राजा, देवता, इ० कांचे दर्शनार्थ गमनोद्देश असतां प्रा० प्र०

**रिक्ता**, स्त्री० सं० चतुर्थी, नवमी, चतुर्दशी या तिथी प्र०

**रिंगणी**, स्त्री० एक ओषधी आहे.

**रिंगणें**, न० रिंगणीचें जें फल तें; २ घोडाचें खेळणें आहे.

**रिंगी**, स्त्री० रा० रिठ्याचें जें झाड तें.

**रिंगें**, न० रा० रिंगीचें फळ तें.

**रिघणें**, मनुष्यादिकांची दाटी, इ० कारणामुळें अडचणीची जी जागा तीमध्यें कोणेक पदार्थानें बलानें अवकाश करून प्रविष्ट होणें; २, रा० सूरण, कोन, रताळें, इ० कंदानीं भूमीमध्यें विस्तरून स्थिगित होणें.

**रिघाव**, पु० अडचणीचे स्थळीं बलानें किं० युक्तीनें जो प्रवेश तो.

**रिचवणें**, धान्य, पाणी, इ० कानें भरलें लें जें पात्र तें तें धान्यादिक पात्रांतराद्यधिकरणीं ओतून रिकामें करणें; पक्षींत्या धान्यादिकांसही कर्मता; २, कों० लांकडें, दगड, विटा, वस्त्रें भांडीं, इ० रूप जो पदार्थ समुदाय तो कोणेक अधिकरणीं गर्भिभन्न होऊन राही असा ठेवणें; उ० घरांतलीं सारीं पांघुरणें गोळा करून बाजेवर नेऊन रिचवलीं.

**रिझणें**, कोणेक विषय मनास आल्यामुळें तद्विषयीं हा घ्यावा, भोगावा, इ० रूप जो अंतःकरणांत भाव होतो, तद्विशिष्ट कोणेकानें होणें; उ० त्या पागोट्याचा रंग भडक दिसतो त्याजवरच रिझूं नका कांहीं सूतपोत पहा.

**रिझाऊ**, ३ लिं० दुसऱ्यास रीझ उत्पन्न करणारें जें गान, स्वरूप, गोड भाषण करणारा मनुष्य, इ० तो.

रिठा, पु॰ एक झाड आहे व त्याचें फल तो.

रिठी, स्त्री॰ कों॰ रिठासारखें झाड ती.

रिठें, न॰ रिठीचें जें फल तें.

रिणकरी, पु॰ ऋणकरी.

रिणानुबंध, पु॰ ऋणानुबंधाचा अपभ्रंश.

रिणायितस्वरूपी, ३ लिं॰ ऋणाइतस्वरूपी.

रिणायीत, ३ लिं॰ ऋणायीत.

रिणी, ३ लिं॰ ऋणी.

रिता, ३ लिं॰ रिकामादितीयार्थी; २, प्राकृत ग्रंथांत अर्थानें रहितजो अधिकरणरूप पदार्थ तो त्या अर्थानें; उ॰ सरस असोचि मधुपबहु मतजरिहिरंगें करूनि कुंद रितें.

रिताड, स्त्री॰ पेठ, बंदर, इ॰ कांचाठायीं बाहेरून आणलेला माल टाकून पुनः तेथील माल न भरितां रिकामे चालले जे बैल, गलबतें इ॰ ती; २, मालभरून किं॰ एरवींच रिकामे माघारे चाललेजे बैल, गलबतें, इ॰ त्यांस म्ह॰; ३, कों॰ रहाटाचे मालेचे रिकामे होऊन पुनः पाणी भरावयास खालीं चाललेलेजे ओरे ती; ४, पोटाचाजो अन्नांशाचा अभावासुळें रिकामेपणा ती.

रिपरीप, स्त्री॰ दे॰ पिरपीर.

रिपार, पु॰ न॰ कों॰ रिपानी केलेंजें ग्रहादिकांस ओमणतें ती.

रिपु, पु॰ सं॰ अरि.

रिवरिवणें, रवरवणें.

रिवरीव, स्त्री॰ रवरव.

रिसालदार, पु॰ हिं॰ रिसाल्याचाजो अधिकारी तो.

रिसालदारी, स्त्री॰ रिसालदारपणा ती.

रिसाला, पु॰ हिं॰ राजादिकानें चाकरीस ठेऊन एके अधिकाऱ्याचे स्वाधीन केलाजो घोडेस्वारांचा समुदाय तो.

री, स्त्री॰ लावणी इ॰ कांचे स्वरपूरणार्थ पाठीमागून रीहा शब्द उच्चारूनजो सूर देतात ती.

रीग, रीघ, पु॰ स्त्री॰ रिघाव; २, रिघाव व्हावयाजोगाजो अवकाश ती तो; उ॰ अशी दाटी झाली आहे कीं आंत बोट शिरकायाला देखील रीघ नाहीं.

रीज, रीझ, स्त्री॰ कोणेक विषयावर अंतःकरणाची असन्येजी सादरता ती.

रीण, न॰ ऋणाचा अपभ्रंश

रीत, स्त्री॰ रीतिशब्दाचा अपभ्रंश.

रीतभांत, स्त्री॰ रीत, इ॰ ती.

रीतरवेस, पु॰ स्त्री॰ रीतभांत.

रीति, स्त्री॰ बोलणें, चालणें, इ॰ व्यापारमात्र करायाचे देशभेद, कर्तृभेदादि प्रयुक्तजे निरनिराळे अनेक प्रकार ते म्ह॰; २, प्रकारादि भेदेंकरून भिन्न भिन्न जे वर्तनप्रकार ते म्ह॰; उ॰ तूं आल्या मनुष्यास शिव्या देतोस ही रीति वाईट.

रीप, स्त्री॰ ओमण करायासाठीं लांकूड चिरून पातळजी पट्टी करितात ती.

रीस, न॰ आस्वल, २, ला॰ आळशी, मलिन, असाजो मनुष्यादि त्यास निंदेनें म्ह॰; ३, दे॰ चीड.

रींस, न॰ रीस प्रथम द्वितीयार्थी.

रुइफल, न॰ छीट, इ॰ वस्त्रावर किं॰ लुगडें, इ॰ कांचे कांठावर किं॰ कंगण्याइ॰ अलंकार, इ॰ कांवरजे रुईचे फुलासारिखे अलंकार विशेष उठविले असतात

सतात ते प्र०

रुई, स्त्री० एक झाड आहे; २, रू; ३, चाजबीजी रीत ती परंतु या अर्थी प्रथमांत प्र० नाहीं; उ० तुह्मी रुईची गोष्ट सांगितली असतां ऐकणें प्राप्त; तोजेव्हां जबरदस्ती करूं लागला तेव्हां सर्कारांत जाणें रुईस आलें.

रुईमांदार, पु० रुईचे झाडासारिखेंच झाड असून ज्याचीं फुलें रुईचे फुलांपेक्षां स्वच्छ पांढरीं असतात तो.

रुका, पु० आण्याचाजो द्वादशांश तो; २, भूमि मोजायाचें एक प्रमाण आहे.

रुकार, पु० कांहींएक करण्याविषयीं कोणेकाचे अनुमताचा बोधकजो त्याचे मुखानें हूं, कर, होय, बरें, आहे, इ० रूपजो शब्द निघतो तो; याचें तात्पर्य आहे. अनुमनावरून म्हणून मानेनें हातानेंजरीं अनुमताविषयीं संज्ञाकेलीतरीं त्यास ह्म०; २, जमाखर्चाची अनेक कलमें किं० मनुष्यादिकांचीं नामें, इ० जीं क्रमानें लिहिलीं असतात त्यांस रुजूवात, इ० संस्कारकर्तव्य असतां जाजा स्थानीं तो संस्कार झाला त्यात्या स्थानीं तद्बोधक जें रु असें अक्षररूप चिन्ह करितात तो.

रुक्का, पु० रुका.

रुकसत, स्त्री० हिं० रुखसत.

रुखय, स्त्री० कों० एक किरडूं आहे जें प्रायः वृक्षावर असतें ती.

रुखरूख, स्त्री० कांहींएक वस्तु हारवली, इ० कारणामुळें कोणेकाचे अंतःकरणास जी चटपट लागती ती.

रुखवत, न० वरप्रस्थानाचे पूर्वी वरास कन्येचा बापाकडून समारंभपूर्वक फराळाची, इ० सामग्री आणितात ते; २, तें फराळाचें, इ० वरापुढें ठेऊन त्याजकडून फराळ करवितात असाजो समारंभ करितात तें; क० तो समारंभ वरप्रस्थानानंतर वधूमंडपांतही करितात.

रुखा, ३लिं० कों० रुक्षजो भक्ष्यपदार्थ, स्थल, भाषण, कंठस्वर, इ० तो.

रुखाडी, ३लिं० वृक्षावर चढण्याविषयींजो सराईत तो.

रुखाड्या, ३लिं० कों० रुखाडी.

रुखाळूं, न० अळवांत एक भेद आहे जें वृक्षावर उगवत असतें तें.

रुख्या, ३लिं० कों० रुखाडी.

रुखसत, स्त्री० रजा; परंतु प्रायः प्रथमार्थावांचून.

रुंगाळा, ३लिं० शरीरानें कृशजो मनुष्यादि तो.

रुग्ण, ३लिं० रोगग्रस्त.

रुचकर, ३लिं० रुचिकराचा अपभ्रंश.

रुचणें, कांहींएक पदार्थ किं० गोष्ट आवडणें; उ० मीन त्यजितां नेलो भूपबळें तुज रुचेल तरि जागे; २, कोणेक गोष्ट यथायोग्य झाल्यामुळें शोभणें; उ० तुह्मी पिढीचे भट तुह्मी प्रसंगीं भिक्षा मागितली तरीं रुचेल पण आह्मा गृहस्थाला लोक हांसतील; ३, रुतणें.

रुचि, स्त्री० सं० पदार्थनिष्ठजी गोडी ती; २, रसनेंद्रियास असत्येजी चव ती; ३, कोणेक पदार्थ, कर्म, इ० विषयांवर आवड ती; ४, कांति.

रुचिक, पु० रुई म्हणून जें झाड त्याचा औषधार्थ काढितात जो चीक तो.

रुचिकर, ३लिं० सं० ज्याचे भक्षणानें रसनेस आलेली

अरुचि

अरुचिआल्यें असाजो आंवळा, महाळुंग, सैंधव, इ॰ पदार्थ तो किं॰ भक्षिलाअसतां चांगला लागतो असाजो मधुराम्ल, क्षाराम्ल, इ॰ पदार्थ तो.

**रुचिर**, ३ लिं॰ सं॰ सुंदर.

**रुचीक**, ३ लिं॰ रुचिकरजो पदार्थ तो; २, रुईचाजो चीक तो.

**रुच्य**, ३ लिं॰ रुचिकर प्रथमार्थी.

**रुजणें**, धान्य, कंद, इ॰ रूपजें बीज त्याणें अंकुरविशिष्ट होणें.

**रुजामा**, पु॰ बैठकीचा उपयोगीं पोटी रू घालून शिवून मोठें जें वस्त्र करितात तो.

**रुजऊमुकाबला**, पु॰ हिं॰ उभयतांचे भाषणादिकांचा खरेखोटेपणा किं॰ उभयपदार्थांचा चांगलेपणा, वाईटपणा, इ॰ समजावे म्हणून ताडून पाहायाकरितां त्याचें करितातजें संमुखपणें संनिधान तो.

**रुजऊवात**, स्त्री॰ विवादविषय किं॰ संशयविषय जो परस्परांचें देणें, घेणें, इ॰ रूप कांहीं अर्थ तन्निर्णयार्थ त्या परस्परांचें तद्विषयीं साक्षात् संभाषण व्हावयाजोगीजी त्यांची समक्षता ती; २, कोणेक कागदपत्राचा लेखाचा खरेपणा, खोटेपणा, इ॰ पाहायासाठीं लेखांतराशीं ताडून पहावें म्हणून त्यात्यालेखाची करितातजी समक्षता ती; रुजुवात घेणें म्ह॰ यादीवर लिहिलेले किं॰ तोंडानें सांगीतलेलेजे पदार्थ, कलमें, इ॰ ते समक्ष ताडून पहाणें.

**रुजऊवाती**, ३ लिं॰ कों॰ रुजऊवात घ्यायाची आहेजाची असेंजे कलम, नावनिशी, रकम, इ॰ तो.

**रुजू**, ३ लिं॰ विवक्षित काम करण्याविषयीं जाकडून अनमान नाहीं असाजो तो; उ॰ तुह्मी सांगाल तें करा; धासमी रुजू आहे; २, चाकरी, इ॰ कामावर किं॰ सर्कार, इ॰ अधिकरणीं जो हजीर तो; होणें, करणें यांच्यायोगीं प्र॰; उ॰ मी काल च्याकरीवर रुजू झालों; तुह्मी चोर धरलेत ते सर्कारांत नेऊन रुजू करा; तुह्मी एथें निरोप घ्या पण पंधरावे दिवशीं पुण्यांत मजपाशीं रुजू व्हा; ३, कोणेक अधिकरणस्थजी ग्राह्यकोटी तीमध्यें लेखादिद्वारा गृहीत जो तो; होणें, पडणें, इ॰ कांचा योगीं प्र॰; उ॰ मूर्खावर उपकार केलाअसतां व्यर्थ ह्मणतां परंतु ईश्वरासतर रुजू पडेल; तुह्मी पन्नास रुपये बाकी आह्माकडे काढलीतपण ती आह्मास रुजू नाहीं; याचे नाव सर्कारचे यादीस रुजू आहे कीं नाहीं तें पहा, तुह्मीजें आज बोलाल तें तेथें रुजू पडेल.

**रुजूगुदस्त**, ३ लिं॰ गुदस्तवह्निवाटीस रुजूजो व्यवहार तो.

**रुजूमुकाबला, रुजूमोकाबला**, पु॰ हिं॰ रुजऊमुकाबला.

**रुझणें**, रुजणें.

**रुझवण**, न॰ कों॰ रुझायाकरितां भूमींत लाविलें जें बीज फलादि तें व तें रुझून झालाजो अंकुरसमुदाय तें.

**रुदुखुदू**, अ॰ केवळ झपाट्यानें नव्हे, केवळ अगदीं स्तब्ध होऊन राहिलें असें नव्हे, अशा प्रकारें खरामरी मंदपणें, कोणेक गोष्ट, मनुष्य, इ॰ कांचें चालणें, इ॰ कांचे वि॰; उ॰ देवळाचें काम आतां रुदुखुदूच चाललें आहे; कोणेकानें रुदुखुद करणें म्ह॰ सांगायाजोगा मोठा कामधंदा, इ॰ न करितां पोटापुरते अनेक किरकोळ व्यापार करणें.

**रुंड**, न० मनुष्यादिकांचें तोडलेलेंजें शिर तें.

**रुंढ**, स्त्री० रा० उचला; २, न० रुंड; एकघाव आणि दोन रुंढें, इ० स्थलीं मनुष्यादि शरीराचे दोन जे तुकडे ते प्र० असा अर्थ

**रुढणें**, कोणेक गोष्ट कोणेक रुपें लोकप्रसिध्धीस येणें; उ० रामशिंगाचे पोरानें चोरी केली असें सगळ्या गांवभर रुढलें.

**रुणझुणणें**, पैंजण, इ० भूषणानीं रुणझुण अशा शब्दानें वाजणें.

**रुणझुण**, अ० अनु० तोरड्या, पैंजण, इ० कांचे वाजण्याचें वि०

**रुणरुणणें**, रा० वेगानें चाललेलाजो गोफणेचा दगड, बंदुकेची गोळी, इ० कानें वाजणें.

**रुणा**, पु० कों० हृद्रोग.

**रुतण**, स्त्री० रुपण.

**रुतणें**, कठिनजो पाषाणादि पदार्थ तो शरीरादि मृदुपदार्थाशीं घट्टसंबंधझाल्यामुळें त्यातें फोडून किं० चेपून आंत शिरणें; उ० पायांत कांटा रुतला; भुईवर निजलेंम्हणजे अंगास खडे रुततात; चिखलांत गाय रुतली आहे कादालतर पहा.

**रुतू**, पु० ऋतुशब्दाचा अपभ्रंश.

**रुंद**, ३लिं० रुंदीनें विशिष्टजो पदार्थ तो.

**रुंदट**, ३लिं० विवक्षित रुंदीपेक्षां जाची रुंदी अधिक तो पदार्थ तो.

**रुदन**, न० रडण्याचाजो व्यापार तें.

**रुंदावणें**, शरीरादिक पूर्वरुंदीपेक्षां रुंद होणें किं० आकुंचित वस्त्रादिक पसरणें, इ० द्वारा रुंद करणें.

**रुंदावा**, पु० रुंदपणा.

**रुदित**, न० सं० रुदन.

**रुंदी**, स्त्री० क्षेत्रवस्त्रादिजो साकारपदार्थ त्याचे लांबीचेंजें सूत्र त्याजवर आडवें सूत्र या पर्यंतापासून त्यापर्यंतापावेतों मारिलें असतां त्या सूत्रानें परिछिन्न होतोजो त्या क्षेत्रादिकांचा परिमाण विशेष ती.

**रुद्रगांठ**, स्त्री० लुगडें, दोरखा, इ० कांवर विणकरीलच चवकडी सारखीं चिन्हे उठविलीं असतात तीं प्र०

**रुद्रगांठी**, ३लिं० रुद्रगांठीनीं विशिष्टजो दोरखा, स्त्रियांचें लुगडें, इ० वस्त्र तो.

**रुद्रपिशाच**, पु० काशींत मेलेलाप्राणी काशींत केलेलें पाप भोगायासाठीं पिशाचदेह धारण करितो तो, २, ला० शीघ्रकोपी, अविचारी, जो मनुष्य त्यास म्ह०

**रुद्रभूमि**, स्त्री० मसणवटी.

**रुद्रवात**, स्त्री० अकरास्कतांचीजी वात करितात ती.

**रुद्रविणा**, पु० विण्यांत एक भेद आहे.

**रुद्रावतार**, पु० फारक्रोध आल्यामुळें भयंकर झालेंजाचें स्वरूप त्यास म्ह०

**रुद्राक्ष**, पु० एकवृक्षबीजरूप शिवप्रिय मणि आहे तो, जाचें मालादिरूपें करून शिवभक्त शरीरावर धारण करितात तो.

**रुंध**, ३लिं० रुंद.

**रुंधट**, ३लिं० रुंदट

**रुधणें**, कांहीं आधेयाचे समावेशानें पात्रस्थलाद्यधिकरणभूत पदार्थ त्या आधेयाकडे गुंतणें किं० मनुष्यादि कोणी व्यापारांतराचे उपयोगीं न पडे असा कोणेक व्यापाराकडे गुंतणें.

**रुधावणें**, रुंदावणें.

**रुंधावा**. पु॰ रुंदावा.

**रुधिर**, न॰ सं॰ शरीरांतील जें रक्त तें.

**रुधिरोद्गारी**, पु॰ साठ संवत्सरांतील जो सत्तावन्नावा तो.

**रुंधी**, स्त्री॰ रुंदी.

**रुद्ध**, ३ लिं॰ सं॰ कांहीं कारणानें रोध पावला जो मार्गादि तो.

**रुपडें**, न॰ प्रा॰ ग्रं॰ प्र॰ पुरुषादिकाचें फार सुंदर जें रूप तें.

**रुपण**, स्त्री॰ वरचालले असतां मनुष्यादि आंत रुपून गर्क होतो असें जें चिखलानें किं॰ रेतीनें विशिष्ट जें स्थल ती.

**रुपणें**, रुतणें.

**रुपया**, पु॰ प्रा॰ अकरा मासे वजनाचें एक रुप्याचें नाणें आहे.

**रुपा**, ३ लिं॰ मुळचें आंग पांढरें असून ज्यावर तांबडे रंगाचे किं॰ काळे रंगाचे ठिपके असतात असा जो बैल, इ॰ तो; २, पु॰ रुपया.

**रुपाया**, पु॰ रुपया.

**रुपें**, न॰ एक धातु आहे; २, चंग, कांचन, गंजीफांत एक रंग आहे.

**रुपेरी**, ३ लिं॰ रुप्याचें वर्ख किं॰ त्या वर्खाची शाई, किं॰ मुलामा तो, अथवा तद्विशिष्ट जो पदार्थ तो.

**रुपेरीकौंटा**, पु॰ संकेतानें बाभळीचे कांट्यास म्ह॰

**रुबेरूब**, अ॰ उरूबुरू.

**रुमणी**, स्त्री॰ नांगराचा हाक त्येसमयीं हातीं धरितात जो अवयव ती.

**रुमणें**, न॰ रुमणी.

**रुमामस्तकी**, **रुमीमस्तकी**, स्त्री॰ एक औषधी पदार्थ आहे ती.

**रुमाल**, पु॰ डोकीस बांधणें, कागदा भोंवता गुंडाळणें, लंगोटीसारखा नेसणें, इत्यादि अर्थ विणून किं॰ फाडून, किं॰ जोडून करितात जें प्रा॰ समचतुरस्र वस्त्र तो; २, त्या वस्त्रांत बांधिलेलें जें जमाखर्ची, इ॰ कागदांचें गांठोडें तो; ३, राजादिकांवर वारायाचें शेल्यासारिखें वस्त्र असतें तो.

**रुमाली**, अ॰ दे॰ डोकीवरून मुदगल फिरविण्याचा एक प्रकार आहे, तेणें विशिष्ट होई असें मुदगल फिरविणें, इ॰ कांचे वि॰

**रुमालीघडी**, स्त्री॰ चोळखण, इ॰ कांची तिकोनी जी घडी घालितात ती.

**रुमालीपाटी**, स्त्री॰ दोन तीन पायली दाणें मावायाजोग्या एक वेळयाचे पाटींत भेद आहे

**रुमाल्या**, ३ लिं॰ निरंतर डोकीस रुमालच बांधितो पागोटें कधीं बांधीत नाहीं असा जो मनुष्य त्यास म्ह॰

**रुमेमस्तकी**, स्त्री॰ रुमामस्तकी.

**रुयफूल**, न॰ रुइफूल.

**रुष्ट**, ३ लिं॰ कोण एकावर रागें भरला किं॰ रुसला तो.

**रुसका**, ३ लिं॰ कों॰ यत्किंचित् निमित्तावरून रुसण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**रुसणें**, मित्रादि जो कोणी आपला आप्त त्याणें कांहीं आपल्या मनास नये असें केल्यामुळें त्याणें ती चूक मागून घेऊन आपली समजी पाडावी, आर्जव करावें, इ॰ भावनापूर्वक जो कोप येत असतो

तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

**रुसवा**, पु० रुसलेपणा; उ० ते रुसले तथापि त्यांचा रुसवा तुह्मी जमेस धरूं नका.

**रुस्कन**, स्त्री० रुखसत.

**रुह**, ३ लिं० जा अधिकरणाचा ठायीं जो रुजलेला तो तद्रुह समासीं प्र०; उ० शिरोरुह ह्म० डोकीचे केश. सरोरुह ह्म० कमल, कररुह ह्म० नख, महीरुह ह्म० वृक्ष. इ०

**रुळणें**, ग्रं० शरीरावयवावर पैंजण, इ० भूषण. किं० केश, इ० कानीं शोभायाजोगें हालत असणें.

**रुक्ष**, ३ लिं० स्निग्धत्व ज्याचे आंगीं नाहीं असा जो पदार्थ तो हें सामान्यलक्षण; उ० मृत्तिकेपेक्षां वाळू रुक्ष ह्मणून तिचा पिंड होत नाहीं; ज्यास आमवायु असेल त्याणें रुक्षपदार्थ भक्षावे; २, जागोजाग पाणी ओलें वृक्ष, तृणें, इ० कें करून जी शोभा असल्ये तिणेंकरून रहित जो देश, ग्राम, इ० तो; ३, जेणेंकरून अंतःकरण रंजतें असा जो धर्मविशेष तद्रहित जें भाषण, गाणें, कंठध्वनि, इ० तो

**रू**, सरक्या काढलेल्या असा जो कापूस तो; २, न० गंजिफांचे पानाचें किं० दस्ताचें जें वुटलें अंग तें.

**रूख**, पु० को० वृक्ष शब्दाचा अपभ्रंश; २, रहाटाचे कणेकडाचीं टोकें ज्यांजवर टेकलीं असतात अशीं जीं दोन आडवीं लांकडें असतात तीं प्र०

**रूच, रूच**, स्त्री० रुचिशब्दाचा अपभ्रंश; परंतु चतुर्थीवांचून.

**रूढ**, ३ लिं० कांहीं अवयवार्थाचें भान नसतां अर्थविशेषाचाठायीं लोकरूढीस्तव वाचकत्वेंकरून वर्ततो किं० अवयवव्युत्पत्तीनें भासतो जो सामान्यरूप अर्थ तद्विशेषींमात्र लोकरूढीस्तव वर्ततो जो कोणेक शब्द तो; उ० गोठी हा शब्द घाटोळा जो दगड त्याजवर रूढ आहे; आंथरी या शब्दापासून आंथरायाची ती आंथरी अशा व्युत्पत्तीनें गादी, सतरंजी, इ० सर्व आस्तरणयोग्य पदार्थाचा बोध व्हावा परंतु हा शब्द रूढ आहे ह्मणून तृणादिनिर्मित पदार्थविशेषाचा मात्र बोध होतो; २, स्त्री० रूढिशब्दाचा अपभ्रंश.

**रूढि**, स्त्री० सं० कोणेक व्यवहाराचा किं० तत्संबंधी इतिकर्तव्यतादि विषयांचा लोकामध्यें चिरकाळ चालत आला असतो जो प्रचार ती; उ० आमचे देशांत अनंतव्रत करण्याची रूढि फार आहे; २, अमुक शब्द अमुक अर्थीं शक्त आहे, अशी जी लोकप्रसिद्धि असल्ये तद्रूप जें शब्दार्थाचें वाच्य वाचक भावाविषयीं प्रमाण ती.

**रूदार**, ३ लिं० ज्याचे आंत रू घातला आहे असा जो अंगरखा, दुलई, इ० तो.

**रूप**, न० चक्षुरिंद्रियानें ज्याचा साक्षात्कार होतो असा जो पदार्थनिष्ठ आकार आणि रंग मिळून विशिष्ट जो एक गुण तें; २, नाक, डोळे, इ० अवयवाचे ठेवणीचे भेदामुळें किं० वस्त्रालंकारादि धारण भेदामुळें जे शरीरादिनिष्ठ दृश्यता धर्माचे अनेक प्रकार घडतात ते प्र०; उ० या ह्मशीचीं शिंगें फार लांब पडलीं ह्मणून रूप वाईट दिसतें; ३, अर्थमात्राचे ज्ञानामध्यें अवच्छेदकपणें जो त्या अर्थाचा उपाधि भासतो ज्याचे भेदानें अर्थाचा भेद भासतो तें; उ० पदार्थ यद्रूप असतो तद्रूपेंकरूनच तो अंतःकरणांत भासतो; भावरूप पदार्थ सहा आणि

णि अभाव एक मिळून सात पदार्थ; पदामध्यें तंतु रूपानें कापूस राहतो; ४, पदार्थमात्राचे अंगीं विद्यमान बरेपणा, वाईटपणा. कुबकेपणा. नासकेपणा, इ० जे विवक्षित यावद्धर्म असतात तावद्धर्म वैशिष्ट्य जें त्या पदार्थाचे अंगीं असतें तें; उ० हा अंबा खाऊन पहावा तेव्हां याचें रूप समजेल; ५, कोणेक पदार्थ गोष्ट, व्यवहार, इ० कांपासून व्हावयाचें जें यथायोग्य फलादि तें झाल्यामुळें किं० त्याचे अंगीं यथायोग्य असावें जे सद्गुणादि तें असल्यामुळें जी त्या पदार्थादिकांतें जी शोभा तें; उ० चार रुपये मिळालेतर व्यवहार केल्याचें रूप नाहींतर काय; याचेघरीं मनुष्यानें जीव देऊन काम करूंद्या परंतु त्याकामाचें रूप व्हावयाचें नाहीं; लज्जा हें कुलस्त्रियाचें रूप होय; ६, नाम किं० धातु यांपुढें विभक्त्यादि अनेकप्रत्यय होऊन जे अनेक शब्दभेद होतात ते प्र०; ७, गणिता मध्यें एक म्हणून जी संख्या त्याची संज्ञा किं० अव्यक्त गणितामध्यें व्यक्त जी संख्या तिची संज्ञा; ८, पु० चंग, कांचन, गंजीफांतील सातवाओ रंग तो.

**रूपक**, न० एक अर्थालंकार आहे.

**रूपवती**, स्त्री० सुंदर जीचें रूप ती.

**रूपवान्**, ३लिं० सुंदर ज्याचें स्वरूप तो; २, रूप ज्यास आहे असा जो पदार्थ तो; उ० जेवढा रूपवान् पदार्थ तेवढ्याचें चक्षुरिंद्रियानें प्रत्यक्ष होतें.

**रूपी**, ३लिं० ज्या अर्थाचें तादात्म्य ज्या अर्थावर मानिलें तो तद्रूपी; उ० हा पुरुष केवळ विज्ञानरूपी आहे.

**रूबरू, रुबुरू**, अ० उरूबुरू.



**रूय**, स्त्री० कों० रुई.

**रूरयात**, अ० बाजवीरीतीनें चालणें, वागणें, इ० कांचें वि०

**रूळें**, पु० स्त्रियांचें पादभूषण आहे.

**रे**, अ० अरे या अर्थीं: उ० रे मुला हिकडे ये.

**रेंकणें**, म्हैस, रेडी, टोणगा, याणीं स्वजातीय शब्दानें ओरडणें; २, ला० मनुष्यानें घोगरे गळ्यानें गाणें किं० ओरडणें यां अर्थीं आरोपानें प्र० करितात; चालणें, बोलणें, इ० कांहींएक काम रेंकत करणें, म्ह० आळसावत आळसावत मंदमंद अशाप्रकारें करणें; कोणेकानें रेंकत जाणें किं० येणें म्ह० कोणेक लालचीचें अगत्य लागल्यामुळें दुसऱ्यानें प्रेरणा नकरितां आपस्करेंच जाणें किं० येणें; उ० आम्ही एव्हां दरिद्री म्हणून आम्हाकडे कोणी येत नाहीं आम्हास श्रीमंत होऊंद्या मग कोण पाहिजे तो रेंकत येईल.

**रेंकला**, पु० गाडीत एकभेद आहे.

**रेंकाड्या**, ३लिं० कों० म्हशीचे कंठाचे शब्दासारिखा ज्याचा घोगरगळा त्यास निंदेनें म्ह०

**रेख्ता**, पु० फारशी भाषेवर किं० हिंदुस्थानी भाषेवर केलेला गानोपयोगी कविताविशेष असतो तो.

**रेखटणी**, स्त्री० रेखाटणी.

**रेखटणें**, रेखाटणें.

**रेखणी**, स्त्री० रेखण्याचा जो व्यापार ती; २, रेखाटणी.

**रेखणें, रेंखणें**, स्थल, भिंत, कागद, लांकूड, इ० कांवर कोष्ठक, चित्र, इ० विवक्षिताकार रंगादिकाचे रेघानीं उत्पन्न करणें, किं० तें स्थलाद्यधिकरण

त्याचक्रियेनें त्या कोष्ठकाद्याकारानीं विशिष्ट करणें; २, कपालादिकांवर सरासरी लावलेलें कुंकूं, गंध, इ॰ तें अधिक लागलें असेल तें पुसून किं॰ लागलें नसेल तेथें नवें लावून स्फरेख दिसे असें करणें; ३, वस्त्राच्या चुण्या, केसांचा पट्या, इ॰ स्फरेख दिसायाजोगें बेतानें विवक्षितानुरूप बसविणें

रेखा, स्त्री॰ सं॰ कागद, भिंत, इ॰ कांवर रंगाची लेखणी, खिळा, इ॰ ओढलें असतां तो रंग लागून किं॰ त्या ओढण्यानें खरडल्यामुळें जें चिन्ह त्या कागद, इ॰ कांवर उमटतें ती किं॰ हस्तादिकांवर तादृशजें स्वतःसिद्ध चिन्ह असतें ती; २, ग्रहादिकांचे गणितार्थ लंकेपासून मेरूपर्यंत दक्षिणोत्तर सूत्रकल्पित आहे ती ·

रेखाटणी, स्त्री॰ आंकणी म्हणून जें रेखायाचें साधन असतें ती ·

रेखाटणें, रेखणें प्रथमार्थी·

रेखांतर, न॰ विवक्षितदेशास दक्षिणोत्तर रेखेपासून कांहींएक योजनात्मक जें मध्यें अंतर असतें तें ·

रेंगणें, आळस, अनुत्साह, इ॰ कारणामुळें हळूहळू मंद मंद चुकवीत चुकवीत असा जो कांहीं काम करण्याचा प्रकार तद्विशिष्ट कोणेकानें तें काम करीत असतां होणें ·

रेंगळणें, को॰ विरंगुळणें; २, कांहीं मोठा परिश्रम पडल्यामुळें थकणें .

रेघ, स्त्री॰ रेखाप्रथमार्थी; २, कपाळावरील केस चिमट्यानें किं॰ वस्त्र्यानें काढून स्फरेख दिसायाजोगा जो शस्त्रधारेप्रमाणें केशसीमेचा सारखा आकार करितात ती; कोणेकास रेघ ओढून देणें, काढून देणें, इ॰ स्थलीं रेषा काढून देणें, ओढून देणें, असा अर्थ·

रेघेरूपास, रेघेरूपेस, अ॰ येणें किं॰ आणणें याच्या योगीं प्र॰ अ॰ आरब्ध जें कोणेक कार्य तें अनुकूल क्रियासंस्कारादियोगानें आकारास येणें किं॰ आणणें; २, ढांसळलेलें जें संसारादि त्याणें पुनः कांहीं आश्रय मिळाल्यामुळें स्थितीवर येणें किं॰ दुसऱ्यानें आणणें; ३, विद्या, द्रव्यादिसंपत्तीचा अभावामुळें अगणनीयत्वें करून स्थित जो कोणी त्याणें त्यात्या संपत्तियोगानें यथायोग्य ऊर्जित दशेस येणें किं॰ दुसऱ्यानें आणणें; उ॰ हा आला तेव्हां याला नेसायास धोतर देखील नव्हतें तो माझ्या आश्रयानें रेघेरूपास आला आतां उफराटी गोष्ट सांगतो; मी पदरचे पांचशें रुपये खर्चून शेत रेघेरूपास आणलें आतां हा सांगतो बाद ·

रेंच, पु॰ भोजनास बसलें असतां कोणी भरल्यापायानीं आला किं॰ कोणाची दृष्टि पडली, इ॰ कारणामुळें अन्नावर अरुचि व्हावी, ओकारी येत असावी, असा जो विकार होतो तो भरणें, उतरणें, यांच्या योगीं प्र॰; रेंच मोडणें, उतरणें, म्ह॰ पाठ हलकी व्हायाकरितां पाठीचा शिरा मोडून किं॰ चिमटीनें कातडी ओढून पाठ हलकी करणें किं॰ गर्व परिहार होई अशी त्याची खोड मोडणें .

रेच, पु॰ मलद्वारानें जो दाळ होतो तो; २, तसा दाळ व्हायाकरितां घेतलेलें जें औषध तो ·

रेचक, न॰ ढाळक; २, ३ लिं॰ रेच करण्याची शक्ति ज्याचे अंगीं आहे असा जो हरीतक्यादिपदार्थ तो ·

रेचन, न॰ रेचक प्रथमार्थी; २, मल पातळ होऊन त्याचें मलद्वारानें बाहेर जें निःसरण तें

रेज

रेजगण, न० मोडकीतुटकीबाळी, बुगडी, पानड्या, इ०किं० सोनें, रुपें, इ०कांचे चांगलें वाईट रज किं० बारीकसारीक माणिक,मोत्यें,इ०जो किरकोळ खिडूकमिडूक जिनसाऱ्या समुदाय तें.

रेंजणें, रा० कोणेकाम यत्किंचित्तरी महत्वबुध्दीनें मानणें; निषेधविषयीं प्र०; उ० तीठकी दादल्यालादेखील रेंजीत नाहीं मग त्यास्तुला कोठून.

रेजा, पु० फांशावरील जो पगडा तो; २, प्रा० उंची कापडाचा जो केवळ लहान तुकडा तो.

रेजीम, न० पुर्तकाल, चीन, इ० देशांपासून येतात जे वीसदस्ते, चाळीस छकड्या, इ० नियत संख्याक कोऱ्या कागदांचे समुदाय ते प्र०

रेंट, न० मोठी जाडजी भाकर तीस निंदेनें ह्मणतात; २, नेटया अर्थी ह्म०

रेंटणें, कोणेक पदार्थ असतो तेथून पलीकडे सरावा किं० आलीकडे येत असतां येऊं देऊं नये ह्मणून त्यास हस्तादि लावून स्वनिष्ठ बळाचे नेटानें विशिष्ट करणें, ज्याचे योगानें तो पदार्थ पलीकडे सरावा किं० आलीकडे येऊं नये; २, ला० ज्याचे योगानें आपण पडून दुर्दशा पावावी असें आपल्यावर आलेलें जें दुखणें, इ०रूप कांहीं संकट त्यास आपण जीत न जातां आपल्या सामर्थ्यानें कांहीं काल तसेंचें तसेंच संभाळून धरणें; उ० हा वादप्रसंग आहे मला रेंटेल तोंवर मी रेंटतों मला रेंटेनासें झालें तर तुह्मी आहांच; ३, संसार, सावकारी, इ० कांहीं व्यवहार नपडूं देतां स्वसामर्थ्यानें कसें तरी चालविणें; रेंटून जा,बसाल, करणें, बोलणें, इ० स्थळीं भीड, भय, इ० न धरितां कडकून बोलणें.



रेटा, पु० टे० कोणेकानें पुढें सरावें ह्मणून हस्त, इ० कानीं मागून देतात जो नेट तो.

रेंटाई, स्त्री० कांहीं संकटाचा ईषन्मात्र प्रादुर्भाव झाला असतां त्याचा प्रतीकारार्थ तत्काल प्रवर्त्तावें तें न करितां अवगणनेनें टकलाटकली खालीं नेण्याचा जो प्रकार ती.

रेंटारेंटी, स्त्री० रेंटाई.

रेड, स्त्री० रा० गिराईक, इ०कानीं पाहिजे तितकें घेऊन उरावें जिकडे पहावें तिकडे तेंच अशीजी अंबे, फणस, धान्य, इ०कांची अतिशयित समृध्दि होत्ये ती; होणें, पडणें, याचा योगीं प्र०; उ० आज बाजारांत अंब्यांची रेड पडली आहे कोणी विचारीत नाहीं.

रेडकूं, न० ह्मशीचें जें अपत्य तें.

रेडा. पु० टोणगा; ह्म० रेडारेडा आणि धारभर ओटा.

रेडी, स्त्री० ह्मशीचें जें स्त्र्यपत्य ती.

रेडूक, न० रेडकूं; २, ह्मसरूं.

रेणु, पु० सं० पित्तपापडा; २, रज.

रेणें, न० रा० तृणादि भक्षण करूं लागलें नाहीं केवळ दूध मात्र पिणारें असेंजें गो महिष्यादि पशूंचें अपत्य त्याचीजी विष्ठा तें.

रेणेणें, रा० वांसरानें रेणें हगणें.

रेत, न० सं० गर्भोत्पादक जी पुरुषशरीरांतील मुख्य धातु तें; रेतस्खलन, रेतःपात, इ० स०

रेतदाणी, स्त्री० लिहिलेल्या कागदावर घालायाची रेती वाळगायासाठीं जें पात्र केलें असतें ती.

रेतदानी, स्त्री० रेतदाणी.

रेती, स्त्री० बारीक खरखरीत स्निग्धांशशून्य असा कणप्राय मृत्तिकाविशेष आहे ती.

रेंद, स्त्री॰ कों॰ गरहादिकांतील केरकचरा, इ॰ जें गदळ ती.

रेंदवणी, न॰ फार गढूळ जें पाणी तें.

रेंदा, पु॰ पाणी, तेल, तूप, इ॰ कांत जमलेलें जें मलांश, मृत्तिकांश, इ॰ कांहीं असतें तो किं॰ त्याचे मिश्रीभावामुळें दाट गढूळ झालेलें पाणी, इ॰ तो; २, रेंद; ३, गळूं, इ॰ कांतून निघतो जो रक्तमिश्रित पू तो.

रेंदाड, ३ लिं॰ ज्यामध्यें रेंदा बहुत झाला यामुळें मलिन झालें असें जें पाणी, तेल, तूप, इ॰ तो.

रेंदावणें, पाणी, तेल, इ॰ रेंद्यानें मलिन करणें; २, गळूं, जखम, इ॰ बाहेर पू, रक्त, गळ्याया जोगें बरबरीत होणें.

रेंपा, स्त्री॰ हिंवज्वर, भरूं लागला ह्मणजे पाठ, इ॰ अवयवांतून जा विलक्षण कळा येतात त्या.

रेफ, पु॰ अकारादिस्वर अविवक्षितकरून अर्धमात्राप्रमाण रह्मणूनजो वर्णतो; व्यंजनाचे पूर्वी त्याचा योग असतां त्याव्यंजनावर तद्बोधक चिन्ह जें अर्कुलें दिलें असतें तो.

रेव, स्त्री॰ कों॰ समुद्र खवळला ह्मणजे त्याचेतीरीं जो लोण्यासारिखा मृदु गाळ येतो ती.

रेंवटणें, ग॰ रोंमरणें

रेवटी, स्त्री॰ ग॰ रेवडी.

रेवड, स्त्री॰ कों॰ भांगल्येजाग्यावर चिखल, द्रोण, इ॰ पडल्यामुळें जी घाण येत्ये ती; उ॰ गोठ्यांत गुड्याभर रेवड जमली आहे त्यांत गुरें बसतील तरीं कशीं.

रेवडी, स्त्री॰ चिघळून पातळ रवरवीत झालेला जो गूळ, पेढा, साकर, इ॰ ती; २, ला॰ रा॰ अतिशयित पिकले त्यामुळें बिलबिलीत झालेला जो फणस, इ॰ फल त्यास ह्म॰

रेमेडोक्या, ३ लिं॰ कांहीं कामकरण्याविषयीं उत्साह नाहीं, त्वरा नाहीं, असा केवळ मंद जो मनुष्यादि त्यास ह्म॰

रेरेरेरे, अ॰ अरेरेरे.

रेल, स्त्री॰ रेळ.

रेलचेल, स्त्री॰ रेळचेळ.

रेलणें, चिरवल, चुना, इ॰ रचून केलेला जो मूर्त, ईट, भिंत, इ॰ पदार्थ त्याणें त्या चिरवल, इ॰ कांचे आंगचे आर्द्रतेचा आधिक्यामुळें किं॰ विसविशीतपणामुळें, खालीं दबून प्रसृत होणें; २, मनुष्यादिजीवानें आपले अवयव केवळ सईल सोडून आपले शरीराचा भार मनुष्यांतरादिपदार्थावर पडे असें तिकडे तोलणें.

रेंव, स्त्री॰ धान्यादिपदार्थांत जो बारीक खड्याचा समुदाय असतो ती किं॰ जी रेती असत्ये ती; उ॰ पायलीभर गव्हांत अदपाव रेंव निघाली; रेतीचे देशांत दुधांत देखील रेंव येत्ये ह्मणून सांगतात; २, कों॰ बारीक खड्यांचा समुदाय ती; उ॰ चुन्यांत घालायाला गाडाभर रेंव घेऊन ये.

रेवट, ३ लिं॰ रा॰ बारीक बारीक रगडांचा समुदाय जांत बहुत असें जें स्थल तो.

रेवड, स्त्री॰ कांबळें, इ॰ कांचे दशांचे मूळप्रदेशीं दशा वळून गुंफून किं॰ दुसरें रेशीम, सूत, इ॰ भरून जो गोफासारिखा आकार करितात ती.

रेंवडा, पु॰ कों॰ रेंव द्वितीयार्थीं; २, तन्मय जें स्थल तो.

रेवडी, स्त्री॰ साकर, इ॰ कांचा पाक करून तीळ घालून जी वडी करितात ती; २, ला॰ बचेरा.

रेवण, स्त्री॰ भुइकोट किल्ल्याचे तटाबाहेर जी मातीचीभर घालितात ती; २, रुतण.

**रेवणें**, रेलणें; २, कोणेक दुखणें, कैफ, इ० बहुत काल झाल्यामुळें आंगांत भिनणें; ३, कोणेक मनुष्यादिकानें अतिशयित जो चिखल, गाळ, रेवण, इ० कांत रुपून गर्क होणें.

**रेवती**, स्त्री० सं० सत्ताविसावें जें नक्षत्र तें; २, एक चमेली मध्यें भेद आहे; ३, संकेतानें अथेलीस ह्म०

**रेंवसळ**, ३ लिं० रेंवट.

**रेंवा**, पु० रा० रेंवड्रितीयार्थी.

**रेवाचिनी**, स्त्री० औषधोपयोगी एके ओषधीचा चीक आहे तो; रेवाचिनीचा शिरा ह्म० रेवाचिनीचा दुधांत गंधाकरून कांड्या बांधिल्या असतात तो.

**रेंचाळें**, न० रा० धान्य पाखडून किं० चाळून निराळें केलें असतां कांहीं धान्यांशानें विशिष्ट राहत्यें जी रेंच तें.

**रेंचीपेंचीं**, अ० ग्रा० कांहीं इकडे सांडलें, कांहीं तिकडे सांडलें, कांहीं गुरानीं खाल्लें, कांहीं पोरानीं उडविलें, कांहीं कुजलें, कांहीं गेलें, इ० प्रकारें अव्यवस्थेमुळें नासधूस होई असें करणें, होणें, जाणें, इ० कांचें वि०

**रेशमी**, ३ लिं० रेशमानें निर्मित जें वस्त्रादिक तें; २, ला० खरमस्यानें चढे जो मनुष्य त्यास ह्म०; ३, रेशिमकांठी जें धोतर, किं० पातळ तें.

**रेशमीनारिंग**, न० नारिंगांत एक भेद आहे.

**रेशिमकांठी**, ३ लिं० ज्याचे कांठ रेशमाचे आहेत तें वस्त्र.

**रेशीम**, न० एक जातीचे किडे आहेत त्यांपासून वस्त्राद्युपयोगी जो तंतुसंघात निपन असतो तें; रेशमाची गांठ ह्म० वधुवरें, जीवात्मा देह, इ० कांचा कधींही विनष्ट व्हावयाचा नव्हे असा जो परस्परांचा संबंध त्यास ह्म० देणें, पडणें, यांचाचयोगीं प्र०

**रेषा**, स्त्री० रेखा; कपाळ, इ० कांतील रेषा उपटणें ह्म० अकस्मात् दैव उदयास येणें; धनी, इ० कानें सेवकादिकांस रेषा ओढून देणें, काढून देणें, इ० स्थलीं वर्तना विषयीं याप्रकारें वर्तावें अशी मर्यादा बांधून देणें; २, अंबा, इ० कांहीं एक फलांत जो केंसर असतो तो.

**रेंस**, **रेस**, पु० आण्याचा पंचविसावा अंश तो.

**रेळ**, स्त्री० चंगळ.

**रेळचेळ**, स्त्री० अतिशयित जी चंगळ ती.

**रेळणें**, रेलणें; २, कों० कपाळ, भिंत, इ० कांवर लावलेलें गंध, कुंकूं, रंग, इ० त्याणें पातळ झाल्यामुळें ओघळून खालीं येऊं लागणें.

**रेळा**, पु० कों० कपाळ, भिंत, इ० पदार्थांस सद्रव, गंध, चुना, इ० कांचा लेप लाविला असतां त्यापासून अथवा जलादिकें करून भरलेला कलशादिक डचमळणें, इत्याद्यनेक कारणानीं त्यापासून वरून खालीं येतो जो ओघळ तो.

**रौंक**, पु० रोख.

**रोकड**, स्त्री० रुपये, होन, मोहरा, इ० जें नाणें तद्रूप जें द्रव्य तें; २, सावकारी, व्यवहार, इ० कांत असतें जें सोनें, रुपें, जवाहीर, एतद्रूप जो ऐवज त्यासही ह्म०

**रोकडा**, ३ लिं० रोकड जो रुपये, सोनें, इ० ऐवज तो; २, भीड भाड न धरितां निरवाळसपणें जेव्हांचें तेव्हां जें उत्तर, प्रत्युत्तर, इ० भाषण, इ० तें; उ० त्याकडे कोणी का मागायाला जाईना नाहीं ह्मणून रोकडें उत्तर करतो; ३, अ० लागलाच; उ० शिवी देतांच त्याणें रोकडी तोंडांत मारली; ४, कों० तूर्त; उ० तो तुकना घरीं गेला

गेला आहे त्यापेक्षां रोकडा आठचार दिवसांनंतर येत नाहीं.

**रोकड्या**, पु० ग्रामांतरास सावकार लोकांचा रोकड पोंचविणाराजो मनुष्य तो.

**रोंकणी**, स्त्री० रोंखणी.

**रोंकणें**, रोंखणें.

**रोकवणी**, न० कों० कोणा एकाचा विटाळ झाला असतां एकवार स्नान करून पुनः शुद्ध्यर्थ जें डोकीवरून पाणी घेतात तें.

**रोख**, ३ लिं० रुपये, होन, इ० जें नाणें, तद्रूप जो ऐवज, तो; २, क्रयविक्रय व्यवहारीं उधार न राखितां तत्काळींच घेतात देतात जो नाणेंरूप ऐवज तो; ३, रोकडा द्वितीयार्थी.

**रोंख**, पु० कोणेक लक्ष्यानें लक्षून त्याजकडे जें नेत्र, बंदूक, तोफ, इ० कांचें आभिमुख्य असतें तो; २, ला० वक्त्याचा किं० कर्त्याचा अंतःकरणाचा कोणेक प्रतिपाद्य अर्थाकडे किं० साध्यकार्याकडे जो कटाक्ष असतो तो. त्याव वक्त्याकर्त्याचा आणि तत्कर्तृक भाषणादिकाचा आणि त्याचे अंतःकरणादिकांचाही.

**रोखठोक**, ३ लिं० निरवाळस जो रोख तो; उ० रोखठोक पैसा दिला म्हणजे जिन्नस सस्ता मिळतो: काय तें रोखठोक बोलावें मागें कुरकूर कामाची नाहीं.

**रोंखणी**, स्त्री० रंधा म्हणून सुताराचें आऊत आहे ती; २, तेणें करून लांकूड साफ करण्याचा जो व्यापार ती.

**रोंखणें**, बंदूक, तोफ, नेत्र, इ० विवक्षित लक्ष्याकडे रोंख होई अशा स्थितीनें विशिष्ट करणें; २, रोंखणीनें काष्ठादि साफ करणें; रोंखून पाहणें म्ह० कोणेक लक्ष्याकडे एकसारखे डोळे लावून पाहणें.

**रोखविक्री**, स्त्री० उधार न ठेवितां रोख पैका घेऊन जिन्नसाची जी विक्री ती; २, त्या विक्रीसंबंधी आलें जें द्रव्य ती; उ० आज दुकानावर पन्नास रुपये रोखविक्री आली.

**रोखा**, पु० कर्जखत; २, सर्कारसंबंधी कूळ, इ० कांपासून वसूल, इ० घ्यावा इत्याद्यर्थ त्यांजकडे पाठवितात जी चिठी ती.

**रोखारोखी**, अ० रोखठोक द्यावें घ्यावें अशा प्रकारानें उदीम करणें, देणें, घेणें, बोलणें, इ० कांचे वि०; २, स्त्री० तसा जो तो प्रकार ती; उ० उधारापेक्षां रोखारोखींत फ़रक आहे.

**रोखी**, स्त्री० उधार न ठेवितां रोख पैक्यानें क्रयविक्रय करण्याचा जो प्रकार ती किं० व्यवहारांत रोकडरूप जो माल ती; प्रा० प्रथमांत प्र० नाहीं; उ० आम्ही काय बाजारांत येणें तें रोखीनें घेतों उधार करीत नाहीं; कापड, किराणा, याचे उदमापेक्षां रोखीचे उदमास योग्यता अधिक आहे.

**रोग**, पु० मनुष्य, पश्वादि, स्थावरजंगमात्मक पदार्थांचे शरीराची जी प्रकृत्यवस्था असते ती बिघडून प्रतिकूल कांहीं विकृति होण्यास कारणीभूत जो प्रतिकूल खानादिसंबंधानें शरीरीं कांहीं दोषरूप धर्मविशेष उत्पन्न होतो तो; २, त्या रोगानें उत्पन्न होऊन ज्वरादिरूपें करून परिणाम पावते जी विकृति तिलाही म्ह०; उ० त्याचें पोट दाबून पाहिलें चांगला अंब्याएवढा रोग हाताला लागला; ३, कांहीं रोगविकृतीनें विकृत झालेला जो मनुष्य, धान्य, भाजीपाला, इ० पदार्थ त्यास आरोपानें म्ह०; उ० हे धडधडीत किडके तांदूळ दिस

दिसतात, आणि पैकारचर्वून हारोग कशाला आण-लात; ४, भक्षणाद्युपयुक्त जें फल पुष्पादिपदार्थ त्यामध्यें विकृतिकारक जो त्याज्यांश असतो तो; उ० अगस्त्याचे फुलांतली मधली काडी तो रोग आहे ती काढून टाक; ५, अंतःकरणास व्यथा जेणेंकरून होत्ये असा जो शोक, चिंता, मत्सर, इ० त्यास प्र० म्ह०; रोगग्रस्त, रोगनिवृत्ति, रोगनाशक, रोगविकृति, इ०, कफरोग, वातरोग, हृद्रोग, इ० स०

**रोगट**, ३ लिं० कांहीं एक रोग जडला आहे ज्याला असा जो मनुष्य, वृक्ष, फल, इ० तो.

**रोगण**, न० तेल, मेण, राळ, इ० कितिएक पदार्थ एकत्र करून जो चिक्कण पदार्थ करितात ज्याचा लेप मेणा, इ० कांस केला असतां भिजत नाहीं आणि तकतकीत दिसतो तें; २, त्याचा मेणा इ० कांस करितात जो लेप तें

**रोगणी**, ३ लिं० रोगण ज्यास दिलें तो पदार्थ.

**रोगणें**, क्रि० कोणेकानें कांहीं रोग लागल्यामुळें अशक्त आणि रोड होणें.

**रोगमल्ल**, पु० रोगिष्ठ जो मनुष्यादि त्यास म्ह०

**रोगराई**, स्त्री० लहान मोठा जो रोग ती

**रोगवणी**, न० औषधाच्या पायानें शरीरांतून मुख, नासिका, इ० द्वारानें किं० पोतानें, रोगांश घेऊन बाहेर निघतें जें पाणी तें; २, कोणेक पदार्थाचे आंगचें किं० आंत मिसळलेलें आंतील रोगांश घेऊन निघतें जें पाणी तें; उ० आंग भिजत घालून धुतली म्हणजे आंतलें रोगवणी निघून जातें; ३, ज्याचे योगानें शेत भात, इ० कांवर कीड, इ० नानाप्रकारचे रोग उत्पन्न होतात असें जें आश्लेषांचे पर्जन्याचें किं० बारीक बुंरगट पडतें त्याचें उदक तें

**रोंगा**, ३ लिं० रा० रुसलेल्या सारखी स्वाभाविक ज्याची मुखश्री तो.

**रोगाड्या**, ३ लिं० कों० रोंगाळा.

**रोंगाळा**, ३ लिं० कांहीं रोग जडल्यामुळें अशक्त, रोड, झालेला मनुष्य, वृक्ष, पशु, इ० जो प्राणी तो.

**रोगिष्ट**, ३ लिं० रोगिष्ठाचा अपभ्रंश.

**रोगिष्ठ**, ३ लिं० सं० निरंतर एक ना एक कांहींतरी रोग ज्यास जडला असतो असा जो मनुष्यादि तो.

**रोगी**, ३ लिं० पंडु, क्षय, दमा, कुष्ट, मेह, इ० जो चिरस्थायी रोग तो जडला आहे ज्यास असा जो मनुष्यादि तो; २, ज्याचे सेवनानें रोग होतो असें जें धान्य, भाजी, फळ, इ० तो; उ० अधींहा देश रोगी त्यांत सकाळचें ऊन घेतां हे रोगी येणेंकरून तुम्ही रोगी व्हाल.

**रोगेणें**, कों० रोगणें.

**रोगेला**, ३ लिं० अल्पस्वल्प कांहीं रोग ज्याचे आंगीं नेहमी जडलेला आहे असा जो मनुष्यादि तो.

**रोग्या**, ३ लिं० रोगाड्या.

**रोंघणें**, कों० प्रायः लंघणें या अर्थी.

**रोचक**, ३ लिं० सं० रुचिकर; २, न० पादेलोण.

**रोंचणें**, कोणेकाचे शरीरादिकांत कंटक आदिकरून रुतविणें.

**रोज**, पु० अहोरात्रात्मक जो काल तो; २, दिवसाचे बोलीनें कांहीं एक कामाकरितां ठेविला जो मनुष्यादि त्यास प्रतिदिवशीं जें देय द्यावें लागतें तो; ३, सर्कार, सावकार, इ० कांकडील तगादेदार आला असतां त्याचा आपल्येकडून खोळंबा होऊन दिवस मोडल्यामुळें त्यास जें द्रव्य द्यावें लागतें तो; उ० रोज देवदर्शन घ्यावें

घ्यावें.

रोजउठून, अ॰ आला दिवस.

रोजकरी, पु॰ रोजाचे बोलीनें कांहीं एक कामावर ठेविला जो गडी तो.

रोजकीर्द, स्त्री॰ रोजखर्डा; २, ला॰ आपलें जें कुटुंबादि खटलें आणि आपण एतत्संबंधी जो भोजनादि निमित्त आवश्यक नित्याचा खर्च ती.

रोजखरडा, पु॰ हिं॰ संसार, व्यवहार, इ॰ संबंधी प्रतिदिवशींचा कर्ज, जमा, खर्च, इ॰ ज्यावर लिहिला असतो असा जो कागद तो.

रोजगार, पु॰ द्रव्यादि संपादनार्थ सुभा, मामलत, हवाला, इ॰ जो धंदा तो; किं॰ पैका मेळविण्याचा जो पद्यायावत् उद्योग त्यास ह्म॰; उ॰ आतां शेतकीचा रोजगारांत जीव राहिला नाहीं; २, प्रसंग विशेषीं सामान्यतः उद्योगमात्रास ह्म॰; उ॰ याची गोष्ट त्यापाशीं. त्याची गोष्ट यापाशीं, सांगणें असला रोजगार आह्माला होत नाहीं.

रोजगारशीर, ३ लिं॰ मामलत, सुभा, इ॰ रोजगार ज्यास आहे तो.

रोजगारी, ३ लिं॰ रोजगार[illegible].

रोजगुजारा, पु॰ روزگزارہ रोजकीर्द चालल्यानें आलेल्या दिवसाचा जो निर्वाह तो.

रोजगुदस्त, अ॰ روزگذشت वर्तमान दिवसाचे अव्यवहित पूर्व दिवशीं जमाखर्चीं लिहिण्यांत प्र॰

रोजचा, ३ लिं॰ नित्याचा.

रोजचेरोज, अ॰ नित्याचे नित्य.

रोजदार, पु॰ हिं॰ रोजकरी.

रोजनामा, पु॰ हिं॰ रोजखर्डा.

रोजमजुरी, रोजमजूरी, स्त्री॰ हिं॰ रोजाचे बोलीनें करतात जी मजूरी; ह्म॰ रोजमजूरी बलायदूर.

रोजमरा, रोजमुरा, पु॰ روزمرہ चाकरास चाकरीसंबंधी प्रतिमासीं किं॰ प्रतिवर्षीं देतात जें वेतन तो.

रोजा, पु॰ روزہ यवनशास्त्रोक्त धर्मार्थ जें उपवास प्रधानव्रत तो.

रोजिना, अ॰ روزينہ रोजीना.

रोजी, स्त्री॰ روزی रोजकीर्द ला॰ क्षणीकार्थी; २, रोजदिती या अर्थीं; ३ ला॰ कोणेकापासून कोणेकास जें नित्य कांहीं मिळत असतें त्यास ह्म॰; ४, मोहरमांत फकीरांस देतात जी भिक्षा ती.

रोजीना, अ॰ हिं॰ प्रतिदिवशीं.

रोट, रौंट, पु॰ कणीक, इ॰ कांचा जाड भाकरीचे आकाराचा किं॰ वरवंट्यासारिखा जो गोळा करून भाजितात तो.

रोटगा, पु॰ रोट.

रौंटा, पु॰ रोंठा.

रोटी, स्त्री॰ भाकर प्रायः कणकेचे भाकरीवर प्र॰.

रौंटीसुपारी, स्त्री॰ रा॰ रौंठी सुपारी.

रौंठा, पु॰ पिकलेल्या पोफळांतील जी सुपारी तो.

रौंठीसुपारी, स्त्री॰ रोंठा रूप जी सुपारी ती.

रोड, ३ लिं॰ अंगांत मांसाचे अल्पत्वामुळें उरःस्थलादिसंबंधी हाडें ज्याचीं निरनिराळीं दिसतात असा कृश जो मनुष्यादि तो किं॰ त्याचें शरीर; ह्म॰ कांगवाई रोड तर मला गांड्याचीओर.

रोडका, ३ लिं॰ रोड; ह्म॰ हातीं धरल्या रोडका आणि शेंडी धरिल्या बोडका.

रोडगा, पु॰ रोटगा.

रोडणें, रोडेणें, रोडहोणें

रोडा, पु॰ भाजलेल्या इटेचाजो तुकडा तो.

रोडावणें, रोडेणें

रोड्या, ३लिं॰ शरीरानें रोडकाजो त्यास निंदेनें म्ह॰

रोत, पु॰ रोंथ.

रोतीसुरत, स्त्री॰ रडवीजी सुरत श्री ती.

रोंथ, पु॰ न॰ रवंथ.

रोंथणें, रवंथणें.

रोदन, न॰ रुदन.

रोध, पु॰ सं॰ निरोध; द्वाररोध मार्गरोध, इ॰ स॰ जाणावे.

रोधणें, मनुष्य, द्वार, नदी, मार्ग, इ॰कांस गति कुंठित होई असें अडविणें; उ॰ उठा एकीकडे बसा कोणी सोंवळ्यानीं जाणारयेणार त्यांची वाट रोधूं नका.

रोप रोंप, न॰ नारळ, पोफळ, भात, वांगी, मिरची, तुळस, इ॰कांचीं बीजें उगवून जीं लहान लहान झाडें झालीं असतात तें किं॰ तीं झाडें प्र॰ परंतु प्रा॰ तेथून स्थळांतरीं लावण्याची विवक्षा असतां प्र॰

रोपटा, पु॰ भारी मोठें नव्हे असें जें आंबा, फणस, इ॰कांचें झाड तो.

रोपदळ, न॰ कों॰ केवळ तरुणावस्थापन्न पोफळी किं॰ माड यांचाजो समुदाय तें; उ॰ आमचे वाडींत रोपदळच बहुत आहे झिंटें नाहींत.

रोपा, पु॰ माडा.

रोंबटणें, स॰ डोळा, मातीचा गोळा, पोट, कापसाची मोट, इ॰कांमध्यें बोट, लांकूड, कटार, इ॰ बळानें खुपसणें.

रोंबें, न॰ कों॰ रक्त काढायाची तुंबडी तें.

रोम, न॰ सं॰ शरीरावरील केश ते प्र॰

रोमणदिवली, स्त्री॰ प्रवासाचे उपयोगीं जमीनींत रोवून ठेवायाजोगा जो लोहादिकांचा एक दिवा करितात ती.

रोमणदिवा, पु॰ रोमणदिवली.

रोमणदिवी, स्त्री॰ रोमणदिवली.

रोमरंध्र, न॰ सं॰ जांतून रोमें उगवून बाहेर आलीं आहेत अशीं जीं शरीराचीं छिद्रें तीं प्र॰; उ॰ त्याचे सर्व रोमरंध्रांतून घर्म आला म्हणजे ज्वर निघेल.

रोमरक्षा, स्त्री॰ रोमें आणि राख ती किं॰ त्या. परंतु कोणेकस्थलीं कोणेक अर्थांचा केवळ अभाव वर्णायाचा असतां, तेथें काय धूळ आहे. त्याला काय राख समजते, तेथें काय माती मिळणार आहे, अशा प्रकारें धूळ, इ॰कांचा जसा प्र॰ होतो तसा याचा प्र॰; उ॰ त्याचा कां तूं नादास लागला आहेस तेथें काय रोमरक्षा आहेत.

रोमरक्षाव्यतीपात, पु॰ रोमरक्षा याचा प्रयोगाविषयीं प्र॰ करितात.

रोमहर्ष, पु॰ सं॰ आनंदादिकें करून शरीरावर जो कांटा उभा राहतो अशी जी अवस्था होत्ये तो.

रोमांच, पु॰ सं॰ आनंदादिकानें शरीरावर जो कांटा उभा राहतो तो.

रोमांचित, ३लिं॰ सं॰ रोमांचानें युक्त जें शरीर किं॰ तद्विशिष्ट मनुष्य, इ॰ तो.

रोमावली, स्त्री॰ सं॰ पोटाचे मध्यप्रदेशीं उभी जी केशपंक्ति असत्ये ती.

रोराण, न॰ युद्धीचा जो स्वजातीय रोंरों असा शब्द त्याचा समुदाय तें; २, पोरें, इ॰कांचे शब्दानीं होतो जो मोठा गलबा तें; ३, थोडक्या निमित्तावरून कलह वाढतां वाढतां शिवीगाळी, हाणामारी, दिवाणदरबार इ॰

इ॰ह्यांचें असेंजें मोठें कळ्याचें प्रकरण होतें तें.

रोंरेणें, रा॰ दुःखानें रोंरों अशाशब्दानें ओरडणें.

रोव, पु॰ रहू.

रोंवणदिवली, स्त्री॰ रोमणदिवली.

रोंवणदिवा, पु॰ रोमणदिवा.

रोंवणदिवी, स्त्री॰ रोमणदिवी.

रोंवणें, भूमि, भिंत, शरीर, वस्त्र, इ॰कांत बीजस्तंभ खिळा, कांटा, सूई, इ॰ खुपसणें; खुपसल्यावांचून शस्त्रादिकानें भूम्यादिकांस खळी करून जरीं आंत स्तंभादि घातलें असलें तरीं त्या क्रियेचें अभिधान या धातूनें होतें; उ॰ मध्यें रणस्तंभ रोंवून दोहोंकडे वीर उभे राहिले.

रोंवथ, पु॰ रवंथ.

रोंवळा, पु॰ रोवळा प्रथमार्थी.

रोवळा, पु॰ मोठीजी वेळूची रोवळी तो; २, रा॰ केळीखंडीचें षष्ठांशरूपजें प्रमाण तो.

रोंवळी. स्त्री॰ तांदूळ धुणें इत्याद्युपयोगी आकारविशेषाचें एक वंशपात्र आहे ती; २. तळीं अनेक छिद्रें पाडून तांदूळ, भाजी, इ॰ धुण्याचे उपयोगीजें ताम्रादि धातूचें पात्र करितात त्यांसही म्ह॰

रोवळी, स्त्री॰ रोंवळी.

रोशन नाईक, पु॰ मशालजी.

रोशनाई, स्त्री॰ कोणेकस्थलीं शोभार्थ अनेक दीप लावून जो प्रकाश करितात ती किं॰ तत्संबंधीं कारखाना ती; २, वृक्ष, मनुष्य, इ॰ समुदायमूलक जी स्थलादिकांस शोभा येत्ये ती.

रोशेल, न॰ एका तृणविशेषाचें तेल काढित असतात तें.



रोष, पु॰ सं॰ क्रोध.

रोषाविष्ट, ३लिं॰ सं॰ क्रोधाविष्ट.

रोसनाई, स्त्री॰ रोशनाई.

रोह, पु॰ रहू.

रोहटी, स्त्री॰ धान्य पेरल्यानंतर प्रथमतः जो अंकुरसमुदाय बाहेर दिसतो ती.

रोहशेल, न॰ रोशेल.

रोहिडा, पु॰ दे॰ रक्तरोहिडा.

रोहिणी, स्त्री॰ अश्विन्यादि नक्षत्रांतील चवथें नक्षत्र त्या.

रोहिला, पु॰ हिं॰ यवनांत एक भेद आहे.

रोही, पु॰ मृगांत एक भेद आहे.

रोहो, पु॰ रहू.

रोहोंत, स्त्री॰ रेंथ.

रोहोशेल, न॰ रोशेल.

रौद्र, पु॰ शृंगारादि रसांतील एक रस आहे; २, ३लिं॰ क्रोधवेशित्यादिकारणामुळें अतिउग्रजें कोणेकाचें भाषण, स्वरूप, इ॰ तो.

रौप्य, न॰ रुपें प्रथमार्थी; रौप्यमुद्रा म्ह॰ रुपया, इ॰ स॰ होतात.

रौरव, पु॰ एकविंशति महानरकांतील एक नरक आहे.

रौक्ष्य, न॰ रुक्षत्व.

---

लइलूट, स्त्री॰ लयलूट.

लई, ३लिं॰ पु॰ फार; शूद्रभाषाप्रवृत्ति.

लकटणें, लोटणें; २, लगटणें.

**लकड**, स्त्री० कों० भारीउंच वाढलेला जो माड, पोफ-ळ, सुरमाड, ताड, इ० वृक्ष ती; २, ला० शरीरानें कृश असून उंचट असतोजो मनुष्य त्यास म्ह०

**लकडकोट**, पु० हिं० स्थलाचें आवरण कराचाकरितां मोटमोटीं लांकडें उभीं भुईंत पुरून भिंताडासारिखी जीरचना करितात तो.

**लकडखाना**, पु० हिं० इमारतीचीं किं० जाळाऊ अशीं लांकडें ठेवायाची एकजागा नेमली असत्ये तो; प्रा० श्रीमंतलोकांचे इथें व्यवहार.

**लकडवाला**, पु० हिं० जाळाऊ लांकडें खरेदीकरून त्यांचा उदीम शहरांत करितो तो.

**लकडा**, पु० हिं० सावकार, इ० कांचें देणें किं० शेन, संसार, इ०जीं अवश्य निर्वाह्य त्याजकडून त्यांचा निर्वाह करण्याविषयीं आपणास लागला असतो जो नेट तो; ज्याचे योगानें कांहीं उद्योगांतर करावयास किं० स्वस्थ बसायास सांपडत नाहीं.

**लकडी**, स्त्री० हिं० गूळ फार कढवून निवविला असतां लांकडासारखा कठीण त्याचा होतोजो परिणाम ती.

**लकडीपूल**, पु० नद्यादिकांवर मार्गार्थ लांकडाचाजो पूल बांधितात तो

**लकड्या**, ३ लिं० लकड.

**लकपक**, ३ लिं० चकपक.

**लकब**, स्त्री० لقب सहवास, अभ्यास, इ० कारणामुळें बोलणें, चालणें, लिहिणें, वस्त्रादिधारण करणें, इ० व्यापारांविषयीं कांहींएक तऱ्हेची लागलेली चाल ती; उ० दुसऱ्यास वेडावूं लागल्यापासून त्याला तोंतरें बोलायाची लकब लागली.

**लकलक**, अ० कर, हो, याचायोगीं प्र० शस्त्रें, वीज, इ० डोळे दिपायाजोगें तेज पडे असें स्फुरणें; उ० त्याचीं भांडीं पहा कशीं लकलक करतात तीं; २, पित्तक्षोभादि कारणामुळें डोळ्यापुढें काजवे येणें; उ० कालचे उपासानें आज डोळ्यापुढें लकलक करते.

**लकलकणें**, लकलक करणें.

**लकलकाट**, पु० सूर्य, चंद्र, चंद्रज्योत, दिवे, इ० संबंधी तेजाची दाटजी व्याप्ति तो.

**लकलकी**, स्त्री० चकचकी.

**लकलकीत**, स्त्री० ३ लिं० स्वच्छनिर्मळ जो पात्र, अलंकार, वस्त्र, शरीर, स्थल. इ० तो; २, जें अधिकरण ज्या द्रव्यादिपदार्थानें सहित होतें तो पदार्थ तेथून निःशेष नाहींसा झाल्यामुळें एकाकी स्वरूपें करून मात्र राहिलें जें तें अधिकरण तो; उ० दोन दागिने होते ते चोरानें नेले आतां मी लकलकीत झाल्ये: विहिरींत तोळाभर पाणी नाहीं अगदीं लकलकीत झाली.

**लंका**, स्त्री० सं० एक उपद्वीप आहे; म्ह० लंकेस सोन्याच्या इटा आहेत पण त्या आह्मास काय होत; २, क्रीडार्थ जाळायासाठीं दारवेचीं झाडें राक्षस, वानर, इ० पदार्थाहींकरूनजो रचनाविशेष करितात ती; लंकेची पार्वती, म्ह० जीचे अंगावर यत्किंचित्‌ही अलंकार नाहीं अशीजी सौभाग्यवती स्त्री तिला म्ह०

**लकाकणें**, लकलकणें.

**लकाकी**, स्त्री० चकाकी.

**लकारविल्हा, लकारबिल्हे**, ३ लिं० संकेतानें लबाडास म्ह०

**लकारी**, स्त्री० संकेतानें लबाडीस म्ह०

लकीर, स्त्री॰ लकेरी.

लकीरी, स्त्री॰ लकेरी; २, पु॰ लाखेचे चुडे, कंगण्या, इ॰ पदार्थ करून उपजीविका करणारी एक जाति आहे.

लकीलक, ३ लिं॰ लकलकीत द्वितीयार्थी; उ॰ झाडें तोडून मोडून रान लकीलक करून तेथें किल्ला बांधूं लागले.

लकेरी, स्त्री॰ सुवर्णादि धातू, हीरकादि रत्नें, रंग, इ॰ जे चकचकीत पदार्थ त्यांचे ठायीं किं॰ कंठादि ध्वनीचे ठायीं जी झील असत्ये ती; २, रंग, राग, स्वार, वास, इ॰ कांमध्यें रंगांतरादिकाची जी छटा मारत्ये ती; ३, वस्त्रादिकांस कलाबतू, रेशीम, रंग, इ॰ कांची बारीक जी किनारी असत्ये ती; उ॰ ह्या दुपट्याचें सूत चांगलें आहे पण लकेरी चांगली नाहीं.

लंकोदय, पु॰ सं॰ लंकेंत मेषादि राशींचे उदयास जे नियमित काळ लागतात त्यांस चरसंस्कार केला असतां स्वदेशींचे होतात ते प्र॰; उ॰ मेषाचा लंकोदय चार घटका अडतीस पळें.

लक्क, ३ लिं॰ लकलकीत; २, न॰ विद्युल्लता, तोफ, इ॰ संबंधी अकस्मात् जें तेजःस्फुरण होतें तें किं॰ पित्तक्षोभादिकामुळे जो डोळ्यांपुढें तादृश भास होतो तें. होणें धातुयोगीं प्र॰; उ॰ अकस्मात् बीज चमकतांच माझे डोळ्यांपुढें लक्क झालें.

लक्कड, स्त्री॰ हिं॰ उफड.

लक्कण, लक्कन, लक्कर, लक्कदिनी, लक्कदिशीं, अ॰ चक्कन.

लक्का, पु॰ खबुतरांत एक भेद आहे.

लकुरव, ३ लिं॰ केवळ निर्धूलकफल्लक जो मनुष्य त्यास स॰

लखलखणें, लकलकणें.

लखलखाट, पु॰ लकलकाट.

लखलखी, स्त्री॰ लकलकी.

लखलखीत, ३ लिं॰ लकलकीत.

लखलाभ, पु॰ हिं॰ लक्ष रुपयांचे लाभस्थानीं मानिला जो कांहीं एक अर्थ त्यास स॰; उ॰ तुम्ही जरीं कांहीं दिल्हें नाहीं तथापि तुमची भेट झाली हाच आम्हास लखलाभ झाला; २, कापड, इ॰ पदार्थ विक्यादि द्वारा घेत्येसमयीं तो पदार्थ गिर्‍हाईक, इ॰ कांचे हातीं देत्येवेळेस मंगलार्थ याचा प्रयोग करितात; उ॰ जाही शालजोडी तुम्हा लखलाभ असो.

लखाखी, स्त्री॰ लकाकी.

लखोटा, पु॰ लाखोटा.

लग, स्त्री॰ घर, इ॰ कांचे भोंवतीं असतात जे खांब त्यांचे माथ्यावर एक चौरस आडवें लांब लांकूड बसविलें असतें ती; २, पु॰ स्त्री॰ काष्ठ शरीरावयव, इ॰ झिजल्या, तुटल्या असतां केवळ द्विभाग न होतां उभय संबंध मध्यें त्याच्या त्याच्या जो ईषन्मात्र अंश राहिला असतो तो ती; ३, लगा प्रथम द्वितीयार्थी.

लंग, पु॰ अनेक कलमांचा अनेक रकमा पंक्तीनें लिहून त्यांचा बेरजा करितात त्यामध्यें ज्या पंक्तीस दुसरें स्थान नाहीं त्या पंक्तीस बेरीज करायासाठीं रकमेचे स्थानीं शून्य लिहून कलमाचे स्थानीं हा शब्द लिहितात.

लगट, पु॰ स्त्री॰ पळणारा जो चोर, इ॰ त्याचे किं॰ कोणेक कामाचे इदून पाठीस लागण्याचा जो व्यापार तो

तोती.

**लगटणें**, कोणेक लक्ष्यातें उद्देशून धरायास किं॰ जिंकायास चाललेंजें सैन्यादि त्याणें त्या लक्ष्याशीं जाऊन ठेपणें; उ॰ फौज येऊन किल्ल्याशीं लगटली तरीं तुमचीतयारी कांहींच नाहीं पुढें कसें; २, कांहीं एक पदार्थ कांहींएक पदार्थाशीं चिकटणें; उ॰ पावसाचे योगानें सगळे कागद एकासएक लगटले; ३, कोणेक पदार्थांत पदार्थांतर त्याच पदार्थाचे रूपानें लोकांत व्यवहार्यता पावावयाजोगें मिसळून देणें; उ॰ श्रीवर्धनचे सुपारींत भोंवरगांवची सुपारी लगटतात.

**लगड**, स्त्री॰ सोनें, रुपें, इ॰ धातूंचा रस करून ओतणींत ओतला असतांजो लांबट आकार होतो ती; २, दे॰ माकण.

**लंगडणें**, मनुष्य, पशु, इ॰ कांनीं पाय अधू असल्यामुळें किं॰ दुखावल्यामुळें त्या पायांवर भार घेववत नाहीं ह्मणून पाय काढीत एकाप्रकारचें बांकडेंबांकडें चालणें.

**लगडतगड**, स्त्री॰ कोणेक कार्य करण्याचीजी सामग्री असावी ती यथास्थित नाहीं, कर्त्यास अवकाश असावा तितका नाहीं, इ॰ अनुपपत्ति असतां तें झालेंसें व्हावें ह्मणून सरासरी तें कार्य सिद्ध करण्याचा जो व्यापार ती; करणें धातुयोगीं प्र॰; उ॰ लांकडें पुरतीं नव्हतीं आणि पर्जन्य वर आला आंगावर तेव्हां लगडतगडकरून एकदांचें घर बांधलेंसें केलें.

**लंगडशाई**, स्त्री॰ लंगडत जाण्याचा जो व्यापार ती; घालणें धातुयोगीं प्र॰; २, एक पाय वरता धरून एका पायानें उड्या मारीत चालण्याचा एक खेळ आहे ती; ३, ३ लिं॰ लंगड्यासच कदाचित् ह्म॰

**लंगडा**, ३ लिं॰ जन्मतः किं॰ मोडल्या दुखावल्यामुळें अधू किं॰ कांटा मोडला, फोड आला, सुजला, इ॰ कांमुळें विकलजो पाय किं॰ हात तो किं॰ तद्विशिष्ट मनुष्य, पशु, पलंग, खुरशी, इ॰ तो; २, ला॰ कांहीं एक अंग वेकल्यामुळें विकलजो व्यापारादि तो; उ॰ एक आसामी जातांच लिहिण्याचें लंगडें पडलें; एक बैल नाहीं याजमुळें नांगर लंगडा झाला.

**लंगणें**, लंगडणें; लंघणें प्रथमार्थीं.

**लगत**, स्त्री॰ कोणेकाचा कोणेकावर गुणक्रियादिसंबंध व्हावयाजोगा त्याशीं असतोजो सामीप्यसंबंध ती; उ॰ या स्थळास नदीची लगत आहे ह्मणून एथें थंडी फार; २, कोणेकाची कोणेकाशीं योनसंबंधामुळें जी जवळीक ती; ३, सहवर्तमान बोलणें चालणें, जाणें, येणें, इ॰ व्यवहार घडत असतां कोणेकाचा कोणेकाशीं होतोजो सामीप्यसंबंध ती किं॰ तन्मूलक होतो दाटपरिचय ती; उ॰ हा लुच्चा आहे याची इतकी लगत आपल्या घरीं कामाची नाहीं; ही गोष्ट त्याजपाशीं बोलायाजोगी इतकी त्याची आमची लगत नाहीं; ४, अ॰ कोणेक अर्थाचे केवळ समीप प्रदेशीं; उ॰ त्या गांवचे लगत नदी आहे; दुसरा नवराचे लगत आहे ह्मणून कोणी नवराआंतच धरतात; ५, नैरंतर्येंकरून एकापुढें एक एकापुढें एक होई असें; उ॰ लगत तीन चिठ्या पाठविल्या तेव्हां निघून आला; इथून लगत चार शेतें आमचीं आहेत.

**लगतलाखोटा**, पु॰ हुंडीपत्राचा, इ॰ मजकूर आंत लिहून त्याच हुंडीपत्रास चिकटवून पाठवितात जो त्या काग

कागदाचा लाखोटा तो; २, जा कागदावर मजकूर लिहितात त्याच कागदाचे शेवटीं कांहीं कोरा अंश राखून तेणेंकरून त्या कागदाचा गुंडाळून करितात जो लाखोटा त्यास कोणी म्ह०

लगता, पु० लगत प्रथमार्थी; २, देश, ग्राम, नदी, पर्वत, इ०जें कोणीएक अवधिभूत तत्सामीप्यसंबंधविशिष्टजो देशविभाग तो; उ० यंदां करनाटकचे लगत्यास चांगलें पीक आलें.

लगताजाव, पु० लगतलाखोटा किं० त्याच लाखोट्यांत त्या हुंडीसंबंधी लिहिलेलाजो जाब तो.

लगनालाखोटा, पु० लगतलाखोटा.

लगती, श्लिं० योनिसंबंधद्वारा ज्याचा जाशीं लगत आहे तो त्याचा; उ० तुह्मी पडलां श्रीमंतांचे लगती तेव्हां तुह्मास असें कसें बोलावें.

लगदन, न० रा० लचका.

लगदा, पु० हिं० कांचेचा बांगड्यांत एक भेद आहे; २, लादा.

लगन, न० लगीन.

लगनघटका, स्त्री० लग्नघटिका शब्दाचा अपभ्रंश.

लगनघर, न० लग्नघर.

लगनचिटी, लगनचिठी, स्त्री० लगीन चिठी.

लगनचुडा, पु० लगीनचुडा.

लगनटका, लगनटक्का, पु० लगीनटका.

लगनदीप, स्त्री० लगीनदीप.

लगनसराई, स्त्री० लगीनसराई.

लगबग, स्त्री० कांहींएक काम लोकर करण्याचा प्रसंग आला असतां अंतःकरणास होत्येजी घाई ती.

लगबगां, अ० भा० यं० लगबगजीतत्पूर्वक कांहीं काम करणें, जाणें, धावणें, इ० कांचे वि०; उ० लगबगां धाविन्नला रघुवीर.

लगम, स्त्री० पु० लगाम.

लंगर, पु० गलबताचाजो लोखंडी नांगर तो; २, लोखंडाची मोठीजी सांखळी तो; ३, ला० साधारण प्रमाणापेक्षां मोठाजो गोठ, सांखळी, सरी, दोर, तुळई, खांब, इ० पदार्थ त्यास म्ह०

लंगरखाना, पु० हिं० अलीजहांकारखाना.

लंगरदोर, पु० दे० गलबताचा लंगर पाण्यांत टाकायाकरितां त्यास बांधायाचाजो मोठा दोर केला असतो तो.

लगलग, अ० अति त्वरेनें, काम करणें, जेवणें, जाणें, इ० कांचे वि०

लगा, पु० थिरा; २, ला० संसारादि निर्वाहोपयोगी जो आश्रय तो.

लगाबांधा, पु० कोणेकास चार पैसे मिळावे, संसार, इ० खटलें चालावें, इ० कांचे विषयीं कोणी सुहृत्संबंधी, आप्त, इ० कांचा लहान मोठा असतोजो आश्रय तो; उ० आह्मास ऐथें कोणाच्या लगाबांधा असता तर भिक्षा कराास मागीतली असती; २, लागाबांधा.

लगाम, पु० स्त्री० हिं० घोड्यानें मनुष्याचे स्वाधीन रहावें, फिरविलें तसें फिरावें, ह्मणून त्याचे तोंडांत लोखंडाचा श्रृंखलासदृश पदार्थ करून घालितात तो ती; २, तोच अनीनीनें विशिष्टझालाअसतां त्याविशिष्टास कोणी म्ह०; ३, ला० कोणेक व्यवहार

व्यवहारादिक विवक्षानुरूपवर्तविण्याचें कोणेकाचे स्वाधीन असनेंजें सूत्र त्यास म्ह०; उ० या फौजेच्या लगाम बक्षीचे स्वाधीन आहे त्यास वश करा म्हणजे झालें; पत्राचार एकदांस ईकरून दिल्ली म्हणजे हातची लगाम गेली; मनुष्यादिपदार्थ कोणेकाचे लगामी किं० लगामेस लागणें म्ह० धनी पुनः परत घेईनांपर्यंत सर्वप्रकारें त्याणें संभाळावा अशाप्रकारें त्याचे स्वाधीन होणें.

लगावणें, काठी, चपराक, चाबूक, इ० कोणेकाचे अंगावर चांगला प्रहार होई असा मारणें; शिव्या लगावणें म्ह० देणें.

लगिन्याबैल, पु० उत्सर्गकरून सोडलेला जो बैल तो.

लगी, स्त्री० राजादिकांचे स्वारीपुढें जरीचे फडक्यांची निशाणें चालवीत असतात तीं प्र०

लग्गीन, न० लग्नाचा अपभ्रंश परंतु प्रा० विवाहार्थी प्र०

लग्गीनगोष्ट, स्त्री० बऱ्हाडगोष्ट.

लग्गीनघडका, स्त्री० लग्नघटिका शब्दाचा अपभ्रंश.

लग्गीनघर, न० लग्नघर.

लग्गीनचिट्टी, लग्गीनचिठी. स्त्री० लग्नचिठी.

लग्गीनचुडा, पु० लग्नचुडा.

लग्गीनटक्का, पु० लग्नटका.

लग्गीनदीप, स्त्री० लग्नदीप.

लग्गीननक्षत्र, न० लग्ननक्षत्र.

लग्गीनसराई, स्त्री० लग्नसराई.

लंगुटी, स्त्री० लंगोटी.

लंगुटीयार, पु० लंगोटीयार.

लगे, अ० कांहींएक काम करण्याविषयीं प्रवृत्त जो कोणी त्याणें तें काम झडून त्वरेनें करावें म्हणून त्याचे प्रोत्साहनार्थ याचा प्रयोग करितात

लगेतगेकरून, अ० कांहींएक कामास पाहिजे तितका वेळ नाहींसा झाल्यामुळें सरासरी, कसेंतरी शेवटास जाऊं म्हणून त्वरेत्वरेनें करण्याचा जो प्रकार त्याप्रकारें; उ० पाऊस डोईवर आला तेव्हां लगेतगेकरून एकदांचें घर शाकारून घेतलें.

लगेलगे, अ० घाईघाईनें कांहीं काम करण्याचें वि०; उ० तुमचें बलावणें आलें तेव्हां लगेलगे जेवलों आणि तसाच आलों; २, स्त्री० कांहींएक काम करण्याविषयीं फार चजी घाई ती; उ० अशी लगेलगे केलीत र काम विघडेल सावकाश करूंया.

लगेहात, अ० हिं० कोणेक कामाचेठायीं प्रवृत्त होताना अंगीं घेतला असतो जो वेग त्याचा मध्यें विराम नहोउंदेतां त्याच वेगानें कोणेक कार्यांतर करण्याचें वि०; उ० तुह्मी बाजारांत जातांच आहां तरेंच लगेहात पुढें जाऊन त्या गृहस्थास बलावून आणा.

लंगोटा, पु० मोठी जी लंगोटी ती.

लंगोटी, स्त्री० केवळ गुह्याचें मात्र आच्छादन व्हावयापुरता जो वस्त्राचा तुकडा कटिगोस्यानें नेसतात ती; २, चार सहा बोटें रुंद आणि हातदीडहात लांब एवढा जो वस्त्राचा तुकडा त्यास पोतबांधणें, इ० इतरकामाविषयीं विनियोग असतां ही म्ह०; ३, शेत, इ० भूमीचे केवळ अरुंद असून लांब फार असे जे अनेक विभाग पाडिले असतात त्यांस प्र० म्ह०

लंगोटीयार, पु० हिं० बाळमित्र.

लगोरी, स्त्री० दे० धोंडे, इट, लांकडाचे तुकडे, इ० पदार्थांचा

र्थांची चेंडूनें पाडावयाकरितां रचितातजी उतरंड ती किं॰ ते पदार्थ प्र॰

**लग्न**, न॰ सं॰ विवाह; कोणेकाचें कोणेकाशीं लग्न लागणें ह्म॰ सर्वदा सर्वकर्मांचेठायीं उभयतांचें साहचर्य असावें असा परस्परांचा संबंध बनलेला असणें; लग्नाचा ह्म॰ ज्यांचा परस्पर विवाहविधीनें संबंध झाला आहे अशीं जीं दादला आणि बायको तीं परस्परांचीं; लग्नसमारंभ, लग्नमुहूर्त, इ॰ स॰; २, विवक्षितकालीं उदयाचलाशीं संलग्न असतो जो मेषादि राशींतील अन्यतम राशि तें; ३, तदुपलक्षित जो काल तें; मेषलग्न, वृषभलग्न, उदयलग्न, अस्तलग्न, इ॰ स॰; ४, ३ लिं॰ संलग्न.

**लग्नकार्य**, न॰ सं॰ लग्न, मुंज, इ॰ जें मोठें कार्य तें

**लग्नकुंडली**, स्त्री॰ सं॰ विवक्षितकालींचे लग्नाच्या अंक पहिल्या कोष्टकांत मांडून तदनुरोधानें इतर राशींचे अंक ज्यांत मांडले असतात अशी जी राशिचक्राची कुंडली लिहितात ती.

**लग्नगोष्ट**, स्त्री॰ कोणेकाचें विवाहरूप किं॰ इतर कोणेकाचें कार्य घडावें एतद्विषयीं आपण तादृश आंतून सांपडतां हा बहुत भला, योग्य, आहे; सासू नसली ह्मणून काय झालें तो मुलीवर पांचशेर सोनें घालील आमची खातरी आहे, इ॰ रूप किं॰ हा पतीचा मनुष्य आहे याला हजार रुपये कर्ज दिल्हें तरीं चिंता नाहीं, इ॰ रूप उपयुक्त जी गोष्ट कोणी बोलतो तीस ह्म॰ प्रा॰ अनेकव॰ प्र॰

**लग्नघटका**, स्त्री॰ लग्नघटिका शब्दाचा अपभ्रंश.

**लग्नघटिका**, स्त्री॰ सं॰ लग्नाच्या मुहूर्तसाधायाकरितां पाण्यांत घातली असते जी घटिका ती; २, लग्न किं॰ मुंज यांच्या मुहूर्त साधायाची जी पूर्णघटिका घालितात ती; ३, लग्न किं॰ मुंज लावण्याविषयीं ज्योतिश्शास्त्रावरून नियमित केला असतो जो मुहूर्तात्मक समय ती; ४, ईषन्मात्र ढळूं देतां कामास नये अशी जी कोणेक कार्याची वेळ तीस आरोपानें ह्म॰; उ॰ ब्राह्मण जेवायास बसले आहेत घरांत तूप नाहीं अशी लग्नघटिका खोळंबली आहे ह्मणून धांवत तुह्माकडे तूप मागायास आलों.

**लग्नघर**, न॰ लग्नसमारंभाची गडबड जेथें चालली आहे असें जें घर तें; २, ला॰ जेथें माणसें बहूत जमल्यामुळें फार गडबड होत्ये आहे असें जें घर त्यास ह्म॰

**लग्नचिटी, लग्नचिठी, लग्नचिठ्ठी**, स्त्री॰ लग्न लावावें अशा आज्ञेची जी शूद्रांस सर्कार चिठी देते ती किं॰ अमुक वेळेस लग्न लावावें अशी जी जोशी चिठी लिहून देत असतो ती; २, आपल्या घरीं लग्न किं॰ मुंज व्हावयाची असतां ग्रामांतरस्थित जे सोयरे धायरे, इष्टमित्र, इ॰ त्यांस आमंत्रणार्थ कुंकुमादिकें करून रंगवून जीं पत्रें लिहून पाठवितात तीं प्र॰

**लग्नचुडा**, पु॰ लग्नामध्यें जा नवरीमूल, इ॰ कांस बांगड्या भरतात तो.

**लग्नटका, लग्नटक्का**, पु॰ लग्नसंबंधी जें सर्कार देय शूद्रादिकांस पडतें तो.

**लग्नटीप**, स्त्री॰ लग्नाचे अनेक मुहूर्त वर्तवून त्यांचा क्रमानें एका कागदावर लेख करितात ती.

**लग्नतीथ**, स्त्री॰ ज्या दिवशीं लग्नास मुहूर्त आहे असा जो दिवस ती.

**लग्ननक्षत्र**, न० सं० लग्नकरण्यास योग्य जें दिवसनक्षत्र तें.

**लग्नपत्रिका**, स्त्री० सं० लग्नाच्या मुहूर्त आपत्रावर लिहून देतात ती जीची विवाहाचे पूर्वी पूजा करीत असतात.

**लग्नमंडप**, पु० सं० विवाहार्थ घातलेला जो मंडप तो.

**लग्नमास**, पु० सं० लग्न करायास विहित जे मार्गशीर्षादिमास ते प्र०

**लग्नमुहूर्त**, न० सं० लग्नकार्य.

**लग्नशुद्धि**, स्त्री० सं० कोणेक कर्मकरण्याविषयीं विवक्षितकालाचे मेषादिलग्नास ज्योतिशास्त्रोक्त मार्गानें ग्रहस्थितीवरून असल्येजी निर्दोषता ती.

**लग्नसराई**, स्त्री० लग्नें करायाचा जो मार्गशीर्षापासून ज्येष्ठपर्यंत काल तो.

**लग्नाउ**, ३ लिं० लग्नाचे उपयोगीं अहेरी, इ० कापड ती.

**लंघणें**, दुरवणें, उपोषण, किं० शारीरकष्ट झाल्यामुळें मनुष्यादि प्राणी किं० त्यांचें शरीर, जीव, हातपाय, यांणीं केवळ सामर्थ्यहीन होणें; २, प्रायः ग्रं० उल्लंघणें.

**लंघन**, न० सं० ज्वरादिनिरसनार्थ जें उपोषण करितात तें.

**लघाळ**, ३ लिं० दुसऱ्यानें अनेकवार निषेधिलें असतांही कोडगेपणानें पुनःपुनः बोलावें अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**लघाळमावशी**, स्त्री० लघाळजी स्त्री तीस म्ह०

**लघिष्ठ**, ३ लिं० सं० अतिशयित जो लघु तो.

**लघु**, ३ लिं० सं० भारानें किं० योग्यतेनें विवक्षिताहून जो हलका किं० आकारानें विवक्षिताहून जो लहान तो; २, गुरु नव्हे असा जो अकारादि वर्ण तो.

**लघुत्व**, न० सं० कांहीं एक कारणामुळें कोणेकाचे योग्यतेस येतो जो उणेपणा तें; उ० ते पिढीचे भिक्षुक त्यांणीं याचना केली म्हणून त्यांस लघुत्व येतें असें नाहीं; २, लघुपणा.

**लघुभोजन**, न० सं० हलक्या पदार्थाचें आणि थोडकें असें जें भोजन तें.

**लघुशंका**, स्त्री० मुतण्याचा जो व्यापार ती किं० मूत्र.

**लघ्वी**, स्त्री० लघुशंका.

**लचक**, स्त्री० पाय, कमर, इ० कोठें लचकल्यामुळें आंत शिरेवर शीर चढून अम्मळ चलन झालें असतां वेधना लागायाजोगा जो विकृतिविशेष कांहीं काल राहतो ती; प्रा० भरणें धातुयोगीं प्र०

**लचकणें**, हस्तपादादि शरीरावयव समविषम स्थलादिकांचे ठायीं वांकडा तिकडा पडल्यामुळें आंतील शिरा, इ० कांस धक्का बसे अशा आंचक्यानें विशिष्ट होणें.

**लचका**, पु० मांस, पिष्टादिकांचा गोळा, इ० कांचा कमलाकार हस्तानें किं० मुखानें तोडून काढिला जो मोठा अंश तो.

**लच्चलालचंगला**, ३ लिं० चालणें, ओझें वाहणें, इ० कर्म करतांनां जो थकला, भागला, किं० दुखावला, पडला, किं० दुखणें, इ० कानें जेर झाला तो; २, ला० द्रव्यादि साधनानें हीन झाल्यामुळें

त्यामुळें विवक्षितव्यापारीं थकलाजो तो.

**लचंड, लचांड**, न॰ प्रा॰ कचाट.

**लचंडखोर, लचांडखोर**, ३ लिं॰ नाहींनाहींतीं लचांडें करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**लचंडी, लचांडी**, स्त्री॰ लचांड; २, ३ लिं॰ कचाट्या.

**लंछन**, न॰ लांछनशब्दाचा अपभ्रंश.

**लजत**, स्त्री॰ कोणेकविषयींची कोणेकास लागलीजी खोड ती; २, रंग, राग, भाषा, रीति, रुचि. इ॰कामध्यें रंगांतर, रागांतर; इ॰कांची मारत्येजी छटा ती.

**लज्जा**, स्त्री॰ सं॰ लाज; लोकलज्जा, जनलज्जा मनोलज्जा, इ॰ स॰

**लज्जायमान**, ३ लिं॰ सं॰ लज्जित.

**लज्जाहोम**, पु॰ विवाहांत लाह्यांचाजो होम करित असतात तो.

**लज्जित**, ३ लिं॰ सं॰ लज्जायुक्त झालाजो तो.

**लटक**, स्त्री॰ गाणें, बोलणें, चालणें, इ॰कांमध्यें इतरांहून विलक्षणजी कोणेकाची निराळीच तऱ्हा असत्ये ती; उ॰ त्याचे गाण्याची लटक मी साधायास जातों पण साधत नाहीं; २, लकबया अर्थीही क्वचित् प्रयोग होतो.

**लटकणें**, खालीं लोंबत हालत रहायाजोगें कोणेक पदार्थानें वरचे आधाराशीं संबंध असणें, लटकत चालणें स॰ नखऱ्यानें ठुमकत चालणें.

**लटकण, लटकन, लटकर, लटदिशीं**, अ॰ अनु॰ निजलेला किं॰ बसलेलाजो मनुष्यादि त्याणें मध्येंमध्यें विराम न घेतां एकाच वेगानें तटकन उठण्याचें वि॰

**लटका**, ३ लिं॰ वास्तवकारींजा रूपानें इंद्रियगोचर होतो वस्तुत; तद्रूप नव्हे असाजो भ्रमविषय सर्प रजतादिपदार्थ किं॰ अनृत जें भाषणादि तो; २, ज्याचे बोलण्याकरण्यांत प्रमाणिकता नाहीं असाजो मनुष्य तो; ३, निरर्थक किं॰ निष्कारणजो व्यापारादि अर्थ तो; उ॰ गेलों खरा पर काम कांहीं झालें नाहीं लटकी खेप मात्र पडली; मी कांहीं अपराध केला नसतां लटक्या मला शिव्या कां देतो; ४, वाय्वादिविकृतीनें कलनचलनादि चेष्टा करायास किं॰ स्पर्शादि समजायास कारणीभूतजी चेतना ती मेलीज्याची असेंजें शरीर किं॰ शरीरावयव तो.

**लटकाफटका**, ३ लिं॰ लटका, इ॰ तो.

**लटाकावणें**, कोणेक पदार्थावरील आधाराशीं लटके असा संबंध करणें.

**लटकुरा**, ३ लिं॰ रा॰ लटका द्वितीयार्थीं.

**लटपट**, स्त्री॰ हिं॰ कलहवादायाजोगाजो परस्परांचा अरेतुरे, इ॰ भाषणादिव्यापार होतो ती; उ॰ कालदेवळांत त्यांची आमची लटपट झाली म्हणून मी त्यांजकडे आज जात नाहीं; २, वाद, युद्ध, इ॰ प्रसंगीं क्रोधावेश, भय, इ॰ कारणामुळें कोणेकाची घाबरेपणानें जीभ मोडावी, कांहींच स्फुरूं नये, इ॰ रूप होत्येजी अवस्था ती; उ॰ हा पंडित बोलूं लागतांच त्या पंडिताची लटपट झाली; ३, अ॰ अनु॰ ढिला झालेलाजो खुंटी, खिळा, खांब, इ॰ त्यांचे ढिलेपणामुळें जें हालणें त्याचें वि॰ खुंटी. इ॰ लटपट करणें स॰ लटपट हालणें

हालणें.

लटपटणें, खुंटी, इ॰ कानें लटपट हालणें; २, कोणेकास प्राप्त झालेला किं॰ होणार जो मामलत, इ॰ अधिकार किं॰ आरब्ध अथवा आरंभणीय जो सावकारी, इ॰ व्यवहार त्याणें कांहीं कारणामुळें त्यात्या रूपेंकरून नाहींसा होणें; उ॰ मामलतीचे छंदास पडला तेणेंकरून पहिली सावकारी होती ती लटपटली आणि मामलत होणार होती तीही लटपटली; ३, विवक्षित अधिकाराद्यधिकरणीं तनद्रूपेंकरून संबध्द झालेला जो मनुष्यादिपदार्थ, भाषण, लेख, व्यवहार, इ॰ त्याणें दुसरा कोणी वरचढ आल्यामुळें किं॰ निरुपयुक्त झाल्यामुळें अथवा तें अधिकरण नाश पावल्यामुळें रद्द पडणें किं॰ तत्तदधिकरणीं संबध्द होणार जो तो मनुष्यादि त्याणें त्यात्या कारणामुळें लागून पडतां रद्द पडणें; उ॰ पहिला कारभारी येतांच नवे कारभारी झाले होते ते लटपटले; त्याचे वक्तृत्वापुढें आमचीं सान्यांचीं वक्तृत्वें लटपटलीं; तो कारखाना मोडतांच सारे कारकून लटपटले.

लटपटपंची, पु॰ हिं॰ हा शब्द पोपटास शिकवितात; २, स्त्री॰ ला॰ अंगीं तादृश विद्या सामर्थ्य नसतां मोठेंडौलाचें जें बोलणें त्यास निंदेनें म्ह॰; उ॰ एवढे डौलानें कशाला बोलतां तुमची लटपटपंची मजपुढें चालायाची नाहीं.

लटपटीत, ३ लिं॰ लटपट हालतो जो खांबादि पदार्थ तो; २, ला॰ पक्केपणीं ठरला नाहीं असा जो मामलत, धंदा, मसलत, भाषण, काम, व्यापार, इ॰ तो.

लटंबर, न॰ जाणें, येणें, इ॰ प्रसंगीं मनुष्यादि समुदायात्मक जें मोठें खटलें त्यास म्ह॰

लटरफटर, न॰ ज्या समुदायास अमुक असें नाव देतां येत नाहीं असा जो अनेक जातींचे लहान सहान अनेक पदार्थांचा समुदाय त्यास प्रतिव्यक्तीचा नामनिर्देश करावयाविषयीं अप्राधान्यामुळें अविवक्षा असतां म्ह॰

लटलट, लटलटां, अ॰ अनु॰ हालणें किं॰ कांपणें यांचे वि॰ लटलट करणें म्ह॰ लटलट कांपणें.

लटांबर, न॰ लटंबर.

लटिंगा, पु॰ कों॰ सरासरी मणगटापासून पायांचे पोटरीपावेतों इतक्या मानाचा जाडा आणि सुमारें दीडदोन हात लांबीचा गोल असा जो लाकडाचा तुकडा तो.

लटीक, ३ लिं॰ लटका प्रथमार्थीं.

लटीकवाद, पु॰ रा॰ लटकें बोलल्याचा लटकेपणारूप जो कोणेकावर दोष येतो तो; उ॰ मी देतों म्हणून बोललों आतां जर न दिल्हें तर मजकडे लटीकवाद येईल.

लटूफटू, लटूबटू, अ॰ लुटूफुटू.

लटूबटूचा, ३ लिं॰ लुटूफुटूचा.

लटूबुटयां, अ॰ कों॰ लटूफटू.

लटूबुटयांचा, ३ लिं॰ कों॰ लुटूफुटूचा.

लटोरा, पु॰ अरगडीओंधळ्यांत एक भेद आहे.

लठ्ठ, पु॰ हातांत घ्यावयाचा मोठा जाड जो सोटा तो; २, ३ लिं॰ सामान्यप्रमाणापेक्षां स्थूल जें शरीर, शरीरावयव, सूत, तन्निर्मित वस्त्र, भाकर,

अलंकार, मनुष्य, इ० तो.

लठ्ठनिरंजन. पु० निरक्षर होत्साता शरीरानें धष्ट पुष्ट असून जो दांडगा त्यास म्ह०

लठ्ठभारती, पु० लठ्ठनिरंजन.

लठ्ठा, ३लिं० लठ्ठ द्वितीयार्थी.

लठ्ठाई, स्त्री० दांडगाई.

लठ्ठामिश्र, पु० लठ्ठनिरंजन.

लठ्ठालठ्ठी, स्त्री० सोटे, दांडे, इ० कांनीं जी परस्परांची मारामारी ती.

लठ्ठाश्रम, पु० लोटाश्रम.

लठ्ठेश्वर, पु० लठ्ठनिरंजन.

लठ्ठ्या, ३लिं० लठ्ठा.

लड, स्त्री० एका सूत्रांत मोत्यें किं० फुलें ओंवून खालीं गुच्छाकार करून जो त्याचा सर करितात ती.

लंड, ३लिं० पक्का धूर्त हरामी जो मनुष्यादि तो; २, पु० प्रसंगविशेषीं शिश्नास म्ह०

लडथड, स्त्री० देणें, घेणें, इ० जो कोणेक परस्परांचा व्यवहार त्यामध्यें कोणेक अंशीं परस्परांचा हिशेब, इ० न मिळाल्यामुळें राहत्येजी विवादविषयता ती; २, तन्निमित्तक जो परस्परांचा विवाद ती; उ० त्याचें आमचें वरकड सारें खटलें तुटलें परंतु शंभर रुपयांचे कलमाची लडथड पडली आहे; त्या दागिन्याविषयीं त्यांची त्यांची आज चार वर्षें लडथड पडली आहे.

लडदू, ३लिं० गबदूल.

लडधू, ३लिं० गबदूल.

लडबड, स्त्री० लुडबुड; २, कों० निद्रेनें निचेत झाला जो त्याचे किं० दुखणें, उपवास, इ० कानें केवळ अशक्त झाला जो त्याचे शरीराचा ताठपणा जाउन केवळ लवलवीतपणानें विशिष्ट असा होतोजो परिणाम ती किं० रहाट, इ० कांचे पट्ट बसलेलेजे सांधे ते सईल झाल्यामुळें ईषत् चलनादि झालें असतां लटपट लटपट हालायाजोगा शिथिलपणा विशिष्ट होतोजो परिणाम ती; खुंटी, इ० कानें लडबड करणें किं० हालणें म्ह० लटपट करणें.

लडबडणें, थरथरणें; २, लटपटणें प्रथमार्थी; ३, लुडबुडणें.

लडबडीत, ३लिं० चिखल, शेण, इ० कानें लडबडलेला जो हस्तादिक तो; २, लटपटीत.

लडबड्या, ३लिं० लुडबुड्या.

लंडभारती, पु० सर्वदा नागवा असतो असा जो गोंसावी, इ० त्यास निंदेनें म्ह०

लंडाई, स्त्री० लंडपणा.

लडिवाळ, ३लिं० लाडका; २, पु० लाड पुल्लिंगार्थी

लडी, स्त्री० दे० लड.

लेंडी, स्त्री० रंडा, परंतु नामर्दपणामुळें कोणेकाचें हीनत्व वर्णायाचें असतां त्यास आरोपानें म्ह०; उ० युद्धांतून पळणें हे लंडीचें काम; मी कमर बांधल्यावर कोण लंडी पुढें येत्ये पाहूं.

लड्डु, पु० सं० लाडू.

लड्डुक, पु० सं० लाडू.

लढ, स्त्री० कों० समुद्रांतून लाटेवरावर चिखलाचे गोळे येऊन तीरीं पडत असतात ती.

लढणें, कोणेकानें कोणेकाबरोबर झूंजणें; २, ला० कोणेक अर्थानें सजातीय अर्थांतराशीं विवक्षित गुणद्वारा साम्य पावणें; उ० हें पागोटें त्या

पागोट्या

पागोष्टयाविषयीं लढवून पाहिलें पण लढत नाहीं; ३, कोणेक अर्थानें लेंढारूपानें उपस्थित होणें.

लढवई, लढवाई, ३ लिं० लढण्याविषयीं समर्थ किं० लढण्याचे उपयोगी जो शिपाई, घोडा, नौका, इ० यान, बाडा, कुत्रा, शस्त्र, इ० तो.

लढा, पु० प्रायः लडथड प्रथमार्थी; २, रा० कोणेक गतिमंताची सारखेपणेंचालली असतां जी गति तिचा वेगाचा यत्किंचित् कुंठीभाव होण्यास कारणीभूत मध्यें जें कांहीं प्रतिबंधक लागतें तो; उ० या कागदावर घोंटणीं नाहीं म्हणून रेघ ओढतांना मध्यें लढा लागतो; वायूनें जीभ आडखळल्यामुळें अस्खलित म्हणतां येत नाहीं म्हणूं लागलें असतां मध्यें लढा लागतो.

लढाई, स्त्री० लढण्याचा जो व्यापार तो.

लढाऊ, ३ लिं० लढवई.

लटी, स्त्री० कों० लढ.

लढ्या, पु० लढ; २, विरवल, इ० कांचा जो गोळा तो.

लतकोडगा, ३ लिं० पराकाष्टेचा जो कोडगा तो.

लता, स्त्री० औषधिवनस्पतींत एक भेद आहे जीचा शाखा तंत्वाकार लांबलांब, असतात आणि भूमि किं० इतर वृक्षादि यांस आश्रयून विस्तार पावतात

लत्ता, स्त्री० कोणेकास प्रहार करण्याविषयीं साधनत्वें करून विवक्षित जें पाद तल तो; लत्ताप्रहार, इ० स०; कोणेकाचे लत्तेस शनी येणें, असणें, म्ह० जन्मस्थानापासून द्वितीयस्थानीं असणें; २, पु० लगता द्विती यार्थी.

लथडणें, लथाडणें, कोणेकास लत्तानीं पुष्कळ मारणें; २, ला० वाद युद्धादिकांत प्रतिस्पर्धी जो त्यास पराजयानें केवळ तुच्छ करून टाकणें; ३, प्राप्त झालेलें किं० प्राप्त होणार जें राज्य, दौलत, इ० त्यानें तुच्छ मानून त्यागणें; ४, सिद्ध व्हायास आलें जें कोणेकाचें कांहीं एक काम त्यातें कांहीं विघ्न करून भंगून टाकणें.

लदाव, पु० कोनाडा, इ० कांवर कमानी सारखा किं० देवळाचा गाभारा, इ० कांवर पालथें पाठीसारखा जो विटा, चुना, दगड, इ० कांनी रचनाविशेष करितात तो.

लपका, पु० लचका.

लंपट, ३ लिं० सं० संसार, स्त्री, इ० विषयांचे ठायीं जो अतिशयित आसक्त तो; स्त्रीलंपट, विषयलंपट, इ० स०

लपंडाई, स्त्री० दे० लपंडाव.

लपंडाव, पु० कोणी दडावें, कोणी त्यास शोधून काढावें, इ० रूप एक मुलांची क्रीडा आहे; २, ला० सावकार, इ० कांशीं तोंड चुकवून वर्तावें किं० भाषणामध्यें धोरत्यानें, कांहीं विवक्षितांश गुप्त राखून बोलावें किं० आपलें अंग बाहेर न दाखवितां आंतून कोणेक व्यवहाराचीं सूत्रें चालवीत असावें, इ० रूप जो कपटाचार त्यास म्ह०; करणें; खेळणें, इ० धातूंचे योगीं म०

लपणें, दडणें; २, तुळई, फळी, कडी, इ० भार पडल्यामुळें मध्यें लवणें.

लपूनछपून, अ० उघडीक न होई असें करणें, राहणें, इ० कांचे वि०

लपेट, पु० स्त्री० लपेटा; २, स्त्री० काष्ठ, पाषाण, इ० कांचा

कांचा जो परिधि ती; ३, आंतील पांचपेंच, इ० दुसऱ्यानें मनांत येऊं नये कांहीं खोटें असलें तथापि खोटें सेंवाटूं नये दुसऱ्यास आकोसाघ्यावयास अवसर सांपडूं नये अशीजी भाषणादिकांत कोणेकाची धूर्तपणाची हातोटी असत्ये ती; उ० त्याची अशी कांहीं बोलण्याची लपेट आहे किंवर शंका करायास अवसरच सांपडत नाहीं; कोणेक गोष्ट लपेटीखालीं नेणें, इ० स्थलीं आंतील व्यथाचीउघडीक, दुसऱ्याची शंका, इ० न होऊं देतां लपेटीनें साधून नेणें; ४, उन्हाळ्याचे दिवसांत सूर्यकिरणानीं संतप्त झालेला मनुष्यादिकांस लागला असतां बाधतो जो वायु ती; ५, पटकी ह्मणून जो उपद्रव त्यास ह्म०

लपेटणें, कोणेक पदार्थ वस्त्रादिकानें अंगाबरोबर सभोंवता वेष्टिन करणें; पक्षीं त्यावस्त्रादिकांसही कर्मता, कोणेक गोष्ट लपेटून नेणें ह्म० लपेटीखालीं नेणें.

लपेटा, पु० कोणेक पदार्थाचे सभोंवतें लपेटलेलें जें वस्त्र, चर्म, शेण, चिखल, इ० कांचें असतें वेष्टन तो; उ० अडुळशाचा पाला एका पानांत घालून त्याचा पुडा करून त्याचे भोंवता शेणाचा लपेटा देऊन फुपाट्यांत भाजावा; २, तार गुंडाळलेल्याजा बांगड्या ती; उ० अरे कांसारा या मुलीचे दोहीं हातांत लपेटाच भर.

लपोडशंख, पु० कोणी कांहीं द्रव्यादि मागितलें असतां किं० कांहीं काम करूं सांगितलें असतां देईन, करीन, असें ह्मणत असावें मोठ्यामोठ्या डोलाच्या गोष्टी सांगाव्या परंतु कांहीं करूं नये असा स्वभाव ज्याचा तो.

लप्पंछप्पं, न० प्रायः गडंपडं याअर्थी.

लप्पा, पु० शेला, पागोटें, इ० कांस मोठा जो जरीचा पदर असतो तो; २, गोलजें लांकूड त्याची कोणेक बाजू सपाट करायासाठीं त्याबाजूचा वरल्या अंगाचा करवतानें जो तकता काढितात तो; ३, स्त्रियांचें कंठभूषण आहे.

लप्पेदार, ३लिं० लप्प्यानें युक्त जें शेला, पागोटें, इ० वस्त्र तो.

लफणें, कों० लपणें द्वितीयार्थी.

लफलफणें, मांसल स्फटलेला जो गो महिष्यादिकांची कास दोंद, इ० अवयव त्याणें थलथल हालणें.

लफा पु० लप्पा; प्रथमद्वितीयार्थी.

लफेदार, ३लिं० लप्पेदार.

लब, स्त्री० जें नियमित नित्य असें नव्हे प्रसंगवशात् कदाचित् उपस्थित होणार अतएव जें कोणेकाचाकराचेमाथां मारलेंअसतें असें नाहीं असें जें कोणेकास बलावून आणणें, कोणेकास कांहीं निरोप सांगणें, इ० रूप लहान सहान श्रीमंत लोकांचे अवलचें नैमित्तिक काम ती; लबेचा ह्म० लबेचें काम करायाकरितां बाळगला असतो जो कारकून, शिपाई, इ० तो.

लंब, पु० सं० खांब, भिंत, इ० कांचे उभेपण्याचा उजूपणा पहावा इत्यादर्थ एका दोरीस बांधून वरून खालीं सोडितात जो शिसें, दगड, इ० कांचा गोळा तो; २, दीर्घ जो अवयव तो; लंबोदर, इ० स०

लबई, स्त्री० लब.

**लंबक**, पु॰ सं॰ लंब.

**लबक**, स्त्री॰ लकब.

**लंबकर्ण**, पु॰ गाढवास संकेतानें म्ह॰

**लबका**, पु॰ मांस, चिखल, शेण, इ॰ कांचा सरासरी ओंबा, कवंठ, एवढाजो गोळा तो.

**लंबन**, न॰ सं॰ सूर्यग्रहणीं दर्शांनाबराबर जादेशीं मध्यान्ह होतो तेथेंमात्र तत्समयीं ग्रहण दृग्गोचर होतें त्यादेशाहून पूर्वेकडील देशीं कांहीं पूर्वींग्रहणाची दृग्गोचरता होत्ये आणि पश्चिमेकडील देशीं कांहीं मागून होत्ये असेंजें देशपरत्वें ग्रहणाचे दृग्गोचरतेस कालकृत अंतर असतें तें.

**लबलब**, अ॰ अनु॰ अतित्वरेनें खातानां, बोलतानां जें तोंडाचें हालणें त्याचें किं॰ तादृश तोंड हालनजें तसें खाणें, बोलणें, त्याचें वि॰; निंदाविषयीं प्र॰; उ॰ माझेगोष्टींत तूं बोलूं नको म्हणून शंभरवेळ सांगितलें तथापि मध्यें लबलब बोलतो.

**लबलबीत**, ३ लिं॰ ज्याचा गोळाकरूं गेलें असतां घट्ट बांधला जात नाहीं इतका पातळजो शेण, चिखल, पीठ, इ॰ पदार्थ तो.

**लंबा**, ३ लिं॰ मृत्यूनें किं॰ मूर्छेनेंजो भुईवर आडवापडला तो; होणें किं॰ करणें यांजवर अन्वय; उ॰ पेठणास अकस्मात् जेव्हांपटकी आली तेव्हां एकादिवसांत हजारमाणूस लंबे झाले; माजूम गोडलागल्यानें पाहिजे तितकी खाल्ली आतां अवघे लंबे होऊन पडले आहेत; २, ला॰ खरचल्या, बुडल्यामुळें, नाहींसा झालाजो पैका, धान्य, इ॰ किं॰ कोसळल्या पडल्यामुळें जमीनदोस्त झालाजो भिंत, झाड, इ॰ तो.

**लंबाड्या**, ३ लिं॰ दे॰ लंबाडचा.

**लबाड**, ३ लिं॰ व्यवहारीं लोकांबराबर वागण्याविषयीं खोटें बोलूं नये, दुसऱ्यास दुखवूं नये, दुसऱ्यानें कांहीं आपला अपराध केला असतांही सोसावें, इ॰ जे चांगले गुण ते अंगीं असून तद्विरुद्ध गुण ज्याचे अंगीं असतात असाजो मनुष्यादि तो; २, अप्रमाणिकजो मनुष्य, भाषण, लेख, कागद, ग्रंथ, आचार, धर्म, इ॰ तो; लबाड बांधून नव्हे या वाक्याचा कोणेकावर लबाडपणाचें विधान कर्तव्य असतां प्रयोग करितात.

**लबाडकी**, स्त्री॰ लबाडपणा.

**लबाडलच्चाड**, ३ लिं॰ लबाड, चोर, इ॰ रूपजो दुर्गुणी मनुष्यादि तो.

**लबाडलाताड**, ३ लिं॰ लबाडलच्चाड.

**लबाडी**, स्त्री॰ लबाडकी; २, लबाडीजांत असल्ये किं॰ लबाडीनें रचलेलीजी गोष्ट, इ॰ ती; उ॰ त्याणें लबाडी सांगितली; हीसर्व लबाडी आहे; ३, दे॰ दगड, इ॰ उचलायाला किं॰ उंचकरायास लावतातजी तरफ ती.

**लबाडीलच्चाडी, लबाडीलाताडी**, स्त्री॰ लबाडी, लुच्चेगिरी, इ॰ ती.

**लंबाड्या**, ३ लिं॰ सामान्यप्रमाणापेक्षां भारी उंच असूनजो पातळ अंगाचा मनुष्य त्यास निंदेनें म्ह॰

**लंबाण**, पु॰ चारण प्रथमार्थीं; २, न॰ चारणांचें बैल, बायका, बिऱ्हाड, इ॰ जें खटलें तें.

**लंबाणभाऊ**, पु॰ लमाणभाऊ.

**लंबाणी**, ३ लिं॰ लंबाणसंबंधीजो माल, बैल, वेष, भाषा, इ॰ तो.

लंबायमान, ३लिं० विवक्षितप्रमाणापेक्षां जो दीर्घ तो.

लंबू, पु० बंबू.

लंबे, ३लिं० लंबा.

लंबेरा, पु० देशांतरादिकांस निघालें असतां मार्गी बरोबर असतो जो बायका, मुलें, घोडीं, गुरें, माणसें, इ० रखटलें तो.

लंबोदर, पु० सं० गणपति; २, ला० ज्याचें लांब पोट त्यास आरोपानें स०

लब्ध, ३लिं० सं० कोणेक व्यवहार, मनुष्य, इ० कांपासून कोणेकास मिळाला जो कांहीं एक अर्थ तो; लब्ध आहे धन ज्यास तो लब्धधन; लब्धाधिकार, लब्धोपदेश, इ० स०; २, शब्दवाक्यादिकांपासून वाच्य व्यंग्यादि मर्यादेनें निष्पन्न झाला जो कांहीं एक अर्थ तो; उ० त्याचांचून मला क्षणभर करमत नाहीं या वाक्यापासून त्याजवर माझा सर्वप्रेमा आहे असा अर्थ लब्ध होतो; ३, न० ३लिं० भाजकानें भाज्य भागिला असतां तें फल येतें तें.

लब्धप्रतिष्ठ, ३लिं० सं० विद्यादिगुणलोकांत प्रसिद्ध होऊन एकवार ज्याची प्रतिष्ठा झाली आहे तो; परंतु अधिक विद्यादि संपादून अधिक प्रतिष्ठा मिळवावी एतद्विषयीं त्याचें औत्सुक्य वर्णनीय असतांच प्राय. प्र०

लब्धप्रतिष्ठा, स्त्री० सं० अंगीं तादृश योग्यता नसतां उगीच मिरवितात जो प्रतिष्ठेचा डोल ती.

लब्धप्रतिष्ठित, ३लिं० सं० लब्धप्रतिष्ठ.

लब्धि, स्त्री० सं० कोणेक व्यवहारापासून द्रव्यादिरूप फलाची किं० कोणेकापासून दानादिद्वारा निर्गत जें द्रव्यादिक त्याची आपलेपणानें आपल्याशीं होत्सेजी संबद्धता ती; २, लब्ध तृतीयार्थी; ३, लभ्यांश.

लभ्य, ३लिं० सं० याचनादिद्वारा मिळाया जोगा जो द्रव्यादि पदार्थ तो; २, लब्ध प्रथमार्थी कोणी प्रयोग करितात; ३, लभ्यांश.

लभ्यांश, पु० सं० प्राप्तांश.

लमाण, पु० न० लंबाण.

लमाणभाऊ, पु० लमाणजातीय जो पुरुष त्यास स०; २, ला० लंबाडयास स०

लमाणी, ३लिं० लंबाणी.

लय, ३लिं० सं० लई; २, स्त्री० मृदंग, वीणा, इ० वाजविल्यानंतर कांहीं काल बारीक जो नाद रहात असतो ती; ३, पु० कोणेक पदार्थ पदार्थांतरांत मिळाला असतां तद्रूपता पावल्यामुळें होतो जो नाहींसेपणा तो; ४, जगाचा जो प्रलय तो; ५, संपत्यादिकांचा जो प्रध्वंसाभाव तो; ६, न० अंतःकरणाची एकाग्रता होउन कोणेक विषयाकडे लागतें जें लक्ष्य तें.

लयलूट, स्त्री० कोणेक पदार्थाची होत्सेजी रगड ती.

ललकारणी, स्त्री० ललकारून करितात जो शब्द ती; २, ललकारण्याचा प्रकार ती; उ० हा गातो तेंच तो गातो परंतु त्याची कांहीं ललकारणी निराळी आहे.

ललकारणें, दूरवर ऐकायास जावें आणि लांब आणि उंच स्वर असावे असा एक शब्द करण्याचा प्रकार आहे त्या प्रकारानें चोपदार, इ० कांनीं तीं तीं वाक्यादि उच्चारणें; २, दूर स्थित जो कोणी त्यास पूर्वोक्त

पूर्वोक्तप्रकारें मोठ्यानें हाक मारणें.

ललकारी, स्त्री० ललकारणी.

ललत, पु० गाण्यांतील एक राग आहे

ललना, स्त्री० सं० स्त्री.

ललललल, अ० अललललल.

ललाट, न० सं० कपाळ ह्मणून जो नेत्रावरील शरीरावयव तें

ललित, ३लिं० सं० सुंदर; २, न० ललीत.

ललितापंचमी, स्त्री० सं० आश्विनशुक्लपंचमी त्या दिवशीं ललिता ह्मणून देवी आहे तिची पूजा करीत असतात.

लव, पु० कों० एक वृक्ष आहे; २, त्याचें जें फल तें; ३, सं० कोणेक पदार्थाचा केवल सूक्ष्म जो अंश तो; ४, ज्योतिःशास्त्रादिकांचेठायीं साधारण अंशास ह्म०; ५, स्त्री० लंव.

लँव, स्त्री० दाढी, मिशी, डोकी, इ० स्थानीं जे कठोर केश असतात त्यावांचून पाठ, पोट, हात, पाय, इ० अवयवांवर जे बारीक कोमळ केस असतात ती; २, पशु इत्यादिकांचे अंगावर असतात जे केश ती; कोणेकाची लंवलंव बोलत्ये, इ० स्थलीं तो अनेकप्रकारें अतिशयित त्वरित बोलतो.

लवकर, अ० शीघ्र; २, कालकृत विलंब न होऊं देतां पूर्वी; उ० हे रुपये जर लवकर घालतर पुनःपाहिजेत तेव्हां देईन; ३, जा कार्याचा जो नियमित काल तो न लागतां पूर्वी; उ० यंदा लवकर पेरे झाले ह्मणून दोनें लवकर पिकलीं; ४, न० उशीराचा प्रतिपक्षी जो कालनिष्ठ धर्म तें; उ० अजून लवकर आहे एव्हांच कवास जातां.

लवका, ३लिं० किंचित् भार पडला असतां किं० वांकविला असतां वांकला जातो असा जो काष्ठादि पदार्थ तो.

लवंग, स्त्री० सं० एक झाड आहे; २, त्याचें जें फूल ती जें सुगंधी आहे विड्यांत खातात; ३, ला० त्या पुष्पासारिखें कर्णांत घालावयाचें सुवर्णादिकांचें भूषण करितात ती.

लवंगणें, कों० वाटेनें चालत्येसमयीं पाय वांकडा पडणें, आर अधिक होणें, इ० कारणास्तव शरीर किं० पाय, इ० अवयव दुखावणें.

लवंगीमिरची, स्त्री० लवंगेसारिखी बारीक आणि अतितिखट अशी एका जातीची मिरची आहे ती; आणि तिचें जें झाड ती.

लवँगेल, लवँग्येल, न० लवंगांचें जें तेल तें.

लवचीक, ३लिं० लवका.

लवंडणें, यथायोग्य स्थितीनें भूम्यादिकांवर स्थित जो पात्रादिपदार्थ त्यानें एका बाजूवर धक्का, इ० कानें पाडणें किं० तसें करून तदंतस्थित जो जलादिपदार्थ तो बाहेर सांडणें; २, बिछाना, इ० कांचे ठायीं सुखार्थ आडवें पडणें.

लवडा, पु० शिश्न.

लवँडी, स्त्री० बटीक.

लवँडीचा, ३लिं० शिवी आहे.

लवडेलूट, स्त्री० ला० धान्यादिकांची अतिशयित जी समृद्धि ती; जेणेंकरून त्यापदार्थास कोणी विचारीना असें होतें.

लवण, पु० सं० क्षार ह्मणून जो रस तो; २, न० मीठ; ३, दोहों बाजूंस उंच वटा असून मध्यें जी निम्न

जागातें.

**लवणाभंजन**, न॰ भाषणादिव्यापारांत आपली विशेषनम्रता दिसायाजोगा साधारणासही लवून नमस्कार करावा, महाराज, इ॰ शब्दानें बोलावें, इ॰ रूपजो प्रकार असतो तें.

**लवणशाक**, पु॰ स्त्री॰ लोणचें.

**लवणें**, शरीर, काष्ठ, इ॰पदार्थानें वर कांहीं नेट आल्यामुळें अनुक्रमानें संबद्ध होत गेलेलें जे त्यारंभकपरमाण्वादि अवयव त्यांचा रेषा कांहीं अन्यथा होई अशास्थितीवर तुटल्या मोडल्यावांचून येणें; वीज, डोळा, यांणीं लवणें ह्म॰ स्फुरणें; मनदेवता, मनपिंगळी. यांणीं लवणें ह्म॰ वाहणें.

**लवंथा**, पु॰ रा॰ कमलाकार हस्तानें कोणेकाचे शरीराच्या ओटिलाजो मांसगोलक तो; येणें, काढणें, धातु योगीं प्र॰

**लवलवणें**, एकत्रस्थित जे अनेक किडे, इ॰ जीव त्यांणीं वळवळत असणें; २, प्रसंगीं कांहीं बोलायासाठीं कोणेकाचे जिव्हेनें स्फुरणविशिष्ट होणें.

**लवलवीत**, ३ लिं॰ लवचीक, कोमल, मृदु, असाजो कोंवळें, पडवळ, दोडका, पोकळा, चांगला शिजलेला भात, मळलेली कणीक, पोटऱ्या, इ॰ शरीरावयव, इ॰ पदार्थ तो.

**लवलक्षण**, न॰ रा॰ मनुष्य, पशु, इ॰ कांचे अंगीं टवटवी, हुरेखपणा, इ॰ गुणनिमित्तक जी दर्शनीयता ह्मणून दिसत असत्ये तें.

**लवलाहीं**, अ॰ ग्रं॰ सटकर.

**लवलेश**, पु॰ कोणेक अर्थाचाई षदंश तो; प्रायः निषेधविषयीं प्र॰; उ॰ घरांत तुपाचा लवलेश नाहीं; त्या गोष्टीचा लवलेश मला ठाउक नाहीं.

**लवाजमा**, पु॰ हिं॰ डौल दिसायाजोगा समागमें बाळगतात जो कांहीं थोडीं, माणसें, इ॰ रूप रवटला तो.

**लव्हा**, पु॰ तृणांतील एक भेद आहे; जो प्रायः नद्यादिकांचे तीरीं असतो.

**लव्हाणा**, पु॰ गुजराथी लोकांत एक भेद आहे.

**लव्हार**, पु॰ लोहार.

**लव्हारकाम**, न॰ लोहारकाम.

**लव्हारसाळ**, स्त्री॰ लोहाराची लोखंडाचे दागिने घडायाचीजीजागा ती.

**लव्हाळा**, पु॰ लव्हा.

**लव्ही**, स्त्री॰ कों॰ लव्ह्यांत एक जाति आहे, जीची काडी बारीक आणि लहान असत्ये ती.

**लशाकोडया**, ३ लिं॰ रा॰ ज्याचे अंगांतून लस वाहत्ये आहे कोड अंगावर फुटलें आहे असाजो मनुष्य तो.

**लशीरवरूज**, स्त्री॰ ओलीजी रवरूज ती.

**लश्कर**, **लष्कर**, न॰ हिं॰ सैन्य; २, पु॰ तोफखाना, इ॰ कितीएक कारखान्याकडे रवटपटीस ठेविलीं असतात जीं मनुष्यें तीं प्र॰ तो.

**लश्करगिरी**, **लष्करगिरी**, स्त्री॰ द्रव्यादि संपादनार्थ लश्करांत राहून त्याजबरोबर जो प्रवास ती.

**लश्करी**, **लष्करी**, ३ लिं॰ लश्करसंबंधीजो शिपाई, सरंजाम, इ॰ ती.

**लस**, स्त्री॰ क्षत, फोड, इ॰ कांतून उदकासारिखा जो द्रवांश वाहतो ती.

**लसणी**, ३लिं॰ लसणीचे बीचे आकारासारिख्या कड्या, इ॰ करून जोजघा, तोडा, इ॰ भूषण करितात तो.

**लसण्या**, पु॰ एक रत्न आहे.

**लसफशीत**, ३लिं॰ जामध्यें चापचोपी, घट्टपणा, नाहीं असें जें सईल नेसलेलें वस्त्र, पागोटें, आंगरखा, वेणी, गांठोडें, शरीर, इ॰ तो.

**लसलशीत**, ३लिं॰ रा॰ लुसलुशीत; २, लसलसलेलें जें पाणी, इ॰ तो.

**लसलस**, अ॰ रा॰ अनु॰ क्षत, कुजलेलें फळ, इ॰-कांत पडलेले जे किडे त्यांचे हालण्याचें वि॰; लसलस करणें स्म॰ लसलसणें.

**लसलसणें**, रा॰ पाणी, दूध, इ॰ सळसळशब्द व्हावयाजोगें अतितप्त होणें; २, क्षत, फळ, इ॰ कांत किडे, इ॰ कानीं वळवळ करीत असणें; ३, शरीरीं तारुण्य, इ॰ कानें तेज टाकायाजोगें भरावस्थेस येणें.

**लसलसाट**, पु॰ रा॰ क्षतादिकांत किडे, इ॰ कांचा जो बुचबुचाट तो.

**लसूण**, पु॰ स्त्री॰ एक वनस्पति आहे; २, तिचा जो कांदा तो.

**लसूणबी**, स्त्री॰ कों॰ लसूणीचे कांद्याचा जो एक अवयव ती.

**लहँगा**, पु॰ हिं॰ मोठ्या बायकोंचा जो परकोर तो.

**लहणीहुंडी**, स्त्री॰ अडत्या, इ॰ कांकडे लहण्याबद्दल जी हुंडी पाठवितात ती.

**लहणें**, न॰ अन्यपेंठचे सावकार, इ॰ कांवर हुंडी, इ॰ देणें केलें असतां त्यास जो मोबदला ऐवज हुंडी, इ॰ पाठवितात तें.



**लहर**, स्त्री॰ लहरीचा अपभ्रंश, परंतु हाच लोकांत विशेष प्रसिद्ध ह्मणून इथेंच अर्थ लिहितों; समुद्रादिकांचे उदकास येतात जा लाटा त्या प्र॰; २, ला॰ कैफ, विष, काम, क्रोध, इ॰ विकार संबंधी शरीरांत उठतात जे वेग ते प्र॰; ३, कांहीं एक करण्याविषयीं येत्ये जी हुकी ती; ४, सर्पाचे गळ्याखालीं जा रेषा असतात त्या यत्संख्याक असतात तो सर्प इसला असतां तत्संख्याक विषाच्या लहरी येतात अशी लोकप्रसिद्धि आहे, ह्मणून त्या रेषांसही ह्म॰; ५, जांभळी, अंजिरी, इ॰ रंगांचीं वस्त्रें, इ॰ त्यांवर उजेड, प्रकाश, यांचे उपाधीमुळें अनेकप्रकारच्या रंगांच्या छाया दिसतात त्या प्र॰; ६, वस्त्रादिकांवर विणकरीनें किं॰ रंगानें जा नागमोडीसारख्या रेषा उठविल्या असतात त्या प्र॰, कोणेकानें लहरा मारणें ह्म॰ मौजा मारणें; लहरीचा ह्म॰ विणकरीनें किं॰ रंगानें ज्यावर लहरी उठविल्या आहेत असा जो वस्त्र, खण, कांठ, इ॰ त्यास ह्म॰

**लहरी**, स्त्री॰ लहर परंतु प्रथमार्थी लोकांत प्रसिद्धि, ग्रंथादिकांत द्वितीयार्थीं ही प्रयोग होतो; २, ३लिं॰ कोणेक गोष्टीविषयीं दुसऱ्यानें हिताचीही गोष्ट सांगितली असतां ऐकेल असें प्रमाण नाहीं आपल्या मनास येईल तेव्हां कोणीं निवारिलें असतांही ऐकायाचा नाहीं अशा स्वभावाचा जो मनुष्यादि तो.

**लहरीदार**, ३लिं॰ लहरीचा जो खण, कांठ, वस्त्र, इ॰ तो; २, लहर द्वितीयार्थीं.

**लहान**, ३लिं॰ विवक्षिताहून आकार प्रमाण ज्याचें

कमी असाजो पदार्थ तो; २, वय,तेज,किंमत,इ० कृत योग्यतेनें ओउणा तो.

लहानगा, ३ लिं० धाकटा.

लहानथोर, ३ लिं० केवळ एकाच प्रतीचा असा नव्हे कांहीं मोठे, कांहीं लहान, कांहीं मध्यम,असा अनेकप्रतीचा जो पदार्थ तो.

लहान माणूस, पु० योग्यतेनें हलका जो मनुष्य तो.

लहानमोठा, ३ लिं० लहान थोर.

लहानवी, स्त्री० रा० लघुत्व प्रथमार्थी.

लहानवी थोरवी, स्त्री० एकापेक्षां एक मोठा आणि त्यापेक्षां दुसरा लहान असें जें परस्परामध्यें अंतर असतें ती; परंतु प्रायः तें अंतर वयःकृत असतांच प्र०

लहानसर, ३ लिं० सजातीय पदार्थ समुदायाच्या लहान आणि मोठे अशाज्या दोनकोटी त्यामध्यें लहान या कोटींत परिगणनीय जो तो; उ० हें घर लहानसरच आहे पण चांगलें टुमदार आहे.

लहानसहान, ३ लिं० लहान,इ० तो.

लहानावणें, रा० लघुप्रमाणविशिष्ट कोणेकानें होणें; उ० पाऊस लहानावला ह्मणजे मग जा.

लहानाळ, ३ लिं० रा० सामान्य प्रमाणापेक्षां ज्याचे अंगाचा बांधा लहान असा जो मनुष्य,पशु,इ० तो.

लहारी, स्त्री० तीन आण्याचें एक नाणें होतें ती; २, प्रस्तुत कोणी तीन आण्यास ह्म०

लहीन, ३ लिं० स्वभावेंकरून विनय विशिष्ट जो मनुष्यादि तो.

लळत्या, ३ लिं० ललित्या.

ललल, अ० करणें धातुयोगीं प्र०; अ० जिव्हेनें ललळणें.

ललळणें, पसरलेल्या तोंडांत लाळ गळत जिव्हेनें हालणें

लळा, पु० लेंकरूं, गुरूं, वासरूं, इ० कांनीं नित्यें जो कोणी लालन, पोषण, इ० करित असतो त्याचा त्या लेंकरूं, इ० कांस जडला असतो जो प्रेमा तो; कोणेकाचा लळा कोणेकानें चालविणें ह्म० लाड चालविणें.

ललित्या, ३ लिं० ललीत करण्याविषयीं कुशल जो हरिदासादि तो.

ललीत, न० नवरात्रादि संबंधी कीर्तन विशिष्ट जो उत्साह त्याचे अंतिम दिवशीं रात्रौ उत्साह देवता सिंहासनारूढ झाली असें कल्पून वासुदेव, दंडी गाणं, इ० ईश्वरभक्तांचीं सोंगें आणून त्या सोंगांनीं स्वसंप्रदायानुरूप देवापाशीं प्रसाद मागावा आणि तो सर्व सभासदांस वाटावा असा जो हरिदास जन कीर्तन विशिष्ट समारंभ करितात तें; २, त्या ललिताचे वेळेस ह्मणायाचा जो अभंग, पदें, इ० रूप कर्त्यानें केलेला ग्रंथ असतो तें; ३, ला० राज्य, संसार, व्यवहार, इ० कांची दुष्टपरिणामानें जी समाप्ति तीस ह्म० कोणेकानें ललितावर येणें; ललितावर येणें ह्म० वादप्रतिवादादि प्रसंगीं चिरडीस येऊन निकरावर येणें.

लक्ष, पु० संख्या आहे १००००० लक्षांश, लक्षगुणित, इ० स०; २, न० लाख रुपयांचा लाभ झाला त्याचे स्थानीं मानाया जोगें जें कांहीं झालें त्यास ह्म०; उ० वाटेनें मागें चोरानें

लुटून घेतलेंतर घेऊ परंतु तुह्मी स्फरक्षित परीआलां एवढेंच आह्मी लक्ष मोजतों; ३, चित्ताचेंजें अनुसंधान तें; ४, बंदूक, शर, नेत्र, अंतःकरण, इ० कोनीं वेधायाविषयीं उद्दिष्टजो कांहींएक अर्थतें.

**लक्षक**, पु० कोणेक अर्थानें लक्षणाराजो तो.

**लक्षण**, न० चिन्ह; २, कोणेक अर्थातें वाच्यमर्यादेनें न बोधवितां तन्निष्ठगुणादि निर्देशद्वारा बोधवितोजो पदसमुदाय तो त्या अर्थाचें; ३, साहचर्यादिनियमात्तव जाअर्थाचा उपस्थापकजो कोणेक अर्थहोतो तो त्याचें; उ० धूमपाहिलाअसतां एथेंअग्नि आहे असें ज्ञान होतें ह्मणून धूमहें लक्षण, आणि अग्नि हें लक्ष्य; ४, मनुष्यादिकांचे अंगीं स्वभावाचे ज्ञापकजे गुण, अवगुण, असतात ते प्र०; उ० फरकन दुसऱ्यास शिवी देतोस हें तुझ्या अंगीं वाईट लक्षण आहे; रा० कोणेकाचें लक्षण जाणें ह्म० लवलक्षण जाणें.

**लक्षणासमन्वय**, पु० लक्ष्याचे आणि लक्षणाचेजे सर्व अवयव असतात त्यांचा परस्परें यथायोग्य प्रत्येकीं संबंधहोऊन विशिष्ट लक्ष्यावर विशिष्टलक्षणाचाजो अन्वयहोतो तो.

**लक्षणा**, स्त्री० वाच्यार्थसन्निहित किं० वाच्यनिष्ठजेगुण तद्विशिष्टजो कोणेक अर्थ तद्विषयीं त्या वाच्यार्थाचा वाचकजो शब्द त्यास वाच्यवाचकभावसंबंध नसतांहीं येत्येजी बोधकता ती; उ० चोराचे भयानें सारा गांवपळाला एथें गांव याशब्दाची लक्षणा गांवांतील लोकांचाजो समुदाय त्याजवर होत्ये; उ० या बैलाला नित्य सांगतोंकीं तूं पढतजा पण त्याचे तें गांवींही नाहीं; एथें बैल या शब्दाची मूर्ख, क्रीडाप्रियजो मुलगा त्याजवर लक्षणा आहे.

**लक्षपुंजा**, स्त्री० लक्षपूजा शब्दाचा अपभ्रंश.

**लक्षपूजा**, स्त्री० सं० बिल्वपत्रें, तुलसीपत्रें, पुष्पें, फळें, तीळ, तांदूळ, इ० लक्ष संख्याक देवावर वहावे असा संकल्पकरून त्यात्या द्रव्यानीं जीपूजा करितात ती; २, लाखोली.

**लक्षभोजन**, न० सं० लक्षसंख्याक ब्राह्मणास धर्मार्थजें भोजन घालितात तें.

**लक्षलाभ**, पु० सं० लखलाभ परंतु त्याचा क्रयविक्रयांत मंगलार्थ जसा प्रयोगहोतो तसा याचा होत नाहीं

**लक्षशः**, अ० लक्ष,दोन लक्ष, तीन लक्ष, असें लक्ष या संख्येनें मेजलें जाई अशा प्रकारें.

**लक्षाचा मनुष्य**, पु० शहाणाअसून पराकाष्ठेचा भला अतएव स्फसंगत असाजो मनुष्य त्यास ह्म०

**लक्षाचा माणूस**, पु० लक्षाचा मनुष्य.

**लक्षाधीश**, पु० सं० लक्षावधि रुपये जापाशीं आहेत तो; ह्म० लक्षाधीश किं० कक्षाधीश.

**लक्षानलक्ष**, ३ लिं० अनेक लक्ष संख्याक जो कांहींएक अर्थ तो.

**लक्षावधि**, अ० सं० लक्षशः.

**लक्षिणें**, मनुष्यादिकानें कोणेकपदार्थाकडे दृष्टि लावून तो पदार्थ लक्ष्यरूपें करून धरणें; २, जा अर्थाची साक्षात् इंद्रियगोचरता होत नाहीं तो अर्थ त्याचें ज्ञापक जें कांहीं एक लक्षण त्याजवरून जाणणें; उ० मुलाची वाढ प्रतिक्षणीं पाहूं लागलें असतां दिसत नाहीं परंतु महिन्यानें किं० वर्षानें पाहिलें असतां कांहीं थोर दिसतो तेव्हां प्रतिक्षणीं वाढ आहे असें लक्षावें; ३, वक्त्यानें शब्दाची शक्तीहून इतर लक्षणा

व्यंजनादिरूप ध्वनितद्वारा कोणेक अर्थउच्चार्यमाण शब्दानें धरणें; उ० भद्रास दिल्हीओंसरी भट हळू हळू हातपाय पसरी, या वाक्यानें दुसऱ्याशीं व्यवहार करित असतां आपण अंमळ सईल सोडलें ह्म० तो आपलें सर्व घेऊं पाहतो असा अर्थ लक्षिलाजा तो; ४, प्रतीक्षणें; उ० चार घटिका तुझा मार्ग लक्षीत बसल्यें आहे.

लक्षित, ३ लिं० लक्षिलातो.

लक्षुमी, स्त्री० लक्ष्मीशब्दाचा अपभ्रंश.

लक्ष्मी, स्त्री० सं० संपत्तीची आणि शोभेची अभिमानिनी विष्णूची स्त्री ह्मणून एक देवता आहे; २ द्रव्याचीजी संपत्ति ती; ३, शरीरादिकांचेठायीं स्वरूपतादिकृत किं० अलंकारादिकृत, गृहादिकांचेठायीं संपत्यादिकृत शेत, बाग, इ० कांचेठायीं फळपुष्पादिकृतजी शोभा असत्ये ती; शेत, गृह, इ० कांचेठायीं लक्ष्मी अवतरणें ह्म० सस्यसमृद्धि, संतति, संपत्ति, इ० संबंधीजी विलक्षणशोभा ती दिसूं लागणें

लक्ष्मीपूजन, न० सं० विवाहोत्तर वधुप्रवेशासमयीं वधूसहवर्तमान वर लक्ष्मीचेंजें पूजन करितात तें; २, आश्विन अमावास्येस धनिकलोक, व्यापारी लोक, इ० मोहरा, रुपये, इ० रूप द्रव्याचर लक्ष्मीचें आवाहन करूनजें तीचें पूजन करितात तें.

लक्ष्मीकंत, ३ लिं० लक्ष्मीवान्.

लक्ष्मीवान्, ३ लिं० संपत्तिमान.

लक्ष्य, न० लक्ष प्रथमार्थावांचून; २, ३ लिं० लक्षायासयोग्यजो अर्थ तो.

लांक, पु० एक धान्य आहे; २, स्त्री० कों० लांख.

लांकड, स्त्री० कों० लकड.

लांकडी, ३ लिं० लांकडानें निर्मिलेलाजो पदार्थ तो.

लांकडूं, न० कों० लांकूड.

लांकूण, स्त्री० कों० लांख.

लांकणें, कों० दोरी, सूत, इ० दुसऱ्या दोरी, इ० कांशीं गांठ, पीळ, इ० द्वारा सांधणें; २, गुरूं, मनुष्य, इ० दुसऱ्या गुरूं, मनुष्य, इ० कांशीं लांखेनें संबध्द करणें; ३, मनुष्य, पशु, इ० कांस स्तंभ, इ० कांशीं बांधून किं० पंतोजी, इ० रक्षकांचे स्वाधीन करून अडकवून ठेवणें; ४, लांखटणें द्वितीयार्थीं.

लांकुडभारा, पु० कों० लांकडांचाजी मोळी तो.

लांकूड, न० काष्ठ; लांकडास माकड जोडणें ह्म० कसेंही करून वरास वधू मिळे असें करणें.

लांकूडफाटें, न० घर, इ० बांधायाचे उपयोगीं लांकडें तृण, इटा, इ० साहित्य किं० संसाराचे उपयोगीं जाळाऊ लांकडें, शेणी, तृण, इ० जें साहित्य तें.

लांकेरी, स्त्री० कों० एक झाड आहे.

लाख, स्त्री० रंगाचे उपयोगीं बोर, पिंपळ, इ० वृक्षांपासून चिकासारिखाजो पदार्थ उत्पन्न होत असतो ती; २, पु० लक्षरूपजी संख्या तो; ह्म० लाख आणि खाक; लाख रुपयांचा ह्म० कोणेक अर्थाचा अतिशयोक्तीनें स्तुति करणें असतां त्या अर्थास ह्म०; उ० त्याणें काल एक लाख रुपयांची गोष्ट सांगितली.

लांख, स्त्री० कों० गमनादिप्रसंगीं गुरूं, शेळी, इ० कांनीं भलतीकडेस जाऊं नये इत्यायर्थ त्याचे गळ्यांत दोरी बांधून ती दुसऱ्या गुरूं, इ० कांचे

गळ्यांत बांधावी असेंउभयतांचें करितात जें संधान तें; २, ला० एकाविषयावर अनेकांचा संबंध स्थापिल्यामुळें तन्निमित्तक त्यांची परस्पर होत्ये जी संबध्दता ती; उ० बंधा अथेल्या नसल्यास दोघांदोघांस एकेक रुपया देऊन दोघांदोघांची लाख घालून द्यावी.

लाखट, ३ लिं० पोटीं लाख भरून केलेला जो रुवर्णादिकाचा अलंकारादिपदार्थ तो.

लाखटणें, मडकें इ० लाखेचा लेपानें युक्त करणें; २, ला० शब्द मोठ्यानें न उमटायाजोगा कांहीं कारणानें गळा बसणें.

लाखटबेगड, ३ लिं० लाखट, झांकील, इ० जो दागिना तो.

लाँखण, स्त्री० कों० लांख.

लाँखणें, कों० लांकणें.

लाखपाड, पु० हीरकादिरत्नें जा आंगठी, इ० कांचे घरामध्यें जडायाचीं असतात त्या घरामध्यें पूर्वीं लाख भरण्याचा जो व्यापार तो, आणि तो लाख विशिष्ट घाट; उ० तूं आधीं लाखपाड कर मग मी लाखपाड वजन करून देईन.

लाखलोटा, ३ लिं० हिं० लाखटलेलें जें मडकें तो.

लाखलोटें, न० हिं० लाखटलेलें जें मातीचें भांडें तें.

लाखा, पु० रा० अळू, पोकळा, इ० कांवर एक कृमिरूप रोग पडत असतो तो.

लाखाचा मनुष्य, लाखाचा माणूस, पु० लक्षाचा मनुष्य.

लाखी, ३ लिं० लाखट; २, लाखेचा जो रंग, इ० पदार्थ तो किं० त्या रंगानें रंगविलेलें जें वस्त्रादि तो.

लाखें, अ० लक्षावधि.

लाखोटा, पु० मोकळा कागद असता कोणी भलता वाचील म्हणून त्याची करितात जी घडी किं० गुंडाळी जावर दुसरा कागद लपेटून चिकटवितात तो; २, ला० अनेक कागद, केंस, इ० कांचा परस्परांस चिकटून एकच होतो जो रचनाविशेष तो; गळ्याचा लाखोटा होणें म्ह० शब्द बाहेर न उमटायाजोगा गळा बसणें.

लाखोंलाख, अ० लाखें.

लाखोली, स्त्री० लक्षपूजार्थ उद्दिष्ट जें लक्षसंख्याक पुष्पादिद्रव्य तें; २, ला० कोणेकातें उद्देशून कोणेकाचे मुखांतून निघतात ज्या अनेक शिव्या त्या.

लाखोंशा, अ० लाखें.

लाख्या, ३ लिं० उत्कृष्टत्वेंकरून वर्णनीय जो पदार्थ तो; उ० तो लाख्या बोलणारा आहे त्याणें त्यासमयीं लाख्या जाबसाल केला; हा लाख्या डाव पडला.

लाख्यासावकार, पु० लक्षाधीश जो सावकार तो.

लाग, पु० कोणेक गोष्टीचा तत्तद्रूपेंकरून होण्याकडे झालेला असतो जो रोंख तो; उ० तुह्मी बाहेर जातां आहां परंतु पाऊस पडण्याचा लाग दिसतो आहे विचार करा; पावसाचा लाग आहे, इ० स्थळीं पाऊस पडण्याचा लाग आहे असा अर्थ होतो तसेंच पैक्याचा लाग आहे, इ० स्थळीं पैका

पैका मिळायाचा लाग आहे असा योग्य क्रियेचा अध्याहारानें अर्थ आणावा; २, त्या गोष्टीची त्याप्रकारें होण्याकडे रोंख धरून जी स्थिति तो; उ० अंबे पिकायाचा लागास आले ह्मणजे काढावे; ३, त्या गोष्टीनें त्याप्रकारें होण्याचे रोंखास यावें ह्मणून जो कोणेकाचा प्रयत्न तो; उ० चाकरीविषयीं बहुत लाग केले पण एकही चालला नाहीं; ४, कोणेक गोष्ट सिद्ध करण्याविषयीं चालवायाचा जो प्रयत्न तो किं० तेथें लागू होण्याविषयीं असल्येजी सोय तो; उ० हा झाड बुंध बुंधीत झाला आहे यावर चढावयाचा लाग दिसत नाहीं; झाडी जेव्हां तोडली तेव्हां किल्ल्याजवळ जायास लाग झाला; ५, डोंबारी, कोल्हाटी, मांजर वाघ, इ० कांनीं उड्डानादि करत्येसमयीं एथून उडून अमुक प्रकारें अमुक लक्ष्यावर पडावें, इ० रूप मनांत धरिलें असतें जें संधान तो; उ० एवढा जर उडीचा लाग साधला तर बक्षीस मिळेल नाहींतर जीव जाईल; ६, जाचे योगानें मरण याचें सर्वस्व नाश व्हाचा असा जो दुखणें, राजकोप, इ० रूप संकटापात तो; उ० आजपावेतों दोन तीन लाग निभावले आत्तां हा शेवटला लाग आहेसें दिसतें, या अर्थी जिवावरचा लाग प्राणावरचा लाग असें ह्म०; ७, वृक्ष, वल्ली, इ० कांस जो फळांचा बार येतो तो; उ० प्रा० इ० रसाल झाडांस बार कमी असतो; ८, वृक्ष, वल्ली, इ० कांस फळें येऊं लागावीं अशीजी वयोवस्था प्राप्त होत्ये तो; उ० नारळ झाड लावल्यापासून दहावे वर्षीं लागास येतो; ९, चोळीला दुश्शी खालीं जो तुकडा लावितात तो; १० समुद्र, खाडी, इ० कांत गलबत खालीं लागून धक्का पावायाजोगें जें उंचवट किं० चिकट स्थळ असतें तो; ११, रा० सुपारी खाल्ली असतां लागायाजोगा जो तिचे अंगीं मदांश असतो तो.

लागट, ३ लिं० दुसऱ्यानें अनेकवार निषेधिलें असतांही त्याची लाज न धरितां स्वेष्टसाधनार्थ पुनःपुनः लोभानें झटण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्यादि तो; २, ईषन्मात्र कीड लागली आहे जास असा जो काष्ठ, धान्यादिपदार्थ, तो; ३, भक्षिला असतां लागतो असा जो सुपारी, हरीक, इ० पदार्थ तो.

लागणें, कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं संयोगसंबंधानें संबद्ध होणें; उ० तूं त्याला लागून को विटाळ होईल; २, पशुपक्ष्यादि जातीय जे पुरुष त्यांणीं स्त्रीशीं मैथुनार्थ संबद्ध होणें; या-अर्थीं निंदा गालिप्रदानाद्यवसरीं मनुष्यांविषयींही प्र० करितात; ३, रोप, कलम, इ० नीं तीं झाडें व्हावीं ह्मणून भूमीत पुरलीं जाणें, अंबा, पडवळ, इ० कांचा बिया खळी करून आंत पुरल्या असतां तेथेंही प्रयोग करितात, जा भूमीमध्यें रोप, बीं, इ० लावितात त्या भूमीसही पक्षीं कर्तृत्व मानून वाफा लागला, अळें लागलें, सरी लागली, इ० प्रयोग करितात; ४, लावलेल्या रोप, कलम, इ० कानें खालीं मूळ धरून जगायाचे पंथास लागणें; ५, शस्त्र, सोटा, गोळी, दगड, इ० कानीं किं० कुशब्दादिकानीं शरीराशीं किं० मनुष्यादिकांशीं प्रहारादिकृत दुःखादि संस्कार येतनें

वर किं० अंतःकरणावर व्हावयाजोगें संबद्ध होणें; ठेला, घाव, इ० लागणें स० तो टोला, इ० बसावयाजोगें शस्त्रादि लागणें असा अर्थ; ६, द्वार, नेत्र, पेटी, फडताळ, इ० कानीं त्यांचीं त्यांचीं आच्छादकजीं कपाट, पांपण्या, इ० त्याहीं करून आच्छादित होणें, पक्षीं त्या आच्छादकासही कर्तृता येत्ये; ७, कोणेक अवयवीस कोणेक अवयव जडला जाणें; ८, श्लोक, वाक्य, किं० त्यांचा अर्थ कुलूप, इ० कानीं त्यांचे अवांतर जे अवयव त्यांचा यथायोग्य संबंध होऊन बसणें; ९, कोणेकस्थलीं विवक्षित फलोद्देशेंकरून विनियुक्त करावयाचा जो कोणेक अर्थ त्याणें तत्फलोपधायकत्वेंकरून तेथें अनुरूपसंबंधविशिष्ट होणें; उ० ही आरशी तुम्हाला लागली म्हणून मला लागेल असें प्रमाण नाहीं; १०, चाल, रीत, खोड, वळण, सद्गुण, दुर्गुण, इ० कानीं मनुष्यादिकाशीं संस्काररूपेंकरून रहावयाजोगें संबद्ध होणें; ११, ताप, हगवण, खोकला, दमा, रोग, इ० कानीं शरीरीं उत्पन्न होऊन कांहीं काळ राहणें किं० क्षुधा, तृषा, उचकी, ठसका, दम, इ० विकारानीं शरीरांत उत्पन्न होणें; १२, क्रमस्थित जे देशकाल विभागादि पदार्थ त्यांतें क्रमानें अन्वित करीत चाललेली जी दर्शन, गमन, भक्षण, इ० क्रिया तीचा ठायीं अन्वित होण्याविषयीं जो कोणेक अवधिपासून आरंभ तद्विशिष्ट त्या देशकाल विभागादि पदार्थानें होणें; किं० तादृश अन्वित होत जावयाजोगें क्रमानें त्यात्या पदार्थानें सन्निविष्ट असणें किं० कोणेक अवधीपासून कोणेक अवधिपर्यंत त्यात्या देशकालादि

कानें

कानें व्यापून असणें; उ० एथून मावळ संपलें आणि देश लागला, तेथून पुढें भरवस्तीचे गांव लागतील; एथून चार अध्यायपर्यंत ग्रंथ कठिन लागला आहे; आजपर्यंत खर्ची कागद झाले आतां उंची कागद लागले; १३, कोणेक पदार्थ गोष्ट गोड, कडू, बरी, वाईट, तिखट, आंबट, इ० रूपेंकरून कोणेकास अनुभवविषय होणें; उ० अंबे खाऊन पहा गोड लागले तर घ्या; याला खरी गोष्ट सांगितली तरी वाईट लागत्ये; १४, कोणेकास कोणेक व्यवहारांत तत्तदनुरोधानें कोणेक अर्थ बरा, वाईट, इ० रूपें प्राप्त होणें; उ० परकड सनगें बरीं आहेत परंतु एवढें पागोटेंमात्र महाग लागलें; चार रुपये खोटे लागले; १५, कोणेकास रोजगार, चाकरी, इ० प्राप्त होणें; पक्षीं त्या पुरुषादिकांस ही कर्तृता; उ० तो चाकरीवर लागला; १६, कोणेकाशीं कोणेकानें सेव्य, सेवकभाव, यौनसंबंध, इ० संबंधानें संबद्ध असणें; उ० तूं त्याची कांरे मस्करी करतोस तुझा तो काय मेहुणा लागला आहे; हाच अर्थ धरून तुझा बाप लागला आहे, उरावरचा धगड लागला आहे, इ० प्रयोग आवेश चढविणें इत्याद्यवसरीं होतात; कोणेकानें कोणेकाचे चार पैसे लागणें, कर्ज लागणें, इ० स्थलीं आधमर्ण्यसंबंधानें विशिष्ट असणें असा अर्थ होतो; १७, कोणेक क्रमानें चाललेला जो कोणी त्यास त्या क्रमाचे ठायीं स्थित जे वृक्ष, नदी, पर्वत, वचन, श्लोक, इ० अर्थ तो एतद्गमनद्वारा प्राप्त होणें; उ० एथून फिरतेस

जातांना

जातानां वाटेनें चारतथा मोठ्या लागल्यात; तुह्मी
मुळापासून वाचितजा आणि पुढें ह्मतश्लोक लागे-
ल तेथें ठेवा; १८, वृक्ष, लता, इ० कांनीं फलविशि-
ष्ट होणें, पक्षीं त्या फलासही कर्तृता; उ० त्या प्रां-
तींचे माड असे लागतात कीं एकाएका माडावर
हजारहजार नारळ लागतात; १९, अंबा, महा-
ळुंग, इ० फल, भाकर, इ० डागणें; उ० अंबा लाग-
ला असेल त्या अंगचा कापून टाक मगखा; २०,
भाकर, पोळी, भाजी, भात, इ० जाळ अधिक ला-
गल्यामुळें ईषन्मात्र करपून पात्रास चिकटणें; २१
सर्प, विंचू, इ० कानें कोणेकास डसणें; २२, धान्य,
काष्ठ, इ० कांस कृमिविशेषरूप रोग होत असतो
तो जडणें, ज्याचे योगानें तें धान्यादि छिद्रविशिष्ट
होतें; २३, काष्ठ, धान्यादिक त्या कृमिविशेषरू-
प रोगानें विशिष्ट होणें; २४, ज्याचा सेवनानें वा-
त, पित्त, क्षोभादिरूप विकृति होत असल्ये अ-
सेजे मदांचा विषांचादि विशिष्ट मद्य, तमाखू,
भांग, पाणीं, माशी, हरीक, सुपारी, समुद्र, ग-
लबत, इ० पदार्थ त्याणीं भक्षणादिद्वारा सेविलें
असतां उक्तविकृतिप्रद होणें, तसेंच केलेला उप-
वास, द्रव्य, गुरुद्रोह, इ० कांनीं बाधक होणें; उ०
ज्याला समुद्र लागतो त्याणें कधींही गलबतांत ब-
सूं नये; ज्याला उपवास लागतो त्याणें करूं नये;
२५, गाय, म्हैस, इ० पवरूनें पायलाग, तोंडलाग,
इ० विकृतीनें विशिष्ट होणें; पक्षीं त्यांचे पायांस,
मुखासही कर्तृता; २६, भक्षिलेला अन्नादिप-
दार्थ अंगीं पुष्टिप्रद होणें; २७, कोणेक कार्याक-
डे कोणेक सामग्रीभूत जो अर्थ तो खरचला जा-
णें; उ० या वाड्याला पंचविसहजार रुपये लाग-
ले; एथून काशीस पोहोंचावयास दोन महिने ला-
गतील; २८, कोणेक अर्थ कोणेकास अपेक्षित
होणें; उ० रुपये एव्हां कांहीं मला नकोत लागतील
तेव्हां घेईन; हा सवदा मला लागत नाहीं; २९, वी-
णा, कंठ, मृदंग, इ० कांचा स्वर विवक्षितानुरूप
उंच नीच होणें; पक्षीं त्या वीणादिकांसही कर्तृता; ३०,
वीणा, सारंगी, इ० कांनीं ज्या तारेपासून जे षड्जादि
स्वर निघावे ते तसे निघत असें होणें; ३१, वीणा,
कंठ, मृदंग, इ० कांनीं स्वरद्वारा परस्पर जी जुळणी
तद्विशिष्ट होणें; ३२, मशाल, दिवा, नळा, चंद्रजो-
त, इ० कांनीं प्रज्वलित होणें; पक्षीं समयी, इ०
दीपाद्याधार पात्रांसही कर्तृता मानितात; लग्न,
मुंज, किं० पाट, याणीं लागणें म्ह० सुमुहूर्तावर
करावयाचें जें परस्पर निरीक्षणादि प्रधान कर्म
तदनुष्ठानद्वारा झालें असें होणें; कोणेकास
गरज, काम, इ० लागणें म्ह० उपस्थित होणें; ३४,
व्यसन, छंद, वेड, खोड, इ० धर्म कोणेकास जडणें;
३५, कोणेकानें कांहीं शब्द उच्चारित्ये समयीं स्ख-
लशीपणा, इ० दोषामुळें मध्येंमध्यें अडणें; इथें
पक्षीं शब्द, जिव्हा, इ० कांसही कर्तृता येत्ये; ३६,
आयास, आवयास, आवयाला, आयला, एतदं-
त्यांत जीं धातुरूपें त्यांपुढें लागणें याचा योग
झाला असतां विशिष्टाचा अर्थ कर्त्यानें त्यात्या
क्रियेचे ठायीं प्रवृत्त होणें किं० त्यात्या क्रियेचा आ-
रंभानें विशिष्ट होणें; उ० तो मारूं लागला म्हणून
मी पळालों; तुकतासा मुलगा बसायाला ला-
गला; ३७, वाद, युद्ध, कलह, पंचाईत, कुस्ती,
कारखाना

लाग

कारखाना, इ॰जे कितीएक व्यवहार त्यांस कर्तृत्व
असतां होऊं, इ॰ उनंतादि धातु रुपांचा अप्रयोग
असतांही अध्याहार मानून केवलाचा ही प्रयोग
होतो; उ॰ आताशी त्यांचें युध्द लागलें ह्म॰ होऊं ला-
गलें असा अर्थ; कोणेकाचें कोणेकाशीं लागणें,
इ॰ स्थलीं स्पर्धोपजीव्यजें वादयुध्द, इ॰ तें प्रवृत्त हो-
णें; ३८, रहाट, चरक, घड्याळ, इ॰ कांनीं स्वस्व
क्रियेचाठायीं प्रवृत्त होणें किं॰ असणें किं॰ न अ-
डतां स्वरळीतपणें चालायाजोगें होणें; ३९, छूरी,
इ॰ शस्त्र पाजविलें जाणें; उ॰ तीन चाकू लागले आ
हेत हे घेऊन जा बाकीचे लावायाचे आहेत ते मग
देईन; ४०, शस्त्रानें छेदनसामर्थ्य विशिष्ट अ
सणें; उ॰ जंग चढला आहे ह्मणून चाकू चांगला
लागत नाहीं; ४१, कोणेक अर्थानें कोणेकाशीं
अवश्य भोक्तव्यत्वादिरूपानें संबध्द असणें; उ॰
उपजल्याप्राण्यास मरण हें लागलेंच आहे; संसा-
राचें कृत्य हें रोज लागलेंच आहे; पण एक दिवस
देवदर्शनास तरचल; ४२, स्थल, वृक्ष, इ॰ पदा-
र्थ सरकारकोठी, पागा, पहाणीखरडा, इ॰ अ-
धिकरणीं लेखादिद्वारा संबध्द होणें; ४३, को-
णेक व्यापारीं कोणेक अर्थानें कर्त्रादिकारकरूपें-
करून संबध्द होणें; उ॰ तो सकाळपासून खण-
तो आहे तो दमला असला तर चार घटका तूं ला-
ग; पाऊस लागणें ह्म॰ पडणें; थंडी लागणें ह्म॰
दुःखरूपें करून त्वगिंद्रियद्वारा अनुभवास ये-
णें ; घोडे, बैल, इ॰ किं॰ त्यांची पाठ, इ॰ ला-
गणें ह्म॰ खोगीर, मूठ, इ॰ कांचें संघर्षणानें क्ष-
तविशिष्ट होणें; कोणेकास व्यवहारीं कूळ अ-
सामी

सामी, इ॰ लागणें ह्म॰ धुडीत कूळ रूपानें प्राप्त
होणें; उ॰ त्याची सावकारी बरी चालली होती प-
ण आलीकडे चारकुळें लागली ह्मणून अगदीं
बसली; कोणेकाकडे कोणेक गोष्ट लागणें ह्म॰
त्या गोष्टीचें बरें वाईट करण्याचा धणी तो होई
अशाप्रकारें ती गोष्ट त्याची होणें; हुंडा, चिठ्ठा,
रोखा, इ॰ कोणेक मनुष्यास किं॰ दुकान, इ॰
अधिकरणीं लागणें ह्म॰ येऊन संबध्द होणें;
४४, सोंगटी, इ॰ कांचे खेळामध्यें फांसे, इ॰ का-
नीं पडलेला जो डाव तो; सोंकटी, इ॰ कांचे पटा-
चीं मधील स्थानें आक्रमून नितकाच्ये स्थानी
जें गमन तद्विषयीं योजिला जाणें; मेलेली सोंग-
टी, इ॰ लागणें ह्म॰ जिवंत होऊन पुनः पटावर
बसणें; कोणेकाचा डाव किं॰ पानें, काडी, मा-
त, कर्ज, रुपये, इ॰ कोणेकावर लागणें ह्म॰
अवश्य फेडलें पाहिजे अशारूपानें प्राप्त होणें;
गाय, ह्मैस, इ॰ कानीं लागणें ह्म॰ स्वरळीतपणें
दूध देऊं लागणें; कोणेक धात्वर्थ अवश्यकर्त-
व्यत्वादिरूपें करून प्राप्त होणें या अर्थी आवा,
आया, आवया, आणि, णे, एतत्प्रत्ययांतजी
तत्त धातूंचीं रूपें त्यांपुढें प्रयोग होतो; उ॰ याचें
हातून न झालें तर तुह्मास जावें लागेल; त्याणें
बोलाविलें तर जाणें लागेल; याची ओळख तुह्मी
सांगतां परंतु हा गेला तर रुपये तुह्मांस द्यावया-
स लागतील; शौचास लागणें, मुतायास लाग-
णें ह्म॰ मळमूत्राचा उत्सर्गाचे पूर्वीं जो कलना
विशेषरूप विकार होतो तो होणें; कोणेकअर्थाशीं
कोणेक अर्थानें यथायोग्यरूपें यथायोग्यप्रकारें
संबध्द

संबध होणें असा या धातूचा सामान्य अर्थ होतो; उ० त्याला ब्रह्मराक्षस लागला ह्मणून वेड लागलें; आधीं सर्कारांत जर परवानगी लागेल तर मग पुढें दाद लागेल; हें काय शहर लागलें आहे, हें काय सोपें लागलें आहे, मी का श्रीमंत लागलों आहें, सर्वांस शालजोड्या द्या ह्मणतां तो, मी काय कार्यधीश लागलों आहें, इ० स्थलीं तो तो अर्थ तत्तद्रूपें करून स्थित आहे असा अर्थ होतो, प्रायः निषेधगम्यमान असतां काकुद्वारा प्र०

लागरा, ३ लिं० भक्षणादिद्वारा सेविला असतां लागतो असा जो माजरा, हरीक, सुपारी, औषध, इ० पदार्थ तो; २, लागलेलें जें धान्य, काष्ठ, इ० पदार्थ तो.

लागलागवड, स्त्री० लागवड प्रथमार्थी.

लागलाच, अ० कोणेक क्रियेचा जो क्षण तदुत्तर अव्यवहितक्षणीं; उ० जेवला आणि लागलाच गेला; मागतांच लागलेंच दिल्हें ह्मणजे बरें वाटतें.

लागलाग्या, ३ लिं० लागग्या.

लागवड, स्त्री० शेतजमीन, नांगरून, पेरून, पेरावें इतका जो व्यापार तो; कोणेक शेतजमीन लागवडीस येणें ह्म० बांध, बांधोळी, इ० रूप संस्कार केल्यानें लागवड करायाचे योग्यतेस येणें किं० चांगलें पीक यावयाचे योग्यतेस येणें; पानमळा, बाग, पोफळ, माड, इ० कांनीं लागवडीस येणें ह्म० पानें, फळें, इ० रूप जें त्यांपासून फल उत्पन्न होतें तें यावयाचे योग्यतेस येणें; २, सिद्ध जो कांहीं गृहादि पदार्थ त्यास दागदोजी संबंधें खर्च लागतो तो; उ० हें घर तुह्मी नीट करा मग लागवड काय लागेल ती आह्मी देऊं; ३, कों० पडीत नव्हे अशी जी शेतजमीन किं० आगरी जमीन, ती; उ० दहा बिघे लागवड होती तिचा धारा दिल्हा आतां हें पडीत आहे.

लागवण, न० कों० दुसरा वृक्ष व्हावा ह्मणून कोणेक वृक्षाची लावितात जी फांदी तें; २, स्त्री० दे० लावणी अंत्यार्थीवांचून.

लागाबांधा, पु० कोणेकाचें कोणेकापासून कांहीं कारण दिसत नसतां जें बरें किं० वाईट होत असतें त्याविषयीं कारणत्वें करून मानितात जो त्याचा त्याचा जन्मांतरीय सत्ता ऋणानुबंध तो; उ० त्याचेहातून याचें एकही काम होत नसतां उगीच हा त्याला हजारों रुपये देतो तस्मात् याचा त्याचा कांहीं लागाबांधा आहे.

लागीं, अ० प्रा० ग्रं० जवळ या अव्ययार्थी साठीं, स, ला, या विभक्तीचा अर्थी ही याचा प्रयोग करितात; उ० कितीशिकवूं तुजलागिं मना रे प्रीति धरीं हरिपाईं.

लागी, ३ लिं० कर्तृकार्यभाव, ग्राह्य, ग्राहकभाव, आधेयाधिकरणभाव, इ० संबंधानें जो ज्याशीं संबध व्हायास योग्य तो त्याचें; उ० हा घोडजोडा तुमचे लागी आहे तुह्मी घ्या.

लागुनी, अ० ग्रं० लागीं.

लागू, ३ लिं० कोणेकस्थलीं किं० व्यापारीं अथवा कोणेकापाशीं जा बेतानें संबध होण्याची विवक्षा असत्ये त्या बेताप्रमाणें तेथें संबध झाला

जो कोणेक अर्थ तो; पड, हो, इ॰ धातुयोगीं म॰

**लागून**, अ॰ ग्रं॰ लागुनी.

**लागूभागू**, ३ लिं॰ कों॰ योनसंबंधानें किं॰ देणें घेणें, इ॰ व्यापारसंबंधानें जो ज्याचा संबंधी तो त्याचा.

**लागोपाठ**, अ॰ एका पाठीमागून दुसरी, दुसरीमागून तिसरी, अशाक्रमानें अव्यवहितपणें कोणेक सजातीयक्रियेचें जें भवन त्याचें वि॰; उ॰ या बाईला लागोपाठ चार मुली झाल्या; त्याजकडे लागोपाठ चार रवेपा घातल्या.

**लाग्या**, ३ लिं॰ कोणेक कार्याचे साधनाविषयीं लाग लावण्याचें कौशल जाचे अंगीं आहे तो.

**लाघव**, न॰ लघुपणा; २, कौशल; हस्तलाघव, शब्दलाघव, इ॰ स॰; ३, स्वकार्यसाधनार्थ गोड गोड बोलावें, आर्जव करावें, इ॰ रूप जी कोणेकाचे अंगीं युक्ति असल्ये तें.

**लाघवी**, ३ लिं॰ लाघव तृतीयार्थ आहे जाचे अंगी तो.

**लांच**, पु॰ स्त्री॰ कोणेकापासून स्वकार्य ज्याद्वारें करून घ्यावयाचें असतें असा जो पंचाईतदार, मध्यस्थ, इ॰ कोणी द्वारभूत त्यास गुप्तरूपें आर्जवार्थ जें द्रव्य देतात तो ती; स्न॰ लांचलुचपत दक्षिणा आणि येई जे तत्क्षणा.

**लांचखाऊ**, **लांचखोर**, ३ लिं॰ लांच खाण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**लांचलुचपत**, **लांचलूच**, स्त्री॰ लांच इ॰

**लाचार**, ३ लिं॰ कोणेक गोष्टी विषयीं निरुपाय झाला जो तो.



**लाचारी**, स्त्री॰ लाचारपणा.

**लांचावणें**, कोणेक गोष्टीपासून एकवार लाभ झाल्यामुळें तीच गोष्ट पुनःपुनः करण्याविषयीं कोणेकानें सवकणें; २, कोणेकास लांच देऊन ओशाळा करणें.

**लांछन**, न॰ चंद्रास जो कलंक आहे तें किं॰ दुराचरणादिमूलक कोणेकास लागतो जो कलंक तें; २, कोणेक पदार्थावर कोणेक आकाराचें उठलें असतें जें चिन्ह तें; उ॰ जो पुरुष चक्रवर्ती होणार त्याचे हातावर कमलाचें लांछन असतें.

**लांछित**, ३ लिं॰ सं॰ कोणेक लांछनानें जो विशिष्ट तो.

**लाज**, स्त्री॰ लोकामध्यें जा प्रतिष्ठेनें वागत असतो त्या प्रतिष्ठेची हानि झाली किं॰ होईल असें मनांत आल्यामुळें किं॰ लोकाशीं भाषणादि व्यवहार करण्याचे प्रसंगीं अवनीतपणा, अज्ञान, इ॰ आपलें वैगुण्य उघडें पडून लोक आपल्यास हांसतील असें मनांत आल्यामुळें भय सदृश जो अंतःकरणांत धर्मविशेष उत्पन्न होतो जाचे योगानें अंतःकरणाचा संकोच होऊन प्रवृत्तीचा रोंख फिरतो ती; २, आपण आपले वडील, इ॰ कांनीं जें कांहीं चांगलें केलें असतें आणि लोकोपहासकारक दुष्कर्मादि केलें नसतें त्याचे योगानें त्याच्या मनुष्यादिकाचे अंगीं जो योग्यता विशेष असतो जो तदनुकूल आचरणानें लोकोपहासापासून रक्षावा लागतो ती; उ॰ या अशा कामांत मनुष्यां-

ची लाज ईश्वर राखील तरच राहील; माझी लाज तुला, इ॰ स्थलीं माझे लाजेचा अभिमान तुला अ सा अर्थ.

लाजकोंमडा, पु॰ स्त्री॰डी, न॰डें, कों॰ दुसऱ्याशीं संभाषणादिव्यापार कराचाची इच्छा मनांत अस-तांही बाह्यात्कारीं लाज दाखविण्याचा स्वभाव ज्याचा त्यास ह्म॰

लाजट, ३लिं॰ ईषत् लाजराजो तो.

लाजणें, लाज प्रथमार्थानें विशिष्ट होणें; २, लाजाळू ह्मणून एक वनस्पति आहे ती मनुष्याचा किं॰ त्याचे छायेचा स्पर्श झाला असतां संकुचित होत असत्ये त्या संकुचित होण्यावरही प्रयोग करिता-त.

लाजमर्यादा, स्त्री॰ लाज विनय, इ॰ ती.

लाजरा, ३लिं॰ बहुत लाजण्याचा स्वभाव ज्याचा तो.

लाजवट, ३लिं॰ लाजट.

लाजवणें, विवक्षित गुणानें स्वसमान जो कोणी त्यास आपल्या उत्कर्षाचा प्रकरनानें लाजायाचे योग्यतेस आणणें; उ॰ तो असा दाता निघाला कीं ज्याणें कर्ण लाजविला; २, कोणेकाचें वैगुण्य बाहेर काढून तो लाजे असा व्यास करणें; उ॰ काल तुह्मास बलावायास विसरलों खरा आतां तें काढून मला लाजवूं नका.

लाजाळू, न॰ एक वनस्पति आहे जी मनुष्याचे स्पर्शादिकानें लाजत असत्ये तें.

लाजाळू, ३लिं॰ लाजरा; २, स्त्री॰ रा॰ लाजाळू.

लाजिरवाणा, ३लिं॰ दुष्कर्माची प्रसिद्धि होणें. इ॰ कारणामुळें लाजून मुखश्री उतरायाजोगा खिन्न झाला जो तो; उ॰ त्याची मर्माची गोष्ट निघतांच तो लाजिरवाणा दिसूं लागला; २, जी गोष्ट कर्तांना कर्त्यास लाजिरवाणेंपणा यावा अशी जी कांहीं अनुचित गोष्ट तो; उ॰ ज्याचे संपत्तिदयांत कोणी याचना केली नाहीं त्याला याचना करणें ही गोष्ट लाजिरवाणी आहे; त्याचे घरीं जावयास मला लाजिरवाणें वाटतें, इ॰ स्थ-लीं ही गोष्ट लाजिरवाणी वाटत्ये हा अर्थ मनांत धरून गोष्ट, इ॰ शब्दाचा उच्चार न करितांही असा प्रयोग करितात.

लाजिरवाणी, अ॰ लाजिरवाणेंपणानें बोलणें. जाणें, येणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ करतों ह्मटलें तें काम आमचे हातून झालें नाहीं आतां लाजिर-वाणी त्याजकडे कायजावें.

लाजिरवाणें, अ॰ लाजिरवाणी.

लाजीम, ३लिं॰ لازم लायक प्रथमार्थी.

लांझा, पु॰ बांधा; २, दुसऱ्याची अपराधिता आ-पल्याकडेस यावयाजोगें चोरी, चहाडी, आरामा-री, इ॰ कांहीं कर्म त्याचा आपल्याकडे असतो जो संबंध जेणेकरून त्या कर्माचा निर्वाह झाल्या-शिवाय आपण मोकळा होत नाहीं तो; उ॰ तुह्मी या कर्मांत नव्हतां अशी स्वस्थ पुरवा ह्मणजे तु-ह्माकडे कांहीं लांझा राहिला नाहीं.

लाट, स्त्री॰ नदी, समुद्र, इ॰ कांस येत्ये जी लहर ती; २, वगाड, पोहे, इ॰ कुटायाचा ढंग, इ॰ का-स जें भाडवें मोठें लांकूड संपन्न केलें असतें तें; ३, तेल्याचा घाणा किं॰ तत्सदृश जो उंसाचा रस

रस काढायाचा घाणा असतो त्यांतजें उभें लांकूड फिरत असतें ती;४, देवळांत देवापुढें सोंवळ्या ओंवळ्याची मर्यादा रहावी, दाटी होऊं नये, इ॰ कारणार्थजें आडवें लांकूड लाविलें असतें ती;५, मार्गादि भूमि सम करायासाठीं वरून फिरवायास वरवंट्याचे आकारासारिखा मोठा दगड केला असतो ती.

**लाटण**, न॰ पोळी, पापड, इ॰ लाटल्येस मर्यांस्यास खालीं वर लावायाकरितां करितातजें पीठ तें.

**लाटणी**, स्त्री॰ कों॰ पोळी, इ॰ लाटण्याचे उपयोगींजें गोलकाष्ट करितात ती.

**लाटणें**, पिठाचा किं॰ कणकेचा गोळा, इ॰ पोळपाट, इ॰ कांवर ठेवून पोळी, पापड, इ॰ विवक्षिताकार होई असा वाढवणें; पक्षीं भाविसंज्ञा श्रयणानें करून त्या पोळी, पापड, इ॰ कांसही कर्मता येत्ये; २, रहाटगाडगें पाणींवर यावयासाठीं फिरविणें; पक्षीं पाण्यासही कर्मता; ३, जेन, बुरणूस, इ॰ लाटणें म्ह॰ लोंकरीस खळ देऊन त्याची गुंडळी करून ती बुरणूस, इ॰ व्हावयासाठीं भूमीवर ठेवून हातानें मागेंपुढें फिरविणें; ४, दपटणें लाक्षणिकार्थी; ५, न॰ लाटणी.

**लाटा**, पु॰ पापड, इ॰ कांचे पिठाचा लांबट गोळा जो करितात तो; २, रा॰ भातेणाचा डोईचें वहावयाजोगाजो भारा बांधितात तो

**लाटालाट**, स्त्री॰ दपटादपट.

**लाटी**, स्त्री॰ पापड, करंजा, इ॰ करायाकरितां चापटजा गोळ्या करितात त्या ब॰

**लाटींव**, ३ लिं॰ लाटून केलेलाजो पोळी, बुरणूस, इ॰ पदार्थ तो.

**लाट्या**, पु॰ कों॰ भिजलेली डाळ, इ॰ उखळांत घालून घाटायाचे उपयोगीं वरवंट्यासारखाजो दगड केला असतो तो; २ ला॰ तदाकार पापडाचें पीठ, कणीक माती, इ॰ कांचे लांबट करितात जे गोळे ते ब॰; ३, ३ लिं॰ लाटालाट करण्याचा स्वभाव जाचा तो

**लाट्यागंगाजी**, पु॰ लाटालाट करण्याचा स्वभाव जाचा त्यास म्ह॰

**लॉंठाई**, स्त्री॰ कों॰ दांडगाई.

**लाड**, पु॰ लालन; पुत्र, स्त्री, इ॰ कांचा लाड चालविणें म्ह॰ लाडुकपणामुळें त्याणी धरलेलीजी होस ती पुरविणें; २, स्त्री॰ राड प्रथमार्थी.

**लाडकेणें**, रा॰ पुत्रादिकांस लालित करणें.

**लाडका**, ३ लिं॰ जो पित्रादिक जा पुत्रादिकांचे प्रेमानें लाड चालवितो तो पुत्रादिक त्या पित्रादिकांचा; २, जाजवळ आपला लाडकेपणा चालतो त्यापाशीं जीभ आडवी घालून तोंड वांकडें करून पोर, इ॰ जें भाषण करितें तो; ३, ला॰ कोणेक व्यवहारीं हिशेब सोडून स्वार्थसिध्यर्थ पडून कोणी करितोजें भाषण, गोष्ट, इ॰ तो; उ॰ आत्तां या पेका मिळाला म्हणजे देऊं अशा लाडक्या गोष्टी कशाला सांगतां.

**लाडकावणें**, पुत्रादिक लाड केल्यामुळें बिगडून टाकणें.

**लॉंडगा**, पु॰ कुत्र्यासारिखा एक वन्य पशु आहे जो हरिणादिकांस मारित असतो; २, वस्त्र, केश, इ॰ कांस लागलें असतां चिकटतें असें एक

एक तृणविशेषाचें बीं आहे आणि आघाडा म्ह-णून एक औषधी आहे तीचें बीं आणि कडया-म्हणून एक औषधी आहे तीचें फळ त्यास म्ह०

लाडन, न० गूळ करायाचे कढईसजें उडदाचें पीठ इ० कांचें लुकण लावितात तें.

लोंडा, ३लिं० ज्याचें पुच्छ किं० पुच्छाग्र छेदनादिकेंक-रून नाहींसें झालें आहे असाजो पशु,पक्षी,सर्प, मत्स्य, इ० तो किं० निरग्रजें पुच्छ तो; २, थोटाजो हात,लेखणी, चाकू, इ० तो; ३, अवयवावयविभा-वसंबंधानें किं० संयोगसंबंधानें ज्याशीं जो पदार्थ संबद्ध असतो तो तेथें ओरखुडपणामुळें अपुरा दि-सूं लागला असतां त्यास म्ह०; उ० हा धोतरजोडा तुम्हास लांडा होतो अणखी चारबोटें रुंद असता तर ठीक दिसता.

लोंडाकारभार, पु० कोणी कारभार सांगितला न-सतां मधधेमध्यें कोणीएकजो कारभार फार क-रतो त्या कारभाराची निरा कर्तव्य असतां त्यास म्ह०

लोंडाकारभारी, पु० लांडाकारभारकरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

लाडावणें, क्रो० लाडकावणें.

लाडीगोडी, स्त्री० कोणेकापासून स्वकार्यकरून घेण्याकरितां त्याशीं गोड बोलावें, कांहीं लोभ प्रद-र्शन करावें, इ०रूपजो त्यास अनुकूलकरण्यावि-षयीं व्यापार करितात ती.

लोंडीलबाडी, स्त्री० चहाडी, चुगली, इ०जी लहान मोठी लबाडी ती.



लाडुकपण, न० लाडकेपणा.

लाडुकपणा, पु० लाडकेपणा.

लाडू, पु० बुंदी किं० गहूं, तांदूळ, इ० कांचें पीठ, ती-ळ, इ० पदार्थांत तूप, साकर, इ० घालून त्यांचे क-रितातजे वाटोळे गोळे ते म्ह०; २, एन्हवीं तशाकार करितातजे धान्यादिकाचे गोळे ते म्ह०

लांडोर, न० स्त्री० मयूरजातीयजी स्त्री तें ती; म्ह० मोर नाचतो म्हणून लांडोरही नाचते पण शोभत नाहीं.

लाण, स्त्री० क्रो० भात, इ० शेत कापण्याचा जो व्यापार ती.

लाणी, स्त्री० क्रो० लाण; २, रा० तृणादि कापायाचे उ-पयोगीं कोयतीसारिखें एक आऊत आहे.

लात, स्त्री० लत्ता प्रथमार्थी; संसार किं० कांहीं ए-क लाभ, इ० कांवर लात मारणें म्ह० अनादरबु-द्धीनें त्यागणें.

लातड, ३लिं० क्रो० लाता मारण्याचा स्वभाव ज्याचा असाजो गोमहिष्यादि पशु तो.

लातडणें, लथडणें.

लातडा, ३लिं० क्रो० लातड.

लातबुकी, स्त्री० लाथबुकी.

लाताड, ३लिं० लातड.

लाताळणें, लाथाळणें.

लाताळें, न० अनेक घोडीं, गाढवें, इ० परस्पर ए-कमेकास आवेशानें लाता मारूं लागले असतां हो-तोजो एकच गोंधळ तें; २, ला० वाद, पचाईत, इ० प्रसंगीं त्यात्या व्यवहाराचे एकानें बोलावें, एकानें उत्तर द्यावें, इतरानीं तटस्थपणें एकावें, इ० रूपजे

संप्रदायिक मार्ग आहेत ते सोडून अनेकांनीं अनेकविषय एकदांच बोलावे त्याजवर अनेकानीं उत्तर यावयास प्रवृत्त व्हावें नंतर परस्पर दुर्भाषणें ही करावीं शेवटीं मारामारीवर यावें अशी अव्यवस्था-झाली असतां होतोजो गोंधळ तें.

लाती, स्त्री॰रा॰ तांदळांचे पिठांत शिजविलेल्या नुरी किं॰ वाटाणें घालून त्याची वडी बांधून शिजवून जो भक्ष्यपदार्थ करितात ती.

लाथ, स्त्री॰ लात

लाथडणें, लातडणें.

लाथबुक्की, स्त्री॰ कोणेकास लाथा, बुक्या, इ॰कानीं जो प्रहार ती.

लाथरा, ३लिं॰ लातडा.

लाथाळणें, लथडणें अन्यार्थी.

लाथाळें, न॰ लाताळें.

लाथेरा, ३लिं॰ग॰ लाथरा.

लादणी, स्त्री॰ घोडें, उंट, गाडा, इ॰कांवर कंठाळ, सलिता, कांहीं ओझें, लादण्याचाजो व्यापार ती.

लादणें, घोडें, बैल, गाडा, गलबत, ओझेंलीमनुष्य, इ॰कांवर कंठाळ, गोणी, किं॰ आणखी कांहीं ओझें चढविणें; २, याना बांधून इतरअंघडोंची, इ॰ अधिकरण त्याजवर त्याला संभाळेल, किती न संभाळेल, किती याचा विचार न करितां मनस्वी ओझें होईअसें कांहीं पदार्थ स्थणें; ३, कोणेक मनुष्यावर त्याची शक्ति न पाहतां किं॰ न्याय अन्याय न पाहतां भारभूतजें कर्तव्य काम किं॰ देयद्रव्य, इ॰ तें आरोपित करणें; ४, भिंत, जोतें, इ॰ बांधतेसमयीं दगड, विटा, इ॰ कांचे थरावर चिरवल, चुना, इ॰ जाड थर बसे असा लावणें.

लादनी, स्त्री॰ लदाव.

लादा, पु॰ कालवलेलें पीठ, चिरवल, इ॰ कांचा हातानें घेऊन भिंत, इ॰ कांवर मारायाजोगाजो गोळा तो; २, पीठ, भात, गूळ, इ॰ कांचा पातळ चिकट, असा झालाजो परिणाम त्यास॰

लादी, स्त्री॰ फरसबंदी, लादनी, इ॰ कांचे उपयोगी सरासरी घडलेलाजो दगड ती; उ॰ चार हात नळाला दहा लाद्या असल्या ह्मणजे आच्छादला जाईल.

लाधणें, यं॰ द्रव्यादिक लब्ध होणें; २, कोणेक मिळालेली वस्त आपल्यास उपभोग देत आपल्याजवळ टिकणें; या अर्थी व्यवहारींही प्रयोग होतो परंतु प्रा॰ निषेधविषयीं; उ॰ मी आपल्यासाठी चांगली वस्त घेतों पण दुसरा कोणी भीड घालून घेऊन जातो मला कांहीं लाधत नाहीं.

लॉपट, ३लिं॰ शिजल्यामुळें घट्ट बसेना असा झालाजो कुलपाचा कांटा, पेटी, इ॰ कांचें झांकण, विण्याची खुंटी, मळसूत्र, इ॰ तो; २, ज्याचे सांधे शिथिल झाले असाजो गाडा, पेटी, कुलूप, इ॰ तो, ३, रा॰ अनेकवार निषेध केला, मारलें, फजीती केली, तथापि पुनःपुनः निर्लज्जपणानें स्वकार्यसाधनार्थ त्याच व्यापारीं प्रवृत्त होण्याचा स्वभाव ज्याचा तो.

लापणिका, स्त्री॰ लांबचलांब कंटाळा याबयाजोगीजी प्रपंचादिसंबंधी गोष्ट ती.

लापन, न॰सं॰ श्लोक, वाक्य, क्रूर, हिशेब, इ॰ लावण्याचाजो व्यापार तें; ग्रंथलापन, श्लोकलापन, इ॰स॰

**लापनिका**, स्त्री॰सं॰ श्लोकादि लावण्याची जी रीति ती; उ॰ अर्थतर एकच पण त्या टीकाकाराची लापनिका निराळी, याची लापनिका निराळी.

**लापशी**, स्त्री॰ लावशी.

**लाफण्णिका**, स्त्री॰कों॰ लापण्णिका.

**लाँब**, ३लिं॰ विवक्षिताहून दीर्घ जो कोणेक अर्थ तो; कोणेकानें लांबलांब गोष्टी सांगणें म्ह॰ पूर्वींची विपदवस्था विसरून उद्दामपणाचा किं॰ उमेदवारीचा गोष्टी सांगणें; २, कों॰ लंबा; ३, अ॰ दूर.

**लाँबचलाँब**, ३लिं॰ अतिशयित लांब तो; २, अ॰ दूरचदूर.

**लाँबचेलाँब**, अ॰ दूरचेदूर.

**लाँबट**, ३लिं॰ विवक्षिताहून ईषत् जो लांब तो; उ॰ या धोत्रापेक्षां हें धोत्र लांबट आहे; २, लांघोडा.

**लाँबटाँग्या**, ३लिं॰ लंबाडुया.

**लाँबण**, स्त्री॰ पुढील ग्रामादि अवधि पाहिला असतां जवळ दिसतो परंतु चालत्येसमयीं सरतां सरत नाहीं असा जो प्रदेश त्यास म्ह॰; २, विवक्षितस्थलाहून कोणेक स्थलीं जाताना जे दोन मार्ग त्यामध्यें एका मार्गापेक्षां एका मार्गास असतो जो फेरा ती; उ॰ पायवाटेपेक्षां गाडेवाटेकडून लांबण आहे खरी परंतु वाट चांगली; ३, कोणेक काम सावकाशानें करण्याचा किं॰ करीत असण्याचा जो प्रकार ती; उ॰ पुढें पावसाचे दिवस आले आहेत याच महिन्यांत लग्न करून घ्या उगीच लांबण लावूं नका; लौकर लौकर जेव लांबण काय लावली आहेस; ४, भाषणादि कोणेक व्यवहार तद्गत आवश्यकांश मात्र संगृहीत करून थोडक्यांत आटोपावा तें न करितां तो व्यवहार विस्तृत करण्याचा प्रकार ती; उ॰ काय तें हंशील सांगा उगीच लांबण लावूं नका उशीर होतो.

**लाँबणदिवा**, पु॰ लामणदिवा.

**लाँबणें**, कोणेक अवधिपासून कोणेक पदार्थ दूर देशस्थित होणें; २, कोणेक पदार्थ पूर्वींपेक्षां दीर्घ होणें; ३, कोणेक गोष्ट पूर्वींचे प्रमाणापेक्षां वाढणें उ॰ प्रथमतः दहा हजारांत घर बांधावें असा बेत धरून आरंभ केला मग जें लांबलें तें पंचवीस हजारांवर गेलें; ४, लौकर व्हावयाचें जें कोणेक काम त्याणें मध्यें कालकृत व्यवधान पडे असा दशेतें पावणें; उ॰ आमचें काम एक दोन दिवसांत झालें असतें पण स्कभेदार पुण्यास गेले आतां चार महिने लांबलें; ५, ताक, दूध, हिंग, कणीक, इ॰ पदार्थ त्यांत सामावावयाजोगी जी पणी, पीठ, इ॰ पदार्थांची भिसळणी घातल्यानें दृष्यतेस कमी होऊन प्रमाणानें वाढणें; कोणेक गोष्ट लांबणें म्ह॰ लांबचे जे लोक त्यांस समजायाजोगी प्रसिद्ध होणें; ६, न॰ कों॰ विहिरींतल पाणी बाहेर काढायास साधनभूत जें दोरी लावून एक पात्र करून ठेविलें असतें तें; प्रायः शूद्र भाषास्थित.

**लाँबता**, अ॰ धरणें धातुयोगीं म॰ अ॰ कोणेक गोष्ट लौकर न करितां हळूहळू करून आरंभास च उशीर लावून लांबेअशी करणें; उ॰ दोन गृहस्थ येणार आहेत जराशी कथा लांबतीच धरा.

**लाँबरुंद**, ३लिं॰ प्रशस्त दिसायाजोगी लांबी, रुंदी ज्यामध्यें आहे असा जो वस्त्र, स्थल, इ॰ तो.

**लॉंबलचक**, ३ लिं० लांबी, रुंदी, उंची, इ० प्रमाणें असावीं तितकीं आमध्यें आहेत असाजो वस्त्र, स्थल, मनुष्य, पशु, भाषण, इ० तो.

**लॉंबवालॉंबव**, स्त्री० चोर भयादिकारणास्तव कोणेक वस्तु पूर्वाधिष्ठितस्थलापासून दूर जाई असें करण्याचाजो व्यापार ती.

**लावशी**, स्त्री० दूध, ताक, नारळाचा रस, इ० कांस शिंगाडे, रताळीं, तांदूळ, इ० कांचें पीठ लावून कढवूनजो पेयपदार्थ करितात ती.

**लॉंवा**, पु० कों० शेतांतील भात कापतेसमयीं गळलेले किं० एर्‍हवीं पडलेलेजे भात गोटे त्यांचें पर्जन्यादिसंबधानें उगवतेंजें रोप तो.

**लॉंबी**, स्त्री० दीर्घता; २, दूरता; रा० कोणेक गोष्ट लांबीवर पडणें, इ० स्थलीं लांबणीवर पडणें असा अर्थ; ३, चौकट, इ० कांत बसविलेलेंजें भिंग. इ० नें तेथून निघून पडूंनये ह्मणून त्याचे संधिप्रदेशीं बसवायाचे उपयोगीं एक मृत्तिकाविशेष आहे.

**लॉंबून**, अ० दुरून.

**लॉंबोडा, लॉंबोळा**, ३ लिं० वाटोळा, चतुष्कोण, इ० जे आकार त्यामध्यें लांबी ह्मणून जें प्रमाण तत्प्रधानजो आकार तो आणि तादृश आकारविशिष्ट जो पदार्थ तो; उ० तोफेचे गोळ्यासारखा वाटोळा करूं नको वरवंट्यासारखा लांबोडा गोळा कर.

**लाभ**, पु० द्रव्यादिपदार्थाची जी प्राप्ती तो; २, धान्यादिकांचें माप घालतेवेळेस मोजताना बरकत यावी ह्मणून एक यास्थानीं प्रथमतः याचा प्रयोग करितात; ह्म० लाभाविणें मैत्री तोडूं नये.

**लाभणें**, लाधणें; २, कोणेकाचे कर्तव्यजे मुंज, लग्न, इ० संस्कार ते किं० मुहूर्त, इ० गुरु, चंद्र, इ० कांचे बळामुळें विवक्षितकालीं करण्यास शुभप्रद होणें.

**लाभदायक**, ३ लिं० ज्याचा संग्रहानें संग्रहकर्त्यास द्रव्यादिलाभ होतो असाजो अश्व, नीळ, इ० पदार्थ तो किं० शुभकर्म, व्यापार, इ० तो.

**लाभलोभ**, पु० कोणेक कार्यामध्यें मला कांहीं प्राप्त होईल असाजो लोभ असतो तो.

**लाभालोभा**, पु० कों० लाभलोभ, इ० तो.

**लामणदिवा**, पु० दोरी, इ० कांस टांगून ठेवावयाजोगाजो लोखंड, पितळ, इ० कांचा दिवा करितात तो; २, कों० पितळेचा खंदीलजास मध्यें सांखळी लावली असत्ये तो.

**लायक**, ३ लिं० لايق जा कर्मादिकाविषयींजो योग्य तो त्यास किं० जें कर्मादिजास योग्य तें त्यास; २, गंजिफांचे खेळांत उतारी करत्येसमयीं उतरायाजोगाजो हुकूम तो.

**लाल**, ३ लिं० तांबडाजो रंग तो किं० तद्विशिष्टजो वस्त्रादि तो; २, वस्त्रादिकांचे तांबडेपणाचा अतिशय वर्णायाचा असतां तांबडा याशब्दापुढें याचा प्रयोग करितात; उ० या पागोट्याचा रंग तांबडा लाल आहे; ३, पु० माणकासारखें एक रत्न आहे; ४, एक पक्षी आहे; ईश्वर, हरी, इ० कांचा लाल, इ० स्थलीं ईश्वराचा प्रियप्राणी असा अर्थ.

**लालची**, स्त्री० कांहींएक व्यापारांतजो लोभ उत्पन्न

उत्पन्न होतो किं॰ कोणी करितो ती; २, ३ लिं॰ इ-त्यादिकांचा लोभ जास फार तो.

लालझगडा, पु॰ प्रीतिकलह.

लालझगडें, न॰ लालझगडा.

लालडी, स्त्री॰ नथ, इ॰ कांत घालावयाचे उपयोगी जी माणकी ती.

लालन, न॰ पुत्र, इ॰ कांस मागितलेला पदार्थ द्यावा, करतील तसें करूं द्यावें, त्याजवर माया करावी, चुंबनालिंगनादि करावें, इत्यादिकें करून त्याचें मन संतुष्ट करण्याचा जो व्यापार तें.

लालबूझक्कड, पु॰ रा॰ लालभुजःकड.

लालभडक, ३ लिं॰ अतिशयित जो लाल तो.

लालभुजःकड, लालभुजःकण, पु॰ केवळ मूर्ख असून चातुर्याचा अभिमान बाळगणारा असा या नावाचा कोणी पुरुष प्रसिद्ध होता त्यावरून आतां दीडशाहाणा जो मनुष्य त्यास आरोपानें म्ह॰

लालसा, स्त्री॰ स॰ अतिशयित जी इच्छा ती.

लालित, ३ लिं॰ लालन केलें ज्याचें तो.

लालित्य, न॰ ललितपणा; परंतु भाषण, काव्य, इ॰ कांचेठायीं अर्थरचनाकृत किं॰ पदरचनाकृत जें सौंदर्य असतें तद्विषयीं विशेषेंकरून प्र॰; अर्थलालित्य, पदलालित्य, शब्दलालित्य, इ॰ म्ह॰

लाली, स्त्री॰ कांहींएक पदार्थनिष्ठ जो लालपणा ती.

लालूच, स्त्री॰ लालचीविशेष्यार्थी.

लाँव, स्त्री॰ फळें, वस्त्रें, दुभतें, पक्ष्याचीं पोरें, इ॰ कांस उपद्रव करणारें एक पिशाच आहे.

लावणी, स्त्री॰ शेत, इ॰ कांची जी लागवड ती; २, भात, इ॰ कांचें रोप किं॰ वृक्षाच्या डाल्या, उसांचीं कांडीं, इ॰ शेत, इ॰ कांत लावण्याचा व्यापार ती; ३, कविता ग्रंथाची एक जाति आहे जी तालस्वरांत गात असतात.

लावणीचा, ३ लिं॰ आपल्या आपण झालेलें नव्हे लावणी करून केलेलें जें वृक्षादि तो.

लावणीटुपणी, स्त्री॰ शेत, इ॰ संबंधी जी लावणी, वेणणी, इ॰ व्यापार ती.

लावणीबाज, ३ लिं॰ कसबिणीचे बैठकींत किं॰ तमाशांत म्हणायाचे उपयोगीं शृंगारप्रधान जा लावण्या त्या गाणारा जो तो.

लावणें, लागे असें करणें; २, कोणेकास अधिष्ठितस्थलापासून दुसरेकडे पाठविणें; उ॰ सगळें खटलें घराकडे लावलें मग मी निघून आलों; घरांतून गुरूं इ॰ हाकून लावणें, इ॰ स्थलीं बाहेर हा अंश पोटांत असतो, या अर्थी लावून देणें हा प्रयोग फार होतो; कोणेकास लावून बोलणें म्ह॰ दुसऱ्याचे अंतःकरणास लागायाजोगा जो कोणेक दंश तो धरून बोलणें; ४, न॰ कों॰ वाडी, मळा, इ॰ कांत लाविलेला जो वृक्षसमुदाय तें.

लावण्य, न॰ मनुष्यादिपदार्थनिष्ठ जें सौंदर्य तें.

लाँवसट, स्त्री॰ लांव.

लाँवसटणें, फळ, दूध, इ॰ लांवसटीचे उपद्रवानें युक्त होणें.

लाँवसरणें, कों॰ लांवसटणें; परंतु नारळ, ताडफळ, इ॰ कांविषयीं प्र॰

**लाँचा**, पु॰ एक पक्षी आहे.

**लाँचारणें**, लांवसरणें.

**लावालाव**, स्त्री॰ परस्परांचा द्वेष कलहादि उत्पन्न व्हावा याजोगा याची गोष्ट त्याजपाशीं, त्याची गोष्ट याजपाशीं सांगावी किं॰ परस्परेंही अधिक उणें सांगावें, इ॰रूपजो कोणेकाचा व्यापार तो.

**लाँच**, स्त्री॰ लांच.

**लाँचा,लाचा**, पु॰ लांचा.

**लाँचारणें**, कों॰ लांचारणें.

**लाशा**, १लिं॰ लास दिल्यासारिखें चिन्ह जा आम्रादिफलावर असतें तो; २, लासाचे चिन्हानें युक्त जो मनुष्यादि तो.

**लास**, पु॰ वाय्वाद्युपद्रवनिरसनार्थ लोहादि तापवून जो शरीरावर डाग देतात तो.

**लाँस**, स्त्री॰ प्राचीनकथांत प्रसिद्ध अशी एक राक्षसी आहे; २, पु॰ दे॰ लास.

**लासणें, लाँसणें**, कोणेक मनुष्यादिकास लासानें युक्त करणें.

**लासा**, १लिं॰ रा॰ लाशा.

**लाँसूर**, पु॰ न॰ दे॰ एकरोग आहे.

**लासें**, न॰ रा॰ आम्रादिफलावर किं॰ मनुष्यादिकाचे शरीरावर प्रा॰ कृष्णवर्ण जें चिन्ह असतें तें.

**लाहणें**, यं॰ लाधणें.

**लाही**, स्त्री॰ द्विदलधान्यातिरिक्त धान्य, किं॰ शाळादि भाजलें असतां फुलून होतोजो परिणाम तो; २, ला॰ क्रोधादिकानें शरीराची होत्येजी संतप्तता ती.

**लाहूर**, न॰ कों॰ लांचा.

**लाहो**, पु॰ तृप्त न होतां जितकें घेववेल तितकें घ्यावें ज्या वें अशा बुद्धीनें कोणेक अर्थाचा घेतातजी लाभ तो; घेणें धातुयोगीं प्र॰; २, कोणेक गोष्ट कितीवेळ झाली किं॰ कोणेक वस्तु किती मिळाली तथापि तृप्ति होऊं नये असाजो कोणेकास इच्छातिशय असतो तो; ३, यं॰ लाभ; उ॰ प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो जाणें केला तो भला भला.

**लाह्यांचामान**, पु॰ विवाहामध्यें लाह्यांचा होम करत्येसमयीं लाह्या घालणाराजो कोणी त्या मुलाचा मामा, इ॰ असतो त्यास वरपक्षीयानीं पागोटें, नारळ, इ॰रूप मान द्यावा लागतो तो.

**लाळ**, स्त्री॰ मुखांतील जो बुळबुळीत द्रव तो; २, तोंडातून लाळ गळावी, पाय कुजावे, असा एक गुरांस रोग होत असतो तो; कोणेकानें कोणेक वस्तुविषयीं लाळ घोटणें प्र॰ अभिलाषानें हें वस्त मला मिळेल तर बरें आहे असा ध्यास करित असणें; लाळेनें चणे भिजवून खाणें प्र॰ आपल्यास जाणीं मानावें असेजे पुत्र, सून, इ॰ त्याणीं जरी गौरव केलें नाहीं तथापि करतील त्यांतच गौरव मानून घेणें.

**लाळणें**, मूल, इ॰कानें मुखांतून लाळ गळे अशाविकारानें युक्त होणें.

**लाळें**, न॰ घोड्याचे सरोसरीस किं॰ मोरकीस खालचे बाजूस एक अवयव असतोजास जेरबंद किं॰ दवासन बांधितात तें.

**लाक्षणिक**, १लिं॰ लक्षणेनें जाणावयाचाजो अर्थ तो.

**लाक्षा**, स्त्री॰ सं॰ लाख प्रथमार्थी.

लिकंडाव, पु० कों० लपंडाव.

लिकण, स्त्री० किल्ला, डोंगर, इ० कांचेठायीं दडून बसायाजोगी जी आडोशाची जागा असत्ये ती.

लिकणें, दडणें.

लिकलिकणें, हिऱ्याची चुणी, तिचे खडे, इ० जे बारीक असून चकचकीत पदार्थ त्याणीं तेजःस्फुरणविशिष्ट होणें किं० दीपादिकानीं तेज मंद असून मध्येंमध्यें विराम पावत तेजस्फूर्तिविशिष्ट असणें.

लिकलिकीत, ३लिं० लिकलिकायाजोगाजो पदार्थ तो.

लिकाचोरी, लिकीचोरी, स्त्री० कांहींएक कर्म लिकून चोरून करण्याचाजो प्रकार तो.

लिकीर, ३लिं० कों० कांहींएक व्यवहारांत आपण वागत असून आपलें अंग बाहेर दाखवूं नये असा स्वभाव ज्याचा तो.

लिकूनचोरून, अ० लपूनछपून.

लिखणें, लिहिणें या अर्थी प्रायः ग्रंथीं आणि वऱ्हाडभाषेंत प्रसिद्धि०

लिखापुसा, पु० लेखपत्र.

लिखित, ३लिं० लिहिलेंजें अक्षर, ग्रंथ, चित्र, इ० तो.

लिखितार्थ, पु० पत्रीं लिहिलेलाजो मजकूर तो.

लिखी, स्त्री० डोकीचे केंसांतील लिखा काढायाचीजी लांबटफणी असत्ये ती.

लिखीत, न० इष्ट, मित्र, धनी, सेवक, इ० कांकडून आलेलीं सलामालकीचीं किं० कांहीं कामाकाजाविषयींचीं जीं पत्रें संग्रहास पडलेलीं असतात तीं प्र०; जीं वाचायास यावें म्हणून मुलें वाचित असतात.

लिख्या, ३लिं० संप्रदायापेक्षां केवळ लहानजो डोळा त्याचें वि०

लिंग, न० सं० कोणेक अर्थावर कोणेक धर्माविकाचें ज्ञापकजें चिन्ह असतें तें; २, शब्दवाच्य जो द्रव्यरूप अर्थ त्याचाठायींशाब्धबोधांत तद्वाचक शब्दानुरोधानें भिन्नभिन्नपणा भासणारा असाएक धर्म आहे तें ज्याचे अवांतर भेद पुंस्त्व, स्त्रीत्व, आणि नपुंसकत्व, हे आहेत; ३, शिश्न; ४, शाळुंकेंत स्थितजी हस्तपादाद्यवयवशून्य शिवमूर्ति तें; ५, लिंगाईतलोक शरीरावर शिवमूर्ति लेंकरून जो खडा बाळगीत असतात तें; ६, लिंगाइताचे नामापुढें हामतिष्टाशब्द लागतो; उ० दादलिंग, सदलिंग, इ०; ७, ला० आपल्यास स्वातंत्र्येंकरून वर्तायास नडणारेंजें कांहीं त्यास किं० आपल्या कर्तव्यकार्यास प्रतिबंधक जें कांहीं त्यास म्ह०

लिंगंडा, पु० निंदेनें लिंगाइतास म्ह०

लिंगदेह, पु० दहा इंद्रियें, पंचविषय, आणि मन, मिळूनजो संघात तद्रूप जीवाचें सूक्ष्मशरीर तो.

लिंगट्या, ३लिं० चेंगट्या.

लिंगाईत, पु० शिवाचें लिंग शरीरावर बाळगीत असतात अशा मार्गानें चालणारा शैवांत एक भेद आहे.

लिगाड, न० लचांड.

लिगाडी, ३लिं० कचाट्या.

लिंगिस्ताई, लिंगिस्थाई, स्त्री० कों० चेंगटाई.

**लिंग्या**, पु० लिंगाईतजो त्यास निंदेनें ह्म०

**लिचपिचीत**, ३लिं० सामान्य भारपडलाअसतांही पिचपिच लपतो असा घटमूट नव्हेजो वेत, छडी, लेखणीचा टांक, इ० पदार्थ तो.

**लिचपीच**, अ० क्री० अनु० लिचपिचीतजो पदार्थ त्याचे लपण्याचें वि०

**लिडबिडणें**, लडबडणें.

**लिडबिडीत**, ३लिं० लडबडीत.

**लिड्या**, ३लिं० रा० शरीरानें रोड, अशक्त, जें मुलगें तो.

**लिदवळ**, ३लिं० क्री० लीद, विष्ठा, इ० खाण्यास संवंकलेलाजो गोमहिष्यादि पशु तो; २, ला० कांच खाऊजो मनुष्य त्यास ह्म०; ३, अल्पद्रव्य लोभानें ही पाहिजे तें कर्मकरण्यास अनुकूल होतो त्यास ह्म०

**लिदाड**, न० कोणेकस्थलीं लीद टाकूनटाकून जमला असतोजो राशि तें.

**लिपंडाव**, पु० लपंडाव.

**लिंपण**, स्त्री० न० पात्रादिकांत कांहीं धान्यादिपदार्थ ठेवून त्याजवर तृणादि घालून वरतें शेण, चिखल यांणीं लिंपून जें आच्छादन करितात ती तें.

**लिंपणें**, फुटलेली भिंत, कुड, चौल, इ० पदार्थ भोकें, खळ्या, इ० बुजून चांगलें व्हावयाजोगें शेण, चिखल, इ० कांचे लेपानें युक्त करणें; पक्षीं शेण, इ० कांसही कर्मता येत्ये; २, चूल, कोथळी, ओटा, इ० चिखल, चुना, इ० कांचे गोळे मारून मारून रचणें.

**लिपणें**, क्री० लिकणें; २, चिखल, इ० सद्रवपदार्थामीं शरीरावयवादि लिप्त होणें; शद्रभा पादृत्ति.



**लिपि**, स्त्री० सं० लीप.

**लिप्त**, ३लिं० शेण, चिखल, इ० सद्रवपदार्थाचे लेपानें युक्तजो तो; २, ला० आपा निर्वाह केल्यावांचून आपली स्वरक्षा नाहीं असें जें कोणेक कर्म किं० तज्जन्य दोषादि त्याचे संबधांत सांपडलेलाजो तो.

**लिप्ताळा**, ३लिं० दुसऱ्याची ओळखवगत घडायाजोगें त्यापासून द्रव्यादिघेयें, उपकारकरून घेणें, इ० कर्म तेणेंकरून जो लिप्त तो त्यादुसऱ्याचा.

**लिंब**, पु० निंबशब्दाचा अपभ्रंश.

**लिबलिबीत**, ३लिं० लबलबीत; २, बिलबिलीत.

**लिंबलोण**, न० कोणेकास दृष्टिविकारादि विकार झाला असतां किं० न व्हावा ह्मणून मीठ, मोहऱ्या, इ० पदार्थ ओंवाळून टाकण्याचाजो व्यापार किं० तदर्थ घेतलेलेजे ते पदार्थ ते.

**लिबा**, ३लिं० रा० लेबाड्या.

**लिंबा**, पु० रा० निंबा.

**लिंबारा**, पु० निंबारा.

**लिंबी**, स्त्री० निंबी.

**लिंबूण**, स्त्री० निंबूण.

**लिंबूर**, पु० निंबूर.

**लिंबोटी**, स्त्री० निंबोटी.

**लिंबोणी**, स्त्री० दे० लिंबू ह्मणून जें फळ त्याचें झाड तें; २, बाळंत लिंब आणि बकाणा यांचें जें फळ तें.

**लिंबोळी**, स्त्री० निंबोळी.

**लिभास**, पु० तत्तद्देशभेदें करून किं० जातिभेदें करून जो भिन्नभिन्न वस्त्रालंकारादि धारणा

चा प्रकार तो; उ॰ हिंदुस्थानी लोकांपेक्षां दक्षणी लोकांचा लिभास निराळा; २, ला॰ लषाजमा.

**लिमचा**, पु॰ निमचा.

**लिलाम, लिलांव**, न॰ कोणेक वस्तु विकायाचें असतां अनेक घेणारांस बलावून अनुक्रमानें किंमत चढवीत चढवीत शेवटीं किंमत ठरेल तीस विकावें असा जो विक्रयाचा प्रकार तें; २, तशा प्रकारानें विकतात जो माल त्यास क्वचित् म्ह॰

**लिबका**, ३ लिं॰ रा॰ ज्याचे अंगीं कांहीं बळ कांहीं नाहीं आणि अवयवही फार शिथिल असा जो मनुष्य, त्याचे अवयव, गांठ, इ॰ पदार्थ तो.

**लिबलिबीत**, ३ लिं॰ मृदु शिथिळ असा जो पदार्थ तो.

**लिहिणावळ**, स्त्री॰ पुस्तकादि लिहिविलें असतां तत्संबंधी जें त्या लिहिणारास द्रव्य द्यावें लागतें ती.

**लिहिणें**, लेखनी, इ॰ साधनानें अक्षरादि निघे असा व्यापार करणें; एथें अक्षर, चित्र, कागद, ग्रंथ, इ॰ पदार्थांस विवक्षानुरूप कर्मता येत्ये.

**लिहिणेंपुसणें**, न॰ कागद, इ॰ लिहिणें हिशेब करणें, इ॰ जो कारकून, लेखक, इ॰ कांचा व्यापार तें; उ॰ ज्याला लिहिणें पुसणें येत असेल त्याला सुलगी द्यावी; आह्मी लिहिणेंपुसणें करून पोट भरतों; २, लेखपत्र.

**लिहिलेंपुसलें**, न॰ लेखपत्र.

**लिळा**, स्त्री॰ लीलाशब्दाचा अपभ्रंश.

**लिक्षा**, स्त्री॰ सं॰ लीख ह्मणून जो प्राणी ती.

**लीख**, स्त्री॰ उवेचें पूर्वरूप अंडाकार सूक्ष्म असतें ती; २, धोत्रजोडा, इ॰ कांचा रेशमी कांठ किं॰ अंजनी, इ॰ कांचे ठायीं रेशीम पट्टन भरल्यामुळें मध्येंमध्यें जो सुताचा पांढरा अंश दिसत असतो ती.

**लीद**, स्त्री॰ हत्ती, उंट, घोडा, गाढव, खेंचर, यांची जी विष्ठा ती; २, कों॰ एक वेल आहे.

**लीन**, ३ लिं॰ कोणेक अर्थाचे ठायीं लय पावला जो कोणेक अर्थ तो, उ॰ प्रलयीं सर्व प्रपंच ब्रह्मस्वरूपी लीन होतो; २, विनयानें नम्र जो कोणेक तो, उ॰ साधूं पाशीं लीन होऊन रहावें.

**लीप**, स्त्री॰ शास्त्र व्यवहारांत किं॰ लौकिक व्यवहारांत उच्चारांत येतात जे वर्ण त्यांचा लिहावयाजोग्या संकेतानें निश्चित केलेल्या जा रेषा चिन्हरूप व्यक्ति ती; जी संकेतानें भिन्नभिन्न असत्ये.

**लीला**, स्त्री॰ क्रीडा.

**लुकडा**, ३ लिं॰ लुक्कड.

**लुकण**, न॰ दगड, काष्ठ, इ॰ कांचा सांधा बसावा, देवादिकांचे अंगास कवच करावें, इत्याद्यर्थ शेंदूर, राळ, चुना, मेण, इ॰ पदार्थ एकत्र करून जें विशिष्ट द्रव्य करितात तें; २, तेणेंकरून त्या संधिप्रदेशादिकांचे ठायीं करितात जो लेप तें

**लुकलुकणें**, लिकलिकणें.

**लुकलुकी**, स्त्री॰ दीप, अग्नि, हिरा, इ॰ कांचे तेजाची किं॰ देहगत जीवाची जी स्फुरद्रूपता तीचा राहिलेला जो ईषदंश ती; २, लकाकी.

**लुकसान**, न॰ स्त्री॰ नुकसान; २, ३ लिं॰ लुसकान.

**लुकसानी**, स्त्री॰ नुकसान.

**लुक्का**, ३ लिं॰ रा॰ कोणत्याही कामास गेला असतां तें काम न करितां ररकशीत माघारा येत असतो असा

असाजो देव चातुर्यादिहीन मनुष्य तो; ह्म० समुद्रास गेला लुका तों समुद्र रूका.

**लुक्कड**, ३लिं० शरीरानें केवळ कृश जो मनुष्यादि तो.

**लुक्कण**, न० लुकण.

**लुक्का**, ३लिं० लुच्चेगिरी, सोधेगिरी, करण्याचा स्वभावजाचा असाजो हलका मनुष्य तो.

**लुगडें**, न० सामान्यतः सोळाहात लांब आणि दोन हातरुंद किं० याहून कांहीं अधिकउणें लांबरुंद याप्रमाणाचें प्रायः रंगीत असें स्त्रियांस नेसायाचे उपयोगीजें वस्त्र तें.

**लुंगा**, ३लिं० शरीरानें केवळ अशक्तजो मनुष्यादि तो.

**लुगारणें**, चोरादिकानीं कोणेकापासून अपहरणादिद्वारा संपत्ति, इ० कांचें हरणकरून घेणें, पक्षीं ज्यापासून संपत्यादि हरण केलें त्यासही कर्मता.

**लुगारू**, ३लिं० कोणेकापासून कोणेक वस्तु लुगारण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**लुंगी**, स्त्री० मुसलमान लोकानीं नेसायाचें एका जातीचें लहानसें वस्त्र आहे ती; २, केवळ लहान जें पंचा, लंगोटी, इ० नेसायाचें वस्त्र त्यास.ह्म०; ३, सअगुन्याचे दाण्यावर जें बोंड असतें ती.

**लुंघणें**, लंघणें प्रथमार्थी; २, संख्यात किं० परिमित जो कोणेक पदार्थ समुदाय त्यांतील कितीएकानीं चोर्यादिद्वारा गेल्यामुळें नाहींसें होणें.

**लुंघवणें**, कोणेकाचें द्रव्यादि युक्ति प्रयुक्तीनें हरण करून त्यास तद्रहित करणें.

**लुचणें, लुंचणें**, गोमहिष्यादि पशूंचे वत्सानें स्तनपान करणें.

**लुचपत**, स्त्री० धनी, इ० कांचे व्यवहारांत वागणाराजो सेवकादि तो त्या धनी, इ० कांस नकळतां त्या व्यवहारांत मिळवितोजें द्रव्यादि ती.

**लुच्चर**, न० रा० अंबा, इ० फळामध्यें असत्येजी रेषा तें.

**लुचाडुणें**, दे० बुचाडुणें.

**लुच्चा**, ३लिं० चहाडी, प्रतरणा, इ० असभ्यकर्म करण्याचा स्वभावजाचा तो.

**लुच्चाई**, स्त्री० लुच्चेपणा.

**लुच्चेगिरी**, स्त्री० लुच्चाई.

**लुच्चेशाई**, स्त्री० लुच्चेगिरी; २,३लिं० लुच्चाचेंजें भाषण, व्यवहार, इ० तो.

**लुटणें**, कोणेकस्थलीं विद्यमानजे कोणेकाचे धान्यराशि वस्त्रें, द्रव्य, पात्रें, फळें, इ० पदार्थ त्यांतें अनेकजे चोर, पेंढारी, राजदूत, किं० ग्रामस्तलोक, भिकारी, इ० कांनीं ज्याचे हातास जें लागेल तें उचाचें अशारीतीनें हरून नेणें; एथें बलात्कारानें हरण असतां त्याविषयाचे धन्यास आणि त्या विषयास आणि त्या अधिकरणास विवक्षानुरूप कर्मता; धन्याचे अनुमतानें हरण आहेतर त्याविषयास आणि अधिकरणासमात्र विवक्षानुरूप कर्मता; पदार्थ बाहुल्य असून लुटणारा एकअसताही प्रयोग होतो; २, ला० कोणेकाचा द्रव्यादिविषय कोणेकानें कपटादिनिमित्तद्वारा अपहृत करणें; एथेंपूर्ववत्कर्मता; उ० तोपडला भोळा त्याला कारकून मिळाला तो हरामी त्याणें अवघी दोलत लुटली.

**लुटलुटीत**, ३लिं० रा० मध्यम रीतीचें पुष्ट, ठेंगणें, वाटोळें, दिसायाजोगें असून जड नव्हे असेंजें

कोणेकानें शरीर किं० तदवयव किं० तो मनुष्य तो.

लुटलूट, अ० अनु० लुटलुटीतजो मनुष्यादि त्याचें फारलांब पाऊल पडूं नये अवळचेजवळ पण लोकरलोकर अशाप्रकारचें चालणें, हालणें, इ० कार्चे वि०

लुटाऊ, ३लिं० लुटून आणलेलाजो विषय तो.

लुटारी, लुटारू, पु० लुटणाराजो मनुष्य तो.

लुटूफुटू, अ० पाहिजे तोअर्थ वास्तविकनसतां केवळ मनःकल्पनेनें कल्याचा अशाप्रकारें खेळणें, इ० कांचें वि०; प्रायः मुलांचे खेळण्यांत प्र०

लुटूफुटूचा, ३लिं० लुटूफुटू अशाप्रकारें कल्पिलेला जो खेळ, पदार्थ, इ० तो.

लुंठणा, न० लुंठनशब्दाचाअपभ्रंश.

लुंठन, न० सं० लुटण्याचाजो व्यापार तें; २, ला० वृक्ष, लतादिसंबंधी फल, पुष्प, पर्ण, इ० जें सर्वस्व त्याचें जें अपहरण त्यास ह्म०

लुडबा, ३लिं० रा० बोबडा.

लुडबुडणें, लुडबूड करणें.

लुडबूड, स्त्री० कोणीकांहीं उद्योग करीतअसतां त्याला साहित्य व्हावें ह्मणून कोणी मध्येंमध्यें भाषण किं० इकडचेंतिकडेठेव, तिकडचेंइकडेठेव, इ० व्यापार करूं लागतो तेणेंकरून साहित्य नहोतां उगीच गडबडमात्र होत्ये असेंअसतां त्या अप्रयोजक व्यापारास ह्म०

लुडबुड्या, ३लिं० लुडबूड करण्याचा स्वभावजाचा तो; ह्म० लांडेंलुडबुडें आणि गांचे पुढ्पुडें.

लुडम्या, ३लिं० लुडबुड्या.

लुडासुडा, ३लिं० कों० सरासरी काम चालवायाजोगाजो जुना रूमाराचामोडका असा नांगर, गाडा, रोडका, त्यातारावैल, रोणगा, मनुष्य, इ० पदार्थ तो.

लुडाबुचा, ३लिं० दे० शारवादिहीन अतएव विशोभित दिसायाजोगा झालेलाजो वृक्षादि तो.

लुतरा, ३लिं० कों० लुबरा.

लुप्त, ३लिं० ज्याचा लोप झाला तो.

लुबरा, ३लिं० आपल्यास तादृश ज्ञान नाहीं आणि अधिकारही नाहीं आणि इतर चारणही करितात, असें असतां कोणेक व्यवहारांत पुढेंपुढें बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो किं० टवळाटवळ, खटपट, इ० करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

लुबलूब, अ० लुबरेपणाचें जें बोलणें त्याचें वि०

लुबाडणें, लुगारणें.

लुब्ध, ३लिं० कोणेक विषयावर लोभविशिष्ट झाला जो तो.

लुब्धक, पु० सं० पारधी; २, मृगनक्षत्राजवळ एक तारा आहे तो.

लुब्धणें, काहींएक विषयाचेठायीं लुब्ध होणें.

लुला, ३लिं० जन्मतः किं० रोगादिकामुळें केवळ निर्जीव लडबड लोंबायाजोगा झालेलाजो हात किं० पाय, किं० तद्विशिष्ट मनुष्यादि तो; २, ला० खरूज, उगाणू, इ० कामुळें कार्याविषयीं असमर्थ झालेला जो हस्तपादादि त्यासही ह्म०; ३, कों० ताठपणा ज्याचेअंगीं नाहींअसाजो पेंढू, वात, रेशीं, इ० इत्यादि, इ० पदार्थ त्यास ह्म०

लुलावणें, कों० कांहींएक व्यापारांत दुसऱ्यास अडचण होईल असें अप्रयोजकपणें कोणेकानें मध्येंमध्यें फिरणें.

लुल्ल, ३लिं० लुल्ल.

**लुबलुबणें**, रा॰ अंगावर ऊ. किं॰ मुंगी, किडा, इ॰ कानें कंडूति सदृश कलनाविशेष व्हावयाजोगें चलनविशिष्ट असणें; २, जिव्हादिकांस भाषणादिव्यापारीं अधीरता उत्पन्न व्हावयाजोगाजो कंडूति सदृश विकार होत असतो तद्विशिष्ट त्या जिव्हादिकानें होणें; उ॰ मी आतां अगदीं बोलणार नाहीं असें मनांतून म्हणतों पण प्रसंग आला म्हणजे जीभ लुबलुबल्ये राहवत नाहीं.

**लुसकान**, ३ लिं॰ अशक्तजो मनुष्य, पक्ष, काष्ठ, इ॰ तो.

**लुसलुशी**, स्त्री॰ पदार्थाचेअंगींजो लुसलुशीतपणा असतो ती.

**लुसलुशीत**, ३ लिं॰ कोंवळेपणामुळें टपटबी आणि मृदुत्व ज्याचे अंगीं आहे असाजो फल, पर्ण, अंकुर, इ॰ किं॰ मनुष्यादिकांचें शरीर, इ॰ तो.

**लुसलुसणें**, लुसलुशीतपणानें युक्त असणें.

**लुळा**, ३ लिं॰ लुला प्रथम द्वितीयार्थीं.

**लुळारवुडा**, ३ लिं॰ कों॰ लुडारवुडा.

**लुळें**, न॰ क्रयविक्रयादिव्यापाराचा दराव, तमाशा, कज्जा, मारामार, मैथुन, इत्यादर्थ एकत्र जमनातजे अनेक ते सर्व मिळून विशिष्ट जो समुदाय तें.

**लूट**, स्त्री॰ लुटण्याचाजो व्यापार ती; २, त्याव्यापारानें लब्ध जें द्रव्य ती; ३, व्या॰ पैका, धान्य, इ॰ संबंधी पांच याव-याचे त्याग पंचवीस यावें, शेरभर यावें तेथें चारशेर यावें, अशाप्रकारचा वाटणें, देणं, इ॰ चेपुन्र्येंकरून जो व्यापार त्यास म्ह॰; ४, कोणेक पदार्थाची अतिशयित होत्येजी समृद्धि जीणेंकरून त्यापदार्थास कोणी विचारीनासें होतें ती; लुटीचा म्ह॰ लुटून आणलेला.

**लूत**, स्त्री॰ एकरजें स्पर्शिल्या मनुष्यादिकांस एकरोग होत असतो ती; २, त्यारोगाचे श्माशानादिकें एक औषधोपयोगीं झाड आहे ती.

**लेक**, पु॰ स्त्री॰ दे॰ लेंक.

**लेंक**, पु॰ पुत्र; २. स्त्री॰ कन्या.

**लेंकपूत**, पु॰ लेंकबाळ.

**लेंकबाळ**, न॰ पु॰ लेक, नातू, इ॰ जो कोणी तें तो.

**लेंकरालेंकरीं**, अ॰ पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें वृत्ति, इ॰ उपभोगिणें, चालणें, इ॰ कांचें वि॰

**लेंकरूं**, न॰ बालक; २, वडीलजे पित्रादिक त्यासजें अपत्य किं॰ तत्सदृश अन्य कोणी तें.

**लेंकरूंबाळ**, न॰ पोरबाळ.

**लेंकवळा**, पु॰ आपल्या रा रखेचा पोटीं उत्पन्न झाला जो पुत्र तो; २, रा॰ आपल्यापासून स्वस्त्रियेवांचून इतर स्त्रीच्येठायीं उत्पन्न झालीजी संतति तो आपला.

**लेंकुरपण**, न॰ पोरपणा.

**लेंकुरपणा**, पु॰ पोरपणा.

**लेंकुरवा**, ३ लिं॰ रा॰ लेकुरपणाचाजो स्वभाव, बुद्धि. समजूत, इ॰ तो.

**लेंकुरवाळा**, ३ लिं॰ जास लेंकरूं आहे तो; २, ज्याला आडवा अवयव फुटला असतो असेजें हळकुंड त्याचें वि॰

**लेंकुरसमजूत**, स्त्री॰ पोरसमजूत.

**लेंकुरस्वभाव**, पु॰ पोरस्वभाव.

**लेंकुरालेंकुरीं**, अ॰ म॰ लेंकरालेंकरी.

**लेख**, पु॰ लेखनव्यापारानें कागद, इ॰ कांवर जीअक्षरांची रचना तो; याग्रंथकागचा लेख अपघड, इ॰ स्थलीं

स्थलीं लेख शब्देंकरून लिहिला जातो जो शब्द किं॰ तद्वाच्य अर्थ त्याचा बोध होतो; २, न॰ एकादि संख्येचे जे पाडे मुलें शिकत असतात ते प्र॰

**लेखक**, पु॰ बाळबद, इ॰ लीपीनें ग्रंथ लिहून देऊन तत्संबंधी इ॰ ज्यानें उपजीविका करितो तो; २, सं॰ लिहिणारा जो कारकून तो; ३, ३लिं॰ लिहिणारा जो तो; उ॰ चित्रलेखक. इ॰ स॰

**लेखकप्रमाद**, पु॰ ग्रंथांत किं॰ सांगणाराचे सांगण्यांत, चुकनसतां लेखकाचे अनवधानतेमुळें लेखांत जी चूक पडल्ये तो.

**लेखकी**, ३लिं॰ लेखकानें लिहिला जो ग्रंथ, पुस्तक, अक्षर, वळण, इ॰ जें लेखसंबंधी तो; २, स्त्री॰ लेखकपणा.

**लेखण**, स्त्री॰ लेखणी.

**लेखणी**, स्त्री॰ लेखनीशब्दाचा अपभ्रंश; त्याची लेखणी खबरदार आहे, तो लेखणीचा पुरा आहे, त्याचे लेखणीस चंग बांधावा, इ॰ स्थलीं तो लिहिणारा उत्कृष्ट आहे असा अर्थ.

**लेखणीबहादूर**, पु॰ पुरा जो लिहिणारा त्यास ह्म॰

**लेखणें**, कोणेक अर्थातें कोणेक रूपेंकरून मानणें; उ॰ साधुजन सर्वजनास आत्मवत् लेखतात; २, क्रमानणें; ३, कोणेकानें कोणेकाशीं कोणेक नात्यानें संबंध असणें; उ॰ तुह्मी माझे एकीकडून धनी लेखतां आणि एकीकडून जांवाई लेखतां.

**लेखन**, न॰ लिहिण्याचा जो व्यापार तें; ग्रंथलेखन, चित्रलेखन, इ॰ स॰

**लेखनी**, स्त्री॰ सं॰ लिहावयास साधन बरूं, पेर, इ॰ कांचा जो पदार्थ करित असतात ती.



**लेखपट्टा**, पु॰ लेखपत्र.

**लेखपत्र**, न॰ देणें, घेणें, इ॰ व्यवहारीं साधनभूत कर्जखत, सनद, ताकीदपत्र, इ॰ लेखरूप कांहीं एक तें.

**लेखपूस**, पु॰ लेखपत्र.

**लेखप्रमाण**, न॰ लेखपत्र.

**लेखा**, पु॰ हा अनुल्लंघनीय, हा भारी, हा शाहाणा, हा दुर्धर, इ॰ रूपेंकरून कोणेक अर्थाचे अंगींजी गणनीयता असल्ये तो; निषेधविषयीं प्र॰; उ॰ तो राजास देखील बोलायास भीत नाहीं मग तुझा लेखा किती.

**लेंचापेंचा**, ३लिं॰ विवक्षितकार्य निर्वाहार्थ जसा खबरदार असावा तसा नव्हे असा जो कोणेक अर्थ तो; प्रायः निषेधविषयीं प्र॰; उ॰ बाराचे कामास लेंचापेंचा मनुष्य कामाचा नाहीं; पाण्याचे जवळचा बांध लेंचापेंचा घालूं नये; लेंचीपेंची गांठ देऊं नको.

**लेंबी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**लेजीम**, न॰ स्त्री॰ सांखळदंडानें संबद्ध केलेला सोटा पैलवान लोक पेलायासाठीं करित असतात तें ती.

**लेंड**, न॰ लेंडूक.

**लेंडरूखासयेणें**, रा॰ आपल्या प्रीतीचें जें मूल, इ॰ कोणी त्याचें लालन करतांकरतां प्रेमानें मूर्छितप्राय होणें.

**लेंडी**, स्त्री॰ घोडा, उंट, बकरी, घूस, उंदीर, इ॰ कांचे विष्ठेचा पडतात जा गोळ्या त्या प्र॰; २, घोडयाचें खोगीर पुढें न सरकावें ह्मणून दांडीखालून घ्याव याचा त्यास संबंध केला असतो जो बंद तो; ३,

खोगरास पुढच्याअंगीं जो घोरबंद असतो त्यास कोणी म्ह०; ४, ताडास जो शेंगेसारिखा लांब एक अवयव येत असतो तो; ५, एकेरी जें मरवमाळीचें फूल तें.

**लेँडूक**, न० मनुष्य, कुत्रें, मांजर, हत्ती, वाघ, आसोल, तरस, इ० कांचे विष्ठेचे जमलेले जे पडतात गोळे ते प्र० तें

**लेँड्याताड**, पु० ज्यावर फळें येत नाहींत तुसत्या लेंड्याच येतात असा एक ताडाचे दुसांत भेद आहे.

**लेणें**, अलंकारार्थ शरीरावर काजळ, कुंकूं, भूषणें, इ० धारण करणें; २, न० शरीरातें शोभा देणारें जें अलंकारादिक तें; ३, प्रा० चैत्रमासीं गौरीच्या उत्साहाकरितां भिंतीवर जें गोपुर, इ० काढितात तें; ४, डोंगर पोखरून आंत सभामंडप, देवालयें, गुहा, नानाप्रकारचीं चित्रें, इ० कृत्य कोठेंकोठें प्राचीनांनीं केलेलें आहे त्यास म्ह०

**लेथडणें**, दे० माती, शेण, खरकटें, इ० कानीं शरीर, अवयव, पात्र, इ० लिप्त करणें.

**लेप**, पु० चिखल, कालवलेला चुना, औषधींचा रस, काष्ठानें उगाळलेलें गंध, इ० शरीर, भिंत, इ० कांवर सारिवणें, इ० व्यापारानें लाविलें असतां जी त्वगवयवासारिखी त्या चिखल, इ० द्रव्याची रचना होत्ये ती; २, शरीरादिकांवर ज्याचा लेप करायासाठीं सिद्ध केलेलें जें द्रव्य तो; परंतु औषधार्थ लेप कर्तव्य असतां प्र०; ३, रा० भात, भाकर, इत्यादि अन्नांशरूप जें खरकटें तो; ४, लेंप.

**लेँप**, पु० न० रजई; २, आंथरायाची गादी तो तें.

**लेंपडी**, **लेँपडी**, स्त्री० लहान जी आंथरायाची गादी ती.

**लेपडें**, **लेँपडें**, न० लेंपास निंदेनें म्ह०

**लेपणें**, चंदनादिकांचे लेपानें देवादिकांचें अंग लिप्त करणें; पक्षीं त्या चंदनादिकांस ही कर्मता.

**लेपन**, न० सं० भिंत, इ० कांवर चिखल, इ० कानीं लेप करण्याचा जो व्यापार तें; २, शरीरादिकांवर लेप करण्याविषयीं उद्दिष्ट जें चंदनादिक तें.

**लेपवणी**, न० रा० खरकटीं भांडीं, हात, इ० धुतलें असतां अन्नांश विशिष्ट होतें जें पाणी तें

**लेपवळ**, स्त्री० रा० कोणेक स्थलीं खरकट्याचा पडला असतो जो पसारा ती.

**लेफंडा**, पु० कों० कोणेक पदार्थावर चिखल, शेण, भस्म, गंध, इ० कांचा कुठे कुठे लेप झाल्यामुळें तेथें उमटतो जो पट्टा तो; उ० स्फरेरव चांगलें कपाळीं गंध लावाचें तो लेफंडा काय लावला आहेस.

**लेँभड**, स्त्री० कों० लडबड.

**लेँभडणें**, कोणेकानें लेंभडरूप होणें.

**लेँभणें**, कों० लंघणें प्रथमार्थी.

**लेलाँव**, न० हिं० लिलांव.

**लेवट**, न० कों० मैथुनार्थ संयुक्त झालें जें द्वंद्व त्यास संकेतानें म्ह०

**लेवा**, पु० कों० लेप प्रथमार्थी.

**लेवांड्या**, ३ लिं० केवळ कृश दिसत नसतां ज्यांत ताकद शक्ति नाहीं असा जो मनुष्यादि कि० त्याचा अवयव तो.

**लेश**, पु० कांहीं एक पदार्थाचा जो ईषदंश तो; उ० विहिरींत पाण्याचा लेश नाहीं, विहिरींत पाणी लेश नाहीं, इ० स्थलीं ईषदंशमात्र ही तें पाणी, इ० नाहीं

नाहीं असा अर्थ; २, ३लिं० लेस.

लेस, ३लिं० जाचें तयारीमध्यें लेशमात्रही न्यूनता राहिली नाहीं असा पुरता तयार झालेला जो कोणेक अर्थ तो.

लेह्य, ३लिं०सं० चाटून खावयाजोगा जो पंचामृत, चाटण, इ० पदार्थ तो.

लैं, ३लिं० लई.

लैलुट, स्त्री० लयलूट.

लोक, पु० मनुष्य, दैत्य, देव, गंधर्व, अप्सरा, इंद्रादि दिक्पाल, ब्रह्मा, विष्णु, महेश्वर, इ० कांचीं रहावयाचीं जीं भिन्न भिन्न स्थानें आहेत तीं प्र०; परलोक, ऊर्ध्वलोक, अधोलोक, इ० स०; २, जन; या अर्थी प्रायः अनेकवचनीं प्र०; लोकमर्यादा, लोकरीति. लोकलज्जा, इ० स०; ३, कांहीं एक विधानार्थ तो; हा, तूं, मी, इ० निर्देशनानें जो पृथक्कृत जीव किं० जीवसमुदाय त्याहून इतर जे सर्व ते; उ० तूंमात्र शहाणा लोक काय वेडे आहेत; आमचे घरीं धर्म होतो इतका लोकांचे घरीं झाला तर मग काय पाहिजे; ४, राजे, सरदार, इ० कांजवळ किं० किल्ला, शहर, इ० कांचे रक्षणार्थ ठेविले असतात ते, प्र० अनेकव० ५ परका जो कोणी मनुष्य तो; ६, जात्यादि भेदक धर्मानें त्या त्या मनुष्य दैत्यादि समुदायाचा भेद विवक्षित असतां त्या त्या जात्यादि वाचक शब्दापुढें याचा प्रयोग होतो; उ० ब्राह्मणलोक, गवईलोक, इ० स० तुह्मी देवलोक तुह्मास मृत्युभय कशाचें.

लोकपाल, पु०सं० इंद्रादि जे प्रति दिशेचे स्वामी ते प्रत्येकीं.

लोकपाळ, पु० लोकपाल

लोकप्रवाद, पु० जनप्रवाद.

लोंकर, स्त्री० पशु, मनुष्यादिकांचे शरीरावरील जो केशसमुदाय ती; परंतु मनुष्याचीदाढी, मिशी, डोकी, घोडयाची अयाळ, दांडी, इ० स्थानचे जे मोठे मोठे जाडे केश त्याविषयीं प्रयोग नाहीं; २, कों० आंब्याचे बांठ्यावर जो काथ्यासारिखा अंश असतो त्यास आरोपानें ह्म०

लोकरंजन, न० जनरंजन.

लोंकरी, ३लिं० मेंढा, इ० कांचे लोकरीनें निर्मिलें जें कंबल, इ० तो.

लोकलज्जा, स्त्री० जनलज्जा.

लोकल्लाज, स्त्री० लोकलज्जा.

लोकलोकपाळ, पु० शिपाई, सरदार, इ० तो.

लोकवार्ता, स्त्री० जनवार्ता.

लोकसंग्रह, पु० सं० सर्वलोकांस वर्तनाविषयीं न्याय्य जी रीति तदनुसार आपण वर्तलें नसतांही आपल्यास प्रत्यवायादि नाहीं परंतु आपण त्या रीति सोडिल्या असतां आपल्या दृष्टांतें करून लोकही मोडतील आणि बुडतील तसें न व्हावें ह्मणून सदाचरणद्वारा त्या त्या रीतींचा कोणी करितो जो अंगीकार तो; उ० ब्रह्मज्ञानी पुरुषानीं कर्म न केलें तरीं प्रत्यवाय नाहीं परंतु लोकसंग्रहार्थ कर्म करितात.

लोकापवाद, पु० जनापवाद.

लोकालोक, पु० सं० सूर्याचे किरणानीं जेथपर्यंत प्रकाश होतो त्या मर्यादा देशीं शास्त्रकल्पित एक पर्वत आहे तो.

लोकालोकीं, अ० प्रत्यक्ष दर्शन नसतां किं० लेखादि प्रमाण नसतां केवळ लोकप्रवादद्वारा कोणेक गोष्ट

आइकणें, इ॰ कांचे वि॰; २, स्वयें आपण किं॰ आपल्येस्थानीं आपला पुत्र, सेवक, इ॰ नसतां केवळ लोकाचे हातून कांहीं काम होणें, करणें, इ॰ कांचें वि॰

**लोकीक**, पु॰ लौकिकशब्दाचा अपभ्रंश.

**लोकेषणा**, स्त्री॰ लोकानीं बरें ह्मणावें, हांसूं नये, वाईट ह्मणूं नये, अशी जी इच्छा ती; २, कर्मेंकरून प्राप्त होतात जे स्वर्गादिलोक तद्विषयक जी इच्छा ती.

**लोकोत्तर**, ३ लिं॰ सर्वलोकांपेक्षां उत्कृष्ट जो मनुष्य किं॰ तत्सामर्थ्य, सौंदर्य, इ॰ तो.

**लोकोपकार**, पु॰ वाट बांधणें, वाटेवर पाणी करणें, धर्मशाळा बांधणें, इ॰ कर्मांनीं लोकांवर जो उपकार तो.

**लोकोपचार**, पु॰ सं॰ जें करावयाविषयीं शास्त्राज्ञा, आपली हौस, इ॰ प्रयोजक निमित्त तादृश नाहीं परंतु केल्यास लोक आपणास हांसतील, वाईट ह्मणतील. ह्मणून केवळ लौकिक संरक्षणार्थ करावा लागतो जो सदाचरणरूप उपचार तो.

**लोखंड**, न॰ एक धातु आहे ज्याचीं शस्त्रें, खिळे, इ॰ करीत असतात तें

**लोखंडकाम**, न॰ घर, गलबत, इ॰ कांकडे लागतें जें खिळे, पट्या, इ॰ लोखंडी सामान तें; २, लोहारकाम.

**लोखंडी**, ३ लिं॰ लोखंडाचा जो शस्त्रादिपदार्थ तो; २, स्त्री॰ लोखंडाची जी कढई ती.

**लोखंडीकेळ**, स्त्री॰ केळीमध्यें एक भेद आहे.

**लोखंडीकेळं, लोखंडीकेळें**, न॰ लोखंडये केळीचें जें केळें तें.

**लोखंडीचार**, स्त्री॰ कों॰ एक तृणभेद आहे.

**लोखंडीजर**, स्त्री॰ खोटी जी जर ती.

**लोखंडीतगर**, स्त्री॰ तगरीचे झाडांत एक जाति आहे.

**लोँग**, स्त्री॰ भात, सांवा, राळा, इ॰ धान्याचें जें कणीस ती.

**लोँगर**, न॰ केळीस येतो जो केळ्यांचा घड तें; २, मोठी जी लोंग तें.

**लोँगी**, स्त्री॰ लोंग.

**लोँघळावणें**, कों॰ चिखल, राख, इ॰ कानीं लिप्त व्हावयाजोगा वस्त्रादिपदार्थ लोळवणें.

**लोँचट, लोँचड**, ३ लिं॰ तुटतां तुटत नाहीं असा जो भाकर, पोळी, पापड, काष्ठ, इ॰ पदार्थ तो; २, ला॰ अनेकवार निषेध केला असतांही स्वकार्य साधनार्थ झटण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्यादि त्यास ह्म॰

**लोचन**, न॰ सं॰ नेत्र.

**लोट**, पु॰ अकस्मात् वेग प्राप्त झाल्यामुळें जमावानें चाललेला जो उदक, वायु, इ॰ कांचा पुंज किं॰ मनुष्यसमुदाय, इ॰ तो; २, धान्यादिकांची अतिशयित जी समृद्धि तो.

**लोटण**, पु॰ भूमीवर लोटत लोटत जावें अशी शिक्षा ज्यास असत्ये असे जें रपचूदर तो.

**लोटणें**, कोणेक पदार्थातें गाड्याचें चाक जसें आपल्या भोंवतें फिरतफिरत चालतें त्या गतीनें पुढें चालविणें; २, प्रायः ढकलणें या अर्थीं; ३, कोणेकस्थळीं कोणेक अर्थानें प्रचुरपणें येणें, उ॰ देवळामध्यें आज कथेस लाखों मनुष्य लोटलें होतें.

**लोटपोट**, स्त्री॰ नृत्य, गीत, नाटक, इ॰ कांचे श्रव-

णादिकें करून अंतःकरणांत पराकाष्ठेचा चमत्कार वाटून त्या त्या रसानें भरून गेल्या सारिखी श्रोते, इ॰ कांची होत्ये जी अवस्था ती; २, ३लिं॰ ती अवस्था झाली आहे ज्याची असा जो श्रोता, इ॰ तो.

**लोटा**, पु॰ मोघा; २, ताम्रादि धातूंचें आकार विशेषाचें एक पात्र करित असतात तो; ३, मोठी जी लोटी तीस म्ह॰

**लोटांगण**, न॰ ईश्वरादिप्रीत्यर्थ आडवें पडून चक्रासारिखें लोटत जाण्याचा जो व्यापार तें किं॰ तसें लोटत जात असतां जे शरीराचे फेर होतात ते प्र॰; २, ला॰ पर्वतादिकांवरून खालीं गडबडत येतो जो पाषाणादि पदार्थ त्याचे जे आपले भोंवते फेर होतात त्यांस प्र॰ म्ह॰; घेणें इ॰ कांचे योगीं प्र॰

**लोटी**, स्त्री॰ ताम्रादि धातूंचें आकारविशेषाचें एक पात्र असतें ती.

**लोट्या**, पु॰ कों॰ लोटा.

**लोठा, लौंठा**, ३लिं॰ शरीरानें जो भारी धष्टपुष्ट तो.

**लोठाश्रम**, पु॰ गार्हस्थ्यादि चार आश्रमांतील एकही आश्रम ज्यास नाहीं असा जो लठ्ठ निरंजन तो.

**लोड**, न॰पु॰ वस्त्रांत कापूस, इ॰ भरून शिंवून मृदंगाकार पदार्थ ओठिंगायासाठीं करितात तें तो; २, स्त्री॰ तुरपून शिवलें असतां जी वातीसारिखी रचना होत जात्ये ती; ३, न॰ दे॰ कुळव, पाभर, इ॰ आउतांस एक अवयव भून आडवें लांकूड असतें ज्यांत जंवाच्या दांड्या अडकवितात तें.

**लोडणा**, पु॰ रा॰ लोढणें; २, फार च जड जो कडीं तोडे, इ॰ भूषण, तांब्या, इ॰ पात्र किं॰ जीभ त्यांस म्ह॰

**लोढ**, न॰ कों॰ लोड प्रथमार्थीं.

**लोढणें, लौंढणें**, न॰ ओढाळ जें गुरूं, इ॰ पशु त्याणें पळूं नये म्हणून त्याचे गळ्यांत बांधितात जें लांकूड तें; २, ला॰ आपल्यास स्वच्छंदें वागण्यास प्रतिबंधक जें बायको, पोर, इ॰ कांहीं असतें त्यास म्ह॰

**लौंढा**, पु॰ अकस्मात् पाणी, इ॰ सद्रव पदार्थांचा लोट येतो तो.

**लोण**, स्त्री॰ कों॰ एक तृणजाति आहे; जें प्रा॰ खाऱ्या पाण्याचे आश्रयानें खाडी, इ॰ कांचे तीरप्रदेशीं रुजतें ती.

**लोणकढेंतूप, लोणकढेतूप**, न॰ नुकतें लोणी कढवून केलेलें जें ताजें तूप तें.

**लोणचें**, न॰ आंबा, निंबू, इ॰ कितीएक फळांचें किं॰ गरमर, इ॰ कितीएक मूळादिकांचें मीठ, मोहऱ्या, हिंग, इ॰ पदार्थ घालून तोंडीं लावाया करितां जो पदार्थ करितात तें.

**लोणाट**, न॰ कों॰ लोणीनें व्याप्त असतें जें स्थळ तें; उ॰ लोणाटावर जाऊन एक पाटीभर म्हशीला लोण घेऊन येजा; २, ३लिं॰ पक्कें न कढल्यामुळें जो ईषन्मात्र तुपास लोण्याचा वास येतो तो.

**लोणंची**, स्त्री॰ रा॰ आंब्याच्या करंबुट्या तोंडीं लावायाकरितां मिठांत घालून ज्या खारवितात त्या प्र॰

**लोणस**, ३लिं॰ कों॰ ज्यामध्यें लोणी निघायाचा सत्त्वांश अधिक आहे असें जें दूध तें किं॰ तसें दूध आहे ज्याचें असा जो गाय, म्हैस, इ॰ पशु तो.

**लोणा**, पु॰ भातांत एक जाति आहे; २, जमीन, मृत्तिका यांचे अंगीं असतो जो क्षारांश ज्याचे योगानें तेथें निरंतर ओल असत्ये खडरवडीत वाळत नाहीं तो.

**लोणारी**, पु॰ एक हिंदूंत जाति आहे जे जळाऊ लांकडें, कोळसे, इ॰ विकून उपजीविका करितात तो.

**लोणी**, न॰ दूध, किं॰ दहीं घुसळलें असतां पृथक् निघतो जो ततांश तें; लोण्यास दांत फुटणें म्ह॰ आपल्या आश्रयानें वाढलेलें पोर, इ॰ त्याणें भाषणादि व्यवहारीं अमर्यादपणें वागूं लागणें.

**लोथ**, स्त्री॰ माजून भारी पुष्ट झालेलें जें मनुष्यादिकाचें शरीर त्यास म्ह॰; २, मरण, निद्रा, आडग्वळणें, इ॰ कारणामुळें खालीं पडलेलें जें शरीर तें साधारण असतांही त्यास म्ह॰; उ॰ आमचे निकडचा शिपाई असतात तर एकदा इतक्यांचा लोथी पाडता; ३, फार मोठें असें जें भोपळा, फणस, चिभुड, इ॰ फल त्यास म्ह॰

**लोद**, पु॰ रा॰ लोथ प्रथमार्थी.

**लोध**, पु॰ लोध्रशब्दाचा अपभ्रंश; २, पांच सहा हात लांबी आणि रूमाने दीड दोन हात वेढ येई असा जो कडी, इत्यादि उपयोगी गोल लांकडाचा तुकडा तो; ३, स्त्री॰ लोथ.

**लोंधट**, ३ लिं॰ कों॰ गोळा घट्ट न जमाया जोगा रूमागचा पातळ झाला जो गूळ, पीठ, इ॰ तो.

**लोधडा**, पु॰ कों॰ शरीरानें अति पुष्ट जो मनुष्य त्यास प्रा॰ निंदावसरीं म्ह॰

**लोधा**, पु॰ शरीरानें भारी मोठा जो मनुष्यादि त्यास म्ह॰; २, कों॰ शरीराचा तोडून काढिला जो लचका तो.

**लोंधागूळ**, पु॰ कों॰ घट्ट गोळा जाचा नसतो असा काकवीसारिखा पातळ जो गूळ तो.

**लोध्र**, पु॰ एक वृक्ष आहे; २, न॰ पु॰ त्याची जी साल तें तो



**लोप**, पु॰ कांहीं काल प्रवृत्तपणें स्थित जो धर्म, आचार, भाषा, द्रव्यादि पदार्थ, इ॰ त्यांचा प्रवृत्तींत आढळ न व्हावयाजोगा जो अभाव होतो तो किं॰ प्रसंगानुरोधानें प्रसक्त जो शब्द, वर्ण, इ॰ कांहीं अर्थ त्याचा जो त्या प्रसंगीं अभाव तो.

**लोपणें**, लुप्त होणें.

**लोंष**, स्त्री॰ रा॰ लोंग.

**लोंबकळणें**, लोंबणें या अर्थी, परंतु त्या स्थितीस संकटावस्थात्व वर्णन विवक्षा असतां प्र॰; उ॰ घोड्यावर बसलें असतां जर रिकिब्या नाहींत तर पाय लोंबकळतात.

**लोंबर**, न॰ दे॰ गव्हा, राजगिरा, इ॰ कांचें जें कणीस किं॰ तरवयवतें; २, स्त्री॰ कों॰ लोंबड.

**लोंबड**, स्त्री॰ विकत घेणें, देणें, या प्रसंगीं असोली नारळांचे समुदायास म्ह॰

**लोंबण**, स्त्री॰ रा॰ निबिडपणें बहुत देशानें व्यापून वृक्षादिकास आश्रयून लोंबत स्थित जो पडवळ, इ॰ फळें, फुलांचे गुच्छ, घडवाघळें, इ॰ कांचा समुदाय ती; लाग धातुयोगीं प्र॰

**लोंबणें**, कोणेक पदार्थानें उपरिस्थ कोणेक आश्रयास आश्रयून खालीं न लागतां अंतराळीं हालाया जोगे स्थितीनें असणें; २, ला॰ कोणेक आरब्ध कार्य शेवटास न आतां लांबणीवर पडून तसेंच राहणें; ३, कोणेक कार्याचे उद्देशानें प्रवृत्त झाला जो कोणी एक त्याणे तें काम हस्तगत न होतां सोडतां नये, धरतां नये, अशी अवस्था पावून क्लेश पावत असणें; उ॰ चौघे जण कामा करतां आलों त्यांतून तिघांचें काम होऊन गेलें मी मात्र अजून लोंबत राहिलों आहें.

**लोंबर**, न॰ रा॰ मोठीजी लोंब ती.

**लोंबी**, स्त्री॰ लोंगी.

**लोंबीझोंबी**, स्त्री॰ कोणेकापासून कांहींएक पदार्थ घेण्याकरितां किं॰ कांहींकामकरून घेणें, इ॰ काकरितां झोंबणें, झटणें, इ॰ रूपजो अतिशयित प्रयत्न तो.

**लोभ**, पु॰ कांहींएक पदार्थाचा लाभाविषयीं उत्कट जी इच्छा तो; २, कोणेक वस्तुविषयीं हें मला रुटूं नये अशीजी बुद्धि तो; उ॰ लोकांचें देणें फार होतचा- ललें यास्तव घराचा लोभ धरूनका विकून देणें वा- रा; ३, कोणेकावर हा माझा अशी असत्येजी बुद्धि जोणेंकरून त्याचें सर्वथा बरें असावें असा पक्षपात असतो तो.

**लोभणें**, ग्रं॰ लुब्धणें.

**लोभाविष्ट**, ३ लिं॰ लोभ प्रथम द्वितीयार्थानें युक्त झाला तो.

**लोभिष्ठ**, ३ लिं॰ लोभ प्रथम द्वितीयार्थ फार आहे जास तो.

**लोभी**, ३ लिं॰ लोभिष्ठ.

**लोम**, न॰ सं॰ रोम.

**लोमकळणें**, लोंबकळणें

**लोयली**, स्त्री॰ लहानजो गलबताचा नांगर असतो ती.

**लोलक**, पु॰ खालीं जाड असून वरता बारीक असा- जो पाच, कांच, बिल्लोर, इ॰ कांचा भूषणोपयोगी मणी असतो तो.

**लोली**, स्त्री॰ लोयली.

**लोलुप**, ३ लिं॰ सं॰ लुब्ध.

**लोलो**, पु॰ घालणें याचायोगीं प्र॰ अ॰; रा॰ अक्षरोच्चार स्पष्ट व्हावा, मध्यें अडखळ, चुकी, लागूं नये, म्हणण्याची वाणी चांगली असावी, इ॰ जे अध्ययनाचे गुण ते नसून उगीच सरासरी ग्रंथ घोकीत किं॰ पढत असणें.

**लोंव**, स्त्री॰ रा॰ लव.

**लोष्ठ**, न॰ सं॰ ढेंकूळ.

**लोह**, न॰ सं॰ लोखंड; लोहभस्म, लोहचूर्ण, लोहशंकु, इ॰ स॰

**लोंहकर**, स्त्री॰ लोंकर.

**लोहकांत**, पु॰ लोखंडांत एकजाति आहे; २, त्याचें जें औषधार्थ भस्मकरितात तो; ३, तिरस्याचे भस्मास म्ह॰

**लोंहचट**, ३ लिं॰ कों॰ लोंचट.

**लोहचुंबक**, पु॰ लोखंडातें आकर्षिणारा असा एक पाषाण आहे; २, ला॰ कोणेकापासून द्रव्यादि काढून घेण्याविषयीं आरंभिलें असतां अनेक युक्ति कराव्या, झटावें, चिकटावें, इ॰कें करून द्रव्यादि काढल्याशिवाय सोडायाचें नाहीं असा स्वभाव जाचा त्यास म्ह॰

**लोहडणें**, न॰ लोढणें.

**लोहबंदीऊद**, पु॰ ऊद म्हणून जें सुगंधिद्रव्य त्यांत एक भेद आहे.

**लोहभानऊद**, पु॰ लोहबंदीऊद.

**लोहभानीऊद**, पु॰ लोहबंदीऊद.

**लोहमंडूर**, पु॰ मंडूरासच म्ह॰

**लोहार**, पु॰ लोखंडाचीं शस्त्रें, खिळे, इ॰ करून उपजीविका करणारी एक हिंदूंत जाति आहे.

**लोहारकाम**, न॰ रिवळे,शस्त्रें,इ॰ लोखंडाचे दागीने घडावे असेंजें काम तें

**लोहारकी**, स्त्री॰ लोहाराचें जें कर्म ती.

**लोहाळा**, पु॰ लव्हाळा.

**लोहित**, ३लिं॰ सं॰ आरक्त.

**लोळ**, पु॰ दे॰ सवेगजो अग्नीचा कल्लोल तो.

**लोळकंड**, स्त्री॰ लोळण.

**लोळकण**, स्त्री॰ लोळकंड.

**लोळण**, स्त्री॰ कोणी आपल्यास बलात्कारानें कोठें नेऊं लागला असतां जाऊं नये किं॰ कोणापाशीं कांहीं हट्टानें मागावें,इ॰ कारणास्तव भूमीवर लोळत पडावें अशीजी शरीराची स्थिति ती; घेणें,मारणें,इ॰कांचें कि॰

**लोळणें**, खालचें अंगवर,वरचें खालीं,होई असें भूम्यादिकांवर इतस्ततः चलन विशिष्ट होणें; २, ला॰ वस्त्र,पात्र,इ॰कोणेक पदार्थ कार्यावर विनियुक्त नसतां अव्यवस्थितपणें इतस्ततः पडला असणें किं॰ मनुष्यादिकानें धंदा,रोजगार,इ॰जा कामाचे अधिकारावर असावें तो अधिकार नसल्यामुळें निरुपयोगपणें अंधारांत पडल्याप्रमाणें असणें.

**लोळपट**, स्त्री॰ गृह,ग्राम,इ॰कांचेठायीं अनेकानीं दुखवण्यानें जेरहोऊन लोळत पडावें अशीजी कालानुरोधानें अवस्था प्राप्त होत्ये ती.

**लोळवणें**, ला॰ लंबा करणें; उ॰ चोरानी रात्रीस दोन असामी लोळवले.

**लोळसावणें**, रा॰ धूळ,इ॰त्याचे अंगास लागायाजोगा भूम्यादिकांवर तो पदार्थ लोळवणें.

**लोळा**, पु॰ घांटेचे आंत वाजवायाकरितां जो लोखंड,इ॰कांचा खिळ्यासारिखा लांबट पदार्थ संबद्ध करित असतात तो; २, जिव्हामूलाचे उपरिभागीं मुखामध्येंजो पडजीभ ह्मणून अवयवविशेष त्यास आरोपानेंह्म॰; ३, दे॰ दंतादिकानीं कोणेकाचे शरीराचा तोडितातजो लचका तो.

**लोळी**, स्त्री॰ लहानजो घांटेचा लोळा ती; २, ला॰ तराकार नासिकाद्वाराजो श्लेष्मा येतो ती; ३, रा॰ लांबट आणि सारखा भरलेला जो फणस त्यास ह्म॰; ४, गर्दभादिकांस लोळायाचीजी तलफ येत्ये ती.

**लौकर**, न॰ अ॰ लवकर.

**लौका**, ३लिं॰ लवका.

**लौकिक**, पु॰ कीर्ति; २, कोणेक गोष्टीचीजी वाच्यता तो; ३, ३लिं॰ लोकांमध्यें प्रसिद्धपणें प्रवर्तमान जीरीति,आचार,संप्रदाय,इ॰ तो

**लौचीक**, ३लिं॰ लवचीक.

**लौंडी**, स्त्री॰ लवंडी.

**लौंडीचा**, ३लिं॰ लवंडीचा.

**लौडेलूट**, स्त्री॰ लवडेलूट.

**ल्यायख**, ३लिं॰ लायक.

**ल्यायणें**, लेणें; २, न॰ लेणें.

**ल्योंक**, पु॰ पुत्र.

**ल्हाव**, पु॰ रा॰ लाहो प्रथमार्थी

**ल्होवा**, पु॰ रा॰ गिमवा.

व, अ॰ आणि.

वइरण, स्त्री॰ न॰ वैरण.

वइरणें, वैरणें.

वई, स्त्री॰ कों॰ वे.

वईल, पु॰ न॰ वाईल.

वईलचूल, स्त्री॰ वाईलचूल.

वक, स्त्री॰ दे॰ ओक.

वकटा, ३ लिं॰ ओरवटा.

वकटें, न॰ संकेतानें पुवडास म्ह॰.

वकणें, दे॰ ओकणें.

वकन, पु॰ वरवन.

वकल, न॰ धनी, मूळपुरुष, सरदार, इ॰ कांचा जो संबंध तद्रूप, किं॰ जाति गुणादिरूप जो कोणेक सामान्यधर्म तदवच्छेदेंकरून भिन्न भिन्न मानिलेलीं जीं मनुष्यादि समुदायरूप अनेक प्रकरणें तीं म्ह॰.

वकलात, वकलाद, स्त्री॰ वकिलाचें जें कर्म, किं॰ अधिकार ती.

वका, ३ लिं॰ दे॰ ओंका.

वकारी, स्त्री॰ दे॰ ओकारी.

वकिली, स्त्री॰ वकलात.

वकील, पु॰ राजा, वादिप्रतिवादी, इ॰ कांनीं इतर राजा, किं॰ न्यायाधीश, इ॰ कांपाशीं आपले तर्फेचें बोलणें बोलायाकरितां. किं॰ निकडील होईल वर्तमान आपल्यास कळवावें इत्यादर्थ ठेविला असतो जो अधिकारी तो.

वकीलनामा, पु॰ या कामाविषयीं माझा वकील तूं असा प्रकारचें वकिलास लिहून देतात जें अधिकारपत्र तो.

वकीलात, स्त्री॰ वकलात.

वकूब, पु॰ हिं॰ मोठा एखादा व्यवहार अंगावर घेऊन संभाळावा, सभा, दरबार, इ॰ स्थळीं न भितां, न घसरतां, उत्तर प्रत्युत्तर इ॰ करावें, इ॰ विषयीं उपयुक्त जो ज्ञान आणि धैर्य मिळून अंगीं प्रभाव विशेष असतो तो, किं॰ अंगीं स्वभावसिद्ध जी अक्कल असते तो.

वक्त, पु॰ वेळ प्रथमादि पंचमार्थ पर्यंतार्थी.

वक्तव्य, ३ लिं॰ सं॰ बोलाया विषयीं योग्य, किं॰ योजलेला जो कोणेक अर्थ तो.

वक्ता, ३ लिं॰ सं॰ बोलणारा जो तो; २, पु॰ वादप्रतिवादादि वाग्व्यापार करण्याविषयीं जो कुशल तो.

वक्त्र, न॰ सं॰ मुख.

वक्र, ३ लिं॰ सं॰ वांकडा; २. वक्री.

वक्रगति, स्त्री॰ सं॰ भौमादिग्रहांची उलटी जी गति ती; २, ३ लिं॰ वक्री प्रथमार्थी.

वक्रदृष्टि, ३ लिं॰ सं॰ जो आजकडे विरुद्ध भावानें पाहातो तो त्याजवर.

वक्री, ३ लिं॰ सं॰ मेषाकडून वृषभाकडे उत्तरोत्तर पुढें जात असावें अशी जी गति ती सोडून तद्विपरीत गतीनें म्हणजे मेषाकडून मीनाकडे जाऊं लागलेला जो भौमादि ग्रह तो; २, वक्रदृष्टि.

वक्रीं, अ॰ वक्रगतीच्याठायीं कोणेक ग्रहानें येणें, जाणें, असणें, इ॰ कांचें वि॰; कोणेकानें कोणेकावर

फांगेकावर वक्रींहोणें स्म॰ वक्रदृष्टिहोणें·

**वक्रोक्ति**, स्त्री॰ दुसऱ्यानें भाषणाचा अर्थ समजला असतांही लबाडीनें श्लेषादि माहात्म्यानें आपण त्याचा अर्थ दुसराच जमेस धरून संवाद करावा, इ॰ प्रकारचें सरळरीति सोडून जें भाषण तें; उ॰ आज माझें फारपोटभरलें असें मी त्यापाशीं बोललों असतां, भरलें असलें तर धुऊनटाक अशी तो वक्रोक्ति बोलला·

**वखटवणी**, न॰ दे॰ खरकटेहात, भांडीं, इ॰ धुऊन ठेवलें असतें जें पाणी तें·

**वखटवाणा**, **वखटवाणी**, ३ लिं॰ दे॰ ओंगळवाणा·

**वखटा**, ३ लिं॰ ओखटा·

**वखत**, पु॰ वक्त·

**वखद**, न॰ ओखद·

**वखदी**, ३ लिं॰ औषधोपयोगी जो पदार्थ तो·

**वखवख**, स्त्री॰ रोगादिकारणामुळें कितीं खाल्लें तरीं तृप्तिहोऊं नये, किं॰ सारेंवेळ खावें खावें असें वाटत असावें असा जो क्षुधातिशय होतो तो; २, ला॰ दारिद्र्य, किं॰ लोभातिशय इ॰ कारणामुळें द्रव्यादि संपादनाविषयीं मानापमानादि सोडून सर्वकाळ त्याविषयीं झटत असावें असा जो अभिलाषातिशय कोणेकास सुटतो तो·

**वखवखणें**, वखवखीनें विशिष्ट होणें·

**वखार**, स्त्री॰ विकायाचा जो माल तो सांठवून ठेवायाकरितां बांधिलें असतें जें स्थल तें·

**वखारदार**, पु॰ वखारीचा जो धनी तो·

**वखारी**, पु॰ वखारदार·

**वग**, स्त्री॰ ज्यापासून आपलें कार्य व्हावयाचें तत्संबंधी जो कोणी त्याला आपले कार्याविषयीं अगत्यवाद पडाया जोगी ओळखदेख, स्नेहभाव, शरीर संबंध, इ॰ कांहींएक संबंधामुळें त्याशीं आपली असते जी जवळीक ती·

**वंग**, न॰ सं॰ कथिल; वंगभस्म इ॰ समास जाणावे·

**वंगण**, न॰ दे॰ करकर वाजूं नये, झिजूं नये, हलका यावा, इत्याद्यर्थ गाडा, रहाट, इ॰ कांचे कणा इ॰ अवयवांस लावितात जें तेल तें·

**वगदी**, ३ लिं॰ वखदी·

**वगराळें**, न॰ ओगराळें·

**वगवशिला**, पु॰ वग इ॰·

**वंगळ**, ३ लिं॰ दे॰ ओंगळ·

**वगळ**, स्त्री॰ को॰ कोणेक समुदायांतून निवडक निवडक अंश काढून घेतला असतां खालीं राहतो जो गाळ साळ ती; २, ३ लिं॰ वगळरूप जो पदार्थ तो·

**वगळणें**, कोणेक क्रियेचा संबंधानें संबद्ध होण्याविषयीं क्रमानुरोधेंकरून प्रसक्त झालेला जो कोणेक अर्थ त्यानें त्या संबंधानें संबद्ध नकरितां सोडणें·

**वंगळवाणी**, ३ लिं॰ दे॰ ओंगळवाणी·

**वंगळसंगळ**, ३ लिं॰ दे॰ वाईटसाईट·

**वगळसगळ**, स्त्री॰ को॰ वगळ इ॰·

**वगैरे**, अ॰ विशेषनाम निर्देशेंकरून पूर्वी निर्दिष्ट जो कोणेक अर्थ असतो त्याहून इतर आणखी जे तत्सजातीय अर्थ विवक्षित असतात

परंतु ज्यांची विशेष नामनिर्देशाविषयीं विवक्षा नाहीं, त्या अर्थाचा परामर्श करणारा हा शब्द आहे; उ॰ सुभेदार, फडणीस, वगैरे झाडून सारे आमचे घरीं आले होते.

वघळ, पु॰दे॰ ओघळ.

वघळणें, दे॰ ओघळणें.

वंचक, ३ लिं॰सं॰ वंचना करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

वचक, पु॰ कोण्यावेळेस हा काय करील, काय बोलेल, इ॰ रूप जें कोणेकाचें भय कोणेकाचे मनांत असतें तें.

वचकणें, कोणेकानें वचक विशिष्ट होणें.

वचका, पु॰ वचक.

वंचणें, प्रतारणा, कपट, इ॰ कानीं कोणेकास ठकविणें; २, कांहींएक गोष्टीविषयीं क्रमप्राप्त जो कोणेक विधि त्याचा संस्कार त्या विवक्षितास न होऊं देतां त्यातें वगळणें; ३, स्वमृत्यु, किं॰ देशांतरगमन, इ॰ कारणानीं उपभोग्य जे दारादि विषय त्याविषयीं अंतरलें जाणें; उ॰ तो बंदीस पडला त्यामुळें आपल्या सर्वस्वास वंचला.

वचन, न॰सं॰ भाष; २, भाषण, किं॰ अर्थ्यायुक्त जी श्लोकादिरूप रचनातें, परंतु या अर्थी या शब्दाचा प्रयोग प्रमाणत्वेंकरून ग्रहणादि प्रसंगीं होतो.

वंचन, न॰सं॰ प्रतारणा.

वंचना, स्त्री॰ सं॰ वंचन.

वचपा, पु॰ कोणेक कर्माचा ठायीं द्रव्यादि पदार्थ, किं॰ प्रयत्न, काल, इ॰ कांहींएक यत्प्रमाण लागावें, करावें, मिळावें, इ॰ विवक्षा असत्ये तदपेक्षया अधिक, किं॰ उणें जालें असतां त्या प्रमाणाची बरोबरी व्हावयाजोगा तत्सजातीय कर्मांतराचा ठायीं तद्विपरीत न्यूनाधिक भावानें साधला जातो जो न्यूनाधिक अंश तो.

वंच्या, पु॰ ओंचा.

वंचित, ३ लिं॰सं॰ प्रतारित.

वज, स्त्री॰दे॰ ओज.

वजपा, पु॰ वचपा.

वजन, न॰ पदार्थमात्राचे अंगीं जो भार म्हणून गुण असतो तें; २, त्याची इयत्ता समजण्यास साधनीभूत जो मासा, तोळा, धडा, मण, इ॰ नीं प्र॰; कांहीं पदार्थाचें वजन करणें, म्ह॰ याचे वजनाची इयत्ता समजण्याकरितां तोलण्याचा व्यापार करणें; कांहींएक पदार्थ वजन करणें, म्ह॰ तोलणें; ३, ला॰ मनुष्यादिकांचे आंगीं विद्वत्ता, धनिकता, सभ्यता, इ॰ कृत असतें जें गुरुत्व तें.

वंजन, न॰ भाजीमध्यें जें द्विदल धान्य किं॰ त्याची दाळ इ॰ मिश्र करितात तें.

वजनदार, ३ लिं॰ सामान्य गुरुत्वरूप जडतेपेक्षां ज्याची विशेष जडता तो; २, ला॰ विद्यादिकृत महत्व विशिष्ट जो मनुष्य तो.

वजनपूर, ३ लिं॰ शेर, तोळा, इ॰ विवक्षित वजनानें जो पुरा तो.

वजनशीर, ३ लिं॰ वजनदार.

वजनी, ३ लिं॰ वजनरूप जो शेर, मण, खंडी, इ॰ जीं

ज्ञों नमाणें नीं प्र०;२,वजनानें वजनकरून देणें, घेणें,इ०करायाचा जो तूप,गूळ,इ०पदार्थ तो·

**वजबा**,पु०वचपा·

**वजवणें**,दे० ओजवणें·

**वजा**,अ० मोठ्या संख्येंतून लहान संख्या बाद होई असें,करणें,होणें,पडणें,इ०कांचें वि०;२,सदृशतुल्य या अर्थीं कितीएकशब्दांपुढें या अव्ययाचा योग होतो;उ० खर्डेवजा,कुळंबीवजा,इ०

**वजाबाकी**,स्त्री० मोठ्या संख्येंतून लहान संख्या वजा करून बाकी काढण्याचा जो व्यापार ती·

**वंजार**,न०वणजार·

**वजारा,वंजारी**,पु०वणजारा·

**वजावाट**,स्त्री० परस्परांचें देणें,घेणें,परस्परांनीं असतां येणें असेल तें देण्यांत वजा करावें,देणें येण्यांत वजा करावें,बाकी ठरवावी इ०रूप परस्पर हिशेब उलगडण्याचा जो व्यापार ती·

**वजीर**,पु० राजाचा मुख्य प्रधान तो·

**वजीरात**,स्त्री० वजीराचें जें कर्म,किं० अधिकार ती·

**वजीरी**,स्त्री० वजीरात;२,गंजिफांचे खेळांत वजीरास द्यावी लागते जी तल्फ ती;३,३लिं० वजीर संबंधी जो डौल,भाषण,रीति,शाह,इ० तो·

**वज्र**,न०सं० इंद्राचें जें आयुध तें;२,हिरा म्हणून जें रत्न तें;३,सत्तावीस योगांतील पंधरावा जो योग तें;४,विद्युल्लता;५,ला० विद्याशौर्यादि गुणानें दुसऱ्याचा पराभव करण्याविषयीं समर्थ जो त्यास म्ह०·

**वज्रचुडेमंडित,वज्रचूडेमंडित**,३लिं० सौभाग्यवती स्त्रियांस कागदामध्यें हें विशेषण देत असतात·

**वज्रटीक**,स्त्री० स्त्रियांचे कंठभूषणाचा सुवर्णाचा एक अवयव आहे;अनेक वचनांत प्र०·

**वज्रदेह**,पु०सं० वज्रा प्रमाणें बळकट जो देह त्यास म्ह०·

**वज्रदेही**,३लिं०सं० वज्रा सारखा आहे देह ज्याचा अतएव परम बलाढ्य जो त्यास म्ह०·

**वज्रपथ्य**,न०सं०रा० ज्यांत लवण देखील नाहीं, किं० एकच धान्य खावें इ०रूप फार अवघड जें पथ्य त्यास म्ह०·

**वज्रपात**,पु०सं० आयुधरूप,किं० विद्युल्लतारूप जें वज्र त्याचें कोणेकस्थळीं जें पतन तो·

**वज्रप्राय**,३लिं०सं० वज्रा सारखा जो कठिन पदार्थ तो,किं० वज्रा सारखा आघात ज्याचा असा जो बाण,मुष्टि,इ० तो;२,तत्सदृश जें हृदयांत सलाया जोगें भाषणादि तो·

**वज्रबटू**,पु० एक वृक्ष आहे;२,न० त्याचें फळ·

**वज्रमहाग**,३लिं०कों० अतिशयित महाग जो जिन्नस तो·

**वज्रमहागाई**,स्त्री०कों० पराकाष्ठेची जी महागाई ती·

**वज्रमहाग्या**,३लिं०कों० अतिशयित महाग विकण्याचा स्वभाव ज्याचा तो·

**वज्रमुष्टि**,पु०सं० मल्लांचें एक आयुध आहे;२, वज्रप्राय जो मुष्टि तो·

**वज्रमूठ**,स्त्री० वज्रमुष्टि·

**वज्रलेप**, पु॰ चुन्यामध्यें कात, गूळ, इ॰ सरंजाम घातल्यामुळें दृढतारूप गुण विशिष्ट जो चुना तो; २, त्या चुन्याचा करितात जो दगड इ॰कांचा संधीस लेप तो.

**वज्रशरीर**, न॰ सं॰ वज्रदेह.

**वज्रशरीरी**, ३लिं॰ सं॰ वज्रदेही.

**वज्रक्षार**, पु॰ सं॰ एक औषधीक्षार आहे.

**वज्रांबट**, ३लिं॰ कों॰ अतिशयित जो अंबट तो.

**वज्रांळें**, न॰ एक वृक्षबीज आहे जें मुलांचे गळ्यांत बांधित असतात तें.

**वज्री**, स्त्री॰ प्राय घांसायाचे उपयोगी दगड, खंगर, इ॰ कांच्या पदार्थ करितात ती; २, पु॰ सं॰ इंद्र.

**वझरता**, ३लिं॰ दे॰ ओझरता.

**वंझळ**, स्त्री॰ दे॰ ओंझळ.

**वझा**, पु॰ गा॰ लोहार.

**वझें**, न॰ दे॰ ओझें.

**वझेल**, **वझेली**, ३लिं॰ दे॰ ओझेली.

**वट**, पु॰ सं॰ वड.

**वटक**, पु॰ सं॰ वडा.

**वटपूर्णिमा**, स्त्री॰ सं॰ वडपुनव

**वंटभरण**, न॰ दे॰ ओंटभरण.

**वटवट**, स्त्री॰ तादृश प्रयोजन नसतां कंटाळा यावया जोगें जें बहुत भाषण ती.

**वटवटणें**, वटवट करूं लागणें.

**वटसावित्री**, स्त्री॰ सं॰ ज्येष्ठ पूर्णिमेस स्त्रियानीं करायाचें एक व्रत आहे.

**वटसावित्रीव्रत**, न॰ वटसावित्री.

वटा

**वटा**, **वंटा**, पु॰ ओटा

**वटारणें**, क्रोधादि कारणानें कोणेकानें दुसऱ्यास भयप्रदर्शनार्थ अतिशयित वासणें.

**वटाव**, पु॰ कों॰ रुपया इ॰ नाण्यास जो थट्टा येतो किं॰ पडतो तो.

**वटावणें**, कों॰ रुपया इ॰ नाणें वटवणें; २, दुःखदायक त्वेंकरून प्राप्त झालेली जीं कांहीं संकट, अडचण, मृत्यु, इ॰ त्यांतून कोणकानें पारपडणें, किं॰ त्याणें पारपडणें, अथवा त्या संकटादिकानीं दुःखसंबंधकरून, किं॰ नकरितां अतिक्रांत होणें, किं॰ त्यानें कोणकानें अतिक्रांत करणें.

**वटिका**, स्त्री॰ सं॰ कात, मात्रूण, इ॰ पदार्थांनीं जी वडी करित असतात ती.

**वटी**, स्त्री॰ सं॰ वटिका; २, दे॰ ओटी. ३, ओंटी.

**वंटी**, स्त्री॰ दे॰ द्वितीय तृतीयार्थक जी वटी ती.

**वठणीस**, अ॰ मर्दन दमनादि व्यापारानें कोणेक पदार्थ नरम येई असें, ये, आण, या धातूंचें वि॰; उ॰ घोडा फार दांडगाई करीत होता, जरासा फेरफटका देतांच चांगला वठणीस आला.

**वठणें**, दे॰ मर्दनादि व्यापारानें, कोणेक पदार्थानें वठणीस येणें; २, मुद्रा, रंग, इ॰ कानीं विवक्षानुरूप उमठणें; ३, ला॰ कोणकानें कोणेकास दत्त जो शापादि त्याणें फलद्रूपता पावणें; ४, सजीव जो मनुष्य, वृक्षादि, त्याणें कांहीं एक रोगादिकेंकरून शुष्क होणें.

**वठाण**, न॰ कों॰ मा॰ खोलीव्यतिरिक्त जो गृहसंबंधी

संबधी माजघर, स्वयंपाकगृह, इ० आवृतस्थलें असतात तीं म०·

**वठार**, पु० कों० एकागावांत जे अनेक महले असतात ते म०·

**वठ्ठया**, ३ लिं० लठ्ठया, दांडगा, असा जो मनुष्य त्यास म्ह०·

**वठ्ठयाचें**, न० संकेतानें निंदा कर्तव्य असतां भोजनास म्ह० प्रा० कर, हो, धातूचे योगीं म०·

**वड**, पु० एक वृक्ष आहे·

**वडपुनव**, स्त्री० ज्येष्ठ महिन्याची जी पुनव ती·

**वडवतें**, न० नूतन विवाहित स्त्रिया वडपुनवेचे दिवशीं जो वायनदान समारंभ करितअसतात तीं·

**वडवा**, स्त्री० सं० घोडी·

**वडवाग्नि**, पु० सं० समुद्रोदरीं जो पुराणप्रसिद्ध अग्नि आहे तो·

**वडवाघूळ**, न० एकपक्षी आहे·

**वडवानल**, पु० सं० वडवाग्नि·

**वडस**, पु० देवी इ० कारणानें नेत्रावर जो कवडा येत असतो तो

**वडा**, पु० दे० ओडा

**वडा**, पु० उडीद, इ० कांचे पिठाचें नरूत एक पक्वान्न करित असतात तो·

**वडारी**, पु० एक शूद्रांत जाति आहे·

**वडिलोपार्जित**, ३ लिं० वडिलानीं संपादित जें धन, स्थावर, इ० तो·

**वडी**, स्त्री० कांहीं एक पिष्टादि भक्षणीय पदार्थाचा जो चापट, लहानसा तुकडा करित असतात ती; २, ला० अळिता इ० कांत कापूस भिजवून जी पोळी करितात ती; ३, शेत, जमीन, इ० किती एक स्थलीं आळ्याचे उद्देशानें, किं० लोकर वाळावें म्हणून विरल विरल पसरीत असतात जें शेण ती·

**वडील**, ३ लिं० माता, पिता, आजा, पणजा, इ० जे पूर्वज ते म०; २, वयानें, किं० विद्या, नातें याणें जो अधिक तो; उ० अरे बाबा तूं मज पेक्षां वयानें लहानखरा पण विद्येनें वडीलना·

**वढ**, स्त्री० दे० ओढ·

**वढगस्त**, ३ लिं० दे० ओढगस्त·

**वढण**, न० ओढण·

**वढणें**, ओढणें·

**वढवणें**, ओढवणें·

**वढा**, पु० ओढा·

**वढाताण**, स्त्री० ओढाताण·

**वढाळ**, ३ लिं० ओढाळ·

**वढाळकी**, स्त्री० ओढाळकी·

**वण**, न० पु० देवी, गळूं, क्षत, इ० बरें झाल्यानंतर त्या त्या ठिकाणीं शरीरावर जें डागासारिखें चिन्ह राहत असतें तें तो; २, कों० सर्कार कागदीं पाहणी इ० व्यवहारीं त्येस शब्दाचे मागें याच्या योग होतो; उ० वण त्यशी ओदापैकीं मयत तीन बाकी जमा अकरा; ३, स्त्री० दे० वराई; ४, रा० वेताळ, खसोबा, या देवांस जो पशवादि जीवांचा बलि देतात ती·

**वणंज**, स्त्री० वाणिज्यार्थ जो प्रवास ती·

**वणजार**, न॰ वणजारी लोकांचा बैल इ॰ रवटल्या सहवर्तमान जो समुदाय तें·

**वणजारा, वणजारी**, पु॰ एक जाति आहे, जे प्रा॰ बैल इ॰ कांवर ग्रामांतरादि संबंधी धान्यादि आणून विकीत असतात, अथवा गुरेंही विकून उपजीवन करित असतात तो·

**वणवण**, अ॰ बहुत श्रम होत असें निरर्थकपणें. प्रा॰ करणें, फिरणें, या धातूंचेंच वि॰·

**वणवणें**, दे॰ ओणवणें·

**वणवा**, ३ लिं॰ ओणवा; २, पु॰ डोंगर इ॰ कांत जो वन्हि पेटत असतो तो; ३, ला॰ क्रोधादिकानें कोणेकाचे शरीराची होते जी आग तो·

**वणिक्**, पु॰ सं॰ तूप, तेल, विकणें इ॰ व्यापार करणारा जो वाणी तो·

**वणिज्**, न॰ सं॰ बवादिकांतील सहावें जें करण तें; २, पु॰ वणिक्·

**वत्**, अ॰ सं॰ सादृश्यार्थी म॰ स॰; उ॰ तद्वत्, एतद्वत्, ब्राम्हणवत्, क्षत्रियवत्, वृक्षवत्, इ॰

**वत**, पु॰ ऊत·

**वंत**, पु॰ स्थावर, धन, इ॰ कांच्याठायीं दायादादि भागीदारांचे अनेक असतात जे अंश ते म॰; २, वान; उ॰ द्रव्यवंत, धैर्यवंत, भाग्यवंत, इ॰·

**वतणें**, उतणें; २, दे॰ ओतणें·

**वंतदार**, ३ लिं॰ कांहीएक क्षेत्रादि पदार्थाचे वंताचा जो धनी तो·

**वतन**, न॰ कोणेकानें कोणेकास दत्त जें पुत्रपौत्रादि परंपरेनें चालायाजोगें वृत्तिक्षेत्रादि उपजीविका साधन तें·

**वतनदार**, ३ लिं॰ जोशीपणा, कुळकर्ण, ग्राम संबंधी पुराण, इ॰ वतनाचा जो धनी तो·

**वतनदारी**, स्त्री॰ वतनदारपणा·

**वतनपत्र**, न॰ वतनाविषयीं साधनभूत जें पत्र करून देत असतात तें·

**वतनभाऊ**, पु॰ एका वतनाविषयींचे जे अनेक विभागी ते परस्पर·

**वतनवाडी**, स्त्री॰ वतन, किं॰ तत्संबंधी शेत, वाडी इ॰ ती·

**वतनी**, ३ लिं॰ मनियमहामुळें, किं॰ विकत घेतल्यामुळें लब्ध जें ग्राम. क्षेत्र. इ॰ स्थावर वृत्यादिक तो; २, वतना संबंधी जो दस्तऐवजी कागद, पत्र, इ॰ तो·

**वतरणें**, पिशाचादिकानें कोणेकाचा शरीरांत संचार करणें, किं॰ त्या संचारानें कोणेकानें संचलन विशिष्ट होणें·

**वतवतणें**, कोणेकानें क्रोधावेशानें तडफडणें·

**वतारणें**, वतरणें·

**वतारी**, पु॰ ओतारी·

**वतींव**, ३ लिं॰ दे॰ ओतींव·

**वत्स**, पु॰ न॰ सं॰ गोमहिष्यादिकांचा जो बालक तो तें·

**वत्सद्वादशी**, स्त्री॰ सं॰ गोवत्सद्वादशी·

**वत्सर**, पु॰ सं॰ संवत्सर·

**वत्सल**, ३ लिं॰ सं॰ संरक्षणीय जो पुत्र, भक्त, शरणागत, इ॰ त्यांचें अभिमान धरून ममतेनें बरें करण्याचा स्वभाव ज्याचा तो·

**वदणें**, ठाऊक असतांही बोलूं नये अशा बुद्धीनें

हृदयांत ठेवलेलें स्वापराधपर दुर्गुणादि कांहींतें मंत्रप्रयोगादि झाल्यामुळें परवश होऊन अपाप बोलूं लागणें; २. कोणेकगोष्ट सर्वांस समजावी म्हणून सभादिकांत मोठ्यानें बोलणें; ३. प्रं. सामान्य बोलणें या अर्थी प्र..

**वंदणें**, नमस्काराभिसंबद्ध करणें; २. तीर्थ, धूलि, इ. कांतें भक्तिपूर्वक मस्तकीं धारण करणें.

**वदंता**, स्त्री. जनवार्ता.

**वंदन**, न. सं. वंदण्याचा जो व्यापार तें.

**वदन**, न. सं. मुखरूप जो शरीरावयव तें याचे स. चंद्रवदन, पद्मवदन, म्लानवदन, इ..

**वंदनीय**, ३ लिं. सं. वंदायास योग्य जो तो.

**वदळ**, स्त्री. येणें, जाणें, इ. व्यापारामुळें कोणेकाम मनुष्य, पशु, इ. संबंधी लागतो जो उपद्रव ती; २, पु. कों. पाण्याचे हेलकाव्यामुळें समुद्रतीरीं जे कांहीं उंचवट, खळ्या, पडतात तो.

**वदान्य**, ३ लिं. सं. उदार.

**वद्य**, पु. सं. माससंबंधी जो कृष्णपक्ष तो; २ ३ लिं. तत्संबंधी जा तिथि त्या मध्येंकीं; उ. वद्यअष्टमी, वद्यएकादशी. इ..

**वंद्य**, ३ लिं. सं. वंदायास योग्य जीं मातापितरे, देव, गो, ब्राह्मण, इ. तो.

**वद्यपक्ष**, पु. कृष्णपक्ष.

**वध**, पु. सं. कोणेकानें कोणेकास जिवें मारण्याचा जो व्यापार तो; जीववध, गोवध, ब्रह्मवध इ. स..

**वधणें**, कोणेकातें वधानें अभिसंबद्ध करणें.

**वधू**, स्त्री. सं. स्त्री, परंतु विवाह योग्य झाल्यापासून प्रौढ होई तोंपर्यंतच लोकव्यवहार आढळतो.

**वधूपक्ष**, पु. लग्नामध्यें नवरी कडील जो पक्ष तो.

**वधूपक्षीय**, ३ लिं. वधूपक्षांतले जे वऱ्हाडी ते.

**वधूवरें**, न. विवाह समारंभ ज्याचा चालला आहे ती वधू आणि तो वर अशीं उभयतां मिळून जीं तीं.

**वधूवस्त्र**, न. लग्नलागत्ये समयीं वधूस जें कांहीं रंगविशिष्ट वस्त्र नेसवीत असतात तें.

**वंध्य**, ३ लिं. सं. फळें यावयाचे योग्यतेचा जातीतला असून ज्यास फळ येत नाहीं असा जो वृक्षलतादि तो; २, ला. निष्फळ जो प्रयत्नादि तो.

**वध्य**, ३ लिं. सं. वधार्ह जो तो.

**वंध्या**, ३ लिं. सं. जीस अपत्य होत नाहीं अशी जी स्त्री ती.

**वंध्यामैथुन**, न. सं. ला. निष्फळ कांहीं एक व्यापार त्यास म्ह..

**वन**, न. सं. अरण्य; साधारणही एकजातीय वृक्ष समुदायास म्ह. वनचर, वनवास. इ. स. जाणावे.

**वनगाय**, स्त्री. एक आरण्यक गो जाति आहे.

**वनचर**, ३ लिं. सं. ज्यांची उत्पत्ति, स्थिति, लय, हे अरण्यांतच प्रा. होतात असे जे सिंह व्याघ्रादि प्राणी ते प्र..

**वनचराई**, स्त्री. गुरें, इ. कांस रानांत चारिल्यामुळें तत्संबंधी जें सर्कारांत द्रव्य द्यायला पडतें ती.

**वनभोजन**, न. सं. कार्तिकादि कितीएक मासांत

सांचेठायीं उद्यानें, अरण्यें, अशास्थलीं जाऊन जो भोजनसमारंभ करितात तें·

**वनमक्षिका**, स्त्री॰ सं॰ मक्षिकांत एक जाति आहे·

**वनमाला**, स्त्री॰ सं॰ ईश्वराचे कंठांतील पुष्पें, तुळसी इ॰ कांची जी आपादलंबिनी माला ती·

**वनवास**, पु॰ सं॰ अरण्यवास; २, ला॰ प्रवासादि संबधानें भोगायास प्राप्त होतें जें कांहीं दुःख तो; कोणेकानें कोणेकास वनवास आणणें, म॰ त्यास अतिशयित दुःख देऊन आतां हें सर्व सोडून वनवासास जावें असें वाटावयाजोगे अवस्थेतें युक्त करणें·

**वनसें**, न॰ स्त्री॰ नणंदेस म्ह॰ याचा प्र॰ अनेक व॰·

**वनस्पति**, स्त्री॰ सं॰ औषधोपयोगी ज्या लतावृक्ष इ॰ त्या प्रत्येकीं·

**वनिता**, स्त्री॰ सं॰ स्त्री·

**वन्य**, ३ लिं॰ सं॰ वनाचेठायीं उत्पन्न होऊन वृद्धि पावतो तो·

**वन्हि**, पु॰ सं॰ अग्नि·

**वपणें**, दे॰ ओपणें·

**वपन**, न॰ सं॰ वस्त्रा इ॰ कानें डोकी करण्याचा जो व्यापार तें·

**वपा**, स्त्री॰ सं॰ काळजांत केळीचे कोंवळ्या पानासारिखा जो पापदरा नियत असतो ती·

**वपु**, पु॰ सं॰ देह·

**वंबण**, न॰ दे॰ ओंबण·

**वंबळणें**, दे॰ ओंबळणें·

**वंबी**, स्त्री॰ ओंबी·

**वमण**, न॰ दे॰ ओंबण·



**वमणें**, प्र॰ ओकणें·

**वमन**, न॰ सं॰ वांति·

**वय**, न॰ उत्पन्न झालेल्या प्राण्याचे उत्पत्तीपासून बाल्य तारुण्यादि अवस्थाभेदकरीत अतिक्रांत होत चाललेला जो काल तें, किं॰ तत्कृत त्याचे अंगीं असलेली जी अवस्था तें; वयांत येणें म॰ तारुण्याचे भरांत येणें; २, स्त्री॰ कों॰ कुपण·

**वयरण**, स्त्री॰ न॰ वैरण·

**वयरा**, पु॰ ओयरा·

**वयवाडा**, पु॰ कुपण इ॰ रूप जो गृहादिकांचे भोंवता आवार इ॰ तो·

**वयस्क**, ३ लिं॰ विवक्षिता पेक्षां वयानें जो प्रौढ, किं॰ वृद्ध तो·

**वयस्कर**, ३ लिं॰ बाल्यदशा अतिक्रमून तरुण दशापन्न जो झाला तो·

**वयातीत**, ३ लिं॰ म्हातारा·

**वयाळा**, पु॰ रा॰ जलांत राहणारी अशी निर्विष एक सर्पजाति आहे·

**वयाळें**, न॰ रा॰ वयाळा·

**वयोवृद्ध**, ३ लिं॰ वयानें जो वृद्ध तो·

**वर**, पु॰ अलौकिक सामर्थ्य विशिष्ट जे ऋषि, साधु, इ॰ कोणी तो कोणावर प्रसन्न होऊन तुला अमुक फल प्राप्त होईल इ॰ रूप अवश्य फलदायक शुभफलाविषयीं त्यास देतात जें वचन तो; २, नवरा; ३, ३ लिं॰ श्रेष्ट; मनुष्यांत श्रेष्ट तो मनुष्यवर, देववर, इ॰ समास; ४, अ॰ आधेयत्वें करून विवक्षित जो पदार्थ व्यवहारादि कोणेक अर्थ त्यास खालून आश्रय देणारें अशा प्रकारें विवक्षित

न जें अधिकरण तन्निष्ठ त्या अधिकरणतेचें वाचक हें अव्यय; उ॰ माडीवर बसला आहे; मजवर दया करा; आजचें काम उद्यांवर गेलें; मीं थाकसवावर पोट भरतों; ५, कोणेक पदार्थापासून स्व मध्याकडील जो प्रदेश त्याचा वाचक; उ॰ देव्हाऱ्यावर मंडपी बांधावी; ६, जिकडून पाणलोट निम्न प्रदेशाकडे जातो त्या प्रदेशीं अतएव कोंकणांत पूर्वेकडील देशीं वर म्हणतात आणि देशांत पश्चिमेकडे वर म्हणतात; ७, अनुक्रमानें स्थित जीं स्थानें त्यांत जिकडे श्रेष्ठत्व वैशिष्ट्य असतें तिकडील प्रदेशीं; उ॰ वर राजा बसला खालीं प्रधान त्याचे खालीं वरकड सारे बसले; सर्व सुभेदारांवर सरसुभेदार, म्हणून अधिकारी असतो; मीच कांहीं घरचा धनी नाहीं मजवर वडील आहेत; ८, विवक्षित, संख्या, किं॰ प्रमाण त्याहून पलीकडे; उ॰ हे अंबे शंभरांवर असतील; इतकें काम आटपायास घटकेवर वेळ लागेल; ९, कोणेक अर्थातें लक्ष्य विषय करून धरून, चालणें, बोलणें, निशाणधरणें, इ॰ कांचे वि॰; उ॰ वाघावर एकटा कसा चालला आहे तो पहा; याच विषयावर चार घटिका बोलत होता.

**वरई**, स्त्री॰ एक तृण धान्य आहे, जास कोंकणांत वरी म्ह॰; २, पु॰ होनांत एक जाति आहे.

**वरकट, वरकड**, ३ लिं॰ विवक्षिताहून इतर.

**वरकर्मी**, ३ लिं॰ अंतःकरणपूर्वक नव्हे असें जें भाषणादि, व ज्याचा आंत प्रवेश नाहीं असा जो रोग, किं॰ तन्नाशक औषध, अथवा बुद्धि इ॰ व जास मुळचा झरा नाहीं असें जें जल, एतत्प्रकारक जे जे पदार्थ त्यांचें तत्तत्प्रतिपादितार्थ बोधकत्वें करून विशेषण होतें; उ॰ याचें असलें वरकर्मी बोलणें तुम्ही असेंस धरूं नका हो; वरकर्मी औषधानें कोठे आंतला रोग मरत असतो.

**वरखडणें, वरखाडणें**, दे॰ ओरखाडणें.

**वरखडा, वरखाडा**, पु॰ दे॰ ओरखाडा.

**वरंगल, वरंगळ**, पु॰ भातांत एक जाति आहे.

**वरघडी**, स्त्री॰ वस्त्राची घडी करतेसमयीं दर्शनी चांगला अंश यावा एतदर्थ असलसा बारीक विणून केला असतो जो तदेक देश नी.

**वरघोडा**, पु॰ वरात इ॰ अंगत्वें अनेक घोडीं, गाड्या, इ॰ समारंभपूर्वक मिरवत जी नवरा नवरीची स्वारी निघते तो.

**वरचढ**, ३ लिं॰ कोणेकापेक्षां गुणादिकानें श्रेष्ठ तो.

**वरचा**, ३ लिं॰ वर एतत् अव्यय वाच्य जें अधिकरण तेथील जो तो.

**वरचावर**, अ॰ हातचेहातीं; २, वारंवार.

**वरचील**, ३ लिं॰ वरकड.

**वरचेवर**, अ॰ वरचावर.

**वरंट**, पु॰ रा॰ वरवंट.

**वरंड**, स्त्री॰ गवताचा जो भारा ती.

**वरड**, स्त्री॰ दे॰ ओरड.

**वरडणें**, दे॰ ओरडणें.

**वरडा**, पु॰ दे॰ ओरडा.

**वरंडी**, स्त्री॰ दे॰ वरवंडी.

**वरडोळ्या**, ३ लिं॰ संप्रदायिक नेत्रांपेक्षां ज्याचे नेत्र गोलक फार वरते असतात, किं॰ ज्याची दृष्टि

दृष्टिवर असल्ये त्यास निंदेनें म्ह०·

**वरडाण**, स्त्री०दे० कोणेकपदार्थ संबंधी जो दुर्गंधि ती·

**वरण**, न० तूर, मूग, इ० कांची डाळ, किं० सगळालेच मूग, उडीद, इ० शिजवून भात, भाकर, यांजबराबर खावयाकरितां जो पदार्थ करितात तें; २, वधूनें वरास, आणि वरानें वधूस वरण्याचा जो व्यापार तें; ३, अनुष्ठानादि विषयीं ऋत्विजादिकांस वरण्याचा व्यापार तें·

**वरणा**, पु० कों० पावटा म्हणून जें धान्य तो; २, क्वचित् कडवा म्हणून पावटा त्यास म्ह०·

**वरणी**, स्त्री० रा० वधूवस्त्र; २, आराध्य देवता इ० प्रीत्यर्थ कोणेकानें ब्राह्मणद्वारा मास, पक्ष, इ० काल नियमानें वरचेवर ब्राह्मण पाळटीत असावे अशा प्रकारें चालविलें असतें जें अनुष्ठान ती·

**वरणें**. स्वकीय अनुष्ठानादि विषयीं तुम्हीं अनुष्ठान करावें असें सांगून तद्विषयीं कोणेक ब्राह्मणातें अधिकृत करणें; २, कन्या आणि वर या परस्परांनीं हा माझा पति, आणि ही माझी भार्या असें निश्चित करणें·

**वरतवळा**, पु० वर्तोळा·

**वरता**, अ० वर या अर्थी·

**वरतीं**, **वरती**, अ० वरता·

**वरद**, ३ लिं० कोणेकास वर देण्यास अभिमुख झाला तो·

**वरदळ**, न० रा० घरावर कवलें, किं० तृण इ० घालाया करितां वांसे पांजरण इ० पसरून जी रचना केली असती तें; २, स्त्री० बदळ; ३, वंजन·

**वरदक्षिणा**, स्त्री० कन्यादान सांगता सिध्यर्थ वरास जी दक्षिणा देतात ती; २, ला० कोणेक पदार्थ चोरी इ० कानें गेला असतां तत्प्राप्त्यर्थ करावा लागतो जो खर्च तो तो पदार्थ न मिळाल्यामुळें विफल झाला असतां त्यास म्ह०·

**वरदहस्त**, पु० वर देण्या विषयीं व्यापृत जो ईश्वरादिकांचा हस्त तो·

**वरदान**, न० वर शब्द प्रथमार्थ विषयक जें दान तें·

**वरदावरदी**, स्त्री० वरावर्दी या अर्थी

**वरदी**, ३ लिं० ईश्वरादिकांपासून ज्यास वर प्राप्त झाला आहे असा जो पुरुष, कुल, इ० तो·

**वरदूध**, न० बालकांस मातृस्तन्यातिरिक्त जें गो महिष्यादिकांचें दूध घालित असतात तें·

**वरधणी**, पु० रा० कांहीं पदार्थ शिजत लाविला असतां जें वर झांकण पात्र ठेवितात तो·

**वरनिश्चय**, पु० कोणेक वधूविषयीं वर लेंकरू नजो कोणेकाचा निश्चय करितात तो·

**वरपणें**, दे० ओरपणें·

**वरपक्ष**, पु० लग्नामध्यें नवऱ्याकडील जो पक्ष तो·

**वरपक्षीय**, ३ लिं० वरपक्षाकडील जे वऱ्हाडी ते प्र०·

**वरपिका**, ३ लिं० वृक्षादिकांवरच पिकला जो फलादि पदार्थ तो; उ० वरपिका फणस असला तर मला दे कोनपिका नको·

**वरपीक**, ३ लिं० वरपिका·

**वरप्रस्थान**, न० स्वगृहांतून, किं० जानवसे घरांतून

गतून विवाहार्थ नवरीचे मंडपांत जावयाकरितां वराचें जें प्रस्थान तें.

**वरमणें**, उत्साहानें प्रवर्तमान जो कोणी त्याणें. मर्मोद्घाटादि झाल्यामुळें अंतःकरणांत खोंचलें जाणें;२,वाढत चाललेला फोड,गळूं, इ० त्याणें औषधाद्युपचार झाल्यामुळें उद्यम मोडून दबलें जाणें.

**वरमाई,वरमाय,वरमायी**, स्त्री०वराची जी माता तीस विवाह समारंभामध्यें म्ह०.

**वरयी**, स्त्री० पु० वरई.

**वरयोजना**, स्त्री० कोणेक कन्येचे विवाहार्थ वराची योजना ती.

**वरला**, ३ लिं०वरचा.

**वरव**, स्त्री० पोटभरणें इ० कार्यार्थ अवश्य खर्चावें लागतें जें तांदूळ,पीठ,इ० मुख्य द्रव्य. त्यास भाजी,कालवण,इ० इतर पदार्थांचें माहाग्यामुळें,किं० इतर कांहीं कारणास्तव कमी खर्च झाल्यामुळें येते जी ऊरती;२,नित्य खर्चाचे तांदूळ,भाजी,इ० जे पदार्थ त्यामध्यें कोणेक पदार्थाचें वैपुल्य असल्यामुळें बहुत करून तोच खर्चांत असावा असें खरचण्याविषयीं त्या पदार्थाकडे असतें जें प्राधान्य तें;३,कांहीं काळ निर्वाह व्हावया जोगा कोणेक पदार्थाची होते जी बेगमी ती.

**वरवंचाईचा**, ३ लिं० कों० वरकमीं जें भाषण. दुखणें इ० तो.

**वरवंट**, पु० वाय्वाद्युपद्रवानें पोट,पाय,इ० शरीरावयवांत जो पेटका येतो तो.

**वरवंटा**, पु० पाट्यावर कांहीं पदार्थ वाटणें,इ० उपयोगी दीर्घवर्तुल आकाराचा घडीव एक दगड करीत असतात तो;२,दे० वरवंट.

**वरवड**, स्त्री० कों० घोंगडी इ० कांम जी रेवड घालितात ती.

**वरवंडी**, स्त्री० दे० भिंतीचे वरल्या प्रदेशीं दोहीं बाजूंस पाणढाळ येई अशी चुना इ० लावून क्रमानें निमोळती आकार विशेषाची जी रचना करितात ती.

**वरवर**, अ० अंतःप्रवेश न करितां,किं० न होतां गवदणें,चोळणें,इ० धातूंचें वि०;२,केवळ अंतःकरणापासून नव्हे बाह्यात्कारीं मात्र दिसे असें बोलणें,ममता करणें,इ० कांचें वि०.

**वरवरता**, अ० वरवर.

**वरवरतीं**, अ० वरवर असें.

**वरवा**, पु० जलमार्गानें गलबतांत बसून जात असतां स्नानाद्यर्थ कोणेकस्थळीं उतरावयाकरितां गलबत लावण्याचा जो व्यापार तो.

**वरशिका,वरशीक**, ३ लिं० ग० मात्रामध्यें एक भेद आहे. जास वर्षाआलिकडे बीं येत नाहीं त्याचें वि०.

**वरसणें**, वर्षणें.

**वरळी**, स्त्री० रावळी.

**वराई**, पु० दे० वरई म्हणून जो होतो तो.

**वराक**, ३ लिं० सं० केवळ गरीब दुर्बळ जो त्यास म्ह०.

**वराटिका**, स्त्री० सं० कवडी.

**वरात**, स्त्री० विवाह झाल्यानंतर वधूसहवर्तमा-

न वरानें आपल्यापरीं मिरवत जावें असा जो समारंभ करितात तो; २, मामलेदार इ॰कांकडेस यावयाचें जें द्रव्य त्याविषयीं त्यांजवर सर्कारांतून करितात जी चिठ्ठी ती; ३, झोंपाळा, पाळणा, यांस टांगायाकरितां जो मोठ्या जाड्या दोऱ्या करित असतात त्या प्रत्येकी.

**वरातदार**, पु॰ सर्कारची वरात घेऊन मामलेदार इ॰ कांकडे वसूलाकरितां येतो जो शिपाई, स्वार, इ॰ तो; २, ला॰ मामलेदार, खोत, इ॰कांकडून कुळाकडेस येतो जो तगाददार त्यासही म्ह॰.

**वराम**, न॰ गलबताचा मागला जो भाग तें.

**वराबर**, अ॰ वरच्यावर प्रथमार्थी; २, स्त्री॰ वधूवरांचा परस्पर विवाह होई अशी घटना करण्याचा जो व्यापार ती.

**वरावर्द**, स्त्री॰ वरावर्दी.

**वरावर्दी**, स्त्री॰ त्रैराशिकादि हिशेब, गुणाकार, भागाकार, मिळवणें, उणेकरणें, इ॰ जें अंकव्यवहार त्याचा घडामोडीचा जो त्रैराशिकादि रीति त्यास म्ह॰.

**वराह**, पु॰ सं॰ डुकर.

**वराळी**, स्त्री॰ औषधोपयोगी एक पदार्थ आहे.

**वरिष्ठ**, ३ लिं॰ सं॰ विद्या, वय, इ॰कानें जो श्रेष्ठ तो.

**वरी**, स्त्री॰ वरई प्रथमार्थी; २, अ॰ सं॰ वरच्या अव्ययार्थी.

**वरीयान्**, पु॰ सं॰ सत्ताबीस योगांतील अठरावा जो योग तो; २, श्रेष्ठ जो मनुष्य, प्रश्न, इ॰ तो.

**वरील**, ३ लिं॰ वरचा.

**वरीस**, **वरीष**, न॰ वर्षशब्दाचा अपभ्रंश.

**वरीसरवंड्या**, ३ लिं॰ कों॰ शेतकी इ॰कामाकरितां वर्षाचे बोलीनें ठेविला जो चाकर तो.

**वरुण**, पु॰ सं॰ जलाचा अधिपति एक देव आहे.

**वरू**, स्त्री॰ दे॰ वरच द्वितीयार्थी.

**वरून**, अ॰ वरशब्दव्ययाचें जें अधिकरण तेथून, किं॰ त्यानें धरून; ३, माडीवरून खाली उतरला; २, कांहीएक समजण्याविषयीं, किं॰ तत्पूर्वक कर्तव्याकर्तव्यादिकाविषयीं कोणेक अर्थातें प्रमाण साधनत्वेंकरून धरून, उ॰ मी तुला शब्दावरून ओळखलें तूं सांगितल्यावरून गेलों.

**वरेकज**, स्त्री॰ विवाहोद्देशानें वराकडेस वधूचें, किं॰ वधूकडेस वराचें संधान नेण्या आणण्याचा जो व्यापार ती.

**वरेकजा**, ३ लिं॰ कों॰ वरेकज करितो तो.

**वरोळा**, पु॰ रोवळा.

**वरोळी**, स्त्री॰ रोवळी.

**वर्कदी**, ३ लिं॰ कों॰ वर्कस जो स्थळी पिकतो तें स्थळ इ॰ तो.

**वर्कस**, पु॰ कों॰ नागली, वरी, हरीक, इ॰ जें धान्य तो.

**वर्ख**, पु॰ कागदाचे पानाचे बंदाचा जो अर्धाभाग तो; २, सोनें इ॰ धातूंचा भक्षणार्थ फारच बारीक पानळ जो पत्रा करित असतात तो.

**वर्खेल**, स्त्री॰ परीक्षार्थ सोनें, रुपें, घांसून पाहण्याचे उपयोगी खरखरीत एक दगड आहे.

**वर्खी**, ३ लिं॰ द्वितीयार्थक जो वर्ख तत्संबंधानें संबद्ध जो लवंग, एलदोडा, इ॰ पदार्थ तो.

**वर्ग**, पु॰ मनुष्यादि पदार्थांचा जो समुदाय तो; २, अकार, ककार, चकार, इ॰ कांचे पांच पांच अक्षरांचे जे आठ समुदाय ते प्र॰; ३, गुण्यांक आणि गुणकांक एकच कल्पून गुणलें असतां जी अंकसंख्या होत्ये ती; ४, कित्तीएक ग्रंथांतील जीं लहान लहान प्रकरणें त्या प्रत्येकास म्ह॰; उ॰ अमरकोशाचे पहिल्या कांडाचे दाहा वर्ग आहेत; ५, ब्राह्मण शूद्रादि जा जाति किं॰ कुळें तीं न॰; उ॰ तुह्मी कोणवर्ग हो आह्मी सोनार, तुह्मी हो कोणवर्ग आह्मी फडके.

**वर्गणी**, स्त्री॰ समुदायावर समुदितलें करून प्राप्त झालें जें देणें, घेणें, इ॰ कांहीं त्याची अवांतर व्यक्तीवर बसवितान जी वांटणी ती.

**वर्गन**, स्त्री॰ वर्गणी.

**वर्गित**, ३ लिं॰ सं॰ ज्याचा वर्ग केला असा जो अंकराशि तो.

**वर्चस**, न॰ वर्चस्व.

**वर्चस्व**, न॰ सं॰ विद्यादि गुणें करून किं॰ कांहींएक अधिकारादि परत्वें करून कोणाएकाकडे जें महत्व असतें तें.

**वर्चस्वी**, ३ लिं॰ वर्चस्व आहे ज्या मध्यें असा जो तो.

**वर्चोल**, ३ लिं॰ वरकड.

**वर्ज**, ३ लिं॰ ज्या प्रकरणामध्यें जो घेऊनये, ह्मणून सांगितलें तो त्यांत, किं॰ संकेतानें कांहींएक विवक्षितावाहेर टाकिला तो.

**वर्जणें**, कोणेक पदार्थ वर्ज होई असा करणें.

**वर्जदिवस**, पु॰ प्रयाणादि प्रसंगीं घातवारास कोणी म्ह॰.

**वर्जन**, न॰ सं॰ वर्जण्याचा जो व्यापार तें.

**वर्जवार**, पु॰ वर्जदिवस.

**वर्जित**, ३ लिं॰ सं॰ वर्जलेला जो तो.

**वर्ज्य**, ३ लिं॰ सं॰ वर्जायास योग्य जो पदार्थ तो.

**वर्ण**, पु॰ सं॰ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, ह्या चार जाति आणि श्वेत, पीत, नीलादि जे रंग ते व अकारादिक जीं अक्षरें ती प्रत्येकीं; २, व्रण ह्मणून एक रोग होतअसतो त्यास म्ह॰

**वर्णणूक**, स्त्री॰ नावाजणूक.

**वर्णणें**, कोणाकाचे गुणादिकांचें कथन करणें.

**वर्णन**, न॰ सं॰ वर्णण्याचा जो व्यापार तें; २, कोणेकाची जी स्तुति तें.

**वर्णना**, स्त्री॰ वर्णन.

**वर्णनीय**, ३ लिं॰ ज्याचे गुणादिकांचें वर्णन करायास योग्य असा जो पदार्थ तो.

**वर्णनूक**, स्त्री॰ वर्णणूक.

**वर्णसंकर**, पु॰ सं॰ ब्राह्मण क्षत्रियादि वर्णांचा व्यभिचारादिकानीं झाला जो संकर तो.

**वर्णसट, वर्णसठ**, स्त्री॰ श्रावणमास संबंधिनी जी शुक्लपक्षींची षष्ठी ती.

**वर्णी**, पु॰ सं॰ ब्रह्मचारी.

**वर्णोच्चार**, पु॰ अकारादिवर्णांचा जो उच्चार तो.

**वर्तक**, पु॰ कों॰ ग्राम संबंधी पाटला सारखा एक

एकवतनदार अधिकारी असतो तो.

**वर्तकी**, स्त्री॰ कों॰ वर्तकाचें जें कर्म. किं॰ अधिकारती.

**वर्तणूक**, स्त्री॰ वर्तण्याचा जो संप्रदाय ती.

**वर्तणें**, कोणेक रीति आश्रयून तदनुसार आचरत असणें; २, कांहींएक गोष्ट घडली जाणें; उ॰ वटवृक्षाखालीं वर्तलें तें सांगेन; ३, कोणेस्थलीं कोणे विद्यमान असणें, याचा न॰ प्रा॰ सं॰

**वर्तन**, न॰ सं॰ वर्तण्याचा जो व्यापार तें.

**वर्तमान**, न॰ बातमी; २, ३ लिं॰ कोणेक काल देश, या अधिकरणी आहेपणानें विशिष्ट जो तो; ३, विद्यमान कालाचें वि॰

**वर्तमानकाळ**, पु॰ प्रस्तुतकाळ.

**वर्तवणें**, ग्रहण, संक्रांति इ॰ कांचें गणित करून तें तें निश्चितकरणें.

**वर्ताळा**, पु॰ एका शिक्याचें नाणें सराफ इ॰ कांस देऊन दुसऱ्या शिक्याचें नाणें घेऊन त्याचा जो वरबटा येतो तो, किं॰ विवक्षितप्रमाणानें धान्यादि मोजून वर जो वाढवा येतो तो; २, कों॰ देणें, घेणें, इ॰ व्यवहारांत जिकडील तिकडे दफे रफे होऊन राहतो जो नफा तो, अथवा तोटा आला असतां जो पदर भरावा लागतो तो.

**वर्ति**, स्त्री॰ सं॰ दीपादिसंबंधी जी वात ती.

**वर्ती**, ३ लिं॰ कोणेक स्थलीं वर्ततो तो तद्वर्ती याचा प्र॰ प्रा॰ समासीं; उ॰ अग्रवर्ती, पुरोवर्ती, इ॰.

**वर्तुल**, ३ लिं॰ सं॰ वाटोळा.

**वर्दळ**, स्त्री॰ वदळ प्रथमार्थी; २, न॰ वंजन.

**वर्दावर्द**, ३ लिं॰ देणें, घेणें, जमाखर्च, नफा, तोटा, इ॰ कांची बरोबरी व्हावया जोगा जितक्यास तितका जो पदार्थ, व्यवहार, इ॰ तो.

**वर्दावर्दी**, स्त्री॰ कोणकपदार्थ, व्यवहार, इ॰ कांचा जो वर्दावर्दपणा ती.

**वर्धक**, ३ लिं॰ सं॰ कांहींएकाचें वर्धन करणारा जो तो.

**वर्धणें**, कोणेकानें वर्धन पावणें.

**वर्धन**, न॰ सं॰ कोणेक पदार्थादिकांचें पूर्वावस्थेपेक्षां जें आधिक्य तें; २, ३ लिं॰ तें आधिक्य करणारा जो तो; विषवर्धन, वीर्यवर्धन, बलवर्धन, इ॰ समास.

**वर्धमान**, ३ लिं॰ सं॰ वृद्धिदशापन्न जो तो.

**वर्धमानपिंपळी**, स्त्री॰ प्रथमदिवशीं एक भाग, द्वितीय दिवशीं दोन भाग, अशा प्रकारें कांहीं दिवस चढवून तशीच क्रमानें उतरीत आणावी, अशी औषधरूपानें सेविलात जी पिंपळी ती.

**वर्धापन**, न॰ सं॰ वाढदीस.

**वर्धावणें**, कों॰ कांहींएक कार्यार्थ पोरें इ॰ कांस खुलविणें.

**वर्धावा**, पु॰ नवऱ्या मुलीचा भाऊ घोड्यावर बसून समारंभ पूर्वक वरास आणायासाठीं जात असतो तो.

**वर्धित**, ३ लिं॰ सं॰ वृद्धिविशिष्ट केला जो तो.

**वर्बडणें, वर्बाडणें**, दे॰ ओरबाडणें.

**वर्वडा, वर्वोडा**, पु॰दे॰ओरबाडा.

**वर्म**, न॰मर्म.

**वर्मी**, ३लिं॰ मर्मी.

**वर्य**, ३लिं॰ सं॰ श्रेष्ठ, परंतु द्विजवर्य, गुरुवर्य, इ॰समासीं म॰.

**वर्याळी**, स्त्री॰वराळी.

**वर्ष**, न॰ द्वादश मासात्मक जो काळ तें; वर्षाचा दिवस म्ह॰ प्रतिवर्षी एकेकवार येतो असा जो गणेश चतुर्थी, नारळीपुनव, बलिप्रतिपदा, इ॰ सणाचा दिवस तो.

**वर्षऋतु**, पु॰श्रावण आणि भाद्रपद, एतन्मास द्वयात्मक जो काळ तो; किं॰ कर्क आणि सिंह या राशींचे ठायीं सूर्य असतो जो ऋतु तो.

**वर्षघात**, स्त्री॰वर्षधात.

**वर्षण**, न॰सं॰ वृष्टि.

**वर्षणें**, मेघानें वृष्टि करणें; २, ला॰ कोणेकावर बाण, अग्नि, इ॰कांची वृष्टि करणें.

**वर्षधात**, स्त्री॰ लोकांस इष्टानिष्ट फलदात्री वर्षरूप काळाची गति ती.

**वर्षफल**, न॰ वर्षप्रतिपदेस या वर्षी अमुक शुभाशुभ होईल असें जें जोशी फल सांगत असतो तें.

**वर्षप्रतिपदा**, स्त्री॰चैत्र शुक्ल प्रतिपदा.

**वर्षर्तु**, पु॰ वर्षऋतु.

**वर्षल**, स्त्री॰रा॰ वतन इ॰कांचे उपभोगाचे पाळीचें जें वर्ष तें.

**वर्षसण**, पु॰ विवाहास वर्ष भरतें त्या दिवशीं जांवयास भोजनास बलावून समारंभ पूर्वक सण करितात तो.

**वर्षाकाल, वर्षाकाळ**, पु॰ पर्जन्यकाल.

**वर्षाचादिवस**, पु॰ सणाचे दिवसास प्रसंग वशात् म्ह॰.

**वर्षादिसाचादिवस**, पु॰ ग॰वर्षाचा दिवस.

**वर्षानवर्ष**, अ॰ प्रतिवर्षी; २, अनेक वर्षात्मक काळ तें व्यापून.

**वर्षाव**, पु॰ पर्जन्यादिकांची जी वृष्टि ती.

**वर्षाशन**, न॰ सं॰ ब्राह्मणादिकांचे उपजीविके साठीं सरकार इ॰ प्रतिवर्षी जें नियमानें धन, द्रव्य, देत असतात तें.

**वर्षासन**, न॰ वर्षाशन शब्दाचा अपभ्रंश.

**वर्षोवर्ष**, अ॰वर्षानवर्ष.

**वऱ्हा**, पु॰ दे॰ गुळाचा रोधा निवावा म्हणून ओतावयाकरितां जो भूमीवर वाफा करितात तो.

**वऱ्हाड**, न॰वर आणि वधू यांचें होतें जें लग्न तें; २, ला॰ मुंग्या इ॰कांचा क्रमानें चालत असतो जो समुदाय त्यास म्ह॰; ३ पु॰ एक देश आहे.

**वऱ्हाडगोष्टी**, स्त्री॰ कोणेकाचें लग्न व्हावें म्हणून तद्विषयीं उपयुक्त ज्या नाना प्रकारच्या अधिक उण्या गोष्टी त्या.

**वऱ्हाडघर**, न॰लग्नघर.

**वऱ्हाडणें**, मुलगा आणि मुलगी या उभतांनीं विवाह संस्कार विशिष्ट होणें; २, ला॰ त्या विवाह समारंभामध्यें वऱ्हाडी लोक इ॰कानी निमग्न होणें.

**वऱ्हाडी**, ३लिं॰ लग्नामध्यें नवरानवरी यांकडील

कडील जे सुहृत्संबंधी जन मिळतात ते प्रत्येकीं; २, वऱ्हाडदेशसंबंधी जें कापड इ॰ तो, किं॰ लग्नोपयोगी जें कापडचोपड इ॰ तो.

**वल**, न॰ स्त्री॰ दे॰ ओल प्रथमार्थी.

**वलंडणें**, दे॰ ओलांडणें.

**वलंडा**, पु॰ दे॰ ओलांडा.

**वलद**. मुसलमान इ॰कांचें नाव लिहून संबंधार्थ त्याचे बापाचें नाव पुढें लिहायाचें असतां मध्यें याचा योग होतो; उ॰ गुलामखान वलद याकुबखान; रामाजी पाटेल वलद गोमाजी पाटेल.

**वलय**, न॰ सं॰ बांगडीचे आकाराचा जो कंकणादि पदार्थ तें.

**वलवणें**, दे॰ ओलवणें; २, वलावणें.

**वलसर**, ३ लिं॰ दे॰ ओलसर.

**वला**, ३ लिं॰ ओला.

**वलाठी**, स्त्री॰ वैलाटी.

**वलांडणें**, दे॰ ओलांडणें.

**वलांडा**, पु॰ दे॰ ओलांडा.

**वलावणी**, स्त्री॰ वल्लावण्याचा जो व्यापार ती.

**वलावणें**, वल्हीं हालवून गलबत चाले असें करणें; २, ला॰ संसारादि खटलें युक्तियुक्तीनें चालविणें.

**वलावा**, पु॰ ओलावा; २, कों॰ मनुष्य समुदाय. किं॰ गलबतांचा समुदाय विवक्षितस्थलीं सुरक्षितपणें पोंहचावा म्हणून चोरादुपद्रव निरसनार्थ कोणेक समर्थ अधिकाऱ्यापासून शिपाई, रामोशी, गलबत, इ॰ रूप पाठबळ घेतात तो आणि तन्निमित्त त्या अधिकाऱ्यास द्यावें लागतें जें द्रव्य तो; ३, वलावणी.

**वलें**, न॰ गलबत चालवायास साधनभूत एका लांकडाचे दांड्यास फळीचा तुकडा लावून जो पदार्थ करित असतात तें; २, ला॰ पोंहणें इ॰ प्रसंगीं हस्त पाद या शरीरावयवांसही आरोपानें म्ह॰.

**वलेता**, ३ लिं॰ दे॰ ओलेता.

**वल्कल**, न॰ सं॰ नेसायाकरितां जी वृक्षाची अंतरसाल काढित असतात तें.

**वल्गा**, पु॰ वल्गना, परंतु प्र॰ अनेक वचनांत.

**वल्गना**, स्त्री॰ आंगीं सामर्थ्य नसतां अरे आ, तो काय समजला आहे, एकाक्षणांत त्याचें मी पारिपत्य करीन इ॰ रूप जो भाषण प्रकार ती.

**वल्ल**, पु॰ सं॰ वाल.

**वल्लद**, वलद.

**वल्लभ**, पु॰ सं॰ भर्ता. किं॰ तत्सदृश जो परमप्रिय तो.

**वल्लभा**, स्त्री॰ सं॰ प्रियाया अर्थी.

**वल्ली**, स्त्री॰ लता; २, ३ लिं॰ ला॰ स्वच्छंदानें वागणारा जो मनुष्य तो.

**वल्हवणें**, वलावणें.

**वल्हा**, अ॰ दे॰ कोणेकानें कांहींएक आरब्ध जें कार्य तें त्याणें त्वरेनें करावें म्हणून प्रेरकत्वें करून या अव्ययाचा प्रयोग होतो.

**वल्हांडणें**, ओलांडणें.

**वल्हांडा**, पु॰ ओलांडा.

**वल्हाणी**, स्त्री॰ दे॰ ओलाणें; २, वस्त्रप्रावरण ठेवा

ठेवायाकरितां जी दोरी बांधिन असतात ती.

**वल्हावा**, पु॰ वलावा.

**वल्हें**, न॰ वलें.

**वल्हेकरी**, ३ लिं॰ वल्हें मारण्याचे कामावर ठेवि-ला असतो जो मनुष्य तो.

**ववेणें**, दे॰ ओंवणें.

**ववरा**, पु॰ दे॰ ओवरा.

**ववरी**, स्त्री॰ दे॰ ओवरी.

**ववळा**, ३ लिं॰ दे॰ ओंवळा.

**वंवा**, पु॰ दे॰ ओंवा

**ववांडा**, पु॰ दे॰ ओवंडा.

**ववाळणी**, स्त्री॰ ओंवाळणी.

**ववाळणें**, दे॰ ओंवाळणें

**ववी**, स्त्री॰ दे॰ ओंवी

**वश**, ३ लिं॰ आर्जव, सेवा, द्रव्य इ॰ द्वारा जो ज्याणें अनुकूल केला तो त्यास.

**वंश**, पु॰ सं॰ कुल; २, पुत्र, नातु, इ॰ रूप जी संतति ती; ३, वेळू.

**वशंगत**, ३ लिं॰ सं॰ कोणेकाम वश झाला जो तो त्यास.

**वंशपात्र**, न॰ वेळूचा पातळ बारीक कांबी करून त्यांचें विणून करितात जें परडी, रोवळी, इ॰ पात्र तें.

**वंशलोचन**, न॰ वेळूचे पोटीं पिठासारिखा पांढरा असा एक औषधोपयोगी पदार्थ उत्पन्न होत असतो तें.

**वशा**, पु॰ दे॰ जसीवाला.

**वशात्**, अ॰ कांहीं एकातें वश होऊन; परंतु दैववशात्, कालवशात्, इ॰ स॰ प्र॰.

**वंशावळ**, स्त्री॰ बाप, आजा, पणजा, निपणजा इ॰ जी वंशपरंपरा ती.

**वशाळकी, वशाळगत**, स्त्री॰ दे॰ ओशाळगत.

**वशाळणें**, दे॰ ओशाळणें.

**वशाळा**, ३ लिं॰ दे॰ ओशाळा.

**वशिला**, पु॰ वशीला.

**वशी**, ३ लिं॰ इंद्रियें ज्याचे स्वाधीन आहेत तो; जो ज्याला वश त्या विषयीं तो.

**वशीकरण**, न॰ कोणी आपल्यास वश व्हावा म्हणून जें मंत्रादि साधन करित असतात तें.

**वशीला**, पु॰ वश, २, दे॰ ज्याचा वश ज्याला असे तो त्याचा

**वशोट**, ३ लिं॰ न॰ ओशाट

**वशोळी**, स्त्री॰ को॰ मंगळागौरी इ॰ व्रतांचा वसा जीस असतो ती स्त्री.

**वश्य**, ३ लिं॰ वश; २, न॰ वधूवरें इ॰ कांचे राशींचें जें आनुकूल्य तें

**वश्वी**, स्त्री॰ को॰ वसवी या अर्थी

**वस**, ३ लिं॰ दे॰ ओस.

**वस,-,कन,-कर,-दिशीं**, वसशब्द होई असें ओरडून अंगावर येण्याचें वि॰

**वसणें**, कोणेकस्थलीं कोणेकानें राहणें; प्र॰ मनीं वसे तें स्वप्नीं दिसे; २, ग्राम देश इ॰ कानीं वसतीनें युक्त होणें; ३, स्त्रियानीं मंगळागौरी इ॰ व्रतें आचरणें.

**वसंत**, पु॰ सं॰ चैत्र आणि वैशाख हे दोन मास मिळून, किं॰ मीन मेष या दोन संक्रांति मिळून जो द्विमासात्मक काल तो ; २, मालिनी वसंतास ही कोणी म्ह॰ ; ३, गानोपयोगी एक राग आहे

**वसंतऋतु**, पु॰ सं॰ वसंत संज्ञक जो ऋतु तो.

**वसंतपञ्चमी**, स्त्री॰ सं॰ माघमासांतील शुक्लपक्षांतील जी पंचमी ती.

**वसंतपूजा**, स्त्री॰ सं॰ वसंत ऋतूंत वसंत माधवप्रीत्यर्थ समारंभपूर्वक जी ब्राह्मणांची पूजा करितात ती

**वसंतमाधव**, पु॰ सं॰ वसंतऋतु संबंधिनी जी [illegible] ना

**वसति**, स्त्री॰ सं॰ ग्राम, देश, इ॰ कांहीं एक स्थळ [illegible] जी मनुष्यादि विशिष्ट गृहादिकांची जी स्थिति ती. २, कांहीं एक स्थळीं एक रात्रादिकांत जी स्थिति ती.

**वसन**, न॰ सं॰ चिरगूट.

**वसनपुजा**, स्त्री॰ वसंतपूजाशब्दाचा अपभ्रंश.

**वसरणें**, दे॰ ओसरणें.

**वसरी**, स्त्री॰ दे॰ ओसरी.

**वसला**, पु॰ को॰ फाडूंनये अशी जा वस्त्राविषयीं विवक्षा आहे, त्याचा जो कोणेकानें फाडून केला तुकडा तो, परंतु उड, कर, इ॰ कितीएक धातूंचेयोगीं अनेकवचनांत संकुचित म॰ होतो.

**वसलात, वसलाद**, स्त्री॰ रा॰ जा मूळपुरुषापासून उत्पन्न झालेला जो वंश विस्तार तो त्याची त्या वंशामध्ये सर्वांनीं चांगलेंच असावें, किं॰ वाईट असावें असें सर्व व्यक्तींवर एक गुण असण्याविषयीं नियामक जो त्या वंशाचा सामान्य स्वभाव असतो ती.

**वसली**, पु॰ वसूल करण्या करितां ठेवितात जो शिपाई तो.

**वसल्या**, पु॰ को॰ वसली.

**वसवस**, अ॰ वसकन.

**वसवसणें**, क्रोधादिकारणानें कोणेकानें वसवसशब्द पुरःसर कोणेच्या अंगावर ओरडणें

**वसवसा**, पु॰ फा॰ दरदरा हुर्ती यार्थी.

**वसवसां**, अ॰ वसकन.

**वसवा**, पु॰ दे॰ साचट.

**वसवी**, स्त्री॰ को॰ कायता, मुसळ, इ॰ कांस जी मोडळ बसवीत असतात ती.

**वसवें**, न॰ रा॰ मुसळ इ॰ कांस जें लोखंडाचें वलय घालितात तें.

**वसहान**, स्त्री॰ वस्साहन.

**वसा**, पु॰ मंगळागौरी इ॰ कितीएक व्रतांचा कोणी धरितात जो नियम तो ; २, स्त्री॰ शरीरांतील एक धातु आहे.

**वसा**, पु॰ वसा प्रथमार्थी.

**वसाड**, ३लिं॰ दे॰ ओसाड.

**वसाडी**, स्त्री॰ दे॰ ओसाडी.

**वसात**, स्त्री॰ वसति प्रथमार्थी ; २, ओस पडलेला जो गांव इ॰ तो पुनः वसविण्याचा जो व्यापार

पार ती.

**वसाहत**, स्त्री॰ वसात.

**वसाळी**, स्त्री॰ वशेळी.

**वसु**, पु॰ कुला इ॰ कांवर डाग देऊन सोडित असतात जो गोहरा तो; २, स्वर्गी एक देवतागण आहे, त्यांतील जा आठ देवता त्या प्र॰; ३, न॰ द्रव्य,

**वसुंधरा**, स्त्री॰ सं॰ पृथ्वी.

**वसुधा**, स्त्री॰ वसुंधरा.

**वसुबारस**, स्त्री॰ गोवत्सद्वादशी.

**वसुमती**, स्त्री॰ पृथ्वी.

**वसुसर्ग**, पु॰ वृषोत्सर्ग शब्दाचा अपभ्रंश.

**वसूं**, न॰ गाड्याचें चाक, नांगराचा फाळ, मुसळ, इ॰ कांचा तोंडाकडल्याप्रदेशीं मोठ्या मांडळीचे आकाराचा जो पदार्थ संयुक्त करितात तें.

**वसूल**, पु॰ सर्कार, किं॰ सावकार लोक इ॰ कांस कुळानीं क्षेत्र ऋणादि संबंधी देय जें द्रव्य तो. किं॰ त्यांपासून आलें जें द्रव्य तो; २, कूळ इ॰ कांकडील द्रव्याचा जो उगावा तो.

**वसूलदार**, पु॰ वसूल्या.

**वसूलबाकी**, स्त्री॰ वसूल घेणें, घालणें, बाकी काढणें, इ॰ जो व्यापार ती.

**वसूलवासूल**, पु॰ वसूल इ॰ करण्याचा जो व्यापार आणि त्याणें लब्ध जें द्रव्य तो.

**वसूली**, ३ लिं॰ लागवड चांगली असल्यामुळें वसूल यावया जोगा जो गांव, शेत, इ॰ तो; २, पु॰ वसली.

**वसूल्या**, पु॰ वसल्या.

**वस्त**, स्त्री॰ सुवर्णादिकांचा जो अलंकार ती; २, जिन्नस अ॰ शारूपानें विवक्षित जो पदार्थ ती.

**वस्तभाव**, स्त्री॰ अलंकारादि पदार्थ समुदाय ती.

**वस्तरा**, पु॰ वस्त्रा.

**वस्तवानी**, स्त्री॰ वस्तभाव.

**वस्ता**, ३ लिं॰ ओसाड नव्हे असा जो ग्रामादि तो.

**वस्ताद**, ३ लिं॰ जा विद्याकलादि गुणामध्यें जो पुरा तो त्यामध्यें; २, तें विद्यादि शिकविणारा जो तो, परंतु गान, नृत्य, तालीम, कुस्ती, अशा कलांच्या जो शिक्षक त्या विषयींच प्र॰; ३, ला॰ जो ज्याचा दमन कर्ता तो त्याचा.

**वस्तादगिरी**, स्त्री॰ वस्तादाचें जें कर्म ती.

**वस्तादी**, ३ लिं॰ वस्तादापासून प्राप्त झाली अशी गानादि विद्या ती.

**वस्ति**, स्त्री॰ नाभीचे खालचा आणि उपस्थाचे वरचा जो भाग ती.

**वस्ती**, स्त्री॰ वसतीचा अपभ्रंश.

**वस्तु**, न॰ स्त्री॰ यच्चयावत् जे पदार्थ ते प्र॰.

**वस्तुकथन**, न॰ कांहींएक अर्थाचें वास्तविक रूपानें जें कथन तें.

**वस्तुगत्या**, अ॰ परमार्थतः किं॰ विचारानें पाहतां.

**वस्तुतः**, अ॰ वस्तुगत्या.

**वस्तुशक्ति**, स्त्री॰ पदार्थ मात्राचा ठायीं कांहीं असाधारण शक्ति जी ईश्वरें निर्मिली असते ती.

**वस्तुस्थितिकथन**, न॰ सं॰ कोणेक वस्तूचें स्तुत्यर्थ, किं॰ निंदार्थ जें अर्थवादादि त्यातें न आश्रयितां केवळ वास्तविक रूपानें जसें आहे तसें

तसें जें कथन तें.

**वस्तस्वभाव**, पु॰वस्तुशक्ति.

**वस्तूक**, स्त्री॰रा॰ लहान मुलांस प्रलोभनार्थ देतात जें खाऊ इ॰ पदार्थ ती.

**वस्त्र**, न॰ कापूस, रेशीम, लोंकर, इ॰कांचे तंतू विणून नेसणें, पांघरणें, इ॰ उपयोगी करितात जो रचना विशेष तें; कोणेकास वस्त्रें होणें, म्ह॰ दिवाणगिरी इ॰ अधिकार प्राप्त होणें; अधिकारावरून दूर होणें, यार्थी विपरीत लक्षणेनें प्र॰ करितात; वस्त्रांतर होणें म्ह॰ पहिलें नेसलेलें वस्त्र सोडून दुसरें वस्त्र नेसणें, म्ह॰ वस्त्राआड जग नागवें.

**वस्त्रपात्र**, न॰ वस्त्र, भांडेंकुंडें इ॰ तें.

**वस्त्रप्रावरण**, न॰ वस्त्र, उपवस्त्र, इ॰ तें.

**वस्त्रा**, पु॰ मस्तकादिकांवरचे केंस काढायाचे उपयोगीं एक लोहाचें शस्त्र आहे तो; २, ला॰ कडकडीत जो विद्वान् त्यास. किं॰ निस्पृहपणें बोलणारा जो मनुष्य, किं॰ तत्संबंधी भाषण, जिह्वा, इ॰ त्यांस आरोपानें प्र॰.

**वहट**, पु॰दे॰ ओहोट.

**वहटी**, स्त्री॰दे॰ ओहोटी.

**वहटणें**, दे॰ ओहोटणें.

**वहडणें**, दे॰ ओढणें.

**वहन**, न॰ वाहन प्रथमार्थी.

**वहमा**, पु॰ प्रत्यक्ष अनुभव नसतां केवळ हेतुदर्शनावरून यानें अमुक कर्म केलें असेल, यापाशीं अमुक द्रव्य असेल, इ॰रूप कोणेकाविषयीं कोणेकाचे मनांत झाला असतो जो निश्चय तो.

**वहळ**, पु॰दे॰ ओहोळ.

**वहाटूळ**, स्त्री॰ वावटळ.

**वहाडणें**, वाटणें.

**वहाण**, स्त्री॰ नद्यादिकांचा वेगविशिष्ट जो प्रवाह ती; २, चालतांना पायास कंटकादि न लागावे म्हणून जी चर्माची पादुका केली असते जिला बोटें अडकवायास व टांचेस बांधायास इ॰ अनेक चर्माचे बंद संबद्ध केले असतात ती.

**वहाणी**, स्त्री॰ वहाण प्रथमार्थी.

**वहावट**, ३लिं॰न॰रा॰ आंतील मृत्तिकांश नद्यादिकांचा जलप्रवाहानें धुपून गेलेला आहे जीचा अशी जी शेतजमीन ती.

**वहावटळ**, स्त्री॰ वहाण प्रथमार्थी.

**वहावण**, स्त्री॰ वहाण प्रथमार्थी.

**वहावणें**, जलादि प्रवाहांत पडलेल्या पदार्थानें त्या प्रवाहा बरोबर जाणें; २, पात्राधार स्थित जो घृतादि पातळ पदार्थ त्याणें प्रवाहरूपेंकरून त्या पात्राधारापासून निघून जाणें, पक्षीं त्या पात्रादिकांसही कर्तृत्व; ३, ला॰ भाषणादि व्यवहारीं कोणेकानें घसरणें; केलेली मसलत, इ॰ वहावणें, इ॰ स्थलीं फसणें.

**वहावरा**, ३लिं॰रा॰ वातविकृतीनें सुटून फार शिथिल झालेलें जें मनुष्यादिकांचें शरीर, किं॰ पिंडीभाव नपावावयाजोगा अधिक पातळ झालेला जो गूळ, चिखल, पीठ, इ॰ पदार्थ तो; २, ला॰ भाषणादि व्यवहारीं वहावण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्य, किं॰ त्याचें तें भाषणादि तो; उ॰ तो केवळ वहावरा आहे, त्यास दर्बारांत

तांत पाडऊं नका.

**वहाळ**, पु० रा० पाणी वहाण्याचा जो ओढा तो.

**वहाळी**, स्त्री० रा० लहान जो वहाळ ती; २, तेरड्यांत एक जाति आहे.

**वहिनी**, स्त्री० वडील भावाचे बायकोस धाकटे भाऊ सन्मानार्थ या नामानें व्यवहार करि तात.

**वहिवट**, स्त्री० वहिवाट.

**वहिवटणें**, वहिवाटणें.

**वहिवाट**, स्त्री० संसार, जकात, दिवाणगिरी, राज्य, इ० जीं खटलीं तीं लेखन, कृषिकर्म, इ० तत्साधनीभूत व्यापारानीं चालविण्याचा जो व्यापार ती; उ० दिवाणगिरीची वहिवाट आम्ही करूं, आणि जकातीची वहिवाट ते करितील; २, शेत, वाडी, वतन, वृत्ति, वस्त्रालंकार, इ० जें उपभोग्यवस्तु त्यांतें आपल्या भोग्य कोटींत वर्तविण्याचा व्यापार ती; उ० शंभर वर्षे या वृत्तीची वहिवाट मीं करीत आलों; ३, देणें, घेणें, बोलणें, चालणें, इ० जा यथायोग्य क्रियातद्वारा त्या त्या अर्थांच्या संबंध घडे असें जें त्या अर्थांशीं वर्तन ती; उ० तिकडेस आमची आण्या येण्याची वहिवाट नाहीं मग ते कोठून आढळतील.

**वहिवाटणें**, कोणेक अर्थातें वहिवाटीनें विशिष्ट करणें; २, निभावणें.

**वही**, स्त्री० बहुल्याचे भोंवतीं उतरंडी रचाया करितां आणितात जो मडक्यांचा समुदाय ती; २, चोपडी, ३, कृपण.

**वहीत**, ३लिं० दे० लागवड जी जमीन, शेत, इ० तो.

**वहीवाडा**, पु० वयवाडा.

**वहू**, स्त्री० सुनेस म्ह०; म्ह० वहू नाहली आणि बाफा शिंपला.

**वहूमाय**, स्त्री० दे० वधूची जी आई तीस विवाहसमारंभामध्यें म्ह०.

**वळ**, पु० मांड्या, कांख्या, कान, यांचे संधिप्रदेशीं लांबट असें एक उठाणूं होत असतें तो; २, सूत्र, दोरी, इ० कांस जो पीळ असतो तो; ३, पु० स्त्री० यष्ट्यादिकृत प्रहारानें तदाकार जें शरीरादिकांवर चिन्ह उठतें तो ती; ४, हस्तपादाद्यवयवांस वायूचे उपद्रवानें एक विलक्षण व्यथाविशेष उत्पन्न होत असतो तो ती; ५, स्त्री० ओळ.

**वळई**, स्त्री० दे० भूंस, गुळीं, इ० पदार्थ ठेवाया करितां जें आवृत स्थल करित असतात ती.

**वळकटी**, स्त्री० बिछाना, तक्या, आंथरी, पर्ण, इ० कांची करितात जी गुंडळी ती.

**वळकंबणें**, दे० ओळकंबणें.

**वळकंबा**, पु० दे० ओळकंबा.

**वळख**, स्त्री० ओळख

**वळखण**, स्त्री० दे० रुपया इ० कांवर खुणें करितां जें चिन्ह करित असतात ती.

**वळखणें**, ओळखणें.

**वळखदेख**, स्त्री० ओळखदेख.

**वळखपाळख**, स्त्री० ओळखपाळख.

**वळखर**, ३लिं० पीळदार जो सूत्र, दोरी, इ० पदार्थ तो.

**वळखी**, ३लिं० ओळखी.

**वळखीदेखी**, ३लिं० ओळखीदेखी.

**वळखीपाळखी**, ३लिं० ओळखीपाळखी.

**वळघणें**, रा॰ उच्चस्थत्वादि कारणामुळें कष्टसाध्य जो कोणेक अर्थ त्याचे लाभा विषयीं अनिश्चित प्रयत्नानें त्याजवर झटून पडणें.

**वळचण**, स्त्री॰ गृहादिकांचे मूळपायाचे बाहेरला पागोळ्यांचे आंतील जो प्रदेश ती; २, दे॰ गृहादिकांचे पाख्याच्या जो अग्र प्रदेश ती.

**वळण**, न॰ अक्षर, चित्र, शरीर, किं॰ तदवयव इ॰ पदार्थांचे आकारांचे भेदक जे लांबट, उभार, उंचवट, चापट, थपकट, इ॰ अनेक प्रकार ते प्रत्येकीं; २, संसारादि व्यवहारीं वर्तनाविषयीं लागली असत्ये जी बरी वाईट रीति तें; ३, कोणेक मनुष्यादिकांशीं, किं॰ कोणेकस्थलीं चालत असतो जो देणें, घेणें, जाणें, येणें, इ॰ व्यवहार तद्द्वारा त्या मनुष्यादिकांची आणि आपली असत्ये जी साहजिकपणें व्यवहार संबंधिता तें; ४, मार्ग, कुपण, काठी, इ॰ कांचा सरळपणा सुटून धनुष्याकार आली असत्ये जी त्यांस वक्रता तें; ५, नद्यादिकांचें पाणी विवक्षितस्थलीं न्यावयासाठीं बांधितात जें धरण तें; ६, ला॰ इष्टप्राप्ति आणि अनिष्ट निरसन एतदुपयोगी दर्बार इ॰ कांचे ठायीं बांधित असतात जें साधन तें: त्स॰ पाण्या आधीं वळण बांधावें.

**वळणदार**, ३ लिं॰ चांगलें आहे वळण ज्याचें असें जें अक्षरादि तो.

**वळणशुद्ध**, ३ लिं॰ वळणदार.

**वळणीस**, अ॰ वळणीस.

**वळणें**, स्थितिमान्, किं॰ गतिमान् जो कोणेक मनुष्यादि अर्थ त्याचे स्थितीचा, किं॰ गतीचा कोणेक दिशेकडेस असतो जो रोंक तो तदितर दिशेंकडेस होई असें त्या मनुष्यादिकानें फिरणें; २, कोणेक दिशेकडेस रोंक धरून चालले जे मनुष्य, गुरें, इ॰ त्यांस कोणेकानें विवक्षित इतर दिशेकडेस रोंक होई असें फिरविणें; ३, गुरें, शेळ्या, इ॰ गुराखी इ॰ कानें चारायास नेणें, आणणें, इ॰ व्यापारानें रक्षिणें; ४, अक्षर, चित्र, इ॰ कानें विवक्षित वळणानें विशिष्ट होणें; ५, अक्षरादिक वळणशुद्ध निघायाजोगें त्या व्यापारीं हस्तानें घटलें जाणें; ६, पात्या, सूत्र, पेळवा, खुंदीचाकळ्या, इ॰ तत्तत्कार्यसाधनभूत अवयवानीं यथायोग्य व्यापारेंकरून ते ते झांप, दोरा, सुंभ, लाडू, इ॰ पदार्थ सिद्ध होत असें करणें; ७, हस्तपादादिकांनीं वायूचा उपद्रवानें कांहींएक विलक्षण व्यथा होत असत्ये तद्विशिष्ट होणें; ८, कोणेकास कांहीं द्रव्यादि द्यावयाचा प्रसंग असतां त्याजकडे जर कांहीं आपला ऐवज येणें आहे तर त्या ऐवजांत त्यास द्यावयाचा जो ऐवज तो धरून घेणें.

**वळता**, ३ लिं॰ दे॰ दे, कर, यांचा योगीं प्र॰ अर्थ; कोणेकाचें द्यावयाचें जें द्रव्यादि तें परत करणें.

**वळती**, स्त्री॰ कों॰ स्वतंत्रपणें इतस्ततः फिरणारे जे मनुष्य, पश्वादि त्यांचें पूर्वीं संभावना नसतां कोणेक स्थलीं साहजिक होतें जें आगमन ती; उ॰ दूध उघडें टाकूं नको मांजराची जर कोणीकडून वळती आली तर खाऊन जाईल; २, दे॰ रानामध्यें इतस्ततः गेलेलीं जीं गुरें तीं वळून आणण्याचा जो व्यापार ती, परंतु प्रायः गुराखी पोरें

पारें खेळत असतां जाजवर हात घेतो त्याणें पुरें व-
जावीं असा संकेत असतां म०;३,जुगारांत बाजूचे
किं०समोरचे दान धनी,किं०लग्ने यांचा फांसा प-
डला असतां संकेतितानीं तें द्रव्य न्यावें याचा फां-
सा पडला असतां त्यानीं तितकें द्यावें अशा संके-
तें मांडितात जें द्रव्य ती.

**वळंबणें**,दे०ओळंबणें.

**वळंबा**,पु० ओळंबा.

**वळंय**,न०रा०अवडधोबड घडलेला असा शेताचा बां-
ध,पाया,इ०कांस लावायाचे उपयोगी जो मोठा धोंडा तें.

**वळवंजी**,स्त्री०रा० गोम म्हणून जो प्राणी त्यांत एक
जाति आहे,जीचे अंगास चिकट मळ असतो तो
भूम्यादिकांस लागला असतां रात्रौ लकाकतो ती.

**वळवट**,न० खिरीचे उपयोगी वळून करितात जो
बोटवे,शेवया,इ०पदार्थ तें.

**वळवटा**,पु० द्वितीयार्थक जें वळण तो.

**वळवटी**,स्त्री०वळकटी.

**वळवणी**,न०वळवाचें जें पाणी तें;म्ह०वळवणी आ-
लें आणि तळवणी घेऊन गेलें.

**वळवणें**,क्रिया,खरडा,इ० गिरवणें;२,विळवणें
द्वितीयार्थी.

**वळवळ**,स्त्री० सर्प,कांटू,इ०जे प्राणी त्यांचे अंगा-
स मोडी पडत असें जें चलनवलन ती;२,ला०
मनुष्यादिकांनी याकुशीहून त्याकुशीस वळावें,
त्या कुशीहून याकुशीस वळावें,लोळावें,इ०रू-
प जें त्यांचें चलनवलन ती;३,कोणेक विषयी-
ची अंतःकरणास लागलेली चरपट ती;४,दु-
सऱ्याचा कोणेक व्यापार पाहणें इ० कारणामुळें
अंतः-करणाचे ठायीं तें तें करावें,अन्यथा चैन पडूं न-
ये असा उत्पन्न होतो जो कांहीं विकारविशेष ती;
५,वळावळ.

**वळवळणें**,वळवळीनें युक्त होणें;२,कोणे कांहीं
एक करण्याविषयीं अत्युत्सुक होणें.

**वळवा**,स्त्री० कों० उत्तरपर्जन्याचीं जीं पूर्वांपासून
पुढलीं नक्षत्रें त्या.

**वळवांचापाऊस**,पु० मेघांची गति पूर्वेकडून पश्चि-
मेकडेस असून जो पाऊस पडतो तो.

**वळविंच**,**वळविंज**,स्त्री० मुंगीत एक भेद आहे.

**वळसा**,पु० मा० वेढा या अर्थी.

**वळसावणें**,मडकें इ० मृत्तिकापात्र निरंदणें.

**वळापिळा**,पु०पिशाच संचारादि कारणामुळें
आंग वळावें पिळावें इ०रूप जो व्यापार तो.

**वळावळ**,स्त्री०रा० कोणेक कर्माविषयीं बरें हो-
ऊ,किं० वाईट होऊ पण कसें करून एकदां लौक-
र संपो असा जो कर्त्याचे अंतःकरणांत भाव उत्प-
न्न होत असतो ती.

**वळी**,स्त्री० घोडें,इ०कांचे पाठीस खोगीर इ० ला-
गावें म्हणून त्याचे खालीं घालावयाकरितां उ-
शी सारिखे दोन अवयव एकत्र शिवून करितात जो
पदार्थविशेष ती;२,वळकटी.

**वळींव**,३लिं०वळून सिद्ध केला जो सूत्रादिपदार्थ
तो;२,ज्यास विशेष पीळ आहे असा जो दोर इ०
पदार्थ तो;३,आदींव पटलेलें असें जें शरीर
इ०तो;४,दे०पु० वळवांचा पाऊस.

**वळू**,पु० घोड्या काढवायाकरितां नियुक्त के-
ला असतो जो घोडा तो.

**वळें**, न॰ बोटांत घालावयाकरितां सरासरी पडून जोडल्या वे आकाराचें सुवर्णादिकांचें भूषण करितात तें.

**वळ्या**, पु॰ रा॰ शंखासारखें अस्थिरूप एक प्राण्यंग आहे.

**वळ्हई**, स्त्री॰ दे॰ वखई.

**वक्ष**, न॰ सं॰ वक्षस्थल.

**वक्षस्थल**, न॰ सं॰ उरस्थल.

**वक्षोज**, न॰ सं॰ स्तन.

**वाँईसा**, ३ लिं॰ थोडासा.

**वाँईंच**, ३ लिं॰ ईषन्मात्र.

**वाईट**, ३ लिं॰ विवक्षित जे गुण असावे ते ज्यामध्यें नाहींत, आणि अविवक्षित जे गुण नसावे ते ज्यामध्यें आहेत, असा जो पदार्थ तो.

**वाईटवरा**, ३ लिं॰ बरावाईट.

**वाईटवाँकडा**, ३ लिं॰ दे॰ वाईट इ॰ तो.

**वाईटवाणा**, **वाईटवाणी**, ३ लिं॰ दे॰ वाईट अशा रूपानें ज्याचा ग्रह होतो तो.

**वाईटसाईट**, ३ लिं॰ वाईट इ॰ तो.

**वाईन**, न॰ कों॰ कांडावयाचें जें उखळ तें.

**वाईल**, पु॰ न॰ अवेल.

**वाउगा**, ३ लिं॰ ग्रं॰ वावगा.

**वाक्**, स्त्री॰ सं॰ वाणी प्रथमार्थी.

**वाँक**, स्त्री॰ स्त्रियांचें बाहु भूषण आहे; २, न॰ रहाट, गाडा, इ॰ कांचे वक्र जे अवयवविशेष असतात ते प्रत्येकीं; ३, पु॰ न॰ पदार्थ, भाषण, इ॰ कांचे ठायीं जी वक्रता असल्ये तो तें; ४, पु॰ कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो विरुद्ध भाव तो.

**वाक**, पु॰ ताग, आंबाडी, घायाळ, इ॰ कांचा लगादि संबंधी काढित असतात जो तंतु समुदाय तो.

**वाँकडकाँका**, ३ लिं॰ रा॰ वांकडमुसका द्वितीयार्थी.

**वाँकडणें**, थंडी लागल्यामुळें कांकडणें.

**वाँकडमुसका**, ३ लिं॰ वांकडें आहे मुसकें ज्याचें असा जो पदार्थ तो; २, ला॰ वांकडातिकडा जो काष्ठादि पदार्थ तो.

**वाँकडा**, ३ लिं॰ विशेषणार्थक जो उजू त्याचा प्रतिपक्षी तो; कोणेकाचें कोणेकाशीं वांकडें पडणें, असणें, इ॰ स्थलीं त्याचा त्याचा विरुद्ध भाव पडणें, असणें, किं॰ त्या परस्परांनीं विरोधी असणें, कोणेकाचें वांकडें पाऊल पडणें; प्र॰ त्याचे हातून कदाचित् परदारा गमनादि एखादें दुष्कर्म घडणें.

**वाँकडातिकडा**, ३ लिं॰ वांकडा इ॰ तो.

**वाँकडीलेस**, स्त्री॰ संकेतानें चिनेचा वृक्षास त्य॰.

**वाँकण**, न॰ मार्ग, नदी, काष्ठ, इ॰ पदार्थांस धनुष्याकार असल्ये जी वक्रता तें.

**वाँकणें**, वृक्ष, शरीर, इ॰ पदार्थांनीं वक्रता विशिष्ट होणें; २, मनुष्यादिकानें औद्धत्य सोडून नम्र होणें.

**वाकती**, स्त्री॰ रा॰ गोणीभीतर, इ॰ वस्त्रांची घडीकरून तीचे पोटीं दाणे इ॰ घ्यावयाकरितां करितात जो पात्ररूप अवकाश ती.

**वाँकनिशी**, स्त्री॰ वांकनिसाचें जें कर्म, किं॰ अधिकार ती.

**वाँकनीस**, पु॰ श्रीमंत लोकांचे घरीं पाकाकडेस जो मुख्य अधिकारी नियमित केला असतो तो.

**वाकब**, ३ लिं॰ माहित द्वितीय तृतीयार्थी.

**वाकबगार**, ३ लिं॰ माहितगार.

वाकबगारी, स्त्री॰ माहितगारी.

वाकबदार, ३लिं॰ माहितगार.

वाँकस, न॰ तासणी म्हणून जें सुताराचें आऊ-न तें.

वाँकसाळ, स्त्री॰ रा॰ भातांत एक जाति आहे.

वाकळ, स्त्री॰ गोदडी; २, फाटकें जें वस्त्र त्यास निंदेनें म्ह॰.

वाका, पु॰ सर्कार, पंच, इ॰ कांस निवेदनीय जें स्वस्व व्यवहार संबंधी इत्थंभूत वर्तमान तो.

वाँकाड, वाँकाण, न॰ वांकण.

वाँकाळा, पु॰ कों॰ रहाटास वांकाची नभूर, किं॰ नड आली असतां तत्स्थानीं दोरीनें जो बंध बांधितात तो.

वाँकी, स्त्री॰ दे॰ वांक म्हणून जें भूषण ती.

वाँकीस्मेस, स्त्री॰ वांकडी मेस.

वाँकुडणें, वांकडणें.

वाँकुडा, ३लिं॰ पं॰ वांकडा.

वाकुदणें, रा॰ मनस्वीपणें नाचणें, उडणें, हंसणें, इ॰ व्यापारीं वर्तणें.

वाँकुल्या, स्त्री॰ कोणेकानें खिजावें म्हणून त्याचे पुढें हात नाचविणें, किं॰ वेडीं वांकडीं तोंडें विचकणें अथवा त्याचा कांहीं वांकडें चालणें तोत्रें बोलणें, इ॰ रूप जा खोडी असतील त्यांची अनुकृति करणें. इ॰ जा चेष्टा त्या.

वाकेनिवीस, पु॰ राजा कचेरीस बसल्यानंतर त्याचे मुखांतून जीं वाक्यें निघतात तीं सर्व लिहून ठेवावीं म्हणून त्याविषयींचा जो अधिकारी असतो तो.



वाँकेरी, स्त्री॰ एक औषधी झाड आहे.

वाँकोल्या, स्त्री॰ वांकुल्या.

वाक्चापल्य, न॰ सं॰ भाषणाविषयीं कोणेकाचे आंगीं असलेली चपलता ते.

वाक्पारुष्य, न॰ सं॰ कोणेकानें उद्देशून जें शिवी, गाळी, इ॰ रूप दुर्भाषण तें.

वाक्य, न॰ सं॰ एका क्रियेशीं क्रियाकारक भावादि संबंधानें अन्वित होणारीं जीं अनेक पदें त्यांचा जो त्या क्रियापदानें विशिष्ट समुदाय तें; २, धर्मशास्त्रादिसंबंधी शास्त्रार्थबद्ध जो गद्यपद्यात्मक पदसमुदाय तें; वाक्यपद्धति, वाक्यरचना, इ॰ स॰ जाणावे.

वाक्यार्थ, पु॰ वाक्यनिष्ठ पदांपासून निष्पन्न होतो जो विशिष्टवाक्याचा अर्थ तो.

वाक्यालंकार, पु॰ जेनेकिं नाहीं, जे आहे तें, आपला, इ॰ शब्दांचा अर्थ तात्पर्यावांचून जो कोणेकाचे भाषणामध्यें केवल वाक्य शोभार्थ प्रयोग असतो तो.

वाक्सरणि, स्त्री॰ सं॰ अस्खलितपणें त्वरेनें चाललेला असतो जो वाणीचा प्रवाह ती.

वाक्सिद्धि, स्त्री॰ सं॰ वाणींतून जीं अक्षरें निघतात तीं खरीं होत असावीं एतद्विषयीं कोणेकास सिद्धि असलेली ती.

वाक्स्तंभ, पु॰ गर्हिंवर इ॰ कारणामुळें भाषणव्यवहारीं वाणीचा जो कुंठी भाव होतो तो.

वाख, पु॰ वाक.

वाखंडी, स्त्री॰ एक औषधी लता आहे; २, पाचु, अननास, यांचा जो वाख ती.

वारखबट, स्त्री॰ दे॰ वारखाची जी बट ती.

वारखल, स्त्री॰ कों॰ क्षुधा इ॰ कारणानें पोटास फ डले जी खळी ती.

वारखलणें, मनुष्यादिकानें वारख्यानें युक्त होणें.

वारखा, पु॰ मोडशी, हगवण, पोटसूळ, इ॰ रोगानीं प्रकृतावस्था पालटून जी कांहीं विकृति होते ती.

वारखाणणी, स्त्री॰ नावांजणी.

वारखाणणें, नावांजणें.

वारखाळणें, दे॰ वारखलणें.

वाग, स्त्री॰ आणें, येणें, बसणें, उठणें; इ॰ व्यापारानीं सव्यापारपणें जें कोणेकाचें कोणेकस्थलीं वर्तन तें.

वांग, पु॰ सोनें, रुपें, इ॰ कांस मोरचूत, शिसें, इ॰ कांचा संबंध असल्यामुळें त्यांजवर जो काळा डाग मारितो तो; २, मनुष्याचे मुखादिप्रदेशीं जन्मतांच असतो, किं॰ कालांतरानें उठतो जो काळसर डाग तो; त्र॰ येतील वांग तर फेडतील पांग; ३, धातुमय पात्रादिकांवर जे हातोड्याचे ठोके असतात ते प्रत्येकीं.

वागटी, स्त्री॰ मत्स्यांत एक जाति आहे.

वागणूक, स्त्री॰ वाग; २, कोणेकस्थलीं कोणेकानें वागवून घेतल्यामुळें जी कोणेकाची नांदणूक ती.

वागणें, कोणेक मनुष्यादिकानें गृहादिस्थलरूप, किं॰ राज्यकारभार इ॰ व्यवहाररूप जें अधिकरण त्याचेठायीं निजणें, बसणें, उठणें, हिंडणें, बोलणें, चालणें, लिहिणें, इ॰ यथायोग्य स्वस्वव्यापार करीत वर्तत असणें; २, अंतःकरणांत काम क्रोधादि, किं॰ कोणेक बरी वाईट गोष्ट, किं॰ जनांत कोणेक धर्म, किं॰ चाल इ॰ अर्थानीं तत्तदधिकरणीं वर्तत असणें. हा सर्व पहिल्या लक्षणाचाच प्रपंच; उ॰ तुम्ही सांगितलें तें माझे मनांत वागतें आहे विसरलों नाहीं; आपले हात पाय वागताहेत तों दुसऱ्यास काम सांगूं नये.

वागबारस, स्त्री॰ गोवत्सद्वादशी.

वागवणें, गर्भ, ओझें, इ॰ कांतें त्यांचा भार संभाळून वाहणें; भृत्य, अधमर्ण, इ॰ कांस वागवून घेणें, त्र॰ त्यांपासून कार्यादिकांत कांहीं अंतर पडलें असतां त्या विषयीं क्षमा करून निभावणी होई असें संभाळून घेणें.

वांगी, स्त्री॰ एक झाड आहे.

वांगीभात, पु॰ वांगीं, मसाला, इ॰ द्रव्यें आंत घालून जो भात करितात तो.

वागुच्या, स्त्री॰ कों॰ जें वस्त्र फाडूं नये अशी विवक्षा आहे, तें फाडून त्याचा झाल्या ज्या चिंध्या त्या; उ॰ पर्वा तुमची नवी साडी घेतली तिच्या इतक्यांत पोरीनें वागुच्या करून टाकल्या.

वांगें, न॰ वांगीचें जें फळ तें.

वाग्दत्त, ३ लिं॰ वाचादत्त.

वाग्दान, न॰ वाग्निश्चय.

वाग्निश्चय, पु॰ मी आपली मुलगी तुमचे मुलास देतों आणि तुमची मुलगी आपल्या मुलास करतों एतन्निश्चय प्रधान एक विवाहांग कर्म आहे.

वाग्बाण, पु॰ दुसऱ्याचे अंतःकरणास बाणासारिखें

रिखें भेदणारें जें वचन त्यास ह्म॰.

**वाग्मी**, ३लिं॰ सं॰ भाषण व्यापारा विषयीं जो परमपटु तो.

**वाग्वल्लुरी, वाग्वल्ली, वाग्विलासिनी**, स्त्री॰ ग्रं॰ सरस्वती ह्मणून जी देवता तीस ह्म॰.

**वाघ**, पु॰ आरण्यक एक प्रबल पशु आहे; २, ला॰ शूर, विद्यादिगुणानें जो प्रखर त्यास ह्म॰ त्या राज्यांत वाघ आणि मेंढी एकत्र पाणी पिताआहेत, एथें राजाचे प्रभावानें परस्पर जे शत्रु त्यांचानें समीप असतांही एकमेकाचें वांकडेंकरवत नाहीं असा अर्थ.

**वाघचनडा**, पु॰ उठाणूरूप एक रोग आहे जो प्रातःकाळहानास होत असतो.

**वाघट**, न॰ रा॰ लहान जातीचा जो वाघ तें.

**वाघंटी**, स्त्री॰ दे॰ एक लता आहे.

**वाघंटें**, न॰ वाघंटीचें जें फल तें.

**वाघनख**, न॰ वाघाचें नख जें सुवर्णानें संबद्धकरून मूलांस भूषण करीत असतात तें.

**वाघबीळ**, न॰ रा॰ वाघानें रहावयाचें जें पर्वतादिकांस बीळ असतें तें.

**वाघमाऱ्या**, ३लिं॰ वाघास मारलें आहे ज्याणें असा जो शिपाई इ॰ त्यास ह्म॰; २, रा॰ हरीक, लागरी सुपारी, इ॰ जे कितीएक पदार्थ त्यांचे लागरेपणाचा अतिशय वर्णायाचा असतां त्यास ह्म॰.

**वाघमेंढी**, स्त्री॰ कितीएक खडयांस वाघ अशी संज्ञा ठेवितात आणि कितीएकांस मेंढी अशी संज्ञा ठेवितात अशो संकेताचा बुदबळांसारिखा एक खेळ आहे, प्रा॰ अनेकव॰ प्र॰.

**वाघर**, स्त्री॰ दे॰ आरण्यक जे हरिणादि पशु त्यांस धरायाचे उपयोगी जें जाल असतें ती.

**वाघरूं**, न॰ वाघास निंदेने ह्म॰.

**वाघवें**, न॰ कोणेकस्थलीं व्याघ्रकृत उपद्रवाचा जो कांहीं काल अतिशय होतो तें; २, ला॰ चोरादिकृत उपद्रवाचें जें कोणेकस्थलीं बाहुल्य असतें त्यासही जाणें, येणें, इ॰ प्रसंगीं ह्म॰.

**वाघळ**, स्त्री॰ दे॰ वाघूळ.

**वाघा**, पु॰ वा॰ वाघ्या.

**वाघांटी**, स्त्री॰ वाघंटी.

**वाघांटें**, न॰ वाघंटें.

**वाघावें**, न॰ वाघवें.

**वाघी**, स्त्री॰ भंडार ठेवायाकरितां वाघ्येलोक व्याघ्रचर्माची जी पिशवी करितात ती; २, व्याघ्रमुखाचे चिन्हानें युक्त असून त्वरेनें चालणारी अशी एक नौका असते ती; ३, पिंवळ्या रंगाचे वस्त्राची आणि वरकाळे पट्टे अशी व्याघ्रचर्मासारिखी जी घोडयास भुरकी करितात ती; ४, लांकूड तासते समयीं आश्रयार्थ त्याजखालीं घालायासाठीं जो लांकडाचा तुकडा घेतात त्यास ह्म॰.

**वाघीकवडी**, स्त्री॰ कवडींत एक भेद आहे, जीचा वर्ण व्याघ्रचर्मासारिखा असतो ती.

**वाघीतंबाखू**, स्त्री॰ व्याघ्रचर्मासारिखा रंग असून जीचें पान दळदार असतें अशी एक प्रकारची तंबाखू आहे.

**वाघूळ**, न॰ वडवाघूळ.

**वाघेंटी**, स्त्री॰ कों वाघंटी.

**वाघेंटें**, न॰ वाघंटं.

**वाघोबा**, पु॰ समयविशेषीं वाघ आणि वाघ्या यां-स त्य॰.

**वाघ्या**, पु॰ एक खंडोबाचा भक्त आहे. जो गळ्यांत भंडाराची वाघी घालून देवाचे नांवावर भिक्षा मागत असतो.

**वाङ्नियम**, पु॰ सं॰ कोणेक कर्मांत अमुक कालपर्यंत बोलूनये असा धरितात जो नियम तो.

**वाङ्निश्चय**, पु॰ वाग्निश्चय.

**वाचक**, ३ लिं॰ जा अर्थातें शब्दानें बोधवितो जो शब्द तो त्या अर्थाचा; २, पुराणादि ग्रंथ वाचणारा जो पुरुष तो.

**वाचणी**, स्त्री॰ पाटीवर लिहिलेलीं अक्षरें वाचण्याचा जो व्यापार तो, सांग, शिक, इ॰ धा॰ सा॰ प्र॰.

**वाचणें**, लिहिलेला ग्रंथ, अक्षरं, इ॰ पाहून तीं त्याप्रमाणें उच्चारणें.

**वांचणें**, जगणें.

**वाचनिक**, ३ लिं॰ सं॰ आर्थिकार्थसिद्ध, ज्ञापकसिद्ध, असा नव्हे साक्षात वचनानेंच प्रतिपादित असा जो विधिनिषेध इ॰ रूप कोणेक अर्थ तो.

**वाचस्पति**, पु॰ सं॰ बृहस्पति.

**वाचा**, स्त्री॰ वाक्; २, रा॰ अवसरणी; तुझी वाचा साखरेनें भरो, एथें तुझें तोंड साखरेनें भरो, असा अर्थ; वाचाविटाळणें, त्य॰ कोणेक कार्यार्थ शब्द खरचणें; वाचा फोडणें, त्य॰ कोणेकातें उद्देशून हा मरेल, याचें निसंतान होऊ, इ॰ अभद्र शब्दोच्चार करणें.

**वाचादत्त**, ३ लिं॰ वाचेनें कोणेकास दिल्हा जो अर्थ तो.

**वाचाल**, ३ लिं॰ अप्रयोजकपणें मनस्वी भाषण करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**वाचाशक्ति**, स्त्री॰ पुस्तकादि अस्खलितपणें त्वरेनें वाचावें अशी जी कोणेकाचे वाणीचे ठायीं शक्ति असते ती; २, कों॰ वाचालपणा; उ॰ तुझी असलें तोंड आटपून धरीत जा भारी वाचाशक्ति करूं नको.

**वाचाळ**, ३ लिं॰ वाचालशब्दाचा अपभ्रंश.

**वाचिक**, ३ लिं॰ सं॰ वाणीचे व्यापारानें घडलें जें पातक पुण्यादि तो.

**वाची**, ३ लिं॰ वाचक प्रथमार्थीं परंतु प्रा॰ समासीं प्र॰; उ॰ शुक्ल, कृष्ण, इ॰ शब्द कदाचित् गुणवाची होतात, कदाचित् गुणिवाचीही.

**वांचून**, अ॰ ज्या अर्थाचा राहित्यं करून, तसें त्यावांचून असा प्र॰; उ॰ रुपये घेतल्यावांचून जाऊं नको.

**वाच्य**, ३ लिं॰ सं॰ जें पद उच्चारिलें असतां ज्या अर्थाचा बोध होतो तो अर्थ त्या पदाचा; २, न॰ कों॰ वाच्यता या अर्थी.

**वाच्यता**, स्त्री॰ कांहीं एक गुप्त गोष्टीची जी प्रसिद्धि ती.

**वाच्यवाचकभाव**, पु॰ सं॰ वाच्य अर्थाचा आणि वाचक शब्दाचा असतो जो परस्पर संबंध तो.

**वांच्छा**, स्त्री॰ सं॰ इच्छा.

**वांछिणें**, इच्छिणें.

**वाजणें**, वाद्यादिकानें शब्द युक्त होणें; २, ला॰ कां-

हीं एक गुप्त गोष्ट प्रसिद्धीस येणें; ३ ,ग॰ काठी, बांसा, इ॰ भारपडणें, इ॰ कारणामुळें केवळ द्विभाग न होतां ईषत भग्न होणें; त्याजबरोबर सारादिवस तोंड वाजवावें लागतें इ॰ स्थलीं तोंडानें बहुत बोलावें लागतें असा अर्थ; वाजते ढोलानें येणें, आणणें इ॰ स्थलीं अपराधादि निरसन करून, अथवा कोणास न भितां आणें, येणें, इ॰ अर्थ होतो; थंडी, हीं वाजणें. त्य॰ लागणें.

**वाजणेंगाजणें**, कों॰ पर्जन्यानें विद्युत्, स्फुरण, गर्जना, इ॰ चिन्हानें विशिष्ट होणें: २, ला॰ गुप्तगोष्ट प्रसिद्ध होणें.

**वाजतगाजत**, अ॰ वाद्य, गर्जना, प्रधान समारंभानें आणें, येणें, मिरवणें, इ॰ कांचें वि॰.

**वाजंत्र**, न॰ मंगल कार्यादिकाच्या ठायीं वाजवायाचा सूर, सनई, ग॰ प्रधान जो वाद्यांचा जोड त्यांतील जी वाद्यें तीं प्र॰.

**वाजंत्री**, पु॰ वाजंत्र वाजवून त्याजवर उपजीविका करितो तो.

**वाजपुसी, वाजपूस**, स्त्री॰ कों॰ विचारपूस.

**वाजबमिती**, स्त्री॰ कांहीं एक व्यवहार पूर्वी होऊन गेला आणि त्याचा कागदपत्र करायाचा असतां जा मितीचा व्यवहार झाला तीजी मांडितात मिती ती.

**वाजवी**, ३ लिं॰ वाजबी.

**वाजवी**, ३ लिं॰ न्याय्य.

**वाजावाजवी**, ३ लिं॰ कों॰ वाजवी.

**वाजी**, पु॰ सं॰ घोडा.

**वाजीबमिती**, स्त्री॰ वाजबमिती.

**वांझ**, स्त्री॰ वंध्या; २, पु॰ जीचे वीर्यापासून अपत्योत्पत्ति होत नाहीं असा जो पुरुष तो; त्य॰ वांझेस कात बोळ कशाला.

**वांझखडा**, पु॰ पोर नव्हावें म्हणून औषध पेत असतात त्यास त्य॰.

**वांझट**, ३ लिं॰ वांझा.

**वांझटोळी**, स्त्री॰ रा॰ वांझेस निंदेनें त्य॰.

**वांझा**, ३ लिं॰ वंध्य प्रथमार्थी; २, जा पुष्पाचा फलरूप परिणाम होत नाहीं असें जें तोंडली, दोडकी, इ॰ कांचें पुष्प तें; ३, आंत असायाचा जो गर, दाणे, कण, इ॰ रूप अंश तद्रहित जें फल, शेंग, धान्य, इ॰ तें; ४, जामध्यें गरे, दाणे, फार थोडे असा जो फणस, शेंग, इ॰ तो.

**वांझा**, पु॰ वांधा.

**वांझीपुनव, वांझीपूर्णिमा**, स्त्री॰ पोषीपूर्णिमा.

**वांझोटा, वांझोडा**, ३ लिं॰ वंध्य प्रथमार्थी; २, पु॰ वांझ जो पुरुष तो.

**वांझोटी**, स्त्री॰ वांझ जी स्त्री ती.

**वाट**, स्त्री॰ मार्ग; रा॰ वाट वावरणें, त्य॰ जा कामाचे उद्देशें कोठें गेला तेथून तें काम न होतां हलपटा खाणें; २, कांहीं एक गोष्टीची होत्ये जी गति तीस प्रसंगविशेषीं त्य॰; उ॰ या पंचाइतीची काय वाट होईल ती पाहूं आतां; कोणेक द्रव्यादि पदार्थांची वाट लागणें, त्य॰ चिन्हें वाट लावणें; कोणेक प्राप्त झालेलीं अडचण संकट इ॰ कांची वाट करणें, त्य॰ तन्निष्पत्तीचे निर्वाहाचा उपाय करणें; कोणेकानें कोणेकाची वाट पाहणें, त्य॰ मार्गप्रतीक्षा करणें; वाटमारणें त्य॰ वाटेनें आणारा जो मनुष्य, जिन्नस, इ॰

तो विवक्षितस्थळीं न आऊं देतां मध्येमध्यें कुटून घेणें; कांहींएक वाटेवर पडणें इ॰ प्रकारचें लागणें, निषेधविषयीं प्र॰.

**वाटकाढू**, **वाटकाढ्या**, पु॰ वाटाड्या.

**वाटकोळ**, अ॰ बहुतवेळपर्यंत; बसणें, वाटपाहणें, इ॰ कांचें वि॰; २, पु॰ बहुत जो वेळ तो.

**वाटखर्ची**, स्त्री॰ वाटेंत खर्चकरायाकरितां घेतात जें द्रव्य ती.

**वाटखोळ**, अ॰ पु॰ वाटकोळ.

**वाटगा**, पु॰ वाडगा.

**वाटच्या**, अ॰ कों॰ वारचा.

**वाटच्याचोर**, **वाटेच्याचोर**, पु॰ अमुक वस्तूची अमुक प्रमाणक किंमत भलता कोणी एक देईल असें बोलायाचे प्रसंगीं त्या भलत्या कोणास प्र॰, उ॰ या पागोट्याचे दाहा रुपये वाटच्याचोर देखील देईल.

**वाटच्यावाटसरू**, **वाटेच्यावाटसरू**, पु॰ जा स्थळींचा, किं॰ जा व्यवहाराचा जास संबंध नाहीं आणि माहितगारीही नाहीं असा जो कोणी वाटेनें जात असतो त्यास तेथें प्र॰.

**वाटण**, न॰ वाटायाकरितां घेतलें जें द्रव्य तें; २, वाटण्यानें होतो जो त्या पदार्थावर संस्कार तें.

**वाटणा**, पु॰ वाटाणा.

**वांटणी**, स्त्री॰ कांहीं द्रव्यादि पदार्थ वांटण्याचा जो व्यापार ती; २, त्या व्यापारानें झाले जे पृथक्‌पृथक् विभाग ते प्र॰.

**वांटणीपत्र**, न॰ कों॰ कोणेक पदार्थाचे वांटणीचा पुढें मागें विवाद नपडावा इत्यादर्थ तद्विषयींचें जें पत्र करित असतात तें.

**वांटणें**, द्रव्यादिरूप कोणेक अर्थाचे अनेक विभाग अनेक विभाग्यांशीं संबद्ध होत अशा प्रकारें तो अर्थ विभक्त करणें, किं॰ कोणेक अर्थ अंशतःअंशतः अनेक विभाग्यांशीं संबद्ध करणें; उ॰ हीआगा वांटलेली आहे; ब्राह्मणास दक्षणा वांटली.

**वाटणें**, पाटा इ॰ कांवर कांहीं पदार्थ घालून तो वरवंटा इ॰ कांचे फिरविण्यानें विवक्षानुरूप बारीक करणें; २, ला॰ कोणेक गोष्टीचा निर्णय व्हावा म्हणून तीगोष्ट अनेकांनीं मिळून विचारपूर्वक घोळणें; उ॰ बेग्याचें वाटलें आणि संभाजीचें मुंडलें कोणास समजत नाहीं; ३, कोणेक अर्थ हा वरा, हा वाईट, हा होईल, हा जाईल, हा अमुक, इ॰ कोणेक रूपेंकरून मनोवृत्तीनें घेतला जाणें; उ॰ आज पाऊस पडेलसा वाटतो; या रंगाचें पागोटें मला चांगलें वाटतें; ४, हें म्या करावें, यास हें द्यावें, अमुकस्थळीं जावें, इत्याद्याकारक कोणेक गोष्ट इच्छा विषय होणें; उ॰ संसार सोडावासें वाटतें; मला काशीस जावेंसें वाटतें.

**वाटतीट**, स्त्री॰ जी मार्गी खडतरपणा, व्याघ्र, चोरादिभय, इ॰ अनेक शंका संभावना आहे अशी अनेक प्रकारची देशांतराहिकांस जावयाची जी वाट ती, प्रथमांत प्रयोग प्रा॰ नाहीं; उ॰ वांटतिटेनें संभाळून जा.

**वांटप**, न॰ रा॰ वांटणी प्रथमार्थी.

**वांटपपत्र**, न॰ रा॰ वांटणीपत्र.

**वाटपाडू**, ३ लिं॰ मार्गांतील रहदारी बंद व्हावयाजोगें कोणिकास मारावें, लुटावें, असें कर्म करणारा

णारा जो तो.

**वाटपाड्या**, ३ लिं॰ वाटपाडू.

**वाटपिठाच्या**, ३ लिं॰ रा॰ डाळ, तांदूळ, इ॰ भिजवून, वाटून त्याच्या करितात जो वडा, उंडा, इ॰ तो.

**वाटमार्गी**, पु॰ वाटसरू.

**वाटमाऱ्या**, ३ लिं॰ वाटपाडू.

**वाटवणी**, स्त्री॰ वाटवण्याचा जो व्यापार तो; २. न॰ संकेतानें मूत्रास म्ह॰.

**वाटवणें**, ग॰ गतीनें अतिक्रांत होत चालले जे देश, काल, इ॰ त्यांचे पूर्वापार भागामध्यें अवधित्वें करून मानिलेला जो पर्वत, पर्व, इ॰ कांहीं त्यांतें अतिक्रांत करणें: उ॰ ही खांदेरी वाटवली म्हणजे मुंबई दिसूं लागेल.

**वाटवा**, पु॰ सराफ इ॰ कांची द्रव्यादि ठेवायाची आकार विशेषाची एक पिशवी आहे.

**वाटशोक**, अ॰ रा॰ या शेवटापासून त्या शेवटपर्यंत सगळ्या वाटेतें व्यापून वृक्षादिकांचें असणें, कांहीं एक सांडत जाणें, इ॰ कांचें वि॰.

**वाटसरू, वाटसारू, वाटसुरू, वाटसूर**, पु॰ स्वकीय गृहादिस्थलापासून निघून देशांतरास, किं॰ ग्रामांतरास जावयास मार्गी लागला आहे जो तो, अनेकवचनीं नपुंसकींही प्रयोग होतो.

**वांटा**, पु॰ एका पदार्थाचे जे अनेक अंश ते म॰

**वाटाडी, वाटाड्या**, पु॰ मार्ग दाखवायासाठीं बरोबर जो कोणी माहितगार घेत असतात तो.

**वाटाणा**, पु॰ एक द्विदल धान्य आहे: कोणेकास वाटाण्याची अक्षत देणें, किं॰ लावणें, म्ह॰ त्याणें मागितलेल्या अर्थाविषयीं स्पष्ट नाहीं म्हणून सांगणें.

**वाटांदुळा, वाटांदूळ**, पु॰ को॰ सडीक तांदुळामध्यें माडी आड जी कणी निघते तो.

**वाटारणें**, वटारणें

**वाटावाट**, स्त्री॰ कोणेक गोष्टीतील तात्पर्यार्थ समजावा इ॰ कारणार्थ अनेक शंका तर्कादिपूर्वक घोळघोळून जी चौकशी ती.

**वाटिका**, स्त्री॰ सं॰ फुलझाडें इ॰ कांचा जो बाग ती: वृक्षवाटिका, पुष्पवाटिका, इ॰ समास.

**वाटी**, स्त्री॰ रुपें इ॰ धातूचें नरोटीचे आकाराचें जें पात्र असतें तीं; २, नारळ मधोमध फोडिला असतां जी दोन अर्धे होतात तीं म॰; ३, गुडघ्यावरचें जें वर्तुल अस्थि तें; ४, सं॰ वाटिका.

**वांटेकरी**, पु॰ विभागी.

**वांटेदार, वांटेलदार**, पु॰ विभागी.

**वांटेली**, पु॰ विभागी.

**वाटोळा**, ३ लिं॰ मध्यकेंद्रापासून सभोंवताल्यापरिधीशीं अंतर सारखें असतें अशा आकाराच्या जो दगड, स्थल, इ॰ पदार्थ तो, किं॰ तो त्याचा आकार, २, लांबट असून गोल असा काठी, नळ, कांडें, इ॰ जो पदार्थ तो; कोणेकाचें वाटोळें होणें, म्ह॰ नाश व्ययादि होऊन कांहीं राहिलें नाहीं अशी अवस्था होणें.

**वाटोळागोटा, वाटोळाधोंडा**, पु॰ भाषणादि व्यवहारीं दुसरा पगीं धरूं म्हणेल तर सांपडायाचा नाहीं असा पंजाबी जो मनुष्य त्यास म्ह॰.

**वांठ**, स्त्री॰ महिषजातीय जें स्त्र्यपत्य ती.

**वांठरूं**, न॰ को॰ वांठीस्य निंदेनें, किं॰ लघुत्ववर्णन प्रसंगीं

प्रसंगीं त्य॰.

**वाँठीँ**, न॰कों॰ तृणादिकानें धान्यादिपदार्थांचा बांधितात जो मुडा तें.

**वाँठीचापिता**, पु॰कों॰ संकेतानें मूर्खास त्य॰.

**वाँठयेँ**, न॰कों॰ वांठीं.

**वाड**, न॰रा॰ वाठें

**वाडकर**, पु॰कों॰ वाडीचा वतनदार जो धनी तो.

**वाडकुलेँ**, न॰कों॰ आवाड.

**वाडगा**, पु॰ मोठी जी धातुमय वाटी तो.

**वाडगेँ**, न॰दे॰ वाडकुलें.

**वाडणेँ**, रा॰ वाढणें प्रथमार्थी.

**वाडप**, न॰रा॰ वाढप.

**वाडया**, पु॰रा॰ सुनाराचे नावापुढें प्रतिष्ठार्थ याचा प्रयोग करितात.

**वाडवळ**, पु॰ हिंदूत एक जाति आहे.

**वाडा**, पु॰श्रीमंत लोकांचें जें मोठें घर तो; राजवाडा सर्कारवाडा, इ॰स॰; २, एका गांवाचे पोटीं जे अनेक पाडे असता ते प्रत्येकीं; या अर्थीं देऊळवाडा. ब्राम्हणवाडा, गोळवाडा, इ॰स॰; ३, आंत कांहीं माल सांठवून ठेवावा, किं॰ कांहीं कारखाना ठेवावा इत्यादर्थ सभोंवतें वांसे इ॰ पुरून आवृत केलें असतें जें स्थल तो; ४, गुरें, शेळ्या, मेंढ्या, इ॰ बांधावयाकरितां जें वेगळें घर केलें असतें तो.

**वाडी**, स्त्री॰कों॰ बागायती जमीनीचे आवारादिरूप सीमाचिन्हांनीं जें अनेक विभाग केले असतात ते प्रत्येकीं ती; २, मूळगांवाचे शेजारीं शेतभात इ॰कांचे सोईनें गृहादिबांधून जी वसति होते ती त्या गांवची; ३, रा॰ भिक्षान्नादिकांस घावयाकरितां थोडकेंसें अन्न वाढून सिद्ध करितात जें पात्र ती.

**वाढ**, स्त्री॰पु॰ मनुष्यादिकांचे शरीराची उत्पन्न झाल्यापासून तारुण्य येईतों उत्तरोत्तर होत चालली असते जी वृद्धि ती तो; २, स्त्री॰ जा धान्यद्रव्यादिपदार्थांचें संख्या प्रमाण निर्णीत असतें तें धान्यादि पुनः मोजिलें मापिलें असतां मापाचा कमीपणा इ॰ कारणानें पहिल्यापेक्षां कांहीं अंशानें होतें जें आधिक्य ती, किं॰ तो अंश ती; ३, वाढी प्रथमार्थी; ४, न॰ वाढें; ५, न॰स्त्री॰कों॰ अंकुर यावयाचा डोळा ज्यास असतो असा जो कोनफळाचा अवयव तें ती.

**वाढण**, न॰ पात्रादिकांवर परिवेषण करायासाठीं घेतलें जें भाकर, भात, इ॰ द्रव्य तें, किं॰ तें परिवेषण करण्याचा जो व्यापार तें; २, म्हणवलीस भोजनार्थ सोयरे धायरे, किं॰ शेजारी पाजारी यांजकडून पक्वान्नादि अन्न विशिष्ट जें पात्र येतें तें; ३, अन्यत्र जाऊन भोजन करायाकरितां अन्न वाढलेलें जें कोणकास पात्र देतात तें.

**वाढणी**, स्त्री॰दे॰ भात इ॰ वाढायाचे उपयोगी परडीचे आकाराचें धातुमय एक पात्र आहे.

**वाढणेँ**, भक्ष्य भोज्यादिपदार्थ भोजन करायाचे पात्रांत घालणें, पक्षीं त्या भोजन पात्रासही कर्मता; भिक्षा, तेल, पाणी, इ॰ पदार्थ झोळी, समई, पानपात्र, इ॰कांत घालणें या अर्थीं ही क्वचित् प्रयोग करितात; २, कोणेक अर्थानें पूर्व प्रमाणापेक्षां अधिक प्रमाण विशिष्ट होणें, किं॰ विवक्षित प्रमाणाशीं तुल्यता होऊन कांहीं अतिरिक्त होणें;

उ॰

उ॰ जसें जसें वय वाढतें तसें तसें ज्ञान वाढतें; बा-जारांतून मणभर दाणे आणले ते घरचे मापानें मोजले तों दोन पायल्या वाढले; ३, युद्धार्थ कोणेकानें स्वाधिष्ठित स्थान सोडून प्रतिपक्ष्याचे अंगावर जावयाकरितां पुढें होणें; ४, काजळ, कुंकूं, धान्य, इ॰ पदार्थांविषयीं संपलें हा शब्द अभद्र असें मानून त्या अर्थी या धातूचा प्रयोग प्रा॰ स्त्रिया करितात; ५, कोणेकानें आंगीं पिशाचादि वारें संचरल्यामुळें मान, हात, इ॰ शरीरावयव थरथर हालत अशा चेष्टानीं विशिष्ट होणें. पक्षीं त्या पिशाचादिकांस कर्तृता; ६, न॰ वाढण द्वितीयार्थीं.

**वाढता**, ३ लिं॰ वाढत्या अंगाचा; २, वाढत्या चुड्याची जी बांगडी तिचें वि॰.

**वाढताचुडा**, पु॰ रा॰ कांसारापासून बांगड्या भरिल्या असतां बोलीपेक्षां अधिक जी एक बांगडी कांसार भरीत असतो तो.

**वाढती**, स्त्री॰ रा॰ मुलांस जी उचकी लागल्ये तीस मंगलार्थ ञ॰.

**वाढतेअंगाचा, वाढत्याअंगाचा**, ३ लिं॰ अंग कांहीं वाढलें असतांही उपयोगीं पडावा म्हणून अंगापेक्षां कांहीं मोठा केला असतो जो आंगरखा, चोळी, इ॰ तो.

**वाढदिवस, वाढदीस**, पु॰ मनुष्य जन्मला म्हणजे वर्ष होई तों पर्यंत प्रतिमासीं जन्म तिथीस नंतर प्रतिवर्षी जन्म तिथीस स्तंभ पूजनादि पूर्वक करायाचें एक संस्कार कर्म आहे तो.

**वाढप**, न॰ वाढण प्रथमार्थी.

**वाढपी**, पु॰ अन्नादि परिवेषण करणारा जो मनुष्य तो.

**वाढलें**, न॰ कों॰ वाढण द्वितीय तृतीयार्थी.

**वाढवणें**, स्त्रियांचें सौभाग्य भूषण जें बांगडी, मंगळसूत्र, इ॰ त्यातें फोडणें, किं॰ तोडणें.

**वाढवा**, पु॰ वाढ द्वितीयार्थी.

**वाढवीस**, पु॰ वाढदिवस.

**वाढवेळ**, पु॰ अ॰ दे॰ वाटकोळ.

**वाढा**, पु॰ गोमहिष्यादिकांचा संततिरूप जो विस्तार तो.

**वाढावा**, पु॰ वाढवा

**वाढाळ, वाढाळू**, ३ लिं॰ संप्रदायापेक्षां थोडक्या वयांत अधिक वाढण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्य, पशु, वृक्ष, इ॰ तो.

**वाढी**, स्त्री॰ सावकारापासून आपले गरजेस्तव धान्यादि कर्ज घेतलें असतां त्या बद्दल व्याजाचे स्थानी मूळ द्रव्यापेक्षां अधिक जें धान्यादि बोलीप्रमाण द्यावें लागतें ती; २, दे॰ कढी, वरण, इ॰ पातळ पदार्थ इ॰ वाढायाचे उपयोगीं आकार विशेषाचें मृत्तिकेचें पात्र आहे, प्रा॰ शूद्रभाषावृत्ति.

**वाढीदिढी**, स्त्री॰ वाढीचे बोलीनें कोणी करितो जो व्यवहार ती

**वाढें**, न॰ खावयाचे उपयोगी नव्हे असा जो उंसाचा शेंड्याकडील भाग तें.

**वाढोळ**, पु॰ अ॰ वाटकोळ.

**वाण**, न॰ व्रतायंगत्वेंकरून नारिकेलादि फलें, किं॰ सौभाग्य द्रव्यें, किं॰ पक्वान्नें इ॰ द्रव्यें वंशादिकांचे पात्रांत घालून ब्राह्मणास, किं॰ सुवासिनीस

जें दिसतात तें; २, पु॰ न॰ शरीर, वस्त्र, इ॰ संबंधी जो काळा, पिंवळा, इ॰ वर्ण तो तें; उ॰ दवळ्यांचे शेजारीं बांधला पोंवळा वाण नाहीं पण गुण लागला; ३, स्त्री॰ संसारादिकांत कोणेक पदार्थाची जी न्यूनता ती; उ॰ मिठाची केली वाण आणि लोंणचाला पडली घाण. इतरत्र प्रा॰ निषेधविषयीं प्र॰.

**वाणक**, न॰ सं॰ वाण प्रथमार्थी.

**वाणका**, ३ लिं॰ घडवतीचे उपयोगी टिकाऊ जें धोत्रजोडा, पासोडी, इ॰ वस्त्र तो.

**वाणकूट, वाणगट**, न॰ पु॰ वाणगंड.

**वाणगंड**, पु॰ न॰ वाण्यास निंदेनें उ॰

**वाणगी**, स्त्री॰ वानगी.

**वाणजिन्नस**, पु॰ वाणसवदा.

**वाणणें**, ग्रं॰ वर्णणें.

**वाणवसा, वाणवंसा**, पु॰ नियमाने स्त्रिया ईश्वर प्रीत्यर्थ व्रतादिकर्म करितात तो.

**वाणसवदा**, पु॰ हिंग, जिरें, मिरें, तूप, गूळ, इ॰ जो वाण्याचे दुकानावरील जिन्नस तो.

**वाणा**, पु॰ वस्त्राचें आडवें जें सूत तो.

**वाणाताणा**, पु॰ वस्त्राचा आडवा उभा जो तंतुसमुदाय तो.

**वाणिज्य**, न॰ सं॰ उदीम व्यापाररूप जें कर्म तें.

**वाणी**, स्त्री॰ शब्दाचे उच्चारास साधनभूत जिव्हानिष्ठ शक्तिविशेषात्मक जें कर्मेंद्रिय, किं॰ तदधिष्ठात्री जी देवता ती, किं॰ तिजपासून उत्पन्न होतो जो वर्णात्मक शब्दसमुदाय ती; २, पु॰ हिंदूत एक जाति आहे; ३, हिंग, जिरें, मिरें, गूळ, इ॰ जिन्नस विकणारा जो दुकानदार तो; ४, अ॰ कोणेक अर्थाशीं सदृश होई असें होणें, असणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ वेड्यावाणी काय बोलतोस.

**वाणीउदमी**, पु॰ वाणी तांबोळी इ॰.

**वाणीबकाल**, पु॰ वाणीउदमी.

**वात**, स्त्री॰ दिवा लावणें इत्यादि अर्थ कापूस, सूत, वस्त्र, याचा पीळ घालून जो तंतु सारिखा पदार्थ करितात ती, फुलवात, वेलवात, इ॰ स॰; २, केवळ लांबवें अतएव बारीक जें पडवळ, शेंगव्याचीशेंग, इ॰ कांस लप॰; ३, गलवताचें औजार गुंडाळून जी लांबट गुंडळी करितात ती; ४, रा॰ समईस जीं वाती लावायाचीं घरें असतात तीं प्र॰; ५, पु॰ सं॰ वायु; आमवात, पक्षवात, इ॰ स॰.

**वांत**, स्त्री॰ वांतिशब्दाचा अपभ्रंश.

**वातज्वर**, पु॰ वात प्रधान जो ज्वर तो.

**वातट, वातड**, ३ लिं॰ ज्याचे आंगीं खुसखुशीतपणा इ॰ नाहीं, अतएव तुटतां तुटत नाहीं, असा जो भाकर, पोळी, फणसपोळी, इ॰ पदार्थ तो; २, ला॰ दुसऱ्यानें कितीही धिक्कारिलें, निषेधिलें, असतांही अवमान न मानितां, त्याशीं न तुटतां, निर्लज्जपणें भाषणादि व्यवहार करण्याचा स्वभाव ज्याचा तो मनुष्य, किं॰ त्याचें तदनुरूप जें भाषण तो.

**वातबद्ध**, ३ लिं॰ बहुतकरून पोट फुगावें, मलशुद्धि साफ होऊं नये मेदोवृद्धीनें स्थूलता यावी, इ॰ रूप वातविकृति विशिष्ट जें शरीर, किं॰ त्याची प्रकृति तो.

**वातविध्वंस**, पु॰ वातनाशक एक रसायन आहे.

**वाता**, पु॰ को॰ कवाडाचे फळीस जीं कुसें असतात तीं प्र॰.

**वाताहन, वाताहात**, स्त्री॰ जमलेला जो संसार, व्यवहार, फौज, गांव, इ॰ त्यांचे अवयव लुटणें, नागवणें, वाऱ्यानें उडणें, पळणें, मरणें, इ॰ कारणानें चहोंकडे ज्या त्यामुळें होतो जो त्या संसारादिकांचा विध्वंस तो.

**वांति**, स्त्री॰ भक्षिलेल्या पदार्थाचें पित्तक्षोभादि निमित्तानें जें मुखाकडून उलटें बहिःपतन होतें तो; २, तिणेंकडून पडतें जें तें अन्नादि तो.

**वातूल, वातूळ**, ३ लिं॰ वातबद्ध; २, ज्याचे भक्षणानें पोट फुगावें इ॰ वात विकृति होत्ये असा जो पावटा, हरभरा, उडीद, देवडांगर, पोपया, इ॰ पदार्थ तो.

**वातेरें**, न॰ वाती करायाचे उपयोगीं जो वस्त्राचा तुकडा असतो तें; २, ला॰ केवळ झिरझिरीत जीर्ण झालें जें वस्त्र त्यास म्ह॰; ३, दे॰ वाता.

**वात्या**, पु॰ वाता.

**वात्येरें**, न॰ कों॰ वातेरें तृतीयार्थावांचून.

**वात्रड**, ३ लिं॰ दे॰ वात्रट.

**वात्सल्य**, न॰ सं॰ वत्सलत्व.

**वाथंग**, पु॰ दे॰ वाथंग.

**वाथंग्या**, ३ लिं॰ वाथंग्या.

**वाथ्या**, पु॰ दे॰ कुटणें याचायोगीं प्र॰; अर्थ, ज्यांत कांहीं लाभ नाहीं, आणि रसही नाहीं, उगीच कंटाळा मात्र येणार, असा भाषण व्यापार करणें.

**वाद**, पु॰ कोणेक विषयाविषयीं उभयतां परस्पर विप्रतिपन्न होऊन स्वस्वपक्ष स्थापनाविषयीं वाग्व्यापारानें करितात जें भांडण तो; २, कोणेक अर्थाचे निर्णयाद्यर्थ परस्परांचें जें प्रश्नोत्तरादिरूप भाषण तो; ३, अमुक गोष्ट अमुक काळीं होणार, किं॰ अमुकानें अमुक कर्म केलें, किं॰ अमुक गोष्ट अमुक प्रकारची आहे, इ॰ रूप कोणेक अर्थाविषयीं लोकांमध्यें चालला असतो जो भाषण व्यवहार तो; उ॰ त्या लढाईंत त्याणें तरवार मारली असा वाद लोकांत आहे आणि तुम्ही म्हणता तो पळाला; ४, कों॰ ब्राह्मणास ज्या अनेक वाद्या असतात त्या प्रत्येकीं.

**वादग्रस्त**, ३ लिं॰ सं॰ ज्या वृत्यादि विषयांविषयीं वादिप्रतिवादी यांचा तंटा आहे, तो वृत्यादिविषय.

**वादणा**, पु॰ ग॰ वाधणा.

**वादन**, न॰ सं॰ वाद्यादि वाजविण्याचा जो व्यापार तें.

**वादप्रतिवाद**, पु॰ एकानें पूर्वपक्ष करावा, एकानें समाधान करावें, एतद्रूप परस्परांचा चालतो जो भाषणव्यापार तो.

**वांदर**, पु॰ वानरशब्दाचा अपभ्रंश.

**वांदरखट**, न॰ वानरखट.

**वांदरतेल**, न॰ वानरतेल.

**वादविवाद**, पु॰ वादप्रतिवाद.

**वादळ**, न॰ वृक्ष मोडावे, गलबतें बुडावीं, घरें पडावीं, धुरळा उडावा, इ॰ अनर्थ व्हावयाजोगा होतो जो वायूचा अतिशय तें.

**वादळणें**, कों॰ कोणेकानें क्रोधावेशादिकारणामुळें आपल्याला, दुसऱ्याला, शिवीगाळ इ॰ करीत एकसारखें मनस्वी बडबडणें.

**वादा**, पु॰ कों॰ गोमहिष्यादिपशूंस लाळ यावी, पाय धरावे, इ॰ रूप विकृतीची जी धाम येत्ये तो.

**वादित**, ३ लिं॰ सं॰ वादन केलें ज्याचें तो वाद्यादिक.

**वादी**, स्त्री॰ बंधानायुपयोगी दोराऱ्या सारिखा लांबट जो चर्माचा तुकडा तो; २, पु॰ कोणेक अर्थाविषयीं

र्थी विप्रतिपन्न होऊन वादकरणारे जे उभयतां ते प्रत्येकीं; ३, अग्रवादी; ४, कांहींएक निमित्त करून वाद मांगण्याचा स्वभाव ज्याचा तो, किं० वाद सांगण्याविषयीं जो कुशल तो; ५, वादानें जो अर्थ सिद्ध करण्याविषयीं अभिमान धरिला आहे ज्याणें तो तद्वादी; उ० द्वैतवादी, अद्वैतवादी, कर्मवादी, स्वभाववादी, इ० समासीं प्र०.

**वादें**, न० कों० वादा.

**वाद्य**, न० वाजवायाचे उपयोगी जो मृदंग, वीणा, सनई, नगारा, इ० पदार्थ ते प्रत्येकीं; चर्मवाद्य, तंतुवाद्य, रणवाद्य, मंगलवाद्य, इ० समास, वाद्यघोष इ० समास०.

**वाद्या**, पु० वादी द्वितीयार्थी

**वाधंग**, पु० दे० गेली गनली अशी जी कांहींएक गोष्ट तिजविषयीं तूं असेंच कां केलेंस असेंच कां बोललास इ० रूप कोणेकास पुनःपुनः बोलण्याचा व्यापार तो.

**वाधंग्या**, ३ लिं० वाधंग लावण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**वाधणा**, पु० अवधणा.

**वांधा**, पु० देणें, घेणें, इ० व्यवहारीं उलगडा नहोतां राहत्ये जी वादविषयिता तो.

**वाधी**, स्त्री० दे० वादी प्रथमार्थी.

**वान्**, ३ लिं० जो अर्थ आहे ज्यास, किं० ज्याचाठायीं तो नद्यान्; उ० भाग्यवान्, दैववान्, धूमवान्, हिमवान्, इ०.

**वान**, पु० वाण द्वितीयार्थी.

**वानगी**, स्त्री० ज्या पदार्थाची परीक्षा चाखून होत्ये त्या विशिष्ट पदार्थाची परीक्षा करायाकरितां त्यांतून घेतात जो थोडा अंश ती; २, हुंगून, ऐकून ज्या विषयांची परीक्षा होत्ये असे जे अत्तर, गुलाब, गाणें इ० विषय तद्विषयींही प्र० होतो; ३, जकातदार इ० कांस उदमीलोक तसेंच ज्याचा मळा, बाग, इ० आपण खंडानें केला आहे, त्या धन्यास ते माळी इ० जकात, सारा, यां शिवाय ऐन जिनसाचा बोली प्रमाणें देतात जो अंश ती.

**वानणें**, ग्रं० वाणणें.

**वानप्रस्थ**, पु० गृहस्थाश्रम सोडून अरण्यांत जाऊन तप करावें असा एक आश्रम आहे. त्यांत जो विद्यमान तो.

**वानर**, पु० न० मा० झाडावर राहणारा असा काळ्या तोंडाचा एक पशु आहे.

**वानरखट**, न० वानराचे शरीरास क्षत पडलें असतां अनेक वानर मिळून तें विचकून पाहूं लागतात तेणेंकरून तें मनस्वी मोठें होतें तद्वत् पूर्वी अल्प असतां अनेकानीं आंत चिवडाचिवड केल्यामुळें अधिकावस्थेस पावलें जें दुखणें, कांहीं व्यवहारीक, संकट, इ० त्यास प्र०.

**वानरतेल**, न० कोणेक सबळाचा आश्रय इ० कारणानें आपणास मी सर्वांहून अकुतोभय सुखी असें मानून निश्चिंतपणें राहिलेला जो कोणी त्याचें कांहींकारणामुळें एकाएकीं सर्वांहून निकृष्ट व्हावया जोगें मोठें जें कांहीं होतें पारिपत्य त्यास प्र०.

**वानरक्षत**, न० वानरखट.

**वानवा**, पु० स्त्री० कांहींएक गोष्टी विषयीं होईलच, किं० नाहींच होणार, इ० एकरूपेंकरून निश्चय नहोतां असतें जें द्वैविध्य तो ती; उ० आमचे आण्याचें

ण्याचें ठरलें नाहीं, अजून वानवाच आहे; २, त्याहेविण्याचा निराम होऊन होय, किं० नाहीं असा कोणेक गोष्टीविषयीं एकरूपतेचा जो निश्चय तो ती; उ० तो देतो कीं नाहीं याचा संशय ठेवूनका काय ती वानवा करून या; ३, वर्णणूक.

**वाना**, पु० कों० काढा, चूर्ण, इत्याद्युपयोगी जे सुंठ, मिरीं, पिंपळी इत्याद्यनेक पदार्थ ते ब०.

**वाप**, स्त्री० रा० धान्य पेरल्यानें रुजून आलेलें जें शेत ती. परंतु तें शेत कोंवळें आहे तों पर्यंत प्रयोग.

**वापरणें**, वस्त्र, शस्त्र, पात्रादिपदार्थ पांघरणें, तोडणें, धान्यादि सांठवणें, इ० जो तत्तद्योग्य व्यापार त्याचे ठायीं लावणें; २, वागणें प्रथमार्थी.

**वापसा**, पु० दे० पर्जन्यकालीं कांहींकाल पाऊस उघडल्यामुळें शेतांचे पेरे व्हावयास जी त्या कालावर योग्यता येते तो.

**वापा**, पु० रा० वाफा.

**वापी**, स्त्री० सं० विहीर; २, रा० मेथी, कोथिंबीर, इ० कांचा लहान जो वाफा ती.

**वाफ**, स्त्री० अग्नि, सूर्यकिरण, इ० तेजःसंयोगानें तप्त जो आर्द्र पदार्थ त्यापासून जो धूम सदृश अंश निघतो ती; कोणेक फलादि पदार्थास वाफ देणें त्य० ती वाफ उत्पन्न व्हावयाजोगा ईषन्मात्र शिजविणें; २, न० कों० बैल इ० कोणेकास नांगर इ० कांस वाहयास देऊन तत्संबंधी जें धान्य, किं० द्रव्य घेतात तें.

**वाफणें**, दे० धान्य मुठींत घेऊन उडवून चहूंकडे पसरून पडे असें पेरणें.

**वाफरें**, न० कों० क्रोध, थंडी, पित्ताच, इ० शरीरांत संचारिलीं असतां भरते जी कांपरी तीस त्य० प्रा० भरणें, येणें, धातूंचे योगीं प्र०.

**वाफा**, पु० वांग्या, मिरचा, कोथिंबीर, ऊंस, खपल्या, कांदे, मीठ, इ० शिवाय करायाकरितां पाणी लावायाचे सोइचीं चतुष्कोणाद्याकार करितात जीं अनेक क्षेत्रें तीं ब०.

**वाफारा**, पु० कांहीं औषधी पदार्थ शिजवून त्याचे वाफेचा जो शरीरास, किं० तदवयवांस शेक घेतात तो.

**वांबळ, वांबाळ**, स्त्री० वाभळ.

**वाभळ**, स्त्री० कों० वाभळलेलें जें भात ती.

**वाभळणें**, कों० भात अतिशयित माजल्यामुळें वर कणरहित पांढऱ्या कणशा उत्पन्न व्हाव्या अशा अवस्थेतें पावणें; पक्षीं त्या भूमीसही कर्तृता.

**वाभा**, पु० रा० वाभारा.

**वाभारा**, पु० धस लागणें इ० कारणामुळें वस्त्राचा निघतो जो फाळा तो.

**वाम**, ३ लिं० डावा जो हस्त, पाद, इ० तो, वामबाहु, वामहस्त, वामांग, इ० समास०.

**वामकुक्षि**, स्त्री० दिवसास भोजनोत्तर अन्न परिणाम चांगला व्हावा म्हणून प्रा० डाव्या अंगावर आडवें पडून कांहीं काल करितात जी स्थिति ती; कों० कोणकानें वामकुक्षि होणें, त्य० वामकुक्षि करणें.

**वामन**, ३ लिं० शरीरानें जो ठेंगणा तो प्रा० मनुष्याविषयीं प्र०; २, पु० ईश्वराचे दशावतारांतील पांचवा जो अवतार तो; ३, वामनद्वादशीचे दिवशीं भोजनार्थ बलावितात जो बटु तो.

**वामनजयंती**, स्त्री० भाद्रपदशुद्ध द्वादशी.

**वामनद्वादशी**, स्त्री॰ वामनजयंती.

**वामनमूर्ति**, स्त्री॰ शरीरानें जो ठेंगणा त्यास म्ह॰.

**वाममार्ग**, पु॰ मंत्रशास्त्रोक्त देवताराधनाचा एक मार्ग आहे.

**वाममार्गी**, ३ लिं॰ वाममार्गानें देवतेचें उपासन करणारा जो मनुष्य तो.

**वामळ**, स्त्री॰ आभाळें यावीं त्यामुळें नीटऊन पडूं नये कांहीं गारोंडा पडावा अशी जी एकाद्या दिवशीं कालावस्था होत्ये ती.

**वामांग**, न॰ प्रसंगविशेषीं वायकोस दाटल्याचें वामांग असें म्ह॰.

**वामाळ**, स्त्री॰ वामळ.

**वामी**, ३ लिं॰ वाममार्गी.

**वायकळ**, ३ लिं॰ जामध्यें अमेस धरायाजोगा अंश नाहीं असें जें भाषणादि तो.

**वायकळणें**, वायचळणें.

**वांयंगणा**, ३ लिं॰ रा॰ उन्हाळ्यांत पिकतें जें भात, तांदूळ, इ॰ तो.

**वांयंगणें**, न॰ रा॰ उन्हाळ्यांत पिकायाचें जें भात तें.

**वायगमन**, न॰ रा॰ एक पोटामध्यें रोग उत्पन्न होत असतो तें.

**वांयंगी**, स्त्री॰ कों॰ वांगी.

**वांयंगीभात**, पु॰ कों॰ वांगींभात.

**वांयंगें**, न॰ वांगें.

**वांयंगेंभात**, पु॰ रा॰ वांगींभात.

**वायगोळा**, पु॰ पोटाची केवळ रिक्तता इ॰ कारणामुळें पोटांत जो गोलाकार वायु उचलतो तो.

**वायचळ**, पु॰ कों॰ वायु झाल्यामुळें कोणेकानें मनस्वी बडबडूं लागावें असा जो त्यास चळ सुटतो तो.

**वायचळणें**, कों॰ शोक, दुःख, भय, इ॰ कारणामुळें भाषणादि व्यवहारीं उपयुक्त जें पूर्वापरानुसंधान तद्रहित होऊन वेड्या सारिखें होणें.

**वांयंडा**, ३ लिं॰ रा॰ बांवडा.

**वायदा**, पु॰ मी तुला अमुक देईन, तुझें अमुक काम करीन, इ॰ रूप जें कोणेक गोष्टीविषयीं दुसऱ्याशीं नियम वचन करितात तो, परंतु देणें, घेणें, इ॰ व्यवहारीं कालावधिविषयीं जर नियम कर्तव्य आहे तर विशेषें करून प्रयोग; कोणेकानें वायद्यावर येणें, सरणें, इ॰ स्थलीं आपल्या गुणावर येणें.

**वायदेचिटी**, **वायदेचिठी**, **वायदेचिठ्ठी**, स्त्री॰ देण्या घेण्याचे व्यवहारामध्यें मूळचे मुदतीस अंतर पडल्यास पुनः दुसरी मुदत ठरवून जी चिटी लिहून देतात ती.

**वायदेरोखा**, पु॰ वायदेचिटी.

**वायधूळ**, स्त्री॰ वायूचे मंडलाकार भ्रमणामुळें जी तदाकार धूळ उडत्ये ती.

**वायन**, न॰ सं॰ वाण प्रथमार्थी; २, रा॰ वाईन.

**वायबार**, पु॰ आंत गोळा इ॰ न घालितां जो नुसता दारू घालून तोफ इ॰ कांचा बार काढितात तो.

**वायला**, ३ लिं॰ वेगळा, शूद्र भाषावृत्ति.

**वायवर्णा**, पु॰ औषधोपयोगी एक झाड आहे.

**वायवी**, स्त्री॰ पश्चिमेची आणि उत्तर या दोहों दिशांचे मधली जी दिशा ती.

**वायव्य**, स्त्री॰ वायवी शब्दाचा अपभ्रंश.

**वायस**, पु॰ सं॰ कावळा.

**वायसपिंड**, पु॰ उत्तर क्रियेंत दशपिंडाचेदिवशीं काकव्यांनें भक्षावयाकरितां एक पिंड करीत असतात तो.

**वाँयँसा**, २ लिं॰ इवल्लासा; २, अ॰ अंमळसा.

**वायु**, पु॰ रूपरहित असून ज्याचा स्पर्श होतो असें पंचमहाभूतांतील एकभूत आहे, तोच स्थानोपाधिभेदेंकरून प्राणापानादि संज्ञा पावतो; २, त्याचाच अंश दोषरूपी शरीरांत असतो तो; ३, त्याचे क्षोभानें होत्ये जी विकृति तो.

**वायुबद्ध**, ३ लिं॰ वातबद्ध.

**वार**, स्त्री॰ जरायु म्हणून जें गर्भवेष्टन ती; २, कों॰ भात भरडलें असतां त्याचे निमेनिम करडे तांदूळ होऊन जी कांहीं अधिक वाढ येत्ये ती; ३, पु॰ तरवार इ॰ शस्त्राचे प्रहारानें शरीरावर होतो जो छेद तो; ४, सूर्योदयापासून सूर्योदयपर्यंत अहोरात्रात्मक जे दिवस ते प्र॰ ज्यांस आदित्य, सोम, मंगळ, इ॰ सप्तग्रहांचे नामाच्या संज्ञा अनुक्रमानें चालतात; स्त्री या अर्थाचे वाचक जे युवती, अंगना, वधू, इ॰ संस्कृत शब्द त्यांचा एतच्छब्दपूर्वक समास झाला असतां वेश्येचीं नांवें होतात; उ॰ वारयुवती, वारवधू, इ॰ समास॰; ५, कोणेक भिक्षुक इ॰ कांची एकाचेच घरीं भोजनाची सोई होत नाहीं म्हणून अनेकांचे घरीं भोजनाविषयीं नियमित केलेला असतो जो एकेक दिवस तो प्र॰; ६, अ॰ वेळां, प्रा॰ संस्कृत शब्दांपुढें योग होतो; उ॰ आम्ही एकवार भोजन करितों आणि त्रिवार स्नान करितों; ७, तो तो अर्थ आहे ज्यामध्यें या अर्थी, उमेद, नफा, सारफा, इ॰ कितीएक शब्दांपुढें तसेंच त्या त्या अर्थानें धरून इ॰ अर्थी बयाद, तपशील, नावनिशी, इ॰ कितीएक शब्दांपुढें याचा योग होतो; उ॰ उमेदवार, बयादवार, इ॰

**वारकरी**, पु॰ दुसऱ्याचे घरीं भोजनास जावयाचा वार ज्याणें लाविला आहे तो; २, पंढरपूर इ॰ महास्थानचे वारीचा नियम ज्याणें धरिला असतो तो.

**वारंग**, पु॰ कों॰ विळा, कोयती, सुरी, इ॰ कितीएक शस्त्रांचा मुठींत अडकवायाचा तीं घडत्ये समयींच त्यांचे मागें जो निमोळता बारीक अवयव राखिला असतो तो.

**वारगीपारगीनें**, अ॰ पारगीवारगीनें.

**वारगोळेँ**, न॰ रा॰ नांगर, गाडी, इ॰ वहायाकरितां बैल, टोणगा, इ॰ कांची जोडी असावी तीनसून एकच बैल, किं॰ टोणगा, आपले पदरीं आहे तर दुसऱ्याचा बैल, किं॰ टोणगा इ॰ पाहून त्या जोत इ॰ कानें काम उभयतांचें पाळीपाळीनें करावें अशा संकेतानें आपला आणि दुसऱ्याचा जो बैल, इ॰ त्यांची परस्पर करितात जी योजना तें.

**वारचा**, अ॰ विवक्षित कर्मादिकाचे ठायीं जो विवक्षित असावा तदभावीं तत्स्थानीं; उ॰ मला न फावलें तर माझे वारचा मुलगा येईल बरें.

**वारण**, न॰ कोणेक कर्माविषयीं प्रवृत्त जो कोणीएक त्यास त्या कर्मापासून मागें फिरविण्याचा जो व्यापार तें; आणि तेणेंकरून त्याची होत्ये जी परावृत्ति तें; २, पु॰ सं॰ हस्ती.

**वारणेँ**, निवारणें; २, हस्तादिकेंकरून मक्षिका हाकणें; ३, ऋण फेडणें; ४, मनुष्यानें मरणें या अर्थी संकेतानें प्र॰; ५, मोरचेल, चंवरी, इ॰ देवता, राजा इ॰ कांवर

इ॰ कांवर धरून हालविणें.

**वारवणें**, धान्यादिक सूप इ॰ पात्रांत घेऊन आंतील भुसकट, फोल, इ॰ हलका अंश वाऱ्यानें उडून जाई असें उंचून ओतीत ओतीत वाऱ्याशीं संबद्ध करणें.

**वारवा**, पु॰ कों॰ घेवडा.

**वारंवार**, अ॰ पुनःपुनः

**वारसा**, पु॰ स्थावरादि द्रव्यावर जो कोणेकाचा स्वत्व संबंध असतो तो.

**वारसेदार**, ३ लिं॰ वारिसदार.

**वारा**, पु॰ वायु प्रा॰ प्रथमार्थी; वाऱ्यावर सरणें त्य॰ मनुष्यादिकानें बेताल वागूं लागणें, किं॰ कांहींएक प्रकरणीं भाषण करित असतां त्या भाषणांत आपलें अनिष्ट असें जाणून प्रकारांतरचें भाषण बोलूं लागणें; वांसरूं इ॰ कानें वारा घेणें, पिणें, इ॰ स्थलीं, त्याणें मोकळें सुटल्यामुळें मनस्वी धावूं लागावें अशा रीतीचा वायुसंबंधानें युक्त होणें; कांहींएक वाऱ्यावर टाकणें, इ॰ स्थलीं संरक्षणार्थ कोणेकाचे स्वाधीन न करितां नसेंच मोकळें सोडणें; त्य॰ वाऱ्यावरवरात आणि दर्यावर हवाला; धान्यादिक वाऱ्यास देणें त्य॰ वारविणें; कोणेकानें कोणेकाचा वारा न घेणें, न पडूं देणें, इ॰ स्थलीं त्याचा दर्शनादि संबंधही न करणें: वारा वाहील तसें करणें, इ॰ स्थलीं समयीं जसा डोल दिसेल तसें वर्तणें; कोणेकानें वाऱ्याबरोबर भांडणें, त्य॰ त्याणें सर्वदा सर्वोबरोबर भांडत असावें अशा स्वभावाचा असणें.

**वारांगना**, स्त्री॰ वेश्या.

**वारांगुळे**, पु॰ कांहींएक धान्यादि पदार्थांचा आटोप न झाल्यामुळें उडवा उडव व्हावया जोगी जी अव्यवस्था ते.

**वाराणसी**, स्त्री॰ काशीक्षेत्र.

**वारापाणी**, न॰ आपल्यास प्रतिबंधक जें कर्ज, जामीनगत, इ॰ स्वटलें त्याची जिकडील तिकडे भांजाभांज करून जी निःशेषता तें; २, आगसमाय जो दोष, लवांड, इ॰ कांहीं त्यास युक्तिप्रयुक्तीनें अनेक निमित्तें योजून विभागशः विभागशः उडवून त्यांत कांहीं नाहीं असा जो त्याचा परिणाम करितात तें.

**वारावणें**, वारवणें; २, आर्द्र जो वस्त्र, काष्ठ, इ॰ पदार्थ त्याणें वायु संबंधानें कांहींसें हडकणें.

**वारावार**, स्त्री॰ कुणकरी, सर्कार, देवना, इ॰ कांचें जें देणें, घेणें, इ॰ स्वटलें उरकायाचें असतें तें जिकडील तिकडे देऊन, घेऊन, तोडून, टाकण्याचा जो व्यापार ती.

**वारासार**, स्त्री॰ गृहादिकांत पडलेला जो पात्रादिकांचा पसारा तो व्यवस्थेनें जिकडल्या तिकडे ठेवण्याचा व्यापार ती; २, वारंवार.

**वारित**, ३ लिं॰ वारण केलें जावें तो.

**वारिसदार**, पु॰ ज्या स्थलादि पदार्थावर ज्याचा वारसा आहे तो त्या स्थलादिकांचा.

**वारी**, स्त्री॰ खंडोबाचे नावानें जी भिक्षा मागतात ती; २, पंढरी, मोरेश्वर, इ॰ क्षेत्रीं प्रतिमासीं एकादशी चतुर्थी इ॰ दिवशीं, किं॰ प्रतिवर्षी यात्रेचे दिवशीं स्वग्रामाहून जाऊन यात्रा करून यावें, असा जो त्या त्या देवाचे भक्तानें धरिला असतो नियम ती.

**वारीं**, अ॰ कोणेक कर्माविषयीं कोणेक अर्थास असल्ये जी करणता तीचें वाचक हें अव्यय, तत्तत्करण वाचक शब्दांपुढें याचा प्र॰ होतो परंतु ती करणता प्रा॰ निमित्त कारणतारूप असावी; उ॰ चोर आला तर त्याला

त्याला आमचे परचा बायका केरसुणी वारीं मारती-ल;२,कोणेकाशीं तुल्य योग्यतेनें मानणें,खरचणें इ०कांचें वि०;उ० मला तो तृणावारीं मोजतो;अशा कामाला पाण्यावारीं पैका खरचला पाहिजे;३, कोणेक अर्थाचें स्वकीयजें नामरूप जें गौण पडून अर्थांतराचें नामरूप व्यवहारीं पुढें होई अशा प्र-कारें त्या अर्थानें खरचणें,जाणे,येणें,इ०कांचें वि०; उ०मी बोललों तें मस्करीवारीं घालविलें;पांटी-भर आंबे आणिले तितकेही प्रसादावारीं गे-ले.

**वारीस**,पु०वारिसदार.

**वारीस**,अ० येणें याचायोगीं प्र० अर्थ;कोणेक अर्था-चे कूतजे इतर विभागी त्यांचे विभागावरून तोअ-र्थ कांहीं उर्वरित होऊन आपले वाट्यास येणें;उ० आज बाजारांत आंबे पुष्कळ आले होते परंतु सा-रे लोकांनीं घेतले माझे वारीस आले नाहींत.

**वारू**,पु०घोडा,लोकव्यवहारीं प्रा०स्तुतिविषय अस-तां प्र०करितात.

**वारूळ**,न०को०भोम;२,एकव्रणरोग आहे;३,वा-ळा प्रथमार्थी.

**वारें**,न०गतिमान्जो वायुतें;कोणेकाचे शरीरावयवावरू-न वारें जाणें त्य० वायुविकृतीनें तो तो अवयव ल-टका पडणें;२,कोणेकाचे अंगीं कोणेक देवतेचें खेळत असतें जें अज्ञान:स्वरूप तें;३,ला० को-णेकाचे अंगीं विद्या,कला,किं० सर्कारी अधिका-र,इ०कांचें प्रवृत्तिप्रयोजक वागत असतें जें स्व-रूप तें;उ० तुमचे अंगीं कारकुनीचें वारें आहे,म्ह-णून हिशेब देण्यास भिणार नाहीं,म्हणतां आ-म्ही भटांनीं काय करावयाचें आहे;४,बरें,वाईट इ०होण्यास कारणभूत जे देशकालादि सामान्य कारणाचे स्वरूपभेद ते प्र०;उ० पहिलें विघ्याम-पांचखंडी भात पिकत होतें तें वारें आतां गेलें हो.

**वारेमाप**,न० कोणेक प्रमेयाचें अटकळीनें केलें जें प्र-माण त्यास वास्तविक प्रमाणाशीं फारच अंतर अ-सतां त्य०;२,३लिं०जास ताळतंत नाहीं अशा ज्ञा गोष्टी,भाषण,इ०तो.

**वारेळूं**,न०रा०वाळा प्रथमार्थी.

**वार्ता**,स्त्री०अमुकस्थलीं अमुक झालें,अमुक दिवशीं अमुक होणार.अमुकस्थलीं अमुक होतें आहे. इ०रूप जो कोणेक व्यवहार त्याची वाचक जी गो-ष्ट ती;कोणेकस्थलीं कोणेक अर्थाची वार्ताही नस-णें,त्य०त्या अर्थाचा सुतराम् अभाव असणें अ-सा अर्थ.

**वार्धक्य**,न०सं० वृद्धपणानें.

**वाऱ्याचीमोट**,स्त्री० युक्त्यादिरूप जें एक साधन ते-णेंकरून अनेकांचें विवक्षित कार्यायर्थ आकल-न होण्याविषयीं साहित्यभूत जें त्या अनेकांस कांहींतरी एक बंधारण असावें तें नसल्यामुळें उ-क्तप्रकारें आकलन करण्याची दुःशकता वर्णाया-चे प्रसंगीं त्या अनेकात्मक अर्थास त्य०;उ० मंड-ळी म्हणजे वाऱ्याची मोट एक येतो तों एक जातो, हे सारे मिळतात कधीं आणि आमचें काम हो-णार कधीं.

**वाऱ्याचेंघोडें**.न०गलबताचे गतीस वाताधीनता व-र्णायाचे प्रसंगीं त्या गलबतास त्य०.

**वार्षिक**,३लिं० प्रतिवर्षी कर्तव्य जें उत्साहादि,किं०

प्रति

प्रतिवर्षी द्यावा लागतो जो पिशाचादिकांस बलि इ॰ तो ;२,सं॰ वर्षाकाल संबंधी जो मासादि तो .

**वाल**,पु॰ द्विगुंजात्मक जें प्रमाण तो,क्वचित् तोळ्याच्या चाळिसावा जो भाग त्यास म्ह॰;२,त्या वजनाची वृक्षविशेषाची बी असत्ये तो ;३ ,पावट्यांतील अवांतर भेद एक धान्य आहे .

**वालखिल्य** ,पु॰ अतिसूक्ष्म देहाचे यानावाचे पुराण प्रसिद्ध साठ सहस्र ऋषि आहेत ;२ ,न॰एकत्रमिळालेलीं जीं लहान लहान मुलें ,त्यांस प्रसंग विशेषीं म्ह॰ .

**वालथर** ,३लिं॰ रा॰ कांहीं कारणानें सईल पडलें जें भाषण,लेख,इ॰ तो .

**वालदाणी** , स्त्री॰दे॰ रेतदाणी .

**वालपापडी** , स्त्री॰ घेवड्यांतला एक भेद आहे .

**वाला** , ३लिं॰ जा कोणेक अर्थाचा संबंधिलें करून कोणेक अर्थाचें नाम घेण्याची विवक्षा जेव्हां असत्ये तेव्हां त्या अर्थाचे वाचक शब्दापुढें याचा योग होतो, आणि विशिष्ट शब्द तत्संबंधी अर्थाचें विशेषण होतें; उ॰ पैकेवाला ,दारूवाला ,बंदूकवाला ,बोलणेंवाला, घेणेंवाला ,दोनशेरवाला तांब्या . चाररुपयेवालें पागोटें ;२ ,राजू .

**वालीप**,**वालीफ** , ३लिं॰ ततूंचा बारीकपणा ,निर्बलपणा ,इ॰ कारणा मुळें घटमूट नव्हे असें जें वस्त्र इ॰ तो .

**वालुकायंत्र**,न॰सं॰ कांचेचा पात्रांत वाळू घालून काल साधनार्थ जें यंत्र करितात तें .

**वालोवालनिसंतान** , न॰ रा॰ द्रव्यादि कोणेक पदार्थाचा अंशतः अंशतः अनेक प्रकारें नाश होऊन शेष कांहीं नाहीं असा जो अभाव होतो त्यास म्ह॰ .

**वाँव** , स्त्री॰ न॰ दोन हात पुरतेपणी पसरले असतां जें प्रमाण होत असतें ती तें .

**वाव** ,पु॰ वारा, शूद्र भाषावृत्ति ;२ ,कोणेक आधेयाकडे न रुधल्या मुळें आधेयांतराचा निवेश व्हावया जोगा असतो जो देश कालादिरूप अवकाश तो ;उ॰ या गाडींत पांचव्या माणसाला बसायास वाव नाहीं ;३ ,उपयुक्त निमित्त सांपडल्या मुळें कर्तव्य गोष्टी विषयीं होत्ये जी जागा तो ;उ॰ तुला फावलें तर ये असें तुमचें वचन सांपडलें म्हणजे त्याला घरीं बसायास वाव झाला ;४ ,३लिं॰ ग्रं॰ भाषण , प्रयत्न ,इ॰ कांचे ठायीं जो अभिधेय फल इ॰ रूप तत्वांश असावा तद्रहित जें भाषणादि तो ;उ॰ जरीं अनुकूल नसे दैव तरीं केले उपाव होती वाव.

**वावकळ** ,३लिं॰ वायकळ .

**वावगा** , ३लिं॰ अयोग्यता प्रयोजक जो कोणेक दुर्गुण तेणें करून विशिष्ट जो मनुष्य ,पात्र ,वस्त्र ,इ॰ पदार्थ तो ,किं॰ त्याच्य रीतीस विरुद्ध जें आचरण ,भाषण, इ॰ तो ;२ ,जाचें कांहीं काम नाहीं असा केवळ निरर्थक जो कोणेक अर्थ तो .

**वावझड** , स्त्री॰ रा॰ गृहादिकांत वाऱ्यामुळें पावसाची जी झड येत्ये ती .

**वावझडी** , स्त्री॰ रा॰ अतिशयित वारा,पाऊस, यांचे योगानें शरीरांत भरत्ये जी हुडहुडी ती .

**वावटळ** , स्त्री॰ मंडलाकार भ्रमण पावतो जो मोठा वारा ती ; म्ह॰ वाऱ्यानें आलें आणि वावटळीनें गेलें .

**वावडुंग** , स्त्री॰ एक वन्य झाड आहे ;२ ,न॰ तीचें बीं .

**वावडा**, ३ लिं॰ पावटा, लांक, काळाभोंपळा, इ॰ वातूळ जो पदार्थ तो; २, ला॰ ज्या रोगास अपथ्यभूत जो अर्थ तो त्या रोगास; ३, ज्या व्यवहारादिकांविषयीं प्रतिकूल जो भाषणादि कोणेक अर्थ तो त्या व्यवहारादिकांस; उ॰ तुमचे पंचाइतीस हा एवढा लेख वावडा आहे, वरकड बरेंच आहे.

**वांवंडा**, ३ लिं॰ कोणेक क्रियादिकांचा ज्या क्रमस्थित अर्थावर अनुक्रमानें संबंध होत चालला असतो तो संबंध न होतां त्या क्रियादिकानें अतिक्रमला गेला जो कोणेक अर्थ तो; उ॰ नित्य मला थोडा बहुत पैका मिळतो, एक दिवस कांहीं वांवंडा जात नाहीं.

**वावडिंग**, न॰ वावडंगीचें बीं तें.

**वावडी**, स्त्री॰ खेळायाचे उपयोगी एक कागदाचा पदार्थ करित असतात ज्यास दोर बांधून आकाशांत उडवीत असतात ती; २, वर उभें राहून दाणे वारवाया करितां तिवई सारिखा उंच काष्ठाचा पदार्थ करितात ती; कोणेकाची वावडी करणें, इ॰ स्थलीं फावडी करणें असा अर्थ.

**वावडें**, न॰ शरीरावयव, सांधे, इ॰ धरावे, दुखावे, इ॰ रूप जी मनुष्यादिकांचे शरीरीं वातविकृति होते तें.

**वावदळ**, न॰ दे॰ वादळ.

**वावदूक**, ३ लिं॰ सं॰ फार बोलावें असा स्वभाव ज्याचा तो.

**वावधूळ**, स्त्री॰ वायधूळ.

**वावर**, न॰ शेत, मळा, इ॰ करायाजोगी जी जमीन तीचा विवक्षित मर्यादेनें मानिला जो विभाग तें; २, पु॰ कों॰ झाडणें, सारवणें, भांडीं घांसणें वस्त्र पात्रादि जिकडील तिकडे ठेवणें, इ॰ रूप जो गृहकृत्य संबंधी व्यापार तो; ३, कोणेक स्थलीं कोणेकाचा हें काढ तें ठेव, तें उचल, हें भर, इ॰ रूप चालला असतो जो उद्योग तो; उ॰ दिवा मालिवला म्हणजे घरांत रात्रभर उंदरांचा वावर चालला असतो.

**वावरणें**, घर, शेत, इ॰ कांचे ठायीं करायाचे असतात जे झाडणें, सारवणें, वेणणें, खणणें, इ॰ उद्योग ते करित त्या त्या अधिकरणीं असणें; शेत इ॰ कांत वावरणें, इ॰ स्थलीं शेत इ॰ वावरणें असा प्रयोग होतो.

**वांवसें**, न॰ कों॰ मा॰ तीन कोंपऱ्यांचे मानाचें जें सुंभाचें गुंडाळें करून ठेवित असतात तें; उ॰ दोन वांवशीं सुंभ असलें म्हणजे एका बाजेची वेगमी होते.

**वाहूण**, स्त्री॰ दे॰ वहाण प्रथमार्थीं.

**वाहूणें**, दे॰ वहावणें.

**वांशीक**, न॰ कों॰ गृहादिकांवर वांसे लावून केलेली असते जी रचना तें.

**वाशेरा**, ३ लिं॰ रा॰ वाशेळा.

**वाशेळा**, ३ लिं॰ ज्यास वाईट वास येतो असें जें तूप, ताक, इ॰ तो.

**वास**, पु॰ पुष्पादि पदार्थ निष्ठ बरा, किं॰ वाईट जो गंध तो; कोणेक गोष्टीचा वास आला इ॰ प्रयोग, गोष्ट, इ॰ कांस वास नसतांही कल्पून करितात: ज्याचा द्वेष न्याच तरीं संबंध ज्यास आहे, तो त्याचे वासाचा असा त्या संबंधामुळें त्यास आदरणीयता, वर्जनीयता, इ॰ कोणेक विशेष प्रतिपादन कर्तव्य असतां प्रयोग करितात; २, ला॰ कोणेक अर्थाचा जो लेश तो; उ॰ विहिरींत पाण्याचा वास नाहीं; ३, वसतिस्थान; ४, कोणेक स्थलीं कोणेकाची कांहीं काळ राहून जी स्थिति ती; ५, न॰ वस्त्र.

**वांसकटी**, स्त्री॰ कों॰ लहान जो वांसा ती; निंदावसरीं मोठ्या

मोठ्या वांशासही म्ह०.

**वासट**, ३ लिं० वाशेळा.

**वांसटी**, स्त्री० रा० वांशास निंदावयसरीं म्ह०.

**वासणें**, भिटलेलें जें तोंड, डोळे, तंगड्या, इ० तें पसरणें; कोणेकाचें वासणें, म्ह० दिवाळें निघणें, रोजगार बुडणें, इ० दुर्दशा होणें.

**वासन**, न० कापडाचें दिंड ज्या वस्त्रांत बांधितात तें वस्त्र.

**वासना**, स्त्री० सर्वांचें बरें व्हावें, किं० वाईट व्हावें, किं० इतरांचें कांहीं होऊ, आपलें मात्र बरें व्हावें इ० रूप निरंतर वाटत असण्याविषयीं कारणभूत जे पृथक् पृथक् भिन्न स्वभाव ते म्ह०; उ० वासने सारखें फळ; २, अमुक करावें, अमुक पदार्थ भोगावा, अमुक स्थळीं जावें, अमुक पदार्थ आपल्यास असावा, इ० रूप इच्छेनें परिणाम पावलेली जी अंतःकरण वृत्ति ती; उ० चित्तीं धरिलीं वासना सिद्धी न्यावी नारायणा; वासना फजीत करणें, म्ह० ज्या विषयाची वासना झाली असल्ये त्या विषयाचे ईषन्मात्र उपभोगादिद्वारा ती वासना दूर करणें; ३, शास्त्र व्यवहारादि विषयांच्या अंतःकरणास तत्तदभ्यासामुळें होतो जो संस्कार ती; उ० कांहीं शास्त्राची वासना असली म्हणजे बोलणें गोड पडतें; शास्त्रवासना, गणितवासना, इ० स०.

**वासनी**, ३ लिं० वासन केलेलें जें वस्त्र ती; उ० ह्या वासनी रवारवा घेतां पण टिकणार नाहीं.

**वासर**, उ० सं० वार चतुर्थार्थी.

**वासरूं**, **वांसरूं**, न० गाय, म्हैस, यांचा जो वत्स तें; २, रा० गळवतावर या नामेंकरून एक दोरी असल्ये तें.

**वासलात**, स्त्री० वसूल, खर्च, इ० मांडाया करितां एक प्रकारची रेघ काढितात ती; कोणेक गोष्टीस वासलात लावणें म्ह० तपशील लावणें; उ० त्याजपाशीं शंभर रुपये दिल्हे होते त्यांस कांहीं इकडे वेचले तिकडे खरचले, असें बोलून त्याणें वासलात लावली.

**वासवारा**, उ० रा० कोणेक अर्थाचा ईषन्मात्र तरीं जो अंश तो, निषेधविषयीं प्र०.

**वासळणें**, फळादि पदार्थांनें वास प्रसार व्हावा अशा अवस्थेनें युक्त होणें.

**वांसा**, उ० घरावर आढ्यापासून वळचणीपर्यंत वर ओंवण आस्त रायासाठीं घालितात जीं लांकडें तीं म० तेथें घालायाचे उपयोगी पडाया जोगें लांकूड असून तेथें विनियोग न मतांही म्ह०; २, पाठीचा कणा आणि नाकाचें हाड ते प्र०.

**वासी**, ३ लिं० जो जेथें राहाणारा तो तद्वासी; उ० वैकुंठवासी, कैलासवासी, वनवासी, परदेशवासी.

**वासुदेव**, उ० मयूरपिसांचा टोप डोकीवर घालून भिक्षा मागत असतो अशे संप्रदायाचा एक भिकारी आहे तो.

**वांसोळी**, स्त्री० रा० वांसकटी.

**वास्त**, स्त्री० कोणेक विषय प्रयत्नानें साध्य होईना, किं० साध्य असतांही कांहीं कांहीं त्याजवर दोष दर्शन झालें इ० कारणामुळें औदासिन्य पावून त्या विषयाची अगदी सोडितात जी आस्था ती; सोडणें, टाकणें, इ० धातुयोगीं प्र०; उ० याजकडे माझें कर्ज येणें आहे, पण तो दंडेली करून वादास प्रवृत्त होतो म्हणून मी त्याची वास्त सोडली.

**वास्तपुस्त**, स्त्री० वास्त, किं० तत्पूर्वक प्रयत्न इ० ती; उ० घरीं जाऊन कांहीं बंदोबस्त करावा तो तिकडली वास्तपुस्तच तुह्मी सोडून दिल्ही हें हो काय.

**वास्तव**, ३ लिं॰ सं॰ वास्तविक.

**वास्तविक**, ३ लिं॰ यथार्थ जो अर्थ तो.

**वास्तव्य**, न॰ कोणेकस्थलीं कोणेकाची कांहीं काल राहून जी स्थिति तें.

**वास्ता**, स्त्री॰ वास्त.

**वास्तु**, न॰ स्त्री॰ रहायासाठीं केलें जें गृह तो, तें; वास्तुप्रवेश, वास्तुनिर्माण, वास्तुदेवता, इ॰स॰.

**वास्तुपुरुष**, पु॰ शास्त्रप्रसिद्ध गृहाभिमानिनी एक देवता आहे

**वास्तुशांत**, स्त्री॰ वास्तुशांति शब्दाचा अपभ्रंश.

**वास्तुशांति**, स्त्री॰ नवें घर बांधिलें असतां, किं॰ ओसाड घरांत वसति करायाची असतां जी शांति करित असतात ती.

**वाहक**, ३ लिं॰ पालखी, डोली, रथ, इ॰ कांतें वाहून नेणार जे मनुष्य, अश्व, इ॰ ते प्र॰; शववाहक, भारवाहक, रथवाहक, इ॰स॰.

**वाहणें**, पालखी, रथ, गांठोडें, इ॰ जें कांहीं एक स्थलांतरीं न्यावयाचें ओझें त्यानें नदीच भार आपण संभाळून आपले गतीनें गति विशिष्ट करणें; २, कोणेक पदार्थ, गोष्ट, इ॰ कांचा भार आपणावर घेऊन त्यास पडूं न देतां विवक्षित स्थितींत धरणें; उ॰ शेष पृथ्वीतें आपल्या मस्तकावर वाहतो, त्यासही इतका अभिमान नाहीं, मग तुम्ही लहानसा दगड उचललांत म्हणून अभिमान कशाला वाहतां; ३, शेत, झाड, घोडें, बैल, गाडी, गलबत, इ॰ जीं कृषिकर्मादि व्यवहारांचीं कारकें त्यांतें त्या त्या व्यवहाराचा निर्वाहक आपण होऊन त्या त्या व्यवहारीं चालविणें; ४, पूजार्थ देवतामूर्ति, ब्राह्मण, इ॰ कांचे अंगावर गंध, पुष्प, अक्षता, इ॰ पूजाद्रव्यें उचलून ठेवणें; आण, शपत, इ॰ वाहणें, त्य॰ करणें; ५, कोणेक मनुष्य, किं॰ गोमहिष्यादिपशु, वृक्ष, शेत, देवता, धर्म, इ॰ उद्देशून हें सर्व स्वीं त्यांचें अशा बुद्धीनें लागणें; लेखणी, फागोटें, इ॰ वाहणें, अशा स्थलीं तत्तत्पदार्थ साध्य जें लेखनादि कर्म त्या विषयीं तत्तज्जातीय पदार्थांचा पुनः अंगीकार करायाचा नाहीं अशा बुद्धीनें सोडणें; ६, ला॰ कोणेक मनुष्य, पदार्थ, इ॰ कोणेक व्यवहारादि उद्देशून हा सर्वस्वीं निकडचा, निकडून सुटला तर आपला, अशा बुद्धीनें अर्पिणें; ७, जलादि सद्रव पदार्थ, किं॰ वायु, काल, सेना, बैलांचा तांडा, इ॰ याणीं अनुक्रमें पुढचा अवयव पुढें ढकलिला म्हणजे मागचे अवयवानें तेथें येत असावें अशा प्रकारें उत्तरोत्तर चालत असें करणें; एथें पक्षीं नदी, भांडें, गळूं, नाक, दिशा, मार्ग, वाट, इ॰ जीं जलादिकांचीं अधिकरणें, त्यांसही कर्तृता घेत्ये; ८, वहाणें; ९, शस्त्र, हात, गाडा, नांगर, इ॰ कांनीं तोडणें, टेणें, मारणें, मार्ग अतिक्रमणें, नांगरणें, इ॰ स्वस्वयोग्य व्यापारीं चालणें; कोणेकानें वाहत्ये गंगेंत हात धुणें त्य॰ आपला कांहीं तोटा नहोतां, यजमान इ॰ कांवर अधिक ओझें न पडतां, जर कांहीं परोपकार इ॰ पुण्य घडतें आहे तर तें मन पाळून करणें; उ॰ श्रीमंतानीं तुम्हाला धर्मार्थ खर्चेल तितकें मजुरां देऊं असें सांगितलें आहे, मग वाहत्ये गंगेंत हात धुवायला तुमचें काय जातें, किं॰ चालते काळांत दानधर्मादि सत्कर्म काय घडेल तें करून घेणें.

**वाहतीकूस**, स्त्री॰ जिला मुलें होऊं लागलीं अशी जी स्त्री तिचे कुशीस म्ह॰; उ॰ एकदां वाहती कूस झाली म्हणजे पाहिजे तितकीं मुलें होतील.

**वाहन**, न॰ सं॰ रथ, शिबिका, अश्व, इ॰ जीं यानें तीं प्र॰; गरुडवाहन, नरवाहन, इ॰ स॰; २, उखळास त्य॰.

**वाहवा**, अ॰ जसा असा असावा तसा, अतिशयित चांगला, जो कोणेक विषय त्याचे साक्षात्कारानें होतो जो अंतःकरणांत विकास ह्मणण्याजोगा आनंद त्याचा बाह्य उद्गार निघतो; २, स्त्री॰ कोणेकाच्या विद्या कलादिरूप उत्कृष्ट गुण तो लोकांस अनुभूत झाल्यामुळें त्याची वाहवा एतदुद्गार प्रधान लोकांचे मुखें होते जी प्रशंसा तीस, किं॰ कोणेकास दुसऱ्यापासून मिळते जो वाहवा इ॰ प्रशंसाशब्द त्यास त्य॰

**वाहीत**, ३ लिं॰ दे॰ वर्षाचे वर्षास राबती जी मळा, बावर, शेत, इ॰ जमीन तो.

**वाहीम**, न॰ कों॰ गाडा, रहाट, नांगर, इ॰ वाहण्याचे उपयोगी जे दोणगा, बैल, इ॰ तें.

**वाहील**, न॰ वांझा जो नारळ तें; २, स्त्री॰ शेत इ॰ करावयाचे जमीनीस नांगरण्याचे खेपे गणीक होतो जो कर्षण संस्कार ती; घालणें इ॰ कांचे योगी प्र॰.

**वाळ**, स्त्री॰ रुपया इ॰ नाण्यास त्याचा कांहीं दोष प्रकट झाल्यामुळें त्याची व्यवहारांत चलन मोडावी असें येतें जें, हीनत्व ती; २, रा॰ वाळीत, याचा प्रयोग प्रथमांत नाहीं; उ॰ तो गृहस्थ त्या दोषामुळें वाळींत राहिला.

**वाळका**, ३ लिं॰ रोगादिकामुळें कृश झालेला जो मनुष्य, किं॰ तदवयव तो.

**वाळकी**, स्त्री॰ वाळकाचा वेल ती.

**वाळकुंजा**, ३ लिं॰ वाळका.

**वाळकुडा**, ३ लिं॰ कों॰ वाळका.

**वाळगणें**, खीर, दूध, भाजी, इ॰ करपट घाण यावया जोगें करपणें.

**वाळणें**, बहिरूल जलादिकानें भिजल्यामुळें, किं॰ आंतील रस, रक्त यांचे योगानें आर्द्र जो पदार्थ त्याणें अग्नि, वायु, सूर्य किरण, रोग, इ॰ कांचा योगानें आर्द्रता रहित होणें; २, खिळा इ॰ दृढ बसावा ह्मणून विवक्षित अंगास वळविणें.

**वाळंबा**, पु॰ रा॰ चांचड ह्मणून मुंगळ्या सारिखा एक प्राणी आहे; २. वाळवीचा जो प्राणी तो.

**वाळवंट**, न॰ नदी, समुद्र, ओढा, यांचे पाण्या बाहेर जी वालुकामय भूमि असते तें.

**वाळवट**, न॰ कों॰ वाळवंट; २, ३ लिं॰ जा स्थली वाळू बहुत आहे, अशी जी जागा तीचें वि॰; उ॰ वाळवट जमीनीचे माड भले जोरदार होतात.

**वाळवण**, न॰ धान्यादि उष्णांत वाळत घातलें असतां वाळल्यामुळें पूर्व प्रमाणापेक्षां कमी होतो जो त्याचा अंश तें; आणें धातूचे योगी प्र॰; २, वाळायासाठीं उष्णादिकांत पसरून ठेवलेलें जें धान्य, पापड, सांडगे, पळवा, इ॰ तें.

**वाळवन**, स्त्री॰ कों॰ केळीचें वाळलेलें जें पान, चिरटा, ती.

**वाळवी**, स्त्री॰ वस्त्र काष्ठादिकांस खाऊन नाश करणारी अशी एक क्षुद्र जीवजाति आहे; २, रा॰ तद्रूप जो काष्ठ, वस्त्र, इ॰ कांस रोग लागतो ती; ३, उत्तरोत्तर क्षीणता येण्यास कारणभूत जें शरीरास रोग, चिंता, इ॰ किं॰ राज्यादिकांस शत्रु संबंधादि जडतें त्यास त्य॰ लागणें धातुयोगीं प्र॰.

**वाळवेणें**, रा॰ काष्ठ, वस्त्र, इ॰ कानें वाळवीचे विकारानें विशिष्ट होणें.

**वाळा**, पु॰ सुगंधि मूळाचें तृण आहे; तो, किं॰ त्याचा सुव्या तो; २, पायांत, किं॰ हातांत घालावयाचें वलयाकार गोल एक भूषण आहे तो, किं॰ पायांत अडकवायाचे जे वलयाकार बिडीस अवयव असतात ते स॰; किं॰ कांहीं कारणास्तव पायांत घालायाचें जें लोहादिकाचें वलय असतें तोय, तांव्या, चंबू, इ॰पात्राचे बुडीं जें वलय बसविलें असतें तो; ३, कीं॰ एक जिवाणू आहे; ४, रा॰ खोबऱ्याचे वाटीची कड सभोंवती कापली असतां निघतो जो वलयाकार तुकडा तो, किं॰ अशा तुकड्यांचे अनेक खंडांचा जो समुदाय तो.

**वाळी**, स्त्री॰ कान, नाक, इ॰ कांत घालायाकरितां सोनें, रुपें, इ॰कांचे सुतार्चे जें वलय करितात ती.

**वाळीन**, न॰ कोणी व्यभिचारादिक दुष्कर्म केलेलें प्रकट झालें असतां स्वजातीय मिळून त्यास घालितात जो बहिष्कार तें; २, ३लिं॰ कीं॰ व्यभिचारादि दोषामुळें जाति बहिष्कृत केला जो तो.

**वाळींत**, न॰ ग॰ वाळीत प्रथमार्थी.

**वाळू**, स्त्री॰ नदी, समुद्र, इ॰ कांचें तीर इ॰स्थलीं असतो असा केवळ स्निग्धता रहित एक मृत्तिकाविशेष आहे; २, वाळवंटांतील बारीक बारीक खड्यांचा जो समुदाय ती; ३, वाळवी.

**वाळूक**, न॰ शिंव्या सारिखें एक फळ आहे तें व त्याचा जो वेल तें; २, अवाळू.

**वि**, अ॰ हा उपसर्ग आहे, हा कोणेक शब्दाचे मागें लागतो तथें विशेषेंकरून, किं॰ विगत, विरुद्ध, इ॰अर्थाचा द्योतक होतो. क्वचित् निरर्थकपणें ही असतो.

**विकणें**, कांहीं एक पदार्थाचें मूल्य घेऊन तो पदार्थ जाणें मोल दिलें त्याचा करणें; तो त्याचा विकलेला आहे, इ॰स्थलीं अनेक उपकारामुळें ओशाळा आहे असा अर्थ; एथें तुमचें शहाणपण विकणार नाहीं इ॰स्थलीं शहाणपण चालणार नाहीं असा अर्थ.

**विकत**, अ॰ विक्रयरूप व्यापारानें घेणें, देणें, आणणें, इ॰कांचें वि॰; विकत कज्जा, विकत खोकला, इ॰ घेणें इ॰स्थलीं उगेंच एखादें लचांड बळेंच गळ्यांत घेणें.

**विकता**, अ॰ विकत.

**विकतेकरी**, ३लिं॰ रा॰ जो शेतभात करीत नाहीं, धान्यादि विकत घेऊन प्रपंच निर्वाह करितो, तो.

**विकरा**, पु॰ कांहीं एक पदार्थ विकण्याचा जो व्यापार तो; २, त्या व्यापारानें त्या पदार्थाचा होतो जो विकलेपणा तो.

**विकराल, विकराळ**, ३लिं॰ ज्याचें स्वरूपादि भयंकर वाटतें तो.

**विकरी**, स्त्री॰ विकरा; २, त्याणें लभ्य जें द्रव्य त्यासही त्य॰,

**विकल**, ३लिं॰ जो हस्त पादाद्यवयव वाय्वादि विकृतीनें, किं॰ मोडल्यामुळें अपूर्ण झाला तो; २, तद्विशिष्ट जो मनुष्यादि तो; ३, ला॰ विवक्षित साधनादि जें अवश्य असावें, तदभाव झाल्यामुळें हीनदशा पावला जो व्यवहारादि तो.

**विकला**, स्त्री॰ सं॰ मेषादि राशींचे जे अंश त्यांचे कलेचा जो साठावा अंश ती.

**विकलांग**, ३लिं॰ विकल आहे अंग ज्याचें तो.

**विकल्प**, पु॰ कांहीं एका शास्त्रार्थादि विषयीं जें संशय असतें तो; २, कोणा एका विषयीं जी कोणा एकाचे मनांत विरुद्ध कल्पना आली ती; ३, कांहीं एक

कार्याविषयीं

कार्याविषयीं नानाप्रकारच्या कल्पना मनांत येतात त्या स॰.

**विकसन**, न॰सं॰ विकसित होण्याचा जो व्यापार तें.

**विकसित**, ३ लिं॰ प्रफुल्लित जें पुष्पादि तें.

**विकळ**, ३ लिं॰ विकल.

**विकळणें**, कों॰ पित्तक्षोभादिकारणामुळें कोणेकानें मनस्वी बडबड करूं लागणें; उ॰ तो त्यानातर आलिकडे विकळला त्या बरोबर तुम्ही कशास बोलतां.

**विकळा**, स्त्री॰ विकला.

**विकाऊ**, ३ लिं॰ विकण्याचे उद्देशानें ठेविला जो पदार्थ तो.

**विकार**, पु॰ कोणेकास कामादिकांचा, किं॰ रोगादिकांचा होतो जो उपद्रव तो, २, कांहींएक कारणानें पदार्थ मात्राची पूर्वप्रकृति पालटायाजोगें होतें जें रूपांतर तें, किं॰ रूपांतरहोण्यास जो मध्यें कांहीं व्यापार होतो तो; उ॰ दहीं हा दुधाचा विकार; ३ ज्या उपादानकारणापासून जो पदार्थ उत्पन्न झाला तो पदार्थ त्याचा; उ॰ सुवर्णाचा विकार अलंकार; मृत्तिकेचा विकार घट, क्रोधविकार, कामविकार, मनोविकार, मृद्विकार. इ॰ समास.

**विकारी**, पु॰ तेहतिसावा जो संवत्सर तो; २, ३ लिं॰ विकार झाला, किं॰ होतो ज्यास तो.

**विकास**, पु॰ विकसितपणा.

**विकासणें**, विकसित होणें.

**विकासित**, ३ लिं॰ विकसित.

**विकृत**, ३ लिं॰ विकार पावला जो पदार्थ तो; २, स्त्री॰ विकृति शब्दाचा अपभ्रंश; ३. विकृती हिताचार्थी.

**विकृति**, स्त्री॰ विकार; २, चोविसावा संवत्सर.

**विकृती**, ३ लिं॰ कों॰ विकृत येतलेला जो पदार्थ तो; २, स्त्री॰ दे॰ कांहीं कारणानें कोणेक भोग्य पदार्थाचा येतो जो तिटकारा ती.

**विकोपास**, अ॰ जाणें याचायोगीं प्रअ॰ कज्जा, रोग, इ॰ कांहीं अपथ्यादि विरुद्धोपचार पोंचल्यामुळें अतिशयित विषमदशा पावणें.

**विक्रम**, पु॰ एक शककर्ता प्रसिद्ध राजा झाला होता ज्याचा शक नर्मदेचा उत्तर तीरीं अद्यापि चालत आहे; २, सं॰ पराक्रम; ३, चवदावा जो संवत्सर तो.

**विक्रय**, पु॰ सं॰ विकरा.

**विक्रीत**, ३ लिं॰ सं॰ विकला जो पदार्थ तो.

**विक्रेय**, ३ लिं॰ सं॰ विकाऊ.

**विखंड**, न॰ कों॰ विळा, खोरें, कुदळ, इ॰ जीं आउतें तीं प्र॰.

**विखम**, ३ लिं॰ रा॰ विषम परंतु संख्येविषयीं प्र॰.

**विखमोगरी**, स्त्री॰ एक लता आहे.

**विखरणें**, कों॰ धान्य, केश, कागद, इ॰ पदार्थ अस्ताव्यस्त पसरणें.

**विखरा**, पु॰ पदार्थाची विखरण्यानें जी अवस्था होते ती.

**विखार**, पु॰ सर्पादिकांचे ठायीं जो विषांश असतो तो; २, त्याचा होतो जो कोणेकास उपद्रव तो; ३, पं॰ सर्पासही त्य॰.

**विखारणें**, कोणेकानें सर्पादि विखाराचा उपद्रवानें युक्त होणें.

**विखारा**, **विखारी**, ३ लिं॰ ज्या सर्पादिकांस विष आहे तो सर्पादि.

**विखुरणें**, विखरणें.

विखोपास

**विखोपास, विखोप्यास**, अ॰ जाणें याचाबोगीं प्र॰. अर्थ; विकोपासजाणें.

**विरख**, न॰ विषशब्दाचा अपभ्रंश; २, अतिशयित जो कडूपदार्थ त्यास आरोपानें म्ह॰.

**विरख्यात**, ३ लिं॰ मरख्यात.

**विगत**, ३ लिं॰ नाहींसा झाला जो तो, याचा प्रा॰ समासीं प्र॰; उ॰ विगतैश्वर्य, विगतमत्सर, इ॰.

**विगलित**, ३ लिं॰ गलित जें पुष्पादि तें.

**विंगळ**, पु॰ दे॰ इंगळ.

**विंगळी**, स्त्री॰ दे॰ इंगळी.

**विगुण**, ३ लिं॰ अनुगुण नव्हे तो; २, कांहीं एक गोष्टींतजें कांहींएक विकल असतें तो.

**विग्रह**, पु॰ सं॰ समासादिरूपेंकरून विशिष्ट जें पद त्याचें अवयवार्थ प्रदर्शकजें वाक्य तो; २, देह; ३, युद्ध.

**विघटन**, न॰ सं॰ कांहीं एक सुघटित जो पदार्थ, किं॰ गोष्ट त्याचें अवयव वियोजन द्वाराजें विध्वंसन तें.

**विघटित**, ३ लिं॰ सं॰ विघटन झालें आहे ज्याचें तो.

**विघड**, पु॰ अनेक अवयवांचा योगानें, किं॰ पदार्थांचा योगानें जो गाडा, रहाट, संसार, इ॰ सिद्ध होतो त्यांतील कांहीं पदार्थांचा नाशादि झाल्यामुळें जी मुख्य पदार्थास विकलता प्राप्त होते तो; २, स्त्री, पुरुष, मित्र, इ॰ कांचा जो परस्पर वियोग होतो तो.

**विघडणें**, विघटित करणें.

**विघरणें**, तूप, गूळ, मीठ, साखर, कथील, इ॰ पदार्थ अग्नि, जल, इ॰ कांचे योगानें पातळ होणें.

**विघात**, पु॰ सं॰ हननादिकें करून कोणेकाचा होतो जो नाश तो.

**विघातक**, ३ लिं॰ कांहींएक कार्याचा विघात करणारा जो तो.

**विघुरणें**, विघरणें.

**विघ्न**, पु॰ न॰ कांहींएक कार्यास प्रतिबंधक जें निमित्त, किं॰ त्याची उपस्थिति तो तें.

**विंच**, स्त्री॰ कों॰ जमीन, काष्ट, इ॰ कांस जी फट असते ती.

**विचकट**, ३ लिं॰ बीभत्स जें भाषणादि तो; २, तें करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**विचकटणें, विचकडणें**, विचडणे; २, उचकटणें.

**विचकणें**, वासणें.

**विचका**, पु॰ विचडा प्रथमार्थी

**विचकुरणें**, कोणेकास विचकुऱ्यानें विशिष्ट करणें.

**विचकुरा**, पु॰ हाताचे पंजाचीं नखाग्रें शरीरावरील कांहीं रुतवून त्या नखाचे कवेंत ती त्वचा घट्ट धरून ओटण्याचा व्यापार तो; २, तेणेंकरून होतो जो नखव्रण तो; ३, कों॰ दोहों बोटांनीं घेतात जो चिमटा तो.

**विंचडा**, पु॰ कों॰ मोटा जो विंचू त्यास म्ह॰.

**विंचरणी**, स्त्री॰ कों॰ केशादि विंचराव्याची जी फणी ती.

**विंचरणें**, गुंतलेले केशादिक फणीनें मोकळे करणें.

**विचक्षण**, ३ लिं॰ सं॰ शास्त्रादि ज्ञान पूर्वक जो व्यवहार, चतुर, तो.

**विचक्षणा**, स्त्री॰ सं॰ कोणेक गोष्टीचें परिज्ञान व्हावें म्हणून अवयवशः फोडकरून जी पुरतेपणी चोकशी ती.

**विचार**, पु॰ कोणेक विषयीं हें असें असा एकरूपेंकरून

रून निश्चय होण्याकरितां हें बरें, कीं वाईट, हें करावें कीं न करावें, असें करावें कीं तसें करावें, इ॰ रूप जो अंतःकरण व्यापार होतो तो ;२, तेणेंकरून हें असें इ॰ रूप निश्चयात्मक होत्ये जी कल्पना तो ;३, करावें कोणतें, न करावें कोणतें, इ॰ रूप जी व्यवस्था तत्परिपालनात्मक जी वर्तनास मर्यादा तो; उ॰ लग्नामध्यें सोवळ्या ओवळ्यांचा विचार राहत नाहीं; ४, विचारणा.

**विचारणा**, स्त्री॰ कोणेक गोष्टीचे निर्वाहाची तोड निघेनाशी झाल्यामुळें कसें करावें, काय करावें, करावें कीं न करावें, इ॰ रूप चिंतात्मक जी संकटावस्थाप्राप्त होत्ये ती; २, विचारप्रथमार्थी.

**विचारणीय**, ३ लिं॰ विचारानें आणावयास योग्य जो अर्थ तो; २, प्रष्टव्यरूप जो अर्थ तो.

**विचारणें, विचारणें**, कोणेक गोष्टीविषयीं कोणा एकास प्रश्न करणें; २, द्रव्यादि दानानें, किं॰ मधुर भाषणादिकानें कोणेकाचा परामर्श घेणें; ३, कोणेकास पदार्थ बुध्या गणणें, प्रा॰ निषेधविषयीं प्र॰; उ॰ जेथें इरसाल अंबे आहेत, तेथें असल्या खट्यास कोण विचारतो.

**विचारपूस**, स्त्री॰ कांहीं एक पदार्थाचा शोधार्थ कोणा एकास विचारणें, पुसणें, इ॰ चवकशी करण्याचा जो व्यापार ती; २, आला, गेला, इ॰ कांस कुशल प्रश्नादिक विचारणें, परामर्श घेणें असा जो व्यापार ती.

**विचारवंत, विचारशील**, ३ लिं॰ विचारी.

**विचारी**, ३ लिं॰ सदसद्विचारपूर्वक कांहीं एक कार्य करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**विचित्र**, ३ लिं॰ चित्रविचित्र दिसायाजोगा जो पदार्थ तो; २, दुसऱ्यास आश्चर्यकारक जो मनुष्य, किं॰ भाषण, आचरण इ॰ तो; ३, प्र॰ अनेक प्रकारचा; उ॰ विचित्र अन्नें वाढिलीं पात्रीं.

**विंचुरणें**, विंचरणें

**विंचू**, पु॰ एक क्षुद्र प्राणी आहे, ज्याचे नांगड्यास विष असतें; २, तदाकार सहा तारकांचें जें कृत्तिका नक्षत्र आकाशांत दिसतें त्यास प्र॰; ३, कों॰ पलंग, बाज, इ॰ विणल्ये समयीं त्या दोरीचे पदर सरून येत म्हणून न अडकणासाठीं जो एक दोन गांठी देऊन वीत दीडवीत दोरीचा तुकडा येत असतात तो.

**विचूक**, अ॰ वात पित्तादि क्षोभानें, किं॰ भांग, अफू, इ॰ कांचा कैफ आल्यामुळें पूर्वापर संधान सुटे असें बोलणें, इ॰ कांचें वि॰; २, ३ लिं॰ तादृश जें भाषण इ॰ तो.

**विच्छिन्न**, ३ लिं॰ सं॰ छिन्नभिन्न झाली जी मूर्ति इ॰ ती; २, कांहीं एक कारणानें ज्याचा भंग झाला असा जो कोणेकाचा नियम, किं॰ संसारादि खटलें, किं॰ वृत्ति इ॰ तो.

**विच्छेद**, पु॰ सतत चाललेल्या वृत्ति अनुष्ठानादिकांचा कांहीं निमित्तानें मध्यें होतो जो खंड, किं॰ लोप तो.

**विजणवारा**, पु॰ दे॰ विंझुणवारा

**विजणा**, पु॰ दे॰ विंझुणा.

**विजय**, पु॰ सं॰ युद्धादिकांत जो कोणेकाचा होतो जय तो; २, सत्ताविसावा जो संवत्सर तो; ३, श्रीविष्णूचा एक द्वारपाल आहे, ज्याची काष्ठादिमय मूर्ति करून देवद्वारीं, किं॰ देवाजवळ स्थापित असतात तो.

**विजयादशमी**, स्त्री॰ आश्वीनशुक्लदशमी, जा दिवशीं सीमोल्लंघनादि विधि करीत असतात.

**विजयाभिनंदन**, पु॰ पुढें शास्त्रप्रसिद्ध एक शककर्ता होणार आहे तो.

**विजयी**, ३लिं॰ युद्धादिकांत ज्याचा जय झाला तो.

**विजवटा**, ३लिं॰ हाड गुणाचा जो मनुष्यादि त्यास त्य॰

**विजात**, स्त्री॰ स्व जातीहून इतर जी जाति ती.

**विजात**, ३लिं॰ कों॰ विजवटा.

**विजातीय**, ३लिं॰सं॰ विवक्षित जात्याकांत नव्हे असा जो मनुष्य, रत्न, इ॰ पदार्थ तो; २, लोक विलक्षण जो मनुष्य, किं॰ सामर्थ्य, रत्न, किं॰ कांहींएक व्यापार तो; ३, एक जातीय नव्हेत असे जे अनेक पदार्थ ते परस्पर.

**विजायली**, ३लिं॰ कों॰ रायवळ जें लांकूड तो, किं॰ तन्निर्मित जो पाट, चौकट, इ॰ पदार्थ तो.

**विजार**, स्त्री॰ इजार.

**विजारदार**, ३लिं॰ इजारदार.

**विजारा**, पु॰ इजारा.

**विजितजाणें**, इजितजाणें.

**विजोड**, ३लिं॰ कोणेक जोडास; किं॰ जोडीस अनेक अवयव असतात त्यांतील जो अवयव अल्पत्वमहत्वादिरूप वैलक्षण्या मुळें त्या जोडास, किं॰ जोडीस मिळत नाहीं तो, किं॰ तद्विशिष्ट तो जोड, जोडी तो.

**विझणवारा**, पु॰ विझुणवारा.

**विझणा**, पु॰ विझुणा.

**विझणें**, पेटलेला अग्नि, जाळ, मशाल, चूल, इ॰ कानीं शांत होणें; २, ला॰ प्रवृत्त जो कज्जा, युद्ध, क्रोध, इ॰ त्याणें शांत होणें.

**विझुणवारा**, पु॰ विझणाऱ्यानें घेतात जो वारा तो.

**विझुणा**, पु॰ पंखा.

**विटकर**, स्त्री॰ न॰ इटकर; २, ३लिं॰ विटावचा जोगा जें लुगडें, सुगटा, इ॰ कांचा रंग तो, किं॰ तद्विशिष्ट तें लुगडें इ॰ तो.

**विटकरी**, ३लिं॰ विटकरेच्या रंगा सारखा जो रंग तो. किं॰ तद्विशिष्ट जें वस्त्र इ॰ तो.

**विटणें**, वस्त्रादिकांवरच्या पूर्वींचा जो तांबडा, पिंवळा, इ॰ रंग त्याणें उष्णादिकां मुळें, कांहीं काळानें मलिन होणें, तसीं वस्त्रादिकांसही कर्तृता; २, अन्नादि शिळें झाल्या मुळें त्याणें दुर्गंधीनें विशिष्ट होणें; ३, कोणेक पदार्थांचें बहुत सेवन झाल्या मुळें, किं॰ कोणेक पदार्थांचा सेवन कालीं कांहीं अमंगलादिकांचें दर्शनादि, किं॰ तद्विषयीं कांहीं दोषबुद्धि इ॰ कारणा मुळें तत्पदार्थाचे उपभागाविषयीं कंटाळा पावणें; कोणेकाचें कोणेकाशीं विटणें त्य॰ परस्पर असतें जें सौरस्य तें नाहींसें होणें; त्याणें त्याणें विटणें त्य॰ परस्परानीं सौरस्य रहित होणें.

**विटंबणें**, स॰ विटंबनेनें युक्त करणें.

**विटबेदी**, ३लिं॰ पक्क्या विटानीं बांधिली जी भिंत इ॰ तो.

**विटंबना**, स्त्री॰ नाक, कान, कापणें, धिंड भोंवडणें, छी, थू, करणें, इ॰ रूप जी कोणेकाची लोकांत फटफजीती ती.

**विटा**, पु॰ इटा.

**विटाळ**, पु॰ धर्मशास्त्रांत ज्यास स्पर्श करूं नये म्हणून सांगितलें आहे, असे जे आशौची, रजस्वला, चांडाल

**वेडण**, न॰रा॰ सोन्याचें,किं॰रूप्याचें, हाताचे,किं॰ पायांचे बोटांत घालायाकरितां सरासरी जें वलय करितात तें.

**वेडदुल्ली, वेडधुल्ली**, ३लिं॰ मूर्खत्व द्योतनार्थ कोणेकास निंदेनें म्ह॰.

**वेडपा**, ३लिं॰ वेडगळ.

**वेडसर**, ३लिं॰ कांहींसा जो वेडा तो.

**वेडा**, ३लिं॰ ज्यास वेड लागलें आहे तो, किं॰वेड लागलेल्यासारिखा व्यवहारचातुर्यशून्य जो तो; २, पूर्वापरानुसंधानादि रहित जें भाषण, लेख, इ॰ त्यास म्ह॰

**वेडाऊस, वेडाउस**, पु॰ खुळाऊंस.

**वेडाखुळा**, ३लिं॰ वेडापिसा.

**वेडापिसा**, ३लिं॰ इष्टविरहादि कारणानें वेड्यासारिखा पिशासारिखा झाला जो तो.

**वेडापीर**, पु॰ वेडगळ, छांदिष्ट, असा जो मनुष्य त्यास म्ह॰.

**वेडाबागडा**, ३लिं॰ वेडावांकडा.

**वेडामधुरा**, पु॰ ज्वरामध्यें शीतोपचार झाला असतां ज्वर विकोपास आऊन एक प्रकारचा वायु होत असतो जेणेंकरून वेड लागल्यासारखी प्रकृति होत्ये तो.

**वेडावणें**, कोणेकानें वेडें होणें; २, कोणेकास वेंडावण्या दाखविणें.

**वेडावांकडा**, ३लिं॰ वांकडातिकडा; २, जसें असावें तसेंच नव्हे अंशतः विपरीत, अंशतः मध्यम, अंशतः चांगलें, अशा प्रकारचें जें भाषण, आचरण, इ॰ तो; उ॰ लेंकुरपणा आहे तों वेडें वांकडें बोललें तरी शोभतें.

**वेडाळणें**, खुळावणें.

**वेडीहळद**, स्त्री॰कों॰ वेडदुल्ली याचे अर्थी प्रयोग करितात

**वेडेचार**, पु॰ वेडेवेडेचार.

**वेडेंपीक**, न॰ येऊं लागलें म्हणजे पुष्कळच येतें नाहीं तर कांहींच नाहीं असें जें कितीएक वृक्ष लता शेत यांचें पीक तें; २, ला॰ बळलानर सर्वस्व देईल, जें म्हटलें तें करील, असा जो दाता इ॰ त्यास म्ह॰.

**वेडेवेडेचार**, पु॰ वेड्यासारिखें जें आचरण तें.

**वेढ**, न॰ स्त्री॰ पायांचे बोटांत घालायाकरितां करितात जें रोप्यादिकांचें वलय तें ती; २, कों॰ किल्ला, गृह, कमर, इ॰कांचा जो घेर तो.

**वेढणी**, स्त्री॰दे॰ उडीद इ॰कांचे पिठांत मीठ, तिखट, इ॰ घालून तोंडी लावाया करितां जो धिरड्यासारिखा पदार्थ करितात ती.

**वेढणें**, सूत्र, मनुष्यादिपंक्ति, इ॰कानें कोणेक पदार्थ त्याचा विवक्षित कोणेक परिधि व्याप्त होई असा आवृत करणें; २, घेरणें; ३, रुधणें; वेढून घेणें म्ह॰ स्नान, वस्त्रांतर, इ॰ करावयाचें असतां मध्यें कांहीं काळ लहान सहान वस्त्र नेसणें.

**वेढा**, पु॰ किल्ला, गृह, मनुष्य, इ॰कांचे भोंवता सैन्य, उदक, रज्जु, इ॰कांचा पडतो जो घेर तो; २, काष्ठादि पदार्था भोंवते रज्वादिकांचे फेरे गुंडाळितात ते प्रत्येकीं; ३, कोणेक पदार्थ आपल्या भोंवतां फिरला असतां; किं॰ कोणेका भोंवता

भोंवता मंडलाकार फिरला असतां होतात जे फेरे ते प्र०; या मळसूत्राचे चार वेढे फिरविले असतां बाहेर पडतें; फिरल्या भोंवऱ्याचे वेढे मजता येत नाहींत; रहाटाचा बैल चारवेढे फिरला ह्मणजे दोण भरल्ये,

**वेढें**, न० वळें.

**वेण**, स्त्री० प्रसूतिसमयीं, किं० बहुन आमांश झाला असतां पोटांत कळा येतात त्या प्र०; जांचा निर्गम कुंथून करावा लागतो, प्रा०दे, कर, या धातूंचे योगीं प्र०.

**वेणा**, ३ लिं० कों० असडी जो तांदूळ, कणी, इ० तो.

**वेणी**, स्त्री० मस्तकादिस्थित केश, किं० नाग, आंबाडी, इ० कांचे प्रा० तीन, पांच असे पेढ करून ते परस्पर गुंफून सर्पाद्याकारक जो रचनाविशेष करितात ती.

**वेणु**, पु० सं० वेळू; २, त्याचे काष्ठाचा जो पांवा करितात तो.

**वेत**, पु० चिंच्या सारिखा एक वृक्ष आहे, जाचा तांती काढून खुरशी इ० विणीत असतात तो; २, त्याची करितात जी छडी ती; ३, न० पशवादिकांची विण्याची जी खेप तें.

**वेतन**, न० कोणेकास चाकरीस ठेवून त्या चाकरी संबंधें जें त्यास देयदेतात तें, परंतु पुराणीक, फडणीस, पोतनीस, इ० जे प्रतिष्ठित चाकर त्यांस जें प्रतिवर्षी देतात तद्विषयीं लोकांत विशेष प्रसिद्धि.

**वेतनी**, ३ लिं० वेतन ठरवून ठेविला जो सेवक तो, किं० वेतना ऐवजीं कोणेकास लावून देतात जी ग्रामादिभूमि ती.

**वेंतस**, न० रक्त काढावयाची जी तुंबडी तें.

**वेतसरी**, स्त्री० पलंग विणणें इत्यादर्थ वेत चिरून त्याचा काढितात जो तंतु ती.

**वेताटी**, स्त्री० वेताची जी काठी ती.

**वेताळ**, पु० सर्व पिशाचांचा राजा ह्मणून एक शिवाचा गण आहे; स्म० वेताळ आहे तेथें भूतावळ आहे.

**वेंतूस**, न० कों० वेंतस.

**वेत्ता**, ३ लिं० जाणणारा; वेदवेत्ता, शास्त्रवेत्ता, इ० स०.

**वेत्र**, न० सं० वेताटी; २, छडीदार, चोपदार, इ० जे राजा इ० कांजवळचे अधिकारी त्यांचे हातीं जी काठी असल्ये तें.

**वेत्रधर, वेत्रधारी**, पु० सं० राजादिकांपाशीं जे छडीदार, चोपदार, इ० असतात ते प्र०.

**वेद**, पु० ब्रह्मदेवाचे चोहोंमूखांतून प्रकट झालेले ऋगादि संज्ञक चारग्रंथ आहेत ते प्र०; ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, वेदघोष, वेदपारायण, इ० समास.

**वेदना**, स्त्री० सं० तिडीक, ठणका, इ० रूप जें दुःख ती.

**वेदमूर्ति**, स्त्री० वेदविद्या संपन्न, किं० केवल भिक्षुक वृत्तीनें उपजीवन करणारा जो ब्राह्मण त्याचें नाव कागदोपत्रीं लिहायाचें असतां एतच्छब्द पूर्वक लिहितात.

**वेदशास्त्रसंपन्न**, ३ लिं० शास्त्रपुराणादिवेत्ता प्रतिष्ठित जो ब्राह्मण त्याचें नाव कागदोपत्रीं लिहायाचें

लिहायाचें असतां एतत्शब्दपूर्वक लिहितात.

**वेदांत**, पु॰ न॰ सकल प्रपंचास मिथ्यात्व बोधणून सच्चित्स्वरूप जो ईश्वर त्याचे स्वरूपाचें कथन करणारें असें शास्त्र आहे तो तें; २, सर्व प्रापंचिक विषयांस मिथ्यात्व बोधनाविषयीं जा गोष्टीचें तात्पर्य असतें अशी जी हरिदासादि गोष्ट सांगतात तीस त्म॰.

**वेदांती**, ३ लिं॰ वेदांतशास्त्राचा जाणे अभ्यासकेला आहे, आणि तदनुरूप वर्तणारा जो तो.

**वेदि, वेदी**, स्त्री॰ सं॰ यज्ञ, विवाह, होम, इत्याद्यर्थ ओटा इ॰ घालून नियमित करितात जी भूमि ती.

**वेदोनारायण**, पु॰ वेदविद्या संपन्न ब्राह्मणास स्तुत्यवसरीं त्म॰.

**वेद्य**, ३ लिं॰ जाणायास योग्य जो तो; ज्ञानवेद्य, तर्कवेद्य, मनोवेद्य, इ॰ स॰.

**वेध**, पु॰ शस्त्रादिकानें मौक्तिकादिकांचे आंत तदवयवांतें विसंधित करीत करीत शिरून त्या मौक्तिकादिकांस स्वप्रवेशानें विवक्षित प्रदेशपर्यंत छिद्रविशिष्ट करण्याचा जो व्यापार तो; २, तेणेंकरून त्या मौक्तिकादिकांस होतें जे छिद्र तो; ३, दृष्टि, बाण, गोळी, इ॰ कानीं स्वस्वलक्ष्यावर केलेंजें स्वपात वैशिष्ट्य तो; ४, सूर्यग्रहणाचे पूर्वी चार प्रहर आणि चंद्रग्रहणाचे पूर्वी तीन प्रहर अशी जी धर्मशास्त्रप्रसिद्ध ग्रहणसंबंधी दोषाची व्याप्ति असत्ये तो, जींत भोजनादिविषयीं निषेध सांगितला आहे; ५, जा दिवशीं प्राधान्येंकरून जे तिथिनक्षत्रादि असतें त्यास त्याच दिवशीं प्रातःकाल, सायंकालादिसमयीं असतो जो पूर्वोत्तर तिथिनक्षत्रादिकांचा अंश त्याचा गुण दोष प्रयोजक असतो जो संबंध तो; उ॰ आज मंगळवारीं दशमी दोन घटिका आणि एकादशी पडली सत्तावन्न घटिका तस्मात् या एकादशीस दशमीचा वेध आहे; ६, सप्त शलाकादि चक्राचे ठायीं एक शलाकादिगत जी नक्षत्रादिक असतात त्यांतून एकीकडचे नक्षत्रादिकावर जो कोणी ग्रह असतो त्याचा दुसऱ्याकडचे नक्षत्रादिकावर जो दृष्टिपात असतो तो; ७, कोणेक मनुष्यादिकास स्वतंत्रपणें वर्ततां जा मुळें येत नाहीं असा जो अवश्य निर्वाह्य कोणेक कार्याचा त्याचे पाठीशीं संबंध असतो त्यास त्म॰; उ॰ प्रपंचाचा वेध जाचे पाठीमागें आहे, त्याला खेळ, तमाशे, कोठून सुचतील; ८, तळें, विहीर, इ॰ कांचा जो खोलपणा तो; ९, व्याक्षेप या अर्थीही याचा क्वचित्प्रयोग करितात.

**वेधक**, ३ लिं॰ वेधणारा जो तो.

**वेधणें**, वेधयुक्त करणें.

**वेधन**, न॰ सं॰ वेधण्याचा जो व्यापार तें.

**वेधना**, स्त्री॰ वेदना शब्दाचा अपभ्रंश.

**वेधित**, ३ लिं॰ वेधिला जो तो.

**वेधी**, ३ लिं॰ बाणादिकानें वेधण्याविषयीं जो कुशल तो; लक्ष्यवेधी, शब्दवेधी, इ॰ समासींच प्र॰.

**वेध्य**, ३ लिं॰ वेधायास योग्य जें लक्ष्यादि तो.

**वेरझार, वेरधार**, स्त्री॰ एरझार.

**वेरीं**, अ॰ कों॰ पर्यंत या अर्थी; काल देश वाचक शब्दांपुढें याचा योग होतो; उ॰ आजवेरीं, कालवेरीं, तेथवेरीं, एथवेरीं.

**वेल**, पु॰ स्त्री॰ लता; २, कों॰ नागवेल; ३, कुडूक, काप, इ॰ कर्णभूषणास मौक्तिक विशिष्ट जी सुवर्णाची सांखळी लावितात ती; कोणेकाचा वेल वाढणें. त्म॰ वंश वाढणें.

**वेलची**, स्त्री॰ एलची.

**वेलदोडा**, पु॰ एलदोडा.

**वेलबुटी, वेलबुट्टी**, स्त्री॰ भिंत, कागद, छीट, इ॰ कांवर रंग इ॰ कानें लिहिलेले जे द्राक्षादिकांचे वेल अनेक नन्हांचे जे बूट ती.

**वेलबूट**, पु॰ वेलबुटी.

**वेलबोंड**, न॰ वेलबोंडीचें जें फल तें.

**वेलबोंडी**, स्त्री॰ एक लता आहे.

**वेलमिरची**, स्त्री॰ मिरचींत एक जाति आहे; जीचा शाखा लते सारिख्या असतात ती.

**वेलवांगी**, स्त्री॰ वांगींत एक जाति आहे.

**वेलवांगें**, न॰ वेलवांगीचें जें फल तें.

**वेला**, स्त्री॰ समुद्राचें पाणी पराकाष्ठा येण्याचा जो अवधि प्रदेश ती.

**वेलांटी, वेलांडी**, स्त्री॰ अक्षरास जें इकाराचें चिन्ह करितात ती; उ॰ कला वेलांटी दे, त्मणजे कीहोईल.

**वेल्याकरंज**, पु॰ करंजांत एक जाति आहे, जाचा शाखा वेला सारिख्या लवचीक असतात तो.

**वेल्यैंहळवें**, न॰ साळींत एक जाति आहे.

**वेल्हांटी**, स्त्री॰ कों॰ वेलांटी.

**वेल्हाळ**, पु॰ ग्रं॰ परम प्रीतिपात्र जो भर्ता इ॰ त्यास प्रीतीनें त्म॰.

**वेल्हाळी**, स्त्री॰ ग्रं॰ परम प्रीतिपात्र जी नायिका इ॰ कोणी स्त्री तीस प्रीतीनें त्म॰

**वेवसाय, वेवसाव**, पु॰ व्यवसाय शब्दाचा अपभ्रंश: प्रथमार्थी प्र॰.

**वेवें**, न॰ भयादिकारणानें कोणेक घाबरला असतां मुखानें कांहींच स्पष्ट शब्द न निघतां जे अस्पष्ट शब्द निघतात त्यांचें अनु॰; उ॰ बोलूं त्मणतो आह्मां पण विचार करा, नाहींतर तेथें गेलों त्मणजे वेवें होईल.

**वेव्हार**, पु॰ व्यवहार शब्दाचा अपभ्रंश; २, कोणेकानें कोणेक गोष्ट सांगितली असतां त्याजवर उलटून कोणेक करितो जो प्रतिवाद तो.

**वेव्हारी**, ३ लिं॰ पु॰ व्यवहारी याचा अपभ्रंश; २, ३ लिं॰ हुजतखोर.

**वेश**, पु॰ वेष.

**वेश्या**, स्त्री॰ कळवांतीण.

**वेष**, पु॰ जातिदेशादि भेदेंकरून वस्त्रालंकारादि धारण करण्याचे जे प्रकारभेद तीहींकरून होतात जे पुरुषादिकांचे रूपभेद ते प्र॰.

**वेषधारी**, ३ लिं॰ राजा इ॰ कांचा वेष जाणें घेतला आहे तो; २, ला॰ आंगीं साधुत्वादि नसतां साधुत्वादि मिरवितो त्यास त्म॰.

**वेष्टण**, न॰ वेष्टन शब्दाचा अपभ्रंश.

**वेष्टणें**, कोणेक पदार्थ सूत्र, वस्त्र, इ॰ कानें त्याचे सर्व परिधि व्याप्त होत असा सभोंवार आवृत करणें, पक्षीं त्या सूत्र वस्त्रादिकासही कर्मता; २, वेढणें प्रथमार्थीं.

**वेष्टन**, न॰ कोणेक पदार्थां भोंवतालें वस्त्रचर्मादिकाचें जें आवरण तें; २, पुस्तकादि वेष्टायास साधन जें वस्त्रचर्मादि असतें तें; ३, वेष्टण्याचा जो व्यापार तें.

**वेष्टित**, ३ लिं॰ वेष्टिलेला तो.

**वेस**, स्त्री॰ गांवकुसास जो दरवाजा ठेवित असतात ती; २, गृहादिकांचे भोंवतालचा आवारास असतें जें दार ती.

**वेसकट**, स्त्री॰ कों॰ कुपणास जें द्वार राखिलें असतें त्या ठिकाणी जी कवाडी करितात ती.

**वेसकर**, पु॰ गांवचे वेशीवर संरक्षणार्थ जो महार असतो तो.

**वेसण**, स्त्री॰ बैल, टोणगा, इ॰ कानीं स्वाधीन रहावें म्हणून त्यांचे नाकांत जी दोरी ओंविली असत्ये ती.

**वेसन**, न॰ व्यसन शब्दाचा अपभ्रंश; परंतु प्रथमार्थींच प्र॰; २, स्त्री॰ वेसण.

**वेसनी**, ३ लिं॰ व्यसनी शब्दाचा अपभ्रंश.

**वेसवा**, स्त्री॰ जी स्त्री गरत असून निर्लज्जपणें व्यभिचारादि करूं लागली तीस म्ह॰.

**वेसवार**, पु॰ दोन तीन प्रकारचा डाळी, धणें, हळद, मिरच्या, मिर्‍यें, इ॰ पदार्थ तळून, किं॰ भाजून भाजी इ॰ कांवर घालावयाकरितां जें पिष्ट करितात तो.

**वेसवाराचेंलोणचें**, न॰ रा॰ मोहऱ्या, मेथ्या, हिंग, हळद, इ॰ कांचें चूर्ण आंत घालून जें आंब्याचें लोणचें करितात तें.

**वेहळा**, पु॰ बेहडा म्हणून जो वृक्ष तो आणि त्याचें फल तो.

**वेळ**, पु॰ अखंड दंडायमान जो काल त्याचा विवक्षित जो विभाग तो; उ॰ मी एवढावेळ निजलों होतों; आज कांहीं काम झालें नाहीं सारावेळ फुकट गेला; त्याला काम करायास वेळ लागतो, इ॰ स्थलीं विवक्षित प्रमाणापेक्षां अधिक काल असा अर्थ; कोणेकाचा वेळ जाणें म्ह॰ सुखानें काल जाणें; २, कांहीं एक कार्य होण्यास, किं॰ कार्यी नरीं प्रवृत्त होण्यास मध्यें कालविभागरूप जो अवकाश असतो तो; उ॰ पेरे होण्यास अजून वेळ आहे, म्हणून आधीं घरें शाकारून घ्या; माझे पाशीं काम आहे वेळ सांपडल्यास येईन; ३, अ॰ वेळां; उ॰ तो दिवसास तीनवेळ जेवतो; ४, स्त्री॰ कालरूप जो समय ती; वेळ वाहणें, म्ह॰ बरें, किं॰ वाईट होण्यास समय अनुकूल होणें; ५, मध्यान्हाहून पूर्वापर दिवसाचे जे दोन विभाग ते प्र॰; ६, वेला शब्दाचा अपभ्रंश; ७, स्त्रियांचे कोपरांत घालायाचें एक भूषण आहे; ८, वेलबोंडी.

**वेळअंवस**, स्त्री॰ कार्तिकी अमावास्या ती.

**वेळअवेळ**, स्त्री॰ विवक्षित कर्माविषयीं उचित, किं॰ अनुचित, अथवा अनुकूल, किं॰ प्रतिकूल असा

असा द्विविधत्वें करून आणायाचा जो काल तो; उ॰ हा म्हातारा नित्य उठून शिव्या देतो, कांहीं वेळ अवेळ पहात नाहीं; वेळअवेळ आहे चार रुपये जवळ अधिक असूंद्या; वेळआहे अवेळ आहे, इ॰रूप व्यस्त ही प्रयोग होतो.

**वेळकूट**, न॰रा॰कळंकाचा तुकडा तें.

**वेळणी**, स्त्री॰ भातवेळणें इत्यादुपयोगी तव्यासारिखें एक धातुमय पात्र आहे.

**वेळणें**, भात, भाजी, इ॰ शिजवून त्यांतील त्याज्य जें पाणी तें युक्तिनें काढावें असा जो संस्कार तद्विशिष्ट करणें; २, हात, पाय, मान, इ॰ अवयव केवळ सईल सोडून इतस्ततः हालविणें.

**वेळणेवारचा, वेळणेवारी**, अ॰रा॰ अभद्र कांहीं बोलणें, आचरणें, यास अयोग्य जो काल त्याचे ठायीं त्याचा प्रतिषेध कर्तव्य असतां प्रयोग; उ॰ वेळणेवारचा उगाच तूं बोंबलतोस काय म्हणून.

**वेळबोंड**, न॰दे॰वेलबोंड.

**वेळबोंडी**, स्त्री॰दे॰वेलबोंडी.

**वेळवणीं**, न॰ भाजी, डाळ, तुरण, इ॰ पदार्थ वेळून त्याचें काढितात जें पाणी तें.

**वेळवारीं**, अ॰वेळेवारीं.

**वेळा**, स्त्री॰ वेला; २, एळा; ३, कालरूप जो समय तो; ४, अ॰वेळां.

**वेळां**, अ॰ कोणेक क्रियेचे आवृत्तींची गणना कर्तव्य असतां संख्यावाचक शब्दांपुढें, किं॰ जितका, इतका, इ॰ शब्दांपुढें याचा योग होऊन विशिष्ट अव्ययाचा प्रयोग होतो; उ॰ एकवेळां सोडीन दोनवेळां सोडीन तिसऱ्यानें बोलशील तर तोंडांत खाशील.

**वेळू**, पु॰ इक्षुदंडा सारिखीं जास पेरें असतात अशी एक वृक्ष जाति आहे, जीचे कळंक किंवा इ॰ अनेक भेद आहेत; कोणेक स्थलीं बाराहात वेळू फिरतो आहे, त्य॰ तेथें मूर्तिमंत दारिद्र्य नांदतें आहे असा अर्थ होतो.

**वेळेनसार**, अ॰ समयानुसार.

**वेळेवारीं**, अ॰ कोणेक कर्म करायास वेळ प्रयुक्त जी सोय असते ती आहे तों, म्हणजे अर्थात् ती वेळ नलागतां, किं॰ तीचा अतिक्रम नहोतां पूर्वी; उ॰ तुला चाकरी सोडणें असल्यास मला वेळेवारींच सांग, नाहींतर आइत्येवेळेस फसवशील.

**वेळोवेळां**, अ॰ यं॰ वारंवार.

**वै**, स्त्री॰ कृपण.

**वैकल्य**, न॰ विकलता.

**वैकल्पिक**, ३लिं॰ जाविषयीं विकल्प सांगितला आहे तो विध्यादि.

**वैकुंठ**, न॰पु॰ श्री विष्णूचें निवासस्थल आहे तें तो

**वैकुंठचतुर्दशी**, स्त्री॰ कार्तिक शुद्ध चतुर्दशी.

**वैकुंठवासी**, ३लिं॰ मृत्यु पावलेला जो कोणी त्याचें कागदोपत्रीं नाम लिहावयाचें असतां एतच्छब्द पूर्वक लिहितात हा संप्रदाय प्रायः वैष्णवांत आहे.

**वैरवरी**, स्त्री॰ चतुर्विध जा वाणी आहेत त्यांतील चवथी जी ती जीणेंकरून शब्द स्पष्ट बाहेर पडतात.

**वैगुण्य**, न॰ विगुणता.

**वैवर्ण**, सुपाचे व्यापार विशेषानें तांदूळ, कणी, किं॰ कणीक, सांजा, इ॰ भिन्नभिन्न होत अशीं करणें.

**वैचित्र्य**, न॰ विचित्रता.

**वैजात्य**, न॰ विजातीयता.

**वैडुर्य**, न॰ वैदूर्य शब्दाचा अपभ्रंश.

**वैतरणी**, स्त्री॰ यमलोकीं जाताना मार्गी एक नदी लागत असत्ये ती; २, तदुत्तरणार्थ उत्तर क्रियेंत ब्राह्मणास गाय देत असतात ती.

**वैदिक**, पु॰ वेद विद्येनें जो प्रख्यात ब्राह्मण तो; २, ३ लिं॰ वेद संबंधी, किं॰ वेदानें उक्त जें कर्मादि तो.

**वैदिकी**, ३ लिं॰ वैदिक संबंधी जो आचार, कर्म. इ॰ तो; २, स्त्री॰ वैदिकपणा.

**वैदूर्य**, पु॰ सं॰ एक रत्न आहे.

**वैद्य**, पु॰ औषधादि द्वारा रोगशांतीचा उपाय जाणतो तो.

**वैद्यक**, न॰ रोग निरास होऊन आरोग्य व्हावें एतदर्थ औषधोपचार, रोगपरीक्षा, रोगनिदान, इ॰ रूप ज्ञेय जो विषय तें; २, तत्प्रतिपादक जें शास्त्र तें.

**वैद्यकी**, स्त्री॰ वैद्याचें कर्म ती.

**वैद्यक्रिया**, स्त्री॰ वैद्यशास्त्रोक्त रसायन निर्माणादि कारणीभूत जें वैद्याचें कर्म ती.

वैद्यराज

**वैद्यराज**, पु॰ वैद्यास सन्मानानें म्ह॰.

**वैद्यशास्त्र**, न॰ वैद्यक द्वितीयार्थी.

**वैध**, ३ लिं॰ वेदवाक्यादिबोधित जें कर्मादि तो.

**वैधर्म्य**, न॰ दृष्टांत दार्ष्टांतिकत्वादिरूपानें उपात्त जे ससंबंध अनेक धर्मी त्यांची परस्पर जी विरुद्ध धर्मता तें.

**वैधव्य**, न॰ विधवापणा.

**वैधृति**, पु॰ सत्ताविसावा जो योग तो; २, पोटांत एक शूळ होत असतो तो.

**वैधृत**, पु॰ रा॰ वैधृति द्वितीयार्थी; २, स्त्री॰ न॰ वैधृति प्रथमार्थीचा अपभ्रंश.

**वैनसें**, न॰ वनसें.

**वैपरीत्य**, न॰ विपरीतपणा.

**वैपुल्य**, न॰ विपुलता.

**वैफल्य**, न॰ विफलता.

**वैभव**, न॰ ऐश्वर्य.

**वैमनस्य**, न॰ विमनस्कता; २, परस्परांचे अंतःकरणांत परस्परांविषयीं जो विरुद्ध भाव तें.

**वैयधिकरण**, न॰ व्यधिकरणत्व.

**वैयर्थ्य**, न॰ व्यर्थत्व.

**वैयाकरण**, पु॰ व्याकरण अध्ययन केलें आहे जाणें तो; २, व्याकरण संबंधी जी प्रक्रिया इ॰ तो.

**वैर**, न॰ कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो प्रतिकूल भाव तें.

**वैरण**, स्त्री॰ घोडें, गाय, इ॰ कांस भक्षणार्थ घालायाचे उपयोगी जें तृण, कडबा, इ॰ ती; २, क्रीं॰ गुरें इकांस चारा घालणें इत्याद्यर्थ

ग्रर्थ गाताडीपुढें जी ओयरण म्हणून जागा ठेवितात ती; ३, न॰ स्त्री॰ दळाया करितां जांत्याचे पाळींत, किं॰ भाजायाकरितां खापर इ॰ कांत एकएक वेळ घालितात जें धान्य तें ती.

**वैरणें**, शिजवायाचें जे तांदूळ, दाळ, पीठ, इ॰ पदार्थ ते शिजायाकरितां सजल जें तपेलें इ॰ पात्र त्यांत ओतणें; २, रा॰ जांतें, खापर, इ॰ कांत दळणें, भाजणें, इत्याद्यर्थ हस्तादिकानें वैरणवैरण घालणें.

**वैरा**, पु॰ ओयरा.

**वैरागर**, पु॰ ग्रं॰ हिऱ्यांची जी खाण तो.

**वैरागी**, ३ लिं॰ ज्यास वैराग्य झालें तो.

**वैराग्य**, न॰ विरागित्व.

**वैरी**, ३ लिं॰ ज्याशीं ज्याचें वैर असतें तो त्याचा.

**वैरूप्य**, न॰ विरूपत्व.

**वैल**, पु॰ न॰ वाईल.

**वैलंडी**, स्त्री॰ रा॰ वेलांटी.

**वैलचूल**, स्त्री॰ वाईलचूल.

**वैलक्षण्य**, न॰ विलक्षणता.

**वैलाटी, वैलाठी**, स्त्री॰ समुद्रापासून सत्याद्रिपर्यंत जो देश त्यामध्यें पूर्वपूर्व जो प्रदेश तो त्याहून पश्चिमेकडील प्रदेशास ती.

**वैलोम्य**, न॰ विलोमता.

**वैवर्ण्य**, न॰ विवर्णता.

**वैवस्वतमनु**, पु॰ सांप्रत चाललेल्या मन्वंतराचा अधिकारी सातवा जो मनु तो.

**वैवाडा**, पु॰ कों॰ वयवाडा.

**वैवाहिक**, ३ लिं॰ विवाह संबंधी जें कर्मादि तो.

**वैशद्य**, न॰ विशदपणा.

**वैशाख**, पु॰ चैत्रापासून दुसरा जो चांद्रमास तो.

**वैशाखी**, ३ लिं॰ वैशाख संबंधी जी तिथि तो.

**वैशिष्ट्य**, न॰ विशिष्टत्व.

**वैशेषिक**, पु॰ पदार्थांचे तत्व निर्णयाविषयीं एकमत आहे त्या मतातें अनुसरून चालणारा जो तो.

**वैश्य**, पु॰ ब्राह्मणादि चार वर्णांतील तिसरा जो वर्ण तो.

**वैश्वदेव**, पु॰ नित्यशः करायाचें एक होमप्रधान कर्म आहे.

**वैश्वानर**, पु॰ एक ओषधींचा पाक आहे; २, सं॰ अग्नि.

**वैषम्य**, न॰ विषमता.

**वैषयिक**, ३ लिं॰ विषय संबंधी जें सुखादिक तो.

**वैष्णव**, पु॰ विष्णूचा जो भक्त तो; २, ३ लिं॰ विष्णुसंबंधी जें पुराण, कथा, व्रत, इ॰ तो.

**वैष्णवी**, ३ लिं॰ वैष्णवसंबंधी आचार इ॰ तो.

**वो**, अ॰ ओ; ओकारादिक जे शब्द ओकारप्रकरणीं लिहिले आहेत ते देशभेदेंकरून कोणी वोकारादिक ही म्हणतात, जसें वोकणें, ओकणें, वोकटा, ओकटा, वोझें, ओझें, वोमणें, ओमणें, असेंच इतर ही जाणावें.

**वौंळ**, स्त्री॰ बकुळवृक्ष; २, न॰ बकुलपुष्प.

**वौंळदोडा**, पु॰ वोंळीचें जें फल तो.

**व्यंकटेश**, पु॰ एक देव आहे.

**व्यक्त**, ३ लिं॰ इंद्रिय गोचर होण्याविषयीं योग्यता ज्याचे अंगीं आहे असा जो कोणेक अर्थ तो; उ॰ अव्यक्त ब्रह्मापासून हा व्यक्त प्रपंच झाला; २, ककारादिवर्ण ज्यांत आहेत असा जो शब्दा तो; ३, चांगलें समजाया जोगें जें भाषण, लेख, इ॰ तो; ४, अंक राशींचा विशेषेंकरून निर्देशकरून त्रैराशिकादि युक्तीनें साधायाचें जें गणित तो.

**व्यक्ति**, स्त्री॰ एक एक एक अशा रूपानें गणायास योग्य असे भिन्न भिन्नत्वें करून स्थित जे अर्थ ते प्रत्येकीं, जे अनेक मिळून जाति, समुदाय, द्वित्वादिसंख्या, इ॰ घडतें; २, कोणेक पुरुषादिकाची गुणेकरून, किं॰ अवगुणेकरून असा धारणता वर्णायाची असतां त्या पुरुषादिकास त्य॰; ३, अभिव्यक्ति; उ॰ हें पोर तुगतें बोलूं लागलें, अजून वर्णांची व्यक्ति होत नाहीं; ४, व्यंजक शब्दादिकें करून व्यंग्यार्थाचें जें प्राकट्य ती.

**व्यंग**, ३ लिं॰ विकलांग; २, न॰ विकलत्व.

**व्यंगुल**, न॰ अंगुलाचा जो साठावा अंश तें.

**व्यंगोक्ति**, स्त्री॰ व्यंग्योक्तीचा अपभ्रंश.

**व्यंग्य**, ३ लिं॰ वाच्यमर्यादेनें बोध होत नसतां तत्तत्पद सान्निध्यादि माहात्म्यामुळें बोधविषय होत असतो जो वाच्यार्थाहून इतर अर्थांतरांश तो.

**व्यंग्योक्ति**, स्त्री॰ व्यंग्यरूप अर्थ ज्या मध्यें भासतो असें जें भाषण ती; २, तादृश जो भाषणप्रकार त्यास कोणी त्य॰.

**व्यग्र**, ३ लिं॰ शोकादिकांमुळें कांहीं सुचेना अशा अवस्थेतें पावलें जें अंतःकरण इ॰ किं॰ तद्विशिष्ट पुरुषादि तो.

**व्यंजक**, ३ लिं॰ सं॰ कोणेक अर्थाची वाच्य मर्यादेवांचून अभिव्यक्ति करणारा जो शब्द, किं॰ इतर कांहीं चिन्हभूत तो.

**व्यजन**, न॰ सं॰ विंझणा.

**व्यंजन**, न॰ अकारादि स्वर वर्जित करून जे ककारादि वर्ण ते प्रत्येकीं; २, अक्षरावर जें अनुस्वाराचें, किं॰ अनुनासिकतेचें चिन्ह करितात तें; ३, सं॰ चटणी कोशिंबीर, इ॰ जें तोंडी लावणें तें; ४, व्यंग्यार्थाचें जें व्यक्तीकरण तें.

**व्यतिक्रम**, पु॰ आज्ञादिकांचा जो उल्लंघ तो.

**व्यतिरिक्त**, ३ लिं॰ ज्याचा व्यतिरेक ज्याचाठायीं आहे असा जो अर्थ तो तद्व्यतिरिक्त; उ॰ ज्ञानव्यतिरिक्त देह काष्ठोपम जाणावा; २, अ॰ विवक्षितावांचू; उ॰ मी तुला घेतल्याव्यतिरिक्त जाणार नाहीं

**व्यतिरेक**, पु॰ सं॰ कोणेक अर्थाचे ठायीं कोणेक अर्थाचे अन्वयाचा जो अभाव तो; उ॰ ईश्वरीं अज्ञानाचा सर्वथा व्यतिरेक आहे; २, जें नसतां जें नसतें असा जो हेतु साध्यभूत अर्थाचे अभाव सत्तेचा नियम तो; उ॰ जेथें ईश्वर भक्ति नाहीं तेथें भूतदया नाहीं असा व्यतिरेक आहे.

**व्यतिरेकमुखें, व्यतिरेकमुखेंकरून**, अ॰ व्यतिरेक

व्यतिरेकरूप जी व्याप्ति तीतें अवलंबून कोणेक अर्थातें प्रतिपादणें इ॰कांचें वि॰.

**व्यतीपात**, पु॰ सत्तावीस योगांतील सत्रावा जो योग तो; २, ला॰ भारी चंचळ द्वाड जो पोर इ॰ त्यास ल्म॰.

**व्यत्यय**, पु॰ कांहीं एक कर्मामध्यें होतो जो विपर्यास तो; २, व्याक्षेप.

**व्यत्यस्त**, ३ लिं॰ विपर्यस्त.

**व्यत्यास**, पु॰ विपर्यास.

**व्यथा**, स्त्री॰ आधिरूप, किं॰ व्याधिरूप अनुभूयमान जें दुःख ती.

**व्यथित**, ३ लिं॰ व्यथा झाली आहे ज्यास तो.

**व्यथिष्ट**, ३ लिं॰ दमा, अर्श, इ॰ चिरस्थायी जे रोग ते जडले आहेत ज्यास तो.

**व्यधिकरण**, ३ लिं॰ एका अधिकरणीं रहाणारे नव्हत असे जे अनेक धर्मादि अर्थ ते परस्पर; २, ज्यामध्यें सरळयुक्ति नाहींत असें जें वितंडवादाचें भाषण इ॰ तो.

**व्यपदेश**, पु॰ कांहीं एक अर्थाचेठायीं शब्देचा संज्ञारूप जो व्यवहार तो.

**व्यभिचरित**, ३ लिं॰ व्यभिचार पावलेला जो नियम, हेतु, इ॰ तो.

**व्यभिचार**, पु॰ कोणेक विधिविषयीं मानलेल्या नियमाच्या लक्ष्यविशेषीं असतो जो भंग तो; उ॰ जितके बुद्धिमान् तितके आळशी, असें म्हणतां येत नाहीं, कांकि क्वचित् व्यभिचार दिसतो; कितीएक बुद्धिमान् असून उद्योगी ही आढळतात; २, पुरुषानें स्वस्त्रीहून इतर स्त्रीशीं, किं॰ स्त्रीनें पुरुषाशीं रतल्यानें जो नियमातिक्रम होतो तो.

**व्यभिचारी**, ३ लिं॰ व्यभिचार आहे ज्यास असा जो नियम, हेतु, इ॰ तो; २, द्वितीयार्थक जो व्यभिचार तो घडला आहे ज्यापासून, किं॰ निरंतर करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**व्यय**, पु॰ खर्च; २, विसावा जो संवत्सर तो.

**व्ययशील**, ३ लिं॰ बहुत किं॰ सर्वदा व्यय करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**व्यर्थ**, ३ लिं॰ निरर्थक; २, अ॰ वृथा.

**व्यवकलन**, न॰ सं॰ कांहींएक अंकराशींमध्यें कांहींएक अंकराशि उणा करण्याचा जो व्यापार तें.

**व्यवच्छेद**, पु॰ सं॰ सामान्यवाचक शब्दानें सामान्य रूपें करून बोधविषय होऊं लागला जो अर्थ त्याचे एकदेशाची विशेषणादि व्यवच्छेदकानें होत्ये जी पृथक्क्रिया तो.

**व्यवच्छेदक**, ३ लिं॰ सं॰ व्यवच्छेद करणारें जें विशेषणादि तो.

**व्यवधान**, न॰ सं॰ कोणेक पदार्थाशीं कोणेक पदार्थाचें संनिधान, किं॰ साक्षात्संबंध न होण्यास कारणीभूत जें मध्यवर्ति अवकाश स्थितिरूप, किं॰ तृतीय पदार्थ स्थितिरूप असतें जें अंतर तें, किं॰ तो तत्कारणीभूत अवकाश आणि तृतीय पदार्थ तें; २, कोणेकाचे गतीमध्यें कांहीं एक पदार्थाचे स्थितीमुळें होतो जो प्रतिबंध तें, किं॰ तो प्रतिबंधक पदार्थ तें; उ॰ भिंतीनें वायुचें व्यवधान होतें, पण दृष्टिचें व्यवधान

धान होत नाहीं;३,सतत चाललेल्या व्यापारामध्यें कांहीं कारणानें यत्किंचित् पडतो जो कालखंड तें.

**व्यवधायक**,३लिं० व्यवधान होण्यास कारणीभूत जो पदार्थ तो.

**व्यवसाय**,पु० क्रय विक्रयादिरूप जो व्यापार तो;२,सं० निश्चय.

**व्यवस्था**,स्त्री० कांहीं पदार्थांचा,किं० क्रियांचा यथायोग्य;किं०विवक्षितानुरूप संबंध होई असा जो विनियोग ती;२,याची पुढें गतिकाय,परिणामकाय,अशाविषयीं गतिपरिणाम या शब्दांचा अर्थी व्यवस्था शब्दाचा प्रयोग कोणी करितात.

**व्यवस्थापक**,३लिं० व्यवस्था करणारा जो मनुष्य,शास्त्र,इ० तो.

**व्यवस्थापन**,न० व्यवस्था करण्याचा जो व्यापार तें.

**व्यवस्थित**,३लिं० व्यवस्थेनें युक्त जो व्यवहार धर्म,इ० तो,किं० ज्याचे भाषणादि व्यवहारामध्यें व्यवस्था आहे असा जो मनुष्यादि तो.

**व्यवहर्ता**,३लिं० व्यवहार करणारा जो तो.

**व्यवहार**,पु० अर्थावर कांहीं क्रिया उत्पन्न झाल्यानें तद्वारा परस्परें अर्थांचें संयोग वियोग आकर्षण,प्रसारण,उच्चारण,इ० जें कांहीं घडतें तें सर्व मिळून जी एक विशिष्ट क्रिया तो; लोक व्यहार,शास्त्रव्यवहार,अंकव्यवहार, इ० स०;क्रयविक्रयादिरूप जो वाणिज्य व्यापार त्या विषयीं विशेषेंकरून प्रसिद्धि.

**व्यवहारणें**, व्यवहृत करणें.

**व्यवहारी**, पु० क्रयविक्रय व्यवहार करणारा जो तो.

**व्यवहार्य**,३लिं० व्यवहृत करण्याविषयीं योग्य जो शब्द,नाणें,मनुष्य,इ० तो.

**व्यवहित**,३लिं० सं० व्यवधान झालें आहे ज्यास तो.

**व्यवहृत**,३लिं० व्यवहार विषय केला जो तो.

**व्यष्टि**,स्त्री० विराट् देहादिक जे विशिष्ट अवयवी त्यांचे अवयव भूत जे अस्मद्देहादिरूप अवांतर अवयवी ते स०.

**व्यसन**,न० कोणेक विषयाची एकवेळ गोडी लागल्यामुळें तद्वियोगीं चित्तास चैन पडूं नये असा जो त्याचा संबंध आपल्यास जडतो तें;२, संकटावस्था तें.

**व्यसनी**,३लिं० व्यसन आहे ज्यास तो प्रा० दुर्व्यसनाविषयीं प्र०.

**व्यस्त**,३लिं० सं० समुदाय रूपेंकरून एकरूपता पावला नव्हे पृथक् पृथक् रूपेंकरून स्थित असा जो कोणेक अर्थ तो;२,ज्याचा पूर्वस्थितक्रम उलटा झाला,किं० बिघडला असा जो कोणेक अर्थ तो.

**व्यस्ताव्यस्त**, ३लिं० अस्ताव्यस्त.

**व्याकरण**,न० सं० प्रकृति प्रत्यय विभागादि प्रकारानें शब्दांची सिद्धि ज्यांत प्रतिपादिली असते असें जें शास्त्र तें.

**व्याकरणी**, पु० व्याकरण जाणणारा जो तो.

**व्याकुल, व्याकुळ**,३लिं० शोक,हर्ष,इ० कानें

अतिव्याप्त झाल्यामुळें कांहींच सुचेना अशी अवस्था पावलें जें अंतःकरण, किं॰ तद्विशिष्ट मनुष्यादि तो; २, कोणेक अतिशय दुःख झाल्यामुळें ज्ञानशक्ति आणि शारीरशक्ति जामध्यें कांहींच राहिली नाहीं, असा झालेला जो मनुष्यादि तो; उ॰ हरिणास एक बाण लागतांच व्याकुळ होऊन पडला.

**व्याख्या**, स्त्री॰ श्लोक, वाक्य, इ॰ कांची अर्थ वर्णनद्वारा जी परिस्फुटता ती; २, गुप्त गोष्टीच्या कोणी करितो जो बोभाटा ती; ३, कोणेक अर्थातें प्रतीकरूपें करून धरून लक्षण, शक्ति, स्वभाव, प्रयोजन, इ॰ रूप जो तत्संबंधी सर्व विषय तन्निरूपणद्वारा जें त्या अर्थाचें वर्णन ती; ४, कोणेक पुरुषाची, किं॰ गोष्टीची कोणी करितो जी हेंटाळणी ती.

**व्याख्यात**, ३ लिं॰ व्याख्या झाली आहे जाची असा ग्रंथ, वाक्य, इ॰ तो.

**व्याख्याता**, ३ लिं॰ श्लोकादिकांची व्याख्या करणारा तो.

**व्याख्यान**, न॰ ग्रंथ, वाक्य, इ॰ कांची व्याख्या करण्याचा जो व्यापार तें; २, गुरूनें शिष्यास काव्यशास्त्र इ॰ कांचा अर्थ समजावून देण्याचा व्यापार तें.

**व्याघात**, पु॰ सतत चाललेल्या व्यापारामध्यें कांहीं विघ्नामुळें जो खंड तो; उ॰ तुम्ही एथें गोष्टी सांगून का आमचे अध्ययनांत व्याघात होतो; २, सत्तावीस योगांतील तेरावा जो योग तो.



**व्याघ्र**, पु॰ वाघ.

**व्याघ्रमुख**, न॰ आरंभीं मात्र परम कठिन असें जें शास्त्रादि त्यास म्ह॰.

**व्याघ्रांबर**, न॰ वस्त्रस्थानीं योजिलें जें व्याघ्रचर्म तें.

**व्याज**, न॰ सं॰ मिष.

**व्याज**, न॰ उत्तमर्णापासून कांहीं पैका ऋण घेतला असतां शंभरांस प्रतिमासीं एक इ॰ रूप बोलीनें अधमर्णानें उत्तमर्णास वरखावयास केलें असतें जें द्रव्य तें.

**व्याजकटावणी**, स्त्री॰ तुटमितीनें व्याजाचा आकार करण्याचा जो प्रकार ती.

**व्याजनिंदा**, स्त्री॰ आंत निंदा असून बाहेर स्तुति दिसावी असा जो व्याज स्तुतीचा एक भेद आहे त्यास कोणी म्ह॰.

**व्याजफेलावण, व्याजफेलावणी**, स्त्री॰ जमेचे रकमाचें व्याज वेगळें करावें, आणि नावाकडील व्याज वेगळें करावें, आणि कमी असेल तें अधिकांत वजा करून बाकी काढावी असें व्याज करण्याचा जो प्रकार ती.

**व्याजबट्टा**, पु॰ कर्जाऊ रुपये देणें, नाणीं बदावणें, हुंडया पाडया करणें, इ॰ सराफीचा जो व्यवहार त्यास म्ह॰.

**व्याजस्तुति**, स्त्री॰ पोटीं स्तुति असून बाहेर निंदा दिसावी, किं॰ पोटीं निंदा असून बाहेर स्तुति दिसावी अशा प्रकारचा जो श्लोक, वाक्य, इ॰ कांचेठायीं अर्थालंकार असतो ती.

**व्याजाऊ**, ३ लिं० व्याजी.

**व्याजाव**, ३ लिं० व्याजी.

**व्याजी**, ३ लिं० व्याजाचे बोलीनें दिलें. किं० घेतलें जें द्रव्य तो.

**व्याजू**, ३ लिं० व्याजी.

**व्याजोक्ति**, स्त्री० मनांत बोलायाचा जो विषय तो स्पष्ट नकरितां निमित्तांतरानें भाषण करीत असावें आणि त्यापासून स्वाभिप्रेत अर्थाचें ध्वनन होत असावें अशा प्रकारें जी उक्ति ती.

**व्याध**, पु० सं० पारधी; २, स्त्री० व्याधिशब्दाचा अपभ्रंश.

**व्याधि**, पु० स्त्री० शरीरास उपद्रव कारक जे रोग, क्षत, इ० ते प्र०; २, ला० आपल्यास उपद्रवकारक पाठीमागें कांहीं लागतें जें लचांड त्यास त्य०; ३, अयोग्य जें पोर त्यास त्य०

**व्याधिष्ट**, ३ लिं० व्याधिष्ठ शब्दाचा अपभ्रंश.

**व्याधिष्ठ**, ३ लिं० रक्तपित्ती, क्षय, शूल, इ० कोणेक मोठा व्याधि जडला आहे ज्यास असा जो मनुष्य इ० तो.

**व्यान**, पु० सर्व शरीरास व्यापून राहिला आहे जो प्राण, वायु, तो.

**व्याप**, पु० देश, ग्राम, राज्य, दरबार, इ० जीं व्यवहाराधिकरणें त्यांचेठायीं कोणक व्यवहर्त्यांची आणें, येणें, देणें, घेणें, इ० व्यवहारद्वारा असल्ये जी व्याप्ति तो; २, उपद्व्याप; ३, प्र० व्यापतिनका संताप.

**व्यापक**, ३ लिं० व्यापितो तो; २, कांहीं एक पदार्थानें, किं० गोष्टीनें पोटीं घेऊन राहाणाराजो अधिक देश वृत्ति पदार्थ, किं० गोष्ट तो; उ० मनुष्यत्वजाति ब्राह्मणत्वजातिपेक्षां व्यापक.

**व्यापणें**, कोणेकानें कोणेक पदार्थादिक आपल्या बाहेर न उरे असा करणें, किं० त्याचे सर्व अवयव स्वरूपानें, किं० स्वशान्त्यादिकानें अन्वित होत असा करणें, किं० तशा प्रकारें आपण पसरणें; उ० विष जों सर्वांगीं व्यापलें नाहीं तों पर्यंत उपाय चालतो.

**व्यापन**, न० व्यापण्याचा जो व्यापार तें.

**व्यापार**, पु० करणें, मारणें, इ० धातूंचा जो अर्थ तो; २, क्रयविक्रयरूप जो व्यवहार तो.

**व्यापारणें**, स्वनिष्ठ जो हनन चालनादि व्यापार तद्द्वारा त्या त्या शस्त्रादिकरणातें, किं० हस्तादिकर्मातें चेष्टारूप जो त्यांजवर चलन गमनादि यथायोग्य व्यापार होत असतो तद्विष्ट करणें.

**व्यापारी**, पु० उदमी.

**व्यापी**, ३ लिं० कोणेक अर्थानें व्यापणारा जो तो; प्रा० सर्वव्यापी, जगद्व्यापी, इ० समासीं प्र०.

**व्यापून**, ३ लिं० व्यापारिला तो.

**व्यास**, ३ लिं० व्यापला गेला जो तो.

**व्याप्ति**, स्त्री० कोणेक अर्थाची कोणेक अर्थानें व्यापून जी स्थिति ती; २, अनुमानस्थलीं हेतुसाध्याचा सामानाधिकरण्यें करून स्थितीचा जो नियम ती.

**व्याप्य**, ३ लिं० व्यापकानें व्यापायाजोगा अल्पदेश वृत्ति जो अर्थ तो.

**व्याप्यकोटि**, स्त्री॰ विद्यादिरूप मोठें व्यापक जें सामर्थ्य तेणेंकरून व्याप्य म्हणजे पराभूत करायास योग्य असें जें अल्प सामर्थ्य तद्विशिष्ट मनुष्यादिकांची कोटि ती; व्याप्यकोटिप्रविष्ट, व्याप्यकोट्यंतर्गत इ॰ स॰.

**व्याप्यव्यापकभाव**, पु॰ एक व्याप्य आणि एक व्यापक अशा उभयतांचा जो संबंध तो.

**व्यामोह**, पु॰ कर्तव्य विचार विसरून भलतेंच करायास कारणीभूत जी चित्तास भ्रांति उत्पन्न होते तो.

**व्यायाम**, पु॰ गमनकरणें, दंडकाढणें, इ॰ केंकरून शरीरावयव ओढले, ताणले, जात असाशरीरास होतो जो संस्कार तो, किं॰ तदर्थक केला जो गमनादि व्यापार तो.

**व्याल**, पु॰ सं॰ सर्प.

**व्यावर्तक**, ३ लिं॰ व्यावृत्ति करणारा जो विशेष धर्मादि तो.

**व्यावर्त्य**, ३ लिं॰ कांहीं एक व्यावर्तकानें ज्याचीव्यावृत्ति करायास योग्य आहे तो.

**व्यावहारिक**, ३ लिं॰ व्यवहार संबंधी जें नाम, भाषा, लिपि, इ॰ तो.

**व्यावृत्त**, ३ लिं॰ ज्याची व्यावृत्ति झाली आहे तो.

**व्यावृत्ति**, स्त्री॰ कोणेक लक्ष्य विशेषीं प्रसक्त झालेला जो दोषादि कोणेक अर्थ तो विशेषणादि सामर्थ्यानें त्या लक्ष्यीं लागूनहोतां त्याचा तेथून जो पृथक्भाव ती; उ॰ चक्षूस दिव्य हें विशेषण दिल्यानें चर्मचक्षूंची व्यावृत्ति होते; २, कोणेक धर्मी इ॰ कांचेठायीं कोणेक धर्मादिकांचा जो व्यतिरेक ती; उ॰ घटादिकार्यांचेठायीं मृत्तिकात्वाची अनुवृत्ति आहे परंतु मृत्तिकेचेठायीं घटत्वादिकार्य धर्मांची व्यावृत्ति.

**व्यास**, पु॰ वेदांचे विभाग अष्टादश पुराणें, इ॰ ज्याणें केले असा एक ईश्वराचा अवतार चिरजीवि ब्राम्हण आहे तो; २, पुराणसांगणारा जो व्यास त्य॰; ३, गोलाकार, किं॰ वृत्ताद्याकार जो पदार्थ त्याचे गर्भीचें जें प्रमाण तो.

**व्यासंग**, पु॰ विद्याकलादिरूप जें साध्य तद्विषयीं तदनुकूल पठनादि व्यापार करीत नेहमी त्याचेठायीं जी स्थिति तो.

**व्यासंगी**, ३ लिं॰ व्यासंगकरण्याचा स्वभावज्याचा तो.

**व्यासज्यवृत्ति**, ३ लिं॰ धर्मी इ॰रूप जे अनेक अर्थ त्या सर्वांवर मिळून एक राहतो पृथक्पृथक् विश्रांति पावत नाहीं असा जो संयोग पृथकत्व इ॰ अर्थ तो.

**व्यासपीठ**, न॰ पुराण सांगावयाकरितां बसायाचें जें आसन तें.

**व्यासपूजा**, स्त्री॰ पुराण समाप्तीचा वेळेस पुराणिकाची, किं॰ संस्थानिक जे पुराणिक असतात त्यांची कार्तिसंबंधी पौर्णिमेस जी पूजा करितात ती; २, आषाढमासीं पौर्णिमेस जी गुरु, संन्यासी, यांची पूजा करितात ती.

**व्यासासन**, न॰ व्यासपीठ.

**व्याहत**, ३ लिं॰ व्याघात झाला ज्याचा तो.

**व्याही**, पु॰ विहिणीचा जो नवरा तो.

**व्याहीभोज**, पु॰ व्याह्यासाठीं जो भोजन समारंभ करितात तो.

**व्याक्षेप**, पु॰ चालत्या व्यापारामध्यें जें कांहीं विघ्न होतें तो, किं॰ तेणेंकरून होतो जो खोळंबा तो.

**व्युत्क्रम**, पु॰ विपरीत जो क्रम तो.

**व्युत्पत्ति**, स्त्री॰ कांहींएक शास्त्रादि व्यवहाराचे जे तत्तत्पारिभाषिक संकेत असतात तज्ज्ञानपूर्वक तत्तद्व्यवहाराचें जें ज्ञान ती; संस्कृत भाषेचें जें ज्ञान तथें विशेषेकरून प्र॰; २, विशिष्ट पदाचीं अवयवभूत जीं अवांतर पदें, किं॰ प्रकृतिप्रत्यय त्यांचेठायीं विशिष्ट पदार्थास अनुगुण जी अर्थकल्पना असते ती; उ॰ वैदिक याशब्दीं वेदातें जो जाणणारा ब्राह्मणादिक, किं॰ वेदानें सांगितलें जें कर्म अशा दोनही व्युत्पत्ति संभवतात.

**व्युत्पन्न**, ३ लिं॰ शास्त्रादि व्युत्पत्ति आहे ज्यास तो, किं॰ ज्याचे अवयवीं अर्थकल्पना आहे असा जो शब्द तो.

**व्युत्पादक**, ३ लिं॰ शास्त्रादि व्युत्पत्ति जेणेंकरून होते असा जो ग्रंथादि तो.

**व्यूह**, पु॰ शत्रूचा आंत प्रवेश नहोतां आपला मार शत्रूवर चालावा म्हणून शकटाद्याकारक सैन्याचा रचनेचे प्रकार आहेत ते प्र॰; २, ला॰ शत्रुपराजयादिरूप जें साध्य तत्साधनार्थ अनेक युक्तीनीं दुसऱ्याचे मनांत एकाएकीं नयावयाजोगी मोठी कोणी रचितो जी मसलत तो.

**व्योम**, न॰ सं॰ आकाश.



**व्रज**, पु॰ केवळ गोव्ळ्यांचीच वस्ती जेथें असते असा जो गांव तो.

**व्रण**, पु॰ मनुष्य वृक्षादिकांचे शरीरास शस्त्रादि लागल्यामुळें, किं॰ रोगादिकांमुळें जो छेद पडतो तो.

**व्रणित**, **व्रणी**, ३ लिं॰ व्रणविशिष्ट जो तो.

**व्रत**, न॰ ईश्वरप्रसादद्वारा पापक्षय, किं॰ इष्ट फलप्राप्ति ज्यांपासून होते अशीं तत्तन्नियम पूर्वक करायाचीं कर्में आहेत तीं प्र॰; २, ला॰ कोणेक शुभाशुभ कर्म करण्याविषयीं सतत धरिला जो नियम तें; उ॰ स्वभक्तपालन करणें हें ईश्वराचें व्रत आहे.

**व्रतबंध**, पु॰ मुंज म्हणून जो संस्कार तो.

**व्रतस्थ**, ३ लिं॰ कांहींएक व्रतादि कर्मांगभूत जो ब्रह्मचर्यादि नियम तो धारण केला आहे ज्याणें तो.

**व्रती**, ३ लिं॰ व्रतस्थ.

**व्रात्य**, पु॰ ज्याची मुंज नहोतां गौणकालही अतिक्रांत झाला तो ब्राह्मणादिकाचा पुत्र; २, ३ लिं॰ अर्वाच्य.

**व्रीडा**, स्त्री॰ सं॰ लज्जा.

**व्रीडित**, ३ लिं॰ लज्जित.

**व्रीहि**, पु॰ स्त्री॰ भात म्हणून जें धान्य तो ती.

**व्हेळा**, पु॰ रा॰ वेहळा.

---

**शक**, पु॰ लोकोत्तर पराक्रम करून जाणें प्रा॰ समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य संपादन केलें असा जो राजा त्याचे राज्याची वहिवाट त्याचाच सत्तेनें होत असावी अशा प्रकारें किं॰ त्याला राज्य ज्या संवत्सरीं प्राप्त झालें त्या संवत्सरातें आरंभून संवत्सर गणना लोक व्यवहारांत चालते अशा प्रकारें जें कांहीं काल प्रमुख चालतें तो; उ॰ नर्मदेच्या आलीकडे शालियाहन शक चालतो पलीकडे विक्रम शक चालतो; २, ला॰ आपण प्रवर्त्तविला जो धर्म, चाल, इ॰तें मान्य करून तदनुसार लोकानीं वर्तावें अशाप्रकारें लोकांवर आपली चालत्ये जी नियंतृत्व शक्ति तो; ३, सं॰ म्लेच्छामध्यें एक भेद आहे.

**शककर्ता**, पु॰ शकप्रवर्त्तक जे पुराण प्रसिद्ध युधिष्ठिरादि राजे ते प्र॰; २, ला॰ ज्याचें नवेंच प्रवर्तविलेलें धर्मादि कांहीं एक तें लोकांत मान्य होऊन प्रवृत्त होतें असा जो कोणी त्यास म्ह॰.

**शकट**, पु॰ गाडा प्रथमार्थीं; २, रोहिणी नामक जीं पांच नक्षत्रें त्यांची जी तदाकार रचना दिसत्ये तो.

**शकटभेद**, पु॰ रोहिणीच्या शकटाचे मधून चंद्रादि ग्रह गेल्या मुळें त्या शकटाचा होतो जो भेद तो; २, ला॰ छकड भेद.

**शकटव्यूह**, पु॰ शकटाकार रचितात जो सेनासंनिवेश तो.

**शकणें**, कांहीं एक करण्या विषयीं कोणेकानें समर्थ होणें.

**शंकणें**, आशंकणें.

**शंकर**, पु॰ महादेव.

**शंकरपाळा**, पु॰ एक पक्वान्नांत भेद आहे.

**शंकरपाळें**, न॰ शंकरपाळा.

**शंकरा**, पु॰ गायनांत एक राग आहे.

**शंकराचार्य**, पु॰ कलियुगामध्यें पाखंड मतांचा विध्वंस करून वेदोक्त अद्वैत मार्ग चालवायासाठीं धर्म प्रवर्त्तक शंकराचा अवतार झाला होता ते प्रा॰ अनेक वचनांत प्र॰; २, आगोआग त्यांचे मठ आहेत तेथें धर्म चालवाया करितां अधिकृत संन्यासी असतो ते.

**शंकराभरण**, पु॰ गाण्यांत एक राग आहे.

**शकल**, न॰ पाषाणादिकाचें जें खंड तें; २, कोणेक गोष्टीचा आंतील जो मर्मांश जो बाहेर निघाल्या शिवाय इदमित्थं ज्ञान होत नाहीं तें; ३, स्त्री॰ अडला जो कोणेक व्यवहार तो चालू करण्या विषयीं बुद्धि चालवून काढितात जी युक्ति ती.

**शंका**, स्त्री॰ कांहीं एक कर्म करण्या विषयीं या कर्मानें मला लोक हांसतील किं॰ शास्ता जो राजा इ॰ त्यापासून शासन घडेल किं॰ मी बुडेन, फसेन, इ॰ संभावनेनें अंतःकरणाचा संकोच व्हावया जोगी जी अंतःकरणांत वृत्ति उत्पन्न होत्ये ती; उ॰ दिवसास रांडेच्या घरीं जातोस लोक आपल्यास हांसतील ही कांहीं शंका वाकगीत ज्या; उ॰ काल रुपयेरवास देतों ह्मणाला आणि आज नाहीं ह्मणतो तेव्हां कांहीं तरीं त्याचे मनांत शंका आली; २, कोणेक अर्थ याथार्थ्यकारीं यद्रूपें करून बोधविषय होत असतो तद्विरुद्धांश संभावना घेऊन जें त्याच अर्था विषयीं तें ह्मणतर ती; उ॰ आजपर्यंत हा विश्वासू असें वा-

टन होतें परंतु कालचें त्याचें तसें कर्म पाहिल्या मुळें माझे मनांत शंका उत्पन्न झाली; ३, शास्त्रार्थादि रूप जो कोणेक ज्ञेय विषय त्याजवर कांहीं विरुद्धांश संभावना घेऊन जो तद्विषयीं प्रश्न ती.

**शंकासूर**, पु॰ राजतुरा.

**शंकित**, ३ लिं॰ शंका प्रथम द्वितीयार्थ प्राप्त झाला आहे ज्यास तो; २, कोणेकानें शंकिला जो कोणेक विषय तो.

**शंकु**, पु॰ सं॰ लोहादि धातु, काष्ठ, इ॰ कांचा प्रा॰ वाटोळा आणि लांबट असा खिळा इ॰ रूप तुकडा तो, परंतु छाये वरून कालादि प्रमाण समजाया साठीं जो हादशांगुळ हस्तिदंतादिकांचा तुकडा मांडितात त्याजवर प्रसिद्ध पणें प्र॰; २, एक संख्या आहे. १००००००००००००००

**शकुन**, पु॰ गमनाद्यर्थ प्रवृत्त होते समयीं सुशब्द कुशब्दादिकांचें श्रवण किं॰ मंगला मंगल पदार्थांचें दर्शन, इ॰ रूप जें कांहीं साहजिक होतें तेंच शास्त्रानुरोधानें मानितात जें होणारे शुभाशुभाचें लक्षण तो; २, प्रश्न तृतीयार्थीं.

**शकुनउंडा**, पु॰ एक पक्वान्न आहे.

**शकुनगांठ**, स्त्री॰ कालांतरीं होणारें किं॰ देशांतरीं झालेलें इ॰ रूप परोक्ष जें कांहीं एक वर्तमान त्याविषयीं सांगीतला जो कांहीं शकुन किं॰ आढळलें जें तत्सूचक कांहीं लक्षण त्याचें स्मरण त्या गोष्टीचें प्रत्यक्ष होईतों पर्यंत रहावें म्हणून जी पदरास गांठ बांधितात ती जेणें करून त्या शकुनाचें संमानन केलें असें होतें.

**शकुनवंती**, स्त्री॰ शकुन पहाण्याचे उपयोगीं ठोक जोशी इ॰ कांजवळ जी लहान शीव ही, पोथी, इ॰ असती ती.

**शकुनि**, पु॰ सं॰ पक्षी; २, बवादि करणांतील जें आठवें करण तो.

**शके**, अ॰ इष्ट शकाच्या संवत्सर संख्या वाचक जो शब्द किं॰ अंक त्याचे पूर्वीं याचा प्र॰ करितात.

**शक्त**, ३ लिं॰ शक्ति प्रथम द्वितीयार्थ आहे ज्याचे अंगीं तो; २, स्त्री॰ शक्ति शब्दाचा अपभ्रंश परंतु प्रथम द्वितीयार्थीं.

**शक्ति**, स्त्री॰ सं॰ अर्थमात्राचे अंगीं न तत्कार्य निर्वाहक जो बल म्हणोन धर्म विशेष असतो ती; द्रव्यशक्ति, शरीरशक्ति, ज्ञानशक्ति, पचनशक्ति, दहनशक्ति, शक्त्यनुसार, इ॰ स॰; २, अमुक शब्द उच्चारिला असतां अमुक अर्थाचाच नियमें करून बोध व्हावा असा जो शब्दाचा ठायीं संकेत घातला आहे ती, ३, ईश्वराची जी योगमाया ती जिचे पार्वती, लक्ष्मी, इ॰ हे अवतार; ४, स्त्री पुरुष मिळून जें मिथुन त्यांतील जी स्त्री तीस प्रसंग विशेषीं म्ह; ५, एक आयुध विशेष आहे.

**शक्तिग्रह**, पु॰ या शब्दाची शक्ति या अमुक अर्थीं आहे असें जें वृद्धव्यवहार, कोश, व्याकरण, इ॰ कांवरून ज्ञान होतें तो; २, अर्थांचे ज्ञापक जे शब्द, लक्षण, इ॰ त्यांवरून कोणेक अर्थाचा कोणेक रूपेंकरून जो बोध होतो तद्विषयीं कोणी प्र॰ करितात; उ॰ याचे वेषावरून हा साधु असा मला शक्तिग्रह झाला होता.

**शक्तिग्राहक**, ३ लिं॰ शब्दाचा शक्तिग्रह जेणें करून होतो असा जो वृद्धव्यवहार, व्याकरण, कोश, इ॰ तो.

**शक्तिपात,** पु॰ रोग, भय, इ॰ कारणामुळें हातपाय इ॰ अवयव उचलायास कठिन पडायाजोगीजी शरीरशक्तीची हानि होत्ये तो.

**शक्तिमंत,** ३ लिं॰ शक्तिमान्.

**शक्तिमान्,** ३ लिं॰ शक्ति आहे जास तो.

**शक्तिक्षीण,** ३ लिं॰ रोग, उपवास, जरा, इ॰ कारणानें जाची शरीरशक्ति क्षीण झाली तो.

**शक्य,** ३ लिं॰ कर्त्याचे शक्तीनें करणें, घडणें, इ॰ विषयीं येंपायाजोगा जो कोणेक कर्मभूत अर्थ तो; २, शब्दापासून शक्तीनें जाचा बोध होतो तो अर्थ त्याचा.

**शक्र,** पु॰ इंद्र.

**शंख,** पु॰ सं॰ समुद्रादिकांत राहाणारा एक जलजंतु आहे; २, त्याचें जें अस्थिरूप शरीरावर आवरण असतें तो जेणें करून देवावर पाणी घालितात जो युद्धादिकांत मुखानें वाजवितात इ॰ शंखवादन, शंखवाद्य, इ॰ स॰; ३, तदाकार जें अंगुल्यादिकांवर रेषाचिन्ह असतें तो; ४, शंखोबा; ५, नवनिधींतील एक निधि आहे; शंख करणें म्ह॰ बोंबलणें; धान्यउदक इ॰ कांचा शंख वाजणें म्ह॰ त्याचा त्याचा खडखडाट पडणें.

**शंखद्राव,** पु॰ औषधार्थ शंखाचा द्रव काढित असतात तो.

**शंखध्मा,** पु॰ शंखोबा.

**शंखध्वनि,** पु॰ शंखाचा जो ध्वनि तो; २, बोंबलण्याचा जो शब्द तो.

**शंखपाळ,** पु॰ एक जिवाणू आहे; २, पालीमध्यें एक भेद आहे.

**शंखमणि,** पु॰ दिसण्यामध्यें मात्र गोरागोमटा दिसतो परंतु जामध्यें विद्याकलादि कांहीं एक गुण नाहीं तो.

**शंखळा,** स्त्री॰ रा॰ शृंखलेचा अपभ्रंश.

**शंखासुर,** पु॰ एक दैत्य होता; २, दे॰ राजतुरा.

**शंखिनी,** स्त्री॰ स्त्रियांमध्यें लक्षण वेद्य एक जाति आहे; २, केवळ थोडें दूध देणारीजी गाय तिला संकेतानें म्ह॰.

**शंखोबा,** पु॰ केवळ निरक्षर ठोंब्याजो मनुष्य त्यास निंदेनें म्ह॰

**शंख्या,** पु॰ शंखोबा; २, करंटा जो मनुष्य त्यास म्ह॰.

**शंख्यासोमल,** पु॰ सोमलांत एक भेद आहे.

**शठ,** पु॰ शहाणा असून दुसऱ्यास वंचावें म्हणून व्यवहारीं सकपटपणें वर्तण्याचा स्वभाव जाचा असा जो हरामी तो; २, कदर्यु जो मनुष्य तो.

**शंड, शंढ,** पु॰ नपुंसक तो.

**शण,** पु॰ सं॰ ताग, शणसूत्र, शणवस्त्र, इ॰ स॰.

**शत,** न॰ एक संख्या आहे १००; शतधा, शतावधि, शतसंख्याक, शतस्थान, इ॰ स॰.

**शतक,** न॰ सं॰ श्लोकादि जे शंभर अर्थ त्यांचाजो समुदाय तें.

**शतकृत्य,** न॰ शतक्रतु लाक्षणिकार्थी; २, चटणी सारिखा एक पदार्थ करित असतात तें.

**शतक्रतु,** पु॰ सं॰ इंद्र; २, इंद्रपद प्राप्त होण्याविषयीं करावे लागतात जे शंभर क्रतु ते; ३, ला॰ घडायास फार अवघड आणि घडलें असतां लोकानीं वाहवा म्हणावी अशा रूपानें विवक्षितजें कोणेक कर्म त्यास म्ह॰; उ॰ जन्मास आल्यापासून एक तळें बांधलें

एवढा

एखदा काय तो शतक्रतु केला; घरच्यें काम होईना ते बाहेर आऊन मोठा शतक्रतु करणार आहां.

**शतघृत**, न॰ सं॰ औषधार्थ शतवेळ धुऊन सिद्ध केलेंजें घृत तें.

**शतघ्नी**, स्त्री॰ एक काळीं शतावधि मनुष्यादिकांस माराया उपयोगी एक आयुध आहे जास लोकांत कारलें असें म्ह॰.

**शतचिंध्या**, स्त्री॰ रा॰ कांहीं एक वस्त्र पुष्कळ ठिकाणीं फाटून चिंध्यारूप होतो जो परिणाम ती.

**शतचूर्ण**, न॰ कोणेक पदार्थ फुटून त्याचा केवळ होतो जो चुराडा तें; २, ३लिं॰ तादृश परिणाम पावला जो तो पदार्थ तो.

**शतच्छिद्र**, ३लिं॰ शतशः भोंकें जास पडलीं आहेत असा जो वस्त्र, कागद, इ॰ त्यास म्ह॰.

**शतंजीव**, अ॰ शंभर वर्षें वांच हा अर्थ याचा प्र॰ कोणास शिंक आली असतां आशीर्वादार्थ करितात.

**शततारका**, स्त्री॰ चोविसावें नक्षत्र त्या॰

**शतपत्र**, न॰ शंभर पांकळ्या जास असतात असें जें कमल तें.

**शतपत्रिका**, स्त्री॰ शेंवतीस म्ह॰.

**शतपावली**, स्त्री॰ भोजनोत्तर भक्षिलेल्या अन्नाचा परिपाक चांगला व्हावा म्हणून प्रा॰ शंभर पावलें चालावें असा जो व्यापार करितात ती.

**शतंभीष्म**, पु॰ विद्यापराक्रमादिकें करून एकापेक्षां एक अधिक असे जे असंख्यात पृथ्वीवर पडले आहेत त्यांस म्ह॰ परंतु त्यांची विद्यमानता दाखवून प्र॰ करून जो कोणी त्याची कःपदार्थता वर्णनीय असतां प्र॰; उ॰ तूं आपली एवढी प्रतिष्ठा कशास सांगतोस तुझ्या सारिखे असे शतंभीष्म पडले आहेत.

**शतमर्दी**, स्त्री॰ रा॰ शतंमर्दी.

**शतमूर्ख**, पु॰ केवळ जो मूर्ख त्यास म्ह॰.

**शतशः**, अ॰ शंभर शंभर अशा संख्येनें मोजले जात असे.

**शतावरी**, स्त्री॰ एक ओषधी आहे.

**शत्रु**, पु॰ वैरी.

**शनवार**, पु॰ शनिवाराचा अपभ्रंश; म्ह॰ नदे त्याचा वार शनवार.

**शनवाऱ्या तेली**, पु॰ तेल्यामध्यें एक जाति आहे जे शनवारीं तेल काढीत नाहींत विकीत नाहींत.

**शनि**, पु॰ नवग्रहांतील जो सातवा ग्रह तो; २, आपल्यास उपद्रव देणारा असा जो सावकार इ॰ कांकडील तगाददार, वैरी, इ॰ पाठीस लागला असतो त्यास म्ह॰; ३, रा॰ केवळ मंद बुद्धि, अंगांत कांहीं उद्योग नाहीं, असा जो पोर इ॰ त्यास म्ह॰.

**शनिप्रदोष**, पु॰ शनवारीं त्रयोदशी असतां जो प्रदोष तो.

**शनिवार, शनिवासर**, पु॰ सातवा जो वार तो.

**शनेश्वर**, पु॰ शनैश्वर शब्दाचा अपभ्रंश.

**शनैः शनैः**, अ॰ मंद मंद गतीनें; आ, ये, बोल, इ॰ कांचें वि॰.

**शनैश्वर**, पु॰ शनि.

**शपणें**, ग्रं॰ शापणें.

**शपत**, स्त्री॰ पु॰ शपथाचा अपभ्रंश.

**शपथ**, पु॰ स्त्री॰ आण; शपथ पुरस्कर, शपथपुरस्सर

र, शपथपूर्वक, इ॰ स॰.

**शप्त**, ३लिं॰ शापिला तो, किं॰ शिवी गाळी, इ॰ दुरुच्चारानें निर्भर्त्सित केला जो तो.

**शफ**, पु॰ गाय, म्हैस, घोडा, इ॰ पशूंचे पायांचा जो खुर तो; एकशफ, द्विशफ, असे समास.

**शबर**, पु॰ सं॰ भिल्ल म्हणून मनुष्यांत जाति आहे.

**शबल**, ३लिं॰ सजातीय अनेक अर्थांचें आंत मिश्रण झाल्या मुळें ज्याची शुद्धरूपता गेली असा वर्ण, रंग, उदकादि द्रव्य, इ॰ कोणेक अर्थ तो; २, न॰ तसा झाला जो त्या अर्थाचा परिणाम तें; मायाशबल, भावशबल, इ॰ स॰.

**शब्द**, पु॰ श्रोत्रेंद्रियानें ज्याचें प्रत्यक्ष होतें असा एक विषय आहे; २, भाषणांतील जीं वाक्यें किं॰ पदें तीं प्र॰; ३, प्रथमादिविभक्ति ज्यावरून होतात अशी जी वर्णानुपूर्वी तो; ४, तूं असें कां केलेंस तूं हें बिघडलेंस इ॰ रूप दोषाधायक जें कोणेकाला उद्देशून कोणेकाचें वचन तो, लागणें, येणें, ठेवणें, इ॰ धातुयोगीं प्र॰; उ॰ न विचारतां गेलोंतर धन्याचा शब्द लागेल.

**शब्दचातुर्य**, न॰ भाषणामध्यें जे गुण असावे ते असल्या मुळें अनुमित होतें जें वक्त्याचें चातुर्य तें.

**शब्दजाल**, न॰ अनंत शब्दांचा जो समुदाय तें.

**शब्दपांडित्य**, न॰ बोलण्या सारखें ज्याचे हातून कांहीं एक व्हावयाचें नाहीं त्याचें उगीच जें कोरडें डौलाचें वाक्पाटव त्यास म्ह॰; उ॰ याचें शब्दपांडित्य मात्र ऐकून घ्यावें हातानें कांहीं एक व्हावयाचें नाहीं.

**शब्दवेधी**, ३लिं॰ कोणेक पदार्थ प्रत्यक्ष दिसत नाहीं

त्याचा

त्याचा शब्द मात्र ऐकूं येतो त्या शब्दानुसंधानानेंच त्या पदार्थाचा बाणादिकानें वेध करितो तो.

**शब्दशास्त्र**, न॰ व्याकरणशास्त्र.

**शब्दशुद्धि**, स्त्री॰ व्याकरणप्रक्रियेचा ज्ञानानें भाषणादिकांत येणारे शब्दांची होत्ये जी अशुद्धराहित्यरूप शुद्धता ती.

**शब्दालंकार**, पु॰ काव्यादि प्रबंध रचनेचा ठायीं अनुप्रास, यमक, इ॰ अलंकार असतात ते प्र॰.

**शब्दित**, ३लिं॰ शब्दानें युक्त केला जो वाद्यादि तो.

**शंभर**, ३लिं॰ शतसंख्याक जे ते.

**शंभु**, पु॰ शंकर.

**शम**, पु॰ काम, क्रोध, मोह, अग्नि, वायु, रोग, सांत, इ॰ जे त्यांचा क्षोभ होण्यास कारणभूत जो वेगविशेष उत्पन्न होत असतो तो न्यून झाल्यानें किं॰ नसल्यानें त्या त्या अर्थाची प्रकृतिरूपानें धरून, जी स्थिति ती; २, अंतःकरणामध्यें काम क्रोधादि किं॰ संकल्पविकल्पादिरूप जा अनेक वृत्ति उठत असतात तद्राहित्यें करून स्वस्थपणें जी अंतःकरणाची स्थिति ती.

**शमणें**, शमविशिष्ट होणें.

**शमन**, न॰ शम; २, शमण्याचा व्यापार; ३, ज्याचा शम जेणें करून होतो तें त्याचें; उ॰ पित्ताचें शमन सुंठसाखर.

**शमी**, स्त्री॰ एक सकंटक वृक्ष आहे; २, त्याचा देवावर वहायास आणितात जो पाला ती.

**शयन**, न॰ निजण्याचा जो व्यापार तें; २, तदुपयोगीं जें आंथरूण किं॰ माचा, पलंग, इ॰ तें; शय्यादान, करशय्या, मृदशय्या, इ॰ स॰.

शयनी

**शयनी**, स्त्री॰ आषाढ शुद्ध एकादशी.

**शय्या**, स्त्री॰ शयन, परंतु द्वितीयार्थी मानुर्येंकरू-न, प्र॰.

**शय्याट्टी**, पु॰ स्त्री॰ सह्याद्रि शब्दाचा अपभ्रंश.

**शर**, पु॰ सं॰ धनुष्यानें सोडायाचा जो बाण तो; शरजाल, शरसंधान, शरदृष्टि इ॰ स॰; २, सूर्याधिष्ठित जो मार्ग त्यापासून चंद्रादि ग्रहांचें जें याम्योत्तर अंतर येतें तो.

**शरठ**, पु॰ सं॰ सरडा.

**शरण**, न॰ सं॰ संकटापासून कोणेकाचे हातानें कोणेकाचें होतें जें संरक्षण तें; २, तादृश संरक्षण करणाराजो तें; ३, वि॰ वि॰ या संकटापासून माझें तूं संरक्षण कर अशी प्रार्थना करीत कोणेक समर्थाचा आश्रयास गेला जो तो जाणें, येणें, असणें इ॰ योगीं प्र॰; उ॰ म्ह॰ शरण आल्यास मरण देऊं नये.

**शरणागत**, ३ लिं॰ रक्षण कर्त्या प्रति रक्षण व्हावें म्हणून गेला जो तो; शरणागतवत्सल इ॰ स॰.

**शरणार्थ**, पु॰ लिंगाईत लोक लोकांस नमन करते समयीं हा शब्द उच्चारितात; अतएव हा शब्द त्या नमनाची संज्ञा.

**शरण्य**, ३ लिं॰ शरणागताचें रक्षण करण्या विषयीं स्वभाव ज्याचा तो.

**शरत्, शरद्**, स्त्री॰ षड्ऋतूंतील जो चवथा ऋतु ती; २, वर्षात्मक जो काल ती.

**शरत्काल**, पु॰ शरदृतु संबंधी जो काल तो.

**शरदृतु**, पु॰ शरत्संज्ञक जो ऋतु तो.

**शरपंजर**, पु॰ कोणेकाचे शरीरास सभोंवताले अनेक बाण टोंचिले असतां जें पंजराकार आवरण होतें तो; २, कोणेकानें शरपंजरीं पडणें म्ह॰ खिनपत पडणें किं॰ आंतून बाहेर निघायचास कोणताच उपाय सुचत नाहीं अशा एखाद्या मोठ्या संकटांत पडणें.

**शरभ**, पु॰ एक पक्षी आहे.

**शरम**, स्त्री॰ लाज, प्रा॰ प्रथमार्थी.

**शरमणें**, लाजणें.

**शरमिंदा, शरमिंधा**, ३ लिं॰ दबेल; २, आपलें कांहीं एक मर्माची उघडीक होणें इ॰ कारणानें लज्जित झाला जो तो.

**शराव**, पु॰ सं॰ परळ म्हणून जें मृत्पात्र तो.

**शरासन**, न॰ बाण सोडायाचें जें धनुष्य तें.

**शरीर**, न॰ देह; २, स्त्री पुरुषांचा गुह्यावयवास संकेतानें म्ह॰.

**शरीरदंड**, पु॰ देहदंड.

**शरीरभोग**, पु॰ शरीरानें भोगूनच साराायाचें असें उपस्थित होतें जें कांहीं दुखणें, किं॰ जखम इ॰ त्यास म्ह॰; २, देवताक्षोभ किं॰ पिशाच इ॰ जाला निमित्त नाहीं केवळ प्रारब्ध योगानेंच प्राप्त झालें असतें जें कांहीं एक दुखणें त्यास म्ह॰.

**शरीरसंपत्ति**, स्त्री॰ बलाढ्य, निरोगी, असें जें शरीर तद्रूपच जी संपत्ति ती.

**शरीरसंबंध**, पु॰ आपली मुलगी दुसऱ्याकडे दिली किं॰ त्याची आपण केली अशा प्रकारें साक्षात् किं॰ परंपरेनें होतो जो परस्परांचा संबंध तो; २, दुसऱ्यास जास बाबयाजोगा जो त्याचा शरीराशीं आपले शरीराचा स्पर्श संबंध त्यास म्ह॰;

कोणेकानें शरीर संबंधावर येणें ह्म॰ मारामारीवर येणें.

**शरीरसंबंधी**, १लिं॰ ज्याचाज्याशीं शरीर संबंध आहे ते परस्पर.

**शरीरी**, पु॰ देही.

**शर्करा**, स्त्री॰ साकर; २, रेती.

**शर्त**, स्त्री॰ प्रायः पराकाष्ठा या अर्थी.

**शर्तमर्दी**, स्त्री॰ कोणेक कार्यसिध्यर्थ पराकाष्ठेचा जो प्रयत्न ती.

**शर्थ**, स्त्री॰ शर्त.

**शर्म**, न॰ सं॰ सुख; २, प्रसंग विशेषीं ब्राह्मणाचे नावापुढें याचा प्र॰; उ॰ सोमशर्मा ब्राह्मण आला होता.

**शर्यत**, स्त्री॰ पैज.

**शलभ**, पु॰ सं॰ टोळ ह्मणून जो प्राणी आहे तो.

**शलाका**, स्त्री॰ सं॰ तृणाची किं॰ तत्सदृश बोरू, चिंवा, इ॰ कांची पिंजून केलेली किं॰ तदाकार धातु, काष्ठ, इ॰ कांची केलेली काडी ती.

**शलाकापरीक्षा**, स्त्री॰ कोणेकानें ह्मटला असतो जो कोणेक ग्रंथ त्या ग्रंथाची पोथी त्यापुढें ठेवून पोथीचा पत्रांत पाहिजे तेथें काडी घालावी ती काडी जेथें शिरेल तेथले पत्राचा अर्थ त्याला लावूं सांगावा अशाप्रकारचीजी त्याचे अध्ययनाची परीक्षा घेतात ती.

**शल्य**, न॰ शरीरामध्यें सलाया जोगा राहिलेलाजो आंत शिरलेल्या बाण, कंटक, इ॰ कांचा अंशतें; २, सं॰ स्त्रियांचे पोटांत राहलेंजें सल तें; ३, सूड न घेतां राहिलेला जो दुसऱ्यानें केलेला अपकार इ॰ रूप जें कांहीं अंतःकरणांत सलत असतें तें.

शव.

**शव**, न॰ मढें.

**शववाहक**, पु॰ शवातें स्मशानीं नेणारे जे मनुष्य ते प्रत्येकीं.

**शश, शशक**, पु॰ सं॰ ससा.

**शशविषाण**, न॰ सं॰ सशाचें जें शिंग तें, हा अर्थ अप्रसिद्ध आहे ह्मणून अप्रसिद्ध पदार्थास दृष्टांत देणें इ॰ विषयीं याचा प्र॰; उ॰ भगवत् गुणाचा अंत शशविषाण प्राय आहे.

**शशशृंग**, न॰ शशविषाण.

**शशांक, शशी**, पु॰ चंद्र मुख्यार्थी.

**शष्प**, न॰ सं॰ कोमल जें तृण तें; २, उपस्थस्थित जे केंस ते प्रत्येकीं.

**शस्त्र**, न॰ आयुध; शस्त्रपाणि, शस्त्रधारण, शस्त्रविद्या इ॰ स॰; २, ला॰ ज्या रोगादिकांचें नाशक जें औषधादि तें त्याचें असें आरोपानें ह्म॰; ३, दुसऱ्याचे पराभवाविषयीं किं॰ आपल्या उत्कर्षाविषयीं साधनभूत जें विद्या, पराक्रम, तप, पोथी, पुस्तक, खत, पत्र, इ॰ कांहीं त्यास ह्म॰; कोणेकानें कोणेकावर शस्त्र धरणें ह्म॰ त्याचें वाईट करण्याविषयीं कंबर बांधणें.

**शस्त्रवैद्य**, पु॰ शस्त्रानें शरीर कापून आंतील रोग काढून आरोग्य करणारा असा जो वैद्य तो.

**शह**, पु॰ बुदबळांचे खेळांत ज्या पगापासून आपल्या गतीनें राजावर उडी पडावी त्या पगीं दुसऱ्याचें मोहरें किं॰ प्यादें आलें असतां त्याचा जो राजास वेध येतो तो; २, ला॰ जिंकावें, मारावें, धरावें, इ॰ उद्देशानें राजा, राज्य, ग्राम, किल्ला, इ॰ कांतें लक्षून शत्रु इ॰ कानें तिकडे रोख धरून स्थिति केली

असतां

असतां जो त्याच्या त्या राजादिकांवर येध येतो तो; ३, रा० कोणेक अर्थ आपल्या कडे यावा इ० कारणास्तव याचनादि द्वारा तद्विषयीं संधान करून ठेवलें असतां त्या अर्थानें आपल्या अनुमता वांचून दुसऱ्या कडे जाऊं नये असें व्हावया जोगा त्या अर्था वर आपला होतो जो संबंध तो; कोणेकानें शहास गुंतणें इ० स्थळीं कोणेक गोष्टी विषयीं आपलें वचन गेलें, लेख गुंतला, किं० कांहीं एक करायास हातीं धरिलें असें कांहीं एक झाल्यामुळें त्या गोष्टीच्या निर्वाह न होतां आपली सुटका नाहीं अशा संकटावस्थेंत पडणें.

**शाहन**, अ० जवाहिरी दागिन्याचे पोटचे अवयव लिहायाचे प्रसंगीं त्या दागिन्याचे नावापुढें हें अव्यय लिहित असतात.

**शाहनिशाह**, पु० कों० शानिशा.

**शाहर**, न० नगर.

**शाहरपह्रा**, पु० चौकी पहारा इ० केंकरून सर्कारानें करायाचा जो शहरचा बंदोबस्त त्या कामाचें जें प्रकरण तो.

**शाहरबटाऊ**, पु० शहरांत राहणारा अतएव पुरामाचा गमनी जो त्यास ह्म०.

**शाहरा**, पु० शहारा.

**शाहरी**, ३ लिं० शहर संबंधी जो मनुष्य, भाषा, वेष, रीति, इ० तो.

**शाहागडी**, ३ लिं० शहागड ह्मणून पेंठ आहे तत्संबंधी जें पागोटें शेला इ० वस्त्र तो.

**शाहाजादा**, पु० पादशहाचा जो पुत्र तो.

**शाहाजानी**, ३ लिं० शहाजान ह्मणून पादशाह होता न

तत्संबंधी जो रुपया इ० नाणें, अम्मल इ० तो.

**शाहाजिरें**, न० जिऱ्यांत एक भेद आहे.

**शाहाजोग**, ३ लिं० पतीचा जो मनुष्य तो; १, हुंडी मध्यें जाची राखले असते त्या वांचून दुसरा जरीं कोणी रुपये घ्यावयास गेला तथापि तो पतीचा आहे तर त्यास त्या हुंडीचे रुपये यावे अशा संकेतानें एतत् शब्द विशिष्ट जी हुंडी लिहिलात तीस ह्म०; २, बिनदिकत यावयाचें, यावयाचें, जे रुपये इ० त्यांस कोणी ह्म०; उ० तुमचे शहाजोग रुपये देणें, त्याचा कोणी तंटा सांगेल.

**शाहाणपण**, न० चातुर्य.

**शाहाणा**, ३ लिं० चतुर.

**शाहाण्णव**, ३ लिं० संख्या आहे ९६.

**शाहादानी**, ३ लिं० शहाजानी.

**शाहानिशा**, पु० शानिशा.

**शाहापुरी**, ३ लिं० शहापुर ह्मणून ग्राम आहे तत्संबंधी धोतर जोडा इ० वस्त्र तो.

**शाहामत**, स्त्री० कोणेक मोठें काम ह्यातानें पार पडे असा कोणेकाचे अंगीं असतो जो प्रभाव तो.

**शाहामृग**, पु० एक पक्षी आहे.

**शाहारा**, पु० हिमज्वर, हेमंतींचा वायु, भैर्य भंगादि व्हावया जोगें साहस कर्मादिकाचें दर्शन इ० संबंधानें अंगीं थंडीची विकृति भरून लागली असतां अंगावर रोमांच उठावे अंग थरारावें अशा जाल्या विकृतीच्या लहरी येतात त्या प्र०

**शाहारें**, न० रा० शहारा.

**शाहाळें**, न० कोंवळा जो नारळ तें.

**शाई**, स्त्री० अक्षरादि लिहाया करितां लाख काजळ हिरडे

हिरडे इ० कांचा जो काळा, तांबडा, इ० किं० सुवर्णादिकांचे वरखे पाण्यांत घोंटून त्यांचा करितात जो रंग ती; २, मृदंगांचे एका तोंडावर बसवितात जें लोखंडाचे किटाचें चूर्ण इ० ती; ३, राज्य, गांव, सेनास्थान, इ० कांमध्यें राहणारे जे अनेक लोक, फौज, इ० विवक्षित ते सर्व मिळून जो समुदाय ती; उ० सगळ्या शाईंत या सारखा शूर दुसरा कोणी नाहीं; ग्राम, शहर, एतद्वाचक शब्दांपुढें तत्तत्संबंधी या अर्थी या शब्दाचा प्र० होतो; उ० पुणेशाई, मुंबईशाई, इ०; कांहीं एका व्यवहाराचे प्रवर्त्तक अतएव लोकांत प्रसिद्ध जे राजा प्रधान इ० नामांकित किती एक मनुष्य त्यांचे नामापुढें ही तत्तत्संबंधी संप्रदायादि वाच्य असतां प्र० होतो; उ० शिंदेशाई, अपाशाई, इ०; जाति गुणादिवाचक किती एक शब्दांपुढें ही याचा प्र० होतो, ब्राह्मणशाई, सोदेशाई, इ०.

**शाईशिरस्ता**, पु० साधारण जीजनरीति तो.

**शाक**, स्त्री० भाजी; संस्कृतांत हा शब्द पुंल्लिंगी आणि नपुंसकी आहे.

**शाकबेशाक**, न० नवें सिद्ध केलें जें लेख किं० कांहीं मजकूर किं० गृहादि पदार्थ इ० त्यामध्यें विवक्षित बेतापेक्षां असतो जो कांहीं न्यूनाधिकपणा तें; २, ३लिं० दे० तो न्यूनाधिकपणा आहे ज्यामध्यें असा जो लेखादि त्याचें विशेषण ही पक्षीं होतें.

**शाकंभरी**, स्त्री० एक देवी आहे; २, तीच्या प्रीत्यर्थ पौषी पूर्णिमेचे दिवशीं अनेकविध शाका मेळवून त्यांचा नैवेद्य करावा, पूजन करावें, इ० रूप व्रत करितात ती.

**शाकभाजी**, स्त्री० भाजी पाला इ०.

**शाकव्रत**, न० चातुर्मास्यांत भाजी, दहीं, दूध, आणि द्विदळ हे चार पदार्थ अनुक्रमें करून प्रतिमासीं वर्ज करावे खाऊ नयेत असें जें करितात व्रत तें.

**शाकार**, पु० घर इ० कांचे वाशांवर ओंवण घालून कवलें तृण, झांप, इ० कानीं करितात जें पर्जन्यादि निवारणार्थ आच्छादन तो; २, कों० पराचे ओंवणावर आच्छादनार्थ घालावा करितां उद्दिष्ट जें तृण झांप इ० तो; या शब्दानें कवलें नळ्याजवर व्यवहार होत नाहीं.

**शाकारणी**, स्त्री० शाकारण्याचा जो व्यापार ती.

**शाकारणें**, गृहादिक शाकारानें आच्छादित करणें पक्षीं तो नळ्या कवलें इ० कांस ही कर्मता येते.

**शाकाव्रत**, न० शाकव्रत शब्दाचा अपभ्रंश.

**शाकाहार**, पु० केवळ शाकांचाच जो आहार तो.

**शाकिनी**, स्त्री० पिशाच गणांतील स्त्रीरूप एक पिशाच जाति आहे.

**शाक्त**, पु० देवीचा उपासक जो तो; २, ३लिं० देवीसंबंधी जो पूजाविधि इ० तो.

**शाख**, स्त्री० शाक शब्दाचा अपभ्रंश.

**शाखभाजी**, स्त्री० शाकभाजी.

**शाखा**, स्त्री० वृक्षाची जी खांदी ती; २, ला० ग्रंथादि कोणेक अर्थाला वृक्षरूपतें करून मानून त्याचे जे प्रकरणादिरूप अनेक अवयव त्यांस प्र० ल०.

**शाखाचंक्रमण**, न० या शाखेवरून त्या शाखेवर

रत्या शाखेवरून त्या शाखेवर असा कोणी वानरादि फिरतो तद्वत् भाषणादि व्यवहारीं जा विषयावर जी युक्ति पाहिजे ती सोडून ही युक्ति लागू होते किं नाहीं, ती युक्ति लागू होते किं नाहीं, असें पहायाकरितां अनेक विषय धुंडीत फिरण्याचा व्यापार तें.

**शाखाचंद्रन्याय**, पु॰ वस्तुतः शाखेशीं चंद्राचा किमपि संबंध नसतां चंद्र पहावयाची खूण समजायासाठीं त्या शाखेवर चंद्र आहे असें कोणी कोणास सांगतो म्हणून एतत्सजातीय कोणेक विषयाच्या ठायीं दृष्टांत तें करून प्रमाणार्थ घेतात जो हा लोक व्यवहार तो; उ॰ समुद्रांत सूर्य बुडतो ही शाखा चंद्रन्यायें करून उक्ति आहे.

**शागिर्त**, पु॰ शागिर्द.

**शागिर्तपेशा**, पु॰ शागिर्दपेशा.

**शागिर्ती**, स्त्री॰ शागिर्दी.

**शागिर्द**, पु॰ जो ज्याचा विद्यार्थीपणा करितो तो त्याचा प्रा॰ गवई लोकांत किं॰ तालिमखान्यांत याची प्रसिद्धि आहे; २, कोणएकापाशीं देवपूजेस मांडावें, धोतें धुणून यावीं, इ॰ कामावर जो ब्राह्मण वेतन देऊन ठेविला असतो तो.

**शागिर्दपेशा**, पु॰ शिपाई वर्ज करून जीं चाकरीचीं माणसें तीं.

**शागिर्दी**, स्त्री॰ शाश्रितानें जें कर्म तें.

**शाश्रिती**, स्त्री॰ शागिर्दी.

**शाग्रीत**, ३लिं॰ शागिर्द प्रा॰ द्वितीयार्थी प्र॰.

**शाग्रीतपेशा**, पु॰ शागिर्दपेशा.

**शाट**, पु॰ छाट, प्रा॰ प्रथमार्थी.

**शाटणें**, छाटणें प्रा॰ प्रथमार्थी.

**शाटाशाट**, स्त्री॰ छाटाछाट.

**शाटी**, स्त्री॰ सं॰ नेसावयाचें किं॰ पांघरायाचें जें वस्त्र तें, परंतु संन्याशाचें भगवें वस्त्र असतें तद्विषयीं लोकांत प्र॰.

**शाठ्य**, न॰ सं॰ शठपणा.

**शाडू**, स्त्री॰ खडू प्रथमार्थी.

**शाण**, पु॰ सं॰ सहाण.

**शाणणव**, ३लिं॰ शहाणणव.

**शाण्णो**, ३लिं॰ शहाण्णव.

**शांत**, ३लिं॰ दुसऱ्यास सहन होण्यास कठीण पडतात असे जे उग्रता, क्रूरता, जलदपणा, इ॰ गुण ते ज्यामध्यें विशेष नाहींत असा जो सत्वगुणप्रधान मनुष्य, प्रकृति, औषध, अग्नि, वायु, नदी, इ॰ तो; २, मरणें, विझणें, इ॰ कारणानें, धरलेलें उद्भूतरूप सोडून स्वप्रकृतिरूपीं लीन झाला जो मनुष्य, दिवा, इ॰ तो; ३, अंतःकरणास उद्वेगादिकें करून क्षोभ होण्यास कारणभूत जे द्वेष, क्रोधादिक, तद्रहित जें स्थलादि तो; ४, स्त्री॰ शांतिशब्दाचा अपभ्रंश प्रा॰ द्वितीयार्थी प्र॰.

**शांतवन**, न॰ सांत्वन शब्दाचा अपभ्रंश.

**शांति**, स्त्री॰ शम, क्रोध, शांति, रोग शांति, इ॰ स॰; २, रोग, अद्भुतसूचित अरिष्ट, इ॰ जें कांहीं उपद्रवकारक तन्निरसनार्थ होम जपादि प्रधान जें कर्म करितात तें; ज्वरशांति, अरिष्टशांति, इ॰ स॰; ३, मरणें, आणें, इ॰ कारणानें उद्भूत रूपता सोडून पूर्व प्रकृत्यवस्थेच्या ठायीं जी स्थिति ती; उ॰ जो गृहस्थ दुखण्यास पडला होता त्या गृहस्थाची काल शांति

ति झाली.

**शांतिक**, न॰ आपल्यास अनिष्ट जें प्राप्त झालें कांहीं रोग दारिद्र्यादि तन्निरसनार्थ शास्त्रोक्त शांत्यादि कर्म तें.

**शांतिकपुष्टिक**, न॰ शांतिक पौष्टिकाचा अपभ्रंश. परंतु यज्ञयागादि मोठ्या कर्मांहून इतर जीं लहानसान कर्में तद्विषयीं प्र॰.

**शांतिकपौष्टिक**, न॰ अद्भुत शांति षोडश संस्कार इ॰ रूप इष्ट प्राप्त्यर्थ किं॰ अनिष्ट निरसनार्थ जीं कर्में तें.

**शांतिब्रह्म**, न॰ बाहेर शांत दिसून आंत जाचें कपट बहुत असतें असा जो त्यास म्ह॰.

**शांतिरस**, पु॰ नवरसांतील एक रस आहे.

**शान**, स्त्री॰ छान द्वितीय तृतीयार्थी.

**शानदार**, ३लिं॰ छानदार.

**शानदारी**, स्त्री॰ छानदारी.

**शानशुकी, शानशोकी**, स्त्री॰ छानछुकी.

**शानशूक, शानशोक**, ३लिं॰ छानछूक.

**शानिशा**, पु॰स्त्री॰ होतें किं॰ नाहीं होत, मिळतें किं॰ नाहीं मिळत, इ॰ रूप संदेह विषय जो कोणेक अर्थ तद्विषयीं होतेंच किं॰ नाहींच होत इ॰ एकरूपतेचा जो निश्चय जेणें करून संदेह विषयता ईषन्मात्र ही राहात नाहीं तो ती

**शानें**, अ॰ ऊन ही आनुपूर्वी जाचे अंतीं असले अशीं जीं अव्ययें त्याचे पुढें वाक्यालंकारार्थ याचा प्रयोग कोणी करितात; उ॰ तिथून शानें कशाला दारवथितोस हिकडेकां घेऊन शानें येईनास.

**शाप**, पु॰ कोणेकानें रागेभरून त्याचें कांहीं एक अकल्याण व्हावें असें मनांत आणून तुझें निसंतान होओ तुला दारिद्र्य येओ तुला दुष्ट योनि माप्त होओ इ॰ रूप जो वाक्य प्रयोग करितात तो; शापग्रस्त, शापमोक्ष, इ॰ स॰.

**शापगुण**, पु॰ जाति कुल इ॰ समुदाय गत जा अनेक व्यक्ति त्या सर्वांवर जो कांहीं एक दोष स्वभासिद्ध असतो त्यास पुरातन ऋष्यादिकांचें हें फल अशी संभावना करून म्ह॰; उ॰ वाघळानीं उलटें टांगून घ्यावें असा आपला त्यांस शापगुण आहे.

**शापणें**, कोण एकातें शापानें अभिसंबद्ध करणें.

**शापदग्ध**, ३लिं॰ कोणेकाचे शापानें जो कांहीं एक दुर्दशा पावला आहे तो.

**शाबर**, न॰ दृष्टिबंधादि गुण जींत आहेत अशीं जी मंत्र विद्या तें.

**शाबरी**, ३लिं॰ शाबर संबंधी जो मंत्र, विद्या, इ॰ तो.

**शाबान**, पु॰ यवनी महिन्यांतील सातवा जो महिना तो.

**शाबास**, अ॰ कोणेकाचें चांगलें कर्म पाहून आनंद झाला असतां तत्प्रशंसार्थ हा उद्गार निघतो: २. स्त्री॰ धन्य स्त्रीलिंगार्थी.

**शाबासकी**, स्त्री॰ शाबास या शब्दप्रयोगापासून कोणेकास मिळतो जो सत्कार ती.

**शाबुडी**, स्त्री॰ कों॰ साबणी म्हणून जी मिठाई ती.

**शाबूत, शाबूद**, ३लिं॰ तुटणें, फुटणें, मोडणें, मरणें, कुजणें, इ॰ कांहीं करून नाशादि संभावना असतां तें नाशादि न होतां जसाचे तसा राहिलेला जो तो; चोरी महाडी इ॰ कोणेक दोष किं॰ त्याचा

मुद्दा

मुद्दा इ॰ कोणेकावर शाबूत करणें स॰ साक्षा-दि प्रमाणानें खरा करणें.

**शाब्द**, १लिं॰ शब्दसंबंधी जी प्रक्रिया शास्त्र इ॰ कों-हीं एक तो.

**शाब्दबोध**, पु॰ शब्द समुदायापासून लिंग, वच-न, काल, इ॰जे भेदक विशेष तत्पुरस्कारें करून तसेंच प्रकृत्यर्थ प्रत्ययार्थ इ॰ अर्थांचा परस्पर संबंध यत्प्रकारक असतो तत्प्रकार पुरस्कारें क-रून जी विशिष्ट अर्थाची उपस्थिति होते तो.

**शाब्दिक**, पु॰सं॰ वैयाकरण.

**शांभवी**, स्त्री॰ संकेतानें भांगेस म॰.

**शाम**, १लिं॰ श्याम शब्दाचा अपभ्रंश.

**शामकर्ण**, पु॰ श्यामकर्णाचा अपभ्रंश.

**शामकल्याण**, पु॰ श्याम कल्याणाचा अपभ्रंश.

**शामशबल**, पु॰ श्याम शबल शब्दाचा अपभ्रंश.

**शामाठ्या**, १लिं॰ माठ्यासच म॰.

**शायदी**, स्त्री॰ साक्षी प्रथमार्थी; २, पु॰ साक्षी द्विती-यार्थी.

**शायदीदार**, पु॰ साक्षीदार.

**शायशी, शायशीं**. १लिं॰ एक संख्या आहे ८६.

**शायी**, १लिं॰ जो जेथें निजणारा किं॰ ज्या प्रकारें निजणारा तो तच्छायी; जलाच्या ठायीं निजणा-रा तो जलशायी, शेषशायी, भूशायी, इ॰ सुखें करून निजतो तो सुखशायी, उत्तानशायी, इ॰.

**शारंग**, न॰ शार्ङ्ग शब्दाचा प्रथमार्थी अपभ्रंश.

**शारदा**, स्त्री॰ वागिंद्रियाची अधिष्ठात्री सरस्वती म्हणून देवता आहे ती.

**शारदीयनवरात्र**, न॰सं॰ आश्वीन शुक्ल प्रतिप-देपासून नवमी पर्यंत जें नवरात्र तें.

**शारीर**, १लिं॰ शरीर संबंधी जें बल, तप, कष्ट, इ॰ तो; २, न॰ शारीरक; ३, गाताना कंप, ज्याचया योगें कोणेकाचे गळ्यांत असतें जें कौशल्य तें.

**शारीरक**, न॰ शरीरामध्यें धातु किती, नाडी किती, कशा आहेत, रोग किती, दोष किती, शरीराची रचना कशी, इ॰ रूप शरीरसंबंधी आणाखाचा जो विषय ज्याचें निरूपण वैद्य शास्त्रादिकांत केलें असतें तें.

**शार्ङ्ग**, न॰ विष्णूचे धनुष्याचें नाव; २, शृंगाचें जें धनुष्य तें; शार्ङ्गधर, शार्ङ्गपाणि, इ॰ स॰.

**शार्दूल**, पु॰ व्याघ्र; २, एक वृत्त आहे.

**शार्दूलविक्रीडित**, न॰ श्लोकाचें एक वृत्त आहे ज्याचे चरणाचीं अक्षरें एकोणीस असतात तें.

**शाल**, स्त्री॰ एक प्रतिष्ठित उर्णावस्त्र आहे; २, पु॰सं॰ एक वृक्ष आहे.

**शालक**, पु॰ श्यालक शब्दाचा अपभ्रंश.

**शालग्राम**, पु॰ शालिग्राम.

**शालजोडी**, स्त्री॰ शालांचे दोन फर्द मिळून जी जोडी ती.

**शालनामा**, पु॰ ज्याचे सर्वांगावर बूट असतात अशी जी शाल तो.

**शाला**, स्त्री॰ अग्निहोत्र, विद्यार्थ्यांचें अध्ययन, स्व-यंपाक, नृत्य, वस्त्रादिकांचें निर्माण, इ॰ व्यवहा-रार्थ किं॰ गाई, घोडीं इ॰ जीव, किं॰ शस्त्रें, रत्नें, इ॰ पदार्थ आंत रहाया करितां जें गृह केलें असतें ती; होमशाला, पाकशाला, गोशाला, रत्नशाला, इ॰ स॰; २, विद्याकलादि शिकविण्याचा जो कोणे-क

क स्थलीं आखाडा असतो ती; ३, अनेक मनुष्यादिकांस एक सारखी वरी, वाईट, रीति लागण्या विषयीं कारण भूत जी संभावना विषय त्या अनेकास एक सारखी शिक्षा ती जेथून होत्ये त्या अधिकरणास म्ह॰; उ॰ त्याचे घरीं कोणीही मनुष्य राहिला असता त्याला चांगली रीति लागत्ये याचें कारण त्यांची शालाच चांगली

**शालाशुद्ध**, ३लिं॰ चांगले संप्रदायाचे शालेंतला अतएव चांगला जो विद्यार्थी गवई इ॰ किं॰ त्याचें नें अध्ययन, गान, इ॰ तो.

**शालि**, पु॰ सं॰ व्रीहि म्हणून जें धान्य तो; शालिक्षेत्र इ॰ स॰

**शालिग्राम**, पु॰ गंडकींतील एके जातीचा काळा पाषाण आहे ज्याची विष्णु प्रतिमात्वें करून पूजा करितात तो

**शालिवाहन**, पु॰ एक पूर्वी शाककर्ता राजा झाला ज्याचा शक अद्यापि चालत आहे.

**शाल**, पु॰ वायकांस नेसायाचे उपयोगी एक उंच बारीक वस्त्र आहे.

**शाल्मली**, स्त्री॰ सं॰ एक वृक्ष आहे.

**शाल्योदन**, पु॰ साळीचे तांदळांचा शिजवून करितात जो भात तो.

**शावक**, पु॰ सं॰ बालक, २, ३लिं॰ शवसंबंधीजें तो.

**शाश्वत**, ३लिं॰ नश्वर नव्हे जो पदार्थ तो; २, स्त्री॰ शाश्वती; उ॰ याचा बोलण्याची शाश्वत नाहीं, या देहाची शाश्वत नाहीं म्हणून पहिल्या पासूनच ईश्वर भजनीं लागावें.

**शाश्वती**. स्त्री॰ शाश्वतपणा.

**शासणें**, क्रि॰ शासनानें कोणेकास युक्त करणें.

**शासन**, न॰ पारिपत्य; २, सेवकादिकांस धनी इ॰ कानी कांहीं एक गोष्ट करण्या विषयीं केली जी आज्ञा तें; ३, राजादिकानें आपले कडे धनीपणा घेऊन प्रजादिकांस अनुकूळ मार्गांत वर्तवावें असा जो व्यापार तें.

**शासनीय**, ३लिं॰ शासन करायास योग्य जो अपराधी, सेवक, प्रजा, इ॰ तो.

**शास्ता**, पु॰ शासन करणारा जो राजा गुरु इ॰ तो.

**शास्त्र**, न॰ कोणेक विद्या विषयांतें अधिकृत करून प्रवृत्त झालेलीं जीं ईश्वराचीं किं॰ इतर कोणेक ज्ञात्यांचीं विधायक वचनें तद्रूप जे विषय भेदें करून भिन्न भिन्न शब्द प्रपंच ते म॰; न्यायशास्त्र, वेदांतशास्त्र, धर्मशास्त्र, इ॰ स॰; शास्त्रमार्ग, शास्त्रवासना, शास्त्रज्ञ, इ॰, कोणेक अर्थ शास्त्रास असणें नसणें इ॰ स्थलीं शास्त्रविधिमात्र यथाकथंचित् निर्वहित होई इतका किं॰ अशा प्रकारें, म्हणजे ईषन्मात्र, किं॰ जे गुण असावे ते नसतां केवळ नामधारी रूपानें असणें नसणें इ॰; उ॰ आज घरांत शास्त्रास साखर नाहीं मग शेरभर देऊं कुठली; हा आपला उगीच शास्त्रास चाकू आहे याणें बोट देखील कापणार नाहीं; हाच प्रकार घेऊन शास्त्रापुरता शास्त्राचा इ॰ प्र॰ करितात.

**शास्त्रव्युत्पत्ति**, स्त्री॰ न्यायशास्त्रादि शास्त्र ग्रंथ लावण्याचे उपयोगी शास्त्राध्ययनें करूनच झालेली जी व्युत्पत्ति ती; उ॰ पुराण सांगण्यास केवळ शास्त्रव्युत्पत्ति नको काव्यव्युत्पत्ति असली म्हणजे

शालें

**शास्त्रार्थ**, पु॰ प्रवृत्ति निवृत्ति विषयीं नियामक जें धर्मशास्त्रादि शास्त्र तत्प्रतिपादित जो कोणेक कर्माविषयीं विधिरूप किं॰ निषेधरूप अर्थ तो; कोणेक गोष्टीचा शास्त्रार्थ करणें म्ह॰ ती गोष्ट यथाकथंचित् केली तरी करणें; शास्त्रार्थास म्ह॰ शास्त्रास.

**शास्त्री**, पु॰ शास्त्राध्ययन केलें आहे तो; २, जा शास्त्राचें अध्ययन ज्याणें केलें तो तच्छास्त्री; न्यायशास्त्री, धर्मशास्त्री, इ॰ स॰; शास्त्रज्ञ ब्राह्मणाचें नावापुढें हा प्रतिष्ठार्थ शब्द लागतो; रामशास्त्री, कृष्णशास्त्री इ॰.

**शास्त्रीय**. ३ लिं॰ शास्त्रसंबंधी जो विषय परिभाषा, व्यवहार, ज्ञान, इ॰ तो.

**शास्य**, ३ लिं॰ सं॰ शासनीय जो तो.

**शाहत्तर**, ३ लिं॰ संख्या आहे ७६.

**शाहिदी**, स्त्री॰ पु॰ शायदी.

**शाहिरी**, ३ लिं॰ शाहीर जो नत्संबंधी जो वेष लावणी इ॰ तो.

**शाहीद**, पु॰ साक्षीदार.

**शाहीर**, पु॰ पोत्याचा तमाशा करून उपजीविका करणारा जो लावण्याचा कवी तो; २, दुसऱ्याच्या लावण्या म्हणून तमाशावर उपजीविका करणारा जो त्यासही म्ह॰.

**शाळ**, स्त्री॰ शाला शब्दाचा अपभ्रंश; यज्ञशाळ, पाकशाळ, इ॰ मा॰ स॰ प्र॰.

**शाळक**, पु॰ रा॰ श्यालक.

**शाळंका**, स्त्री॰ शाळुंखा.



**शाळंकृत**, ३ लिं॰ सालंकृताचा अपभ्रंश.

**शाळंखा**, स्त्री॰ शाळुंखा.

**शाळग्राम**, पु॰ शालिग्राम.

**शाळसूद**, ३ लिं॰ रा॰ साळसूद.

**शाळा**, स्त्री॰ शाला.

**शाळाशुद्ध**, ३ लिं॰ शालाशुद्ध.

**शाळुंका, शाळुंखा**, स्त्री॰ महादेवाचें लिंग बसवायासाठीं पाषाणादिकांची योन्याकार जी बैठक करितात ती.

**शाळू**, पु॰ जोंधळ्यांत एक जाति आहे, २, हेमंत ऋतूंतील लवकर आणारे जे दिवस त्यांस म्ह॰

**शाळूसोबत**, स्त्री॰ शाळू सोबत्याची जी सोबत ती.

**शाळूसोबती**, पु॰ शेवटपर्यंत सोबत देणारा नव्हे मध्येंच सोडून जाणारा असा जो सोबती त्यास म्ह॰.

**शाळें**, न॰ शहाळें.

**शाळोंका, शाळोंखा**, स्त्री॰ शाळुंखा.

**शाळोत्री**, पु॰ अश्वाची परीक्षा आणि चिकित्सा जांत सांगीतली आहे असें जें शालिहोत्र शास्त्र तें जास येतें म्हणून त्याजवर उपजीविका करणारा तो.

**शिऊळ**, स्त्री॰ बैल इ॰ कांची मान अडकायासाठीं जो कडाचे कडेस भोंकें पाडून जा त्यांत घालायाच्या खुंट्या केल्या असतात त्या प्र॰; २, मुखछिद्राचें आकुंचन करून पाव्या सारिखा जो मुखानें शब्द करितात ती.

**शिंक**, स्त्री॰ शैत्यादिकामुळें नाकांतून सशब्द वायूचें निःसरण व्हायाजोगी जी वायूची चेष्टा होते

ल्ये ती.

**शिककाई**, स्त्री॰ शिकेकाई.

**शिकजी**, स्त्री॰ गुलाबाचें फूल इ॰ कांच्या वासला-वून जो साखरेच्या पाक करितात ती.

**शिकणाऊ**, ३ लिं॰ त्या त्या विद्या कला यांचें नैपुण्य यावें ह्मणून त्या त्या कामावर लागलेला जो तो; उ॰ लिहिणें पुष्कळ पडलें कोणी शिकणाऊ कार-कून असले तर लिहायास आणून बसवा ह्मण-जे दोघांचीं ही कामें होतील, २, गुरुपासून शिकू-न साध्य केलेलें जें गाणें बोलणें इ॰ तो.

**शिंकणी**, स्त्री॰ एक औषधी आहे, जी हुंगली अ-सतां शिंका येतात ती.

**शिंकणें**, कोण एकानें शिंकेनें युक्त होणें.

**शिकणें**, विद्या कलादि आपणास यावें ह्मणून तद्वि-षयक जी शिक्षा तद्विशिष्ट होणें आणि तद्द्वारा तो विषय तद्विषयक आंगीं प्राविण्य यायया जो-गा बुद्धींत घेणें.

**शिकंदर**, पु॰ पक्का हरामी सोदा असा जो मनुष्य त्यास ह्म॰.

**शिकरण**, स्त्री॰ शिखरण.

**शिंकरणें**, वायुवेगानें शब्द पुरःसर नासिकेंतील श्लेष्मा बाहेर पाडणें किं॰ तादृश व्यापारानें ना-सिका श्लेष्म्यानें वियुक्त होई अशी करणें.

**शिकरी**, स्त्री॰ कों॰ रहाटाचे माळेस लोटा बांधाया-चे उपयोगी जो दोरीच्या तुकडा असतो ती.

**शिकल**, स्त्री॰ जंगलेलीं जीं तरवार इ॰ शस्त्रें त्यां च्या जंग जाऊन जिल्हे यावी ह्मणून त्यांजवर क-रितात जो घर्षण संस्कार ती.

**शिकलकर**, **शिकलगार**, पु॰ शिकल करण्याचें कसब करितो तो.

**शिकवणी**, स्त्री॰ कोण एकास कांहीं एक गोष्टी वि-षयीं बुद्धिवाद सांगण्याच्या जो व्यापार ती; प्रथ-मांत प्रयोग प्रा॰ नाहीं.

**शिकस्त**, ३ लिं॰ वि॰ पराभव पावला जो तो.

**शिका**, पु॰ शिक्का.

**शिकाऊ**, ३ लिं॰ शिकणाऊ.

**शिकार**, स्त्री॰ पारध.

**शिकारखाना**, पु॰ अरण्य संबंधि धरून आणलेले अनेक पशुपक्ष्यादि ठेवायाची जागा असते तो; किं॰ तोफारखाना.

**शिकारबंद**, पु॰ घोड्याचे खोगरास वर पाठबंद द-वासन इ॰ बांधायया करितां जे जे मागें पुढें बारी-क दोरीचे बंद लावले असतात ते प्र॰.

**शिकारी**, ३ लिं॰ शिकारेचे उपयोगी जो कुतरा बं-दूक इ॰ तो; २, स्त्री॰ लांकडाची बैठक जास अस-ल्ये असें जें शिंकें ती.

**शिकाळी**, **शिंकाळी**, स्त्री॰ जी दोरी धरून उचल लें असतां पात्र समान उचललें जावें अशी जी त्या-पात्राचे गळ्यास दोरी बांधली असते ती; २, तद्वि-शिष्ट जें तें पात्र ती.

**शिकी**, स्त्री॰ गलबताचें शीड गुंडाळून काठीस बां-धायाचे उपयोगी शिडास संबंध केलेले जे दोरी-चे तुकडे असतात ते प्र॰.

**शिकील**, स्त्री॰ शिकल.

**शिकीलकर**, **शिकीलगार**, पु॰ शिकलगार.

**शिकें**, **शिंकें**, न॰ पोटीं भांडीं इ॰ पदार्थ घालून टांगा-

याचे उपयोगी दोरीच्या विणून पात्र विशेष करितात तें.

**शिकेकटार**, स्त्री० शिका दौत इ० सरंजाम विशिष्ट जी राजादिकांची कटार ती;२,प्रेत दाहार्थ तिकट्यावर अग्निविशिष्ट पात्र ठेवून नेत असतात त्यास संकेतानें ह्म०

**शिकेकाई**, स्त्री० एक वल्ली आहे व तिचा जा शेंगा ती.

**शिकेदौत**, स्त्री० शिका करायाची शाई ठेवायाकरितां जी दौत केली असते ती.

**शिकेबरदार**, पु० शिकेकटार बाळगाया करितां नियुक्त जो अधिकारी असतो तो.

**शिक्कल**, स्त्री० शिकल.

**शिक्का**, पु० मोहोर पुतळी इ० नाणें किं० सनद इ० पत्र इ० कांवर प्रभूच्या नावाचें चिन्ह असावें ह्मणून त्यांजवर माराया करितां प्रभूचे नामाक्षराचा जो ठसा केला असतो तो किं० त्याणें नाणें पत्र इ०कांवर उमटतें जें चिन्ह तो;२,चिन्हार्थ काहीं एकावर मारितात जो कोणेक ठसा त्यास ह्म०; ३,कों० देवी यावयाकरितां शरीरावर जो व्रण करून घेतात त्यास ह्म०;४,शरीर,फल,वस्त्र,इ० काहीं पदार्थावर कांहीं एक संबंध बोधक जें चिन्ह असतें त्यास ह्म०

**शिक्केकटार**, स्त्री० शिकेकटार.

**शिखणाऊ**, ३ लिं० शिकणाऊ.

**शिखणें**, शिकणें.

**शिखर**, न० वृक्ष, पर्वत, घर, इ० कांचा जो शिरोभाग तें;२,देवाळयादिकांवर शृंगाकार उंच जी रचना केली असते तें; कोणेक गोष्ट शिखरास जाणें इ० स्थलीं त्या त्या गोष्टीच्या कळस होणें.

**शिखरण**, स्त्री० पिकलेलीं केळीं,खरबुजें,इ० पदार्थ कुसकरून आंत दूध,दहीं, इ० घालून भुरकून खाया जोगा पातळ पदार्थ करितात ती.

**शिखरिणी**, स्त्री० एक श्लोकाचें वृत्त आहे जाचे चरणाचीं अक्षरें सत्रा असतात.

**शिखवणी**, स्त्री० शिकवणी.

**शिखा**, स्त्री० मस्तकावर भोंवताल्चे केस काढून मध्येंच जो केश समुदाय राखितात ती;२,मोर,कोंबडा,चंडोल,अश्व,इ० कांचे मस्तकावर मध्यें जो केशादिरूप अवयव वाढला असतो ती;३,तत्सदृश अश्वादिकांचे मस्तकावर जें कलगी इ० लाविलें असतें ती;४,अग्नीची जी ज्वाला ती.

**शिखानष्ट**, पु० संकेतानें यवनास ह्मणतात.

**शिखामणि**, पु० मुकुटमणि.

**शिखासूत्र**, न० द्विजाति चिन्हरूप जें शिखा आणि जानवें तें; कोणेकानें शिखासूत्रावर येणें ह्म० क्रोधावेशानें वैतागून शिखासूत्र टाकायाचे लागास येणें.

**शिंग**, न० कितीएक जातीचे पशूंचे मस्तकास जे अस्थिरूप अवयव फुटतात ते प्र०;२,तदाकार वांकडें पितळ इ० कांचें जें मुखवाद्य करितात तें.

**शिंगट**, न० नळ्याची दारू भरून उडवाया करितां जें पशूचें पोकळ शिंग घेतात तें;२,निंदाद्यर्थ सरीं शिंगास च ह्म०.

**शिंगडा**, पु० बंदुकेची दारू ठेवाया करितां कंबरेस

स बांधायाचे उपयोगी शृंगाचें किं॰ तदाकार पितळ, इ॰ धातु, किं॰ चर्म, इ॰ कांचें पात्र करितात तो.

**शिंगडी**, स्त्री॰ कों॰ पावटा, तूर, इ॰ कांचे वाळलेल्या शेंगांचा जो समुदाय ती.

**शिगडी**, स्त्री॰ कों॰ लहान जो शिगा ती.

**शिंगडें**, न॰ कों॰ शिंगडी.

**शिंगरट**, न॰ शिंगरूं जें त्यास निंदेनें म्ह॰.

**शिंगरवट**, पुलिं॰ पुरता शिंगरूंपणा ज्याचा गेला नाहीं असें जें घोडें तो.

**शिंगरूं**, न॰ घोडें, खेचर, गाढव, यांचें जें लहान पोर तें.

**शिगलोटा**, पुलिं॰ आंतील धान्यादिकांची शीग लोटून सपाट केलें जें तीर इ॰ माप किं॰ पंचपात्री इ॰ पात्र तो.

**शिंगशिंगोटी**, स्त्री॰ गाय, बैल, म्हैस, इ॰ जे पशु तत्संबंधी जें शिंग इ॰ माण्यंग भूम्यादिकांत पडलें असतें ती; उ॰ जेथें मेलेलीं गुरें ओढून टाकितात तेथें शिंगशिंगोटी पडत असते; २, ला॰ गाय, म्हैस, इ॰ जें लहान मोठें गुरूंढोर, इ॰ त्यास प्रसंग विशेषीं म्ह॰.

**शिंगळद्वीप**, न॰ सिंहलद्वीपाचा अपभ्रंश.

**शिंगा**, पु॰ कों॰ माडाचे झांवळीचा जो अग्र भाग तो.

**शिंगा**, पु॰ अल्पवयस्क जो घोडा तो.

**शिंगाडा**, पु॰ तळें इ॰ कांचा ठायीं एक वेल असतो त्याचें जें फळ तो; २, मत्स्यांत एक जाति आहे; ३, पुलिं॰ ज्याचीं लांब शिंगें जास्त आहेत असा जो

गाय

गाय म्हैस इ॰ तो.

**शिंगाड्या**, पु॰ वाद्यरूप जें शिंग तें वाजविणारा जो मनुष्य तो; २, पुलिं॰ ज्याचीं शिंगें मोठीं असतात असा जो टोणगा, बैल, इ॰ तो.

**शिंगाळ**, पुलिं॰ कों॰ शिंगानीं मारण्याचा स्वभाव ज्याचा असा जो पशु तो; २, ला॰ गांवकुसवांस निंदेनें म्ह॰; ३, शिंगाड्या द्वितीयार्थी.

**शिंगाळीकेळ**, स्त्री॰ रा॰ केळींत एक जाति आहे.

**शिंगाळू**, पुलिं॰ शिंगें फुटून बोडकेपणा ज्याचा गेला असा जो एडका काळवीट इ॰ तो; २, शिंगाळ.

**शिंगाळेंकेळें**, न॰ शिंगाळे केळीचें फळ तें.

**शिंगाळ्या**, पुलिं॰ रा॰ शिंगाड्या द्वितीयार्थी.

**शिंगी**, स्त्री॰ अल्पवयस्क जी घोडी ती.

**शिंगेळ**, स्त्री॰ कों॰ शिंगाळी केळ.

**शिंगेळीकेळ**, स्त्री॰ शिंगाळी केळ.

**शिंगेळेंकेळें**, न॰ शिंगाळें केळें.

**शिंगोटी**, स्त्री॰ गाय, म्हैस, इ॰ पशूचें जें शिंग त्यास प्रसंग विशेषीं म्ह॰; २, तद्विशिष्टजी ती पशुजाति तीसही प्रसंग विशेषीं म्ह॰; उ॰ दोन शिंगोट्या होत्या त्याही सर्कारांत नेल्या; आम्हीं यंदा शिंगोटीची जरबाद केली आहे.

**शिग्रु**, पु॰ सं॰ शेगवा.

**शिजणें**, तांदूळ, डाळ, भाजी, इ॰ पदार्थ जलाग्नि संयोगानें पक्क होणें; २, ला॰ कोणेक गोष्ट कोणेक प्रकारचे परिणामावर आणण्या करितां घाटत असणें; उ॰ तुमचे कडे मुलगी मागावी असें शिजतें आहे निश्चय होईल तेव्हां खरें; कोणेका-

चें

नें कोणेक स्थळीं शिजणें ख॰ त्याणें लटलेलें भाळणें; २, ऊष्मा होणें.

**शिजवक**, न॰ रा॰ संग्रहीं राहिलें असतें जें भात, भाकर, इ॰ शिजलेलें अन्न तें.

**शिजाळू**, ३ लिं॰ सजाती यापेक्षां लवकर शिजायाजोगा जो डाळ, अळू, इ॰ पदार्थ तो.

**शिझणें**, कों॰ शिजणें.

**शिझाळू**, ३ लिं॰ शिजाळू.

**शिंट**, स्त्री॰ कों॰ कोणेक पदार्थावर पर्जन्यादि संबंधी उदकाचा येतो जो तुषार ती.

**शिटणें**, पक्ष्यानीं हगणें; २, घोडीनें उनाड सुटून लहान सहान घोड्या पासून मैथुन करून घेणें.

**शिटवा**, पु॰ रा॰ बायकांची विष्ठा जीचें बांगी इ॰ कांम स्वत घालतात तो.

**शिटा**, पु॰ शिंतोडा.

**शिटाऊ**, **शिटाव**, ३ लिं॰ घोडी शिटल्यामुळें तिज पासून उत्पन्न झाला जो वाईट साईट घोडा इ॰ तो; २, पक्का हरामी नेपन्न मंगळीचा जो मनुष्य इ॰ त्यास ख॰

**शिटी**, ३ लिं॰ छिटी.

**शिडकणें**, शिंपडणें.

**शिडकाठी**, स्त्री॰ गलबतावर जा काठीस शिड बांधलें असतें ती काठी.

**शिडकाव**, पु॰ छिडकाव.

**शिडंब**, पु॰ एक वन्य वृक्ष आहे.

**शिडशिडणें**, कों॰ पर्जन्यानें शिडशिड पडणें.

**शिडशिडी**, स्त्री॰ कों॰ हां हां ह्मणतां येऊन जाणारी अशी पर्जन्याची केवळ लहान जी सर ती.

**शिडशिडींत**, ३ लिं॰ रा॰ सडसडीत.

**शिडशीड**, अ॰ अनु॰ शिडशिडी रूप जो पर्जन्य त्याचे पतनाचें वि॰.

**शिडा**, ३ लिं॰ रा॰ सडा विशेषणार्थी.

**शिडाइती**, ३ लिं॰ शिडाईत केल्यानें झालेलें जें अंबा इ॰ झाड तो.

**शिडाईत**, न॰ अंबा इ॰ कांचे झाडावर दुसऱ्या अंबा इ॰ झाडाची ढाळी लावून करितात जें कमल तें.

**शिडासोटा**, ३ लिं॰ सडासोटा.

**शिडिशिडी**, अ॰ शिडशीड.

**शिडी**, **शिढी**, स्त्री॰ लांब लांब दोन लांकडें हात सवा हाताचे अंतरानें उभी मांडून त्यांस मध्यें पाय ठेवायास हात सवा हात लांबीचे लांकडाचे अनेक तुकडे अडवे संबद्ध करून जें माडी इ॰ कांवर चढायास साधन करितात ती.

**शिणक**, स्त्री॰ वाय्वादुपद्रवानें पोटांत किं॰ हस्तपादावयवास वारंवार येत असते जी तिडीक ती.

**शिणकणें**, शिणकानी व्यथित होणें.

**शिणगार**, पु॰ शृंगार प्रथमार्थी.

**शिणगारणें**, शृंगारणें.

**शिणणें**, मनुष्यादिकानें शिणानें विशिष्ट होणें.

**शितकण**, पु॰ न॰ शिजलेल्या भाताचें जें एक शीत तो तें.

**शितकूण**, पु॰ रा॰ शितकण.

**शितडणें,** रा॰ शिपडणें; २, कों॰ शितोडणें.

**शितडा,** पु॰ शितोडा.

**शितडी,** स्त्री॰ दह्यीं नासल्यानें ज्या भाताच्या शिता सारिख्या गोळ्या होतात त्या म॰.

**शितवड,** स्त्री॰ कों॰ कोणेक स्थळीं पडला असतो जो शितांचा पसारा तो.

**शितळ,** १लिं॰ शीतळाचा अपभ्रंश; २, कों॰ खर नव्हे असा जो नांगर इ॰ तो.

**शितळशिमगा,** पु॰ आपले घरीं लहान मुलगें असतां रंग पंचमीचे दिवशीं कि॰ वर्षप्रतिपदेस. इतरांचीं मुलें बोलावून त्यासर्वांस वसंती रंगाचीं आंगडीं टोपडीं साकरेच्या गाठ्या इ॰ द्यावें असा जो समारंभ करितात तो.

**शितळाई,** स्त्री॰ थंडावा.

**शितळादेवी,** स्त्री॰ शीतलादेवीचा अपभ्रंश.

**शितागोर,** स्त्री॰ रा॰ शतावरी.

**शिताचंवरी,** स्त्री॰ रा॰ शितागोर.

**शितापी,** स्त्री॰ शिताबी.

**शिताफळ,** स्त्री॰ एक झाड आहे; २, न॰ त्याचें जें फळ तें.

**शिताफळी,** स्त्री॰ दे॰ शिताफळ प्रथमार्थीं.

**शिताबी,** स्त्री॰ कोणेक कर्म त्वरेनें करून चांगलें करावें असें जें अंगीं सामर्थ्य असतें त्याचा जो त्या कर्मावर प्रयोग करितात ती.

**शितेच्याकानवला,** पु॰ एक आरण्यक झाड आहे त्याचे पानास ह्म॰.

**शितैन,** न॰ साठ यासंख्येचें अरबी नाव, परंतु यवनी शकाचे संवत्सरसंख्येविषयीं मात्र म॰.

शितोडणें,

**शितोडणें,** कों॰ पर्जन्यानें थेंब थेंब गळे अशा प्रकारें पडणें.

**शितोडा,** पु॰ आघातादिकामुळें आधारापासून सुटून उडतो जो उदकादिकाचा बिंदु तो; २, वरून पर्जन्यादिकाचा पडतो जो थेंब त्यास ही ह्म॰; ३, उदकादिकाचा जो सेक तो.

**शिथकण,** पु॰ कों॰ शितकण.

**शिथवड,** स्त्री॰ कों॰ शितवड.

**शिथिल,** १लिं॰ ज्याचे आरंभक, अवयवांचा संयोग दृढ नव्हे असा जो पदार्थ तो; शिथिलांग शिथिलावयव इ॰ ह्म॰.

**शिंद,** स्त्री॰ खजुरी सारिखें एक झाड आहे; २, केवळ अरुंद भिंत टिकणार नाहीं ह्मणून लांकडाचे तुकडे एकास एक संबद्ध करून जी भिंत्याकार रचना करितात ती जिला चुना माती यांचा बाहेरून लेप केला असतां भिंती सारखी दिसते ती.

**शिंदळ, शिंदळ,** १लिं॰ व्यभिचारी जो पुरुष किं॰ स्त्री तो.

**शिंदळकी, शिंदळकी,** स्त्री॰ शिंदळाचें जें कर्म तें.

**शिंदळचार, शिंदळचाळे,** पु॰ नटावें मुरडावें गंधकुंकूं रेखून लावावें चट्टी पट्टी करावी इ॰ जा शिंदपणाच्या अभिव्यंजक चेष्टा ते.

**शिंदळटेव,** पु॰ रा॰ शिंदळचार.

**शिंदळवडा, शिंदळवाडा,** पु॰ कोणाचाहीं कोणी जावें कोणी नजावें हा ताळतंत काहीं जेथें नाहीं असा जो कोणेक गृहीं गावीं व्यभिचाराचें बाहुल्य मस्त असतें तो.

शिंदळसोव,

**शिंदळसोव**, पु॰रा॰ कोणेक गोष्टी विषयीं कळ-न असलें तरीं नेणतेपणा घेऊन विचारीत असावें मनांतून करायाचें असतांही नको न-को ह्मणत असावें इ॰ रूप जो व्यभिचारिणी सारखा वर्त्तन प्रकार ते.

**शिंदा**, पु॰ दासीचे पोटीं उत्पन्न झाली जी संतति तद्रूप जी जाति तो.

**शिंदापोरगा**, पु॰दे॰ आपले दासीचा पुत्र असू-न आपले घरीं चाकरी करून असतो तो.

**शिंदेशाई**, श्लिं॰ महादजी शिंदा ह्मणून पेश-वे सरकारचा सरदार होता त्यापासून प्रसिद्ध झालेल्या जा वस्त्रालंकारादिकांचा तऱ्हा किं॰ त्या तऱ्हेचे वस्त्रालंकारादि ती.

**शिदोरी**, स्त्री॰ अरण्य ग्राम मार्ग इ॰ कांच्या ठायीं भोजनार्थ न्यावया करितां शिजलेल्या अन्ना-ची वस्त्र, पात्र, इ॰ कांत बांधिली असत्ये जी गा-ठोडी ती.

**शिद्दी, शिद्धी**, पु॰ यवनांत एक जाति आहे.

**शिधा**, पु॰ भोजनार्थ पाक कराया करितां घेतात जो तांदूळ, डाळ, पीठ, तूप, लांकडें, इ॰ पाक सा-मग्री तो.

**शिधापाणी, शिधासामान**, न॰ शिधा इ॰.

**शिधासामग्री**, स्त्री॰ शिधा इ॰.

**शिधोरी**, स्त्री॰ शिदोरी.

**शिनळ**, श्लिं॰ शिंदळ.

**शिनळकी**, स्त्री॰ शिंदळकी.

**शिंप**, स्त्री॰ समुद्रादिस्थित जळ जंतूचीं आवरक शूर्पाकार दोन हाडें असतात तीं प्र॰; २, कांठी बो-रूचें पेर इ॰ कांचे अग्र भागीं, लेखणी, इ॰ कराया-साठीं सुरी इ॰ काने तिरकस तासलें असतां जो तत्सदृश आकार होतो ती.

**शिंपट**, न॰ कों॰ सुपारीचे झाडास फळें यावयाचा जो अवयव फुटत असतो तें.

**शिंपटी**, रा॰ शिंपट.

**शिपटी**, स्त्री॰ अश्वादिकास माराया करितां जी वृक्षादिकाची बारीक काठी घेतात ती.

**शिंपडणें**, स्थळादि कोणेक पदार्थावर बिंदुशः से-क होई असें जळ, रंग, गंध, इ॰ टाकणें.

**शिंपणें**. खळी इ॰ चांत स्थित जें पाणी इ॰ सद्रव पदार्थ तो स्थळादिकावर सेक होई अशा प्रकारें हस्तादिकानें त्याजवर उडविणें; पक्षीं त्या स्थळा-दिकास ही कर्मता; २, न॰ शिमग्याचे खेळाचे स-माप्तीस जो रंगाचा सेक अंगावर करितात तें; ३, रंगपंचमीस ह्म॰.

**शिपतर, शिंपतर**, न॰ एक वंशपात्र आहे.

**शिंपला**, पु॰ जीमध्यें मोत्यें उत्पन्न होतात अशाजा-तीची किं॰ जिच्या पाठीवर रेषा असतात अशी जी शिंप तिला ह्म॰; २, ला॰ गंध इ॰ ठेवाया करि-तां आकार विशेषाचें धातुमय पात्र करीत अ-सतात त्यास ह्म॰.

**शिंपली**, स्त्री॰ रा॰ सुपली.

**शिंपा**, पु॰ माडास नारळ यावयाचा जो पोगींतून अवयव बाहेर येतो तो; २. रा॰ शिंप्यास ह्म॰.

**शिपाई**, पु॰ सैन्यामध्यें युद्ध करणारे जे योद्धे ते प्र॰; २, वसूल, वासूल, चवकी, पहारा, इ॰ कामावर ठे-विला असतो जो तरवार, सोटा, इ॰ शस्त्र बाळग-णारा

णारा राजादिकांचा दूत तो; ३.ला॰ युद्ध वाद प्रतिवाद इ॰ कर्मांचे ठायीं न भितां धीटपणें उत्साहानें प्रवृत्त होण्याचा स्वभाव ज्याचा असा जो त्यास म्ह॰; ४, डोली, पालखी, इ॰ कांची दांडी जें जाल दिवटी इ॰ कांस आधारभूत केंची सारिखीं दोन दोन लांकडें एकत्र संबद्ध केलीं असतात तीं दोन दोन मिळून एक. किं॰ प्र॰.

**शिपाईप्यादा**, पु॰ रा॰ शिपाई खिजमतगार आसूद इ॰ तो.

**शिपाईराणा**, पु॰ कों॰ शिपाईप्यादा.

**शिपायगिरी**, स्त्री॰ शिपायाचें जें कर्म ती; २, ३लिं॰ शिपाईलोक संबंधी जो वेष, बाणा, बोलणें, इ॰ तो.

**शिपायडा, शिपायडें**, पु॰ न॰ शिपायास निंदेनें म्ह॰.

**शिपार**, स्त्री॰ गलबतास खालून पाण्याचा उपद्रव होऊं नये म्हणून डांबर रोमण इ॰ कें करून जो बाहेरून लेप करितात तो.

**शिपारशी**, ३लिं॰ शिफारशी.

**शिपारस**, स्त्री॰ शिफारस.

**शिंपी**, पु॰ वस्त्र शिंवणें, विकणें, इ॰ व्यापार करणारी एक जाति आहे; २, स्त्री॰ शिंप प्रथमार्थीं; ३, उराचे मध्यभागीं पोटाकडे उतरत गेलेली जी खळी असते ती; ४, गवतांत एक जाति आहे.

**शिंपुरडा**, पु॰ शिंप्यास निंदेनें म्ह॰.

**शिंपूट**, न॰ कों॰ शिंपट.

**शिफारशी**, ३लिं॰ हिमाइती.

**शिफारस**, स्त्री॰ राजा इ॰ कोणेक थोराजवळ कोणेकाची मान मान्यता व्हावी म्हणून त्याचे विद्या शौर्यादि गुणाची कोणी करितो जी प्रशंसा ती; तूं यांत काय मोठी शिफारस केलीस इ॰ स्थळीं प्रशंसा करायाजोगें काय कर्म केलेंस असा अर्थ होतो; २, हिमाईत.

**शिबंदी**, स्त्री॰ किल्ला शहर इ॰ कांचे संरक्षणार्थ ठेविले असतात जे पायचे शिपाई ती.

**शिबाड**, स्त्री॰ गलबतांत एक भेद आहे.

**शिबिका**, स्त्री॰ सं॰ पालखी.

**शिबिर**, न॰ सं॰ सैन्यांत राजा सेनापति इ॰ कांचे पृथक् पृथक् असतात जे गोट तें.

**शिबुटलें**, न॰ कों॰ शिंपतर.

**शिबें**, न॰ पोसाळें दोडका निबर झाला असतां आंत जें तंतुमय जाळ होतें तें; २, मनुष्याचे आंगावर एकत्व योग होत असतां तें कि॰ त्याचीं जीं ठिकें पडतात तीं प्र॰; ३, गुळ साकर इ॰ कांचे रांध्यावरचा मळ काढणें इत्यादि अर्थ काठीस बांधलेलें शिपतर इ॰ रूप जें साधन करितात तें; ४, वेळणी म्हणून जें पात्र तें.

**शिमगा**, पु॰ फाल्गुन मास जो तो; २, त्या मासांत जो होलिकोत्सव होत असतो तो; शिमगा करणें म्ह॰ बोंबलणें; म्ह॰ शिमगा जाई आणि कवित राही.

**शिमटी**, स्त्री॰ कों॰ शिपटी.

**शिमरा**, ३लिं॰ कों॰ विशोभित दिसाया जोगें बसकट जें नाक आणि तद्विशिष्ट जो मनुष्य त्यास निंदेनें म्ह॰.

**शिमशेजारी**, पु॰ रा॰ शींवशेजारी.

**शिमा**, स्त्री॰ सीमा शब्दाचा अपभ्रंश.

**शिर**, न॰ मस्तक, शिरोभूषण, शिरोवेष्टन, शिरःकंप इ॰ स॰; २, अ॰ मांजरास हाकते समयीं याचा कोणी उच्चार करितात.

**शिरकणें**, शिरणें, परंतु, शिरणार जो अवयवी तो विशिष्ट रूपें न शिरतां त्याचे कोणेक अवयवाचे ईषन्मात्र शिरण्याचें किं॰ अवयवाचें जें शिरणें तेणेंच करून अवयवींचे शिरण्याचें जेव्हां वर्णन आहे तेव्हां याचा प्र॰; उ॰ या दाटीमध्यें माझें एक बोट शिरकतें स्त्र॰ मग वाट केली असती; २, रा॰ कापूस, लोंकर, इ॰ कांतील सरक्या, केर इ॰ हातानें काढून तो कापूस इ॰ मोकळा करणें.

**शिरकमळ**, न॰ कमलाचें रूपकें करून शिरासच स्त्र॰.

**शिरकावणें**, शिरके असा करणें.

**शिरकी**, स्त्री॰ सरकी.

**शिरखंड**, न॰ श्रीखंड प्रथमार्थीं.

**शिरगोळा**, पु॰ रांगोळी करायाचा उपयोगी एक जातीचा दगड आहे.

**शिरघोंसाळी**, स्त्री॰ शिरघोंसाळ्याचा वेल ती.

**शिरघोंसाळें**, न॰ रा॰ शिराळें.

**शिरजोर**, ३ लिं॰ नियम्य कोटींत असून नियामक जे राजा, धनी, पति, इ॰ त्यांची तादृश सत्ता आपल्यावर न चालाया जोगा वरचढ झाला जो सेवक, बायको, इ॰ तो.

**शिरच्छेद**, पु॰ शिरश्छेदाचा अपभ्रंश.

**शिरड**, स्त्री॰ रा॰ घरावर ओंवण घालणें कूड बांधणें इत्यादि उपयोगी पाळा झडलेल्या शिप्यांचा समुदाय ती.

**शिरडी**, स्त्री॰ रा॰ लहान जें शिरडें ती.

**शिरडें**, न॰ रा॰ शिरें प्रथमार्थीं.

**शिरणें**, कोणेकाचें बाह्य प्रदेशीं स्थित जो कोणेक अर्थ त्याणें त्याचे आभ्यंतर प्रदेशीं प्रविष्ट होणें.

**शिरदें**, न॰ चिपटें.

**शिरपाव**, पु॰ चाकर, तमासगीर, इ॰ कानी तादृश कांहीं कृत्य चांगलें केलें असतां त्याजवर प्रसन्न होऊन सत्कारार्थ त्यास जें पागोटें इ॰ बक्षीस देतात तो.

**शिरपुटणें**, शिरपुटीनें मारणें.

**शिरपुटी**, स्त्री॰ जाळायाचे उपयोगी जी लांकडाची बारीक वाळलेली काटकी ती; २, कों॰ शिपटी.

**शिरपेंच**, पु॰ पुरुषांचे पागोट्यावर बांधायाचें जडावाचें एक भूषण असतें तो.

**शिरभारी**, स्त्री॰ डोकीवर वाहून न्यावयाजोगें कापड इ॰ कितीएक पदार्थांचें जें ओझें ती.

**शिरशिरणें**, रा॰ कोणेकानें शिरशिरीनें युक्त होणें.

**शिरशिरी**, स्त्री॰ रा॰ थंड वाऱ्याचा स्पर्श किं॰ हिंवज्वर याचा प्रादुर्भाव इ॰ निमित्तानें यत्किंचित् आंग थरारावें अशी जी विकृति अनुभूत होत्ये ती.

**शिरशी**, स्त्री॰ शिरसा सारखें एक भाजीचे उपयोगी झाड आहे.

**शिरशेल**, न॰ शिरसांचें जें तेल तें.

**शिरश्छेद**, पु॰ तरवार इ॰ शस्त्रानें कोणेकाचे मस्तकाचा

लकाच्या जो छेद तो.

**शिरस**, पु॰ एक उपधान्य आहे.

**शिरसा**, अ॰ मस्तकें करून हा अर्थ परंतु प्रतिकूल भाव न धरितां परम विनय पूर्वक आदरानें कोणेक गोष्ट मानायाची असतां मान्य, वंद्य, मानणें, वंदणें, इ॰ कांचे योगीं प्र॰; उ॰ तुह्मी आमचे वडील त्यापेक्षां तुह्मी सांगालतें आह्मास शिरसामान्य आहे.

**शिरसाष्टांगनमस्कार**, पु॰ वडील इ॰ कांस विनयानें कागदो पत्रीं असा नमस्कार लिहितात तो.

**शिरस्ता**, पु॰ व्यवहारीं वर्तनाचा जा भिन्न भिन्न चाली त्या प्र॰; प्रांत शिरस्ता, शाई शिरस्ता, जनशिरस्ता, सर्कार शिरस्ता इ॰ स॰.

**शिरस्तेदार**, पु॰ मामलत, न्यायाधिशी, इ॰ अ॰ धिकारांवर जे मुख्य अधिकारी असतात त्यांचे हाता खालीं जे त्या विषयाचे माहितगार मुख्य कारभारी असतात ते प्र॰.

**शिरस्नान**, न॰ डोकीवरून जें स्नान.

**शिरा**, पु॰ गव्हांचे रव्याचें मोहन भोगा सारिखें एक पक्कान्न करित असतात तो; २, रेवाचिनी, ज्येष्ठमध, इ॰ किती एक पदार्थांचा तत्वांश घेऊन त्याचा जो औषधार्थ रांधा करून ठेवला असतो तो; ३, रवजराचे आंगचा जो द्रवांश सांठविला असतो तो, किं॰ रवडी साखर करायाकरितां करितात जो रांधा त्यांत रवडीसाखर जमतां जमतां वेगळा निघतो जो द्रवांश तो; ४, स्त्री॰ शरीर पान इ॰ संबंधी जा शिरा असतात त्या प्र॰.

**शिरा**, ३ लिं॰ अवि॰ विवक्षित तत्तद्गुणानी अतिशयित जो उत्तम तो.

**शिराजी**, ३ लिं॰ रवबूदरांत वर्णकृत एक भेद आहे.

**शिराटा**, पु॰ कों॰ अनेक शिरीं एकत्र संबद्ध करून प्रस्तृत तृणादि गोळा करायाकरितां जें साधन करितात तो.

**शिराणी**, स्त्री॰ प्रं॰ कोणेकाचे अंतःकरणास असतें जें कौतुक ती; उ॰ जीला हरीचे चरीतीं शिराणी.

**शिरापुरी**, स्त्री॰ शिरा आणि पुऱ्या मिळून जें पक्कान्न ती.

**शिराळ**, ३ लिं॰ जाचे आंगास दिसाया जोगत्या मोठ्या मोठ्या शिरा आहेत असें जें शरीर इ॰ तो.

**शिराळशेट**, पु॰ पूर्वीं थानाचा कोणेक वाणी राजा झाला होता त्याची आतां श्रावण शुद्ध षष्ठीस सपरिवार मृन्मय मूर्ति पूजार्थ करितात तो जाचा त्या दिवसीं उत्सव करीत असतात.

**शिराळी**, शिराळ्याचा जो वेल ती; २, एक रानवटी वेल आहे.

**शिराळें**, न॰ दोडका ह्मणून जें फल तें.

**शिरिशिरी**, अ॰ रा॰ शिड चीड.

**शिरीद**, न॰ शिरदें.

**शिरीस**, पु॰ शिरस.

**शिरिस्ता**, पु॰ शिरस्ता.

**शिरिस्तेदार**, पु॰ शिरस्तेदार.

**शिरें**, न॰ पांजरण, कुंपण, पडवळ, इ॰ कांचे मांडवावर आस्तरण इ॰ कामाचे उपयोगीं धावटी

निगडी

निगडी, करवंदी, इ॰ कांच्या जा दाळ्या तोडून आणितात त्या प्र॰; २, शाई करायाकरितां लाखेचें शिजवून किं॰ नाचण्या, मजगुरे, इ॰ धान्य जाळून त्याचें मिश्रण करून तत्तांश विशिष्ट पाणी करितात तें; ३, बाळंतीण, इ॰ कांस पाजायाकरितां आहळींव, बोळ, नारळाचा रस, इ॰ द्रव्यांचा औषधी पदार्थ करितात तें.

**शिरोभाग**, पु॰ शिरोरूप जो भाग तो; २, ३ लिं॰ गुण दुर्गुणादि कृत योग्यतेनें जो विवक्षित समुदायामध्यें उत्तम तो.

**शिरोमणि**, पु॰ मुकुटमणि; पंडितशिरोमणि, मूर्खशिरोमणि, इ॰ स॰.

**शिरोळी**, ३ लिं॰ शिरोळ ह्मणून एक ग्राम आहे तत्संबंधी जो चर्मी जोडा इ॰ पदार्थ तो.

**शिलक**, स्त्री॰ आंतून कांहीं खर्च होऊन अंशतः अवशिष्ट राहिली जी पैका, धान्य, इ॰ अर्थाची जमा ती; २, पत्रावळ, इ॰ कांस लावायाचें उपयोगी जी चोय ती; ३, धान्यादि विकृतीनें पाठ इ॰ कांत भरल्ये जी उसण किं॰ येत्ये जी तिडीक ती.

**शिलकझाडा**, पु॰ जमा आणि खर्च यांचा ताळा पहायाकरितां शिलकेचा काढितात जो झाडा तो; २, सर्व खर्च होऊन जी शिलकेची निःशेषता तो.

**शिलकबंद**, पु॰ दिवसांत किं॰ महिन्यांत झाला जो व्यवहार तत्संबंधी जमेकडे जमा खर्चाकडे खर्च लिहून शेवटीं शिलक जाजवर काढितात असा जो कागद तो.



**शिलकसांखळी**, स्त्री॰ प्रतिमाशीं अशेक्रमानें उतरत उतरत गेली अशी जी शिलकेची परंपरा ती; २, द्रव्याचें पोतें आणि तत्संबंधी जी झाडा झडती इ॰ मिळून जें शिलकेचें प्रकरण ती.

**शिलकणें**, दे॰ बंदुकीचा तोडा, काष्ठ, इ॰ पदार्थानी पेटणें.

**शिलकावण, शिलकावणी**, स्त्री॰ कोणी अपराधी जो त्याजकडे त्याला बोलावायास किं॰ तगाद्यास सर्कारांतून शिपाई पाठविला असतां तो शिपाई त्या कुळापासून दर्शनीच घेतो जें कांहीं द्रव्य ती.

**शिलकावणें**, तोडा, काष्ठ, इ॰ शिलके असें करणें.

**शिलकी**, ३ लिं॰ शिलक ह्मणनें राहिला जो पदार्थ तो; २, बहुत दिवस न खरचतां संग्रहीं पडोन राहिलेला जो वस्त्र, पात्र, अलंकार, इ॰ पदार्थ तो.

**शिलंगण**, न॰ दसऱ्याचे दिवशीं करितात जें सीमोल्लंघन त्याचा अपभ्रंश. ह्म॰ शिलंगणाचें सोनें पाहिजे त्याणें लुटावें.

**शिलगणें**, शिलकणें.

**शिलगावण, शिलगावणी**, स्त्री॰ शिलकावण.

**शिलशिला**, पु॰ कोणेक व्यवहार इ॰ कांची पूर्वापर अनुक्रमानें कोणत्याही एका प्रकारें चालत चालली असते जी परंपरा तो.

**शिला**, स्त्री॰ सं॰ पाषाण.

**शिलाई**, स्त्री॰ शिंवणावळ, परंतु वस्त्राविषयीं

प्र०.

**शिलाजीत**, पु॰ औषधोपयोगी एक पदार्थ आहे.

**शिलारस**, पु॰ एक चिका सारखा सुगंधि पदार्थ आहे.

**शिलेदार**, पु॰ आपले पदरचें घोडें घेऊन त्यासुद्धां जो सरकारांत चाकरीस राहातो तो.

**शिलेदारी**, स्त्री॰ शिलेदाराचें कर्म ती; २, ३लिं॰ शिलेदार संबंधी जो डौल इ॰ तो.

**शिलेपोस, शिलेपोस्त**, ३लिं॰ ज्याचे योगानें समटले वेळेस धांवणें, उडी मारणें, इ॰ क्रियां विषयीं अडचण होत्ये असें जें लोंबत सुटलेला पोषाख, ओझें, पोरें, बाळें, इ॰ खटलें तें ज्याहीं सं[illegible]ाहीं किं॰ ज्याचे तयारीमध्यें गुंतून पडाया जोगें कांहीं वैकल्य नाहीं असा अतएव जेव्हां म्हटलें तेव्हां जसा पाहिजे तसा तो तो पलायनादि व्यापार कराया जोगा सिद्ध जो मनुष्य घोडं, महागिरी, इ॰ तो.

**शिलोक**, पु॰ श्लोक शब्दाचा अपभ्रंश.

**शिलोंच्छवृत्ति**, स्त्री॰ तपस्वी लोक, शेत, इ॰ स्थळीं पडलेले धान्याचे कण एकेक वेंचून आणून तेणें करून करितात जी जीविका ती; २, ३लिं॰ त्या जीविकेनें वर्त्तणारा जो कोणी तपस्वी तो.

**शिल्प**, न॰ धातु, काष्ठ, पाषाण, रंग, इ॰ कांचें यंत्र, शस्त्र, अलंकार, नाव, घर, वाडा, भिंत, चित्र, इ॰ ठोकणें, तासणें, फोडणें, जोडणें, रेखणें, इ॰ क्रिया द्वारा तो तो पदार्थ निर्मिण्याचें जें कौशल्य तें; शिल्पविद्या, शिल्पशास्त्र, इ॰ स॰.

**शिल्पी**, पु॰ शिल्पानें उपजीविका करणारे जे सुतार, लोहार, गवंडी, सोनार, इ॰ ज्या जाति त्या प्र॰.

**शिव**, पु॰ महादेव; २, सत्तावीस योगांतील विसावा जो योग तो; ३, सं॰ कल्याण; ४, अ॰ शोक किं॰ खेद इ॰ व्हावया जोगें वाईट जें कांहीं मनांत येतें तत्समयींचा हा उद्गार आहे; कदाचित् इच्छानुरूप याचें आम्रेडित ही होतें.

**शिवटणें**, शेवटणें प्रथमार्थी.

**शिवण, शिंवण**, स्त्री॰ एक वृक्ष आहे; २, वस्त्र इ॰ कांस सांधावें इत्यार्थ दोरा घालीत गेलें असतां जो रचना विशेष होतो ती; ३, गुदद्वारापासून शिश्नाग्रा पर्यंत जो दोरा घातल्या सारखा रेषाकार दिसतो ती; ४, न॰ कों॰ शिवायाचे उद्देशानें घेतलें जें कापड तें; ५, घर इ॰ कांवर घालायाचा जो तृणादिरूप आकार तें.

**शिंवणकर**, पु॰ रा॰ घर शिंवाया करितां आणिले असतात जे गडी ते प्र॰.

**शिवणावळ, शिंवणावळ**, स्त्री॰ वस्त्रादिक शिवविलें असतां त्या शिवणारास द्यावें लागतें जें मूल्य ती; २, रा॰ वस्त्रादि शिवण्याचें जें काम ती.

**शिवणें**, वस्त्र, पर्ण, चर्म, जखम, इ॰ दोरा घालून विवक्षानुरूप परस्पर सांधले जात असें करणें; २, स्पर्श संबंध होई असें कोणेक जीवानें मनुष्य वस्त्र इ॰ कांहीं एकास लागणें; परंतु परस्पर स्पर्शानें विटाळ, ओंवळेपणा इ॰ होतें असा विषय असतां प्र॰.

**शिंवणें**, कों॰ शिवणें प्रथमार्थी; २, तृण झाप इ॰

कानीं गृह्यादि शाकारणें; नळा कवळें याविषयीं प्र॰ नाहीं.

**शिंवधडी**, पु॰ दे॰ शिंवशेजारी.

**शिवधार**, स्त्री॰ कों॰ वाढलेसमयीं केवळ वारीक जी तुपाची धार वाढितात तीस संकेतानें म्ह॰.

**शिवनक**, पु॰ भातांत एक जाति आहे.

**शिवनिर्माल्य**, न॰ पु॰ शिवावरील जो निर्माल्य तें तो; २, ला॰ शपथार्थ शिवस्वा सारिखा याचा ही प्रयोग होतो.

**शिवरस**, पु॰ कांजिका सारखा कालवणाचे उपयोगी एक पदार्थ करीत असतात तो.

**शिवरा**, ३लिं॰ दुसऱ्यास सर्वदा शिव्या देत असावें असा स्वभाव ज्याचा तो.

**शिंवरा**, पु॰ रा॰ भूम्यादिकावर उदकादिकाच्या पातळ गातळ करितात जो सेक तो.

**शिवराई**, पु॰ प्रथमतः शिवाजी राजानें पाडलेला असा एक पैसा आहे.

**शिवरात्र**, स्त्री॰ शिवरात्रि शब्दाचा अपभ्रंश.

**शिवरात्रि**, स्त्री॰ शिवप्रीत्यर्थ उपवास जागरण प्रधान व्रत कराया विषयीं विहित जी प्रतिमासींची कृष्ण चतुर्दशी ती; माघ कृष्ण चतुर्दशी विषयीं विशेषें करून प्र॰.

**शिवर्धनी**, ३लिं॰ श्रीवर्धनी.

**शिवशरणार्थ**, पु॰ शरणार्थ, विशेष विनय प्रदर्शन कर्तव्य असतां याचा प्र॰.

**शिवशिवणें**, शैत्यादि विकृती मुळें कांहीं तरीं कडकडा च्यावावें डसावें असा कांहीं कल्पना विशेष दांतांस होवो तद्विशिष्ट दांतांनी होणें.

**शिवशिवशिमगा**, पु॰ दे॰ शिवळ शिमगाचा अर्थी.

**शिंवशेजारी**, पु॰ ज्या गांवची शींव ज्या गांवाचे शिंवेस लागली आहे असे अनेक जे जवळजवळ गांव त्यांचा ठायीं राहणार जे लोक ते परस्पर.

**शिंवसर**, पु॰ सिंह राशीस सूर्य असतां जो काळ तो ज्याचा ठायीं गाय व्याली असतां धन्यास कांहीं अनिष्ट फळ शास्त्रांत सांगीतलें आहे.

**शिंवसरणें**, गाईनें सिंह संक्रांतींत प्रसवणें.

**शिंवसुरणें**, कों॰ शिवसरणें.

**शिंवसूर**, पु॰ रा॰ शिंवसर.

**शिंवसोयरा**, पु॰ कों॰ शिंव शेजारी.

**शिवस्व**, न॰ शिवास अर्पित झाला जो द्रव्यादि कोणेक विषय तें, ज्याचें ग्रहण केल्यास मोठें पाप लागतें, अतएव तुझें द्रव्य ह्मणजे मला शिवस्व आहे असे असे शपथार्थ याचे प्र॰ करितात.

**शिवळ**, स्त्री॰ शिऊळ.

**शिवळणें**, कों॰ शिवशिवणें.

**शिवामूठ**, स्त्री॰ श्रावणांत प्रतिसोमवारीं विवाहोत्तर पांचवर्षें पर्यंत स्त्रिया सांबावर गोधूमादि धान्याचा जो मुष्टि वाहतात ती; २, तत्कर्म प्रधान जें व्रत ती.

**शिवाय**, अ॰ खेरीज, परंतु तो खेरीज हा खेरीज या अर्थी प्रा॰ प्र॰ नाहीं.

**शिवायजमा**, स्त्री॰ शेतसारा, वेतन, इ॰ रूप जी ऐन जमा त्याहून इतरजी खंड गुनेगारी नजर

र इ॰ रूप जमा साधल्ये ती.

**शिंवार**, न॰ पु॰ ग्रामाकडे गृहसमुदाय बाग ब॰गीचा यांखालीं रुधलें असतें जें स्थल त्याचे बाहेर त्या गांवचे शिंवे पर्यंत शेतें, तृणें, काष्ठें, इ॰ जेथें होत असतें असें जें स्थल तो तें; २, कों॰ गृहाद्युपयोगी जो वांसे इ॰ लांकडी सरजाम तो तें.

**शिंवारसैंपाक**, पु॰ शेतांत जाऊन भोजनस्थानीं भक्षायास हुरडा, ओंब्या, इ॰ भाजून जें अन्नस्थानीं कल्पितात त्यास म्ह॰.

**शिवालय**, न॰ शिवाचें जें देऊळ तें.

**शिवाशीव**, **शिंवाशींव**, स्त्री॰ सोंवळें, ओंवळें, ब्राह्मण, शूद्र, इ॰ कांच्या परस्परें संपर्क झाल्यामुळें होतो जो भ्रष्टाकार ती; २, ग॰ दुष्टस्पर्श, आशौच, इ॰ कें करून होतो जो विटाळ ती.

**शिवाळ**, स्त्री॰ शिउळ प्रथमार्थी.

**शिवी**, स्त्री॰ क्रोधाद्यवसरीं कोणेकाला उद्देशून प्रयुक्त करितात जे पातकादि दोषारोपक रांडेच्या, भोडकीच्या, शिंदळीच्या, लबाड, लुच्चा, इ॰ शब्द किं॰ झकमारतोस इ॰ वाक्य ती.

**शिवीगाळ**, **शिवीगाळी**, स्त्री॰ शिवी इ॰ रूप जी दुरुक्ति ती.

**शिवीळ**, **शिवूळ**, शिवळ.

**शिवूंनयेशी**, **शिवोंनयेशी**, स्त्री॰ विटाळशी.

**शिवेरा**, ३ लिं॰ रा॰ शिवरा.

**शिंशपावृक्ष**, पु॰ एक वृक्ष आहे.

**शिंशपाशोध**, न॰ रावणानें लंकेस सीता नेली ती कोठें तरीं ठेवायाची ती शिंशपावृक्षाखालीं ठेविली होती तद्विषयीं ती शिंशपावृक्षाखालींच कां ठेविली अशी जी कोणेकाची व्यर्थ शंका असते तद्वत् जी कोणेकाची कोणेक गोष्टी विषयीं शंका असते तीस म्ह॰.

**शिशिर**, पु॰ शिशिरऋतु.

**शिशिरऋतु**, **शिशिरर्तु**, पु॰ मकर आणि कुंभ एतद्राशिस्थित सूर्य असतां जे दोन सौरमास किं॰ माघ आणि फाल्गुन हे जे दोन चांद्रमास तदात्मक जो ऋतु तो.

**शिशी**, **शिंशी**, स्त्री॰ लहान जो शिसा ती.

**शिशु**, पु॰ बालक.

**शिश्न**, पु॰ न॰ पुरुषाच्या प्रजोत्पादक जो अवयव तो तें.

**शिश्नोदरपरायण**, ३ लिं॰ मैथुन आणि भक्षण या दोहों विषयांच्या सर्वदा पाठीस लागला जो तो.

**शिष्ट**, पु॰ यथाशास्त्र वर्तणारा ज्याची रीति, आचार, इ॰ लोकानीं प्रामाण्यें करून घेत असावें अशा योग्यतेचा किं॰ विद्या, तप, इ॰ गुण वैशिष्ट्यास्तव पूजाद्यवसरीं साधारण जनापेक्षां उत्कृष्ट कोटींत गणायाचा जो ब्राह्मणादि तो; शिष्टसंप्रदाय, शिष्टमंडळी, इ॰ स॰; २, ३ लिं॰ अवशिष्ट; हुतशिष्ट, यज्ञशिष्ट, इ॰ स॰.

**शिष्टसंभावना**, स्त्री॰ विवाह यज्ञादि समारंभीं इतर जनापेक्षां विशेषें करून दक्षिणा वस्त्रादि दान पूर्वक सभ्यजनांचा करितात जो सत्कार ती, किं॰ तत्समयीं त्यांस देतात जें तें दक्षिणा वस्त्रादि ती.

**शिष्टाइकी**, स्त्री॰ शिष्टपणा.

**शिष्टाई**, स्त्री॰ शिष्टाइकी; २, ग्रं॰ परस्परांचा विवाहादि व्यवहार जुळावा ह्मणून एकाकडून दुसऱ्याकडे जाऊन त्याला बधवाया करितां चार गोष्टी अधिक उणत्या सांगाव्या त्यास राजी करावा इ॰ रूप जो मध्यस्थपणें कोणी भाषण व्यापार करितो ती.

**शिष्टाचार**, पु॰ शिष्ट परंपरेनें चालत आला जो आचार तो. ज्याला इतर जन आपल्या वर्तनास शास्त्रा सारिखें प्रमाण मानितात, शिष्टाचारकरणेंस; शिष्टाचाराचें पालन होई असें यथा कथंचित त्या त्या गोष्टींचें अनुष्ठान करणें; २, विवाहादि प्रसंगीं यजमानास करितात जें अहेराचें दान तो, शास्त्रीय विधाना वांचून केवळ शिष्टाचार प्रामाण्यानें चालतात जीं विवाहादिकांचा ठायीं पाय घड्या, विड्या तोडणें, इ॰ किती एक कर्में तीं प्र॰.

**शिष्टायकी**, स्त्री॰ शिष्टाइकी.

**शिष्टावणें**, कों॰ कोणेकानें आपल्या अंगीं शिष्टत्व मानू लागणें, निंदा विषय असतां प्र॰.

**शिष्य**, पु॰ जो जा गुरुपासून विद्या कलादिकांहीं शिकतो तो त्या गुरूचा, शिष्यवर्ग, शिष्यपरंपरा, इ॰ स॰.

**शिष्यशाखा**, स्त्री॰ कोणेक गुरूचे साक्षात् शिष्य किं॰ परंपरागत शिष्य त्यांचा जो विस्तार ती.

**शिष्यसंप्रदाय**, पु॰ संत, गोंसावी, इ॰ कांची जी शिष्य शाखा तो.

**शिष्यसंप्रदायी**, ३ लिं॰ शिष्य संप्रदायांतर्गत जो मनुष्य तो.

**शिष्या**, पु॰ शिष्य; २, शागिर्द.

**शिसकारी**, स्त्री॰ शिंसारी.

**शिसफूल, शिंसफूल**, न॰ स्त्रियांचें एक शिरो भूषण आहे; २, ज्याचे पाठीमागें फळ आहे असें जें तोंडली, दोडकी, भोंपळी, इ॰ कांचें फूल तें.

**शिंसव, शिसव, शिसवा**, पु॰ एक वृक्ष आहे.

**शिसवी**, स्त्री॰ शिसव; २, ३ लिं॰ शिंसवी.

**शिंसवी**, ३ लिं॰ कों॰ शिंसवाचा जो पाट, खुंटी, इ॰ पदार्थ तो व तें काष्ठ तो.

**शिसा, शिंसा**, पु॰ आंवळ गळ्याचें उभार आकाराचें कांचेचें पात्र असतें तो, २, मधुमक्षिका जा मध्यें मधाचा संचय करीत असतात असा जो त्या मोहळाचा एक विभाग तो; ३, शिंसव.

**शिंसावासा, शिसावासा, शिसाभासा**, पु॰ कांहीं कारणानें दुसऱ्याचे स्वाधीन कर्तव्य जो अश्वादि पशु किं॰ कांचेचा पेला, अरसा, इ॰ पदार्थ त्याचा दुखणें, वहाणें, पडणें, धक्का लागणें, इ॰ कारणानें जो संभावित नाश तो; उ॰ हा अरसा तुह्मी एथें ठेविला पण शिसावासा तर मजकडे दोष नाहीं.

**शिसारी, शिंसारी**, स्त्री॰ अति कडू किं॰ अति उग्र ज्यांचा गंध असे जे कुटकी, एरंडेल, वोळ, इ॰ पदार्थ त्यांचे भक्षणानें किं॰ वास आल्यामुळें वमन व्हावया जोगें जें कळमळून येतें ती; २, कोणेक पदार्थांचे अतिसेवना मुळें किं॰ त्याचा

त्याच्या ठायीं कांहीं अमंगलादि दोषाच्या दर्शना दिकामुळें त्या पदार्थाच्या आला असतो जो वीट.

**शिसें, शिँसें**, न॰ कथला सारिखी एक धातु आहे.

**शिस्त**, स्त्री॰ कुळांकडील वसूल कराया साठींजी कुळारगवार याद तयार करितात ती; २, १लिं॰ विवक्षित संप्रदायानुरूप जो जावसाल, व्यवहार, इ॰ ती; ३, स्त्री॰ बाणादिकें करून कोणेक लक्ष्य वेधाया करितां धरितात जें संधान ती.

**शिस्तवार**, १लिं॰ शिस्तीस अनुगुण जो भाषण, व्यवहार, उत्तर, प्रत्युत्तर, इ॰ कांहीं एक ती.

**शिळक**, स्त्री॰ रा॰ चोय, पोट, इ॰ कांत शिळका भरणें ह्म॰ आंत काड्या टोंचल्याशा वाटाया जोगी व्यथा होणें.

**शिळट**, स्त्री॰ कों॰ पर्जन्य काळीं एखादे दिवशीं पडतो जो गारोंडा ती.

**शिळटणें**, कों॰ फार शिळट पडल्या मुळें आँवण इ॰ कानें विकृत होणें.

**शिळटी**, स्त्री॰ दे॰ शिळट.

**शिळबुडा**, १लिं॰ रा॰ अग्न्यादि संयोगानें आंगच्या गारठा मोडला आहे ज्याचा असें जें पाणी, दूध, ताक, इ॰ ती.

**शिळवड**, स्त्री॰ शिळें राहिलें जें भात, भाकर, इ॰ अन्न ती.

**शिळवरें**, न॰ रा॰ शिळवड.

**शिळा**, १लिं॰ पर्युषित; २, शिजविणें, भाजणें, इ॰ संस्कार करते समयीं आंत प्रविष्ट झाला असतो जो अग्न्यंश तो किं॰ पर्ण पुष्प इ॰ कांचे आंगीं तीं झाडावर असतां असतो जो तेजोंश तो कांहीं कालातिक्रम झाल्यामुळें निःशेष विमुक्त झाला आहे जा पासून असा जो अन्न, फळ, पुष्प, इ॰ पदार्थ तो; ३, रा॰ थंड जें पाणी तो; ४, ला॰ फार थंड जो कारभार किं॰ तसा कारभार करणारा जो मनुष्य इ॰ तो; ५, स्त्री॰ शिळा.

**शिळापाका**, १लिं॰ शिळा इ॰ जो पदार्थ तो; ह्म॰ शिळें पाकें खाऊ तुझी थोंगडी से व्हाऊ.

**शिळाविद्या**, पु॰ रा॰ एखादे कामांत पडला असतां तें काम लवकर संपवायाचा नाहीं आणि लवकर सोडायाचा नाहीं कोणी बोललें तरीं राग येऊं नये असा फारच धिमा, मंद, वेंगट, जो त्यास ह्म॰.

**शिळारस**, पु॰ शिलारस.

**शिळावेळ**, पु॰ स्त्री॰ रा॰ कों॰ शिळोपा.

**शिळासप्तमी**, स्त्री॰ श्रावण शुक्ल सप्तमी व्रतदिवस आहे.

**शिळोपा**, पु॰ चार सहा घटका दिवस आल्या पासून चार सहा घटका दिवस राही पर्यंत प्रा॰ सूर्य जनित संताप होत असतो त्या कालास सोडून इतर जो मार्गक्रमणा सुपयोगी पूर्वापरकाल तो.

**शिक्षक**, पु॰ विद्यादि शिकविणारा जो गुरु तो; २, चोरादिकांस शिक्षा करणारा जो राजादिक तो.

**शिक्षण**, न॰ शिक्षा करण्याचा जो व्यापार तें.

**शिक्षणें**, प्र॰ कोणेकास शिक्षित करणें.

**शिक्षा**, स्त्री॰ अविदित जो विद्या कलादि कोणेक अर्थ तद्विषयींचें ज्ञान व्हावया जोगा हा विषय

असा

असा आहे ही गोष्ट अमुक प्रकारें करावी असें केलें असतां असें होईल इ॰ रूप गुरुवचनादिक जें ज्ञापक तेणेंकरून अंतःकरणास होतो संस्कार तो, आणि तादृश संस्कारजनक जें गुरु इ॰ कर्तृक कर्म तो;२, पारिपत्य.

**शिक्षित**, ३लिं॰ शिक्षाविशिष्ट केला जो शिष्य; चोर, इ॰ तो;२, कोणेकाचे शिक्षेनें शिकला गेला जो ग्रंथ, विद्या, इ॰ तो.

**शीक**, पु॰ एक हिंदूत जाति आहे.

**शींक**, स्त्री॰ शिंक.

**शीख**, पु॰ शीक.

**शीग**, स्त्री॰ अधोली, पायली, इ॰ माप किं॰ इतर कांहीं पात्र त्यांत कांठोकांठ धान्यादि भरून अणखींवर धान्यादि घातलें असतां जो कांठावर राशि होतो तो, किं॰ भूम्यादिकांचा ठायीं स्थितक्रमानें वर वर बारीक होत गेलेला जो धान्यादिकांचा राशि त्याचा जो अग्रभाग तो; २, रा॰ भूम्यादिकांवर मलादिकाचे थर वर थर बसून भूम्यादिकांपेक्षां वर दिसाया जोग्या जाउंच आकृति वहाडतात त्यांस प्र॰स॰.

**शीघ्र**, ३लिं॰ त्वरित; शीघ्र ग्रहण करणारा जो तो शीघ्र ग्राही. शीघ्र भोजन करणारा तो शीघ्र भोजी इ॰ शीघ्रगामी इ॰स॰.

**शीघ्रकवि**, पु॰ कांहीं एक आश्रय पाहून अतित्वरेनें कवन करणारा जो कवि, तो.

**शीघ्रकोपी**, ३लिं॰ यत्किंचित् निमित्तावरून जास तत्काळ कोपयेतो असा स्वभावाचा जो तो.

**शीघ्रबुद्धि**, ३लिं॰ कोणेक विषयाचें अतित्वरेनें ग्रहण करण्याविषयीं पटु आहे बुद्धि जीची तो.

**शीट**, स्त्री॰ पक्ष्यांची जी विष्ठा ती;२, न॰ छीट.

**शीड**, न॰ गलबत इ॰ कांचें जें अवजार तें; कोणेकांचें शीड चढणें, उतरणें, इ॰ स्थलीं संपत्ति इ॰ कांचे मर्यादेनें मान चढणें उतरणें असा अर्थ.

**शीण**, पु॰ शक्तीपेक्षां अधिक कांहीं श्रम केल्यामुळें अवयव वैकल्य होऊन शरीर फुटून शक्ति क्षीण व्हावया जोगा जो विकृति विशेषरूप संस्कार शरीरांत राहतो तो;२, पु॰स्त्री॰ वयोवस्था, उ॰ तो आणि मी एका शिणेचे आहों.

**शीणभाग**, पु॰ शीण, भागवटा, इ॰ तो.

**शीत**, न॰ शिजलेल्या भाताचे जे भिन्न भिन्न अवयव ते प्र॰;२, कों॰ ग्राम संबंधी जा क्षुद्र देवता पिशाचें यांस प्रा॰ प्रतिवर्षीं रात्रौ त्या त्या स्थानीं जाऊन अन्नादिकांचा बलि देतात तें;३, मनुष्याची जी दोरी तें;४, सहा म्हणून जी संख्या तीचें वाचक परंतु यवनी साला विषयीं प्र॰; ५, स्पर्शादिविषय उष्णतेचा प्रतिपक्षी जो जलादिनिष्ठ गुण तें;६, ३लिं॰ तादृश गुणविशिष्ट जो उदकादि पदार्थ तो; शीतवायु, शीतोपचार, इ॰स॰.

**शीतकाल, शीतकाळ**, पु॰ हेमंत आणि शिशिर एतदृतुद्वयात्मक जो काल तो.

**शीतज्वर**, पु॰ शीत प्रधान जो ज्वर तो.

**शीतल, शीतळ**, ३लिं॰ शीत पर्यायी.

**शीतलादेवी**, स्त्री॰ देवी म्हणून जा अंगावर फोड्या येत असतात तदुपद्रव शांत्यर्थ जीचें आराधन

गाधन करितात अशी एक देवी आहे.

**शाम**, स्त्री॰ग॰ शीव.

**शीर**, स्त्री॰ शरीर, पर्ण, फल, काष्ठ, इ॰ कांचे आं- गीं त्यांचे उपजीव्य जे अन्नादि रस ते जिकडे चे तिकडे पोंहचायास मार्गभूत जे अनेक तं- त्वाकार बारीक मोठे अवयव असतात ते प्र॰; शिरा काढणें, शिरा घेणें, इ॰ स्थलीं रोग परिहा- रार्थ शरीरांतील स्थल विशेषांच्या शिरा तोडू- न त्यांतील रक्त काढणें; चतुष्कोणाद्याकार वि- शिष्ट जे काष्ठ, पाषाण, धातु, इ॰ कांचे पदार्थ त्यां- स जे धारे सारखे आकार असतात ते प्र॰.

**शीर्ष**, न॰सं॰ मस्तक.

**शील**, न॰ स्वभाव; २, उत्तम मार्गानें वर्तावें कुमा- र्गानें सर्वथा वर्तूं नये असा जो कोणेकाचे अंतः करणाचा स्वभाव असतो तें.

**शींव**, स्त्री॰ सीमा शब्दाचा अपभ्रंश, परंतु गांव, ठिकाण, इ॰ स्थल विभाग संबंधी जी सीमा त- द्विषयीं प्र॰.

**शीस, शींस**, न॰ भोंपळी, पडवळी, तोंडली, इ॰ कांस तुरतें धरलेलें जें फळ तें.

**शीळ**, स्त्री॰ शिला, परंतु स्नान करणें, वस्त्र धुणें, शस्त्र घांसणें, इत्याद्युपयोगी सपाट अंगाची जी शिला असते तद्विषयीं प्रा॰प्र॰; २, शिऊ- ळ द्वितीयार्थी; ३, न॰ शील.

**शुक**, पु॰सं॰ पोपट.

**शुकुरवार**, पु॰ शुक्रवाराचा अपभ्रंश.

**शुक्क**, अ॰ मार्जारादिकांस हाकते वेळेस याचा उच्चार करितात; कोणेकास शुक्क करणें किं॰ ह्मणणें ह्मणाले यथेच्छपणें कोणेक स्थलीं प्र- वेश किं॰ कांहीं वस्तूंचें ग्रहण इ॰ विषयीं प्रवृत्त जो त्यास तूं कोण कोणाचे आज्ञेनें चालतोस इ॰ रूप ईषन्मात्र तरीं कोणेकानें प्रतिरोधि भाषण करणें; निषेध विषयीं प्र॰; कोणेक स्थलीं शुक्क असणें ह्म॰ हालचाल किं॰ मनुष्यादिकांची व- र्दी इ॰ कंकरून शून्य प्राय असणें.

**शुक्ति**, स्त्री॰सं॰ शिंप प्रथमार्थी.

**शुक्र**, पु॰ दैत्यांचा उपाध्याय एक ऋषि आहे ज्याचें नवग्रहांमध्यें सहावे स्थानीं परिगणन करिता- त ज्याचा तारा सूर्यापासून फार दूर जात नाहीं तो; शुक्रास्त, शुक्रोदय, इ॰स॰; २, न॰रेत.

**शुक्रवार**, पु॰ रविवारादि सात वारांतील जो सहा- वा वार तो.

**शुक्राचार्य**, पु॰ शुक्र प्रथमार्थी; २, ला॰ एकाक्ष जो मनुष्य त्यास थटेनें ह्म॰.

**शुक्री**, ३लिं॰ शुक्राचे ताऱ्या सारखा जो मोत्यांचा रं- ग तो किं॰ तद्विशिष्ट जें तें मोतीं तो.

**शुक्ल**, ३लिं॰ पांढरा स्वच्छ जो वर्ण किं॰ तद्विशिष्ट पदार्थ तो; २, मासाचे जे दोन पक्ष त्यांमध्यें ज्यां- त प्रतिदिवशीं चंद्रकलेची वृद्धि होत असते असा जो पक्ष तो किं॰ तद्गत जी तिथि तो; ३, पु॰ केवल ब्राह्मणापासूनच धान्य द्रव्याद्युपार्जन करून उपजीविका करणारा जो ब्राह्मण तो; ४, सत्तावीस योगांतील जो चोवीसावा योग तो.

**शुक्लकाष्ठ**, न॰ आपण कोणीकडे गेलें तरीं आप- ल्यास सोडीत नाहीं असें जें कांहीं एक पाठी- शीं लागलें असतें ह्मद त्यास ह्म॰.

एथें मूल हें संप्रदान.

**संप्रदाय**, पु॰ रीति,संप्रदायानुरूप इ॰स॰२, पदशक्तीचा अनुरोधानें जो अर्थ तो त्याभ र्थ जोचें तात्पर्य असत नाहीं विशिष्टाचें कोणेक विशिष्ट अर्थांतरीं तात्पर्य असतें अशीं जीं नाकानें कांदे सोलणें, अंगावर तुटून पडणें, इ॰ लोकसंप्रदायसिद्ध या क्यें भाषेंत चालतात तीं प्र॰.

**संप्रदायशब्द**, ३लिं॰ पायाशुद्ध.

**सफई**, स्त्री॰ सफाई.

**सफर**, पु॰ यवनी महिन्यांतील जो दुसरा महिना तो ;२, स्त्री॰ गलबतसुद्धां जी विवक्षित स्थलीं सफरीलोकांची खेप ती,आणि त्यांस तत्संबधी देतात जें वेतनादि ती, सफर साधणें प्र॰ शिकार साधणें.

**सफरी**, पु॰ गलबतावर तांडेला वांचून जे वल्हिवणें इ॰ त्याद्यर्थ कारणी मनुष्य ठेविले असतात ते प्र॰.

**सफल, सफळ**, ३लिं॰ विवक्षित फलानें युक्त जो वृक्षादि, व्यापार, मनोरथ, इ॰ ती.

**सफाई**, स्त्री॰ काष्ठपाषाणादि पदार्थांवर घोटणें, तासणें, साफकरणें, इ॰ संस्कारानें जो गुळगुळीतपणा, नीटनेटकेपणा, इ॰ रूप धर्मविशेष उत्पन्न होतो ती ;२, जामध्यें नीटनेटकेपणा असावा तसा आहे आणि व्यंग सहसा दुसऱ्यास दिसूं नये असा जो भाषण लेखनादि कांविषयींचा कृतिप्रकार तो ;३, भ्रष्टपणादि कोणेक कार्याविषयीं जो शिताफी ती.

**सफांशी**, ३लिं॰ जीस फांसा जोडला आहे असी जी पुतळी, मोहर, इ॰ ती.

**सफेजंगी**, स्त्री॰ लुटणें, मारणें, खाणें, इ॰ कारणानीं देश इ॰ कांचा जो सत्यानास ती.

**सफेत**, ३लिं॰ स्वच्छ जो पांढरा तो, पांढरेपणाचा अतिशय वर्णायाचा असतां पांढरा एतत्समभिव्याहारीं हें विशेषण होतें;उ॰, हा कागद पांढरा सफेत आहे.

**सफेतमुसळी**, स्त्री॰ एक औषध आहे.

**सफेता**, पु॰ रंग इ॰ करायाचे उपयोगीं खडूसारिखा एक पांढरा पदार्थ आहे.

**सफेती**, स्त्री॰ भिंत इ॰ सफेत करायासाठीं जो चुना इ॰ कानीं त्यांस लेपरूप संस्कार करितात ती;२. सफेतपणा.

**सफ्फर**, पु॰ स्त्री॰ सफर.

**सबजा, सब्जा**, पु॰ एक झाड आहे.

**सबजी**, स्त्री॰ पदार्थ निष्ठरंग रूप जो हिरवेपणा ती ;२, माशनाद्यर्थ भांगेचें जें पाणी करितात ती.

**सबंद**, ३लिं॰ सबंध.

**संबंध**, पु॰ परस्परें भिन्न स्वरूप जे अर्थ त्यांचा कोणेक प्रकारें करून एकमेकाशीं जो लागूपणा असतो तो, जाचेजन्यजनकभाव, सेव्यसेवकभाव, इ॰

आणि

आणि संयोग समवायादि अवांतर भेद आहेत; शरीरसंबंध, यौनसंबंध, परंपरा संबंध, इ० स०;२. ब्राह्मण मरून जो पिशाच झाला तो.

**सबंध**, ३लिं० अवांतर अवयव इतस्ततः न व्हावे इत्यार्थ जो कांहींएक बंध करून आरचनेनें रचित केला असतो तो बंधन सुटतां त्या रचनेनें विशिष्ट जो तो पदार्थ तो;उ०, कुटकळ सनगें घ्यावीं त्यापेक्षां सबंध गांठोडें घ्यावें तें बरें, गुळाची टेंप सबंध जर वजन केली तर अधिक भरेल.

**संबंधन**, न० परस्परांच्या संबंध करण्याचा जो व्यापार तें.

**संबंधी**, ३लिं० ज्याचा संबंधानें जो युक्त तो त्याच्या; तत्संबंधी, ग्रामसंबंधी, इ० स० ;२, पु० शरीरसंबंधी.

**सबनिशी**, स्त्री० सबनिसाचा जो अधिकार तो.

**सबनीस**, पु० शागीर्दपेशा इ० कांस रोजमुरा वांटाचा ह्या कामावर जो अधिकारी ठेविला असतो तो.

**सबब**, स्त्री० कोणेका गोष्टीस लाविलें जें कांहींएक कारण तो;उ०, प्रभूचे मनांत लुटावें असें असल्यास कोणती तरी सबब लावून लुटील;२, अ० कोणेक कारणास्तव ;उ०, त्याणें शिव्यादिल्या सबब मी तोंडांत मारली.



**सबर**, ३लिं० सगर्भ परंतु थोडी, गाटवी; खेचरी, यांविषयीं प्र०.

**सबल, सबळ**, ३लिं० निर्बलाचा प्रतिपक्षी तो.

**सबसणीस**, अ० (बसणें) रा० एकदेशी भारादि पडलें असतां ही उलटूं नये अशा प्रकारें भूम्याद्या धारावर पाषाणादिकानीं पुरतेपणी बसणें.

**सबसब**, अ० वारंवार.

**संबळ**, पु० गोंधळी इ० कांचें एक चर्मवाद्य आहे.

**संबळी**, स्त्री० वेत, वंश, इ० कांचें देव इ० ठेवायासाठीं एक पात्र करितात तो.

**सबळी**, ३लिं० बळसहित जें बुदबळ त्यासही मारावें असा बुदबळें खेळण्याचा एक प्रकार आहे त्या प्रकारचा जो डाव तो.

**संबळ्या**, पु० संबळ वाजविण्याचें कसब करितो तो.

**सबा**, न० सातया संख्येची संज्ञा परंतु यवनी सालाविषयीं प्र०.

**सबाह्याभ्यंतर**, न० बाह्यात्कारीं लोकांत वर्तायाची जी वृत्ति तत्सहवर्तमान जी कोणेकाची अंतःकरण वृत्ति तें ;उ०, या पुरुषाचें सबाह्याभ्यंतर मला समजलें आहे;२, अ० तादृश जी अंतःकरणवृत्ति तीणें करून ;उ०, सबाह्याभ्यंतर जर हरीस भजाल तर तो पावेल.

**सबुरी**, स्त्री० कांहींएक कर्तव्य गोष्टीविष यीं घाई, उतावळी, नकरितां कांहीं काळ दम धरून उगेंच राहाण्याचा जो व्यापार तो; उ०, या लग्नसराईंत कापड घेतलें असतां महाग पडेल याजकरितां दोनमहिनें सबुरी करा.

**सबूर**, स्त्री० सबुरी.

**सबेन**, न० यवनी सालांत नायकीचें एक साल आहे.

**संबोधणें**, कोणेकास संबोधन विशिष्ट करणें.

**संबोधन**, न० कोणेकास कांहींएक अर्थ बोधवायाकरितां हाक मारण्याचा व्यापार तें आणि तदर्थ उच्चारितात जीं राम, कृष्णा, इ० रूप प्रथमांत नामे किं० अरे हे इ० शब्द तें; २, स्तुत्याद्यवसरीं कोणेकास देतात जें विशेषण त्यास कोणी म्ह०; उ०, तो सुज्ञ आहे. थोर आहे. धीट आहे, हीं एवढीं त्यास संबोधनें कशाला देतां तो कसा तो मला ठाऊक आहे.

**संबोधित**, १ लिं० संबोधिला जो तो.

**सबा**, न० सबौ.

**सबैन**, न० सबेन.

**सभर**, १ लिं० सबर; २, भारादि विशिष्ट होत्सातां पुरतेपणें, कोणेकावर पाय पडणें. टोला बसणें, काठी मारणें, इ० कांचें वि०.

**सभर्तृका**, १ लिं० ज्याचा भर्ता जिवंत आहे अशी जी स्त्री तीचें वि०; २, भर्त्यासहवर्तमान जी स्त्री ती.

**संभव**, पु० अर्थानें असायास किं० व्हावयास जी साधन सामग्री अपेक्षित असत्ये ती असल्यामुळें त्या अर्थाचे अंगीं असण्याविषयीं किं० होण्याविषयीं जी योग्यता असते ती; २, होइलच होईल असेलच असेल. असा निश्चय न होतां असेल तर असेल, झालें तर होईल, असें कोणेक अर्थाविषयीं जें अंतःकरणांत ज्ञान होतें तो; उ०, तिकडचें पाणी हवा कसें आहे म्हणून तूं जे व्हां विचारतोस ते व्हां तूं तिकडे रहावयास जाणार असा मला संभव होतो; ३, उत्पत्ति, गर्भसंभव, रोगसंभव, कफसंभव, इ० स०; ४; १ लिं० ज्यापासून ज्याची उत्पत्ति तो तत्संभव, कुंभापासून संभव ज्याचा तो कुंभसंभव, पद्मसंभव, योनिसंभव, इ० स० प्र०.

**संभवणें**, कोणेक अर्थानें संभवविषय होणें; २, कोणेक अर्थानें उत्पन्न होणें.

**सभँवता, सभँवताला, सभँवती**, अ० भोंवताला.

**सभा**, स्त्री० कांहीं कारणास्तव राजा, राजलोक किं० विद्वान्, पंडित, गुणी, इ० कांचा समाज व्हावयाकरितां निर्मिलें असतें जें स्थळ ती; २, त्यास्थळीं

सभर्तृका, किं०

किं० कोणीकरून्हलीं त्याचा झाला जो समाज तो, राजसभा, ब्रह्मसभा, इ० स०.

**सभाकंप**, पु० सभादिकांचा ठायीं भयादिकारणानें भाषणादि व्यापाराविषयीं शरीरास कंपसुटावा. घामयावा, भलताच शब्द तोंडांतून यावा, इ० रूप कोणेकास प्राप्त होत्येजी अवस्था ती.

**सभागी**, ३ लिं० सभाग्यशब्दाचा अपभ्रंश.

**सभाग्य**, ३ लिं० भाग्यवान् ; २, जाचेहातून बहुतांवर उपकार होत असावे, जाचे योगानें बहुतांचें हित होत असावें. असाजो कोणी पुरुषादि त्यास म्ह०; उ०. कोणा सभाग्याचा हातानें बोहणी झाली माझाजिन्नस लौकर विकला.

**सभाचातुर्य**, न० सभादिकांचाठायीं यथायोग्यपणें वागण्याचें जें चातुर्य तें.

**सभादीप**, पु० श्रावणीचें दिवशीं सभेंत ब्राह्मण, अग्नि, यांचे संन्निध ब्राह्मणास दान देतात जो दिवा तो.

**सभाधीट**, ३ लिं० सभादिकांचे ठाईं भयादि नधरितां भाषणादि व्यापारीं धीटपणें प्रवृत्त होतो जो तो.

**सभानायक**, पु० सभेचेठायीं मुख्य-जो विद्वज्जन इ० अधिकारी तो.

**सभापांडित्य**, न० तादृश अंगीं विद्यादि असो किं० नसो परंतु सभा इत्यादिकांचे ठायीं भाषणामध्यें पांडित्य करण्या विषयीं जें कोणेकास सामर्थ्य असतें तें.

**सभामंडप**, पु० देवालयापुढेंच कथा, कीर्तन, पुराण, इ० कांसाठीं जो लांकडी, दगडी, असा केलाअसतो मंडप तो.

**संभार**, पु० यज्ञ युद्ध इ० कार्यांचा जो सामग्रीसमुदाय तो. याचे स० पूजासंभार, सेनासंभार, इ०

**सभारंजन**, न० सभादिकांचे ठायीं स्थित जे लोक त्यास गायन, नृत्य, पांडित्य, कीर्तन, इ० गुणें करून रंजिवण्याचा जो व्यापार तें.

**संभावणें**, कोणेक अर्थ संभावनाद्वितीयार्थविषय करणें.

**संभावना**, स्त्री० संभव प्रथम द्वितीयार्थी; २, हा पदार्थ बहुत करून अमुकस्वरूप असेल, किं० यास्थलीं अमुक-अर्थ असेल, किं० अमुकस्थलीं अमुकपदार्थ असेल काय, इ० रूप जो मनोव्यापार तो; ३, पंडित, वैदिक, पुराणीक, हरिदास, इ० कोणी प्रतिष्ठित जो भिक्षुक तो कांहीं निमित्तानें आपले घरीं आला असतां त्यास निरोप देते समयीं दक्षिणादि दानें करून त्याचा करितात जो गौरव तो आणि तें देतात जें दक्षिणादि तें.

**संभावित**, ३ लिं० संपत्तिमत्ता, विद्वत्ता, इ० कानी जो प्रतिष्ठित तो; २, संभावना विषय जो अर्थ तो.

**संभाव्यमान**, ३लिं० संभावना ह्रितीयार्थ विषय केला जातो आहे जो कोणेक अर्थ तो.

**संभाषण**, न० कोणएकाचें कोणएकासंगतीं जें भाषण तें.

**सभासद**, पु० सभेमध्यें प्रतिष्ठितपणें बसलेअसतात जे लोक ते प्र०;२, दे० सभेच्याठायीं बसून न्यायमनसुबी. वादविवाद. इ० व्यापार करणारें जें मनुष्य तें प्र०.

**संभाळ**, पु० प्रतिपाळ.

**संभाळणें**, अन्नदानादिकेंकरून कोणंकास प्रतिपाळित करणें;२. कांहींएक व्यापार,पदार्थ,इ० स्वशक्ति,सावधपणा,इ० कानें आटोपून धरणें;३. अपथ्य, कांहींएक अरिष्टप्राप्त होईल-ह्मणून तद्विषयीं सावधपणें असणें;उ० संभाळ अपथ्य केलेंसतर दुखणें वाटेल;४, रा० सुखकारक,दुःखकारक. जी कोणेकाच्या स्पर्शतो विदित होणे; उ०, माझें शरीर बधिर असें झालें आहे त्यास डाग दिल्हा तरीं संभाळत नाहीं मगचिमटा कोठला संभाळायला.

**सभीज**, अ० कों० सकलावयवीं पुर्तेपणी भिजे असें भिजणें होणें इ० कांचें वि०.

**संभूत**, ३लिं० संभवविषय झाला जो तो; २.उत्पन्न झाला जो तो;३, स्त्री० संभूत वार्ता.



**संभूतवार्ता**, स्त्री० संभावना होतअसावी,गोष्टी तरी निघत असाव्या, इतक्यानें तरीं जें कोणेक अर्थाचें अस्तित्व तो, निषेधविषयीं प्र०;उ०, यागावांत सर्पाची संभूतवार्ता नाहीं मग तुला डसेल कोठून :२,कोणेक अर्थाची ज्ञापकतत्संबंधी यत्किंचित तरी जी गोष्ट ती निषेधविषयीं प्र०:उ०, तुमचे घरीं लग्न होणार याची आह्माला संभूतवार्ता ठाऊक नव्हती मग आह्मी कशावरून यावें.

**संभूति**, स्त्री० सं० संभव;२. संभूतवार्ता.

**संभोग**, पु० विषयाच्या जो उपभोग तो परंतु स्त्रीचे उपभोगाविषयीं विशेष प्र०.

**संभोगणें**, स्त्र्यादिविषयानें संभोग विशिष्ट करणें.

**सभोंवता.सभोंवताला.सभोंवती,** अ० भोंवताला.

**सभोंवर.सभोंवार**, अ० भोंवताला.

**सभ्य**, ३लिं० सभासद;२,संभावित प्रथमार्थ.

**संभ्रम**, पु० भयलाभादिकांच्या किं० थोराचे आगमनाच्या इ० प्रसंग आलाअसतां त्याकाळीं कर्तव्य जें कृत्य त्याविषयीं कांहीं सुचूं नये, घाबरें व्हावें. अंतःकरणास त्वरा व्हावी. इ० रूपजी

अवस्था होत्ये तो; २. कोणी काम कोणं क गोष्टीविषयीं प्रीतिपूर्वकउद्योग करीत असावा अशी असत्ये जी हौस ती; उ०, कांहीं नवा पदार्थ पाहिला ह्मणजे त्याचें संपादन करावें हा संभ्रम यापोरास फार आहे; ३. कोणेक पदार्थ नीटनेटका दिसावा ह्मणून त्यासकरितां जे अनेक उपचार ते प्र०; उ०, चकीदार पागोटें घालावें, गंध रेखून लावावें, डौलानें चालावें, असे हा दिवसभर आपले जीवाचे संभ्रम करीत असतो.

**संभ्रांत**. ३ लिं० भ्रांतीनें युक्त जो अंतःकरण, मनुष्य, इ० ती; २. संभ्रमप्रथमार्थानें युक्त जो तो.

**सम्**, अ० हा संस्कृत उपसर्ग आहे हा ज्याचे मागें लागतो त्याचें प्राशस्त्य बोधितो. संलग्न, संमोहित, संजात, इ० स० प्र०.

**सम**, ३ लिं० तुल्य; २, वांकडेतिकडेपणा किं० उंचसखलपणा इ० अविवक्षित गुणरहित जो भूम्यादिकांचा प्रदेश तो आणि तद्विशिष्ट भूम्यादिपदार्थ तो; ३, दोन चार, सहा, इ० रूप जी युग्मसंख्या ती; ४, सर्व अर्थास तुल्य रूपानें पहाणारा जो साधु इ० तो; उ०, जे साधुपुरुष आहेत ते सर्व भूतांच्या ठायीं सम असतात; ५, कोणे काचा शत्रु नव्हे आणि मित्र हा नव्हे केवल उदासीन जो ग्रह इ० तो.

**समई**, स्त्री० मध्यें स्तंभ आणि खालीं वर दोन वाडीं असतात ऐसें एक दीप लावायाचें पात्र आहे.

**समईक**, ३ लिं० समाईक.

**समकणें**, रा० संवकणें.

**समकक्ष**, ३ लिं० विद्या शौर्यादि गुणानीं परस्पर जे तुल्य ते प्र०.

**समकोण**, ३ लिं० वृत्तामध्यें मधोमध आडवी, उभी, रेषा काढली असतां जो कोण होतो तत्सदृश आहे कोण ज्याचा असा जो क्षेत्रादि तो.

**समग्र**, ३ लिं० सं० सगळा.

**समज**, स्त्री० पु० तत्तद्विषयांचें जें परिज्ञान ती तो.

**समजणें**, विवक्षित कांहीं एक गोष्ट कोणा एकास परिज्ञात होणें व तज्ज्ञान विशिष्ट आपण होणें; २. रुसलेला किं० कोणेक गोष्टी विषयीं अडून बसलेला जो कोणी त्याणे रुसवा, अड, इ० सोडून अविरुद्धभाव विशिष्ट होणें

**समजदार**, ३ लिं० ज्याचे बुद्धीत चांगला समज असतो तो.

**समंजस**, ३ लिं० कांहीं एक गोष्ट करणें ती तारतम्यानें विचारपूर्वक चौघांस बरी दिसेल ती करणारा असा चांगल्या स्वभावाचा जो तो; २, समजदार; ३, न्याय्य जें भाषणादिक तो.

**समजस**, ३लिं० समंजस शब्दाचा अपभ्रंश परंतु ना० प्रथमार्थी प्र०.

**समजावणें**, कोणेकास कोणेक गोष्ट समजे असें करणें ;२, रुसला जो तो समजे असें करणें.

**समजाविशी, समजावीस, समजी.** स्त्री० रुसलेला किं०अडून बसलेला किं० विवदमान जो कोणी त्याणें समजावें म्हणून तदनुकूल करितात जो व्यापार तो आणि तेणेंकरून त्यांचा होतो जो समजलेपणा तो.

**समजीक**, ३लिं०समजस.

**समजूत**, स्त्री० समजी;२, समज.

**समजूतदार**, ३लिं०समजदार.

**समंतात्**, अ० आसमंतात.

**समतोल**, ३लिं० गुणादिद्वारा जे तुल्य ते परस्पर, २. वातपित्तादिकाचें विषमभावेंकरून रहित अशी जी कोणेकाची समान प्रकृति ती :३,अ० शरीर, ओझें, इ० कोंचा ईषन्मात्रही इतस्ततः तोल नजाउं देतां,तर इ० कांत बसणें. ठेवणें, इ० कांचें वि० :उ०, होडीमध्यें समतोल बसावें म्ह० डळमळत नाहीं.

**संमंध, समंध.** पु० संबंधशब्दाचा अपभ्रंश.

**समधात**, ३लिं० शीत, उष्ण, जे तसम आहेत असें जें औषध, शरीर, प्रकृति, देश, इ० तो.

**समंधी**, ३लिं० दे० पिशाचसारिखा स्वभाव ज्याचा तो ; २, ३लिं० संबंधीशब्दाचा अपभ्रंश.

**समन्वित**, ३लिं० कोणेक अर्थानें जो अन्वित तो दन्वित, याचे समास पात्रसमन्वित, क्रियासमन्वित, इ०.

**समभाग**, ३लिं० कोणेकाचे भाग समान आहे भाग ज्याचा असा जो औषधादिपदार्थ तो.

**समय**, पु० कोणेक कार्य करण्याचा, होण्याचा जो कालावयव तो ;. कोणेकावर समय पडणें किं० येणें म्ह० परदुःखदायक प्रसंग त्यास प्राप्त होणें, समयास उपयोगी पडणें समयीं उपयोगीं पडणें म्ह० प्रसंगीं कामास येणें, प्रसंग शब्दावरील संप्रदाय प्रा० एथें होतील असें जाणावें ;२, स्त्री० समई.

**समयस्फूर्ति**, स्त्री० ज्या विषयाचा जो प्रसंग त्या प्रसंगीं त्या विषयाची स्फूर्ति होवी अशी जी कोणेकाच्या बुद्धीमध्यें शक्ति असते ती.

**समयानसार, समयानुसार**, अ० प्रसंगानुसार.

**समयी**, स्त्री० समई.

**समयोचित**, ३लिं० विवक्षित तत्समयीं योग्य जें भाषण इ० तो.

**समर**, पु० सं० युद्ध.

समरंगण,

**समरंगण**, न० समरांगण शब्दाचा अप-भ्रंश.

**समरस**, ३ लिं० सर्वांशीं मिळून रहावें, कोणाशीं विरुद्ध कधींही होऊं नये अशा स्वभावाचा जो पुरुष इ० तो.

**समरांगण**, न० युद्धार्थ नेमिलेलें जें स्थळ तें; २, युद्धादिकांचा जो प्रसंग त्यास म्ह०.

**समरास**, स्त्री० धान्यादिकांची जी अनेक विभाग न करितां उभी रास ती.

**समरासमोर**, अ० रा० समोरासमोर.

**समर्प**, ३ लिं० सं० सवंग.

**समर्थ**, शरीर, द्रव्य, विद्वत्ता, इ० कांचे बळानें तत्तत्कार्याविषयीं जो शक्तिमान तो.

**समर्थन**, न० कोणेक ग्रंथ किं० मत किं० पूर्वपक्ष, समाधान, इ० कांवर कोणी दोष दिला असतां त्याचें निवारण करून त्या ग्रंथादिकांचें जें अनेक युक्तींनीं स्थापन तें.

**संमर्द**, पु० युद्ध, यात्रा, इ० कांमध्यें अनेक मनुष्यादिकांची जी दाटी होत्ये ती.

**समर्पक**, ३ लिं० कोणेकाच्या प्रश्नादिकांवर यथायोग्य असावें तसें जें उत्तरादि तें.

**समर्पण**, न० देव, ब्राह्मण, इ० कांस कांहीं एक पदार्थाचें केलें जें अर्पण तें.

**समर्पिणें**, देव, ब्राह्मण, इ० कांस कांहीं एक पदार्थ अर्पित करणें.

**समर्पित**, ३ लिं० समर्पण ज्याचें केलें तो.

**समला**, पु० पाठीवर लोंबाया जो गाडीवरचे पागोठयाचा शोभार्थ बाहेर सोडितात जो पदर तो.

**समवयस्क**, **समवयी**, ३ लिं० तुल्यवयाचे जे ते परस्पर.

**समवाय**, पु० सं० गुणगुणी, क्रियाक्रियावान, जातिव्यक्ति, यांचा जो परस्पर संबंध तो; २, समुदाय.

**समवायिकारण**, न० ज्यावर समवाय संबंधानें कार्य उत्पन्न होतें त्या कार्याचें तें.

**समवेत**, ३ लिं० समवायसंबंधानें कोणेकानें अन्वित जो कोणेक तो; २, अ० कोणेएका सहवर्तमान जा, ये, हो, इ० कांचें वि०.

**समशेर**, स्त्री० तलवार; २, पु० चंगकोचन गंजिफांतील जो आठवा रंग तो.

**समशेरबहादर**, **समशेरबहादूर**, ३ लिं० तरवारबहादर.

**समशेरी**, ३ लिं० ज्या पुतळीच्या दोहों अंगच्या बाहुल्यांचीं डोकीं एकादिशेकडे होतात अशी झालेली जी पुतळी ती; २, ३ लिं० समशेर म्हणून जो गंजिफांतील रंग तत्संबंधी पान, तलव, इ० तो,

तो.

**समष्टि**, स्त्री० अनेकव्यष्टि मिळून आला जो विराट् देहादि एकअवयवी तो.

**समसका**, ३ लिं० रा० प्रतिवर्षी यांत असतो जो गोमहिष्यादि पशू तो.

**समसमान**, ३ लिं० विद्वत्ता, शौर्य, आकार, संख्या, इ० कानीं तुल्य जें तें परस्पर.

**समस्त**, ३ लिं० सर्व; २. अनेकपदांचा समास होऊन झालें जें एकपद तो.

**समस्या**, स्त्री० विवक्षितार्थप्रतिपादक श्लोकादिकांचा एकदेश उच्चारला असतां त्यास सर्वार्थाचें पूर्तिविषयीं अवशिष्टांशाची अगती जी आकांक्षा ती आणि तो उच्चारित जो एकदेश तो, कविजन एकमेकाचें ज्ञानपरिक्षार्थ कांहीं अंशाचें निगरण करून कांहीं अंश दुसऱ्यास आकांक्षापूरणार्थ विचारितात त्या व्यवहारीं प्र०; २, ज्याचें उत्तर एकाएकीं ध्यानांत येत नाहीं असा जो कोणेक विषयावर कोणेकाचा कठिण प्रश्न असतो तो; इ०, त्याणें मला अशी समस्या घातली कीं गणपति पूजनावांचून लग्न होत नाहीं ह्मणतां तर महादेवाचें लग्नांत कसें केलें, कोणेकानें कोणेकाचीस मस्या पुरविणें ह्म० शौर्यादिजन्य दर्पादिकांचा परिहार व्हावया जोगी स्वकीय शौर्यादि प्रदर्शनद्वारा त्यातर जमा करून देणें.

**समळी**, स्त्री० कों० संबळी.

**समक्ष**, अ० कोणेकाचें देखत, २, ज्याशीं भाषणादि व्यवहार करायाचा त्याशीं आणि आपणाशीं साक्षात् संबंध घडे असें बोलणें, पहाणें, गांठपडणें सांगणें, इ० कितीएक धातूचें वि०; उ०, त्यांची माझी समक्ष गांठ पडेल तेव्हां काय तें सांगू तुझ्यापाशीं सांगत नाहीं जा.

**समक्षता**, स्त्री० समक्षपणा.

**समक्षा**, स्त्री० समस्या शब्दाचा अपभ्रंश; २. देवादिकांचा साक्षात्काराविषयीं कोणी प्र० करितात.

**समक्षासमक्ष**, अ० स्त्री० उरूबुरू.

**समा**, पु० कों० एक पिशाच देवता आहे; २, समुद्रास नित्यशः भरती येते तीची जी पूर्णावस्था तो; ३, रा० तत्त्म व्यवहाराचा किं० धान्यादि उत्पन्न होण्याचा जो मुख्य समय तो, ४, मप.

**समाईक**, ३ लिं० अनेक स्वामिक असून अविभक्त जो क्षेत्र धनादि पदार्थ तो.

**समाकुळपोढर**, स्त्री० ग्रामसंबंधी जे पाटील, कुळकर्णी, मेहमर, इ० समस्त लोक तो किं० गृहादिसंबंधी जीं समस्त मनुष्यें तो परंतु कांहीं कारणास्तव

रणास्तव अवघ्यानीं एकत्र होण्याचा प्रसंग असतांच प्रा॰ प्र॰.

**समागम**, पु॰ परस्परांचा जो विवक्षित संयोग तो.

**समाचार, समाचार**, पु॰ परामर्श प्रथमार्थी; २, कोणेकाचें बरें वाईटपणाचें जें वर्तमान तो; उ॰, त्याचा समाचार आलीकडे समजत नाहीं, परामर्श शब्दावरचे संप्रदाय एथें ही जाणावे.

**समाज**. पु॰ मनुष्यादि एकजातीयांचा जो समुदाय. तो.

**समाजीक**. ३ लिं॰ कों॰ समाईक.

**समाध**, स्त्री॰ समाधि शब्दाचा अपभ्रंश.

**समाधान**, न॰ इष्टानुरूप घडल्यामुळें उद्वेगादि जाऊन बरें वाटायाजोगी सुखरूपें करून जी अंतःकरणाची स्थिति तें; २, पूर्वपक्षाच्या निरासकरणारें जें वाक्यादि तें, कोणेकाचे शरीरीं समाधान नाहीं किं॰ त्यास समाधान वाटत नाहीं इ॰ स्थलीं त्यास बरें वाटत नाहीं तो दुखणेकरी आहे असा अर्थ.

**समाधि**, स्त्री॰ पु॰ अंतःकरण, विषयांपासून निवृत्त होऊन ईश्वराचे ठायीं लागावें म्हणून प्राणायामादि साधनानीं करितात जी त्या अंतःकरणाची एकाग्रता ती ती; २, संन्याशाला जलांत बुडवून घेऊन किं॰ स्थलांत पुरून घेऊन जो प्राण त्याग करितो तो ती; ३, सन्यासी मरण पावल्यानंतर त्याचे देहास जलांत बुडियणें किं॰ स्थलांत पुरणें असा जो संस्कार करितात तो ती; ४, संन्यासी जा स्थलीं पुरतात तेथें चबूदावनादि बांधितात तो ती.

**समाधिस्थ**, ३ लिं॰ समाधि प्रथमार्थानें युक्त जो तो, सन्याशानें समाधिस्थ होणें म्ह॰ मरण पावणें.

**समान**, ३ लिं॰ सपाट प्रथमार्थ; २, तुल्य; ३, न॰ यवनी सालांतील आठवें साल तें.

**समानकक्ष**, ३ लिं॰ समकक्ष.

**समानवयस्क**, ३ लिं॰ समवयस्क.

**समानशील**, ३ लिं॰ तुल्यस्वभावाचे जे मनुष्यादि ते परस्पर.

**समानाधिकरण**, ३ लिं॰ एका अधिकरणाचे ठायीं जे विद्यमान ते परस्पर; २, विशेषणविशेष्यरूप असून एकविभक्ति जीं पदें तीं परस्पर.

**समानीन**, न॰ यवनीसालांत नायकीचें एक साल आहे.

**समानोदर**, ३ लिं॰ सोदर.

**समापत्र**, न॰ संमतिपत्र शब्दाचा अपभ्रंश.

**समाप्त**, ३ लिं॰ संपला जो तो; २, स्त्री॰

समाप्ति शब्दाचा अपभ्रंश.

**समाप्ति**, स्त्री० संपलेपणा.

**समारंभ**, पु० लग्न, मुंज, यज्ञ, कीर्तन, सण, वार, ब्राह्मणभोजन, इ० कार्याचा अनेक सामग्रीनें शोभायाजोगा करितात जो उत्साह तो; २, तदर्थसंपादित जी उपयुक्त सामग्री ती; उ०, आमचे घरीं लग्न आहे याजकरितां तुमचे घरचा सर्व समारंभ अह्मास द्या.

**समाराधन**, न० समाराधना.

**समाराधना**, [illegible]त, विवाह, इ० संबंधानें ब्राह्मणभोजन करितात तें. [illegible] भायणें; २, कोणेक [illegible] स्वरूप [illegible]डायाजोगें त्यांत कोणेक पदार्थानें समाविष्ट होणें; उ०, शेरदुधांत [illegible] पाणी समावेल [illegible] घातलें [illegible] दूध नासेल; ३, [illegible] तुल्य असावा अशा रूपें करून विवक्षित जो कोणेक अर्थ त्याची त्या प्रमाणाहून अतिरिक्तता दिसण्यांत न येतां त्यांत कांहीं [illegible] समाविष्ट होणें; उ०, [illegible] पांचे सैंपाकांत पांच पानें [illegible]तील, तुमचा कंठाळींत [illegible] माझें सोंवळें भांडें का [illegible]णार [illegible].

**[illegible]न**, न० सोडमुंज.

**समाविष्ट**, ३ लिं० विवक्षित अधिकरणीं किं० विवक्षित कोटींत समावेश झाला ज्याचा तो.

**समावेश**, पु० विवक्षित प्रकरण कोटीमध्यें कोणाएकाचा जो संग्रह तो; उ०, शंभर ब्राह्मणामध्यें या एका ब्राह्मणाचा समावेश करा; २, विवक्षित अधिकरणीं कोणेक अर्थाची विवक्षानुरूप प्रवेशपूर्वक जी स्थिति; उ०, या लहानशा खोलींत पन्नास मनुष्यांचा समावेश कसा होईल.

**समास**, पु० परस्पर अन्वित जीं अनेक पदें त्यांची एकमेकाशीं जुळणी होऊन होतें जें विशिष्ट एकपद तें; २, समासाचा अर्थ दाखवायासाठीं करितात जो विग्रह त्यास कोणी म्ह०; ३, लिहावयाचे पत्रास मध्यें लिहून भोंवताली जी बेतानें रिकामी जागा राखतात तो.

**समिध**, स्त्री० सं० समीध.

**समीचीन**, ३ लिं० उत्तम; २, विपुल.

**समीध**, स्त्री० होमार्थ पळस, खैर, उंबर, इ० यज्ञिय वृक्षांचा शाखेचा वितस्तिप्राय जा [illegible]ट क्या करितात त्या प्र०.

**[illegible]प**, अ० सन्निध.

**स[illegible]ता**, स्त्री० चतुर्विध मुक्तींतील [illegible] मुक्ति आहे जी मध्यें ईश्वराचें सांनिध्य

समाविष्ट,

न्निध्य घडतें ती.

**समुच्चय**, पु० समुदाय ;२, समुदाया-च्या विचारानें कोणेक गोष्टीविषयीं करितात जो कांहीएक निर्णय त्यास कोणी ह्म०.

**समुदाय**, पु० एकत्र स्थित जा अनेक व्यक्ति त्यांस अवयवत्व कल्पून त्यांच्या मानिला जो वैशिष्ट्यें करून निराळा अवयवी तो.

**समुदित**, ३लिं० समुदायरूपानें एकत्र स्थित जो तो.

**समुद्र**, पु० बहुतेक पृथ्वीच्या प्रदेशाव्यापून राहिला आहे असा जो अपार उदकराशि तो. ज्याचें उदक क्षार आहे. ह्म० समुद्रांत जाऊन कोरडा जो त्या अंतपार नाहीं असे जे ईश्वर, गुण, माया, शब्दसमूह, जन्ममरणरूप संसार, इ० त्यांस आरोपानें ह्म० या अर्थी गुणसमुद्र, शब्दसमुद्र, भवसमुद्र, इ० स०.

**समुद्रकांठा**, पु० कों० समुद्राचे कांठच्या जो प्रदेश तो.

**समुद्रफळ**, न० एक औषधी वृक्षाचें फळ आहे.

**समुद्रफेण, समुद्रफेन, समुद्र[illegible]**, पु० समुद्राचे तीरीं मत्स्या[illegible] फुसफुशीत असें औषधी प[illegible] एक प्राण्यांनुं येऊन पडत असे तो.

**समुद्रमाणकी**, स्त्री० समुद्रफेन.

**समुद्रवलयांकित**, ३लिं० समुद्ररूप वलयानें अंकित अशी संपूर्ण जी पृथ्वी तीचें वि०.

**समुद्रशोक, समुद्रशोष**, पु० एक वेल आहे.

**समूल, समूळ**, ३लिं० मूळासहित जो वृक्ष इ० तो ;२, जास आधारभूत मूल आहे असा जो वाक्य, ग्रंथ, इ० तो.

**समूह**, पु० समुदाय.

**समृद्ध**, ३लिं० समृद्धि झाली जाची तो.

**समृद्धि**, स्त्री० [illegible] ले [illegible]

**समे[illegible]**, पु० [illegible] असें [illegible] तुल्य, इ० तो आऊ[illegible] जो अविरुद्ध भा[illegible].

**समेटणें**. ग० [illegible] युद्ध [illegible] इ० तें कोणेकानें [illegible] करणें.

**समेत**, ३लिं० सम[illegible].

**समेतबाबती**, अ० [illegible] देखील बाबती.

**समेळ**, पु० कों० संबळ.

**स[illegible]ळ्या**. पु० कों० संबळ्या.

**[illegible]**, ३लिं० सूतमारल्यासारखा उजू [illegible] गेलेला जो नदी, मार्ग, [illegible], [illegible] रेषा, जोतें, काष्ठ, इ० तो ;२, [illegible] कोणेक अवधीपासून समान सूत्रानें अन्वित जो प्रदेश [illegible] ठायीं

यां किं० कोणेकाचे विवक्षित पुढल्या प्रदेशीं.

**समोरच्या**, ३लिं० समोरील.

**समोरासमोर**, अ० परस्पर संमुख होत असें; उ०, दोघे समोरासमोर उभेराहून बोलत होते.

**समोरी**, स्त्री० समोरपणा.

**समोरील**, ३लिं० समोर प्रदेश जो तेथील.

**समोरून**, अ० कोणेकाचें पुढून.

**सम्मत**, ३लिं० अभिमत; २, न० अनुमत.

**सम्मति**, स्त्री० सम्मत द्वितीयार्थी.

**सम्मान**, न० समान.

**सम्मार्जन**, न० शेणखळा, उदक, इ० कानीं शुध्यर्थ सडाघालणें, सारिवणें, इ० रूपजो व्यापार तें.

**सम्मार्जनी**, स्त्री० सं० केरसुणी.

**सम्मुख**, ३लिं० अभिमुख.

**सम्यक्**, अ० उत्तमप्रकारें करून.

**सय**, स्त्री० आठवण.

**सयतान**, न० सैतान.

**सयँपाक**, पु० सैंपाक.

**सयँपाकघर**, न० सैंपाकघर.

**सयँपाकी**, पु० सैंपाकी.

**सयँपाकीण**, स्त्री० सैंपाकीण.

**सयली**, स्त्री० सैली.

**सयसद**, अ० रा० सततसय.

**सयसुमार**, पु० सईसुमार.

**संयुक्त**, ३लिं० कोणेकाशीं संयोगसंबंधानें संबद्ध जो तो.

**संयोग**, पु० पदार्थांचा परस्परें एकमेकास लागलेपणा रूपजो संबंध तो.

**संयोगी**, पु० जाणे लग्नकरून घेतलें असतें असाजो गोसांवी, किं० बैरागी, तो.

**संयोजक**, ३लिं० उत्तमरीतीनें योजना कर्ताजो तो.

**संयोजन**, न० उत्तमरीतीनें अनेकांचासंयोग करण्याचा जो व्यापार तें.

**संयोजित**, ३लिं० संयोजन केलें जाचें तो.

**सय्यद**, पु० महंमदाचा वंशांत जेउत्पन्न यवन ते प्र०.

**सर**, पु० जामध्यें मोत्यें, पोवळीं, फुलें, इ० ओंवली आहेत असें जें सूत्र तो; २, मंडपाद्युपयोगी सरळ लांब मोटा जो वांसा तो; ३, सजातीय अधिकारविशिष्टजे अनेक अधिकारी त्यांजवर केला असतो जो एक मुख्य अधिकारी तो, हाशब्द अधिकार व अधिकारी यांचे मागें लागतो; उ०, सरदेशमुखी, सरदेशमूख, सरसुभेदारी, सरसुभेदार, इ०; ४, विवक्षित सजातीय समुदायामध्यें गुणादिकें करून जो अधिक तो; ५, मध्येंमध्यें कांहीं काल कोणेकाम्जी वेड लागल्यासारखी अवस्था हो

त्ये तो :६, रा॰ मुसळसळई ;७, स्त्री॰ कांहीं काळ राहून जावा असा येतो जो पर्जन्याचा झपाटा ती ;८. कोणेकाची कोणेकास गुणादिकें करून जी बरोबरी ती प्रा॰ निषेधविषयीं प्र॰ :९, गजिफांतील जी नलफ ती ;१०, अ॰ पावेतों :उ॰ भांडेंवरसर भरूनकी :११, लेखनप्रसंगीं गाय, म्हैस, बैल, टोणगा, वांसरें, यांची संख्या लिहायाची असतां त्याचा त्याचा नावापुढें या शब्दाचा प्र॰ करितात ;उ॰, गायसर दोन, म्हैससर एक, किल्ला, राज्य, इ॰ सरकरणें - म्ह॰ युद्धादिकें करून स्वायत्त करणें.

**सरकट**. न॰ रा॰ पर्जन्याची लहान जी सर पडती तीस निंदेनें म्ह॰.

**सरकटणें**. कों॰ पाय इ॰ निसरणें ;२, रा॰ वस्त्रानें सन्यानीं विशिष्ट होणें.

**सरकटा**, ३ लिं॰ कों॰ निसरडा प्रथमार्थीं ;उ॰, माडसरकटा झालेला आहे संभाळून चढ.

**सरकटें**. न॰ कों॰ निसरडें.

**सरकणें**, कों॰ सरकटणें प्रथमार्थीं ;२, विवक्षित स्थलापासून पलीकडे होणें; उ॰, अमळ सरकूनबसा म्ह॰ आगाहोईल.

**सरकत**, स्त्री॰ कृषिवाणिज्यादिरूप जो - कोणेक व्यवहार त्यामध्यें तोटा नफा यांचे अधिकारित्वें करून अनेकांचा असतो जो स्वामित्व संबंध ती.

**सरकतदार**, पु॰ सरकती.

**सरकतनामा**. पु॰ सरकतीचे ठरावाचा केला असतो जो कागद ती.

**सरकती**, पु॰ जा व्यवहारांत जाणी सरकत ठेविली आहे ते त्या व्यवहाराविषयीं परस्पर.

**सरकत्या**. पु॰ सरकती.

**सरकन. कर. दिनी. दिशीं**. अ॰ अनुकरण, निसरड्यावरून पाय इ॰ निसरणें इ॰ कांचें वि॰.

**सरकफांस**, पु॰ गांठसरकावली असतां पाहिजे तेवढा लहान मोठा व्हावा असा जो फांस करितात तो.

**सरकावणें**. सरके असें करणें ;२, कोणेक व्यवहारीं पुढें सरणें.

**सरकाळ, सरकाळी**, स्त्री॰ ओंधळा, मजगुरा, याचे तोंटाचें जें अग्रभागचें पेरें जास कणीस असतें तें परंतु कणीस नसतां म्ह॰.

**सरकी**, स्त्री॰ कापशीची जी बी ती.

**सरखत**, न॰ कों॰ अनेकवार द्यावाचें जें सर्कारचें देयतें त्या त्या वेळेस देऊन एका कागदावर मांडून घेत असावें अशी जी सर्कारातून पावती लिहून घेतात तें ;२, स्त्री॰ गा॰ सरकत.

**सरखेल**, पु॰ राजाजवळचा एक अधिकारी आहे.

**सरखेली**, स्त्री॰ सरखेलाची जो अधिकारती.

**सरचश्मा, सरचष्मा**, पु॰ कोणेक समुदायामध्यें मुख्यत्वेंकरून वागणारा,काम कारभार,व्यवहार,पाहणारा,असा जो कोणी असतो तो.

**सरजा**, पु॰ नथेंस मुख्य मोत्यांचेवर त्या गाडयास जी कलिकाकार मोत्यें ओळीनें लावितात ते.

**सरजा**, पु॰ बंदुकीस तोंडा अडकवायाचे उपयोगी जो लोखंडाचा आंकडयासारिखा अवयव असतो तो.

**सरंजाम**, पु॰ तत्तत्कार्योपयोगि जी सर्व सामग्री तो; २.सर्कारांतून जास घोडें,पालखी इ॰ देतात किं॰ फौजठेवायास सांगतात त्यांचे खर्चाबद्दल जो ग्रामादि नियमित करून देत असतात तो.

**सरंजामी**, ३लिं॰ सर्कारांतून ग्रामादिरूप सरंजाम जास दिला आहे तो; २,सरंजामाबद्दल दिल्हेला जो ग्रामादि तो.

**सरड, सरडा**, पु॰ पालीच्या आकारचा एक क्षुद्र जंतु आहे, म्ह॰ सरडयाची धांव कुंपणापर्यंत.

**सरडोका**, पु॰ कों॰ सरडा.

**सरण**, न॰ मृत मनुष्यास जाळायाकरितां रचितात जी चिता तें.

**सरणि**, स्त्री॰ सं॰ मार्ग; २.ला॰ कोणेकाची भाषण, कविता, इ॰ संबंधी जी गति ती.

**सरणें, सरकणें**;२,व्ययादिद्वारा द्रव्यादि निःशेष होणें; ३.ग॰ कोणेक गोष्ट कोणेकास योग्य दिसणें; उ॰, यावयांत हें बोलणें तुला सरत नाही. त्यावांचून त्याचें सरत नाहीं म्ह॰ चालत नाहीं असा अर्थ; उ॰,म्ह॰ शेजी विण सरेना आणि घडीभर पडेना.

**सरता**, ३लिं॰ अनुक्रमानें स्थित जे अनेक अर्थ त्यामध्यें जो शेवटला तो.

**सरतेशेवट**, अ॰ भाषणादि कोणेक व्यवहाराची जी चरमावस्था तीचेठायीं; उ॰ सरतेशेवट रुपये द्यावे असें ठरलें.

**सरतेशेवटीं**, अ॰ सरतेशेवट;२.शेवटल्याविभागीं.

**सरद**, ३लिं॰ सर्द; २, स्त्री॰ विवक्षित जो दिक्प्रदेश किं॰ देशप्रदेश तो; उ॰, यंदां दक्षिणचें सरदेंस पर्जन्य पडला नाहीं म्हणून तो सरद बुडाली.

**सरदणें**, कोणएक पदार्थ सरदानें युक्त होणें.

**सरदावणें**, सरदणें.

**सरदी**, स्त्री॰ सर्दी.

**सरदेणें**, ग॰ सरदणें.

**सरद्गर्मी**, स्त्री॰ सरदानें मिश्रित जी गरमी तद्विशिष्ट जें कोणेक देशाचे ठायीं किं॰ कालाचे ठायीं असतें ती; २.सरदी आणि गरमी हीं मिश्र झाल्यामुळें शरीरांत होतो जो विकृति

विकृति विशेष तो.

**सरधोपट**, ३ लिं० जामध्यें वांकडेतिकडेपणा नाहीं असा जो सरळ मार्ग, भाषण इ० तो, अ० अर्थ सांगणें, मननकरणें, इ० कांकडें नगुंततां सरळगतीनें वाचणें, लिहिणें. इ० कांचें वि०.

**सरनौबत, सरनौबद**. पु० हशालदारां चें हातास्वाळच्या एक अधिकारी आहे.

**सरपण**. न० जाळावयाचें उपयोगीं जीं लांकडें. गोंवऱ्या. इ० तें.

**सरफळी**, स्त्री० मुलाचें कमरेस बांधाया चें एकसर्पाकार भूषण आहे; २, सुवर्णादिकांची एक प्रकारची सांखळी आहे.

**सरबर**. स्त्री० बरोबरी या अर्थे.

**सरबरा**. स्त्री० सरबर.

**सरबरीत**, ३ लिं० फारदाटनव्हे. आणि फारपातळ नव्हे, असा जो अंब्याचा रस. कालवलेला भात, पीठ, विरवल. भाजी. इ० पदार्थ तो.

**सरबसर**, ३ लिं० केवळ बरोबरीचें नव्हत प्रमाणादिगुणानें एकसे कांहीं यत्किंचित् अंतरानें विशिष्ट जो कोणेक अर्थ तो; उ०, सगळीं मोत्यें एकसारखीं नाहींत सरबसर आहेत.

**सरम**. न० बाजरीचें तोटाचा जो समुदायतें

**सरमाड**. न० सरम.

**सरळ**, ३ लि० उजू नीट, असा जो काठी, मार्ग, इ० पदार्थ तो; २, स्त्री० अतिशयित गूढाशय. कठिनपदप्रक्षेप, वक्रता, इ० दोषजांत नाहींत अशी जी कविता. भाषण. इ० ती.

**सरवट**, न० सरकट; २. ग० सरचा करायाचें उपयोगीं जी जमीन तें.

**सरवजा**, पु० ग० सरवाधा.

**सरवदा. सरवद्या**, पु० दाकोला.

**सरवा**, पु० पर्जन्याची जी एक सर तो; २, ग० प्रथमवर्षे भाजून तयारकेलें जें डोंगरी, शेत, त्यासपुढे मा० दोनवर्षेपर्यंत म्ह० ; ३, जो धव्या, मजगुरा. इ० कांचें शेत कापून घेतल्यानंतर त्यांत गहनात जें त्याचें स उपाचोळा तृण इ० नहिशिष्ट जी भूमि तो.

**सरवेभात**, न० ग० सरव्यामध्यें पिकतें जें भात तें.

**सरस**, पु० बकऱ्याचें मांसापासून एक पदार्थ उत्पन्न होत असतो जो चपडा लाखेसारिखा दिसतो आणि जो डकवायाचें उपयोगी पडतो; २, विवक्षित गुणानें जो उत्तम तो; ३, विवक्षित प्रमाणापेक्षां जो कांहीं अधिक तो, हाशेर त्याशेरापेक्षां सरस आहे कसा म्हणतो हें काय.

**सरसंदा**, ३ लि० ग० सरसोंदा.

**सरसकट, सरसगट**. अ० सकट प्रथमार्थे.

**सरसर**. अ० अनुकरण असा शब्द होई असें सर्पादिकांनीं गमन करणें, काष्ठादि कांवरून पाय इ० निरणें इ० कांचें वि०

सरसरणें.

**सरसरणें**, सरसर शब्द होई असें सर्पादिकांनीं गतिविशिष्ट होणें.

**सरसरां**, अ० सरसर.

**सरसा**, अ० सन्निधप्रदेशीं किं० संनिधप्रदेशातें आश्रयून बस, ठेव, इ० कांचें वि०; २. कोणेक कार्यार्थ पदार्थावर उत्पन्न झाला जो वेग त्याच वेगबळानें; उ०, फौजेवर गोळा टाकला त्या सरसें वृक्षही उडाले.

**सरसाल**. न० विवक्षित जें सर्व वर्ष तें; उ० यंदाचें सरसालांत एक पैसा मिळाला नाहीं; २. अ० अवघें जें एक वर्ष त्याच पर्यंत; उ०. आह्मास संसारास सरसाल हजार रुपये खर्चास लागतात.

**सरसाला. सरसाली**. ३ लिं० सरसालसंबंधी जी बाकी, हिशेब, इ० तो.

**सरसावणें**, दूरस्थित जो कोणेक पदार्थ तो सरसा करणें; २. कोणेक पदार्थ अधिष्ठितस्थळाहून विवक्षितस्थळीं सरके असा करणें; ३, युद्धवादादि प्रसंगीं कोणेकानें तत्तद्विषयीं सिद्ध होऊन प्रा० आवेशपूर्वक पुढें होणें; ४, मनुष्य, पशु, वृक्ष, यांणीं अकस्मात् वृद्धिंगत होणें; उ०, पूर्वी ही मुलगी एवढीशी दिसत होती पहा एका वर्षांत कशी सरसावली आतां चांगली मोठी बायको दिसत्ये.

**सरसुमार**. पु० सईसुमार.

**सरसोदा**. ३ लिं० कों० आसपरस्पर व



यः कृत अंतर फार नाहीं अशीं जीं स्त्रीपुरुषें भिन्नभिन्न ओताचे बैल, इ० ते परस्पर.

**सरस्वती**, स्त्री० वाणीची अधिष्ठात्री एक देवता आहे; २, तिजपासून झाला जो गीर्वाणभाषादिरूप आणि वेदशास्त्र पुराणादिरूप शब्दप्रपंच ती; ३, तो प्रपंच ज्यांत लिहिला आहे असें जें पुस्तकादि ती; ४, पाटीवरचें लिहिणें लिहिणारीं जीं मुलें पूजनोद्देशानें त्या पाटीवर एककादिल असतात जें रेखादिरूप चिन्ह ती.

**सरस्वतीअनध्याय**, पु० आश्विनमासीं शुक्लपक्षीं मूळनक्षत्रीं सरस्वतीचें आवाहन करितात त्या दिवसापासून श्रवणनक्षत्रपर्यंत जे अनध्याय दिवस ते.

**सरस्वतीदान**. न० कोणेकापासून द्रव्यादिक घेऊन किं० एरवींच त्यास जें रत्न इ० दत्त ऐवज करून देतात त्यासच प्रसंगविशेषीं म्ह०.

**सरस्वतीपूजन**, न० आश्विनमासीं घरोघर मूळनक्षत्रावर पुस्तकांचा ठायीं सरस्वतीचें आवाहन करून दुसरे दिवशीं तिचें पूजन करितात तें.

**सरळ**. ३ लिं० सरल.

**सरळणें**, सरसावणें द्वितीय तृतीयार्थी.

**सरळव्याज**. न० चक्रवाढीचा हिशेबानें व्याज न करितां केलें जें व्याज तें.

**सरळी**, स्त्री० कों० एकदांच आंगामध्यें वेग घेऊन मध्यें हातपाय न हालवितां सर्पासारिखें पाण्यामध्यें सरळ शरीरानें पोंहत जावें अशा प्रकारें जी गति ती. मार धातुयोगी म्ह०.

**संरक्षक**, ३ लिं० उत्तमरीतीनें रक्षण करणारा तो.

**संरक्षण**. न० उत्तमरीतीनें जें रक्षण तें.

**संरक्षिणें**. उत्तमरीतीनें रक्षिणें.

**संरक्षित**. ३ लिं० संरक्षण केलें जाचें तो.

**सरा**, पु० यज्ञादिसंस्कारानें संस्कृत जो माडा, ताडी, इ० तो ;२, कों० सरद्दितीया श्रे :३, दुरुला.

**सराई. सराँई**. स्त्री० फलधान्यादि तो तो पदार्थ सिद्ध होण्याचा जो मुख्य समय तो ;२, ला० लग्न इ० तोतो व्यवहार होण्याचा जो मुख्यसमय तो. यत्नादिकानीं मार्गामध्यें मार्गस्थांस उतरायाकरितां जी शाला बांधलीअसन्ये ती, प्रा० हिंदुस्थानांत व्यवहार.

**सराईत**. ३ लिं० पोहणें, गाणें, घोड्यावर बसणें, निशाणमारणें, इ० विद्येमध्यें लहानपणापासून अभ्यस्त झालेला जो तद्विषयीं.

**सरौंटा**. पु० एक औषधी लहानझाड आहे तो आणि त्याचें फल तो ;२, रा० माड, पोफळ, इ० काष्ठाचे अंगीं असतात ते हिरके ते प्र० परंतु हातपाय इ० कांत वोंचण्याचे प्रसंगीं प्र० ; ३, सकंप जी लांबतान गाण्यांत घेतात तिला म्ह०.

**सरासरा**, अ० सरासरी.

**सरासरीस**, अ० सरासरीस.

**सराफ**. पु० हुंडा, नाणें, रोकड, याचा देघेंकरावी असा व्यापार करून उपजीविका करतो तो :२, ला० खर्चवेच करण्याविषयीं बारीक कसर पाहणारा असाजो कृपण त्यास निंदेनें म्ह०.

**सराफडा**, पु० निंदेनें सराफास म्ह०.

**सराफी**, स्त्री० सराफाचें जें कर्म तें ;२, ३ लिं० सराफ संबंधी जी रीति इ० तो.

**सरारणें**, सरसरणें.

**सरारों**. अ० सरसरां.

**सराव**, पु० घोड्यावर बसणें, चालणें, पोहणे, इ० कांहीं एकगोष्टीचा जो अभ्यास तो.

**सरावलें**, न० कों० परळ म्हणून मृत्पात्र आहे तें.

**सरासर**. अ० सरसर.

**सरासरी**. अ० यथाकथंचित ;२, पुरतेपणीं निर्णय नहोतां अजमासानें ;उ०. एवढें घर बांधलें असतां यास सरासरी हजाररुपये लागतील.

**सरासरीस**, अ० सरासरी.

**सराळी**, स्त्री० कों० सरळी.

**सरिगम**, स्त्री० सप्तस्वरांची बांधकजी स, रि, ग, म, प, ध, नी, हीं सात अक्षरें इतीकरूनच कोणेक रागावर केला असतो जो निबंध तो.

**सरित्. सरिता**. स्त्री० सं० नदी.

**सरिफा**, पु० कायदा.

**सरिफेवार**, ३लिं० क्रयविक्रय व्यवहारींजांत सरिफा होतो असाजो पदार्थ तो.

**सरी**, स्त्री० सुवर्णाचा किं० रुप्याचा तारा दोरीसारख्या वळून स्त्रियांचें एक कंठभूषण करित असतात; २, सुवर्णादि धातूची अलंकारादि करायाकरितां काढितातजी तारती; ३, पाटी, छत्री, इ० कांस लावायाकरितां चिंवा, वेत, इ० पिंजून त्याच्या लांब लांब काढितात ज्या काड्या त्या प्र०; ४, वांग्या, मिरच्या, खरबुजें, रताळीं, इ० कांस पाणी लावायाकरितां त्यांच्या दोन दोन पंक्तीमध्यें जी एकेक लांबट खळी करितात ती किं० तिच्या दोहों बाजूस मिरच्या, रताळीं, इ० जिन्नसानें विशिष्ट होतात जे दंड ते प्र०; ५, वस्त्राचें सूत पिरल्यामुळें त्यास लांबट पडतो जो दुरला ती.

**सरीसर्वत्र**, अ० सर्वत्र.

**सरू**, पु० सुरूह्मणून जो वृक्ष तो.

**सरूदार**, ३लिं० सुरूदार.

**सरूप**, ३लिं० सं० समानआहे रूप ज्यांचें ते परस्पर.

**सरूपता**, स्त्री० चतुर्विध मुक्तींतील एकमुक्तिआहे जीचेठायीं ईश्वरसदृश रूप प्राप्त होतें; २, सरूपपणा.

**सरोता**, पु० अडकिता.

**सरोबरी**, स्त्री० कों० बरोबरी; २, अ० कोणेक प्रमाणानें तुल्य होई असें कोणेक पदार्थांत कोणेक पदार्थ मिसळणें, असणें, इ० कांचें वि०.

**सरोरुह**, न० सं० कमल.

**सरोवर**, न० मोटेंजें तटाक ज्यांत प्रा० कमलादिक असतात तें, सरोवर न्हाणें ह्म० सती निघाली जी स्त्री तिणें समारंभपूर्वक एकस्नान करायाचें आहे तें करणें.

**सरोसर**, स्त्री० पु० मोहोरकी सारिखा चर्मादिकांचा सखलाद इ० कानें मढविलेला किं० नुस्ता चर्माचाच अश्वाचे मुखावर शोभार्थ घालायासाठीं जो पदार्थ करितात तो तो.

**सर्कार**, न० ज्याचा योगानें प्रजापालन, दुष्टनिग्रह, इ० कार्यें होतात असें जें सत्तारूप अधिकरण ज्याचा अधिकारी राजा असतो तें; २, त्या अधिकरणाच्या अधिकारी जो राजा इ० तो.

**सर्कारखराब**, ३लिं० कों० जीवतनदार इ० कोणाचे दुमाल्यास लागलेली नव्हे सर्कारांतच राहिलेली पडजमीन ती.

**सर्कारधारा**, पु० शेत, वाडी, इ० कांवर सर्कारानें बसविलाजो धारा तो.

**सर्कारमहश्मूर**, ३लिं० दर्बारमहश्मूर.

**सर्कारवाडा**, पु० सर्कारचा जो वाडा तो.

**सर्कारी**, ३लिं० सर्कारसंबंधीजो संप्रदाय. शिरिस्ता, घोडा, कारकून, पंडित, इ० तो

**सर्ग**, पु० काव्यादिकांचें अध्याय स्थानापन्नजें प्रकरण तें; २, सृष्टीची जी उत्पत्ति तो.

**सर्द**, ३लिं० ज्यामध्यें सर्दी बहुत आहे असाजो देश,

देश, औषध, हवा, इ० नीं, कोणेकानें मनां नसर्द होणें ह्म० कोणी मर्म काढल्यामुळें किं० उगीच दोष ठेवल्यामुळें अशा कांहींएक कारणामुळें खिन्न होणें.

**सर्दार**, पु० ज्याचे हाताखालीं अनेक शिपाई लोक असतात असा जो मोठा शिपाई राजादिकांपाशीं असतो तो.

**सर्दारी**, स्त्री० सर्दाराचा जो अधिकार ती ;२, घोड्याचे लगामाग घोड्याचें डोक्यांत अडकवाया करितां जो चर्मादिकांचा बंध लाविनात तीः३, ३लिं० सर्दाराचा जो वेष, डौल, रीति, इ० नीं.

**सर्दी**, स्त्री० वायु, पृथ्वी, चुना, जल, औषधादि पदार्थ इ० कांमध्यें विकारकारी जो ओलेपणा किं० थंडपणा असतो ती ;२, तणें करून होतो जो शैत्यविकार ती

**सर्प**, पु० ज्याला बाहेर पायदिमत नाहींत सरनसरत चालणारा रज्जूसारखा लांब असा एक प्राणी आहे, तत्सदृश दशां कचिन्नित सविष असा जो असतो त्यास विशेषें करून ह्म०.

**सर्पटणें**, मनुष्यादिकानें भुईवर पालथें पडून भुईशीं पोट लागत लागत पुढें सरावें अशी किं० फेंकलेला दगड इ० कानें भुईशीं फार अंतर न राहतां भुईस लागत पुढें जावें अशी गति धरणें ;२, सरकटणें प्रथमार्थें.

**सर्पटोळी**, स्त्री० सापटोळी.

**सर्पट्यां**, अ० फरपट्यां.

**सर्पीण**, स्त्री० घोड्याचे शरीरावर एक दुर्लक्षणाचें चिन्ह असतें ती.

**सर्पोस**, पु० झांकण परंतु कोणेकास नजर किं० अहेर न्यावयाचा असतां त्याचे आच्छादनार्थ जें वस्त्र केलें असतें त्याविषयीं किं०-कितीएक पात्रांवर घालायाचें जें झांकण-केलें असतें त्याविषयीं प्रसिद्धि.

**सर्फराजी**, स्त्री० कोणी शौर्यादि केलें असतां त्याची सर्कारांत मोठा करितात जी प्रतिष्ठा-ती.

**सर्फेवार**, ३लिं० सरिफेवार.

**सर्बत**, न० निंबू, चिंच, अंबा, यांचा रसांत शकरा घालून पानार्थ जो पदार्थ करितात तें.

**सर्बती, सर्बत्ती**, स्त्री० एकसमयावच्छेदें करून अनेक तोफा, बंदुका, यांचा होतो जो आवाज ती.

**सर्व**, ३लिं० आत्यादिरूप जें अवच्छेदक त्याचा आश्रयभूत जितक्या व्यक्ति असतील-तितक्यांतून एकही व्यक्ति वगळूं नये अशा रूपानें विवक्षित जो कोणेक अर्थ ती ;२, विवक्षित अर्थाचे अवांतर जितके विभाग असतात तितक्याही विभागानीं विशिष्ट अशा रूपानें विवक्षित जो कोणेक अर्थ ती ;उ० सर्वगूळ या एकट्यानें खाल्ला सर्वमनुष्यें गेलीं इ० स्थलीं व्यक्तिगत अनेकत्व घेऊन अनेकवचन ही होतें.

**सर्वकाल, सर्वकाळ**, अ० विवक्षित सर्व

कालाचे ठायीं.

**सर्वतः**, अ॰ सं॰ सर्वत्र या अर्थी.

**सर्वतोभद्र**, न॰ देवतास्थापनार्थ किं॰ ग्रहादि वेधार्थ रेखांकित चक्र करीत असतात तें.

**सर्वतोमुख**, ३ लिं॰ सर्व दिशेकडे ज्याला मुख कल्पिलें असतां संभवे असा जो ईश्वर किं॰ वर्तुल पाषाणादि किं॰ उदक इ॰ ती.

**सर्वत्र**, अ॰ विवक्षित सर्वांठायीं; उ॰, ईश्वर सर्वत्र आहे; हा शब्द सर्वत्र बोलतात; २, याचा प्रयोग सर्व या अर्थी कोठें कोठें प्राकृतजन करितात; उ॰, सर्वत्रांस दक्षिणा दिल्ही.

**सर्वथा**, अ॰ सर्वप्रकारें.

**सर्वदा**, अ॰ सर्वकाळ.

**सर्वनाम**, न॰ शब्दामध्यें एक जाति आहे जे शब्द कोणेकाची संज्ञा नसून प्रकरणाच्या अनुरोधानें उपस्थित जें अर्थमात्र त्याचा परामर्श करितात असे जे तो, जो, हा, मी, तूं, भलता, इ॰ शब्द ते प्र॰.

**सर्वनामा**, पु॰ सर्वनाम.

**सर्वपित्रीअमावास्या**, स्त्री॰ भाद्रपदमास संबंधी जी अमावास्या ती.

**सर्वभक्ष**, ३ लिं॰ खावें काय, न खावें काय, हा विधिनिषेध ज्यास नाहीं किं॰ कोणताही थाईट बरा पदार्थ असला तरी तो खावा, खाऊन जिरवावा, असा जो अग्नि, शेळी, कावळा, इ॰ किं॰ कोणी मनुष्य ती.

**सर्वभक्षक**, ३ लिं॰ सर्वभक्ष.

**सर्वशाक, सर्वशाख**, स्त्री॰ अनेक भाजा एकत्र शिजवून करितात जी एकच भाजी ती; २, आलें ह्मणून जो कंद त्यास प्रसंगविशेषीं म्ह॰.

**सर्वसाक्षी**, ३ लिं॰ सर्वभूतमात्राचाठायीं साक्षीरूपानें राहणारा जो ईश्वर, वायु, आकाश, अग्नि, इ॰ ती.

**सर्वसोंवळा**, ३ लिं॰ जन्मसोंवळा.

**सर्वस्व**, न॰ स्वसत्ताक्रांत जें सर्व धनादि तें; २, जें ज्याचें सारभूत मुख्यरूप तें त्याचें; सर्वस्वापहार, सर्वस्वनाश, इ॰ स॰.

**सर्वस्वीं, सर्वस्वें**, अ॰ सर्वप्रकारें; उ॰, सर्वस्वीं मी लबाड ठरलों; २, सर्वस्वसुद्धां; उ॰, मी सर्वस्वें तुमचा आहें.

**सर्वज्ञ**, ३ लिं॰ अर्थमात्रातें जाणणारा जो ईश्वर, योगी, इ॰ ती.

**सर्वात्मना**, अ॰ सर्वस्वीं.

**सर्वावद्ध**, ३ लिं॰ सर्वांशीं जो अबद्ध ती.

**सर्वाशुद्ध**, ३ लिं॰ ज्यांत बहुत अशुद्धें आहेत असा जो ग्रंथादि ती.

**सर्वोत्तम**, ३ लिं॰ सर्वांमध्यें उत्तम जो ईश्वरादि ती; २, कोणी कांहीं एक गोष्ट सांगीतली असतां तीचे अंगीकारार्थ जसें फार बरें आहे, उत्तम आहे, यांचा प्रयोग करितात तद्वत् याचाही करितात.

**सर्वोपरी**, अ॰ सर्वप्रकारें.

**सर्वौषधि**, स्त्री॰ सं॰ शतावरी ह्मणून एक वनस्पति आहे ती.

**सर्षप**, पु॰ सं॰ शिरस ह्मणून एक उपधान्य आहे.

**सल**, पु॰ न॰ नपाढतां बहुतदिवस पोटांत राहिला असतो जो गर्भ तो तें; शरीरावयवादिकांत कांटा इ॰ भरल्यामुळें त्यांत राहतोजो त्यांचा अंश तें; ३, स्त्री॰ पाठ इ॰ कांस भरत्येजी उसण ती; ४. पु॰ तरवार इ॰ कांपासून मेण पडून ये ह्मणून परजास बांधायाकरितां त्यामेणास संबद्ध केली असती दोरी तो.

**सलक**, स्त्री॰ कां॰ उसण; २, ३ लिं॰ सलग द्वितीयार्थी.

**सलकडें**, न॰ जेथें उसण भरली असते तेथें फिरविलें असतां ती उसण उतरावी ह्मणून धातूचें एक मंतरलेलें कडें करून ठेवितात तें.

**सलग**, स्त्री॰ जाणें, येणें, इ॰ कारणानीं कोणेकाच्या झालाजो विशेष परिचय ती; २, ३ लिं॰ मध्यें खंडित नहोतां किं॰ सांधा नमतां विवक्षित लांबीनें किं॰ रुंदीनें युक्तजो काष्ठ, वस्त्र, इ॰ पदार्थ तो.

**सलगी**, स्त्री॰ सलग प्रथमार्थी.

**सलगीचा**, ३ लिं॰ कोणेकाची जाशीं सलगपडली असत्ये तो त्याचा.

**सलज्ज**, ३ लिं॰ निर्लज्जाचा प्रतिपक्षी.

**सलणें**, [illegible] शरीरावयवांत प्रविष्टजो कंटकादि त्याणें खुपणें; २, ला॰ शब्द किं॰ दुर्भाषण इ॰ नेत्रमन, इ॰ कांत खुपत असणें.

सलतान,

**सलतान**, न॰ बाजारबुणगें लढाईचा सरंजाम एतत्सहित फौजेचा जो समुदाय तें.

**सलदें**, न॰ कों॰ झिरीं इ॰ कांचें जें नटकें करितात तें.

**सलम**, ३ लिं॰ कों॰ सलग द्वितीयार्थी.

**सलाबत**, स्त्री॰ ज्याचे योगानें जें केलें तें पार पडावें, लोकानीं वचक धरत असावें असाजो दैवानुकूल्यानें कोणेकाचे अंगीं प्रताप असतो ती.

**सलाम**, पु॰ यवनलोक दुसऱ्यास सत्कारार्थ अभिवंदन करायाचें असतां रामराम या शब्दस्थानीं या शब्दाचा प्र॰ करितात.

**सलामत**, अ॰ फुटणें, तुटणें, इ॰ कारणानीं नाशादिक होतां यथास्थितपणें कोणेक पदार्थ असणें, जाणें, येणें, इ॰ कांचें वि॰ परंतु प्रा॰ नाशसंभावना असतां प्र॰; उ॰, आह्मी गलबतांत बसून गेलों तें सलामत घरीं पोंहचलों.

**सलामालकी**, स्त्री॰ परस्परानीं एकमेकाचे घरीं कदाचित् जात असावें वाटेंत गांठ पडली असतां रामराम नमस्कार इ॰ करावा परगांवीं असतां कुशलवृत्त लिहून कळवीत असावें असाजो कोणेकाचा कोणेकाशीं सुमाराचा सख्यभाव असतो-तो.

**सलामी**, स्त्री॰ रामरामी.

**सलामीचाहात**, पु॰ दांडपटा खेळते समयीं आरंभीं मंगलार्थ एक प्रकारचा हात करीत

त

त असतात तो

**सलिता, सलिदा.** पु॰ उंटावर लादायाचें जें ओझें तें बांधायाकरितां गोणपाटाचे तुकडे जोडून एकसाधनभूत वस्त्रविशेष केला असतो तो.

**सलिल.** न॰ सं॰ जल.

**सलींव.** ३ लिं॰ यत्किंचित् सैल जो तो.

**सलूक, सलूख.** पु॰ समेट प्रथमार्थ; २. ग्रा॰ परस्परांची जी मैत्री तो.

**सलोकता.** स्त्री॰ चतुर्विध मुक्तींतील एकप्रकारची मुक्ति आहे जीणेंकरून ईश्वराचे लोकीं वास होतो.

**सलुग्न.** कोणेक पदार्थाशीं लागून राहिला जो तो त्याशीं.

**सल्ला.** पु॰ समेट प्रथमार्थ परंतु भा॰ युद्धप्रसंगीं प्र॰; २. कोणेक कार्याविषयीं कोणाकाचें घेतात जें अनुमत तो; ३. करांगुलींत घालायाचें एक भूषण आहे.

**सल्लाम.** न॰ यवनीमालांतील तिसरें जें साल तें.

**सल्लासीन.** न॰ यवनीमालांत एकनायकीचें साल आहे.

**सव.** स्त्री॰ दे॰ संवय; २. ग्रा॰ कोणेक पदार्थास असल्ये जी चवती.

**सवई,** स्त्री॰ ग्रा॰ संवय.

**सँवकणें,** कोणेक व्यापारापासून काहीं लाभ झाला असतां त्याची गोडी लागून पुनःपुनः तोच लाभ व्हावा ह्मणून तो तोच्या पार करण्याविषयीं जी चट लागल्ये तद्विशिष्ट कोणें कानें होणें; उ॰, एकवेळ या कुत्न्यास घरांत आणून भाकर घातली तर ह्मणजे तो तसाच संवकेल.

**सवंग,** ३ लिं॰ महागाचा प्रतिपक्षी; ह्म॰ सवंग सवदा हगवण लावी.

**सँवगडा.** पु॰ संवगडी.

**सँवगडी,** पु॰ कोणेकाचा जो खेळगडी तो त्याचा.

**सवंगणें.** धान्यादिकानीं सवंगाईनें युक्त होणें.

**सवँगाई,** स्त्री॰ महागाईचा प्रतिपक्षी.

**सवघड,** ३ लिं॰ अवघडाचा प्रतिपक्षी.

**सवड,** स्त्री॰ कर्मद्रव्यादि अर्थाहीं करून रुद्ध झालेला जो देश, काल, इ॰ त्याचाठायीं तत्सजातीय अर्थांतराचा समावेश व्हावयास असतो जो कचित् अवकाश तो; उ॰, मला सारा दिवस काम आहे त्यांत येण्यास सवड सांपडली तर येईन; धन्याची आज्ञा झाली तर येईन अशी नाहीं ह्मणायास सवड ठेवा; मगळी जागा भरली एक मनुष्य बसायास देखील सवड नाहीं; २. ग्रा॰ सवड्या.

**सवडे, सवड्यां,** अ॰ ग्रा॰ समक्ष.

**सवणणें.** क्रि॰ विवक्षित गृहकृत्य आटोपणें.

**संवत्,** पु॰ शक. परंतु विक्रमशकाविषयीं

र्यी प्र०.

**सवत**, स्त्री० एकपतिक जा दोन स्त्रिया त्या परस्पर.

**सवतमत्सर**, पु० परस्पर सवतींचा जो मत्सर तो; २, ला० एकस्वामिक जे अनेक भृत्यादि त्यांचा जो मत्सर त्यास म्ह०.

**सवतळा**, पु० एक्या स्त्रीपाशीं जाणारे जे दोन ते परस्पर.

**सवतवळा**, स्त्री० कों० परस्पर जा सवती त्या सर्व मिळून त्या.

**सवता**, ३ लिं० निराळा. प्रा० शूद्रभाषेंत प्र०.

**सवतां**, अ० कों० स्वतः या अर्थी, शूद्रभाषेंत प्र०.

**सवताळा**, पु० सवतळा.

**सवतिमत्सर**, पु० सवतमत्सर.

**संवत्सर**, पु० द्वादश मासात्मक जो काल तो; २, पर्यायें करून होत असतात जी प्रभवादि साठ वर्षांचीं नामें तीं प्र०.

**संवत्सरप्रतिपदा**, स्त्री० चैत्रशुक्ल प्रतिपदा जा दिवशीं चांद्रसंवत्सराचा आरंभ होतो.

**सँवथळ**, ३ लिं० ग० सपाट जी भूमि ती.

**सवँदड**, स्त्री० शमी म्हणून जो वृक्ष ती.

**सँवदरफल**, न० ग० समुद्रफल.

**सवदा**, पु० कोणे कजिनसाचा क्रयविक्रयरूप जो व्यापार तो; २, तादृश व्यापारानें घेतला जो जिनस तो.

**सवदागर, सवदागीर**, पु० इकडील जिन्नस तिकडे नेऊन विकावा, तिकडील इकडे आणून विकावा असा व्यापार करणारा जो मोठा व्यापारी तो.

**सवदागरी, सवदागिरी**, स्त्री० सवदागराचें जें कर्म ती; २, ३ लिं० सवदागर संबंधी माल इ० तो.

**सवदासूत**, न० सवदा इ० तें.

**सवन**, स्त्री० न० गाते, पढते समयीचें जें उच्च, मध्य, नीचरूप स्वर मान ती, तें.

**सँवय, सवय**, स्त्री० कोणेक गोष्टीचें अनेक वार आचरण झाल्यामुळें कर्ता इ० कांचे अंगीं तत्संबंधी जडतो जो संस्कार ती जेणेंकरून ती गोष्ट स्वाभाविक वृत्तिप्राय होत्ये. अतएव तद्विरहीं दुःख व्हावें ती सहजांत केली जावी इ० होतें.

**संवरणें, सवरणें**, याव धातुमात्राचा रूपापुढें तत्सदृश याचीं रूपें होऊन उपशब्दामागिलीं लागतात; उ०, मी देऊन संवरून का हो चोर झालों; झालें संवरलें आतां त्याची गोष्ट कशास पाहिजे.

**सवर्णन**, न० सं० सावयव अंकांचा सूक्ष्म जो अवयव असेल तत्सजातीय अवयवें अवयव करून त्यांचें जें एकीकरण तें.

**सवर्णित**, ३ लिं० सं० सवर्णन ज्याचें केलें असा जो अंकराशि तो.

**सवा**, ३ लिं० एक किं० एकत्वें करून विवक्षित जो पंचविशी, पन्नाशी, शें, हजार इ० अंकराशि त्यांचा चतुर्थांशानें युक्त जो एक अंक किं अंकराशि तो; उ०, आठ आणि पावला मिळून सवा

सवा आठ ; शें आणि पंचवीस मिळून सवा शें .

**सवाई** , ३लिं० कोणेकाचे चतुर्थांशानें युक्त जो कोणेक तो त्यापेक्षां ; उ०, कोंकणचे मापा पेक्षां देशाचें माप सवाई आहे ; २, स्त्री० द्रव्यादिरूप जो कोणएक अवयवी त्याचा जो चतुर्थांश तत्तुल्य अंशानें जी त्या अवयवी ची अधिकता ती, हां, कर, इ० योगीं प्र०; ३, प्राकृत कवितेंत एक छंद आहे ; ४, गा० मवई .

**सवाकीं** , न० दे० एक सवें सवें बेसवें अडीच अशी प्रकारची मुलांस शिकवायाचें उपयोगी एक अंकपरिपाटी आहे ती, प्र० अनेकव० .

**सवागी** . स्त्री० पु० एक स्वार आहे .

**सवाणणें** , स० खोबाचें नेम, बंदूक. इ० कांत मातो, दारू. इ० घालून घट्ट बसवावी म्हणून पहार. गज, इ० कांचें अग्रानें अनेक वार ठोकणें. पक्षीं तें नेम, त्यांत बसवाया चा खोब, इ० कांस ही कर्मता .

**सवाणा** , पु० चिमट्यासारिखें सोनाराचें एक आऊत आहे .

**संवाद** , पु० कोणएक विषयींचें प्रश्नोत्तरादि रूप जें परस्परांचें भाषण तो .

**सवायकें** , न० सवाकीं , याचा एकवचनीं ही प्र० होतो ; उ०, मलासवायकें पाठ आहे .

**संवारी** , स्त्री० कों० समुद्राचें नित्यशः भरती ती ची परिपूर्णांच स्थानी .

**सवारी** , पु० गानसंबंधी तालांत एक भेद आहे ; २, ३लिं० तद्विशिष्ट जो ख्याल इ० तो .

**सवाल** , पु० विवादादि प्रसंगीं वादिप्रतिवादी इ० कांस कोणेक गोष्टीविषयीं जो प्रश्न करितात तो ; २, यवनी महिन्यांतील जो दहावा महिना तो .

**सवाशा** . पु० कांहीं एक दोषानें पृथक् ठेव पाकली अशी एक ब्राह्मण जाति आहे .

**सवाशीण** , स्त्री० **सवाष्ट** , स्त्री० **सवाष्णा** , स्त्री० सुवासिनी शब्दाचा अपभ्रंश .

**सविस्तर** , ३लिं० विस्तारें करून युक्त जें वर्तमान, गोष्ट. लेख, इ० तें .

**सवे** , **सेंवे** , स्त्री० दे० संवय .

**सवें** . अ० प्र० कोणएकासह वर्तमान . आ, ये. उठ. चे. इ० कांचें वि० .

**सवेंच** , **सवेंचि** . अ० प्र० कांहीं एक कार्याचें अव्यवहित उत्तरक्षणीं कांहीं एक करणें, होणें. इ० कांचें वि० ; उ०. ऐसें बोलून अगस्तिमुनि, सवेंचि गेला निजस्थानीं .

**सवेणया** . स्त्री० कों० रास न्हाणें म्हणून जो समारंभ त्या ; प्र० अनेकव० .

**सव्य** , न० पदार्थमात्राचा जो डावा भाग इ० तो ; २, प्रदक्षिण जें भ्रमणादि तो ; ३, लोकामध्यें जो उजवा भाग त्यास म्ह० .

**सव्यगत** , अ० कां० ईषन्मात्र ही उणेपणादि सण्यांत न यावयाजोगा व्यक्तपणें कोणेक पदार्थ दृष्टीस पडणें भूम्यादिकांवर प्रतिबिंबि

विचित होणें इ० कांचें वि०.

**सव्यसाची**, पु० दोहोंहातानीं सारखे बाणमारणारा असा एक पुराण प्रसिद्ध पांडवांत अर्जुन ह्मणून होता त्याची ही संज्ञा आहे त्यावरून आतां जो कोणी दोहोंहातानीं सारखें काम करितो त्यास आरोपानें ह्म०.

**सव्याज**, ३ लिं० व्याजासहित जें मुद्दल इ० तो.

**सधा**, ३ लिं० सधा.

**सबाल**, पु० सबाल्य हिंतीयार्थी.

**सद्वीस**, ३ लिं० एक संख्या आहे २८.

**संशय**, पु० संदेह.

**संशयग्रस्त**, ३ लिं० संदेहविशिष्ट जो तो.

**संशयात्मक**, ३ लिं० ज्यापासून संशय उत्पन्न होतो पुरतेपणी एकाचें ज्ञान होत नाहीं असा जो ग्रंथ, भाषण, इ० तो.

**संशयी**, ३ लिं० भलत्याच गोष्टीविषयीं ज्याचे मनांत अनेक संशय पदोपदीं येत असावे अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**सष्टम**, ३ लिं० कों० ठळक जो दागिना इ० पदार्थ तो.

**ससकर**, ३ लिं० ग० धान्यादि पदार्थांत त्याचे बरोबरीनें मिश्रित झालेला असतो जो गोटा, पाकड, खडे, विजातीय धान्य इ० पदार्थांतर तो.

**संसक्त**, स० ३ लिं० आसक्त.

**ससगणी**, **ससगाणी**, स्त्री० रा० ससगणी प्रथमार्थी.

**संसर्ग**, पु० पदार्थाचा पदार्थाशीं जो स्पर्शादि संबंध तो.

**संसर्गी**, ३ लिं० कोणे काचा संसर्ग ज्यास आहे तो त्याचा.

**संसर्प**, पु० ज्यावर्षी क्षयमास येतो त्यावर्षी क्षयमासाचे पूर्वी जो अधिक मास पडतो तो.

**ससा**, पु० एक चतुष्पद पशु आहे.

**ससाणा**, पु० एक पक्षी आहे.

**संसार**, पु० प्रपंच प्रथम हिंतीयार्थी.

**संसारी**, ३ लिं० घरदार, बायकापोरें, इ० रूप संसार ज्याचे पाठीशीं आहे तो.

**संसारीक**, ३ लिं० द्रव्योपार्जन करून व्यवस्थेनें खर्च करावा, कुटुंब पोषणादि करावें, इ० रूप संसार करण्याविषयीं जो दक्ष तो.

**ससाक्ष**, ३ लिं० साक्षीनें विशिष्ट जो लेख, भाषण इ० तो.

**संसृति**, स्त्री० सं० प्रपंच प्रथमार्थी.

**संस्करण**, न० संस्कारण्याचा जो व्यापार.

**संस्कर्ता**, ३ लिं० संस्कार करणारा जो तो.

**संस्कार**, पु० कोणेक अर्थावर क्रियेचा संबंध झाला असतां तेणें करून त्या अर्थावर कांहीं एक नवा विशेष गुण उत्पन्न होऊन कांहीं राहतो तो, ज्याचे योगानें त्या अर्थाचे स्वरूपाचा पूर्वावस्थेपेक्षां कांहीं भेद होतो, २. गर्भाधानादिक जो संस्कार कर्में तो प्र०.

**संस्कारणें**, विवक्षित संस्कारानें विशिष्ट करणें.

**संस्कारित**, ३ लिं० संस्कारिला जो तो.

**संस्कार्य**, ३ लिं० ज्याचा संस्कार करावयाचा आहे

हृतो.

**संस्कृत**, ३लिं॰ संस्कारित :२, एकभाषा आहे तीचें आणि तत्संबंधी जो शब्द, ग्रंथ, भाषण, इ॰ त्याचें वि॰.

**संस्कृति**. स्त्री॰ सं॰ संस्कार.

**सस्ता**, ३लिं॰ सवंग.

**सस्ताई**, स्त्री॰ सवंगाई.

**सस्तावणें**, स्वस्तावणें.

**संस्थ**, ३लिं॰ जो जेथें स्थित तो तत्संस्थ :उ॰, जलसंस्थ, वृक्षसंस्थ, इ॰ समासीं प्र॰ :२, ज्यादिशाकडे ज्याची समाप्ति तो तत्संस्थ :उ॰, दक्षिणेकडे संस्था ज्याची ते दक्षिणसंस्थ, प्राक्संस्थ, उदक्संस्थ, इ॰ स॰ प्र॰.

**संस्था**. स्त्री॰ सुखरूपें करून राहण्यास अन्नोदकादिकांची जीजी जशी जशी सोय असावी तसं तसं तिचें आनुकूल्य असल्यामुळें जी यथास्थितपणें स्थिति होत्ये ती :२, स॰ कोणेक अर्थाची समाप्तिरूप जी दशा ती.

**संस्थान**. न॰ राजाचा राजकीय व्यवहार जेथें मुख्यत्वें करून होत असतो असें जें नगरादिस्थान तें :२, ज्याचें खर्चाचें सरंजामाकरितां राजादिकांनीं ग्रामादि दिल्हें असतें असा जो कोणी देव, सत्पुरुष, विद्वान्, मांडलिक, राजे, इ॰ यांचें जें आपआपला व्यवहार करण्याचें मुख्यग्रामादिस्थान तें ;३. मोठा विद्वान् इ॰ जो कोणी त्यास स्न॰.

**संस्थानिक**, ३लिं॰ वंशपरंपरादि संबंधी जीं स्थानें तीं समान आहेत ज्यांचीं ते परस्पर.

**संस्थानी**, ३लिं॰ स्थलरूप संस्थानाचा जो अधिकारी तो.

**संस्थापणें**, उत्तम रीतीनें देव, राजा, धर्म, इ॰ स्थापणें.

**संस्थापन**, **संस्थापना**, न॰ स्त्री॰ संस्थापण्याचा व्यापार तें, ती.

**संस्थापित**, ३लिं॰ संस्थापना केली ज्याची तो.

**संस्थित**, ३लिं॰ उत्तम प्रकारें जो स्थित तो.

**सस्य**, न॰ सं॰ वृक्षादिकांचें जें फल तें परंतु धान्याविषयीं विशेषें करून प्रसिद्ध.

**सह**, अ॰ विवक्षित अर्थानें घेऊन जाणें, येणें, आणणें, इ॰ कांचें वि॰.

**सहगमन**, न॰ स्त्रीचें सती जाण्याचें जें कर्म तें.

**सहचर**, ३लिं॰ कोणेक कर्माविषयीं जो ज्याचें बरोबर वागणारा तो त्याचा परंतु मित्रपणानें जो वागणारा त्याविषयीं प्रा॰ प्र॰.

**सहज**, ३लिं॰ सं॰ एकोदरीच जे बंधुभगिनी इ॰ ते परस्पर ;२, मनुष्यादि पदार्थ जेव्हां उत्पन्न होतो तेव्हां त्याचे बरोबर त्याचा शरीरीं उत्पन्न झाला जो केश काम क्रोधादि तो

**सहज**, अ॰ तादृश कार्योद्देश न धरितां किं॰ तादृश प्रयत्न न करितां जा, ये, कर, हो, इ॰ कांचें वि॰ ;उ॰. सहज कोणाचे घरीं जाऊन ये : दरबारांत जात असलें ह्मणजे सहज चार मंडळींचा परिचय होतो.

**सहजगतीनें**, **सहजगत्या**, अ॰ प्रा॰ सहज या अर्थी.

**सहजगतीनें, सहजरीत्या**, अ॰ सहजगतीनें.

**सहजाखालीं**. अ॰ सहजगतीनें.

**सहजांत**, अ॰ सहज.

**सहजानसार**, अ॰ सहजांत.

**सहजावारीं, सहजावृत्या**, अ॰ भा॰ सहजगतीनें.

**सहजासहजीं**, अ॰ सहजगतीनें

**सहदेवी**, ३ लिं॰ सहदेव ह्मणून एक शूद्रांत ज्योतिषी झाला होता त्याणें प्रोक्त जें ज्योतिष प्रकरणी शके. वाक्यें. मत, इ॰ ती; २. स्त्री॰ एक औषधी झाड आहे.

**सहन**, न॰ सं॰ प्रतिकूलत्वेंकरून संबद्ध होणारजें दुःख, संकट, शीत, उष्ण, अन्यकृत अपराध, भार, इ॰ कांहीं एक अर्थ त्यांचे संबंधानें होणारीजी क्षोभभंगादि विक्रिया तिला आत्मप्रभावानें न होऊं देतां किं॰ झाली असतां न गणितां त्या अर्थाचें जें आत्मसंबंधांत धारण तें.

**सहनशक्ति**, स्त्री॰ शीतोष्णादि सहन करण्याचीजी शक्ति ती.

**सहनशील**, ३ लिं॰ अन्यकृत अपराधादि सहन करण्याविषयीं आहे शील ज्याचें तो.

**सहनीय**, ३ लिं॰ ज्याचें सहन करणें योग्य तो.

**सहल**, स्त्री॰ व्यायामार्थ मौजेनें इतस्ततः फिरण्याचा जो व्यापार ती; २. अ॰ कों॰ कोणेक गोष्ट कोणेक कारणानें सुलभ होई असें पड. धा॰ भ॰; उ॰, देणें जें आहे तें थोडें थोडें देत गेलें ह्मणजे सहल पडतें एकदांच थोर रकम द्यायास अवघड.

**सहवर्तमान**, अ॰ सह.

**सहवास**, पु॰ एकत्रस्थिति इ॰ रूपें जो कोणेकाशीं कोणेकाचा संबंध तो; २. एकत्र स्थिति संभाषण इ॰ कारणानें कोणेकाचा होतो जो विशेष परिचय तो; कोणेक व्यवहारादि सहवासाखालीं पडणें ह्म॰ अभ्यासाखालीं पडणें.

**सहवासणें**, कों॰ सहवासादि कारणामुळें कोणेक स्थल किं॰ मनुष्यादिक ह्याचा गला किं॰ वाईट अशारीतीनें अनुभूत करणें.

**सहवासी**, ३ लिं॰ ज्याचा सहवास ज्यास आहे तो त्याचा.

**सहसा**, अ॰ एकाएकीं लोकांत निषेधविषयीं प्र॰; उ॰, तुह्मी सांगता खरें पण त्याचे हातून सहसा अशी गोष्ट घडणार नाहीं.

**सहस्र**, न॰ पु॰ एक संख्या आहे १०००.

**सहस्रघृत**, न॰ सहस्रवेळ धुऊन औषधार्थ सिद्ध करितात जें घृत तें.

**सहस्रनाम**, न॰ विष्णु. शिव, इ॰ देवांचा सहस्रनामांचा जो समुदाय तें; तुलसी इ॰ कांचें सहस्रनाम वाहणें इ॰ स्थलीं ईश्वरनामोच्चारपूर्वक सहस्र तुलसीदल इ॰ वाहणें.

**सहस्रभोजन**, न० सहस्र ब्राह्मणास भोजन द्यावें असें जें धर्मकृत्य करितात तें.

**सहस्रशः**. अ० हजारों.

**सहस्रावधि**, अ० हजारों.

**सहा**, ३ लिं० संख्या आहे ६; २, स्त्री० सा ब हिंदी याचा अर्थ.

**सहाकार**. पु० कोणेकाचें साहाय्य करण्याचा जो व्यापार तो.

**सहाकारी**, ३ लिं० जो ज्याचा सहाकार करितो तो त्याचा.

**सहाण**. स्त्री० वरचंदनादि उगाळणें इ० यार्थ प्रा० कुरंदाचें दगडाचा एक आकार-विशेषाचा पदार्थ करितात ती; २. शस्त्रास धार लावणें, हीरकादि घांसणें, इत्यार्थ जो त्याचें तळी सारिखा एक पाषाणादिकांचा पदार्थ करित असतात ती.

**सहाध्यायी**. पु० बरोबर अध्ययन करणारे जे अनेक ते परस्पर.

**सहामहिन्याचीजांभई**, स्त्री० जाचे हातून लौकर काम होत नाहीं असा आळशी, चेंगट, जो कोणी त्यापाशीं कांहीं काम दिल्हें असतां हें काम लौकर होणार नाहीं अशा संभावनेनें या शब्दाचा प्रयोग करितात; उ०, या सोनारापाशीं दागिना करायास दिल्हा म्हणजे सहामहिन्यांची जांभई, आज देतों म्हणेल आणि वर्षस हा महिनें लावील.

**सहाय**, ३ लिं० कोणेक मनुष्यादि कांहींएक कार्य करीत असतां तत्कार्य सिद्धी विषयीं अनुकूल पणें त्याशीं वागणारा जो मनुष्यादि तो त्याचा; २, न० साहाय्य शब्दाचा अपभ्रंश.

**संहार**, पु० सं० प्रकृत स्वरूपसोडून विशेषनाम रूपानें प्रसिद्धीस आलेला जो कोणेक अर्थ त्याचा तें नामरूप सोडून पुनः आपल्या प्रकृतस्व स्वरूपीं जो लय तो; २, खाणें, जाळणें, मारणें, तोडणें, इ० केंकरून कोणेक अर्थाचा निःशेष जो नाश तो; ३, कों० संबारी.

**संहारणें**, कोणेकाचा संहार होई असें करणें.

**सहासष्ट**, ३ लिं० एक संख्या आहे ६६.

**सहित**, ३ लिं० कांहीं एका पदार्थानें युक्त तो तत्सहित; २, अ० सहवर्तमान.

**संहिता**, स्त्री० अनेक जे वर्ण पदें इ० त्यांची अतिशयित सान्निध्येंकरून जी स्थिति ती; २, कश्यादि प्रोक्त जे वैद्यक, धर्मशास्त्र, ज्योतिष, वेदांत, इ० विषय प्रतिपादक मूलग्रंथ ते प्र०; सूतसंहिता, वाराहसंहिता, गर्गसंहिता, इ० स०; ३, वेदामध्यें एक विभाग आहे तो.

**सहिलावणें**, रा० सैलावणें.

**सहिष्ण**, ३ लिं० सहिष्णु शब्दाचा अपभ्रंश.

**सहिष्णु**, ३ लिं० सहनशील.

**सही**, स्त्री० सई हिंदी याचा अर्थ.

**सहील**, ३ लिं० रा० सैल.

**सहेली**, स्त्री० सहल प्रथमार्थं.

**सहोदर**, ३लिं० एकोदरोत्पन्न जे बंधुभगिनी इ० ते परस्पर.

**सह्याद्रि**, पु० मुख्य जे सात पर्वत त्यांतील एक पर्वत आहे.

**सळ**, पु० सल चतुर्थार्थं; २, नव्या सनगास जो घडीचा मोडी असतात त्या प्र०.

**सळई**, स्त्री० उराणू, गळू, इ० फोडणें कि० नेत्रांत अंजन घालणें, इ० कांहीं एक कारणास्तव धातु, कांचीट, इ० कांची केली असत्ये जी दाभणासारिखी काडी ती; २, कडबा, गवत, फळें यांची संख्येनें कि० लांकडांची वजनानें इयत्ता कर्तव्य असतां विवक्षित संख्यांचा धार्य जो तत्तदंश काढून ठेवितात ती; ३, विडी वसविल्यावांचून जें मुसळाचें लांकूड ती; ४, सनानी मुगट्यावर जा उभ्या रेघा असतात त्या प्र०.

**सळणूक**, स्त्री० छळणूक.

**सळणें**, दे० धा० छळणें याअर्थं.

**सळंप, सळप**, न० ग्रा० लहान पातळ जी लांकडाची ढलपी तें.

**सळंपा**, पु० ग्रा० उसळपा.

**सळय**, स्त्री० कों० सळई द्वितीयार्थीवांचून.

**सळसळ**, अ० अतितप्त जें जलादि त्याचा शब्दाचें अनुकरण; वाजणें, करणें, इ० कांचें वि०.

**सळसळणें**, उदकादिकानें विशेषतापल्यामुळें सळसळ शब्दानें विशिष्ट होणें.



**सळसळां**, अ० सळासळ.

**सळा**, स्त्री० कों० सळई प्रथमार्थी.

**सळाथी**, कों० स्त्री० केरसुणी.

**सळासळ**, अ० सळसळ.

**सळाळां**, अ० सळासळ.

**संक्षिप्त**, ३लिं० संक्षेपविशिष्ट जो ग्रंथ, भाषण इ० तो.

**संक्षेप**, पु० अवांतरविशेषादि योगानें विस्तार पावलेली जी कोणेक गोष्ट तिजांतील सारांश न जातां जितका अंश कमी होईल तितका कमी करून थोडक्यांत आणण्याचा जो प्रकार तो.

**संज्ञक**, ३लिं० ती ती आहे संज्ञा ह्मणजे नाम ज्याचें तो तो तत्संज्ञक, द्रव्यसंज्ञक, गुणसंज्ञक, विष्णुसंज्ञक, इ०.

**संज्ञा**, स्त्री० व्यवहारामध्ये त्यात्या अर्थाचे तत्तद्रूपें करून ज्ञान व्हावे ह्मणून अर्थमात्राम जें संकेतित नाम असतें ती; २, कोणंकास कांहीं एकविषयीं नेत्रसंकेतादिद्वारा करितात जी खूण ती; ३, संमूर्च्छित झाला जो कोणी त्यास येत्ये जी शुद्धि ती.

**संज्ञी**, पु० जा संज्ञेचा अभिधेय जो अर्थ तो तिचा.

**संज्ञीक**, ३लिं० जाजा अर्थाचा जाजा प्रसिद्ध संज्ञा आहेत त्या सोडून लाघवार्थ तेते अर्थ खुणेनें समजावे ह्मणून नवेच कांहीं तद्विषयीं संकेत केले असतात त्या संकेतानीं जाणायाचा जो ग्रंथ,-

भाषण, लेख, अर्थ. इ०.

संज्ञु, १लिं० सं० चालताना गुडघ्यास गुडघा जाचा लागत असतो असा जो मनुष्यादि तो.

सा, १लिं० सहा ह्मणून जी संख्या तो.

साई, स्त्री० सायदितीयाथै.

साउली, स्त्री० यं० सावली.

साऊळ, स्त्री० रा० माड, पोफळी, इ० कांचीभ्रावळी.

साक, स्त्री० साख.

सांकटण, न० रा० सकोरण.

सांकटणें, ग० कांहीं एक पदार्थ सांकटणावर धरून खंडशः होई असें तोडणें; २, न० सांकटण.

सांकड, १लिं० संकुचित जें स्थळ, पात्र, गृह, इ० तो; ह्म० परसांकड वाई लमाकड, पा० ह्मणींत प्र०.

सांकडें, न० यं० कोणेकास प्राप्त होतें जें संकट तें.

सांकणें, रा० सांखणें.

साकर, स्त्री० साखर; साखर शब्द पूर्वक जे शब्द पुढें आहेत ते साकर शब्दपूर्वक ही होतात, साखरनिंबू एथें साकरनिंबू, साखरपारा एथें साकरपारा, इ०.

सांकर, पु० रा० पाणी वहावयाचा जो पाट, मोरी, इ० मार्ग त्यामध्यें प्रवाहाचा प्रतिबंधकरणारा जो केर, पातेरा, इ० जमतो तो; २, गातेवेळेस, किं० ह्मणतेवेळेस, किं० बोलतेवेळेस, शब्दप्रवाहाचा प्रतिबंधक जो गळ्यामध्यें कफांश जमतो तो.

सांकल्पिक, १लिं० अंतःकरणाचे संकल्पानेंच केलेला इच्छारूपिकिंसंकल्प संबंधी जो कोणेक अर्थ तो.

साकल्य, न० सकलपणा; साकल्यवर्तमान, साकल्यवृत्त, साकल्यार्थ, इ० स्थलीं सकल या अर्थीच कोणी ह्म०.

सांकव, पु० रा० सांकू.

सांकशी, स्त्री० वरोळीचा आकाराची जी करंडी ती.

साकसुरत, १लिं० नीटनेटका, यथास्थित जे थील तेथें जसा असावा तसा जो लेख, भाषण, इ० पदार्थ तो.

सांकळ, स्त्री० सांखळ.

सांकळणें, रा० सांखळणें प्रथमार्थ.

सांकळी, स्त्री० रा० सांकळ.

सांका, पु० सांखारा.

सांकाटा, पु० रा० सांगाडा; २, सांपडा.

साकार, १लिं० आकृति आहे जास असा-जो ईश्वर मूर्ति, इ० पदार्थ तो.

साकी, स्त्री० साक.

सांकुळणें, रा० सांकळणें.

सांकू, पु० कों० नद्यादिकांतून पार जाण्याकरितां आडवीं लांकडें, टाहाळ, इ० टाकून जो सरासरी पूल करितात तो.

सांकेतिक, १लिं० जाजा अर्थाचा जाजा प्रसिद्ध संज्ञा आहेत त्या सोडून लाघवार्थ त्यात्या अर्थाचा नव्याच केल्या असतात

णात आबाब्द रेषा, इ० रूप संज्ञा तत्प्रधान जें भाषण, लेख, ग्रंथ, शास्त्र, व्यवहार, इ० तीं.

**साख**, स्त्री० पत ; २, मर्यादा.

**सांखणें**, घृतादि पदार्थानें थिजणें.

**साखर**, स्त्री० अग्निसंयोगादि कृतिविशेषानें इक्षुरसाचा रेतीसारख्या एकपरिणाम होत असतो ती ; साखरपेरणें, पसरणें, इ० स्थलीं कोहींएक आपला मतलब साधायासाठीं कपटानें कोणास द्रव्य देणें, कोणाशीं गोड बोलणें, इ० रूप गोडीचा डौल दाखविणें ; म्ह० हातावर साखर आणि मानेवर कातर ; साखरेची सुरी म्ह० आंत कांहींक पट असून बाहेर गोड दिसावें असें जें भाषण किं० तादृश भाषण कर्ता इ० त्यास म्ह०

**साखरजांब, साखरजांभ**, पु० गुलाबी जांब.

**साखरझोंप**, स्त्री० पहांटेचावेळेस थोडी बहुत निद्रा घेतात तीस म्ह०.

**साखरनिंबी, साखरलिंबी**, स्त्री० एकफलप्रधान झाड आहे.

**साखरनिंबू, साखरलिंबू**, न० साखरनिंबीचें जें फळ तें.

**साखरपाणी**, न० अंतस्तापनिवारणार्थ आंत साखर आणि कागदी निंबाचा रस घालून प्यायाकरितां जें पाणी करितात तें.

**साखरपारा**, पु० तूप साखर यांत सपीठ घालून एक भक्ष्य पदार्थ करीत असतात तो.

**साखरपुडा**, पु० वधूवरांचा विवाहनिश्चय दिवशीं वधूच्या हातांत साखरेचा पुडा देऊन सर्वांस पानसुपारी वांटणें इ० रूप जो समारंभ करितात तो.

**साखरफुटाणा**, पु० पोटीं इलायचीदाणें किं० भाजलेले हरभरे घालून वर साखरेचा वरचेवर पाक लावून जाकरवंदा एवढाल्या गोळ्या करितात त्या प्र०.

**साखरफेणी**, स्त्री० साखरेचा मोठा रुंद टजो बत्तासा ती.

**साखरबोंड**, न० एक पक्वान्न आहे.

**साखरभात**, पु० केशरीभात.

**साखररंगी**, ३ लिं० गुळ्या साखरे सारखें रंगाचें जें वस्त्र, कागद, इ० ती.

**साखरलाडू**, पु० एक पक्वान्न आहे.

**साखरवळी**, स्त्री० एक पक्वान्न आहे.

**साखसुरत**, ३ लिं० साकसुरत.

**सांखळ**, स्त्री० कों० लोहादिकांची मोठी जी सांखळी ती.

**सांखळणें**, नासणें इ० विकृतीनें प्रा० रक्तानें घट्ट होणें ; २, ला० व्याघ्रादिकानीं इतस्ततः जाऊं न ये इत्यार्थ विवक्षित स्थळीं त्यांस सांखळीनें संबद्ध करणें ; ३, मनुष्यादिकानीं स्वतंत्रपणें वागूं न ये म्हणून विवक्षित उद्योगीं गुंतिवणें.

**सांखळदंड, साखळदंड**, पु० धातुमय अनेक कडया एकत्र गुंतवून दंडाकार जी मोठी

जाडी

जाडी सोंखळी करितात ती.

**साँखळी, सारखळी,** स्त्री॰ धातुमय अनेक कडया एकांत एक गुंतवून भूषणाद्यर्थ किं॰ बंधनाद्यर्थ रज्जाकार पदार्थ करितात ती.

**साँखारा,** पु॰ की॰ केळीचे गोपांचें पाणी, आ त्याचा रस भिजलेले गहू, रताळीं, इ॰ थाटून त्याचें पाणी इ॰ कितीएक पदार्थ पात्रांत घालून कांहीं काल ठेविलें असतां त्यांत खालीं जमतो जो घनांश तो; २, ग॰ सांकर.

**सारवी,** स्त्री॰ साक्षी.

**साँखुळणें,** ग॰ सांकळणें.

**सांख्य,** न॰ एक सहा शास्त्रांतील शास्त्र आहे; २, ३लिं॰ तदध्ययन कर्ता किं॰ तन्मतानुयायी असा जो तो.

**साग,** पु॰ एक वृक्ष आहे जो मुख्यत्वें करून इमारत इ॰ कांचे उपयोगी पडतो.

**साँग,** स्त्री॰ भाल्या सारखा शस्त्रविशेष आहे.

**सांग,** ३लिं॰ वाग्दान, पुण्याहवाचनादि जीं जीं ज्याचीं अंगें तीं हीं करून पूर्ण जो विवाह, यज्ञ, वेद, ब्राह्मणभोजन, इ॰ तो.

**साँगड,** पु॰ प्रा॰ दोन होडया किं॰ पगार एकत्र संबद्ध करून जें जलयान करितात तें; २, स्त्री॰ पांढरे भोंपळे, नारळ, इ॰ फळें किं॰ गोमहिष्यादि पशू, मनुष्य, इ॰ कांचा अनेक व्यक्ति विवक्षित कारणास्तव रज्जादिकानें एकत्र संबद्ध केल्या असतां जी रचना होते ती; ३, सांगाडी.

**सांगडणें,** अनेक पदार्थांची सांगड होई असे ते पदार्थ एकत्र संबद्ध करणें; २, कोणेक पदार्थ इतस्ततः न व्हावा म्हणून कोणेक पदार्थाशीं बांधणें.

**साँगणी,** स्त्री॰ कोणेक गोष्टीविषयीं तूं असें कर, असें बोल, असें करूं नको, इ॰ रूप जी कोणेकाप्रति कोणेकाची उक्ति असते ती; २, पुराण, गोष्ट, इ॰ सांगण्याचा जो प्रकार ती.

**साँगणीचा,** ३लिं॰ वधूपक्षीयानीं तत्संबंधी द्रव्य न घेतां किं॰ मोबदला न करितां तीचा केला जो विवाह तो, तादृश विवाहानें विवाहित जी कन्या ती.

**साँगणें,** कोणेकास कोणेकानें कांहीं एक गोष्ट भाषणादि द्वारा कळे असें करणें; २, कोणेकास रोजगार, मामलत, चाकरी काम, इ॰ करण्याविषयीं अर्पिणें; ३, अध्ययन, ग्रंथ, विद्या, इ॰ कोणेकास शिकविणें; अमुक ग्रंथांत अमुक सांगितलें आहे इ॰ स्थलीं ग्रंथकर्त्यानें तें तें कथिन आहे असा अर्थ, कोणेकास जेवायास सांगणें ह्म॰ भोजनार्थ आपले घरीं बोलावणें; मुलगी सांगून देणें इ॰ स्थलीं तत्संबंधी द्रव्यादि न घेतां विवाहार्थ अर्पिणें; दुखणें इ॰ कानीं कठीन सांगणें, अवघड सांगणें, इ॰ स्थलीं त्याचा परिणाम कठिन होणें असा अर्थ.

**सांगता,** स्त्री॰ विवाहादि कर्माचा जो सांगपणा ती; २, कितीएक कर्मांची सांगता संपादक

णार्दक जीं ब्राह्मणभोजन, दक्षिणादि दोनक र्में यांस म्ह०.

**सांगतीं**, अ० संगतीं.

**सांगतें**, अ० संगतीं.

**सागर**, पु० समुद्र; याचे स० गुणसागर, करुणासागर, इ०.

**सागरगोटा**, पु० सागरगोटीचें जें बीज तो.

**सागरगोटी**, स्त्री० औषधोपयोगी एक लता आहे.

**सागली**, १ लिं० कों० साग संबंधी जें काष्ठ, तन्निर्मित गृह, पाट, चौकट, इ० पदार्थ तो.

**सागवान**, पु० दे० साग; २. न० सागवृक्षांचा जो समुदाय तें.

**सागवानी**, १ लिं० सागली.

**सांगशी**, स्त्री० सांकशी.

**सागळ**, स्त्री० रंगविलेलें जें प्रा० बकऱ्याचें जोडा, इ० कांचे उपयोगी चर्म तें.

**सांगळ्या**, १ लिं० षडंगूळ जो मनुष्य तो.

**सागा**, पु० कों० बकरीं, मेंढरें, इ० कांचा जो कळप तो.

**सागाई**, स्त्री० कों० एक औषधोपयोगी झाड आहे.

**सांगाडा**, पु० शरीर, गाडा, पलंग, नौका, छत्री, इ० कांचे आकारास मुख्यत्वें करून आधार मूल जीं हाडें, लांकडें, इ० कानें झालेली रचना असते तीजाचे आश्रयानें चर्मादिवेष्टन तृणादिरूप आच्छादन, मृत्तिकादिलेप, इ० होऊन तो पदार्थ सांग होतो.

**सांगाडी**, स्त्री० कोणेक काष्ठादि पदार्थ कातायाकरितां तोमध्यें अडकला आहे असें उपयोगाचें जें यंत्र असतें तें.

**सांगाती**, १ लिं० संगती.

**सांगातीं**, अ० संगतीं.

**सांगातें**, अ० सांगातीं: २, रा० सांगातें आणें म्ह० भर्त्याबरोबर सती आणें.

**सांगावांगी**, स्त्री० सांगासांगी.

**सांगासांगी**, स्त्री० कोणेक गोष्टीविषयीं प्रत्यक्षादि प्रमाण नसतां एकानें दुसऱ्यापाशीं सांगावें, त्याणें तिसऱ्यापाशीं सांगावें, अशीजी सांगण्याची परंपरा चालत येत रूप जें त्या गोष्टीविषयीं प्रमाण तें; प्रा० ग्रंथमांत प्रयोग नाहीं.

**सांगी**, स्त्री० कों० कोणेक गोष्टीविषयीं कोणेकानें सिद्ध व्हावें, किं० सावध व्हावें, म्हणून त्यास पूर्वी करितात जी सूचना ती सांगणी ग्रंथमार्थः.

**सांगुळणें**, कों० सांकळणें.

**सागुती**, स्त्री० सागोती.

**सागू**, पु० एक वृक्ष आहे; त्याचे पिकाचा जो पळ्या सारिख्या जा गोळ्या करितात त्या प्र०.

**सागूचे तांदूळ**, पु० सागूदाणा.

**सागूदाणा**, पु० सागू इती यार्थी.

**सांगूळ**, स्त्री० रा० फणसाचे चार खंडावरील जी चार ती.

**सागोती**, स्त्री० बकरा इ० कांचें मांस शिजवून

जवून असणेंप्रसंगी करितात जो एक पदार्थ विशेष तो.

सांगोपांग, ३लिं॰ अंगानीं आणि उपांगानीं पूर्णता पावला जो विवाह, यज्ञादि तो.

सांगोवांगी, स्त्री॰ सांगोसांगी.

सांगोसांगी, स्त्री॰ सांगासांगी.

साग्या, पु॰ चोरी, चहाडी, शिनळकी, वध, इ॰ गुप्तविषयकर्माविषयीं जोजाचा सोबती तो त्याचा किं॰ते परस्पर.

सांच, पु॰ पात्रादिविवक्षित अधिकरणीं विवक्षित प्रमाणक अर्थ मावाया जोगा असतो जो अवकाश तो किं॰ आंत समाविष्ट झालेला पदार्थ बाहेर नजातां आंतचे आंत सांचून रहावयाचे सोईची असत्ये जी जागा तो; उ॰, हें जाहाज फार लहान पडलें यामुळें यांत इतकें खटलें रहावयाजोगा सांच दिसत नाहीं.

साच, ३लिं॰ वास्तविक.

सांचणें, कोणेक अधिकरणीं उदक, धान्य, द्रव्य, इ॰ पदार्थानें थोडा थोडा येऊन पडत गेल्यामुळें संग्रहरूपता पावणें.

सांचवणी, न॰ कोणएकस्थळीं सांचलेलें जें पाणी तें.

सांचा, पु॰ सौकर्यानें तत्तदाकारक पदार्थ अनेकसिद्ध व्हावे एतदर्थ विवक्षित लांबी, रुंदी, इ॰रूप आकार मनांत घेऊन तसा सिद्ध केला असतो जो कागद, फळी, पत्रादि पदार्थ तो; २, एकसारख्या लांबी, रुंदीची कापून केलेली जी कागद, केळीचीं पानें, इ॰ यांची जुळी तो.

साचा, ३लिं॰ साच.

साचार, अ॰ग्रं॰ निश्चयें करून; उ॰, सप्तपरब्रह्म साचार, सात वाजवनार.

सांचीव, साचींव, ३लिं॰ सांचून संग्रहरूपता केलें उदकादि तो.

साज, पु॰ पखवाज; २, संच प्रथमार्थ; ३, कों॰ न॰ गवतांत एक जाति आहे.

सांज, स्त्री॰ संध्याकाळ.

साजण, पु॰ग्रं॰ सजण तो.

सांजण, न॰ग॰ सांदण.

सांजणपात्र, न॰ग॰ सांदणपात्र.

साजणी, स्त्री॰ सजणी प्रथमार्थ.

साजणें, कोणे कास कांहीं एक गोष्ट शोभणें उ॰: हें रंगीत पागोटें त्याला चांगलें साजतें हें बोलणें याचयांत तुला साजत नाहीं; म्ह॰ साजेल तें बोलावें आणि पचेल तें खावें; २. समावणें प्रथमार्थी वांचून.

साजभारा, पु॰ कों॰ साजारा

साजरा, ३लिं॰ अलंकार भूषणादि तत्तद्योग पदार्थानीं शोभिवंत जो तो; २, गौजिरवाणा; दिवस, सण, इ॰ साजरा करणें म्ह॰ त्यात्या दिवसादिकांचे ठायीं जें जें उत्साहादि करायाचें तें तें यथाकथंचित् केलें से करून तो दिवस, सण, सुशोभित करणें.

सांजवणें, रा॰ सांजावणें.

सांजवात, स्त्री॰ देवालयादिकांचा ठायीं सायंका

संकाळीं शास्त्रापुरता दिवा लावला साव्हावा म्हणून तेल्यांत वात भिजवून सरासरी लाविता तजो दिवा तो; कर, हो. लाव, इ० कांचे योगीं प्र०.

**साँजवेळ**, स्त्री० चारसा घटका दिवस राहिल्या पासून सूर्यास्तपर्यंत जो काळ ती.

**साजसरंजाम**, पु० कोणेक व्यापाराविषयीं उपयुक्त जो साजसामग्री इ० ती.

**साँजसकाळ**, अ० सकाळसंध्याकाळ.

**साँजसोंवळें**, न० रा० सायंकाळीं स्नान न करितां ओवळें वस्त्र सोडून सोंवळें वस्त्र मात्र नेसल्यानें होतो जो सोंवळेपणा तें.

**साँजळणें**, क्रि० संध्याकाळ होणें.

**साँजा**, पु० गहूं दळलेअसतां किं० भरडलेअसतां त्यांचा होतात जा कण्या तो.

**साजात्य**, नं० सजातीयपणा.

**साजारा**, पु० कों० साज म्हणून जें गवत त्याचें जें ओझें तो.

**साँजावणें**, क्रि० सांजळणें.

**साजिंदा**, पु० वेश्येचे मागें राहून नृत्यादिसमयीं गाणें, पखवाज, सारंगी, इ० वाजविणें, इ० कें करून साह्य करितो तो.

**साजिरा**, ३लिं० ग्रं० साजरा.

**साजूक**, ३लिं० ज्याचे उत्पत्तीस बहुत काल झाला नाहीं अतएव ज्याची रुचि बिघडली नाहीं असा जो भक्ष्य भोज्यादि पदार्थ तो किं० मूलस्थानापासून आणून ज्यास बहुत काल झाला नाहीं असा जो उदक, पुष्प, इ० तो.

**साँजे**, अ० संध्याकाळीं.

**साँझ**, स्त्री० कों० सांज.

**साँझळणें**, क्रि० सांजळणें.

**साँझे**, अ० कों० सांजे.

**साँट**, पु० सांठ.

**साट**, पु० माळा, गलबत, इ० कांवर बसणें, निजणें, इत्याद्यर्थ आस्तरणास उपयोगी बांबू, कामठी, इ० अनेक एकत्र संबद्ध करून हांतरी सारखा पदार्थ करितात तो; २, न० फणसपोळी किं० आंब्याचे रसाची जी पोळी करितात तें.

**साटणें**, क्रि० सहस्त्रावधि रुपयांचा माल एकदम दर ठरवून पत्करणें.

**साँटणें**, रा० साठणें.

**साटल्यामोटल्या**, स्त्री० अनेक प्रकारच्या बांधलेल्या जा मोटल्या त्या.

**साँटवण**, न० कांहींएक धान्यादि पदार्थ सांठवायाचे उपयोगी जें पात्र तें.

**साँटवणी**, न० सांठवणी.

**साँटवणें**, सांठवणें.

**साँटा, साटा**, पु० सांठा; २, शिंतोडा.

**साटी**, स्त्री० साट प्रथमार्थ; २, गाड्याचे आंसावरील जी पेटी तिजवर मनुष्यादि बसणें, ओझें सांठविणें, इत्याद्यर्थ घातला असतो जो चौकटीचे आकारचा अवयव ती जिला मध्यें कांबी, फळ्या, लाविल्या असतात.

साटी,

**साटी**, अ॰ साठीं.

**साटें**, न॰ कोणी उदम्यानें जो जितका माल विकावयास आणला असतो तीतितका माल एकदम ठरवून त्यापासून खरेदी घ्यावा असा कोणी करितो जो सवदा तें ठर, मार, घे, इ॰ धातुयोगीं प्र॰.

**साटेखत, साटेपत्र**, न॰ जिन्नस, इ॰ कांचें साटें ठरवून तद्विषयींचे लेख्याच्या करितां जो कागद तें.

**साटेंलोटें**, न॰ आपले घरची मुलगी दुसऱ्याचे घरीं द्यावी त्याचे घरची आपले घरीं आणावी असा जो विवाह करण्याचा प्रकार तें; २, मोबादला या अर्थें कोणी प्र॰ करितात.

**साटोप**, ३लिं॰ विवक्षित सम्मानादि व्यवहारांची आकलनशक्ति ज्याचे आंगीं आहे असा जो मनुष्य तो.

**सांठ**, पु॰ सांच.

**साठ**, पु॰ साट; २, ३लिं॰ संख्या ६०.

**साठणें**, रा॰ सांचणें; २, कोणेक पात्रांत कांहीं एक धान्यादि पदार्थ मावणें.

**सांठवण**, न॰ सांटवण.

**सांठवणी**, न॰ आंत जिवंत झरा नसतां पर्जन्यादि संबंधी सांचून राहिलेलें जें पाणी तें.

**सांठवणें**, धान्यादि किती एक पदार्थ कोठार इ॰ कांचे ठायीं किं॰ विवक्षित पात्रादिकांत भरून ठेवणें; २, कोणेक पदार्थ सांचविणें; उ॰, त्याणें चार महिन्यांत पांच शें रुपये सांठवले.

**सांठवा सांठव**, स्त्री॰ हें सांठीव, तें सांठीव, इ॰ रूप अनेक पदार्थ सांठविण्याचा जो व्यापार ती.

**साठळणें**, वयास साठ वर्षें झाल्यावर बुद्धि मंद व्हावी किं॰ बुद्धिभ्रंश व्हावा, इ॰ रूप जी अवस्था होत असते त्या अवस्थेनें कोणेकानें युक्त होणें

**सांठा**, पु॰ संग्रह.

**साठी**, स्त्री॰ सादी; २, वर्षादि साठ पदार्थांचा जो समुदाय ती; ३, कोणेक मनुष्यास साठ वर्षें भरल्यामुळें जो अवस्था विशेष प्राप्त होतो ती; ४, अ॰ ग॰ साठीं.

**साठीं**, अ॰ क्रियेच्या उद्देश भूत जो कोणेक अर्थ त्यावरील उद्देशतेचें वाचक हें अव्यय त्या उद्देशभूत अर्थाचे वाचका पुढें याचा प्र॰; उ॰, मुक्तीसाठीं हरिला भजती; तुझ्या भेटीसाठीं मी आलों.

**सांठ्याचा**, ३लिं॰ रा॰ तगवणा.

**साड**, पु॰ वंरनादि[illegible]पोटांतील जो गाभा तो.

**सांड**, स्त्री॰ उष्ट्रजातीय जी स्त्री ती; २, कों॰ सांडवा; ३, जो पदार्थ हातीं घेतला तो तो सोडावा अशी जी कोणेकास अवस्था प्राप्त होते ती; ४, निसरसांड; ५, मोड; ६, ३लिं॰ रा॰ मालकापासून सांडून मार्गादिकांचे ठायीं कोणी धनी नाहीं अशी प्रकारें पडलेका

लेला जो पदार्थ तो.

**सांडई**, स्त्री॰ तोंडी आवळायाचे उपयोगी एक पदार्थ करितअसतात.

**सांडगा**, पु॰ कोहळा, भोंपळा, कोकडा. इ॰ किंवा एक पदार्थ एकत्र चिरून किं॰ किसून त्यांत किं॰ हरभरा इ॰ कांचे पिठांत तिखट, मीठ, इ॰ पदार्थ घालून त्याचा तोंडी लावण्याचे उपयोगी वाळवून करितात जा गोळ्या त्या प्र॰.

**सांडण**, स्त्री॰ रा॰ सांडणी.

**सांडणस्वार**, पु॰ रा॰ सांडणीस्वार.

**सांडणी**, स्त्री॰ सांड प्रथमार्थ.

**सांडणीस्वार**, पु॰ सांडणीवर बसून डाक, बातमी, इ॰ पोंचविण्याचें कसब करितो तो.

**सांडणें**, पात्रादिकांत ठेविलेला जो जल, धान्यादि पदार्थ त्याणे त्यांतून बाहेर न पडावें अशी विवक्षा असतां उलंडणें इ॰ कारणानी बाहेर पाडणें ;२, कोणी कानें कोणेक पदार्थ विस्मृत्यादिकानें कोठें पाडल्यामुळें किं॰ टाकल्यामुळें तो आपला आपल्या सहीं सीं पडूं नये असा करणें ;३, स्वसंबंधाकांत जो संपत्ति संसारादि पदार्थ अभिमान, लज्जा, इ॰ यानें त्यांस त्यागिणें

**सांडभाऊ**, पु॰ साडू.

**सांडरा**, १ लिं॰ इत्यादि हारविण्याच्या स्वभावजाचा तो.

**सांडऊं**, न॰ दे॰ स्त्रीस ही शिवी देत असतात.

**सांडलबंड**, स्त्री॰ जलादि पदार्थ सांडण्याचा किं॰ लवंडण्याचा जो व्यापार तो.

**सांडवा**, पु॰ धरण, बांध, इ॰ कानीं तुंबविलें जें पाणीं त्याणें विवक्षारूप स्थ रहावें अधिकानें निघून जावें इत्यार्थ त्या धरण इ॰ कांस राखितात जीं द्वारें तीं प्रत्येकीं

**सांडशी**, स्त्री॰ दे॰ लहान जो सांडस तो.

**सांडस**, पु॰ सोनार, लोहार, इ॰ कांचें चिमट्यासारिखें एक आऊत आहे.

**सांडसूट**, स्त्री॰ रा॰ कोणाकडे यावयाचें जें इत्यादि त्यामध्यें त्यास थोडी बहुत देतात जी सूट ती.

**साडा**, पु॰ लग्नामध्यें साडे म्हणून जें कर्म करितात त्यासमयीं वधूस जी साडी देतात तीस याशब्दानें व्यवहार करितात तो ;२, रा॰ व्यादि संख्येचे, वरजें अर्ध असतें जाचे योगानें साडेतीन, साडेचार, इ॰ व्यवहार होतो तो.

**साडादिडा**, १ लिं॰ रा॰ धड एकेरी नव्हे, धड दुहेरी नव्हे, धड दिड की नव्हे, धड तिहेरी नव्हे इ॰ रूप म्हणजे त्या त्या येनापेक्षां कांहीं अधिक किं॰ कांहीं न्यून अशी जी, वस्त्रादिकांची घडी, दोरा, इ॰ ती.

**सांडासांड**, स्त्री॰ हें सांड, तें सांड, असा जो व्यापार ती.

**साडी**, स्त्री॰ अमीर स्त्रियानी नेसायाचे उपयोगीं लहान जें लुगडें ती.

**साडू**, पु॰ अनेक कन्या वहिणी त्यांचे जे दादले ते

ते परस्पर.

साडे, पु॰ लग्नानंतर प्रा॰ चतुर्थादि दिवशीं ऐ श्रिणी पूजन वरास वधूस वस्त्रदान इ॰ जें कर्म करितात तें; कोणेकाचे साडे करणें ह्म॰ खरडपट्टी काढणें; २, ३लिं॰ हा शब्द सार्ध शब्दाचा अपभ्रंश परंतु तिहीं पासून पुढील जी संख्या तीचें विशेषण होऊन समासींच प्र॰ होतो; उ॰, अर्धानें सहित जे तीन ते साडे तीन; साडे पांच, इ॰; शिनळीचा, बटकीचा, इ॰ कितीएक शिव्यांचे मागें तदाधिक्य द्योतक लें करून या शब्दाचा प्र॰ करितात; उ॰, हा साडेशिंदळीचा, साडे माचा गमनीं, इ॰.

साडेभावार्थी, ३लिं॰ आंतलबाड असून बाहेर भावार्थ दाखविण्याचा स्वभाव ज्याचा त्यास प्रसंग विशेषीं ह्म॰.

साढू, पु॰ कों॰ साडू.

साणें, स्त्री॰ रा॰ सहाण

साणा, पु॰ रा॰ निसणा; २, शेत, गुन्हाळ, इ॰ कांचे ठायीं सर्कती इ॰ कांहीं चोरून काढून घेईल ह्मणून आपल्या पक्षाचा जो कोणी रक्षणार्थ बसवितात तो.

साणें, न॰ रा॰ गृहादिकांतील धूर जावा ह्मणून किं॰ आंत उजड पडावा ह्मणून किं॰ कांहीं कारणास्तव भिंत इ॰ कांस राखितात जें द्वार तें.

सात, ३लिं॰ एक संख्या आहे; ७; २, स्त्री॰ साथ.



सौंत, स्त्री॰ धाम; २, एक मत्स्य जाति आहे.

सातत्य, सौतत्य, न॰ कांहीं एक व्यापार इ॰ कांचा जो सततपणा.

सातपानी, ३लिं॰ रा॰ उगवल्यापासून सातपानें आलीं ह्मणजे ज्याला फूल येतें अशा जातीचा जो दूधभोंपळा, कांकडी, इ॰ कांचा वेल तो.

सातपुती, स्त्री॰ पडपोसाळी; २, सातपुत्र जीस आहेत ती; याचा प्रयोग ह्मणींत, ह्म॰ एकपुती रडती आणि सातपुती रडती.

सातपुतें, न॰ पडपोसाळें.

सातरणें, कों॰ वृक्षानें वडू अंगून सारख्या विस्तारानें युक्त होणें.

सातरस, पु॰ ऐशानी दिशेकडून वहात असतो जो वारा तो.

सातरें, न॰ सात अहोरात्रें पर्यंत जी पर्जन्यादिकांची स्थिति तें; २, सहा दिवस मध्यें जाऊन सातवे दिवशीं हीं व्हावें असा जो हांव येण्याचा प्रकार तें; ३, ... आणी नित्यांत ज्याशिवाहीं कधीं प्राप्त होणार असा जो मिष्टान्न भोजन, इत्यादि लाभ, इ॰ कांचें कांहीं दिवस चालतें जें सातत्य त्यास ह्म॰; उ॰, पंधरा दिवस क्षीरभोजनाचें सातरें लागलें होतें.

सौंतवण, पु॰ एक वृक्ष आहे.

सौतवन, न॰ सांत्वन शब्दाचा अपभ्रंश

सातवळा, ३लिं॰ सातव्या मासीं जन्मलेलें अपत्य तो, किं॰ वी वाळंतीण.

सांतविणें, ग्रं॰ कोणेकास उपदेशादि द्वारा-

सांतन विशिष्ट करणें.

**सांतवीण, सातवीण**, पु॰ सातवण.

**सातकणें**, हरभरे, इ॰ दाणें किं॰ मिरच्या, इ॰ कांहीं पदार्थ अग्नीवर ठेवलेलें जें कढई इ॰ पात्र त्यांत थोडेसें तेल अथवा तूप घालून त्यांत भाजणें.

**सातसवाई, सातसवाईनें**, अ॰ सातपटी, पेक्षां आधिक्यानें; कोणेक अर्थाचें कोणेक अर्थापेक्षां गुणादिकृत आधिक्य वर्णायाचें असतां अतिशयोक्तीनें प्र॰ करितात; उ॰, तुमचे घोड्यापेक्षां आमचा घोडा सातसवाईनें चांगला आहे.

**सातारा**, ३लिं॰ सातरलेला जो वृक्ष तो.

**साती**, पु॰ साथी.

**सांती**, कों॰ स्त्री॰ धाम.

**सातू**, पु॰ गव्हां सारिखें एक धान्य आहे.

**सातेरा**, ३लिं॰ कों॰ सातारा.

**सातेरूं**, न॰ रा॰ मोहोळ्यांत एक भेद आहे. जास सातमधांचीं ठिकाणें असतात.

**सातेरें**, न॰ कों॰ सातरें प्रथमार्थः.

**सातोळा**, ३लिं॰ कों॰ सातवळा.

**सात्रक**, ३लिं॰ घोड्याची एक चाल आहे तिचें वि॰.

**सात्रें**, न॰ सातरें.

**सांत्वन**, न॰ शोक क्रोधादि कारणानें क्षुब्ध झालेला जो कोणी त्यास गोड गुलाबीचा गोष्टी सांगणें इ॰ द्वारा सामोपचारानें प्रकृतीवर आणण्याचा जो व्यापार तें आणि तेणेंकरून होतें जी त्याची स्वस्थता तें.

**सात्विक**, ३लिं॰ सत्वगुणानें युक्त जो मनुष्य इ॰ किं॰ गोधूमादि पदार्थ किं॰ चांगला व्यापार इ॰ तो.

**साथ**, स्त्री॰ सोबत.

**साथी**, पु॰ सोबती.

**साद**, स्त्री॰ पु॰ कों॰ दूरस्थित मनुष्यादिकानें स्वसमीप यावें इ॰ कारणास्तव त्यातें उद्देशून करितात जो शब्दप्रयोग तो, तो : वनी गेकून त्याणें दिलें जें ओ, आलों, इ॰ रूप प्रत्युत्तर तें तो.

**सांद**, स्त्री॰ भिंत्यादिकांचा जो संधिप्रदेश तो.

**सांदण**, न॰ सांदणें प्रथमार्थः.

**सांदणपात्र**, न॰ सांदण करायाचें उपयोगीं जें धातुमय पात्र करितात तें.

**सांदणें**, न॰ तांदुळांचें एक पक्वान्न आहे ः २, सांधणें.

**सादर**, ३लिं॰ कांहीं एक कार्याविषयीं आदरविशिष्ट जो तो; कांहीं एक सादर करणें म॰ विवक्षितस्थळीं पाठविणें; परंतु लिहिणार सरकार असतां किं॰ जास लिहावयाचें त्याजकडे पूज्यत्व विवक्षित असता प्र॰.

**सादवणें**, कों॰ कोणेकास कोणेकानें साद घालणें.

**सादळणें**, सरदणें.

**सांदा**, पु॰ सांधा.

**सादावणें**, रा॰ सादवणें.

**सादिलवार**, ३लिं॰ गांवाकडे वार्षिक नेमणुके

कशिवाय फकीर, गोसांवी, बैरागी, मेजवानि इ० संबंधी जो जाजती होतो खर्च त्याचे आणि त्या बद्दल करितानजी गांवावरपट्टी तिचें नसंबंधी जमालिहिणें इ० कांचें वि०.

**सौंदीकौंदी**, स्त्री० सांद, कोंपरा, इ० रूपजें प्रदेश त्या प्र० अनेकव०

**सादृश्य**, न० सदृशपणा.

**सौंदोरी**, स्त्री० मोठीजी सांदती.

**साद्यंत**, ३ लिं० आद्यंतानें सहित असा अवघा जो ग्रंथ, वर्तमान इ० तो.

**सांद्र**, ३ लिं० सं० निबिड.

**सौंध**, स्त्री० सांद.

**साधक**, ३ लिं० मोक्षादि कार्य साधण्याविषयीं प्रवृत्त तो; २, विवक्षिततत्कार्य सिद्धिविषयीं उपयुक्त जो लेख, वचन, पदार्थ इ० तो.

**सौंधण**, न० कों० सांदण.

**सौंधणताटली**, स्त्री० कों० सांधणपात्र.

**साधणूक**, स्त्री० मंत्रयंत्रादिकेंकरून कांहीं एक कार्य साधण्याचा जो व्यापार ती; २, कोणेक कार्य सिद्ध करण्याविषयीं करून ठेवलें असतें जें फला इ० रूप संधान ती.

**साधणें**, तत्तदुपयोगि व्यापारानीं तें तें कार्य सिद्ध होई असें करणें; २, तादृश व्यापारानें तें कार्य सिद्ध होणें; कालादि साधणें स० तत्तत्कार्यास उक्त जो काळ त्या कालीं तें तें कार्य करून त्या कार्यीं तो काल संबद्ध होई असें करणें.

**सौंधणें**, वस्त्र, कागद, पत्रा, सूत्र, काष्ठ, इ० पदार्थांचे फाटणें, तुटणें, मोडणें, इ० कारणानें भिन्न झाले जे विभाग ते क्रि० मुळचेच पृथक् जे विभाग ते तों तों वस्त्रादि पदार्थ सलग एकरूप दिसायाजोगे परस्पर एकास एक जडणें

**साधन**, न० विवक्षित कार्यादि साधण्याचा जो व्यापार तें आणि तदुपयुक्त जें खत, पत्र, कुदार, इ० कारणभूत पदार्थ ते प्र०.

**साधनद्वादशी**, स्त्री० पूर्वदिवशीं एकादशी प्रयुक्त उपवास करून उत्तरदिवशीं द्वादशी कांहीं राहते त्यांत पारणा साधावी अशी विवक्षा असतां त्या द्वादशीस स०.

**साधनसूत्र**, न० दस्तऐवजी कागद, पत्र, इ० रूपजें साधन इ० तें.

**साधनी**, स्त्री० गंवडी, सुतार, इ० कांचें उंच, नीच, वांकडें, तिकडें, इ० पहायाचें उपयोगीं एक आऊत आहे; २, ३ लिं० कोण एक कार्य साधण्याविषयीं अनेक युक्ति प्रयुक्तिद्वारा झटणारा जो मनुष्य तो; ३, कांहीं एक कार्य साधनास उपयोगीं पडायाजोगा जो मतलबी कागद, पत्र, इ० तो: ४ मुख्यत्वें करून साधनोपयोगीं जें खत, पत्र, इ० त्यास प्रसंग विशेषीं स०.

**सौंधप**, न० रा० कार्यादि सांधण्याचा जो व्यापार तें.

**साधर्म्य**, न० सारख्य.

**साधलाद**, स्त्री० कोणेकापासून बरें वाईट फल होण्यास प्रयोजक जी दैवगती ती; उ०, आह्मी दोघे सारखी चाकरी करीत असतां यजमानानें त्याला हजार रुपये बक्षीस दिल्हे मला कांहीं नाहीं ही साधलाद आहे.

**साधा**, २लिं० नकशी, जर, रेशमी कोंड, ज्ञानकौशपणा, अकड, अन्योक्ति, वक्रता, इ० रूपजे त्यात्या पदार्थांस विशेष शोभादि देणारे गुणादि तेजा चे आंगीं नाहींत असाजो स्तंभ, पागोटें, धोत जोडा, मनुष्य, भाषण, इ० तो.

**साँधा**, पु० सांधलेल्या अनेक पदार्थांचाजो संधिप्र देश तो कि० अवयविरूपजो पदार्थ त्यास अवयवलेंकरून सांधलाजो सजातीय तुकडा तो; उ०, याहोरीस दहा हात सांधा आविला तेव्हां पाणी काढायाचेउपयो गीं झाली; कोणएक व्यवहाराचा सांधा वसणें म० जवा वसणें.

**साधारण**, ३लिं० विवक्षित जे अनेक अर्थ त्यांजवरजाचा समान संबंध असतो असाजो कोणेक धर्मादि तो; उ०, मनुष्य हें साधारण नाम त्यांत ब्राह्मण; शूद्र हीं विशेनामें, साधारण धर्म, साधारणरीति, साधारणसंज्ञा, सर्वसाधारण, उभयसाधारण, इ० स०; २, केवळ उत्कृष्ट नव्हे, केवळ निकृष्ट नव्हे, असा मध्यम प्रतीचाजो अर्थ तो; ३, पु० चवेचाळिसावाजो संवत्सर तो.

**साधारणपक्ष**, पु० कोणेक कार्याविषयीं उत्तम पक्ष, आणि निकृष्ट पक्ष सोडून स्वीकारतात मध्यमजो पक्ष तो.

**साधारण्य**, न० सं० साधारणपणा.

**साधित**, ३लिं० युक्तिप्रयुक्तीनें साधिलाजो तो.

**साँधींव**, ३लिं० सांधून सिद्ध केलाजो पदार्थ तो.

**साँधीकोंदी**, स्त्री० सांदीकोंदी.

**साधु**, पु० शमादि गुणें करून युक्त आणि कामक्रोधादि दोषानें रहित असा असून परोपकार करावा आणि ईश्वराचे ठायीं निष्ठा असावी असा जो तो; साधुसमागम, साधुसंगति, इ० स०; २, ३लिं० विवक्षित दोषरहित असून विवक्षित गुणानीं विशिष्ट असाजो वाक्य, भाषण, ग्रंथ, कर्म इ० तो; उ०, साधुजो पक्ष असेल त्याचें आश्रयण करावें.

**साध्य**, पु० सं० एक देवजाति आहे; २, ३लिं० सत्तावीस योगांतील जो बेविसावा योग तो; ३, त्या त्या व्यापारानें साधायास शक्य जो तो कि० साधायाचा जो तो; रोग, शत्रु, इ० साध्य आहेत इ० स्थलीं त्यांचा प्रतीकार साध्य आहे असा अर्थ.

**साध्वी**, स्त्री० पतिव्रता जी स्त्री ती.

**सान्निध्य**, न० सन्निधपणा.

**साप**, पु० सर्प.

**साँपई**, ३लि० रा० कुवट.

**सापकंद**, पु० सापकांदा.

**सापका**, उ० पडणें कीं० कांहीं एक संकटादि प्रसंगानें प्राण जीव याजवर बेतणें.

**सापकाँदा**, पु० एक कंद आहे ज्याचे भक्षणानें विषासारिखी बाधा होत्ये.

**साँपट, सापट**, स्त्री० सांधा इ० कांस असती जी फट ती.

**साँपटणें**, कीं० सांपडणें.

**सापटोळी**, स्त्री० सर्पजातीय एक जिवाणू आहे.

**साँपड**, पु० रा० शेत इ० संबंधी लावणी, वेणणी, इ० काम लौकर व्हावें म्हणून एकामे पुष्कळ कामकरी मिळून त्यांत एकानें बापयाजवीत असावें

आणि त्यानादावर सर्वांनी इच्छेनें तें तें कामलवकरें करीतअसावें असा कामकरण्याचा जो प्रकार तो.

**सोंपडणें**, अर्थाचें आकलन करणारें जें इंद्रियादिक त्यांचें तो तो अर्थ आकलित करायास साधनभूतजेंचक्ष्वादिक त्याचाठायीं कांणेक अर्थ पडणें.

**सोंपडा**. पु॰ कों॰ अनेक काठ्या, वांसे, इ॰ माळा, मंडप, इ॰ कांवर घालून प्रायः त्याचे वर खालीं दोन सोंपडी घालून काठ्या, वांसे, इ॰ पोटीं सोंपडवून त्यास अनेक बंध घेऊन जो तो विशिष्ट बंधकरितात तो.

**सापत्न**, ३लिं॰ सावत्र.

**सापत्नभाव**, पु॰ सवती, सापत्नबंधु, इ॰ कांचा परस्पर जो वैरभाव तो.

**सापसंद**, **सापसंध**, स्त्री॰ एकऔषधी आहे.

**सोंपसारणी**, कों॰ स्त्री॰ मा॰ भाषण करते समयीं पसरलेली जी गोष्ट ती सुधारण्याचा जो व्यापार तो.

**सोंपसारणें**, कों॰ अ॰ अव्यवस्थितपणें इकडे तिकडे पडलेले जे अनेक पदार्थ ते यथायोग्य स्थलीं आवरून ठेवणें; २, सोंपसरणीचा व्यापारानें पसरलेली गोष्ट सुधारणें.

**सापसुरळी**, स्त्री॰ चोपय.

**सोंपळा**, पु॰ घूस, चाप, उंदीर, इ॰ प्राणी धरणें इ॰ कारणा करितां जो यंत्रविशेष करितात तो; ला॰ अस्थिपंजरास म्ह॰.

**सोंपालें**, न॰ रा॰ जेथें मनुष्यादिकांची विशेषेंकरून वहिवाट नाहीं आणि जेथें बिळें पडलेलीं, पालेगवत पडलेला, तृणरुजलेलें, इ॰ असावें अतएव सर्पादिक किरडूं एथें रहातअसेल अशी संभावना व्हायाजोगें जें स्थल तें.

**सापिका**, पु॰ शिवराई पैशाचा जो अर्धभाग तो.

**सापिंड्य**, न॰ सपिंडपण.

**सोंपूड**, स्त्री॰ कों॰ कुंपण इ॰ कांस बंधार्थ आडवीं-किं॰ उभी बांधायासाठीं जी बांबू इ॰ कांची काठी, वांसकटी, इ॰ पैतात ती.

**सापेक्ष**, ३लिं॰ ज्याविषयीं ज्यास अपेक्षा आहे तो त्याविषयीं म्ह॰ स॰ प्र॰; उ॰, कालज्ञान यंत्र सापेक्ष आहे.

**सांप्रत**, अ॰ वर्तमान काळीं.

**सांप्रतकाळीं**, अ॰ सांप्रत.

**सांप्रदाय**, पु॰ संप्रदाय शब्दाचा अपभ्रंश.

**सांप्रदायिक**, ३लिं॰ संप्रदाय संबंधी जी रीति इ॰ ती.

**साफ**, ३लिं॰ वांकडेतिकडेपणा, खरखरीतपणा, उच्चीरखालीरपणा इ॰ दोषज्याचेआंगीं नाहींत असलांटनेटकेपणा गुळगुळीतपणा इ॰ गुणानीं विशिष्टजो पाषाण काष्ठादि पदार्थ तो; २, ज्यामध्यें गूढार्थ, वक्रोक्ति, संदेहविषयता, इ॰ दोष नाहींत असें सरळजें भाषण, लेख, इ॰ तें; ३, रोगांश, मलांश, इ॰ ज्यापासून निःशेष गेलेअसा जो पात्र शरीर इ॰ तें; ४, अ॰ लाभागोभा भीड मुरवत इ॰ न धरतां निखालसपणें बोलणें, उत्तर करणें, इ॰ कांचें वि॰; ५, पुरतेपणीं; जळणें, भिजणें, दिसणें, इ॰ कांचें वि॰, उ॰, मी पावसानें साफ भिजलों.

लों; मलासाफदिसत नाहीं.

**साफल्य**, न॰ सफलता.

**साफी**, स्त्री॰ सफाई; २, भांग गाळायाचें जें फडकें तें.

**सांब**, पु॰ महादेव; २, ला॰ भोळा जो मनुष्य त्यास ह्म॰.

**साबका**, पु॰ रा॰ कांहीं एककर्म केल्यामुळें हाआमक्या कर्माचा अमुकगुणविशिष्ट आहे अशीजी कोणे-काची लोकांत एकवेळ ख्याति पडोन गेली असते ती; पड, अस, धातुयोगी प्र॰

**साबडा**, ३लिं॰ साभडा.

**साबण**, पु॰ मलिनवस्त्रें निर्मळ करणें इत्याद्युपयोगी रांधा केलेला एकपदार्थ आहे.

**साबणी**, स्त्री॰ एकमिठाई आहे.

**सांबर**, पु॰न॰ मृगामध्यें एकजाति आहे.

**साबर**, न॰ शाबर.

**सांबरभोंपळी**, स्त्री॰ एकलता आहे जीचापाला सांबरास पोटदुख्या लागल्याअसतां तन्निरसनार्थ चारितात.

**सांबरमीठ**, न॰ एकक्षार आहे.

**सांबरशिंग**, न॰ सांबराचें जें शिंग तें.

**सांबरशिंगी**, ३लिं॰ सांबरशिंगाचा जो आंकडा इ॰ पदार्थ करितात तो.

**सांबरी**, ३लिं॰ सांबराचें चर्म किं॰ त्याचर्माचा जो जोडा इ॰ तो; २, स्त्री॰ रा॰ सांबराचें जें सकलचर्म ती; ३, रा॰ दारू, गोळ्या, चकमक, नाचकण, इ॰ ठेवायाचे उपयोगी सांबर इ॰ कांचे चर्माची आकारविशेषाची एकपिशवी करीतात ती.

**साबरी**, ३लिं॰ शाबरी.

**साबान**, पु॰ शाबान.

**सांबार**, पु॰ रा॰ सांभारें, भाजी, इ॰ कांत घालाया करितां अनेकप्रकारचीं धान्यें मेथ्या, मिरच्या, मसाला, असें एकत्र करून, भांड्यांत भाजून, याचें पीठ करावें असा एक पदार्थ करीत असतात तो.

**सांबारें**, न॰ तक्रादिकांत फळादिकांचा फोडी, दाणे, इ॰ घालून पीठ लावून जें पातळ कालवण करीत असतात तें.

**साबीत**, ३लिं॰ शाबूतयाअर्थं.

**साबू**, पु॰ साबूण.

**साबूण**, पु॰ साबण.

**साबूत**, **साबूद**, ३लिं॰ साबीत.

**साभडा**, ३लिं॰ साधी वृत्तिजाची असाजो भोळा मनुष्य तो.

**साभण**, पु॰ साबण.

**साभणी**, स्त्री॰ दे॰ साबणी.

**साभळा**, ३लिं॰ साभडा.

**सांभारें**, न॰ सांबारें.

**सांभाळ**, पु॰ संभाळ.

**सांभाळणें**, धा॰ पं॰ संभाळणें.

**सांभाळीं**, अ॰ कों॰ (करणें) कोणेकपदार्थ कोणेकानें रक्षावा ह्मणून त्याचे स्वाधीन करणें.

**साम**, न॰ एकवेद आहे त्याचीं जीं अवांतर खंडें आहेत तीं प्र॰; २, शत्रु इ॰ कांवरावर गोडी गुलाबीचीं भाषणें करून सख्य करण्यासाठीं आर्जवरूप जो उपाय तें.

**सामका**, अ॰ रा॰ समोर.

**सामग्री**, स्त्री॰ तत्तत्कार्योपयोगी जो साधनभूत

पदाचा समुदाय तो.

**सामंत**, पु॰ सं॰ मुख्य राजास कर देणारा जो मांडलिक राजा इ॰ तो.

**सामता**, पु॰ कुतार इ॰ कांचें वाटोळें भोंक पाडाया चें एक शस्त्र आहे.

**सामदाम**, न॰ भेयहून करितां कांहीं गोडी गुलाबी चा गोष्टी सांगून किं॰ कांहीं द्रव्यादि देऊन करून आर्जव करण्याचा जो उपाय तें.

**सामर**, पु॰ सांबर.

**सामरिक**, ३लिं॰ सं॰ समरसंबंधी जो वाद्य, शस्त्र, इ॰ पदार्थ तो.

**सामरी**, ३लिं॰ स्त्री॰ सांबरी.

**सामर्थ्य**, न॰ विवक्षित कार्य करण्याविषयीं शारीरादि किं॰ द्रव्यादिरूप जी शक्ति तें.

**सामवणें**, रा॰ सामावणें.

**सामवेद**, पु॰ एक वेद आहे.

**सामवेदी**, पु॰ ज्यांचे कुळांत सामवेदें करून संस्कारादि कर्में होत तआलीं असा जो तो.

**सामसूम**, न॰ स्त्री॰ कांहीं एक व्यवहाराचा जागरूकतेंकरून स्थितीचा जो अभाव तें तो; उ॰, तेथें कथा होऊं लागली नाहीं अजून सामसूम आहे; २, अ॰ तसव्यवहारादिकांची जागरूकतें करून स्थिति न दिसे असें; उ॰, त्याचेवरीं गेलों तों सारें सामसूम निजले आहेत.

**सामाजिक**, ३लिं॰ सं॰ समाज संबंधी जो तो; २, पु॰ सभासद प्रथमार्थं.

**सामान**, न॰ सामग्री.

**सामानसुमान**, न॰ सामान इ॰.

**सामान्य**, न॰ अनेक जो अर्थव्यक्ति त्या सर्वांत न भिन्न जी एक धर्म राहतो तें ज्याला जाति म्हणतात; उ॰, आंबा, पिंपळ, ताड, माड, इ॰ सर्व वृक्षांवर वृक्षत्व म्हणून एक सामान्य राहतें; २, ३लिं॰ साधारण प्रथम द्वितीयार्थं.

**सामान्यतः**, अ॰ साधारण पक्षातें आश्रयून.

**सामान्यपक्ष**, पु॰ साधारण पक्ष.

**सामान्या**, सं॰ स्त्री॰ परस्त्री हून इतर जी वधूक, वेश्या, इ॰ स्त्री ती.

**सामायन**, न॰ सामान.

**सामावणें**, समावणें.

**सामाशा**, सामासका, ३लिं॰ समसका.

**सामीप्य**, न॰ समीपपणा; २, समीपता म्हणून जी मुक्ति तें.

**सामील**, ३लिं॰ सहाय प्रथमार्थं.

**सामुग्री**, स्त्री॰ सामग्रीशब्दाचा अपभ्रंश.

**सामुदायिक**, ३लिं॰ सं॰ समुदाय संबंधी तो.

**सामुद्र**, ३लिं॰ सं॰ समुद्रसंबंधी जें लवण इ॰ पदार्थ तो.

**सामुद्रिक**, सं॰ न॰ मनुष्यांचे हस्तापादांगावयवांवरील रेषादि चिन्हें पाहून शुभाशुभ फल सांगायाचें उपयोगी एक शास्त्र आहे; सामुद्रिक लक्षण, सामुद्रिकचिन्ह इ॰ स॰.

**सामेणें**, रा॰ सामावणें.

**सामोग्री**, स्त्री॰ सामुग्री.

**सामोपचार**, पु॰ शरीरास विशेष दुःख न देतां अवघड पथ्य इ॰ न करितां जो औषधादि उपचार करितात तो; २, द्वितीयार्थ कजें साम तद्रूप जो उपचार

चार ह्मणजे प्रकार तो, परंतु याचा प्रयोग सामी पचारें सामीपचागनें असा बहुत होतो प्रथमांत समयविशेषीं होतो.

**सामीपाय**, पु॰ सामीपचार.

**सामोरा**, अ॰ आपल्या गृहादिकांचे बाजीं येणारा जो मनुष्य त्याचा सत्कार करावा ह्मणून तत्संमुख प्रदेशीं जा, ये, इ॰ कांचें वि॰

**साम्य**, न॰ गुणादि द्वारा परस्परांचें जें तौल्य तें.

**साम्यता, साम्यत्व**, स्त्री॰ न॰ साम्यशब्दाचा अपभ्रंश.

**साम्राज्य**, न॰ केवल निष्कटक जें राज्य तें; २, ज्या राज्यांत चोरी, चाहडी, गोजणूक, इ॰ नाहींत सुखें करून प्रजांना रहाये असें जें राज्य तें.

**साय**, पु॰ साग; २, स्त्री॰ दुग्ध, दधि, इक्षुरसादि किती एक पदार्थांवर अग्निसंयोगादि कारणानीं पोळीसारखा जो घट्ट अंश जमतो तो.

**सायक**, पु॰ सं॰ धनुष्यास लावून मारायाचे उपयोगी जो बाण तो.

**सायंकाल, सायंकाळ**, स॰ पु॰ सूर्यास्तसमय; २, पंचधाविभक्त दिनमानाच्या पांचवा भाग सवधी जो काळ तो.

**सायटें**, न॰ कों॰ दुग्धादिकांवर जी अल्पस्वल्प साय येती तें.

**सायरा**, पु॰ कों॰ उरफ, नेच, इ॰ कांवर जो तवंग येत असतो तो.

**सायरी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**सायरेल, सायन्येल**, न॰ सायरीचें जें तेल काढितात तें

सायला.

**सायला**, पु॰ रा॰ साग.

**सायली**, २लिं॰ सागवानी.

**सायवान**, न॰ मंडपादिकांचे चौफेर जो पडवीचे ड्यो त्याचा उतरता विभाग करित असतात तें; २, पु॰ न॰ सागवान.

**सायवानी**, २लिं॰ सागवानी; २, ज्यास सायवान उतरलें आहे असा जो मंडप इ॰ तो.

**साया**, पु॰ साग.

**सायास**, पु॰ कोंहीं एक कार्याविषयीं अतिशयित जो आयास तो.

**सायान्ह**, पु॰ सं॰ सायंकाळ.

**सायाळ**, स्त्री॰ एक पक्षी आहे.

**सायुज्य**, न॰ चतुर्विध मुक्तींतील एक मुक्ति आहे जीमध्यें ईश्वराशीं आणि जीवाशीं अभेद होतो.

**सायुज्यता**, स्त्री॰ सायुज्यशब्दाचा अपभ्रंश.

**सार**, न॰ चिंच, आमसोल, इ॰ जे आंबट पदार्थ ते पाण्यांत कोळून त्यांत मीठ, हिंग, इ॰ घालून जें कालवण करितात तें; २, पु॰ न॰ पदार्थ मात्रांतील विवक्षित जो तत्वांश तो तें.

**सारक**, न॰ कों॰ करमाडाची जी सालपटी ते व त्याम जो फळें यायाच्या लोंगरासारिखा अवयव उत्पन्न होत असतो आणि तंतु बांधायाचे उपयोगी पडतात तें; २, २लिं॰ रेचकता शक्ति ज्याचे आंगीं असा जो औषधि पदार्थ तो.

**सारखपट**, न॰ स्त्री॰ मनुष्य, वृक्षादिक जे पदार्थ त्यांचें जें आ॰ आकार द्वारा परस्पर सादृश्य तें ती.

**सारखपटा**, पु॰ सारखपट.

सारखा,

**सारखा**, ३लिं॰ समान प्रथमद्वितीयार्थं;२, सर्वावयवीं विवक्षानुरूप जो सम तो;३, अ॰ मध्येंन्यूनाधिकभावरहित होतां एकरूपानें कांहींएकक्रियेचें वि॰;उ॰, हें पोरचार घटका सारखें रडतें आहे.

**सारखावणें**, तासणें इ॰ संस्कारानें काष्ठादि पदार्थ सारखा होई असें करणें.

**सारंग**, पु॰ एकराग आहे.

**सारंगपाट**, पु॰ यं॰ क्रीडासाधन भूतजी सोंगट्या, फांसे, पट, मिळून खेळ तो.

**सारंगा**, ३लिं॰ केवळ तांबडा नव्हे कांहीं आंत काळसरपणा असावा अशा रंगविशेषानें विशिष्टजो अश्व तो.

**सारंगी**, एकतंतुवाद्य आहे.

**सारंग्या**, पु॰ सारंगी वाजविण्याचें कसब करितो तो.

**सारजा**, स्त्री॰ शारदा शब्दाचा अपभ्रंश.

**सारण**, स्त्री॰ कों॰ सरी तृतीयार्थ.

**सारणी**, स्त्री॰ ग्रह, पंचांग, इ॰ सिद्ध करायाचे उपयोगी जें अंकजाल लिहिलें असतें तीं.

**सारणें**, सरके असें क्रि॰ कोणेक पदार्थ व्ययादि द्वारा निःशेष होई असें करणें;२, यं॰ कांहीं एक व्यापार करून संपविणें;उ॰, सारुनियां घरधंदा सेविनें पतिपदारविंदा.

**सारथी**, पु॰ रथाचा अग्रभागीं बसून घोड्यांचें नियमन करून पाहिजे तसा रथ चालवावा त्याचें रक्षण करावें अशा कामावर जो नियुक्त तो;२, ला॰ कोणे कार्चें कांहीं एक कार्याविषयीं जो साहाय्य करितो तो त्याचा.

**सारथ्य**, न॰ सारथ्याचें जें रथ चालविणें इ॰ रूप कर्म तें.

**सारपा**, पु॰ कों॰ काष्ठ तासलें असतां, तोडिलें असतां लहान लहान ढलप्यांचा जो समुदाय जमतो तो.

**सारफा**, पु॰ दे॰ सरिफा.

**सारफेवार**, ३लिं॰ सरिफेवार.

**सारमंडळ**, न॰ एकतंतुवाद्य आहे.

**सारल्य**, न॰ सं॰ सरलपणा.

**सारवण**, न॰ भूमि, इ॰ सारवाया करितां तयार करितात जो शेण खडा इ॰ तें वत्याणें केला जो भूमि इ॰ कांस संस्कार तें वतो संस्कार करण्याचा जो व्यापार तें.

**सारवणें**, भूमि, इ॰ सारवण संस्कारानें संस्कृत होई असें करणें.

**सारवत**, न॰ कों॰ जून, कडकडीत जें नागवेलीचें पान तें.

**सारवान्**, पु॰ उंटाची चाकरी करावी, विवक्षित स्थळीं त्याची ने आण करावी, एतदर्थ जो नियुक्त मनुष्य तो.

**सारस**, पु॰ सं॰ एकपक्षी आहे;२, न॰ कमल;३, रा॰ सुरमाडाचे शाखेचे बुंध्याकडला जो पन्हळासारिखा अवयव असतो तें जो पाणी उडवण्यास साधनभूत होतो.

**सारस्य**, न॰ स्वारस्य शब्दाचा अपभ्रंश;२, कोणेक पदार्थाचे अंगीं गुणादिकृत असतो जो चांगलेपणा तें.

**सारस्वत**, पु॰ ब्राह्मणांत एक जाति आहे तो.

**सारा**, ३ लिं॰ अवघा; २, पु॰ दे॰ शेत, वाडी, इ॰ संबंधी जें सर्कार देय द्यावें लागतें तो; ३, नेत्रांवर येतोजो तवंग तो.

**सारादोरा**, पु॰ शेतसंबंधी जो सारा इ॰ तो.

**सारांश**, पु॰ पंचाइत, वाद, ग्रंथ, भाषण, इ॰ विषयांतील निवडून काढिला जो सारभूत अंश तो; २, तोजा कागदावर लिहितात तो कागद; ३, सारहितार्थ.

**सारासार**, न॰ कोणेक गोष्टींतील कांहीं सारभूत आणि कांहीं असारभूत असे उभयविध जे अंश तें; २, स्त्री॰ कोणेक दुसऱ्याचा तिसऱ्याचा समावेश करणे इत्यादि अर्थ आलीकडलें पलीकडे सारावें, तिकडलें हिकडे सारावें, असा जो व्यापार तो.

**सारासारविचार**, पु॰ कोणेक गोष्टींतील सारभूत अर्थ किती आणि असारभूत अर्थ किती, असा तद्विषयक जो विचार तो.

**सारिका**, सं॰ स्त्री॰ मैना म्हणून जो पक्षी तो; २, सोंगटी.

**सारिखा**, ३ लिं॰ ग्रं॰ सारखा.

**सारिपाट**, पु॰ मा॰ ग्रं॰ सारंगपाट.

**सारिफा**, पु॰ सरिफा.

**सारिफेयार**, ३ लिं॰ सरिफेयार.

**सारूप्य**, न॰ सरूपता.

**सारींख**, ३ लिं॰ ग्रा॰ चोर्यादि कांहीं दुष्टकर्म करून तद्विषयीं केवळ अलिप्तपणा जो दाखवितो तो.

**सारींखी**, स्त्री॰ ग्रा॰ सारींखपणा.

**सार्थ**, ३ लिं॰ अर्थसहवर्तमान जो श्लोकादि तो; २, पु॰ सं॰ मनुष्यादिकांचा जो समुदाय तो.

**सार्थक**, न॰ सार्थक्य शब्दाचा अपभ्रंश, कोणेक पदार्थ सार्थकीं लागणें म्ह॰ विवक्षानुरूप यथायोग्य विनियोग पावणें.

**सार्थक्य**, न॰ यद्यत्कार्योद्देशें करून उत्पन्न जो पदार्थ व्यापारादि त्यांची जी तत्तत्कार्यजननद्वारा सफलता तें.

**सार्वकाल**, अ॰ सर्वकाळ.

**सार्वजनीन**, ३ लिं॰ सं॰ सर्वजनसंबंधी जो आचार इ॰ तो.

**सार्वत्रिक**, ३ लिं॰ सर्वत्र विद्यमान, किं॰ प्रसिद्ध इ॰ रूप तो.

**सार्वभौम**, पु॰ सकल पृथ्वीचा जो राजा तो.

**सार्ष्टि**, न॰ पंचधा मुक्तिपक्षीं एक मुक्तीचा प्रकार आहे.

**साल**, स्त्री॰ न॰ वृक्षलता फल धान्य इ॰ सर्व पदार्थांवर जो त्वगंश असतो तीतें परंतु वृक्षलता किंवा एक फलें इ॰ कांची मोठी साल तद्विषयीं स्त्रीलिंगी प्र॰ धान्यादिकांवरची लहान साल तद्विषयीं नपुंसकीं प्र॰ अशी प्रा॰ व्यवस्था आहे; २, मनुष्यादिकांचे अंगाचें घर्षणादिकेंकरून जातें जें कातडें तद्विषयींही प्रसंगीं प्र॰ होतो; ३, ला॰ पाठीचें साल आणें इ॰ स्थलीं कांहीं एक व्यवहारीं चढ्ढाजाणें; ४, न॰ कोकंवसोल; ५, द्वादश मासात्मक जें वर्ष तें; ६, पु॰ एक वृक्ष आहे.

**सालकरी**, पु॰ ओसपण, कुळकरण, इ॰ वृत्तींचे अनेक जे विभागी त्यांत जा सालची वहिवाट करण्याचा जो अधिकारी, विभागी, तो त्या सालचा.

**सालंकृतकन्यादान**, न॰ विवाहविधीनें वरास अलंकारसहित कन्येचे जें दान करितात तें.

**सालगुदस्त**, न॰ चालत्या वर्षाचे पाठिमागील जें अव्यवहित साल तें.

**सालगुदस्तां**, अ॰ गतवर्षी.

**सालट**, ३लिं॰ कों॰ थोडें बहुत साल ज्याचे अंगीं आहे असा जो डाळ, कणीक, तांदूळ, इ॰ किं॰ जळाऊ लांकडें इ॰ पदार्थ तो.

**सालटी**, स्त्री॰ प्रा॰ शरीरावरील त्वचेस प्रसंग विशेषीं म्ह॰.

**सालटें**, कों॰ न॰ सालटी.

**सालडें**, न॰ सालद्वितीयार्थं.

**सालटोल**, स्त्री॰ सालफळ.

**सालदरसाल**, अ॰ प्रतिवर्षं.

**सालपट**, न॰ वृक्ष, मनुष्य, धान्य, इ॰ संबंधी साल तें.

**सालपा**, पु॰ सारपा.

**सालफळ**, स्त्री॰ एक वृक्ष आहे.

**सालबंदी**, स्त्री॰ कौल, ठरावबंद, हप्तेबंदी, खत, इ॰ कांवर चढता चढ देणें किं॰ प्रतिवर्षं हप्ता अमुक द्यावा इत्याद्यर्थ त्या कौल इ॰ कांवर अमुक वर्षं अमुक द्यावें, घ्यावें, अमुक वर्षं अमुक घ्यावें, द्यावें, इ॰ रूप ठरावांचा वर्षक्रम लिहिला असतो ती; २, रा॰ वृत्यादिकांचे वहिवाटी विषयीं अमुकानीं अमुक सालीं वहिवाट करावी असा जो साल कऱ्यानीं सालांचा ठराव केला असतो ती.

**सालभेंडा**, ३लिं॰ कों॰ ज्याचें साल मात्र फार जाड असतें आणि तादृश तत्वांश आंत कांहीं नाहीं असा जो नारळ, पोफळ, केळें, इ॰ फल आणि त्याचें तें झाड तो.

**सालभेंडी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**सालमजकूर**, न॰ वर्तमान जें वर्ष तें.

**सालंमिश्री, सालमिश्री**, स्त्री॰ एक औषधी पदार्थ आहे.

**सालवणी**, न॰ रा॰ सोलवणी.

**सालस**, ३लिं॰ ओलवाड, लचाड, खोडकर, नव्हे असा जो सज्जन, मनुष्य, पशु, इ॰ तो.

**सालसाई**, स्त्री॰ सालसपणा.

**सालसूल**, न॰ स्त्री॰ साल, इ॰ तें नी.

**साला**, पु॰ शालक.

**सालाबाद**, अ॰ प्रतिवर्षं.

**सालाबादी**, ३लिं॰ सालाबाद होत असतो किं॰ चालत असतो असा जो देणें, घेणें, इ॰ व्यवहारादिक तो; २, स्त्री॰ प्रतिवर्षं कर्तव्य किं॰ घडत असतो असा जो कांही एक व्यवहारादि ती.

**साली**, स्त्री॰ बायकोची जी बहीण ती.

**सालीना**, अ॰ सर्व साल मिळून अशा प्रकारें प्रतिवर्षं; उ॰, आह्मास सालीना हजार रुपये वेतन मिळतें.

**सालोसाल**, अ॰ प्रतिवर्षं; २, वर्षोवर्ष.

**साव**, पु॰ सावकार; २, चोराचे प्रतिपक्षि तें करून

करून जो विवक्षित तो.

**साँघ**, स्त्री॰कों॰ बकरा इ॰ कांचा आंत उयांचा जो लांब तंतु असतो ती, जी पिंजाऱ्याची कमान सारंगी इ॰ कांचे उपयोगी पडत्ये.

**सावकार**, पु॰ जापासून लोक द्रव्यादिक र्जी घेतात असा जो धनवान् तो; २, जो जाचा उत्तमर्ण तो त्याचा; ३, सामान्य उदीम व्यापार करणारा जो कोणी त्यास कोणी म्ह॰.

**सावकारा**, पु॰ कोणेक ग्रामादिकाचे ठायीं सावकारांच्या जो समुदाय तो; २, रा॰ मोठी र्जी सावकारी तो.

**सावकारी**, स्त्री॰ सावकाराचा जो दुसऱ्यास कर्ज देणें इ॰ व्यापार ती; २, ३लिं॰ सावकार संबंधी जें द्रव्य, खातें, चालु शिरिस्ता, इ॰ ती.

**सावकाश**, अ॰ कोणेक कार्याविषयीं त्वरा न करितां स्वस्थपणें किं॰ विवक्षित कालांतरीं जाणें, येणें, भोजन करणें, इ॰ काचें वि॰; उ॰ तुह्मी सावकाश जेया; अह्मी यंदा लग्न करीत नाहीं सावकाश करूं याई काय आहे.

**सावकाशी**, स्त्री॰ सावकाशपणा.

**सावकास**, अ॰ सावकाश याचा अपभ्रंश.

**सावचित**, ३लिं॰ ग्रं॰ सावधातनपणें जो स्थित तो.

**सावज**, न॰ ससा, व्याघ्र, हरण, इ॰ जीं आरण्यक चतुष्पदें तीं म॰, सावज पाडणें म्ह॰ वादप्रतिवादादिकांमध्यें दुसऱ्यास पराजित करून आपल्या हाता खालीं येई असें करणें.

**सावजी**, पु॰ ग्रं॰ सावकार.



**सावट**, न॰ स्त्री॰ जा स्थलावर निरंतर वृक्षादिकांचें आच्छादन असतें अत एव जे थें जित्र बहोत नाहीं असें जें स्थल तें ती, परंतु जित्रब करण्याचे प्रसंगी प्रा॰ प्र॰; २, न॰ रा॰ पाण्यांत दूर दिसतें जे गलबत त्यास म्ह॰.

**सावटी**, ३लिं॰ सावटाची जी जमीन, शेत, इ॰ ती.

**सावडणें**, इकडे एक तिकडे एक अशा प्रकारें चहूं कडे पडलेले किं॰ पसरून पडलेले जे अर्थ ते जमा करणें.

**साँवडणें**, रा॰ सावरणें तृतीयार्थ; २, सावडणें.

**सावत्र**, ३लिं॰ सावत्र आईचे संबंधानें जे भाऊ मामा, सासरा, चुलता, इ॰ नाते याईक ते प्र॰; सावत्र भाऊ, सावत्र मामा, सावत्र सासरा, सावत्र चुलता, इ॰.

**सावत्रआई**, स्त्री॰ कोण एकाचे आईची जी सवत ती त्याची.

**सांवत्सरिक**, ३लिं॰ सं॰ प्रतिवर्षं नियमानें करायाचें जें श्राद्धादिक ती.

**सावंत्राई**, ३लिं॰ कों॰ गृहाचे डौलांत एक भेद आहे त्या डौलाचें जें गृह ती.

**सावद**, न॰ रा॰ सावज.

**सावध**, ३लिं॰ मूर्च्छा, कैफ, निद्रा, इ॰ कारणानें देहभान जावें गेलें नाहीं असा जो ती; २, दक्ष; ३, ला॰ दारिद्र्य जाऊन उर्जित दशा पावजो त्यास म्ह॰.

**सावधगिरी**, स्त्री॰ सावधपणा.

**सावधान**, ३लिं॰ अवधानानें सहित ती; २,

लग्न आणि मुंज लावण्याचे वेळेस मंगलाष्टक ह्मणून याशब्दाचा प्रयोग करितात तेथें अभिप्राय असा कीं सावध असा; ३, प्रसंगविशेषींविवाह संस्कारास ह्म०.

**सावन**, ३लिं० सं० तीस दिवसांचा एक महिना या मानानें जो वर्ष, मास, दिवस, इ० काल तो.

**सावपा**, ३लिं० कों० मूर्छादि जाऊन जो सावध झाला तो.

**सावयव**, ३लिं० अवयवविशिष्ट जो तो.

**सांवर**, स्त्री० कों० एक वृक्ष आहे.

**सावरणें, सांवरणें**, इतस्ततः कोंसणारा किं० पडणारा असा जो वस्त्र काष्ठादि कांहीं एक पदार्थ त्यातें आवरून धरणें; २, क्षीणावस्थापन्न जें शरीर किं० शरीरी त्याणें विवक्षित शारीर शक्तीनें अथवा द्रव्य शक्तीनें युक्त होणें; ३, घसरलेली जी कांहीं एक गोष्ट किं० व्यापार इ० त्यांतें युक्तिप्रयुक्तीनें संभाळणें.

**सांवरी**, स्त्री० सांवर.

**सावर्णि**, पु० पुढें होणारा आठवा जो मनु तो.

**सांवऱ्या**, पु० कों० गृहावर घालणें इत्याद्यर्थ आणितात जो सांवरीच्या वांसा तो.

**सावली**, स्त्री० मनुष्य, वृक्षादिकांची जी छाया ती.

**सावसावकारा**, पु० सावकार, सावकारी, इ० तो; उ०, पहिलें राज्य बुडाल्यापासून आली कडेस सावसावकारा बुडाला.

**सावळा, सांवळा**, ३लिं० केवळ गोरा नव्हे आणि केवळ काळाही नव्हे, असा जो मनुष्य वर्ण तो वतद्वर्णविशिष्ट जो मनुष्य तो; २, केवळ काळा नव्हे, तांबडा नव्हे, असा जो पशु इ० कांचा रंग वतद्विशिष्ट जो गाय, बैल, वांसरूं, तो.

**सांवळगोंदें, सांवळगोंधें**, न० सावळें गोंधळें.

**सांवळी**, स्त्री० पोफळीची जी झावळी ती.

**सावळें गोंधळें**, न० देणें, घेणें, वाद, पंचाईत, इ० रूपजें खटलें त्याचा धड एक परिणाम न होतां त्याणें गोंधळत राहावें अशी जी त्या खटल्याची अवस्था तें किं० त्याणें कांहीं दिवस सरासरी निर्विवाद रहावें अशी जी त्याची गति करितात तें; २, सोंवळें, ओंवळें, आचार, अनाचार, पंक्तिविचार, शरीरसंबंध, इ० विषयीं जी व्यवस्था असावी ती न राखितां आंतल्या आंत जो गोंधळ असतो तें.

**सांवा**, पु० एक तृण धान्य आहे.

**सावी**, स्त्री० रा० सांवी.

**सावीज**, न० रा० रावज.

**सांवी, दे० साधी**, कों० स्त्री० स्त्री प्रसूत झाली असतां सहावे दिवशीं षष्ठीपूजन समारंभ करितात ती.

**साशंक**, ३लिं० आशंकेनें युक्त जो तो.

**साष्टांग**, ३लिं० अष्टांगानीं सहित जो तो, प्रणाम, नमस्कार, इ० कांचें वि०.

**सासट**, ३लिं० सहासष्ट.

**सांसपणें**, चांचपणें; २, रा० कुर्वाळणें; ३, दुःखित जो कोणी त्यास सुख व्हावें ह्मणून त्याचे अंगावरून हात फिरविणें.

**सासर**, न० दे० सासरें.

**सासरा**, पु० दादल्याचा किं० बायकोचा जो बाप तो; २, तत्स्थानीं मानला जो त्याचा बंध्वादि तो; हा

हा अर्थ घेऊन चुलत सासरा, मामेसासरा, इ०.
**सासरें**, न० दादल्याचें बापाचें जें गृह तें.
**सासरेवास**, पु० ग्रा० सासुरवास.
**सासवडी**, ३लिं० सासवड ह्मणून ग्राम आहे त त्संबंधी जें धोत्रजोडा, ओठ, इ० तो.
**सासष्ट**, ३लिं० सहासष्ट.
**सासुरवड**, स्त्री० कों० सासुरवाडी.
**सासुरवाडी**, स्त्री० बायकोचा बापाचें जें गृह ती.
**सासुरवास**, पु० सुनेस श्वशुर गृहीं सासू, सासरा, इ० करितात जो जाच तो; २, ला० स्वतंत्रेच्छेनें नवागण्याविषयीं कोणेकाचा जो कोणेकास जाच असतो तो.
**सासुरवाशी**, ३लिं० सासुरवासानें युक्त जी सून इ० तो; २, मातापितर, सासू सासरा, धनी, इ० कांचे धाकामुळें जास स्वतंत्रपणें वागतां येत नाहीं असा जो कोणी तो त्याचा.
**सासुरवाशीण**, स्त्री० सासऱ्यांस वास करणारी जी स्त्री तिची संज्ञा; २, दे० सासुरवाशी जी स्त्री ती.
**सासुरें**, न० पं० सासरें.
**सासू**, स्त्री० सासऱ्याचीजी स्त्री ती.
**साहचर्य**, न० अनेक मनुष्यादि पदार्थांचा जो एकत्रस्थितिरूप संबंध तें; उ०, धूमाचें आणि वन्हीचें साहचर्य आहे.
**साहजिक**, ३लिं० सहज इतीयार्थ; २, असहज
**साहटें**, न० कों० सायटें.
**साहणें**, सोसणे प्रथमार्थ; २, न० कों० गृहादिकांचे पाख्यास अथवा भिंतीस आंत प्रकाश पडावा इत्याद्यर्थ जें गवाक्ष सदृश द्वार राखिलेलें असतें तें.
**साहरा**, पु० कों० सायरा.
**साहरी**, स्त्री० कों० सायरी.
**साह्येल**, न० सायम्मेल.
**साहस**, न० जा व्यापारांत मरणसंभावना आहे असा जो युद्धांत उडी घालणें, दुसऱ्याचे घरास आग लावणें, कोणेकास जिवें मारणें, इ० रूप व्यापार तें.
**साहसिक**, ३लिं० साहस कर्म करण्याचा स्वभाव ज्याचा तो.
**साहसी**, ३लिं० साहसिक.
**साहाय्य**, न० सहायाचें जें कर्म तें.
**साहित्य**, न० सामग्री; २, साहाय्य.
**साहित्यपत्र**, न० कोणेकाचें कार्य कर्तव्य असतां याचें हस्तें परहस्तें कार्य करावें अशा अर्थाचें त्यापाशीं कोणेकाचे नावें कोणेक लिहून देतो जें पत्र तें.
**साहित्यशास्त्र**, न० काव्य, नाटक, इ० कांचीं अलंकार लक्षणादि जांत सांगितलीं आहेत असें जें शास्त्र तें.
**साहित्यसुहित्य**, न० साहित्य इ० तें.
**साहुकार**, पु० सावकार.
**साहुकारी**, स्त्री० सावकारी.
**साहेब**, पु० हें प्रतिष्ठातिशय बोधक नाम आहे परंतु बापू, नाना, राव, दादा, बाबा, इ० जीं सामान्य प्रतिष्ठा नामें त्याचे पुढें याचा योग होतो; उ०, बापूसाहेब, रावसाहेब, इ०; २, स्त्रि

स्त्रियांचे प्रतिष्ठानामापुढें याचा योग झाला असतां पक्षीं नपुंसकीं बहुवचनीं प्र० होतो, बाईसाहेब आलीं, ताईसाहेब गेलीं, राजा, धनी इ० कांविषयीं केवलाचाही प्र० होतो, इंग्रेज आदिकरून जे टोपीवाले त्यांची संज्ञा त्यांचे नावापुढें किं० केवलाचाही प्र० होतो.

**साहेबनौबत**, स्त्री० राजादिकांचे स्वारीबरोबर हत्तीवर घालून जी नौबत चालवीत असतात ती.

**साहेबी**, स्त्री० देशग्रामादि संबधी कोणेक अधिकार किं० कांहीं संपत्यादिक प्राप्त झाल्यामुळें मर्यानीं त्यास साहेब ह्मणत असावें असा जो कोणेकास मोठेपणा प्राप्त होतो तो; २, ३लिं० टोपकरजे साहेब तत्संबंधी जो वेष, रीति, इ० तो.

**साहोत्रा**, पु० प्रतिमासीं किं० प्रतिवर्षं शेंकडा सहा रुपये द्यावे असा जो व्याजाचा संकेत तो; २. कोणएक ग्रामादिस्थलीं कोणएकाचा जो शेंकडा सहा रुपये प्रमाणें जो अंश असतो तो.

**साह्य**, न० ३लिं० सहाय या अर्थं स्प०.

**साह्यटें**, न० कों० सायटें.

**साह्यरा**, पु० कों० सायरा.

**साह्यरी**, स्त्री० कों० सायरी.

**साह्यरेल, साह्यरेल**, न० कों० सायरेल.

**सात्था**, पु० कों० साग.

**साळ**, स्त्री० वेतन घेऊन मुलांस लिहिणें शिकविणें किं० सुतार, लोहार, इ० कित्तीएक शिल्पकारांचें लोखंडी काम घडणें, लांकडी काम करणें, इ० व्यवहाराचें जें अधिकरण ती आणि तो कारखाना; २, शालि ह्मणून जें धान्य ती; जिरेसाळ, घोडसाळ, इ० स०; ३, सायाळ; रेशीम, सूत, इ० कांची साळ घालणें ह्मणजे जितकें लांब सनंग विणावयाचें असेल तितक्या अंतरावर भूम्यादिकांस खुंट्या मारून त्यांचे भोंवतीं तें सूत्र गुंडाळून तितका लांब ताणा होईल असें करणें.

**साळकेगोळके**, पु० साळकोजी माळकोजी.

**साळकोजी माळकोजी**, पु० ज्यांचें विशेषरूपें करून नाम घ्यावयाची विवक्षा नाहीं असे सामान्यकोटींत परिगणनीय जे मनुष्य त्यांस निंदेनें स्प०. अनेकवचनीं प्र०.

**साळणें**, चाकू, वांकस, इ० शस्त्रानें काष्ठ, इ० कांचा उखिरवाखीरपणा इ० अविशिलतांश काढावयाकरितां तें तें काष्ठादि तासणें.

**साळढाळ**, ३लिं० ज्याचे अंगीं अकडदारखवाबी, अटघराची, छांदसपणा करावा, इ० नाहीं व्यवहारांत चवघांशीं मिळून चवघांचे रीतीप्रमाणें वर्तणारा असा सालस जो मनुष्य तो आणि त्याचा तसा व्यवहार, भाषण, इ० तो.

**साळपीस, साळपींस**, न० साळ ह्मणून जो पक्षी त्याचे अंगावर जे कंटकासारखे अवयव असतात ते प्र०.

**साळवट, साळवटी**, ३लिं० साळ्यानें विणलेला जो धोत्रजोडा, पंचे, इ० वस्त्र तो.

**साळशीट, साळशीत, साळशीद**, न० साळपीस

पीस:२,सायाळ.

**साळसूद,साळसूध**,३लिं॰सालसजो मनुष्य पशु,इ॰ तो.

**साळा**,पु॰मेहुणा.

**साळाऊ**,३लिं॰दे॰साळ्यानें विणलेलें जें वस्त्र तें.

**साळाभोळा**,३लिं॰विशेष छक्केपंजे ज्याचे अंगीं नाहींत निष्कपट असा जो मनुष्य तो किं॰ तसा जो त्याचा व्यवहारादि तो

**साळिंद्र**,दे॰न॰सायाळ:२,साळपीस.

**साळी**,पु॰प्रा॰कार्पास वस्त्रें विणणारी एक हिंदूमध्यें जाति आहे;२,स्त्री॰सायाळ;३,मेहुणी.

**साळुंकी**,स्त्री॰एक पक्षी आहे.

**साळुंखी**,स्त्री॰साळुंकी.

**साळू**,स्त्री॰सायाळ.

**साळोंखी**,स्त्री॰साळुंकी.

**साक्ष**,स्त्री॰साक्षा;२,स्त्री॰पु॰साक्षी.

**साक्षर**,३लिं॰जाणें थोडें बहुत अध्ययन केलें आहे असा जो ब्राह्मण तो.

**साक्षा**,स्त्री॰देव,मंत्र,प्रश्न,शकुन,इ॰कांचीजी प्रतीति ती.

**साक्षात्**,अ॰स्वरूपें करून शब्द मात्राचें अर्थाचे दोन अंश असतात एक मुख्य आणि जाणें केलें असतां आपण केलेंसें होतें जाला पाहिजे लें असतां आपणास पाहिजेसें होतें ह्मणून किं॰ सादृश्यादि कारणास्तव तत्स्वरूपत्वें करून मानाया जोगा असा जो पुत्र भृत्य प्रतिमादि कोणी तत्स्थानिक तो दुसरा गौण त्यांत केवळ त्या मुख्यांशींच जेव्हां तात्पर्य आहे तेव्हां गौणांशा व्यावृत्यर्थ हें विशेषण लागतें;उ॰ दुसऱ्या कोणास पाठउन का तुह्मी साक्षात् जाऊन पहा;हा ब्राह्मण साक्षात् सूर्य आहे.

**साक्षात्कार**,पु॰साक्षा;कोणें कास साक्षात्कार होणें ह्म॰ स्वप्नादिकांत ईश्वराचें प्रत्यक्ष दर्शन होणें.

**साक्षी**.पु॰कर्तृत्वाद्यभिमान नसतां कोणेक व्यवहारातें प्रत्यक्ष पाहणारा जो तो त्याचा;२,स्त्री॰ साक्ष्य.

**साक्षीदार**,पु॰साक्षी प्रथमार्थ.

**साक्षेप**,पु॰विद्या,पदार्थ,इ॰कांचा संग्रह किं॰ कांहीं एक व्यापार अगत्य धरून करावा असा- जो कोणें काचा स्वभाव असतो तो.

**साक्षेपी**,३लिं॰साक्षेप आहे ज्यास तो.

**साक्षोप**,पु॰साक्षेप.

**साक्षोपी**,३लिं॰साक्षेपी.

**साक्ष्य**,न॰कोणेक व्यवहाराचा जो साक्षी त्याचें त्या व्यवहाराविषयीं याचा मी साक्षाद्द्रष्टा आहें अशा अर्थाचें प्रमाणत्वें करून स्थित जें लेख,भाषण,इ॰ तें.

**सिकता**,स्त्री॰सं॰वाळू प्रथमार्थ.

**सिकलगर,सिकलगार**,पु॰शिकलगार.

**सिक्कल**,स्त्री॰शिकल.

**सिक्कलगार**,पु॰शिकलगार.

**सिक्का**,पु॰शिक्का.

**सिक्रण**,स्त्री॰शिकरण.

सिंगरूं,

**सिंगरूं**, न॰ शिंगरूं.

**सिंगळद्वीप**, न॰ सिंहलद्वीप याचा अपभ्रंश.

**सिंगाडा**, पु॰ शिंगाडा.

**सिंगी**, स्त्री॰ शिंगी.

**सिंचणें**, शिंपणें.

**सिंचन**, न॰ शिंपण्याचा जो व्यापार तें.

**सिंचित**, ३ लिं॰ सिंचनानें युक्त केला जो तो.

**सिजणें**, शिजणें.

**सित**, ३ लिं॰ शुभ्र.

**सिताफळ**, न॰ शिताफळ.

**सिताफळी**, स्त्री॰ शिताफळी.

**सिंदूर**, पु॰ शेंदूर.

**सिदोरी**, स्त्री॰ शिदोरी.

**सिधा**, पु॰ शिधा.

**सिंधु**, पु॰ सं॰ समुद्र; २, एक देश आहे; ३, स्त्री॰ नदी.

**सिंधुनद**, पु॰ एक महानद आहे.

**सिद्ध**, ३ लिं॰ तयार जें जें करून जें सिद्ध होतें तें तत्सिद्ध, व्याकरसिद्ध, न्यायसिद्ध, इ॰ स॰ प्र॰; २, निर्णयादिकें करून निर्णित जो अर्थ तो; उ॰, याचा दावरून त्याकडे दोष नाहीं हें सिद्ध झालें; ३, पु॰ अणिमादिसिद्धि ज्यास प्राप्त झाली आहे तो; ४, एक देवजाति आहे; ५, एक विसावा जो योग तो; ६, जैनांत एक भेद आहे.

**सिद्धता**, स्त्री॰ सिद्धपणा.

**सिद्धपुरुष**, पु॰ अणिमादि सिद्धि ज्यास प्राप्त झाल्या आहेत असा जो तो.

**सिद्धसाधक**, पु॰ कपटें करून कोणेकास वचाया करितां हे एक मताचे आहेत असें बाहेर नसमजूं देतां एकानें वाचाळ व्हावें दुसऱ्यानें शिष्य होऊन त्याची मोठी वर्णावी कि॰ एकानें कांहीं एक बोलावें दुसऱ्यानें त्यास अनुमोदन द्यावें अशा प्रकारचें सगणमतांचे जे अनेक ते, अनेकवचनीं प्र॰.

**सिद्धस्थाली**, स्त्री॰ कोणेक सिद्धपुरुष इ॰ कानें पाहिजे तें अन्न विपुल आंतून निघावें अशी प्रसादिक कोणेकास दिल्ही असत्ये जी स्थाली ती; २, ला॰ लाक्षणिकार्थ कच्चरू ज्याला सही प्र॰.

**सिद्धांत**, पु॰ कोणेक गोष्टीविषयीं प्रमाणाद्यनुरोधानें निर्णय होऊन शेवटीं ठरतो जो अर्थ तो; २, कल्पाचे आदिपासून ग्रहादिकांचें साधन, व्यक्ताव्यक्त गणित, यंत्रादिविधि, भूगोल खगोल, इ॰ कांचीं स्वरूपें इ॰ विषयांचें निरूपण ज्यामध्यें केलें असतें असा जो ज्योतिष, ग्रंथ, तो.

**सिद्धांतित**, ३ लिं॰ सिद्धांतरूपानें निश्चित जो अर्थ तो.

**सिद्धांती**, ३ लिं॰ ज्योतिष प्रकरणाविषयीं जो सिद्धांत ग्रंथ तो पढला आहे तो

**सिद्धान्न**, न॰ शिजणें इ॰ संस्कारानें सिद्ध झालें जें अन्न तें.

**सिद्धार्थ**, पु॰ त्रेपन्नावा जो संवत्सर तो.

**सिद्धि**, स्त्री॰ अणिमा, महिमा, इ॰ जा अष्ट त्या प्र॰; २, कोणेकापाशीं जें कांहीं एक गोष्टीविषयीं चें अलौकिक सामर्थ्य असतें त्यास प्र॰; ३, तत्तत्कार्याद्युपयोगी जी सामग्री तीणें झाली जी तत्तत्कार्याची सिद्धता ती; ४, पु॰ सत्तावीस योगांतील जो सोळावा योग तो.

सिपाई,

**सिपाई**, पु॰ शिपाई.

**सिपायगिरी**, स्त्री॰ शिपायगिरी.

**सिपारस**, स्त्री॰ शिपारस.

**सिबंदी**, स्त्री॰ शिबंदी.

**सिरस्ता**, पु॰ शिरिस्ता.

**सिरस्तेदार**, पु॰ शिरिस्तेदार.

**सिलसिला**, पु॰ शिलशिला.

**सिलेखाना**, पु॰ तलवारी, बंदुका, इ॰ हत्यारें ठेवायाचीजी जागा तीं; व तीसर्व कारखाना.

**सिसफूल**, न॰ शिसफूल.

**सिसा**, पु॰ शिसा.

**सिसें**, न॰ शिसें.

**सिंह**, पु॰ सकल चतुष्पदांमध्यें श्रेष्ठ असा एक आरण्यक पशु आहे; २. सजातीय समुदायामध्यें गुणादिकेंकरून विशेष श्रेष्ठ्य पावलो त्यास ह्म॰; याचा प्र॰ समासीं; उ॰, पुरुषसिंह, पंडितसिंह, इ॰; ३. बाराराशींतील जो पांचवा राशि तो.

**सिंहनाद**, पु॰ अरण्यांत सिंहाच्या जसा मोठा गर्जनाशब्द होतो तद्वत्; रणादिकांचाठायीं शूरांचा जो सावेश मोठा शब्द तो; २. देवालयादिकांमध्यें मनुष्यादिकांचा संबंध नसतां समयविशेषीं देवापासून जो ध्वनि उत्पन्न होतो तो.

**सिंहलद्वीप**, न॰ एकद्वीप आहे जामध्यें सिंह बहुत आहेत आणि स्त्रिया फारचांगल्या आहेत इ॰ ख्याति आहे तें.

**सिंहस्थ**, पु॰ सिंहराशीस जी बृहस्पतीची स्थिति किं॰ तदुपलक्षित जो काल तो.

**सिंहावलोकन**, न॰ लेखनपठनादि उत्तरोत्तर पुढें करीत जात असतां मध्यें मध्यें जें उलटून मागें करितात जें अवलोकन तें.

**सिंहासन**, न॰ देव, राजा, इ॰ कांचें मुख्य बसायाचें आसन तें.

**सीग**, स्त्री॰ शीग.

**सीमंतपूजन**, न॰ सीमांतपूजा शब्दाचा अपभ्रंश.

**सीमंतोन्नयन**, न॰ स्त्री गर्भिणी झाल्यानंतर चतुर्थादि कोणत्या एका मासाचा ठायीं एक गर्भसंस्कार करित असतात तें.

**सीमा**, स्त्री॰ देश, ग्राम, काल, इ॰ कांचा जो अवधि तो; २. आचार, व्यवहार, इ॰ कांविषयीं लोकशास्त्रकृत जी मर्यादा ती; ३. कांहीं एक व्यवहार, भाषण, इ॰ कांची जी पराकाष्ठा ती; उ॰, त्यावर्षी पर्जन्यानें मोटी सीमा केली.

**सीमांतपूजन**, **सीमांतपूजा**, न॰ स्त्री॰ ग्रामांत राहून कन्यावरणार्थ आला जो वर त्याची जी स्वग्रामसीमांतीं, किं॰ देवालयादिकांचे ठायीं पूजा करितात तें ती, स्वग्रामस्थ वराची ही नाह शास्त्रीं पूजा करितात तीसही ह्म॰.

**सीमोल्लंघन**, न॰ स्वग्रामसीमेचें जें उल्लंघन तें परंतु विजयादशमीचे दिवशीं अपराजिता पूजनार्थ अवश्य करावें इ॰ विधि किं॰ श्राद्धदिवसादिकांचे ठायीं करूं नये इ॰ निषेध असतां विशेष प्र॰.

**सु**, अ॰ हा संस्कृत उपसर्ग आहे, याचा जा शब्दाचे मागें योग होतो, त्याचा उत्तमत्वाचा किं॰ अतिशयाचा वाचक, द्योतक, होतो, समासीं प्र॰; उ॰ उत्तम जो पुत्र तो सुपुत्र, सुशब्द, सुशील, इ॰ अतिशयें जो दूर तो, सुदूर, सुदुर्लभ, सुदुःसह, इ॰.

**सुई**, स्त्री॰ वस्त्रादि शिंवायास साधन भूत एक कंटकाकार लोहादिकांचा पदार्थ करित असतात ती; २, माड, पोफळ, केळ, गहूं, इ॰ कांचा झाडांतून जें साग्र कोमलपर्ण विकसित नहोतां नुकतें बाहेर पडतें ती.

**सुईण**, स्त्री॰ प्रसूत होणारी जी स्त्री तिचा प्रसृति समयीं करावयाची खटपट ती करून पुढें बाळंतपणाची खटपट करीत असत्ये ती.

**सुईणपण, सुईणपणा**, पु॰न॰ सुईणीचें जें प्रसूति संबंधी शुश्रूषा करणें इ॰ रूप कर्म तें.

**सुएर**, पु॰ न॰ वृद्धि तृतीयार्थी.

**सुएरतुला**, ३लिं॰ सुएर आहे ज्यास तो, स्पर्शादि संबंध विषय असतां प्र॰.

**सुकट**, स्त्री॰ एक मत्स्य जाति आहे जो वाळवून शुष्क करून ठेवित असतात ती; २, ३लिं॰ रोगादि विकृतीनें शुष्क जें शरीर, शरीरी, इ॰ तो; ३, यत् किंचित् शुष्क झालें जें काष्ठ, फळ, इ॰ तो.

**सुकट्या**, ३लिं॰ कों॰ सुकट द्वितीयार्थी.

**सुकड**, स्त्री॰ जून होऊन वाळलेला जो चोडांसकट नारळ ती; ३लिं॰ सुकट द्वितीयार्थी.

**सुकणें**, शुष्क होणें; २, कों॰ समुद्रादिकांचें पाणी ओहोटणें.

**सुकताव**, पु॰ सोनें, रुपें, इ॰ तावून पाण्यांत नबुडवितां तसेंच निववून राखिला जो त्याचा तावलेपणा तो.

**सुकर**, ३लिं॰ करण्याविषयीं तादृश कठिन नव्हे असें जें कार्य तो.

**सुकर्म**, न॰ कुकर्माचें प्रतिपक्षी.

**सुकर्मा**, पु॰ सत्तावीस योगांतील सातवा जो योग तो.

**सुँकलें, सुंकलें**, न॰ कर्णादिकांत अलंकारार्थ सुवर्णादिकांचें बारीक लहानसें वलय घालीत असतात तें.

**सुकवण**, न॰ कों॰ वाळवण.

**सुकवत**, स्त्री॰ कों॰ वाळवत.

**सुकवशी**, स्त्री॰ कों॰ सुखवशी.

**सुकवें**, न॰ कों॰ पर्जन्याभावादि कारणामुळें नपिकतां वाळलें जें शेत तें.

**सुकळ**, पु॰ सुकाळचा अर्थींच समय विशेषीं प्र॰.

**सुका**, ३लिं॰ आर्द्रपणा जाऊन शुष्क झाला किं॰ जात आर्द्रपणा मुळींच नाहीं असा जो पदार्थ तो.

**सुकाण**, न॰ विवक्षानुरूप गलबत फिरवावें म्हणून जो त्यास अवयव विशेष मागल्ये आंगास केला असतो तें.

**सुकाणदार**, पु॰ गलबतावरील सुकाण धरणारा जो मनुष्य तो; २, ला॰ कोणेक व्यवहार चालविणारे जे अनेक त्यांत जो मुख्य त्यास म्ह॰.

**सुकाणू**, न॰ सुकाण.

**सुकाण्या**, पु॰ सुकाणदार.

**सुकादुकळ**, पु॰ पर्जन्य नपडल्यामुळें पडतो जो दुकळ तो.

**सुकाळ**, पु॰ दुकळाचा प्रतिपक्षी.

**सुकाळा**, ३लिं॰ सुखार्थ वारंवार दुसऱ्या पुरुषा पासून मैथुन करून घेत असावें अशा स्वभावाचा जो पुरुष, स्त्री, नपुंसक, तो.

**सुकीकेळ**, न॰ दे॰ सोलून वाळविलेलें जें पक्क केळें तें.

**सुकीखरूज**, स्त्री॰ मोटे फोड येऊन आंत पू होत नाहीं केवळ बारीक, बारीक, फोड येतात, आणि कंडूमात्र होतो, अशी एक प्रकारची खरूज होत असत्ये ती.

**सुकुमार**, ३लिं॰ नाजूक जो मनुष्यादि पदार्थ तो.

**सुकृत**, न॰ ईश्वर प्रीति जनक जीं यज्ञादिकर्में तीं प्र॰; २, तज्जन्य जो आत्म्याचा ठायीं धर्म विशेष राहतो तें.

**सुकृती**, ३लिं॰ सुकृत आहे ज्याचे पदरीं तो.

**सुकेळ, सुकेळें**, न॰ सुकीकेळ.

**सुक्रखरूज**, स्त्री॰ग्रा॰ सुकीखरूज.

**सुक्रखा**, ३लिं॰ग्रा॰ सुका.

**सुख**, न॰ अनुकूलरूपें करून जो जीवाचा ठायीं अनुभव घडतो तें, आत्मसुख, विषयसुख, रतिसुख, इ॰स॰, कोणेकास सुखास पडणें, वाटणें, किं॰ येणें, ल॰ चैन पडणें.

**सुखट**, ३लिं॰कों॰ सुकट द्वितीयार्थीं.

**सुखड**, स्त्री॰ कों॰ सुकड प्रथमार्थीं.

**सुखढाळ**, पु॰ विशेष दुःखद नव्हे असें जें ढाळक तो.

**सुखणें**, सुकणें.

**सुखताव**, पु॰ सुकताव.

**सुखती**, स्त्री॰ग्रा॰ समुद्रादि संबंधी जी ओहोटी ती.

**सुखप्रसव**, पु॰ विशेष दुःख नहोतां जो प्रसव तो.

**सुखरूज**, स्त्री॰कों॰ सुकीखरूज.

**सुखरूप**, ३लिं॰ दुखणें वाहणें, इ॰ दुःख किं॰ काहीं संकटादि न प्राप्त होतां सुखें करून युक्त जो तो; २, अ॰ सुखेनैव; उ॰ मला वाटतें असें कर्म करूं नये तुह्मी करीनच ह्मणतां तर सुखरूप करा.

**सुखयत**, स्त्री॰ कों॰ सुकयत.

**सुखवशी**, स्त्री॰ उत्तरोत्तर शरीर शुष्क होत जावें असा जो रोगादि कारणानें मनुष्यादिकांस अवस्था विशेष प्राप्त होतो ती.

**सुखवस्तू**, ३लिं॰ वतन, वाडी, इ॰ रूप आश्रय नसून तृण काष्ठादि संबंधी सोईचें कांहीं एक सुख मानून कोणेक ग्रामादि स्थलीं राहिलो जो तो.

**सुखशायन**, न॰ शृंगारादि वर्णन प्रसंगीं निजायाचें जें चांगलें आंथरूण, पलंग, इ॰ त्यास ह्म॰.

**सुखशय्या**, स्त्री॰ सुखशायन; २, आपण जीवंत असतां आपल्यास जन्मांतरीं सुख व्हावें एतदर्थ जी ब्राह्मणास शय्या देतात ती.

**सुखशेज**, स्त्री॰ ग्रं॰ सुखशायन.

**सुखसंतोषें**, अ॰ कोणी बलात्कार, शिवी, गाळ, इ॰ न करितां आपले संतोषें करून लिहून देणें, भोजन करणें, जाणें, इ॰ वि॰

**सुखसोहळा**, पु॰ विवाह, मुंजी, गर्भाधान, इ॰ कांचेठायीं न्हाण, माखण, अलंकारधारण, मिरवणें, इ॰ रूप जो सोहळा करितात तो.

**सुखा**, ३लिं॰ सुका.

**सुखांगणें**, क्रिं॰ जा जा सुखादिकांचे लोभानें जे जे व्यापार पूर्वी करीत असतो ते ते सुख किं॰ तदधिक सुख अनायासें करून प्राप्त झालें असतां पूर्वीचे व्यापारांविषयीं उपेक्षा बुद्धिविशिष्ट होऊन त्या सुखादिकांतच निमग्न होऊन राहणें; प्र॰ निंदा असतां.

**सुखानंद**, पु॰ प्रपंचादि निर्वाहाची जो काळजी बाळगीत नाहीं आणि यथेच्छपणें वर्ततो तो.

**सुखापुरी**, ३लिं॰ प्रपंचादि निर्वाहाविषयीं जास कधींही यातायात करावी लागत नाहीं, सुखानें निर्वाह होत असतो असा जो मनुष्य किं॰ त्याचें शरीर तो.

**सुखावणें**, कोणेकास कांहीं एक विशेष सुख प्राप्त झालें असतां पूर्वीचें सुख सोडून त्या विशेष सुखाचाच ठायीं आसक्त होणें.

**सुखासंतोषानें**, **सुखासमाधानानें**, अ॰ सुखसंतोषें.

**सुखासन**, न॰ सुखावह जें आसन तें, प्र॰; उ॰ रायें बैसविला सुखासनीं; २, मेणा, डोली, इ॰ रूप सुखानें बसायाचें जें यान तें.



**सुखासुखीं**, **सुखासुखी**, अ॰ सुख संतोषानें.

**सुखी**, ३लिं॰ सुख आहे जास तो; २, प्रपंचाचे निर्वाहाची यथास्थित सोय आहे जाची असा जो गृहस्थ तो; उ॰ जाचे घरीं आपली मुलगी देतों तो गृहस्थ आपले घरचा सुखी आहे.

**सुगड**, न॰ एक आकारविशेषाचें लहान मडकें आहे; २, ३लिं॰ सुगर.

**सुंगणें**, ढुंगणें.

**सुगति**, स्त्री॰ दुर्गति शब्दाचा प्रतिपक्षी.

**सुगंध**, पु॰ दुर्गंधाचा प्रतिपक्षी.

**सुगंधराज**, **सुगंधराव**, पु॰ सुगंध विशिष्ट एक तेल आहे.

**सुगंधि**, ३लिं॰ सुगंध विशिष्ट जो पदार्थ तो.

**सुगंधिक**, ३लिं॰ सुगंधि.

**सुगंधी**, पु॰ गंधी द्वितीयार्थीं.

**सुगम**, ३लिं॰ सोपारा.

**सुगर**, ३लिं॰ जा जा कसबांमध्यें किं॰ व्यवहारादिकांमध्यें जो कुशल तो त्याविषयीं.

**सुगरण**, ३लिं॰ पाकक्रियादिकर्मांमध्यें कुशल जो तो, परंतु मा॰ स्त्रीविषयीं प्र॰; २, सुगर.

**सुगराई**, स्त्री॰ सुगरपणा; २, गानांतील एक रागिणी आहे.

**सुगरावा**, पु॰ सुगरपणा.

**सुगरीण**, स्त्री॰ सुगरण जी स्त्री ती.

**सुगावणें**, कोणेकास कांहीं द्यावें किं॰ कोणेक कार्य करावें, इ॰ विषयीं अंतःकरणाचा उल्हास झाल्यामुळें कोणेकानें अनुकूल होणें.

णें.

सुगावा, पु॰ सुदावा.

सुगी, स्त्री॰ सराई प्रथमार्थी; म॰ सरली सुगी आणि राहिली उगी.

सुग्रास, पु॰ उत्तम प्रकारचें जें अन्नादि भोज्य त्यास समय विशेषीं म॰.

सुघटित, ३ लिं॰ अघटित शब्दाचा प्रतिपक्षी.

सुघड, न॰ कों॰ सुगड; २, ३ लिं॰ सुगर.

सुचणें, तत्प्रसंगीं उपयुक्त कांहीं एक गोष्ट, कल्पना, श्लोक, वाक्य, कर्तव्यांश, इ॰ अंतःकरणांत अकस्मात् आविर्भूत होणें.

सुचना, सुचना, स्त्री॰ सूचना शब्दाचा अपभ्रंश.

सुचिन्ह, न॰ दुश्चिन्हाचें प्रतिपक्षी.

सुच्चें, न॰ कों॰ सुचना.

सुजट, ३ लिं॰ कों॰ ईषत् सुजलेला जो हस्तपादावयवादि तो.

सुजणें, मनुष्यादिकानीं सुजीनें युक्त होणें, तो त्या पदार्थासाठीं सुजला नाहीं, इ॰ स्थलीं त्या वांचून त्यानें कांहीं खोळंबलें नाहीं असा अर्थ.

सुजन, ३ लिं॰ सज्जन.

सुजनी, स्त्री॰ गर्भसुती एक रेशमी वस्त्र विशेष आहे.

सुजभिरणें, रा॰ हस्तपादावयवानीं ईषत् सुजणें.

सुजभीर, ३ लिं॰ रा॰ सुजभिरलेला जो हात, पाय, इ॰ तो.

सुजाण, ३ लिं॰ सुज्ञ.

सुजीर, ३ लिं॰ सुजट.

सुटकण, अ॰ सुटकन.

सुटकणें, कों॰ सटकणें.

सुटकन, सुटकर, सुटदिनीं, सुटदिशीं, अ॰ सुटकन.

सुटका, स्त्री॰ विवक्षित तत्प्रतिबंधापासून होत्येजी मोकळीक ती.

सुटणें, जाशीं संबद्ध होऊन राहिलेला जो कोणेक अर्थ त्याणें त्यापासून वियुक्त होणें; २, कोणेक प्रतिबंधानें प्रतिबद्ध जो त्याणें त्या प्रतिबंधापासून मुक्त होणें; ३, अंतःकरण, शरीर, शरीरावयव, अन्न, मीठ, मांस, इ॰ कितीएक अर्थरूप जीं अधिकरणें त्यांच्या ठायीं, भय, कंप, खाज, वास, पाझर, घाण, इ॰ कितीएक अर्थ उद्भवणें; तोफ, बंदूक, इ॰ सुटणें म॰ त्यांपासून आवाज होणें; इतांत सर्व धातुरूपांपुढें तो तो व्यापार एक सारखा करूं लागणें या अर्थीं योग होतो; उ॰ तो मारीत सुटला, खात सुटला, पळत सुटला, इ॰.

सुटसुटीत, ३ लिं॰ कांहीं काम करण्याविषयीं ज्याचे आंगीं मंदत्व नाहीं असा चपळ जो तो; २, बोजड नव्हे असें जें शरीर, ओझें इ॰ तो; ३, फारजाचा पसारा नाहीं असा आटोपसर जो संसार, व्यवहार, इ॰ तो.

सुटा, ३ लिं॰ कोणेक अवयवी पासून पृथक् त पावला जो त्याचा अवयव तो किं॰ अवयवीचा अवयवलेंकरून मानिला जो पदार्थ तो.

तो; उ॰ शेला फाडूं नको एकादें सुटें पट्टें असलें तर दे; बंदा रुपया पाहिजे तर घे सुटी अघेली मजवळ नाहीं; २, कोणेक व्यवहारीं गुंतला नजातां मोकळेपणें स्थित जो मनुष्य, पदार्थ, इ॰ तो; उ॰ होते वासे तितके मांडवाकडे गुंतले एक देखील वांसा सुटा नाहीं देऊं कोठून.

**सुटी**, स्त्री॰ विद्याभ्यास, चाकरी, कृषिकर्म, इ॰ व्यापार करणारे जे शिष्य, चाकर, बैल, इ॰ त्यांस त्या त्या व्यापारीं संबद्ध नकरितां विश्रामार्थ कांहीं काल देतात जी मोकळीक ती.

**सुद्धा**, न॰ कों॰ देणें, घेणें, इ॰ व्यवहार संबंधी जो तुटलेपणा तें, करहो, इ॰ योगीं प्र॰; उ॰ कापडवाल्यापासून कापड आणीत असें त्याचा हिशोब करून रुपये देऊन त्याचें सुद्धा करून टाकिलें.

**सुंठ**, स्त्री॰ शुंठी शब्दाचा अपभ्रंश, साठांवर्षी सुंठ फुलणें, ग्र॰ कांहीं एक चांगली गोष्ट कधीं नवत घडणें; कोणेकानें कोणेकाचे गांडींत सुंठ फुंकणें, ग्र॰ त्यास कांहीं एक गोष्ट सांगून त्याचें अंतःकरण फिरविणें.

**सुंठरूं**, न॰ दे॰ गळ्या सारिखें एक उठाणू होत असतें तें.

**सुंठवडा**, पु॰ बाळंतीण, इ॰ कांस भक्षणार्थ द्यावया करितां सुंठ, गूळ, शर्करा, आदिकरून अनेक औषधें एकत्र करून एक पदार्थ करीत असतात तो.

**सुंठसाखर**, स्त्री॰ पित्तोपद्रवादि निरसनार्थ भक्षाया करितां शर्करा मिश्रित जें सुंठीचें चूर्ण करितात तें.

**सुडका**, पु॰ कों॰ प्रा॰ जुने वस्त्राचा जो फडका तो; २, दे॰ सुडकें; ३, एक शिवी आहे.

**सुडकें**, न॰ वस्त्रास निंदेनें म्ह॰.

**सुडसुडीत**, ३लिं॰ सुटसुटीत.

**सुडावणें**, ज्याचा ठायीं प्रवृत्त होण्यास एकाएकीं धीर होत नाहीं असें जें वाद, युद्ध, पैका उधळणें, कुदान घेणें, इ॰ दुष्कर कर्म तद्विषयीं काय होईल तें होऊ पण करावेंच असें धैर्य धरून तें करण्या विषयीं कोणेकानें पुढें होणें.

**सुडी**, स्त्री॰ दे॰ सकणिज्ञा, जोंधळा, सजगुरा, इ॰ धान्याचा रचून ठेवितात जो गंज ती.

**सुत**, पु॰ सं॰ पुत्र.

**सुतक**, न॰ सूतक शब्दाचा अपभ्रंश, परंतु लोकांत मृताशौचास म्ह॰.

**सुतकतुला**, ३लिं॰ कों॰ सुतकाचे विटाळानें युक्त जो तो.

**सुतकाळा**, **सुतकाळया**, ३लिं॰ सुतकतुला.

**सुतकी**, स्त्री॰ पाथर्वट, इ॰ लोकांचें धोंडे फोडायाचे उपयोगी एक आऊत आहे ती; २, ३लिं॰ सुतकतुला जो मनुष्य तो.

**सुतकील**, ३लिं॰ दे॰ सुतकतुला जो मनुष्य तो.

**सुतरनाळ**, स्त्री॰ दे॰ उंटावरून मारायाची जी तोफ ती.

**सुतरस्वार**, पु॰ सांडणी स्वार.

**सुतराम्**, अ॰ प्रा॰ सर्वथा या अर्थी.

**सुतल**, न॰ सप्त पातालांतील तिसरें जें पाताल तें.

**सुनळ**, न॰ सुतळ ; २, स्त्री॰ कों॰ सुतळी.

**सुतळी**, स्त्री॰ तागाची जी बारीक दोरी करितात ती.

**सुता**, स्त्री॰ सं॰ पुत्रिका.

**सुंता**, स्त्री॰ सुनता.

**सुताडा**, पु॰ आस्तरणाधुपयोगी सतरंजी सारिखें एक जाड वस्त्र आहे ; २, नागपुरी लुगड्यांत एक भेद आहे; ३, निंदेनें मोटें जाड जें वस्त्र त्यासही म्ह॰.

**सुताडें**, नं॰ प्रथमार्थक जो सुताडा त्यास निंदेनें म्ह॰; २, ला॰ कोणा एकाची यौन संबंध द्वारा अनेक कुळांचे ठायीं जी व्याप्ति असत्ये तीस प्रसंग विशेषीं म्ह॰.

**सुतार**, पु॰ लांकडें तासून त्यांचें विवक्षितानुरूप आकार विशिष्ट पदार्थ करणारी आणि गृहादि बांधण्याचें कसब करणारी एक जाति आहे ; २, पु॰ एक पक्षी आहे जास काष्ठ,कुट्ट, म्ह॰.

**सुतारकाम**, न॰ सुताराचें जें लांकडें, घडणें, इ॰ काम तें ; २, सुतारानें घडून तयार केलेलें जें लांकडी सामान त्यासही प्रसंग विशेषीं म्ह॰

**सुतारकी**, स्त्री॰ सुताराचें जें कर्म ती किं॰ कोणेक ग्रामीं जो सुतारपणाचा अधिकार असतो ती.

**सुतारनाळ**, स्त्री॰ सुतरनाळ.

**सुताळ**, स्त्री॰ वा॰ भातांत एक जाति आहे.

**सुतिवणें**, संक्रातीचीं मडकीं, रुखवताचे लाडू, पिंपळ, इ॰ सुतानें वेष्टणें.

सुती,

**सुती**, ३ लिं॰ सुताचा जो दोरी इ॰ पदार्थ तो; २, सूत मारून पाहिलें असतां ईषन्मात्र ही जास वक्रता नाहीं असा जो कृत्रिमी भिंत, स्तंभ, इ॰ पदार्थ तो, किं॰ स्वतःसिद्धच जो यष्टी, इ॰ पदार्थ तो ; ३, सूचक, एक दोन तीन, इ॰ संख्याक सुतें आहेत ज्यामध्यें असा जो दोरा, इ॰ तद्विषयीं एक दोन, इ॰ संख्यापूर्वक प्र॰ होतो तसेंच बारीक, मोठें, इ॰ सूत आहे ज्याचें असा जो वस्त्रादि पदार्थ तद्विषयीं बारीक, मोठा, इ॰ शब्द पूर्वक प्र॰ होतो; उ॰ ही दोरी तीन सुती आहे, हें वस्त्र बारीक सुती आहे.

**सुतींव**, ३ लिं॰ कों॰ सुती द्वितीय तृतीयार्थी.

**सुतेरा**, पु॰ कोळी म्हणून एक क्षुद्र जंतु आहे तो ; २, त्याचे गुदापासून उत्पन्न जो तंतु तो.

**सुत्रा**, ३ लिं॰ सूत्रा.

**सुथारणें**, कों॰ सुधारणें.

**सुंदडणें**, कों॰ तुडविणें.

**सुंदर**, ३ लिं॰ चांगला जो पदार्थ तो.

**सुंदरा**, स्त्री॰ ग्रं॰ सुंदरीचा अपभ्रंश.

**सुंदरी**, स्त्री॰ सुंदर जी स्त्री ती ; २, सतार, रुद्रवीणा, इ॰ वाद्यांस विवक्षित स्वरानुसंधानानें त्यांचे दांडीस जे बंध बांधीत असतात ते प्रत्येकीं.

**सुदर्शन**, न॰ विष्णूचें जें चक्र म्हणून आयुध आहे तें ; २, ला॰ कोणा एकाचे पाठीशीं लागलें जें लचांड तें ; ३, शाळग्राम शिळा फुटली असतां तीचें जें चक्र विशिष्ट शकल निघतें तें.

सुदर्शन-

**सुदर्शनचूर्ण**, न॰ औषधार्थ अनेक ओषधी एकत्र कुटून एकचूर्ण विशेष करित असतात तें.

**सुदामत**, अ॰ खराबी,नाश, इ॰ न होतां सुरक्षितपणें, असणें, पोंहोंचणें,पावणें,इ॰कांचें वि॰,उ॰ कांचेचीं भांडीं कापडींत घालून पाठवा म्हणजे सुदामत पोहचतील;२,उच्छृंखलपणा,दांडगाई, इ॰ न करितां सुरळीतपणें, वागणें,नांदणें,देणें, बोलणें,इ॰कांचें वि॰,उ॰ही गाय सुदामत दूध देतीतर मग बहाला, अडची, हें करणाला पाहिजे होतें; दोहीं अर्थीं नाशादिकांची किं॰उच्छृंखलपणा,इ॰कांची संभावना असतां प्रा॰ प्र॰

**सुदामपुरी**, स्त्री॰ अतिशयित दारिद्र्य जास्थळीं वसतें अशी जी नगरी, ग्राम, इ॰ त्यास म्ह॰.

**सुदामदेवाचेंवस्त्र**, न॰ अतिशयित फाटलेलें जें वस्त्र त्यास म्ह॰.

**सुदामपोहे**, पु॰ कोणास सत्काराप्रर्थ देतात जें द्रव्यादि त्यास अति अल्पत्व मानून लीनतेनें म्ह॰.

**सुदामे**, पु॰ संकेतानें पृथुकांस म्ह॰ प्र॰अनेक॰ व॰.

**सुदावा**, पु॰ गत नष्ट जो पदार्थ त्याचा किं॰ गुप्तरूपें स्थित जी कांहीं एक गोष्ट तीचा लावितात किं॰ लागतो जो शोधतो, लाग, काद इ॰प्रयोगीं प्र॰

**सुदिन**, न॰ पु॰ व्यतीपात, भद्रा, इ॰ दोषरहित किं॰ सणाचा जो दिवस तें, तो;२,इष्ट वस्तूचा लाभ, साधु, इ॰कांचें दर्शन, संकटापासून मुक्ति, इष्ट वार्ता, श्रवण, इ॰ जा दिवशीं जास घडलें तो दिवस त्याला.

**सुदीस**, अ॰ सदीस.

**सुद्धां**, अ॰ सकट द्वितीयार्थीं; उ॰ ओझ्या सुद्धां मला शिवला; २, देखील; उ॰ वरकड येतील तर नवल काय, राजा सुद्धां येईल.

**सुद्धा**, ३लिं॰ कों॰ केवल तृतीयार्थीं.

**सुधा**, स्त्री॰ सं॰ अमृत; २, चुना; ३, ३लिं॰ विवक्षित तत्तद्गुणानीं जो बरा तो, प्रा॰ निषेध विषयीं प्र॰; उ॰ त्याचें बोलणें सुधें नाहीं म्हणून त्याजवळ कोणी टिकत नाहीं.

**सुधारणें**, कोणेकाचे हातून घसरली जी कांहीं एक गोष्ट ती, किं॰ करताना बिघडला किं॰ मुळींच सरासरी केला जो पदार्थ तो विवक्षानुरूप नीट करणें.

**सुधारस**, पु॰ अमृतरूप जो रस तो.

**सुधांशु**, पु॰ चंद्र मुख्यार्थीं.

**सुधी**, ३लिं॰ उत्तम प्रकारचा ज्ञानानें युक्त जो पंडित तो; २, स्त्री॰ त्याची जी बुद्धि ती.

**सुनका**, ३लिं॰ सुना.

**सुनत**, **सुनता**, स्त्री॰ यवन लोकांस जन्मला जो मूल त्याचा शिश्नाग्र छेदरूप संस्कार करित असतात ती.

**सुनबहिरी**, स्त्री॰ भैरी व्यथा म्हणून जो रोग ती.

**सुनमूख**, न॰ विवाहोत्तर सासवेनें सुनेचें मुख पाहण्याचा जो समारंभ करित असतात तें.

**सुना**, ३लिं॰ ओंकें दिसाया जोगें कोणेक अर्थानें

तें शून्य झालें जें कोणेक अधिकरण तो, दिवस, डाव, इ॰ सुना जाणें; म॰ त्या त्यामध्यें घडायाचें जें जें फळ तें तें नहोतां तो तो दिवसादि व्यर्थ जाणें.

**सुपरीत**, ३ लिं॰ विपरीताचा प्रतिपक्षी.

**सुंपली. सुपली**, स्त्री॰ केवळ लहान जें सूप तें.

**सुपाऊस**, पु॰ कों॰ उत्तम प्रकारें जी पर्जन्याची वृष्टि ती.

**सुपात्र**, न॰ कुपात्राचा प्रतिपक्षी.

**सुपारी**, स्त्री॰ एक फळ आहे, जें विड्याचें मुख्य साधन होय तें; २. त्याचें जें झाड तें; कोणेकास सुपारी देणें म॰ अनुज्ञा नाकरितां आमंत्रण, किं॰ गोंधळ, वाजविणें, इत्यादि अर्थ गोंधळी, वाजंत्री, इ॰ कांस सुपारी देऊन निश्चित करणें.

**सुपिंड**, ३ लिं॰ कों॰ ज्याचें शरीर चांगलें पुष्ट बळकट असा जो प्रा॰ मनुष्य तो व त्याचें शरीर.

**सुपीक**, न॰ कों॰ पर्जन्य चांगला पडल्यामुळें उत्तम प्रकारचें आलें जें पीक तें.

**सुपुत्र**, पु॰ कुपुत्राचा प्रतिपक्षी.

**सुपेती**, स्त्री॰ निजावयाची जी गादी तीस म॰.

**सुप्त**, ३ लिं॰ सं॰ निद्रित जो तो.

**सुप्रभात**, न॰ प्रभात समय; २, अ॰ प्रभात समयीं.

**सुप्रयुक्त**, ३ लिं॰ उत्तम प्रकारें यथायोग्य जाणी योजना केली तो; उ॰ आह्मी तें कर्म सुप्रयुक्त केलें होतें परंतु ईश्वर इच्छेनें विपरीत झालें त्यास काय उपाय; २, अ॰ सुदामत द्वितीयार्थी.

**सुप्रसन्न**, ३ लिं॰ अतिशयित जो प्रसन्न तो.

**सुफराटा**, ३ लिं॰ उफराट्याचा प्रतिपक्षी.

**सुफल, सुफळ**, ३ लिं॰ उत्तम प्रकारें फळ झालें आहे ज्याचें तो कर्मादि.

**सुंब**, न॰ पु॰ सुंभ.

**सुबक**, ३ लिं॰ सुटसुटीत द्वितीयार्थी; २, सुरेख.

**सुबकणें**, चुबकणें.

**सुंबखंड, सुंबखंडी**, स्त्री॰ सुंभखंडी.

**सुबत्ता**, स्त्री॰ धान्यादि पदार्थांची सवंगाई, राजकीति, चोर, महामारी, इ॰ कृत उपद्रवांच्या अभाव, इ॰ कारणानें देशादिकांच्याठायीं असते जी स्वस्थता ती.

**सुबत्ताकाळ**, पु॰ कोणेकास असतो अनुकूळ काळ तो; उ॰ चार दिवस सुबत्ताकाळ आहे तों एवढें देवालय करून घ्या.

**सुंबा**, पु॰ सुंभा.

**सुंबाडी**, स्त्री॰ सुंभाडी.

**सुबारा**, पु॰ दे॰ गुंगारा, देणें, धातुयोगीं प्र॰

**सुबुद्ध**, ३ लिं॰ बुद्धिमान जो तो.

**सुबोध**, ३ लिं॰ दुर्बोधाच्या प्रतिपक्षी

**सुंभ**, न॰ पु॰ काथ्याची वळून करितात जी दोरी तें, नक्षदश अंबाडी ताग, इ॰ कांची जी दोरी करितात तीसही कोणी म॰; २, पु॰ घोडें, गाढव, इ॰ कांचा जो खूर तो.

**सुंभखंड, सुंभखंडी**, न॰ स्त्री॰ कों॰ सुंबाडी.

**सुभग**, ३लिं० दुर्भगाचा प्रतिपक्षी.

**सुंभणें**, स० माच्या, वाज, इ० सुंभानें विणणें.

**सुभक्ता**, स्त्री० सुबत्ता.

**सुंभा**, पु० खडक, दगड, हे फोडायाचें एक मोठें लोहाचें आऊत आहे; २, सुंभहि इतीयार्थी.

**सुभा**, पु० विवक्षित परिमाणानें परिमित जो देश, तालुका, इ० त्यांची जमाबंदी, करण्याचा जो सर्कारी अधिकार तो व तो देश, तालुका, इ० तो; २, ला० तादृश अधिकार विशिष्ट जो त्यासही प्रसंग विशेषी म्ह०; उ० म्ह० कोणदेशींचा सुभा मुसाफर पानवथ्यावर उभा; ३, विटाळशीपणास संकेतानें म्ह०.

**सुभां**, अ० प्रथमार्थक जो सुभा त्याकडेस, ऐवज, इ० जमा करणें, जाणें, इ० कांचें वि०.

**सुभाजन**, ३लिं० कों० पुरतेपणी भाजला जो पापड, धान्य, इ० कांहीं भक्ष्य पदार्थ तो.

**सुंभाडी**, स्त्री० सुंभाच्या जो बंधना ग्रुपयोगी तुकडा ती.

**सुभानु**, पु० साठ संवत्सरांतील सत्रावा जो संवत्सर तो.

**सुभावणा**, ३लिं० आकारादिकें करून शोभिवंत जो पदार्थ तो.

**सुभाषित**, न० लौकिक व्यवहारायुपयोगी दृष्टांत द्राष्टांतादिरूप जो श्लोक, वाक्यादिकांचा समुदाय तें.

**सुभिक्ष**, न० धान्यादि पदार्थांची जी सवंगाई तें.

**सुंभेकरी**, पु० सुंभ्यानें दगड फोडण्याचें काम करितो तो.

**सुभेदार**, पु० सुभ्याचा जो अधिकारी तो; २, पलटणांतील जमातदारांवर जो अधिकारी असतो तो.

**सुभेदारी**, स्त्री० सुभेदाराचें जें कर्म किं० अधिकार ती.

**सुमंत**, पु० अष्टप्रधानांतील एक प्रधान आहे तो.

**सुमन**, न० सं० पुष्पमुख्यार्थी; २, पु० इंद्रादि देवांची संज्ञा.

**सुमनुष्य**, पु० भला सज्जन जो मनुष्य तो.

**सुमार**, पु० हें इतकेंच आहे, अमुकतें हेंच, हें अमुकच आहे, अशाप्रकारें निश्चित न होतां किंचिदंतर विशिष्ट जें कोणेक अर्थाचें मनांत स्वरूप येतें तो, सुमारानें सांगणें, बोलणें, इ० स्थलीं त्या त्या अर्थाचा सुमार अनुलक्षून बोलणें, सांगणें, असा अर्थ; २, कोणेक अर्थाचें उपलक्षक लें करून विवक्षित जो वृक्ष, पर्वत, श्लोक, इ० कोणेक अर्थ तो आपल्या आसपासचे प्रदेश सुद्धां; उ० त्या झाडाचे सुमारास त्याचें घर आहे; ३, संख्या, परंतु सुमारी जिन्नस लिहिण्याचे प्रसंगी प्र०; उ० अंबे सुमार शंभर.

**सुमारमाफक**, ३लिं० सुमाराचा.

**सुमाराचा**, ३लिं० विवक्षानुरूप चांगला नव्हे किं० विवक्षानुरूप पुरता झाला नाहीं असा मध्यम प्रतीचा जो तो; उ० हें सोनें कांहीं चांगलें म्हणायाचें नव्हे सुमाराचें आहे; उ० भात

त सुमागच्या शिजला ह्मणजे खालीं उतरावा मग अपाप पुरता शिजतो.

**सुमारी**, ३लिं॰ व्यक्तींची संख्या करून घावयाच्या घ्यावयाच्या असा जो फलें, गुरें, इ॰ पदार्थ तो; २, स्त्री॰ सुमार प्रथम तृतीयार्थी.

**सुमार्ग**, पु॰ कुमार्गाच्या प्रतिपक्षी.

**सुमुहूर्त**, पु॰ प्रयाणायुपयोगी ग्रहबलादिकें करून उत्तम प्रकारच्या जो मुहूर्त तो.

**सुयटा, सुयटी**, पु॰ स्त्री॰ द्वितीयार्थक जी लहान सुई ती.

**सुयरणें**, कों॰ केळीची सूय बाहेर न पडवयाजोगा तीस एक विकार होत असतो तद्विशिष्ट तीणें होणें.

**सुयरा**, पु॰ कों॰ सुयटी.

**सुयारणें**, कों॰ सुयरणें.

**सुयुक्त**, ३लिं॰ उत्तम प्रकारचें यथायोग्य जें भाषण, लेख, इ॰ व्यापार तो; २, तादृश भाषणादिकर्ता जो मनुष्य तो.

**सुर**, पु॰ सं॰ देव.

**सुरई**, स्त्री॰ तलवारे सारिखें एक हत्यार आहे; २, प्यावयाचें पाणी ज्यामध्यें थंडर हावें कोठें बरोबर नेतां यावें ह्मणून ठेवीत असतात असें मा॰ जस्ताचें चंबूसारखें उंच गळ्याचें एक पात्र आहे; ३, ३लिं॰ उकडे नव्हेत असे जे तांदूळ ते, उकडे तांदळांचा प्रतिपक्षित्वेंकरून प्र॰; ४, लवंगा, वेलदोडे, जायफळ, जायपत्री, केशर, इ॰ रूप उंची जीं औषधें तीं प्र॰.

**सुरकण, सुरकन, सुरकर, सुरदिन, सुरदिनी, सुरदिशीं**, अ॰ नळा, चिचोंद्री, इ॰ कांच्या जळणें, इ॰ शब्दाचें अनुकरण, नळा उडणें, चिचोंद्री जळणें, पाण्यांत सुरकांडी मारणें, इ॰ कांचें वि॰.

**सुरकांडी**, स्त्री॰ मत्स्याकार शरीर करून वेगानें पाण्यांत मारितात जी सरळी ती, दाटी इ॰ कामध्यें शिराया करितां मुखावयव कांहीं पुढें करून शरीराकुंचन पूर्वक धरिली जीस वेगगति ती; २, मारणें, प्र॰.

**सुरकुतणें**, वस्त्र, चर्म, इ॰ कानें सुरकुत्यानी विशिष्ट होणें.

**सुरकुती**, स्त्री॰ वस्त्र, चर्म, शरीर, इ॰ कांची विवक्षित सफाई बिगडायाजोगें त्यांजवर आकुंचनादि कारणानें जे चुणी सारखे आकार होतात ते प्र॰.

**सुरक्या**, पु॰ गंजिफा खेळत्ये समयीं ज्याचियापासून खेळाचा प्रारंभ होतो तें चित्र तो; २, रा॰ वाजंत्र्यांतील जो सूर वाजविणारा तो.

**सुरखाई**, स्त्री॰ वस्त्रादि निष्ठ जो तांबडा रंग त्यामध्यें शोभादायक जो तेजोंश असतो ती.

**सुरख्या**, पु॰ सुरक्या.

**सुरंग**, पु॰ सुरुंग; २, स्त्री॰ रा॰ एक झाड आहे.

**सुरंज**, पु॰ रंगाचे उपयोगी एक पदार्थ आहे

**सुरंजी**, ३लिं॰ सुरंजाचे रंगानें रंगिवलेलें जे खारवा, इ॰ वस्त्र तो.

सुरंट, सुरट, न॰ दे॰ सुरवेंट.

सुरण, पु॰ सूरण.

सुरत, स्त्री॰ रूपद्वितीयार्थी; २, न॰ सं॰ मैथुन.

सुरती, ३ लिं॰ सुरत म्हणून शहर आहे तत्सं-बंधी जो मोती, रुपया, मोहोर, वस्त्र, शस्त्रादि, पदार्थ तो.

सुरतीएरंड, पु॰ एरंडाचे झाडांत एक भेद आहे.

सुरदास, पु॰ हरिदास, इ॰ कांचे मागें स्वर देणारा असतो जो त्यास म्ह॰.

सुरनदी, स्त्री॰ भागीरथी.

सुरनीस, पु॰ राजकीय एक अधिकारी आहे; २, रा॰ सुरदास.

सुरपणें, क्रि॰ सांठवून ठेवलेलें भात आंत भुरकी पडल्या मुळें फोला सारखें हलकें होणें.

सुरपारंब्या, स्त्री॰ वृक्षावर चढून खेळायाची एक मुलांची क्रीडा आहे; अनेकवचनीं प्र॰.

सुरफाटणें, उरफाटा झाला जो कोणेक अर्थ त्यास सुरफाटा करणें.

सुरफाटा, ३ लिं॰ सुफराटा.

सुरबंद, स्त्री॰ औषधोपयोगी एक झाड आहे.

सुरमा, पु॰ शरीरावर शिंबें म्हणून रोग होत असतो तो; २, डोळ्यांत घालायाचे उपयोगीं एक अंजन आहे तो.

सुरमाड, पु॰ ताडा सारखा एक वृक्ष आहे जास भेरळ, म्ह॰.

सुरमी, स्त्री॰ अन्न आम्ररस, इ॰ अतृप्त भक्षिलें असतां त्याचा मद शरीरांत चढूं लागला म्हणजे निजावेंसें वाटाया जोगा जो विकृति विशेष होतो ती.

सुरवंट, पु॰ सुरवेंट.

सुरवा, पु॰ दे॰ केळ, इ॰ झाडांची जी सुई ती.

सुरवात, स्त्री॰ कोणेक कर्माच्या जो आरंभ ती.

सुरवार, स्त्री॰ पायजम्यांत एक भेद आहे.

सुरवारीहिरडा, पु॰ हिरड्यांत एक भेद आहे.

सुरवेंट, पु॰ एक क्षुद्र प्राणी आहे जाचे आंगावर केंस बहुत असतात जे केंस कोणाचे शरीरास लागले असतां गांधी येऊन खाज सुटत्ये तो.

सुरस, ३ लिं॰ उत्तम आहे रस जामध्यें असें जें काव्य, भाषण, गाणें, इ॰ तो.

सुरसा, पु॰ खिळ्यांत एक भेद आहे, जास दोहों बाजूनें अण्या असतात.

सुरसुरणें, चिचोद्री, नळा, इ॰ दारवेचा पदार्थांनीं अग्निसंयोगानें सुरसुर वाजणें; २, वाय्वादि विकृती मुळें शरीरावयवानीं सुरसुरीनें युक्त होणें.

सुरसुरी, स्त्री॰ सुरमी; २, दे॰ दारवेचे चिचोंद्रींत एक भेद आहे.

सुरसूर, स्त्री॰ वाय्वादि विकृतीनें शरीरांत मुंग्या आल्या सारखें वाटाया जोगा एक विकृति विशेष

विशेष होत असतो तो;२,अ० चिर्चोंदी,इ० उडणें, इ० शब्दाचें अनुकरण.

**सुरसोटा**, पु० शुद्ध सोट्याचे आकारासारिखा एक विणा करित असतात तो.

**सुरळी**, स्त्री० कागद,वस्त्र,इ० कांची जी केली वळकटी तीस प्रसंग विशेषीं ह्म०.

**सुरळीत**, ३लिं० ज्यामध्यें खचरटपणा नदी, नाले,इ० अडचणी नाहींत असा जो मार्ग तो;२,रीति वक्रोक्ति,गूढार्थ,दांडगाई,इ० जीत नाहींत असा जो श्लोक,वाक्य,भाषण, ग्रंथ,मनुष्य,इ० तो;३,अ० मध्यें कांहीं विघ्नादि नहोतां किं० व्यवहाररीति,इ० नमोडितां यथास्थितपणें, कांहीं एक कृत्यादि चालणें,किं० कोणेकाने वर्तणें,इ० कांचें वि०.

**सुरक्षित**, ३लिं० विवक्षित नाशादि नहोतां यथास्थितपणें विद्यमान जो तो.

**सुरा**, स्त्री० सं० मद्य;२,पु० मोटा जो सुरी तो.

**सुरारवार**, पु० सुऱ्यारवार.

**सुरी**, स्त्री० फळादि कापणें, चोया करणें,पानें कापणें,इ० उपयोगी एक शस्त्र आहे; ह्म० घेसुरी आणि घाल उरी.

**सुरुंग**, पु० खडक फुटावा ह्मणून दारू भरावा साठीं त्यास जें भोंक पाडितात तो;२,भूमीतून गुप्तपणें आण्या येण्या करितां जो मार्ग करितात तो.

**सुरू**, पु० एक झाड आहे;२,३लिं० आरंभ विशिष्ट झाला जो कोणेक व्यापार तो; उ० गाणें सुरू झालें;३,दे० सुरूखुरू.



**सुरूख**, पु० दे० सुरक्या.

**सुरूखुरू**, ३लिं० चोरी,चहाडी,लबाडी,इ० वाईट,कर्मे करून तीं कर्मे आपण केलीं नाहींतच असें दाखवून अलिप्तपणें लोकामध्यें वागणारा जो मनुष्य तो,ह्म० सुरूखुरू सापिका आणि नकटाति रूका.

**सुरूचा**. ३लिं० सुरूचे वृक्षाचे आकाराचा जो स्तंभ समयी इ० पदार्थ तो.

**सुरूदार**, ३लिं० सुरूचा.

**सुरूप**, ३लिं० कुरूपाचा प्रतिपक्षी.

**सुरेख**, ३लिं० नीट नेटका सुंदर जो पदार्थ तो.

**सुरेखाई**, स्त्री० सुरेखपणा.

**सुरेखी**, स्त्री० दे० सुरेखाई.

**सुऱ्यारवार**, पु० सोरा ह्मणून जो ग्वार तो.

**सुलटा**, ३लिं० उलट्याचा प्रतिपक्षी.

**सुलतानी**, स्त्री० राजादि कृत जो देशादिकांस उपद्रव होतो ती, याचा,प्र० कागदी पर्वा.

**सुलभ**, ३लिं० दुर्लभाचा प्रतिपक्षी;२,करणे जाणणें,इ० कां विषयीं कठिन नव्हे जो तो.

**सुलक्षण**. न० दुर्लक्षणाचा प्रतिपक्षी;२, ३लिं० नहिशिष्ट जो मनुष्यादि तो.

**सुलक्षणिक**, ३लिं० सुलक्षणी.

**सुलक्षणी**, ३लिं० दुर्लक्षणीचा प्रतिपक्षी.

**सुलाख**, पु० सोनें,रुपें,इ० कांचे खरे खोटेपणाचे परीक्षे करितां त्यांस जी खिळा मारून खळी पाडितात ती.

सुलाखणें, सोनें, रुपें, इ॰ सुलाखानें युक्त करणें.

सुलाखी, ३ लिं॰ सुलाखानें युक्त जो रुपया इ॰ पदार्थ तो.

सुँवरा, पु॰ रा॰ सुयरा.

सुवर्ण, न॰ सं॰ ताम्रादि सकल धातूंमध्यें श्रेष्ठ एक धातु आहे तें; २, पु॰ न॰ सुवर्णाचें जें ऐंशी गुंजा रूप मान तो तें.

सुवर्णकार, पु॰ सं॰ सोनार.

सुवर्णपुष्प, स्त्री॰ न॰ स्वर्णपुष्प.

सुवर्णमालिनीवसंत, पु॰ एक रसायन आहे.

सुवर्णमाक्षिक, न॰ सं॰ सतेजस्क एक पाषाण आहे जो सोन्या सारिखा चकाकतो.

सुवर्णमुखी, स्त्री॰ सुवर्णमाक्षिक.

सुवर्णस्तेय, न॰ सुवर्णाचीजी चोरी तें.

सुवर्णस्तेयी, ३ लिं॰ सुवर्णस्तेय ज्याणें केलें आहे तो, जो पंचमहापातकी जे त्यांत गणित आहे.

सुवर्णाभिषेक, पु॰ विवाहामध्यें सुवर्णयुक्त जलानें वधूवरांस जो अभिषेक करितात तो.

सुवाच्य, ३ लिं॰ भ्रांतिकर नव्हे आणि मोकळें अतएव वाचायास सुलभ असें जें अक्षर तें किं॰ तसें अक्षर आहे ज्याचें असा ग्रंथ, पुस्तक इ॰ तो.

सुवास, पु॰ केशर, कस्तुरी, इ॰ पदार्थनिष्ठ जो उत्तम प्रकारचा वास तो.

सुवासिक, ३ लिं॰ सुवासविशिष्ट जो पुष्पादि पदार्थ तो.

सुवासित, ३ लिं॰ सुवासानें युक्त केला जो तो.

सुवासिनी, ३ लिं॰ जीचा पति विद्यमान आहे अशीजी स्त्री ती.

सुवाळा, पु॰ एक गलवतांत भेद आहे.

सुवेत, न॰ पूर्णमास होउन स्त्रियांचा होतो जो प्रसव तें.

सुवेर, पु॰ रा॰ सुएर.

सुवेरणें, रा॰ सुवेरानें युक्त होणें.

सुवेरतुला, ३ लिं॰ रा॰ सुएरतुळा.

सुशाक, ३ लिं॰ दुःशकाचा प्रतिपक्षी.

सुशिक्षित, ३ लिं॰ कोणेक कर्म करण्याची ज्यास शिक्षा चांगली आहे असा जो तो.

सुशी, स्त्री॰ एक प्रकारचें वस्त्र आहे.

सुशील, ३ लिं॰ उत्तम प्रकारचें आहे शील ज्याचें असा जो मनुष्यादि तो.

सुशोभित, ३ लिं॰ उत्तम प्रकारचे शोभेनें युक्त जो तो.

सुश्राव्य, ३ लिं॰ ज्याचे श्रवणानें आनंद होतो असें जें गाणें, भगवत्कथाश्रवण, इ॰ तो.

सुषुप्ति, स्त्री॰ सं॰ जागृति आणि स्वप्न या दोन अवस्थांहून तिसरी जी अवस्था जीमध्यें अंतःकरणवृत्तीचा अज्ञानांत लय झाल्यामुळें कोणत्याच विषयाची स्फूर्ति असत नाहीं ती.

सुषुम्ना, स्त्री॰ शरीरांतर्गत इडा आणि पिंगला या दोहों नाडींमध्यें एक नाडी आहे ती.

सुष्ट, ३ लिं॰ दुष्टाचा प्रतिपक्षी.

सुसकार, पु॰ सुसकारा.

सुसकारणें, कोणेकानें सुसकाऱ्यानें युक्त होणें.

सुसकारा, पु॰ सशब्द सवेग जो मुखानें बाहेर सोडि

ला उच्छ्वास तो.

**सुसंग**, पु॰ **सुसंगति**, स्त्री॰ सुजनादिकांची जी संगति ती.

**सुसंबद्ध**, ३ लिं॰ असंबद्धाचा प्रतिपक्षी.

**सुसर**, स्त्री॰ मनुष्यादिकांस मारणारा एक जलजंतु आहे; २, ३ लिं॰ वि॰ कों॰ वेड्यावांकड्या मार्गानें वागत असतां शासनादि युक्तींनी मार्गावर आणिला जो मनुष्यादि जीव तो.

**सुसह**, ३ लिं॰ दुःसहाचा प्रतिपक्षी.

**सुसाट**, पु॰ सुसाटा; २, अ॰ सशब्द सवेगपणें वायु, अश्व, इ॰ कांनीं जाणें, येणें, इ॰ कांचें वि॰.

**सुसाटा**, पु॰ वारा, जल, इ॰ कांचा जो सपाटा तो; २ वेगानें चालणारा जो वायु, जल, इ॰ त्यांचा जो शब्द तो.

**सुसाध्य**, ३ लिं॰ दुःसाध्याचा प्रतिपक्षी.

**सुस्त**, ३ लिं॰ सुस्ती प्रथमद्वितीयार्थानें विशिष्ट जो तो; २, कोणेक कार्य सुस्तीनें करण्याचा स्वभाव ज्याचा तो किं॰ त्याचा तो कारभार इ॰ तो; सुस्त निजणें, सुस्त बसणें, इ॰ स्थलीं असमाधानादि कारणामुळें जी हालचाल तद्रहित निजणें इ॰.

**सुस्ता**, ३ लिं॰ दे॰ सुस्त द्वितीयार्थी.

**सुस्ताई**, स्त्री॰ सुस्तपणा.

**सुस्तावणें**, कोणेकानें सुस्तीनें युक्त होणें.

**सुस्ती**, स्त्री॰ आलस्य; २, दहीं, आम्ररस, इ॰ पदार्थ भक्षिल्यानें शरीरांत शैत्य होउन उद्योगाविषयीं हस्तपादादिक त्वरेनें न उठायाजोगी जी जडतारूप विकृति होते ती; ३, कोणेक कामाविषयीं आलस्यादि कारणानें त्वरा न करितां मंदपणें करण्याचा जो प्रकार ती.

**सुस्थल**, न॰ उत्तम जें स्थल तें.

**सुस्वर**, ३ लिं॰ कार्कश्य, अपस्वर, इ॰ दोषरहित असें जें गाणें, म्हणणें, इ॰ तो; २, स्त्री॰ रा॰ सुसर प्रथमार्थी.

**सुहागी**, स्त्री॰ स्वागी.

**सुहृद्**, पु॰ सखा.

**सुहृत्संबंधी**, पु॰ सखासोयरा.

**सुहेर**, पु॰ सुएर.

**सुहेरणें**, न॰ सुवेरणें.

**सुहेरतुला**, ३ लिं॰ सुएरतुला.

**सुळ**, —, कण, —कन, —कर, —दिन, —दिनी, —दिशीं, अनु॰ सुळसुळीत पदार्थावरून पाय इ॰ सरणें किं॰ सुळसुळीत पदार्थ हस्तादिकांतून गळणें, निसटणें, सुटणें, उडणें, इ॰ वि॰.

**सुळका**, पु॰ क्रमानें सूच्यग्र होत गेलेला जो पर्वतादिकांचा शृंगादिरूप अवयव तो; आडवा विस्तार जाला फार नाहीं असा फार उंच जो वृक्ष त्यास म्ह॰.

**सुळकी**, स्त्री॰ खुंटी, मेख, इ॰ कांस बारीक जें सूच्याकार अग्र असतें ती.

**सुळकंबा**, **सुळकुंबा**, पु॰ बैलगाडाचे कणेकडाचे खालीं आंत तुंब भरून जो सूच्यग्र स्तंभ फिरायाजोगा उभा केला असतो तो; २, सुळका.

**सुळखांब**, **सुळखुंबा**, पु॰ सुळकंबा.

**सुळा**, पु॰ ज्याला अणी असते असा जो मनुष्य. हत्ती, डुकर, व्याघ्र, मार्जार, सर्प, इ॰ कांचा दंत तो;

तो; २, गमन करण्यास समर्थ पायांस खुपायाजोगे जे खडे, खुंटाळे, इ० ते प्र०; ३, एक क्षुद्र प्राणी आहे जो महिष्यादि पशूंचे अंगावर गोचिडासारखा पडत असतो तो; ४, कसई म्हणून एक जातीचें तृण आहे त्याचें जें बीज तो; ५, मोटेचें चाक ठेवायासाठीं जे विहिरीचे कांठावर दोन खांब झुकते उभे केले असतात ते प्र०.

सुळावरचीपोळी, स्त्री० यथास्थितपणें निभावलें असतां बरें नाहींतर सर्वस्वनाशादिक मोठ्ये संकटाची संभावना ज्यांत आहे असें जें कांहीं एक अवघड कर्म त्यास म्ह०; उ० मृगसालींगलवतांत वसून आणें हें सुळावरची पोळी.

सुज्ञ, ३ लिं० शास्त्रादि परिचयें करून जें विशेष ज्ञान येत असतें तें आहे ज्यास तो.

सू, स्त्री० सुई; २, ३ लिं० ज्यानें जो प्रसवतो तो तत्सू; उ०; वीरांतें प्रसवते ती वीरसू किं० विश्वसू.

सूकर, पु० सं० डुकर.

सूक्त, भाषणादि अर्थाविषयीं बरें आणि वाईट अशा ज्या दोन कोटी त्यामध्यें बरें ही जी कोटि ती विषयीं प्र०.

सूचक, ३ लिं० सं० कोणेक अर्थातें सुचविणारा जो मनुष्य किं० कांहीं चिन्ह इ० तो; २, पु० चहाडखोर.

सूचन, न० सूचना, स्त्री० कोणे काला कोणेक अर्थ सुचविण्याचा जो व्यापार तें ती.

सूचवणें, सुचवणें.

सूचित, ३ लिं० सूचविला जो तो.

सूची, स्त्री० सं० सुई प्रथमार्थी; २, अमुक प्रभावर अमुक पंक्तीस अमुक प्रकरण आहे हें समजायाकरितां केली असते जी अनुक्रमणिका ती; ३, जो जो अर्थातें सुचवितो तो तत्सूची; उ० हर्षातें सुचवितो तो हर्षसूची, भाग्यसूची, इ०.

सूचीकटाहन्याय, पु० केवळ लहान आणि अति मोठें अशीं दोन कामें युगपत्प्राप्त झालीं असतां लहान काम आगोदर करून टाकावें असे अर्थाविषयीं दृष्टांतत्वें करून घेतात जें सुई आणि कढई हीं दोन घडायाचीं असतां सुई आधीं घडतात असें जें एक लोकव्यवहाररूप प्रमाण तो.

सूच्यग्र, ३ लिं० सुईचे अग्रासारिखा क्रमानें बारीक होत गेलेला जो शिखा, इ० पदार्थ तो.

सूज, स्त्री० जलोदरादि रोगामुळें किं० आघातादि कांहीं निमित्तानें रक्तास विकार होउन शरीरास किं० शरीरावयवांस येतो जो विलक्षण जाडेपणा ती.

सूट, स्त्री० देणें घेणें, इ० व्यवहारांत न्यायतः कूळ, इ० कांकडून घ्यावयाचें जें द्रव्यादि ते देणाराचे नातवानी इ० कारणामुळें सर्व न घेतां त्याचे कांहीं अंशाविषयीं करितात जी माफी ती; आणि न घेतां सोडितात जो तो द्रव्यांश ती; २, स्वत्वसंबंधाक्रांत जे दासी, दास, इ० त्यांवरील स्वत्व निरास करून त्यांस स्वतंत्रपणें वागण्याविषयीं देतात जी मोकळीक ती; ३, कों० एक पंक्त्यादि कांचाठायीं सन्निविष्ट जे अनेक पदार्थ त्यांस परस्परें मध्यें असतें जें अंतर ती.

सूटसाट, सूटसांड, स्त्री० सूट, इ०.

सूड, पु॰ चुकलेला, हारवलेला, इ॰ रूप जो कोणेक अर्थ त्याचा त्या त्या प्रकरणादिकांचें अनुक्रमानें चालन केल्यानें लागतो जो शोध तो; सूड घेणें उगवणें ह्म॰ कोणेकानें आपला केला जो अपकार तो प्रतिक्रिया द्वारा फेडणें; २, रा॰ ढोल, इ॰ वाद्य वाजवूं लागल्यापासून मध्यें अवसान घेई तोंपर्यंत वाजविण्याचा जो व्यापार तो, मारणें धातू॰ योगीं प्र॰; ३, मध्यें अवसान किं॰ कार्यांतर न घेतां सतत कांहीं एक काम करण्याचा जो प्रकार तो.

सूडबंद, पु॰ अनेक कलमांचे सूड जाजवर लिहिले असतात असा जो कागद तो.

सूत, न॰ वस्त्रादिकांचे उपयोगी कापुस, रेशीम, लोंकर, इ॰ सुवर्णादि धातु किं॰ लारन, इ॰ कांचा जो तंतु तें, परंतु कापसाचे तंतूवर विशेषेंकरून प्र॰; उ॰ रेशमाचें सनगापेक्षां सुताचें सनगास उबफार असतें; २, ला॰ कांहीं एक कार्यसाधनार्थ कोणेकाचें कोणेकाशीं असतें जें संधान तें; ३, फलादिकांचा ठायीं बारीक पडतात जे कृमि ते प्र॰; कोणेकानें सुतानें स्वर्गास आणणें ह्म॰ कोणेक विषयाचा यत्किंचित् अंश समजल्यानें बुद्धिबळें करून त्या सर्व विषयातें जाणणें; कोणेक मनुष्य व्यवहार इ॰ कानें सुतास लागणें ह्मणजे सुरळीतपणें चालाया जोगें सोईस लागणें; ४, पु॰ राजादिकांपुढें स्तुतिपाठ, सारथ्यकर्म, इ॰ करणारी अशी एक पुराणप्रसिद्ध मनुष्यांत जाति आहे; ५, सारथि; ६, पारद.

सूतक, न॰ सं॰ सुहेर; २, ग्रहणसंबंधी जें आशौच त्यास ह्म॰.

सूतकी, ३लिं॰ सं॰ सूतक आहे ज्यास तो.

सूतरनाल, स्त्री॰ सुतरनाल.

सूतरस्वार, पु॰ सांडणिस्वार.

सूतिका, स्त्री॰ बाळंतीण.

सूतशेखर, पु॰ एक रसायन आहे.

सूत्र, न॰ कार्पासादिकांचा जो तंतु तो; २, यंत्रादिकांचा ठायीं त्याचा चलनादि व्यवहार विवक्षानुरूप व्हावयासाठीं युक्तीनें लाविले असतात जे सूत्रादिरूप अवयव ते प्र॰, आणि त्या यंत्रादि व्यवहारास उपजीव्य जा युक्ति त्या प्र॰; ३, कोणेक कार्य विवक्षानुरूप सहज अनायासें व्हावें ह्मणून त्या त्या अधिकरणीं युक्तीनें जो पूर्वीं योजना विशेष करून ठेविला असतो तें; ४, शास्त्रप्रवर्तकाचार्य जे त्याणीं त्या त्या शास्त्रविषयावर जो मूळग्रंथ रचिला असतो तें, आणि त्यांचीं जीं अवांतर वाक्यें तीं प्र॰.

सूत्रक, ३लिं॰ कोणेक काम सूत मारून केल्यासारखें नीटनेटकें सहज ज्याचे हातून घडतें असा जो मनुष्य आणि त्याचा हात लेखणी, इ॰ तो; २, सुती जें यंत्र, भिंत, इ॰ काम तो.

सूत्रधार, पु॰ नाटकाची नांदी झाली ह्मणजे नाटककथेचा प्रसंग आणायाकरितां जें सोंग येतें तो; २, सूत्रधारी.

सूत्रधारी, पु॰ कळसूत्री बाहुलीं, इ॰ कांचा चलनवलनादि विषयीं कारण जीं गुप्त सूत्रें असतात तीं हातीं धरून चालन करितो तो; २,

सूत्रा, ३ लिं॰ सूत्रक.
सूत्री, ३ लिं॰ सूत्रा.
सूदकल्याण, पु॰ गानाचेरागांत एकभेद आहे.
सूने, स्त्री॰ पुत्र किं॰ पुत्रस्थानी जोपुतण्या, इ॰त्याची जी स्त्री ती.
सूना, स्त्री॰ सं॰ झाडणें, कांडणें, दळणें, चूलपेटवणें, पाणीभरणें, हीं जीं गृहकृत्यें त्यांचाठायीं प्रत्येकीं कीटपतंगादिक जीवांचा हिंसा घडतात त्या प्र॰.
सूनु, पु॰ सं॰ पुत्र.
सूप, न॰ (शूर्प॰) धान्यपाखडणें इत्यादुपयोगी वंशादिकाचें पात्र आहे; विवाहादिकांतसूपफडफडणें किं॰ वाजणें ह्मणजे मंडपोद्वासन होउन त्यासमारंभाची समाप्ति होणें.
सूय, स्त्री॰ सुई.
सूर, पु॰ स्वर प्रथम द्वितीयार्थी; २, सनई, पेवा, इ॰ वाद्यें समस्वरांवर वाजत असतां त्यास्वरांचें सामान्यस्वरूप धरून जें सतत एकसारखें वाद्य वाजत असतें तो; ३, स्त्री॰ कों॰ सुराशब्दाचा अपभ्रंश.
सूरकरी, पु॰ गाणारांचेमागून स्वरपूरण करणाराजो तो.
सूरण, पु॰ सं॰ एककंद आहे.
सूरसन्न, पु॰ न॰ हिं॰ वर्तमानकालीनजो शकतो तें, परंतु यवनीशकाविषयीं फागदोपत्रींप्र॰.
सूर्य, पु॰ ज्याचे उदयास्तानें दिवसरात्र होतात असाजो सर्वग्रहांत श्रेष्ठग्रह आहे तो; सूर्यकिरण, सूर्यप्रकाश, सूर्यमंडल, इ॰ स॰; ल॰ सूर्यापुढें काजवात; सूर्यापोटीं शनैश्वर.
सूर्यकन्या, स्त्री॰ संकेतानें भाकरीस ल॰.
सूर्यकमळ, न॰ कमळांत एक जाति आहे.
सूर्यकमळी, स्त्री॰ एकफुलझाड आहे.
सूर्यकांत, पु॰ एकतेजस्वी स्वछ पाषाण आहे जो सूर्यस्थानीं पूजित असतात आणि सूर्यकिरणाचे संयोगानें ज्यापासून अग्नि उत्पन्न होतो तो.
सूर्यकांती, ३ लिं॰ सूर्यकांत पाषाणाचा आरशी इ॰ जो पदार्थ तो.
सूर्यखार, पु॰ सुर्याखार.
सूर्यग्रहण, न॰ सूर्यास लागतें जें ग्रहण तें.
सूर्यनक्षत्र, न॰ सूर्यानें अधिष्ठित जें सत्तावीस नक्षत्रांतील नक्षत्र तें.
सूर्यनारायण, पु॰ देवताबुद्धीनें सूर्यास ल॰.
सूर्यपर्व, न॰ सूर्यग्रहण, व्यतीपात, सूर्यसंक्रांत, अमावास्या, इ॰ जीं पर्वें तीं प्र॰.
सूर्यपुट, न॰ औषधादिपदार्थ स्वल्पदिवस उन्हांत तापत ठेवावा असाजो त्यास तापनसंस्कार करितात तें.
सूर्यपुटी, सूर्यपुठी, ३ लिं॰ सूर्यपुटाकें संस्कृत जो औषधादिपदार्थ तो.
सूर्यपूठ, न॰ सूर्यपूट.
सूर्यफूल, न॰ सूर्यकमळीचें जें फूल तें.
सूर्यवंश, पु॰ सूर्यापासून झालेला असा एक पुराणप्रसिद्ध राजवंश आहे.
सूर्यवंशी, ३ लिं॰ सूर्यवंशांत उत्पन्न जें तें प्र॰; २, ला॰ सूर्योदयोत्तर जागृत होउन उठण्याचा स्वभाव ज्याचा असा जो मनुष्य त्यास ल॰.

**सूर्यविकासी**, ३लिं॰ दिवसास विकसित असावें आणि रात्रीं मिटावें अशा स्वभावाचें जें कमलादि तो.

**सूर्यसंतान**, न॰ कोणेकाचे पोटीं उत्पन्न होतें जें कुसंतान तें.

**सूर्याचें झाड**, न॰ सूर्यकमळी.

**सूळ**, पु॰ शूळाचा अपभ्रंश; चढायास कठिण असा फारउंच जो डोंगर, वृक्ष, इ॰ त्यास म्ह॰.

**सूक्ष्म**, ३लिं॰ बारीक; सूक्ष्म दृष्टि, सूक्ष्म बुद्धि, इ॰स॰.

**सूक्ष्मदर्शी**, **सूक्ष्मदृष्टि**, ३लिं॰ कोणेक विषयाचा बारीक विचार, मर्मांश, इ॰ पाहाण्याविषयीं समर्थ आहे दृष्टिजाची तो.

**सूक्ष्मदेह**, पु॰ लिंगदेह.

**सूक्ष्ममान**, न॰ यत्किंचित् हीजांत अंतर नाहीं असें स्पष्टजें कालादिकांचें मान तें.

**सृक्किणी**, स्त्री॰ ओष्ठप्रांताचा वाचक संस्कृत सृक्किन् शब्द नपुंसकीं आहे त्याचें हें द्विवचन, हा शब्द त्याच अर्थीं स्त्रीलिंगीं अनेकवचनीं लोकांत प्र॰.

**सृगाल**, पु॰सं॰ कोल्हा.

**सृष्ट**, ३लिं॰ कोणेकानें उत्पन्न केला जो कोणेक अर्थ तो.

**सृष्टि**, स्त्री॰ ब्रह्मदेवादिकानीं केलीजी सर्व जगाची किं॰ जगदंतःपाति पदार्थांची उत्पत्ति ती; आणि त्याउत्पत्तीनें उत्पन्न झालें जें जग किं॰ तदंतःपातिपदार्थ ती; मनुष्यसृष्टि, भूतसृष्टि, इ॰ स॰

**सेक**, पु॰ भूम्यादिकांवर जलादि सद्रव पदार्थ शिंपडल्यानें त्याचा बिंदुशः होतो जो पात तो.

**सेकणें**, शेकणें.

**सेकाटा**, पु॰ शेकाटा.

**सेंग**, स्त्री॰ शेंग.

**सेगडी**, स्त्री॰ शेगडी.

**सेचन**, न॰ सिंचन.

**सेज**, स्त्री॰ न॰ शेज.

**सेट**, पु॰ शेट.

**सेटजी**, पु॰ शेटजी.

**सेटया**, पु॰ शेटया.

**सेण**, न॰ शेण.

**सेत**, न॰ शेत.

**सेतु**, पु॰ पूल.

**सेंदणें**, शेंदणें.

**सेंदाड**, न॰ शेंदाड.

**सेंदूर**, पु॰ शेंदूर.

**सेंदेलोण**, न॰ शेंदेलोण.

**सेना**, स्त्री॰ राजादिक जो नायक त्याचे पदरीं स्वार, पायदळ, इ॰ जो योधसमुदाय असतो ती.

**सेनापति**, पु॰ राजादिकानें आपल्ये सर्व सेनेवर जो अधिकारी करून ठेविला असतो तो.

**सेंपाक**, पु॰कों॰ सैंपाक.

**सेंपाकघर**, पु॰ सैंपाकघर.

**सेंपाकी**, पु॰कों॰ सैंपाकी.

**सेंपाकीण**, स्त्री॰ सैंपाकीण.

**सेपु**, स्त्री॰ शेपू.

सेंपूट, न॰ शेंपूट.

सेंबूड, पु॰ शेंबूड.

सेर, पु॰ शेर.

सेरा, पु॰ शेरा.

सेवक, पु॰ चाकर; २, लिं॰ कोणेक अर्थातें सेवणारा जो तो.

सेवट, पु॰ शेवट.

सेवणें, कोणेक अर्थातें सेवित करणें.

सेवन, न॰ ना अर्थाचा जो उपयोग तो त्यापासून आपणास घडे असें त्या अर्थाचें तन योग्य क्रिया द्वारा आत्मसंबंधांत जें धारण तें.

सेवा, स्त्री॰ चाकरीरूप जें कर्म ती; २, सेवन द्वारा घडतो जो अर्थाचा संबंध ती.

सेवाधर्म, पु॰ पिता, धनी, इ॰ कांची सेवा करावी हा च जो पुत्र, भृत्य, इ॰ कांचा धर्म तो.

सेवित, ३ लिं॰ सेवन केलें आचें तो.

सेवी, ३ लिं॰ जो जातें सेवितो तो त त्सेवी; उ॰ तीर्थातें सेवितो तो तीर्थसेवी, अरण्यसेवी, औषधसेवी, इ॰ स॰ प्र॰.

सेवेकरी, पु॰ देवाचा सेवेकरितां देवस्थानीं आवुन राहिला असतो जो तो.

सेव्य, ३ लिं॰ सेवावयास योग्य जें ईश्वर औषधादि पदार्थ तो.

सेव्यसेवकभाव, पु॰ सेव्य आणि सेवक यांचा जो परस्पर संबंध तो.

सेळी, स्त्री॰ शेळी.

सै, स्त्री॰ सई.

सैतान, पु॰ हिं॰ सर्व कर्मफलदाता जो ईश्वर त्याचा विरोधी असा एक कोणी आहे ह्मणून यवन लोक मानितात तो; २, पु॰ न॰ घोरकर्मा घोररूपी असा जो मनुष्य, पर्जन्य, वारा, इ॰ त्यास आरोपानें ह्म॰

सैती, स्त्री॰ हिं॰ एक आयुध आहे.

सैंधव, न॰ एक क्षार आहे आस सेंधेलोण ह्म॰; २, ३ लिं॰ सिंधुदेश संबंधी जो अश्वादि पदार्थ तो आणि समुद्र संबंधी जो जलमौक्तिक, इ॰ पदार्थ तो.

सैनापत्य, न॰ सं॰ सेनापतीचा जो अधिकार तें.

सैनिक, पु॰ सेना संबंधी जे सरदार, शिपाई, इ॰ ते प्र॰.

सैन्य, न॰ सेना.

सैंपाक, पु॰ भोजनार्थ भात, भाकर, पोळी, वरण, भाजा, इ॰ पदार्थ सिध्यर्थ करितात जी पाकक्रिया तो आणि त्या क्रियेनें सिद्ध झाला जो तो पदार्थ समुदाय तो.

सैंपाकघर, न॰ गृहामध्यें सैंपाकाकडे योजिलेलें जें स्थल असतें तें.

सैंपाकी, पु॰ सैंपाक करणारा जो पुरुष तो.

सैंपाकीण, स्त्री॰ सैंपाक करणारी जी स्त्री ती.

सैयद, पु॰ हिं॰ सय्यद.

सैरट, ३ लिं॰ अंतःकरणांत जशी लहर येईल तसें वर्तावें अशा स्वभावाचा छांदस जो तो; २, ज्याचे अंगीं लौकिक तारतम्य नाहीं अतएव काम करावें कोणतें, न करावें कोणतें, बोलावें काय, न बोलावें काय, इ॰ रूप जें संधान तें ज्याचे बुद्धींत नाहीं अशा स्वभावाचा जो तो; उ॰ कोण हा सैरटपणा अरे वाट चुकून चार कोस भलतीकडे गेलात रीं आला समजलें नाहीं.

सैरंध्री, स्त्री॰ गरतअसून श्रीमंत लोकांचे घरीं था बकांची वेणीफणी, पत्र्यालंकारादि रचना, इ॰ रूप कामकराया साठीं वेतन घेउन राहलेजी स्त्रीती.

सैरावैरा, अ॰ ग्रं॰ आला जिकडे वाटफुटेल तिकडे; सैन्यादिकानें भयादिकामुळें अनेक मार्गांनें संभ्रांतपणें जेंपळणें, धांवणें, इ॰ त्यांचें वि॰.

सैल, ३ लिं॰ शिथिल.

सैलावणें, बंधादिक पूर्वांपेक्षां सैल होई असें करणें.

सैली, स्त्री॰ गळ्यांत घालणें इत्याद्यर्थ सूत इ॰ कांचा हालासारिखा पदार्थ विणून त्याचा एकमाळे सारिखा पदार्थ विशेष करीत असतात ती.

सैंवर, न॰ स्वयंवर शब्दाचा अपभ्रंश.

सैसद, अ॰ रा॰ सनसय.

सोइरगत, स्त्री॰ कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो योनसंबंध ती.

सोइरा, पु॰ सोयरा.

सोइराधाइरा, पु॰ सोयराधायरा.

सोइरी, स्त्री॰ सोयरी.

सोइरीक, स्त्री॰ सोयरीक.

सोई, स्त्री॰ सोय.

सोईवार, ३ लिं॰ आमध्यें असावी तशी सोय आहे असाजो पदार्थ, व्यवहार, इ॰ तो.

सोईसार, ३ लिं॰ कों॰ सोईवार.

सोईस्कमार, पु॰ सोयस्कमार.

सोईसोईनें, अ॰ अशीअशी सोय होईल तसें तसें, देणें, घेणें, करणें, इ॰ कांचें वि॰

सोएर, पु॰ सुएर.

सोएरतुला, ३ लिं॰ स्कएरतुला.



सोंकटीं, सोकटी, स्त्री॰ सोंकटें.

सोंकटें, सोकटें, न॰ प्रा॰ लांबट स्कपारीचे आकाराचे क्रीडार्थ जे हस्तिदंत, काष्ठ, इ॰ कांचे पदार्थ करितात ते प्र॰; २, सभादिकांचे गर्मी उदकाउया रवांचाया करितां तदाकार जे काष्ठादिकांचे पदार्थ करितात ते प्र॰.

सोंकणें, सोकणें, संवकणें.

सोकरा, पु॰ मुलगा.

सोकरी, स्त्री॰ मुलगी.

सोकरें, न॰ मुलगें.

सोंकावणें, सोकावणें, सोंकणें.

सोंकील, सोकील, ३ लिं॰ कोणएकविषयीं जो संवकलेला असतो तो.

सोक्त, ३ लिं॰ गंजिफाचे खेळांत वाटपानांतून एकहीपान दुसऱ्याचे हातांत राहिलें नाहीं असा जो रंग होतो तो.

सोख, पु॰ शोष.

सोखणें, शोषणें.

सोंग, न॰ तमाशा इ॰ कांमध्यें कोणएकाचा धरितात जो वेष तें आणि तादृशवेषविशिष्ट जो मनुष्य तें; २, कपटानें धरिलेंजें दरिद्री, दुखणेकरी, इ॰ कांचें कोंग तें; म्ह॰ वेडीचें सोंग घेतलें म्हणजे पाटांव फाडला पाहिजे; आ॰ लोकविलक्षण आचार, वेष, इ॰ कानीं युक्त जो मनुष्यादि त्यास तसेंच विशेषशोभा, डौल, इ॰ दिसावें हें मात्र कदाचित् प्रयोजन असेल तर असो परकरु आचें कांहीं प्रयोजन नाहीं आचे योगानें उगीच अडचण वालगील इ॰ मात्र होतें असें अविवक्षित

जें कांहीं त्यास ल० .

सोंगटी, स्त्री० सोंकटी.

सोंगटें, न० सोंकटें.

सोंगसंपादणी, सोंगसंपादनी, स्त्री० जें सोंग आणलें त्याची यथायुक्त जी संपादणी.

सोंगळ, ३ लिं० मलिनपणा, दुसऱ्यांचें उच्छिष्टभक्षण, अस्पृश्यपदार्थांचा स्पर्श, इ० कांविषयीं आसफारखंत असते अशा स्वभावाचा जो तो.

सोगा, पु० नेसलेल्या किं० अंगावर घेतलेल्या धोतर, शेला, इ० वस्त्राचा लांबत रूहला असतो जो अवयव तो.

सोंगाडी, पु० तमाशा, इ० कांत अनेक सोंगें घेतो तो; २, ३ लिं० आंगीं तादृश दुःख दारिद्र्य इ० नसतां बाहेर लोकांस कोंग दाखविण्याच्या स्वभावजाच्या तो.

सोंगाड्या, पु० ३ लिं० सोंगाडी.

सोंगाढ्या, ३ लिं० सोंगाडी द्वितीयार्थी.

सोंगी, ३ लिं० सोंगाढ्या.

सोंग्या, ३ लिं० सोंगी.

सोजी, स्त्री० भांडयांत तांदूळ फोडणीस टाकून किं० भाजून शिजवून जो उपहारार्थ पाक करितात ती.

सोज्वल, सोज्वळ, ३ लिं० स्वच्छ निर्मळ जो कोणेक अर्थ तो.

सोट, पु० आडवा विस्तार विशेष न होतां एका कांडानें नीट उंच वाढत गेलेला जो मोठा आड वृक्ष तो किं० त्याकांडासारखें मोटें लांब सरळ जें लांकूड तो; २, ला० वरनीट उभा अतएव चढायास कठीण असा जो पर्वत, मनोरा, इ० तो; ३, शरीरानें धष्टपुष्ट असून विद्यादिगुणहीन किं० मुलें, बाळें, इ० खटलें आन्हे मागें नाहीं असा जो पुरुष किं० स्त्री० त्यांस ल० .

सोटगें, न० लहानसा जो हातीं धरायाचा सोटा तें.

सोंटा, सोटा, पु० गलकताची काठी, इ० धरावयाजोगें आड गोल लांब असें जें लांकूड तो; २, आयुधस्थानीं हातीं बाळगायाचें उपयोगी म्हणजे टाएवढा सरासरी जाड दोन तीन हात कमार लांब असें वाटोळें जें लांकूड तो; ३, गोमहिष्यादिकांचा प्रसवाचा पूर्वकालीं योनींतून शेंबडाचे लोढी सारखा जो धातुविशेषाचा अंश बाहेर पडतो तो.

सोटादुपट्टा, सोटादुपेटा, पु० एखादें वस्त्र, एखादें पात्र, इ० रूप थोडेंच जें कोणेकानें खटलें असतें त्यास ल० .

सोटेपान्हवण, न० पान्हवण घातलें तरी पान्हवत नाहीं उभें रहात नाहीं असें जें गुरूं त्याणें पान्हवाकें उभें रहावें म्हणून त्यास देतात जो सोटा, इ० कानें मार त्यास ल० .

सोटेबारदार, पु० आयुधरूपानें हातीं सोटा बाळगतो तो

सोटेबाजी, स्त्री० सोटयानीं जी मारामारी ती.

सोड, स्त्री० सूट द्वितीयार्थी; २, शिष्य, पुत्र, इ० प्रतिकूल वागूं लागला असतां त्यास शिक्षा करावी ती न करितां किं० आपणाशीं भांडूं लागला जो दावादादि कोणी त्या बरोबर भांडावें तें न करितां उपेक्षादि कारणामुळें त्याणी त्याशीं पाहिजे

[illegible]सें वर्तावें अशी त्यास देतात जी मोकळीक ती.

**सोंड**, स्त्री॰ शुंडा; २, ला॰ पर्वत, दरड, मेघपटल, इ॰ कांस जो गजशुंडाकार अवयव वाढला असतो त्यास ह्म॰; ३, नदीचा घाट, ओतें, इ॰ कांवर चढायाचा पायऱ्या, इ॰ कांचे बाजूस उतरती शुंडाकार जी बांदिस्त केली असते तीस ह्म॰; ४, आंत भरलेलें पाणी आंतून बाहेर पडतें असा जो मोटेचा शुंडाकार अवयव असतो ती.

**सोडगा**, पु॰ **सोडगें**, न॰ सोटगें.

**सोडचिटी**, **सोडचिठी**, स्त्री॰ आपल्या सत्तेंत राखून ठेवलेला जो गांव शेत, माल, किल्ला, दासी, इ॰ त्यांचे मोकळिकेविषयीं मीं आपल्या सत्तेंतून सोडला अशा अर्थाची जापक लिहून देतात जी चिठी ती.

**सोडण**, न॰ रा॰ चोड.

**सोडणें**, सुटे असें करणें.

**सोडन**, स्त्री॰ कोणेक पदार्थाची किंमत अनेकानीं मिळून अंशतः भरावी आणि केल्या संकेताप्रमाणें जाचेनावें तो पदार्थ निघेल त्या एकट्यानेंच तो घ्यावा अशा संकेताचा करितात जो व्यवहार ती.

**सोंडदोर**, पुं॰ पाणी काढायाचे मोटेचा सोंडेस जो ओढायाचा दोर लाविला असतो तो.

**सोडबांध**, स्त्री॰ अनेक वार सोडावें बांधावें असा जो व्यापार ती.

**सोडमुंज**, स्त्री॰ ब्रह्मचाऱ्यानें कमरेस बांधली असते जी मुंज ती सोडण्याचें एक संस्कार कर्म आहे.

**सोडवण**, स्त्री॰ कांहींएक नियम इ॰ कानें संबद्ध



जो कोणीएक त्यास त्याप्रमाणें वर्तवेनासें झालें असतां पश्चात् राश्रयणादिकें करून तें सोडण्याविषयीं असते जी मोकळीक ती.

**सोडवणी**, न॰ रा॰ शेलण्यानें शिंपलेलें किं॰ घागरीनें घातलेलें असें नव्हे पाटांतून वाहून जाउन भाजी, पाला, इ॰ जिन्नस लागत असतें जें पाणी तें.

**सोडवणूक**, स्त्री॰ कांहींएक प्रतिबंधापासून कोणेकाची जी सुटका ती; २, प्रतिबंधक जें कर्मादिक तेणेंकरून प्रतिबद्ध झालेला जो कोणी त्यास कांहीं कालमध्यें मोकळें व्हावयास साधनभूत जें कांहीं असतें त्यास ह्म॰; उ॰ माझा भाउ हा मला सोडवणूक आहे ह्मणून चार घटका विसावा घ्यावयास सांपडतो; जीवाला सोडवणूक ह्मणून कांहीं पदरीं पुण्य असावें नाहींतर निरंतर यमयातना भोगावी लागेल; ३, सोडवण.

**सोडवणें**, कोणाशीं संबद्ध झालेला जो कोणेक अर्थ तो त्यापासून सुटे असा कोणेकानें करणें; उ॰ विष चढेल असें समजून मणगटापासून पंजा सोडविला; उ॰ मी केवल बद्ध झालों नाहीं मिळालें तर देईन असें सोडवून ठेवलें आहे; २, रा॰ स्वशोभित दिसायाजोगें भित्यादिकांवर वेल, बूट, चित्रें, इ॰ काढणें.

**सोडसांड**, स्त्री॰ सूटसाट.

**सोडा**, पु॰ एक मत्स्य जाति आहे.

**सोँड्या**, ३ लिं॰ कों॰ सोंडेसारखा मुखावयव ज्यास असतो अशीं जीं मुरकुटें, टोळ, इ॰ त्यास ह्म॰.

सोड्याळ, ३ लिं॰ रा॰ कोणेकविषयावर अमंगलता, इ॰ दोष आढळल्यानें एकवेळ आलाओ वीट तो आले अंतःकरणांतून एकाएकी जात नाहीं असेंएव ज्याचें प्रसन्न अंतःकरणं करून तो तो सेववत नाहीं अशास्वभावाचा जो तो.

सोत, स्त्री॰ कों॰ गोमहिष्यादिकांचें जें निरण ती.

सोतरणें, सोताडणें, सोतारणें, कों॰ कोणएकानें कोणएकास यष्टि, इ॰ कानें ताडिन करणें.

सोंती, स्त्री॰ रा॰ सोत.

सोदणें, रा॰ सोधणें.

सोदर, ३ लिं॰ सहोदर.

सोदा, पु॰ साधुपणा, धनिकपणा, प्रामाणिकता, इ॰ रूप डौल बाहेर दाखवावा इ॰ अनेक कपटयुक्तीनीं दुसऱ्यास ठकवून आपलें कार्य करून घेणार जो तो किं॰ रांडबाजी, रव्यालतमाशा, इ॰ रूप असभ्यकर्मावर ज्याची निष्ठा असा जो तो.

सोदेगिरी, स्त्री॰ सोदेपणा.

सोदेशाई, स्त्री॰ सोदेगिरी; २, ३ लिं॰ सोद्यासंबंधी जें भाषण, रीति, डौल, इ॰ तो.

सोद्या, पु॰ सोदा.

सोधणें, शोधणें; परंतु पुस्तकादि शुद्ध करणें या अर्थावांचून; २, न॰ जलादिसद्रवपदार्थ गाळायाचे उपयोगीं जें वस्त्र केलें असतें तें.

सोधनें, न॰ सोधणें द्वितीयार्थी.

सोधा, पु॰ सोदा.

सोधेगिरी, स्त्री॰ सोदेगिरी.

सोधेशाई, स्त्री॰ सोदेशाई.



सोध्या, पु॰ सोदा.

सोनकळी, स्त्री॰ चांपकळी ह्मणून जें भूषण ती.

सोनकाव, स्त्री॰ कावेंत एक भेद आहे.

सोनकावळा, पु॰ कों॰ भारद्वाज ह्मणून जो पक्षी त्यास ह्म॰.

सोनकुला, ३ लिं॰ आवडीनें बोलायाचें असतां लहान मुलांस ह्म॰.

सोनकेतक, स्त्री॰ केतकींत एक जाति आहे जी चे पुष्पाचा वर्ण सोन्यासारिखा असतो ती; २, न॰ तीचें जें पुष्प तें.

सोनकेतकी, स्त्री॰ सोनकेतक प्रथमार्थी.

सोनकेवडा, पु॰ सोनकेतकीचें जें पुष्प तो.

सोनकेळ, स्त्री॰ एक केळींत जाति आहे; २, तीचें जें फल तें.

सोनकेळें, न॰ सोनकेळ द्वितीयार्थी.

सोनक्या, पु॰ सोनकुला.

सोनखत, न॰ शेत इ॰ कांस घालितात जें मनुष्यविष्ठाप्रधान खत तें.

सोनखात, न॰ पु॰ सोनखत.

सोनचडी, स्त्री॰ सोनचिडी.

सोनचांपा, सोनचांफा, पु॰ एक पुष्पवृक्ष आहे तो.

सोनचांपें, सोनचांफें, न॰ सोनचांप्याचें जें फूल तें.

सोनचिडी, सोन चेड, सोनचेडी, स्त्री॰ कोल्ह्याच्या तमाशांत उड्यामारणें, नाड्यावर चढणें, इ॰ खेळ करणाऱ्या जाल्या असतात त्यास ह्म॰.

**सोनजुई**, स्त्री॰ एक फुल झाड आहे.

**सोनटका, सोनटक्का**, पु॰ एक फुल झाड आहे; २, ग्रं॰ पूर्वी एक स्त्रवर्णाचें नाणें होतें; ३, सोनकुला.

**सोनताव**, पु॰ अश्वादिकांचे पायांस कांहीं दुःख झालें असतां तवा तापवून त्यावर त्याचा पाय ठेवून वरपाणी ओतावें म्हणजे जो त्याचे पायास चटका बसतो तो; २, ला॰ गालिप्रदानादिद्वारा कोणएकास देतात जो ताव तो.

**सोनपितळ**, स्त्री॰ न॰ पितळ म्हणून जी धातु तींत एक भेद आहे.

**सोनफक**, स्त्री॰ भातांत एक जाति आहे.

**सोनवर्णी**, न॰ दुखणेकरी, बाळंतीण, इ॰ कांस प्यावयाकरितां आंत सोनें घालून तापविलेलें किं॰ नसल्यास सोनें आंत बुडवून तसकेलेलें जें पाणी तें.

**सोनवेल**, स्त्री॰ एक भातांत जाति आहे.

**सोनसळा**, ३ लिं॰ पीतवर्ण जो गहूं तो; २, पिंगटवर्ण जे केंस ते प्र॰; ३, पीतवर्ण सळया ज्या जवर असतात असें जें लुगडें, खण, इ॰ वस्त्र त्याचें वि॰.

**सोना**, पु॰ सोनकुला.

**सोनामुखी**, स्त्री॰ भुइंतरवडाचा जो पाला ती; २, कों॰ स्त्रवर्णमुखी.

**सोनार**, पु॰ स्त्रवर्णादिकांचे अलंकारादि करणारी अशी एक जाति आहे; २, ला॰ चिकू जो त्यास म्ह॰; ३, एक सपक्ष स्त्रुद्र जंतु आहे; ४, एक पक्षी आहे.

**सोनारकी**, स्त्री॰ सोनारपणा.

**सोनारडा**, पु॰ सोनारास निंदेनें म्ह॰.

**सोनें**, न॰ स्त्रवर्ण प्रथमार्थी; उत्कृष्टतेंकरून ज्याचें वर्णन कर्तव्य असतें त्याच्याठायीं आरोपउपमा इ॰ प्रकारें प्र॰ करितात; उ॰ सोन्यासारखा दिवस उगीच फुकट कां घालवितां; कोणेकाचें सोनें होणें म्हणजे मरणोत्तर उत्तम परिणाम होणें; ग्रामादिकोणेक स्थलीं सोन्याचा धूर निघत असणें म्हणजे संपत्तीचा अतिशय असणें; २, विजयादशमीचे दिवशीं सीमोल्लंघन करून लोकांस वांटावयाकरितां आणितात जीं आपटा, शमी, इ॰ कांचीं पानें त्यांस म्ह॰.

**सोनेंनाणें**, न॰ सोनें, रुपये, इ॰ रूप जो विषय तें.

**सोनेरी**, ३ लिं॰ सोन्याचे जे वस्त्र, शाई, कलाबतू, बादला, इ॰ तो किं॰ तिहींकरून केला जो मुलामा, रंग, इ॰ तो किं॰ तेणेंकरून काढलेले वेल, बूट, इ॰ किं॰ तद्विशिष्ट कागद इ॰ तो.

**सोनेंबानें**, न॰ सोनें, इ॰.

**सोनेळ**, स्त्री॰ सोनकेळ प्रथमार्थी; २, न॰ सोनेळें.

**सोनेळें**, न॰ सोनेळीचें जें केळें तें.

**सोन्या**, पु॰ सोना.

**सोप**, न॰ केळ, चवई, यांचे आंगास जात्यचा असतात त्या प्र॰.

**सोपट**, न॰ सोपासच प्रसंगविशेषीं म्ह॰.

**सोपणें, सोंपणें**, संपणें; २, कोणेक व्यवहार किं॰ कांहीं एक खटलें याचे बरेवाइटाचा सर्व सें अधिकारी तूं असें म्हणून कोणेकाचे स्वाधीन

**सोपस**, ३लिं० स० आघात, उपोषण, शीत, उष्ण, इ० जें प्रतिकूल त्याचा ईषन्मात्र संबंध झाला असतां तत्काल म्लान होतो, मरतो, अशा देहस्वभावाचा जो प्राणी तो.

**सोपस्कर**, ३लिं० मुख्य अन्न गृह, इ० त्यांस विशेष रुचि, विशेष शोभा, इ० गुणाधायक जे त्याचे अंगभूत, साहित्यभूत, उपचारादि तद्विशिष्ट जो अन्नादि पदार्थ तो.

**सोपस्कार**, पु० अन्न, शरीर, गृह, इ० कांस विशेषरुचि याची, विशेष शोभा याची, ह्मणून जे अनेक प्रकारचे उपचार करितात ते.

**सोपा**, पु० घोडीं, गुरें, इ० बांधणें, तृण काष्ठादि ठेवणें, इत्यादि उपयोगी लांबट जो गृहास अवयव वाढविला असतो किं० तत्सदृश पृथक् बांधिलें असतें जें घर तो; २, ३लिं० सोपारा.

**सोपाट**, न० सोपट.

**सोपान**, न० सं० जिना, शिडी, घाट, इ० संबंधी जा पायऱ्या त्या प्र० तें.

**सोपारा**, ३लिं० करणें, आणणें, इ० विषयीं अवघड नव्हे तो.

**सोबकणें**, धुवायाचें वस्त्रादिकें एके अंगें धरून पाषाणादिकावर धाडधाड आपटणें; २, तद्वत् मनुष्यादिकांस आपटलें असतांही ह्म०.

**सोंबट**, ३लिं० दे० कोमट.

**सोबणी**, स्त्री० दे० भोजन करत्येसमयीं ताटांत घेतलेला जो पातळपदार्थ तोच हुंकडे न पसरावा ह्मणून ताटाखालीं एके अंगें लावायाकरितां आकार विशेषाचा काष्ठाचा पदार्थ केला असतो ती.

**सोबत**, स्त्री० संगत तृतीयार्थी.

**सोबतसंगत**, स्त्री० कोणत्यातरी प्रकाराची लहान मोटी, बरी वाईट, जी सोबत ती.

**सोबती**, पु० गमनादि कोणेक क्रियेच्याठायीं ज्याची ज्याला सोबत असत्ये तो त्याचा.

**सोबतीसंगती**, पु० कोणत्याही प्रकारचा जो सोबती तो.

**सोभत**, स्त्री० सोबत.

**सोभतसंगत**, स्त्री० सोबतसंगत.

**सोभती**, पु० सोबती.

**सोम**, पु० चंद्र प्रथमार्थी; २, एक लता आहे; ३, सोमयाग; ४, एक रोग आहे.

**सोमकांत**, पु० एक पाषाण आहे.

**सोमकांती**, ३लिं० सोमकांताचा जो आरशी, इ० पदार्थ तो.

**सोमट**, ३लिं० सोमाळा जो तो.

**सोमयाग**, पु० सोम ह्मणून जी लता तीचें हवन ज्यांत होतें असे जे यज्ञविशेष तें प्र०.

**सोमयाजी**, पु० सोमयाग ज्याणें केला आहे तो.

**सोमल**, पु० एक विषरूप पदार्थ आहे.

**सोमलखार**, पु० सोमल.

**सोमली**, ३लिं० सोमलाचा किं० सोमलाचे योगानें निर्मिलेला जो मात्रा, औषध, इ० पदार्थ तो.

**सोमवती**, स्त्री० इंदुवारानें युक्त जी अमावास्या ती; ज्यादिवशीं स्त्रिया अश्वत्थ शत फलादि पदार्थ अश्वत्थमूळीं वाहून व्रत करीत असतात ती.

**सोमवंश**, पु॰ चंद्रापासून उत्पन्न झालेला असा एक पुराणप्रसिद्ध क्षत्रियवंश आहे.

**सोमवंशी**, ३लिं॰ सोमवंशसंबंधी जो पुरुषादिक तो.

**सोमवार**, पु॰ सातावारांतील दुसरा जो वार तो.

**सोमवाऱ्या तेली**, पु॰ तेल्यांत एक जाति आहे जे सोमवाराचे दिवशीं घाणा लावीत नाहींत.

**सोमसूत्र**, सं॰ न॰ शिवाचे स्नानाचें पाणी बाहेर येउन जेथें सांचतें तेथें केली असते जी न्हाणी तें.

**सोमसूत्रीप्रदक्षिणा**, स्त्री॰ सोमसूत्र न उल्लंघितां उलटें फुलटें फिरून पुरती करावी अशाप्रकारें शिवास घालायाची जी प्रदक्षिणा ती.

**सोमळ**, ३लिं॰ दे॰ कोमट जो पदार्थ तो; २, कों॰ सोपस.

**सोमाळा**, ३लिं॰ कों॰ कोमट जो पदार्थ तो.

**सोय**, स्त्री॰ कोणेक कार्य विवक्षानुरूप होण्याविषयीं त्यास जें जें जसें जसें अपेक्षित असतें तें तें तसें तसें सर्व अनुकूल असल्यामुळें त्या कार्याची गति होण्यास मार्गवत् उपकारक जें संधान ह्मणून कांहीं असते ती; २, द्रव्यमिळावें संसारनिर्वाह व्हावा, इ॰ विषयीं आश्रयभूत जें चाकरी, वतन, शेतभात, इ॰ कांहीं असतें त्यास ह्म॰

**सोयरा**, पु॰ वरपक्षीय आणि वधूपक्षीय जे लोक ते परस्पर; २, ज्यांचा परस्पर योनिसंबंध झाला आहे ते परस्पर; याचा प्रयोग क्वचित् कदाचित् आहे; ३, वेश्या, बटीक, इ॰ जी सामा

सामान्यस्त्री तीणें मैथुनार्थ नेहमी आश्रयलेला असतो जो पुरुष तो.

**सोयराधायरा**, पु॰ सोयरा, इष्ट, मित्र, इ॰ तो.

**सोयरी**, स्त्री॰ कोणएकानें मैथुनार्थ राखिली असती जी वेश्यादि सामान्य वनिता ती.

**सोयरीक**, स्त्री॰ कोणएकाचा कोणएकाशीं जो योनिसंबंध तो.

**सोयवार**, ३लिं॰ सोईवार.

**सोयस्कमार**, पु॰ सईस्कमार.

**सोर**, स्त्री॰ रा॰ आकारविशेषाचें एक मृन्मय पात्र आहे.

**सोरट**, पु॰ द्रांडगेपणानें वागणारा जो हलक्या स्वभावाचा मनुष्य तो; २, गानांतील एक राग आहे.

**सोरटाई**, स्त्री॰ सोरटपणा.

**सोरटी**, ३लिं॰ सोरट ह्मणून एक देश आहे तत्संबंधी जें मनुष्य, गुरूं, इ॰ तो.

**सोरठ**, पु॰ सोरट.

**सोरठाई**, स्त्री॰ सोरटाई.

**सोरठी**, ३लिं॰ सोरटी.

**सोरमीठ**, न॰ सुर्याखार.

**सोरा**, पु॰ एक क्षार आहे जो दारू इ॰ करायाचे उपयोगीं पडतो; २, कों॰ काष्ठाचे पदार्थास सांधा घट्ट बसावा इत्यादर्थ खिळ्यासारिखा काष्ठाचा तुकडा करून मारितात तो.

**सोल**, पु॰ रागू; २, न॰ कोकंबसोल.

**सोलणें**, कोणेक पदार्थ वरील त्वगंश शस्त्रादिकेंकरून काढून तद्रहित करणें.

सोल

सोलवणी, न० कालवण इत्यादर्थ आमसोलें भिजवून त्याचें काढितात जें पाणी तें.

सोला, पु० हरभरा; पावटा, इ० हिरवल धान्याच्या ओल्या शेंगा घांटे सोलून त्यांतील काढिलेला जो दाणा तो; आ० म० अनेक व०.

सोलाणा, पु० सोला

सोलापुरी, ३ लिं० सोलापुर ह्मणून गांव आहे तत्संबंधी जो पासोडा, तपकिरीची डबी, इ० पदार्थ तो.

सोलींव, ३ लिं० सोललेला जो दाणा, डाळ, फल काष्ठ, इ० तो; २, ला० कोणेकाचे सोदेपणा, लुच्चेपणा, माआगमनीपणा, इ० कितीएक असभ्यगुणांचा अतिशयवर्णायाचा असतां त्यामनुष्यास विशेषण देतात.

सोंवळ, ३ लिं० कों० सोमळ ह्या अर्थी.

सोंवळा, सोवळा, ३ लिं० संध्या, देवपूजा, भोजन, इ० कर्माविषयीं जितकी शुद्धता असावी तितकी स्नानादिकें करून ज्याचे आंगीं आली आहे तो मनुष्य आणि त्याणें स्पर्शायास योग्य ह्मणजे ज्याला स्पर्शकेला असतां आपण ओंवळा होत नाहीं असा जो वस्त्र, अन्न, इ० पदार्थ तो; २, कोणेककर्मसंबंधानें विटाळले ला नव्हे जो त्यास ह्म०; उ० वरकड साऱ्यानीं लांच खाल्ला मीं मात्र अजून सोंवळा आहें; ३, जेथील जनसंमर्द अगदी मोडला असा जो मार्ग, ग्राम, इ० त्यास किं० ज्याचे पाठीशीं काम कारभार, बायको, पोरें, इ० खटलें नाहीं त्यास ह्मणजे विधवेनें सोंवळें होणें ह्मणजे सवाशीणपणांतील जे केश ते काढून विधवा धर्मास शुद्ध होणें; ४, पु० आकारविशेषाचें एक गलबत आहे.

सोवळें, सोंवळें, न० सोंवळ्यानें नेसायाचें उपयोगी रेशमी वस्त्रविशेष आहे; २, सोंवळेपणा.

सोव्हाळा, पु० रा० सोहळा.

सोशा, ३ लिं० वेगानें सोंसों असा शब्द करीत अकस्मात् येतो जो वारा त्याचें वि०.

सोशीक, ३ लिं० रोग क्षुधादिजन्य दुःख आलें असतां किं० कोणी दुर्भाषण, द्रव्यापहार, इ० काहीं आपला अपराध केला असतां तें सोसून उगेंच राहण्याचा स्वभाव ज्याचा तो.

सोंस, पु० सोस; २, आपल्याला हें असावें तें असावें मिळालें असतांहीं इतकें पुरणार नाहीं अधिक असावें असें सर्वदा वाटायाजोगा कोणेकास असतो जो तृष्णातिशय तो.

सोसक, ३ लिं० सोशीक.

सोसणें, प्रतिकूलत्वें करून संबन्ध होणार जो दुःख, संकट, शीतोष्ण, अन्यकृत अपराध, भार, इ० कांहीं एक अर्थ त्याचे संबंधानें होणारी जी क्षोभभंगादि विक्रिया तिला आत्मप्रभावानें न होउं देतां किं० झाली असतां न गणितां त्या अर्थातें आत्मसंबंधांत धरणें; २, अन्न औषधादि कोणेक अर्थ प्रतिकूल विकारावहत्वें करून प्रतिकूल असे न होणें.

सोंसाटा, सोसाटा, पु० सुसाटा.

सोहनी, पु० गाण्यांत एक राग आहे.

सोहलत, स्त्री० कों० सोलत.

सोहळा, सोहाळा, पु॰ लग्न, गर्भाधानादि जे शोभनसंस्कार ते म॰; २, ला॰ सुखदुःखादि कारक जे जे देहास संस्कार घडतात ते म॰.

सोहेर, पु॰ सुएर.

सोहेरगत, स्त्री॰ सोहरगत.

सोहेरतुला, २ लिं॰ सुएरतुला.

सोखरा, पु॰ सोपरा.

सोखरी, स्त्री॰ सोपरी.

सोखरीक, स्त्री॰ सोपरीक.

सोळकी, स्त्री॰ भा॰ काष्ठादि जडपदार्थ नेणें, आणणें, इ॰ प्रसंगीं मिळालाजो सोळामनुष्यांचा समुदाय ती.

सोळकीचा, २ लिं॰ सोळकीनें उचलायाजोगा मोठाजो दगड, तुळई, इ॰ तो.

सोळन्हाण, सोळन्हाणें, विवाहदिवसापासून सोळावे दिवशीं जांवयास आपले घरीं आणून त्यासस्त्रीसहवर्तमान न्हाउंघालावें, मिष्टान्नभोजन द्यावें, वस्त्रालंकारादि अर्पावे, इ॰ रूपजो सोहळा करितात तें.

सोळभोंक, पु॰ ज्याचे मध्यें विद्यादिगुण, कांहींनाहींत आणि कोणी आपले घरीं आला असतां आगतस्वागत करावें, संसाराची काळजी वाळगावी, इ॰ संसारिक जनांचे धर्म ज्याचे अंगींनाहींत असा वृथापुष्ट जो मनुष्य तो.

सोळवंड, स्त्री॰ नारळ, इत्यादिफळें, चोपा, इ॰ कांचीं पुष्पें, इ॰ पदार्थांचे सोळासोळा व्यक्तींचे समुदाय जे सोळा ब्राह्मणास दान देतात ते म॰.

सोळैवद्ण, न॰ रा॰ सोळन्हाण.

सोळा, २ लिं॰ संख्या आहे १६.

सोळासंस्कार, पु॰ गर्भाधान, पुंसवन, इ॰ शास्त्रपरिगणित सोळाजे द्विजातीस संस्कार आहेत ते कोणेकअर्थीं सोळा संस्कार होणें ह्मणजे बरे, वाईट, सर्वजे संस्कार ते होणें.

सोळुला, २ लिं॰ सोळापायल्यांचा एकमण अशा संकेताचें जें मण, खंडी, इ॰ माप तो.

सोक्षमोक्ष, पु॰ कांहींएकगुंतून पडलेल्या व्यवहाराचा बरा किं॰ वाईट परिणाम होउन कसातरी जोउलगडा तो.

सौकर्य, न॰ सुकरपणातें.

सौकुमार्य, न॰ सुकुमारपणातें.

सौख्य, न॰ सुखीपणा.

सौगंध्य, न॰ सुगंधिपणातें

सौजन्य, न॰ सुजनपणातें.

सौंदर्य, न॰ सुंदरपणातें.

सौदा, पु॰ सवदा.

सौदागर, सौदागीर, पु॰ सवदागर.

सौदागरी, सौदागिरी, २ लिं॰ स्त्री॰ सवदागिरी.

सौदामनी, सौदामिनी, स्त्री॰ विद्युल्लता.

सौदासूत, न॰ पु॰ सवदासूत.

सौध, पु॰ न॰ राजादि श्रीमंत लोकांचा जो चुनेगची मोठा वाडा तो.

सौभाग्य, न॰ सुभगपणा; २, सवाशीणपणामुळें काजळ, कुंकूं, मंगळसूत्र, बांगड्या, इ॰ धारणकरण्याविषयीं जो स्त्रियांचे अंगीं योग्यताविशेष असतो तें; ३, ला॰ ज्याचे योगानें आपणास मान्यता, शोभा, प्रतिष्ठा, तेज, इ॰

कांहीं असतें असें जें विघ्न; वतन, अधिकार, सम र्थाचा आश्रय, इ० त्यास ल०; ४, सत्ताईस योगां तील जो चवथा योग तो.

सौभाग्यचिन्ह, न० स्त्रियांचें सौभाग्य ज्ञापक जें कुं कूं, मंगलसूत्र, इ० तें.

सौभाग्यतंतु, पु० मंगलसूत्रास ल०.

सौभाग्यद्रव्य, न० सुवासिनीनें धारण करावयाचे जें हरिद्रा, कुंकुमादि पदार्थ ते प्र०.

सौभाग्यवती, स्त्री० सुवासिनी जी स्त्री ती.

सौभाग्यवाण, सौभाग्यवायन, न० सौभाग्यवृ ध्यर्थ स्त्रिया सौभाग्यद्रव्ययुक्त वायन देतात ते.

सौभाग्यशुंठी, स्त्री० शुंठीप्रधान एक औषधोपयो गी पाक करितअसतात ती.

सौभाग्यसुंठ, स्त्री० सौभाग्यशुंठी.

सौमनस्य, न० वैमनस्याचाजो प्रतिपक्षी भाव तें.

सौम्य, ३ लिं० क्रूर, उग्र, यांचा प्रतिपक्षी; २, पु० सा ठसंवत्सरांतील त्रेचाळिसावा संवत्सर तो; ३. बुधलणून जो ग्रह तो.

सौम्यग्रह, पु० शुभ जो ग्रह तो.

सौम्यवार, सौम्यवासर, पु० बुधवार.

सौम्या, स्त्री० सं० उत्तरदिशा.

सौर, ३ लिं० सूर्यसंबंधी जें व्रत, मंत्र, पूजा, भक्ति, भक्त, उपासना, इ० तो; २, सूर्यानें एकराशीचा भोग केला म्हणजे एकमास झाला अशा संकेता चा जो दिवस, ऋतु, वर्ष, इ० कालमान तो.

सौरभ्य, सं० न० सौगंध्य.

सौरस्य, न० एकमेकानें केलेलें एकमेकास विरुद्ध वाटूंनये एकमेकाविषयीं एकमेकाचे मनांत कपट असूंनये, इ० रूप जो परस्परांचा भाव असतो तें; २, सुरसपणा.

सौरहस्य, न० सौरस्याचा अपभ्रंश परंतु प्रथमार्थीं.

सौरी, स्त्री० स्त्रीवेषधारी जो नपुंसक तो; २, आ रोपानें निर्लज्ज जी स्त्री तीस ल०.

सौलत, स्त्री० हिं० सौरस्य प्रथमार्थी.

सौलभ्य, न० सुलभता.

सौवर्ण, ३ लिं० सुवर्णसंबंधी जो अलंकारादि तो.

सौशील्य, न० सुशीलपणा.

सौष्टव, सौष्ठव, न० उत्तमपणा.

सौहार्द, न० सख्य.

सौहृद, न० सौहार्द.

सौक्ष्म्य, न० सूक्ष्मपणा.

स्कंध, पु० मनुष्यादिकांचा ग्रीवेपासून बाहूमूल प र्यंत जो विभाग तो; २, बैल, हत्ती, इ० कांचे ग्री वेचे मूळचा जो प्रदेश तो; ३, वृक्षाचे मूळ कांडा स जे मोठे मोठे अवयव फुटले असतात ते प्र०.

स्खलद्गी, ३ लिं० तोंतरा जो तो.

स्खलन, न० सं० चालणें, बोलणें, इ० व्यापारीं जो अडखळलेपणा होतो तें; २, आधारापासून रेत, जल, इ० कांचें बिंदुरूपें करून जें पतन तें; रेतस्खलन, इ० प्र०.

स्खलित, ३ लिं० स्खलन पावला जो तो; २, रेतस्ख लन आलें ज्यास तो.

स्तन, पु० ज्यामध्यें दूध उत्पन्न होत असतें असे जे मनुष्य, वानर, इ० कांचे स्त्रियांस उरस्थला वर दोन दोन आणि गोमहिष्यादि पशुस्त्रियांस पोटावर योनिभेदें करून दोन चार साहा आठ इ०

नियतसंख्याक अवयव असतात ते प्र०; आणि अश्वजातीवांचून तत्जातीय जे पुरुष त्यांसही त्यात्यास्थानीं तत्तत्संख्याक जे अवयव असतात ते प्र०; स्तनसंबंधी दुग्धाचें जें पान तें स्तनपान स्तनप्राशन, स्तनोद्भेद, इ० स०

**स्तन्य**, न० स्तनास मुख लावून प्राशावयाचें जें दुग्ध तें.

**स्तबक**, पु० सं० पुष्पादिकांचा जो गुच्छ तो.

**स्तब्ध**, ३ लिं० धरलेला जो गतिभाषणादि व्यापार तो कुंठितकरून खोळंबून राहिला जो तो.

**स्तंभ**, पु० सं० खांब; २, कोणेक अर्थाची गति कुंठित झाल्यामुळें तेथच्या तेथेंच जी स्थिति ती; वीर्यस्तंभ, गतिस्तंभ, इ० स०.

**स्तंभन**, न० वीर्य, भाषण, इ० कांचा स्तंभ करण्याचा जो व्यापार तें; २, वीर्यादिकांचा स्तंभ जेणें करून होतो असें जें औषध, मंत्र, इ० तें.

**स्तंभित**, ३ लिं० स्तंभन केलें ज्याचें तो.

**स्तव**, पु० कोणाचा गुणवर्णनद्वारा जी प्रशंसा ती; २, अ० हेतुत्वाचें वाचक हें अव्यय हेतुभूत जो कोणेक अर्थ तद्वाचक शब्दापुढें याचा प्रयोग होतो; उ० या दोषास्तव मीं तें सोडिलें.

**स्तवणें**, कोणएकातें स्तवविषय करणें.

**स्तवन**, न० स्तवण्याचा जो व्यापार तें.

**स्तवनीय**, ३ लिं० स्तुत्य.

**स्तावक**, ३ लिं० स्तोता; २, विधिनिषेधकिं० वस्तुनिष्ठगुणाचें याथार्थ्य यांकडे ज्याचा कटाक्ष नाहीं असें जें कर्मादिवस्तूचें प्रशंसार्थमात्र प्रवृत्त जें श्लोक, वाक्य, ग्रंथ, इ० तें; उ० सत्य बोलण्याएवढा दुसरा धर्म नाहीं हें स्तावक वाक्य आणि सत्य बोलावें हें विधिवाक्य; उ० हें औषध सेविलें असतां लोखंडासारखें बळकट शरीर होईल या स्तावक वाक्यापासून हें औषध शरीर बळकट करण्याविषयीं फार चांगलें असा बोध होतो.

**स्तिमित**, ३ लिं० कोणेक कार्य करण्याविषयीं मंद जो मनुष्यादि व त्याचा कारभार, इ० तो.

**स्तिमिताई**, स्त्री० स्तिमितपणा.

**स्तुत**, ३ लिं० स्तविला जो तो.

**स्तुति**, स्त्री० स्तव प्रथमार्थी.

**स्तुतिप्रिय**, ३ लिं० आपली कोणी स्तुति केली असतां ज्यास फार आवडते अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**स्तुतिवाद**, पु० स्तुतिपर जें भाषण तो.

**स्तुत्य**, ३ लिं० ज्याचा स्तव करायास योग्य तो.

**स्तूत**, स्त्री० स्तुति शब्दाचा अपभ्रंश.

**स्तेन**, पु० सं० तस्कर.

**स्तेय**, न० चौर्य.

**स्तेयी**, ३ लिं० स्तेय केलें आहे जेणें तो; स्वर्णस्तेयी, द्रव्यस्तेयी, इ० स०.

**स्तोतव्य**, ३ लिं० स्तुत्य.

**स्तोता**, ३ लिं० स्तवनकर्ता.

**स्तोत्र**, न० स्तव; देवता, गुरु, इ० जे स्तुत्य त्यांचे स्तवानें घटित असा रचला असतो ग्रंथ तें.

**स्तोम**, पु० सं० कोणेक अर्थाचा जमलेला जो समुदाय तें; २, न० साधु, संत, गोसांवी, राजा, विद्वान्, इ० संबंधी तदंगभूत जे मनुष्यसमुदायादि तद्विशिष्ट पृथक् पृथक् रूपें करून गणनीय जीं प्रकरणें तीं प्र०; ३, पोम.

स्त्री, स्त्री० पुरुषापासून बीजग्रहणकरून सगर्भव्हावें अशीसंभावना जेथेआहे अशाजा मनुष्यादि व्यक्तिता म०; स्त्रीचरित्र, स्त्रीलंपट, स्त्रीजित, इ० स०; २, जावृक्षलतादिजाती मध्यें फळेंयेतात आणि फळेंयेतनाहींत अशा भेदेंकरून दोनप्रकारअसतात त्यामध्यें जिला फळेंयेतात ती व्यक्ति; ३, जीजाची बाईल तीत्या ची; ४, स्त्रीलिंगनामानें वाच्यजो अर्थ तो; उ० लेखणीहीस्त्री आणि चाकू हापुरुष.

स्त्रीपुरुषें, न० नवराआणि त्याची बायको मिळून उभयतां तीं.

स्त्रीबुद्धि, ३लिं० बाइलबुध्या.

स्त्रीलिंग, न० नामाचीं तीनलिंगें आहेत त्यामध्यें जी. ती. ही, अशा सर्वनामरूपानीं जानामार्था चा परामर्श होतो त्यानामाचें जें लिंग तें; २, ३लिं० तद्विशिष्ट नाम किं० त्याचा अर्थ तो.

स्त्रीसंग, पु० स्त्रीशीं जो मैथुनार्थ संग तो

स्त्रैण, ३लिं० स्त्रीचेठायीं जो लंपट तो; २, स्त्री संबंधी जो व्यवहारादि तो.

स्थ, ३लिं० ज्या अधिकरणीं जो राहिला आहे तो तत्स्थ; पात्रस्थ, गर्भस्थ, मार्गस्थ, जन्मस्थ, इ० स० प्र०.

स्थंडिल, न० हवनार्थ भूमीवर मृत्तिका घालून भूमीपेक्षां कांहींउंच जो रचनाविशेष करितात तें

स्थल, न० जागा, प्रथमार्थावांचून; २, समुद्रादिकांचे उदकानें अवरुद्ध झालेलें नव्हे असें जें भूतल तें.

स्थलचर, ३लिं० भूतलरूपस्थलावर चालणें उत्पत्तिस्थित्यादि वर्तन असा जो मनुष्य पश्वादि जीव तो.

स्थलदेवता, स्त्री० विवक्षित भूतलरूपस्थलाची अभिमानिनी जी देवता ती.

स्थलमार्ग, पु० खुष्कीचा जो मार्ग तो.

स्थलशुद्धि, स्त्री० ज्यास्थलावर पाक, गृह, यज्ञ, इ० कांहीं करायाचें असतें त्यास्थलाची अमेध्य पदार्थ काढणें किं० सडासंमार्जन करणें, इ० यथा योग्य व्यापारानें करितात जी शुद्धि ती; २, तळ शोधणी.

स्थलांतर, न० अन्यजें स्थल तें; स्थलांतर करणें; ह्मणजे अधिष्ठित स्थलापासून कांहीं कारणास्तव अन्यस्थलीं गमन करणें.

स्थळ, न० स्थल.

स्थळचर, ३लिं० स्थलचर.

स्थळदेवता, स्त्री० स्थलदेवता.

स्थळमार्ग, पु० स्थलमार्ग.

स्थाणु, पु० सं० वरशाखादिविस्तार अगदी नाहीं असा केवळ कांडरूप जो वृक्ष तो.

स्थातव्य, न० कोणेकाची कोणएकस्थलीं कांहींएक काल घडायाची जी स्थिति तीस ह्म०; उ० आतां एथें कांहीं काल आपलें स्थातव्य आहे किं० लवकर गंतव्य आहे.

स्थाता, ३लिं० स्थितिविशिष्ट होणारा जो तो.

स्थान, न० सं० स्थल प्रथमार्थी; स्थानमाहात्म्य, स्थानभेद, इ० स०; २, प्रसंग प्रथमार्थी.

स्थानच्युत, स्थानभ्रष्ट, ३लिं० पदच्युत.

**स्थानिक**, ३लिं॰ जो ज्या स्थानीचा किं॰ ज्याचे स्थानीचा तो तत्स्थानिक; शिरस्थानिक, पितृस्थानिक, इ॰ स॰.

**स्थानापन्न**, ३लिं॰ कोणेक स्थानातें पावला जो तो; २, यत्प्रतिनिधित्वें करून जो मानिला तो तत्स्थानापन्न; गुरुस्थानापन्न, पुत्रस्थानापन्न, इ॰ स॰.

**स्थानीय**, ३लिं॰ स्थानिक.

**स्थापक**, कांहींएक अर्थातें स्थापणारा जो तो; धर्मस्थापक, मतस्थापक, इ॰ स॰.

**स्थापणें**, कोणेक अर्थ कोणेक अधिकरणीं स्थित होई असें करणें.

**स्थापन**, न॰ स्थापण्याचा जो व्यापार तें; घटस्थापन, दोषस्थापन, देवतास्थापन, इ॰ स॰.

**स्थापना**, स्त्री॰ स्थापन.

**स्थापनीय**, ३लिं॰ स्थाप्य.

**स्थापित**, ३लिं॰ कोणेकानें स्थापिला जो तो.

**स्थायिक**, पु॰ उपरीपणें राहणारा जो त्याचा प्रतिपक्षी.

**स्थायी**, पु॰ स्थायिक; २, ३लिं॰ कोणेक स्थलीं कांहीं काल राहणारा जो तो.

**स्थायीभाव**, पु॰ शृंगारादि रसांचे तो तो रस समाप्त होई तोंपर्यंत राहणारे जे रति, उत्साह, इ॰ भाव ते त्या त्या रसाचे

**स्थाली**, स्त्री॰ सं॰ भात, वरण, इ॰ पदार्थ शिजवायाचें जें पात्र ती.

**स्थालीपाक**, पु॰ गृहस्थाश्रमी जो त्याचें एक कर्म आहे.



**स्थावर**, ३लिं॰ ज्याचे अंगीं संचारशक्ति ईश्वरानें ठेविली नाहीं असे जे वृक्ष, पर्वत, काष्ठ, पाषाण, इ॰ पदार्थ ते प्र॰; २, ज्याचा उपभोग ज्यागचे जागीं करावा लागतो जो पाहिजे तिकडे नेतां येत नाहीं असा जो गृह, शेत, वतन, इ॰ तो.

**स्थित**, ३लिं॰ स्थितिपावला तो.

**स्थिति**, स्त्री॰ द्रव्यक्रियादिरूप अधिकरणातें धरून जी अर्थाची विद्यमानता ती; जी प्रकारादिभेदकानीं भिन्नभिन्न होत्ये; कोणेकानें स्थितीवर येणें, असणें, इ॰ स्थळीं जशी असावी तशी योग्य जी स्थिति ती असा अर्थ होतो; २, जगाचीउत्पत्ति झाल्यापासून विनाश होई तोंपर्यंत जी मधली अवस्था ती.

**स्थिर**, ३लिं॰ जी एक धरलेली स्थिति तेथून इतस्ततः चलित न होतां त्याच स्थितीवर कांहीं काल विद्यमान जो तो; २, होणें, जाणें, करणें, इ॰ विषयीं प्रयोजक जो वेग तो ज्याचे आंगीं अल्प आहे असा जो तो; ३, स्थावर; ४, ज्याचा ठायीं कार्य आरंभिलें असतां लवकर होत नाहीं व झालें असतां लवकर नाश पावत नाहीं अशीं जीं रोहिण्यादि नक्षत्रें, वृषभादि राशि, रविवार, यांस ज्योतिःशास्त्रांत ही संज्ञा आहे.

**स्थिरवेळ**, **स्थिरवेळा**, स्त्री॰ ज्या वेळेवर आरंभिलेलें कार्य लांबणीस पडतें त्या वेळेस ल॰.

**स्थिरस्थावर**, ३लिं॰ राजक्रांति, क्रोध, संभ्रम, इ॰ कारणामुळें जी गडबड असत्ये ती जाउन एके स्थितीवर आला जो राज्य, मनुष्य, अंतःकरण, इ॰ तो; २, न॰ ती गडबड जाउन जी स्वस्थता तें.

**स्थिरावणें**, कोणेकातें स्थिरकरणें; उ॰ तो जायाला निघाला आहे त्यास दोनगोष्टी सांगून चारदिवस स्थिरावा; उ॰ अंमळपाउस स्थिरावला ह्मणजे मग जाउं.

**स्थीत**, स्त्री॰ स्थितिशब्दाचा अपभ्रंश.

**स्थूल**, ३ लिं॰ सूक्ष्माचा प्रतिपक्षी.

**स्थूलदेह**, पु॰ प्रतिजन्माचे ठायीं निरनिराळा होतो जो हा दृश्यदेह तो.

**स्थूलमान**, न॰ सूक्ष्मनव्हे असें जें मान तें.

**स्थूळ**, ३ लिं॰ स्थूल.

**स्थैर्य**, न॰ स्थिरपणा.

**स्थौल्य**, न॰ स्थूलपणा.

**स्नात**, ३ लिं॰ स्नानकेलें जाणें तो; तीर्थस्नात, इ॰ स॰.

**स्नातक**, पु॰ ब्रह्मचर्यसमासकरून विवाहकरण्यास जो सिद्ध झाला तो.

**स्नाता**, ३ लिं॰ स्नानकरणारा जो तो.

**स्नान**, न॰ देहशुद्ध्यर्थ जलादिकें करून शरीरधुवावें किं॰ तदभावीं भस्मगोमयादि शुद्धिकारक पदार्थांनीं लिप्तकरावें, इ॰ रूपजो शरीरास संस्कार करितात तें; गंगास्नान, जलस्नान, भस्मस्नान, कंठस्नान, इ॰ स॰.

**स्नानसंध्या**, स्त्री॰ स्नानआणि संध्या एतत्पूर्वक जें देवपूजा, जप, आर्घ्य, इ॰ कर्म तीं.

**स्नायी**, ३ लिं॰ जो जेणेंकरून स्नात तो तत्स्नायी; तिलस्नायी, तीर्थस्नायी, इ॰ स॰ प्र॰.

**स्नायु**, न॰ शरीरांतील एकधातु आहे.

**स्निग्ध**, ३ लिं॰ ज्याचे आंगीं स्नेह असा जो पदार्थ तो.

स्नुषा

**स्नुषा**, स्त्री॰ सं॰ सून.

**स्नेह**, पु॰ चूर्णादिपदार्थांचा गोळा व्हायास कारणभूत जो लत्तत्पदार्थनिष्ठ गुणविशेष असतो तो; २, पार्थिवजे धान्यकाष्ठादिपदार्थ त्यांचे आंगीं जो तैलांश असतो तो; ३, कोणएकाचा कोणएकाशीं मित्रभाव तो.

**स्नेहभाव**, पु॰ स्नेहतृतीयार्थी.

**स्नेहाळू**, ३ लिं॰ मायाळू.

**स्नेही**, ३ लिं॰ ज्यांचा परस्पर स्नेहभाव आहे ते परस्पर.

**स्पर्धणें**, स्पर्धाविशिष्टहोणें.

**स्पर्धा**, स्त्री॰ आपल्याउत्कर्षानें याला अपकृष्ट करीन किं॰ याचीबरोबरी करीन असा जो कोणकानें कोणेकाशीं भाव धरिला असतो ती; उ॰ तुला रागयेतांच तुझीनेत्रें रक्तोत्पलाशीं स्पर्धा करूं लागलीं.

**स्पर्धी**, ३ लिं॰ एकमेकाशीं स्पर्धा करणारे जे ते परस्पर.

**स्पर्श**, पु॰ कोणेक पदार्थ कोणेक पदार्थाशीं लागल्याने जो त्याचा त्यास संबंध होतो त्याचें जें आरंभावस्थेंतील रूप तो; स्पर्शवेध, स्पर्शस्त्रव, जलस्पर्श, अस्पृश्यस्पर्श, इ॰ स॰; २, त्वगिंद्रियानेंच ज्याचें प्रत्यक्ष होतें असा जो पदार्थनिष्ठगुण तो; ३, लेशयाअर्थी प्र॰ करितात; उ॰ याचे हृदयांत दयेचा स्पर्श नाहीं; ४, ककारापासून मकारपर्यंत जे पंचवीस वर्ण ते प्र॰; ५, परीस ह्मणून जो पाषाण तो.

**स्पर्शणें**, कोणेकानें स्पर्श प्रथमार्थानें युक्तकरणें किं॰

कोणं

कोणेक अर्थाचा जो स्पर्श तद्विशिष्ट आपण होणें; उ॰ मीयावरील अंबास्पर्शला देखिल नाहीं; मी अस्पृश्य पदार्थास स्पर्शलों म्हणून स्नान करतों.

**स्पर्शन**, न॰ स्पर्शण्याचा जो व्यापार तें; २, सं॰पु॰ वायु.

**स्पर्शनीय**, ३ लिं॰ ज्याचा स्पर्श करणाया योग्य तो.

**स्पर्शमणि**, पु॰ परीस म्हणून जो मणि तो.

**स्पर्शस्नान**, न॰ ग्रहणाचे आरंभीं जें स्नान करितात तें.

**स्पर्शास्पर्श**, पु॰ परस्पर स्पर्शानंतर जें कांहीं सोवळें, ओंवळें, इ॰ त्यांचा जो परस्पर संबंधानें संभावना विषय स्पर्श तो.

**स्पष्ट**, ३ लिं॰ आहे किं॰ नाहीं, असें कीं नसें, हा अमुक कीं अमुक, इ॰ रूप संदेह उत्पन्यास कारण भूत जें त्या त्या अर्थाची आवृतपणें स्थिति, बारीकपणा, अर्थांतरसादृश्य, गुप्तमुद्रीतपणा, इ॰ तें आमच्येंनाहीं असा अभिव्यक्तरूपें करून स्थित जो कोणेक अर्थ तो; २, जामध्येंयत्किंचित्ही अंतर नाहीं असा जो गणितागत ग्रह, अहर्गण, संक्रांति, इ॰ तो.

**स्पष्टप्रतिपत्ति**, स्त्री॰ कोणएक अर्थाचे स्पष्टरूपें करून जें ज्ञान ती.

**स्पष्टवक्ता**, ३ लिं॰ भीड मुरवत न धरितां मनांत येईल तें स्पष्ट बोलण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**स्पष्टीकरण**, न॰ कोणेक अर्थ स्पष्ट करण्याचा जो व्यापार तें.

**स्पष्टीकृत**, ३ लिं॰ स्पष्टीकरण केलें ज्याचें तो.

**स्पार्शन**, न॰ त्वगिंद्रियानें अनुभूत होनें जें स्पर्शसंबंधी ज्ञान, सुख, इ॰ तो.

**स्पृहणीय**, ३ लिं॰ ज्याचें दर्शनादि झालें असतां ह्या आपल्यास असावा अशी ज्या अवर इच्छा होती असा मनोरम जो कोणेक अर्थ तो.

**स्पृहा**, स्त्री॰ कोणएक अर्थाविषयीं जी इच्छा ती.

**स्फटिक**, पु॰ पांढरा एक पाषाण आहे.

**स्फाटिक**, ३ लिं॰ स्फटिक संबंधी जो पदार्थ तो.

**स्फीत**, स्त्री॰ स्फीति शब्दाचा अपभ्रंश.

**स्फीति**, स्त्री॰ प्रा॰ प्रशंसा या अर्थी.

**स्फुट**, ३ लिं॰ स्पष्ट; २, मोठ्या ग्रंथांत बांधलागेला नाहीं असा जो श्लोक, वाक्य, कथा, इ॰ तो.

**स्फुटित**, ३ लिं॰ फुटला जो पाभ फलादि पदार्थ तो.

**स्फुंदणें**, रडयाचा वेग आवरूं गेलें असतां तो आवरेनासा होउन श्वासाची गति विलक्षण होय असा जो कांहीं विकार होतो तद्विशिष्ट कोणेकानें होणें.

**स्फुरण**, न॰ विद्युल्लता, रत्न, अग्नि, इ॰ संबंधीजें तेज त्याचें किं॰ नेत्र, बाहु, इ॰ शरीरावयव संबंधी कानडीचें जें कंपन तें; २, युद्ध, वाद, दान, इ॰ कांविषयीं जो उत्साह, कोधावेश, यांचा हृदयांत आविर्भाव होउं लागला म्हणजे त्याबरोबर कंपनादि कारक जो विकार विशेष शरीरांत होतो तें; ३, बुद्धीच्याठायीं संस्काररूपें करून स्थित जो विषय त्याचें तत्तत्समयीं जें आविर्भवन तें.

**स्फुरणें**, कोणेक अर्थानें स्फुरण प्रथम तृतीयार्थानें विशिष्ट होणें.

**स्फुरद्रूप**, ३ लिं॰ वर्तमानकालीं स्फुरतो आहे असा

ओ विद्युल्लतादि संबंधी तेज किं॰ तद्विशिष्ट विद्युल्लतादि किं॰ विद्याशास्त्रार्थादिरूप कोणेक विषय तो.

**स्फुलिंग**, पु॰ अग्नीची ठिणगी; २, आपल्याचा-दोनशंउपजावाजो अंश तो, गुणन भजनादि प्रसंगीं प्र॰.

**स्फूर्त**, ३ लिं॰ स्फूर्तिविशिष्ट झाला जो तो.

**स्फूर्ति**, स्त्री॰ स्फुरण प्रथम तृतीयार्थी.

**स्फोट**, पु॰ शरीरादिकावर येतो जो फोड तो; २, फलपात्रादिकांचा जो स्फुटितपणा तो; घटस्फोट, ब्रह्मांडस्फोट, इ॰ स॰.

**स्फोटन**, न॰ फल, पात्र, शरीर, इ॰ फोडण्याचा जो व्यापार तें.

**स्मर**, पु॰ सं॰ मदन; २, कोणेक विषयाचीजी स्मृति ती.

**स्मरण**, न॰ अनुभूत होउन संस्काररूपें करून अंतःकरणांत राहिलेला असतो जो कोणेक विषय त्याचें पुनः उद्बोधक कांहीं झाल्यामुळें होतेंजें ज्ञान तें; २, अनुभूत जो अर्थ तो संस्काररूपें राखून ठेवण्याचीजी अंतःकरण शक्ति तें; ३, अनुभूतअर्थ संस्काररूपें करून ज्याचाठायीं राहतो असेंजें अंतःकरण वृत्तिरूप अधिकरण तें; उ॰ तुह्मी बोललातें माझे स्मरणांत राहिलें नाहीं; ४, ईश्वरादिकांचेंजें नामसंकीर्त्तन त्यास ह्म॰; ५, असन्निहित राहणाराजो मित्रादिक त्यास आपलें स्मरण रहावें ह्मणून जें त्यास अलंकारादि वस्त्र देतात त्यास ह्म॰.

**स्मरणी**, स्त्री॰ नाममंत्रादिजपाची संख्या राखायासाठीं प्रा॰ तेरामण्याचीजी माळा हातांत कोणीनेहमी राखित असतात ती; कोणेक गोष्टीची स्मरणी घेणें ह्म॰ ध्यास घेणें.

**स्मरणीय**, ३ लिं॰ ज्याचें स्मरण करायास योग्य असा जो ईश्वरादि तो.

**स्मरणें**, आठवणें.

**स्मर्ता**, ३ लिं॰ स्मरणारा.

**स्मशान**, न॰ श्मशानशब्दाचा अपभ्रंश.

**स्मशानवैराग्य**, न॰ श्मशानशब्दाचा अपभ्रंश.

**स्मारक**, ३ लिं॰ कोणेक विषयानें स्मरण विषय करून देणारा जो पुरुष, शब्द, लेख इ॰ तो.

**स्मार्त**, ३ लिं॰ स्मृतीनें विहित जें व्रतादिकर्म इ॰ तो; २, पु॰ स्मृत्युक्त मार्गानें वर्तणारा जो तो.

**स्मित**, न॰ सं॰ मुखाचा फार विकास न करितां मुखांतले मुखांत किंचित जें हास्य तें.

**स्मृत**, ३ लिं॰ स्मरणविषय केला जो अर्थ तो.

**स्मृति**, स्त्री॰ स्मरण; २, धर्मशास्त्र प्रतिपादक जे मन्वादिऋषींचे ग्रंथ ते किं॰ तत्संबंधी वाक्यें तीं प्र॰; स्मृतिप्रणीत, स्मृत्युक्त, स्मृतिविहित, इ॰ स॰.

**स्मृत**, स्त्री॰ स्मृतिशब्दाचा अपभ्रंश.

**स्यंदन**, पु॰ सं॰ रथ.

**स्रक्**, स्त्री॰ सं॰ पुष्पादिकांची जी माळा ती.

**स्रव**, पु॰ सं॰ स्राव.

**स्रवण**, न॰ स्रवण्याचा जो व्यापार तें.

**स्रवणें**, जलानें भरलेली घागर, गुळाचा रवा, इ॰ निष्ठ जो द्रवांश त्याणें स्वाधारापासून विभुक्त होउन थोडथोडें गळणें; त्याघागर इ॰ आधारास कर्तृता मानून द्रवांशास कर्मता मानली असतां सकर्मकही प्र॰ होतो

**स्तस्त**, ३ लिं॰ जेथें संबद्ध होतां तेथून सईल झाल्या मुळें खालीं किं॰ हिकडे तिकडे सरला जो कोणेक अर्थ तो.

**स्त्राव**, पु॰ कांहीं एकापासून स्रवतो जो द्रवांश तो; २, पांचवा मास लागायाचे पूर्वीं जो गर्भाचा हो तो पात तो.

**स्त्रावी**, ३ लिं॰ जाद्रवांशानें जो स्रवतो तो तत्स्रावी; मदानें स्रवतो तो मदस्रावी गज, अमृतस्रावी चंद्र, जलस्रावी सोमकांत.

**स्व**, न॰ मी एतच्छब्दवाच्य जो आपण तें; २, पैका किं॰ तद्रूपें करून मानिलेलें जें अलंकार, वस्त्र, पात्र, गृह, वतन, इ॰ तें; ३, आपला जो पुत्र, मित्र, सेवक, गृह, धन, इ॰ तो.

**स्वक**, ३ लिं॰ स्वीय

**स्वकपोलकल्पित**, ३ लिं॰ मूलभूत प्रमाण नसतां केवल आपल्याच कल्पनेनें रचित जो ग्रंथादि तो.

**स्वकर्म**, न॰ जाजा प्राण्यास जें जें विहित कर्म हें तें तें त्याचें त्याचें; उ॰ क्षत्रियानीं युद्ध करावें हें त्याचें स्वकर्म; सर्पानें डसावें हें त्याचें स्वकर्म.

**स्वकष्टार्जित**, ३ लिं॰ स्वतः कष्ट करून संपादिलेला जो द्रव्यादि पदार्थ तो.

**स्वकीय**, ३ लिं॰ स्वीय; २, आपला आप्त जो कोणी तो.

**स्वकीया**, स्त्री॰ स्वीया.

**स्वच्छंद**, पु॰ प्रवृत्ति निवृत्ति विषयीं प्रयोजक जो आपल्याच अंतःकरण वृत्तीचा संकल्प तो; प्रथमांत प्रयोग प्रा॰ नाहीं; उ॰ त्याचे स्वच्छंदास आलें तर तो करील, दुसऱ्याचे सांगण्यानें करायाचा नाहीं; २, ३, स्वच्छंदी; ३, अ॰ स्वच्छंदानुरोधानें वागणें, वर्तणें, इ॰ कांचें वि॰.

**स्वच्छंदी**, ३ लिं॰ आपल्याच छंदानें वागण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**स्वजन**, पु॰ आत्मीय जो जन तो.

**स्वजान**, स्त्री॰ स्वजाति शब्दाचा अपभ्रंश.

**स्वजाति**, स्त्री॰ आपलीजी जात ती.

**स्वजातीय**, ३ लिं॰ आपले जातीचा जो कोणी तो.

**स्वतः**, अ॰ भृत्यादि द्वारा नव्हे खुद्द आपण; उ॰ मुलाचे हातून होणार नाहीं स्वतः तुह्मांला गेलें पाहिजे; २, दुसरा कोणी प्रवर्तक नसतां आपल्या आपण; उ॰ मला कोणीं सांगीतलें नाहीं मी स्वतः गेलों; ३, दुसरें कांहीं निमित्त नसतां स्वभावें करून; उ॰ आधीं दूध स्वतः गोड त्यांत साकर पडल्यावर मग काय विचार तां.

**स्वतंत्र**, ३ लिं॰ परतंत्र नव्हे आपल्याच आधीन जो तो.

**स्वतःप्रमाण**, ३ लिं॰ प्रामाण्यार्थ इतर प्रमाणाची ज्यास अपेक्षा नाहीं असा जो वेदशास्त्रादि पदार्थ तो.

**स्वतःसिद्ध**, ३ लिं॰ मनुष्यादिकांचे कृतीनें झालेला नव्हे असा आपल्या आपण जें सिद्ध झालेला जो कोणेक अर्थ तो.

**स्वतां**, अ॰ स्वतः याचा अपभ्रंश.

**स्वत्व**, न॰ घर, दार, वतन, द्रव्य, इ॰ जो आपला ह्मणून कोणेक अर्थ त्याजवर असतो जो आपलेपणा ह्मणून धर्म तें.

**स्वत्वनिवृत्ति**, स्त्री॰ दान, क्रय, उत्सर्ग, इ॰ क्रियानी

ती आपल्याघदार्थावर जें आपलें स्वत्व असतें त्या
ची होत्येजी निवृत्ति ती.

**स्वदस्तूर**, न॰ कोणकरवत, पत्र, इ॰ कांवर असतो जो आपल्या हातानें लिहिलेला लेख तें; २, ३ लिं॰ आपल्या हातानें लिहिलेलें जें खत, पत्र, इ॰ तो.

**स्वधर्म**, पु॰ ब्राह्मणादि जातीचेठायीं वर्णाश्रमायनुरोधानें शास्त्रानें जोजास विहितधर्म असतो तो त्याचा किं॰ अर्थमात्राचेठायीं जें अव्यभिचारि गुणादिक असतें तो.

**स्वन**, पु॰ सं॰ ध्वन्यात्मक जो शब्द तो

**स्वनित**, ३ लिं॰ स्वनविशिष्टकेलाजो वाद्यादि तो; २, न॰ वस्त्र, पर्णादिक, वारा, इ॰ कानें हालले असतां होतोजो शब्द तें.

**स्वपरभाव**, पु॰ आपपरभाव.

**स्वप्न**, पु॰ न॰ जागृतींतील इंद्रियांचा लय झाला असतां एकटें अंतःकरणच इंद्रियादि सर्वप्रपंचरूपी होउन त्याप्रपंचाचा अनुभव घेतअसतें अशीजी मनुष्यादिजीवास अवस्थाप्राप्त होत्ये ती तें किं॰ त्याअवस्थेंत तोभासतो जो प्रपंच तो तें; स्वप्नप्रपंच, स्वप्नकरण, स्वप्नसृष्टि, स्वप्नवत्, इ॰ स॰.

**स्वप्नावस्था**, स्त्री॰ स्वप्नरूपजी अवस्था; २, स्वप्नामध्यें जो वीर्यपात होतो ती.

**स्वप्रकाश**, ३ लिं॰ स्वयंप्रकाश.

**स्वप्रख्य**, ३ लिं॰ हाअमक्याचा पुत्र किं॰ अमक्याचा जांवई इ॰ रूपेंकरून प्रसिद्ध असा नव्हे केवळ आपल्याच विद्यादिगुणेंकरून सर्वत्र प्रसिद्ध जो तो.

**स्वभाव**, पु॰ अर्थमात्राच्याठायीं अर्थनिष्ठवृत्तीचा नियामक जो त्यात्या अर्थाचेठायीं धर्मविशेष उत्पन्न झालेला असतो तो; स्त्रीस्वभाव देहस्वभाव, वस्तुस्वभाव, इ॰ स॰.

**स्वभावतः**, अ॰ स्वभावरूप जें निमित्त तेणेंकरून; उ॰ उदकहें स्वभावतः मधुर मगउपाधिकरून रसभिन्न होतो.

**स्वभावसिद्ध**, ३ लिं॰ त्यात्या अर्थाचाजो स्वभाव त्याच कारणानें त्या अर्थावर सिद्ध झाला असतो जो गुणादिक तो.

**स्वभाववादी**, पु॰ याप्रपंचाचें वस्तुमात्राचा स्वभावेंकरूनच उत्पत्तिस्थित्यादि सर्व होतें ईश्वराचेसत्तेनें होतें असें नाहीं असें एकमत आहे तदनुयायी जे ते

**स्वभाविक**, ३ लिं॰ स्वाभाविकाचा अपभ्रंश.

**स्वयं**, अ॰ सं॰ स्वयें; उ॰ स्वयंकृत, स्वयंपाक, इ॰ समासीं प्र॰.

**स्वयंज्योति**, ३ लिं॰ स्वयंप्रकाश.

**स्वयंदास**, ३ लिं॰ ज्यापाशीं दुसरा दास कोणी नाहीं आपला आपणच दास असें मानून सर्वसेवाकर्म आपलें आपणच करून घ्यावें असाजो कोणी तो.

**स्वयंपाक**, पु॰ भोजनार्थ आपल्या हातानें करितातजो भात, भाजी, भाकर, इ॰ अन्नाचा पाक तो; २, सैंपाक.

**स्वयेंपाक**, पु॰ स्वयंपाकशब्दाचा अपभ्रंश.

**स्वयेंपाकघर**, न॰ सैंपाकघर.

**स्वयेंपाकी**, पु॰ सैंपाकी.

**स्वयँपाकीण**, स्त्री॰ सैंपाकीण.

**स्वयंप्रकाश**, ३लिं॰ आपल्याच्य प्रकाशानें प्रकाशमानजो अग्नि,सूर्य, इ॰ तो; २,ला॰ गुरु, इ॰कांची शिक्षा नसतां आपल्याच्य बुद्धीनें शास्त्रादिसर्व विषयजाला समजतात असाजो कोणी बुद्धिमान् त्यास आणि स्वप्रस्थ्य जो कोणी त्यास स्म॰.

**स्वयंभ**, ३लिं॰ स्वयंभू शब्दाचा अपभ्रंश.

**स्वयंभू**, ३लिं॰ स्वतःसिद्धजें शिवलिंगादि तो; २, कोणी अर्वाचीनानें स्थापित नव्हे अशीजी शिवलिंगादि देवमूर्ति तीस स्म॰; ३, पु॰सं॰ ब्रह्मदेव.

**स्वयंवर**, पु॰न॰ वधूनें आपले मनास येईल तो वर वरावा किं॰ पराक्रमादि परीक्षार्थ पित्रादिकानीं केला असतो जो कांहीं एकपण तो जिंकील त्यास वरावें अशासंकेतानें कन्येचा करितात जो विवाह तो तें.

**स्वयंवह**, ३लिं॰ सं॰ मनुष्यादिकजो चेतन त्याचे सन्निधाना वांचून आपल्या आपण चालणारें जें यंत्र तो.

**स्वयें**, अ॰ स्वतः.

**स्वर**, पु॰ उच्चता नीचता याभेदेंकरून भिन्न होतात जे कंठ, तंतुवाद्य, इ॰ अन्य ध्वनीचे भेद ते प्र॰, त्यांत षड्‌आदि सात भेद विशेषनामांकित आहेत; गानादिकांत स्वरदेणें ह्मणजे दुसऱ्यानें आरंभिलेल्या स्वराचें पूरण करणें; २, दोन नाकपुड्यांतून वाहतात जे वायु ते प्र॰; कोणेक कामाविषयीं कोणेकाचे स्वर वाहणें, भजणें; ह्मणजे मनदेवता वाहणें किं॰ अंतःकरण त्यास अनुकूळ असणें; ३, अ, इ, उ, ऋ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, हे नववर्ण आपले ह्रस्व दीर्घादि भेद करून ते प्र॰.

**स्वरकरण**, न॰ सरीगमपधनी याअक्षरांचे उलटापालटीनें जें गाणें बांधलें असतें तें.

**स्वरबद्ध**, ३लिं॰ षड्‌आदि जो स्वर जेथें असावा तो तेथें येईअशाप्रकारें जें गाणें ध्रुपद, इ॰ तो.

**स्वरस**, पु॰ पाणी, इ॰ इत्यांतर आंत न घालितां फळें, पाला, इ॰ कांचे आंगच्याच्य केवळ कादितात जो इत्यांश तो; २, भाषणादि कोणेक कर्माचे ठायीं प्रवृत्त होणारा जो त्याणें प्रवृत्त होण्याविषयीं आपल्या मनांत धरलीअसल्येजी रुचि तो, त्याचा आणि त्याचे भाषणादि व्यवहाराचा ही.

**स्वरशास्त्र**, न॰ नासिका द्वारानें जे स्वर वाहतात त्यांचे गतीवरून प्रश्नादिपाहण्याची इतिकर्तव्यता ज्यामध्यें सांगितली आहे असें एक शास्त्र आहे.

**स्वरूप**, न॰ कोणेकअर्थाचें आपलेंजें रूप तें; २, रूप, द्वितीय तृतीय चतुर्थ पंचमार्थी; कदाचित् प्रथमार्थींही प्र॰ करितात.

**स्वरूपवती**, स्त्री॰ रूपवती.

**स्वरूपवान्**, ३लिं॰ रूपवान्.

**स्वर्ग**, पु॰ मृत्युलोकीं ज्याणें पुण्य केलें असतें त्याणें मरणोत्तर त्यापुण्यकर्माचे फळाचा जेथे आनुन उपभोग करावा असा इंद्रादिदेवांनी अधिष्ठित लोक आहे, जो चौदांत्या या भूलोकापासून वर आहे असें ह्मणतात तो; स्वर्गलोक, स्वर्गवास, स्वर्गसुख, इ॰ स॰; कोणेकास दोन बोटें स्वर्ग उर

उरणें, इ॰ स्थळीं संपत्यादिकामुळें गर्विन होणें; स्वर्गास हात पोंचणें ह्मणजे कांहीं मोठा लाभ झा ल्यामुळें किं॰ आपले हातून कांहीं मोठी गोष्ट घड ल्यामुळें आपल्यास कृतकृत्य मानणें.

**स्वर्गीय**, ३लिं॰ स्वर्गसंबंधी जे रूप, पदार्थ, इ॰ तो.

**स्वर्ण**, न॰ सं॰ सुवर्ण.

**स्वर्णपुष्प**, स्त्री॰ सोनटका ह्मणून जें फुलझाड ती; २, न॰ त्याचें फूल.

**स्वल्प**, ३लिं॰ अल्प.

**स्ववश**, ३लिं॰ परवश नव्हे तो.

**स्वसंतोषें**, अ॰ कोणी बलात्कार, आग्रह, इ॰ नक रितां केवल आपल्याच संतोषानें कांहींएक क रणें, आणें, लिहून देणें, इ॰ कांचें वि॰.

**स्वसत्ताक**, ३लिं॰ आपला स्वामित्व संबंध जाज वर आहे असा जो कोणेक अर्थ तो.

**स्वसत्तात्मक**, ३लिं॰ स्वसत्ताक.

**संवेद्य**, ३लिं॰ जो दुसऱ्यास सांगतां येत नाहीं केव ळ मनानेंच आणायाचा असा जो आत्मानुभव, शरी रांत उठलेला शूळ, कांहींएक पदार्थाची गोडी, इ॰ तो.

**सा**, स्त्री॰ सं॰ भगिनी.

**स्वसाक्ष**, अ॰ कोणेकाचे साक्षीनें; कांहींएक कर्म करणें, बोलणें, इ॰ कांचें वि॰.

**स्वस्त**, ३लिं॰ सवंग; २, स्वस्थ शब्दाचा अपभ्रंश.

**स्वस्ता**, ३लिं॰ सवंग.

**स्वस्ताई**, स्त्री॰ सवंगाई.

**स्वस्तावणें**, धान्यादि स्वस्तें करणें.

**स्वस्ति**, अ॰ सं॰ कल्याणार्थक हें अव्यय आहे; आ शीर्वाद देणें, इ॰ प्रसंगीं याचा प्र॰ होतो; उ॰ राजा तुला स्वस्ति असो; वा॰ रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति.

**स्वस्तिक**, न॰ भूम्यादिकांवर रेखांचें एक आकार विशेषाचें मंडल काढित असतात तें.

**स्वस्तिक्षेम**, नाश, उपद्रव, इ॰ न होतां यथास्थि तपणें असणें, पोहोंचणें, इ॰ कांचें वि॰.

**स्वस्थ**, ३लिं॰ क्षोभ, विकार, घाई, गडबड, इ॰ रहि त होत्साता समाधान वृत्तीनें किं॰ प्रकृतिरूप वृत्ती नें स्थित तो; २, सवंग.

**स्वस्था**, ३लिं॰ सवंग.

**स्वस्थाई**, स्त्री॰ सवंगाई.

**स्वस्थावणें**, गडबड, शोक, इ॰ कानें क्षुब्ध झाला जो त्यास स्वस्थ करणें; २, स्वस्तावणें.

**स्वहित**, न॰ आपलें जें हित तें.

**स्वागत**, न॰ आपले घरीं जो कोणी आला त्याचा तु ह्मी आलां हें बरें झालें, यावें, बसावें, इ॰ रूप स त्कार करितात तें.

**स्वागी**, स्त्री॰ पु॰ सवागी.

**स्वाच्छंद्य**, न॰ स्वछंदपणा.

**स्वातंत्र्य**, न॰ स्वतंत्रपणा.

**स्वाती**, स्त्री॰ सत्तावीस नक्षत्रांतील जें पंधरावें नक्ष त्र त्या.

**स्वाद**, पु॰ त्यात्या पदार्थाचे आंगीं जी रुचि असती तो; २, पदार्थाचे आंगीं जो वास असतो त्याविष यींही प्रयोग करितात; उ॰ गुलाबाचे फुलाचा स्वाद दुसऱ्या फुलास नाहीं.

**स्वादिष्ट**, ३लिं॰ स्वादिष्ठाचा अपभ्रंश.

**स्वादिष्ठ**, ३लिं॰ स्वादविशिष्ट जो पदार्थ तो.

**स्वादु**, ३लिं॰ सं॰ मधुरजोपदार्थ तो.

**स्वाधीन**, ३लिं॰ आपल्याअधीनजो तो; मींधन्याचेस्वाधीन आहें, इ॰ स्थलीं धन्याचे अधीनआहें असाअर्थ होतो.

**स्वाधीनपतिका**, स्त्री॰ पति जिचा अधीन आहे अशीजी प्रोढस्त्री ती.

**स्वाध्याय**, पु॰ प्रतिपदादि अनध्याय सोडून जादिवशीं अध्ययन करण्याची योग्यता आहे तोदिवस.

**स्वाध्यायी**, पु॰ सहाध्यायी शब्दाचा अपभ्रंश.

**स्वाभाविक**, ३लिं॰ स्वभावसिद्ध; २, अ॰ विशेषरूपेंकरून कोणेक उद्देश नधरितां एरवीं कांहीं एक बोलणें, करणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ मीं तुलाला स्वाभाविक बोललों रागयावा ह्मणून बोललों नाहीं.

**स्वाम्**, पु॰ आपलाजोस्वामी त्याशींच कांहींभाषण करण्याचे प्रसंगीं गौरवानें स्वामी सच ल॰; उ॰ स्वामआज्ञा करतील त्याप्रमाणें मीं चालेन.

**स्वामित्व**, न॰ धनीपणा; शेत, वाडी, ग्राम, पेठ, इ॰ संबंधीजो मामलत, जकात, इ॰ कोणेक व्यवहारसर्कारांतून जाणें मनुष्यानें आपणाकडे करून घेतला असतो त्यामालकापासून तो व्यवहार कोणेक तिऱ्हाइतानें आपणाकडे पतकरून घेतला असतां सर्कारचे देयावांचून निराळेंजें त्यामालकास कांहीं द्रव्य द्यावें लागतें तें.

**स्वामी**, पु॰ ज्याचाजो धनी तो त्याचा; २, देव, गुरु, राजा, सन्यासी, तपस्वी, इ॰ मोठे त्यांस गौरवानें ह्म॰.

**स्वाम्य**, न॰ सं॰ कोणएकपदार्थाचा ठायीं कोणएकाचा जो धनीपणा तें.

**स्वायत्त**, ३लिं॰ सं॰ स्वाधीन.

**स्वार, स्वाँर**, पु॰ घोडेराऊत; अश्वादिकांवर स्वार होणें ह्मणजे आरूढ होणें.

**स्वारँवी**, ३लिं॰ कों॰ बकरीं, गुरें, यांचे मलमूत्राचा संबंधाचा जो राड, आंवण, त्यांचें वि॰.

**स्वारसिक**, ३लिं॰ स्वरस प्रथमार्थानें सिद्धजो ग्रंथादिकांतील अर्थादि तो.

**स्वारस्य**, न॰ भाषणादिकाचे अंगीं असतें जें स्वरस वैशिष्ट्य तें; २, कोणेक व्यवहारांत असावी जी गोडी जिचा योगानें कर्त्यानें आस्थापूर्वक प्रवृत्त व्हावें तो; उ॰ आतां सावकारीचा व्यापारांत स्वारस्य राहिलें नाहीं.

**स्वाँरी, स्वारी**, स्त्री॰ क्वचित्स्थलीं गमनार्थ अश्वादिकांवर जी आरूढता ती; २, अश्वादियानावर बसून जाणारी जी मनुष्यव्यक्ति ती; उ॰ हातरूमणाची कंठाळ आणि एक स्वांरी घेउन चालतो, ३, राजा, इ॰ कोणी श्रीमंत लोक बाहेर जात असतां त्यांचे बरोबर चालायाचें जें घोडीं, पालख्या, इ॰ यानें, वाद्यें, स्वार, पांयदळ, मनुष्यें, इ॰ खटलें ती; उ॰ राजा शिकारीस जाणार आहे ह्मणून अवघी स्वांरी तयार झाली; तादृशखटल्यानिशीं गमनागमनें करावाचे योग्यतेचा जो राजा किं॰ सरदार इ॰ थोरलोक त्या एकाव्यक्तीसही ह्म॰; उ॰ मीं वाड्यांत गेलों तों स्वांरी निजली होती; ४, अपराधी लोकांस धरून आणावें किं॰ दरवडा इ॰ कांचा बंदोबस्त राखावा इत्यादिअर्थ सर्कारांतून

पाठवितात जो शिपाईलोकांचा समुदाय तो; ५, असें निंदेनें बोलायाचें असतां मनुष्यादिव्यक्तीवर घिंड या शब्दाचा प्रयोग करितात तसें प्रशंसेनें बोलायाचें असतां या शब्दाचा प्रयोग करितात; उ० आपली स्वारी अरुण्यास आलीतर आमचे घरीं पाय धूळ झाडावी.

**स्वारीशिकारी**, स्त्री० स्वारी करणें, शिकारीस जाणें, इ० रूप जो राजादिकांचा गमनव्यापार तो.

**स्वार्थ**, पु० कोणेक व्यापारीं आपलें जें हित तो; स्वार्थपर, स्वार्थबुद्धि, इ० समास जाणावे; कोणेकास स्वार्थ करणें लागे इत्यादिविषयक लोभ उत्पन्न होणें; २, ग्रंथ, भाषण, इ० कांतील आपद्वाक्य, इ० कांचा जो शब्दार्थ तो त्याचा.

**स्वार्थी**, ३ लिं० दुसऱ्याचें अहित झालें तरी हो ओ परंतु धनादिकें करून आपला स्वार्थ होईल तें करीत असावें असा स्वभाव ज्याचा तो.

**स्वास्थ्य**, न० स्वस्थपणा; २, प्रपंचनिर्वाहोपयोगी राजादिकांपासून संपादिलें असतें जें ग्राम, भूमि, वर्षासन, इ० कांहीं उपजीविकासाधन त्यास ल०.

**स्वीकरण**, न० अंगीकार.

**स्वीकार**, पु० अंगिकार.

**स्वीकारणें**, अंगीकारणें.

**स्वीकृत**, ३ लिं० अंगीकृत.

**स्वीय**, ३ आत्मीय.

**स्वीया**, स्त्री० विवाहादिकें करून आपली बायको झाली अशीजी नायिका ती.

**स्वेच्छ**, ३ लिं० आपल्याच इच्छेनें वर्तणारा जो तो; २, त्याचें जें वर्तनादि तो.

**स्वेच्छाचारी, स्वेच्छाविहारी**, ३ लिं० स्वेछ.

**स्वेद**, पु० घर्म.

**स्वेदज**, ३ लिं० स्वेदापासून उत्पन्न होणारी जी ढेकूण, उवा, इ० रूप जीवजाति तो.

**स्वेदित**, ३ लिं० स्वेदानें युक्त जो तो; २, आंत पाणी न घालितां अग्नीच्या योगानें घर्म उत्पन्न होतो त्याचे योगानें च शिजविला जो शाक, इ० पदार्थ तो.

**स्वैंपाक**, पु० स्वयंपाक.

**स्वैंपाकघर**, न० स्वयंपाकघर.

**स्वैंपाकी**, पु० स्वयंपाकी.

**स्वैंपाकीण**, स्त्री० स्वयंपाकीण.

**स्वैरगति**, स्त्री० आपल्या इच्छेस येईल तसें चालावें अशीजी गति ती; २, ३ लिं० स्वैरगामी.

**स्वैरगामी**, ३ लिं० आपल्या इच्छेस येईल तसें गमन करणारा जो मनुष्यादि तो.

**स्वैरिणी**, स्त्री० व्यभिचारिणी.

## ह

**हुं**, अ० हों.

**हईक**, अ० हेक.

**हउद**, पु० हौद.

**हउस**, स्त्री० हौस.

**हउसदार**, ३ लिं० हौसदार.

**हक**, पु० न० रा० हक्क.

**हकटक**, पु० देशमूख, इ० कांस हक्कसंबंधी या वेंलागतें जें द्रव्य तो; उ० हें इनाम शेत आहे यास हकटक पडत नाहीं; कोणेक गोष्ट कोणेकाचे

स्वेछा हका

हकारकांत येणें स॰ आटोक्यांत येणें.

**हकणें**, हाकणें.

**हकदार**, पु॰ हक्कदार.

**हकदारी**, स्त्री॰ हकदारी.

**हकनहक**, **हकनहाक**, अ॰ नाहक.

**हकनाक**, अ॰ हकनाहक.

**हकनाहक**, अ॰ नाहक.

**हकम**, पु॰ हाकीम.

**हकमाई**, स्त्री॰ हकिमी.

**हकमाल**, पु॰ हक्कमाल.

**हकमी**, स्त्री॰ हकिमी.

**हकलणें**, दे॰ हाकलणें.

**हकहलाल**, ३लिं॰ हक्कमालओपदार्थतो.

**हकाचा**, ३लिं॰ हक्काचा.

**हकाटा**, पु॰दे॰ हाकाटा.

**हकाटी**, स्त्री॰ दे॰ हाकाटी.

**हकारणी**, दे॰ स्त्री॰ गलबतहाकारण्याचा जो व्यापार ती.

**हकारणें**, दे॰ हाकारणें; २, नावपाण्यांत वलें, इ॰ कांचे योगानें चालूकरणें; ३, अनित्वरेनें पोंचावें म्हणून जासूद, घोडें, इ॰ कांतें पिटणें.

**हकालणें**, दे॰ हांकलणें.

**हकाहाक**, स्त्री॰ हाकाहाक.

**हकिमाई**, स्त्री॰ हकीमपणा.

**हकिमी**, स्त्री॰ हकिमाई.

**हकीकत**, स्त्री॰ कांहींएकप्रकरणाचाजो वाकाती.

**हकीकतनामा**, पु॰ कोणेकाची हकीकत ज्यांतलिहिली असते असाजो कागदतो.

**हकीगत**, स्त्री॰ हकीकत.

**हकीम**, पु॰हिं॰ वैद्य, परंतु हाशब्दयवनी म्हणून यवनजातीय वैद्यांविषयींच रूढ; २, हाकीम.

**हक्क**, पु॰न॰हिं॰ देश, ग्राम, गृह, इ॰ कोणेकअर्थाचाजोस्वामी त्याचें त्यादेशादिकांवर असतेंजें स्वत्व तो तें; २, देशादिकांचे जेंदेशमूख, देशपांडये, शेटये, महाजन, इ॰ स्वामी त्यांस प्रतिवर्षीं किं॰ त्यात्याव्यवहाराचे निमित्तानें जें नियमित इत्यादि द्यावें लागतें तो तें; ३, अभ्यासादियोगानें म्हणेनतसें करीन अशी कोणेकाची सत्ताचा लायाजोगें झालें असतें जें विद्याकलादि तोत्याचा असें म्ह॰; उ॰ झाडावरचढणें हावानरांचा हक्कआहे.

**हक्कदार**, पु॰हिं॰ देशादिसंबंधी हक्कघेणारे जे देशमूख, देशपांडये, इ॰ ते म॰

**हक्कदारी**, स्त्री॰ हक्कदारपणा.

**हक्कमाल**, पु॰ हिं॰ जाअर्थावर ईश्वर इछेनें ज्याचे स्वत्वाचा नियम झालाअसतो तोअर्थ त्याचा; उ॰ पदार्थरस्त्यांत पडला म्हणून चिंता काय आपला हक्कमालअसलातर त्यास कोणीनेणारनाहीं; २, जाअर्थावरजाचें न्यायतः स्वत्वआहे असाजो इत्यादिअर्थतो त्याचा; उ॰ बक्षीसकांहीं देणारहोनातें नद्यालतरनद्या पण चाकरीचा पैसा तोतरमाझा हक्कमाल आहे तोमीं नाहीं सोडणार.

**हक्काचा**, ३लिं॰ हक्कमालरूपजो अर्थतो; २, जें विद्याकलादिजाचा हक्क तो त्याचा

**हग**, पु॰ मनुष्य, मार्जार, डुकर, इ॰ कितीएकाची

जी विष्ठा तो.

**हगओक**, स्त्री॰ मोडशी, इ॰ झाल्यामुळें वारंवार हगावें ओकावें अशीजी विकृति होत्ये ती.

**हगणें**, भक्षिल्या अन्नादिपदार्थांचा पोटांत जमतोजो मल तो; गुद्द्वारानें बाहेर टाकणें किं॰ गुद्द्वारानें जो मलविसर्ग तद्विशिष्ट कोणेकानें होणें; डोळा हगणें म्हणजे पुवासारखा जो मल डोळ्यांतून बाहेर येत असतो तद्विशिष्ट त्याणें होणें; समुद्रानें हगणें म्हणजे पाणी गढूळ व्हावें, घाण सुटावी, अशा अवस्थेतें पावणें; जोंतें, इ॰ कानें हगणें म्हणजे मधला खुंटा कांहींसा ढिला झाल्यामुळें दळतांनां त्याछिद्रानें आंतील पिष्टांश खालीं गाळणें.

**हगंदरी**, **हगंदारी**, स्त्री॰ गुरवाडी.

**हगरड**, स्त्री॰ रा॰ हगवण; २, हगंदरी, इ॰ स्थलीं जी विष्ठा, इ॰ रूप घाण पडली असत्ये ती.

**हगरा**, ३ लिं॰ वारंवार हगत असावें अशा स्वभावाचा जो तो; कांहींएक कार्य करण्याविषयीं ज्याला धैर्य नसतें यत्किंचित् भयसंभावना असतां ज्याचें अवसान सुटतें अशा स्वभावाचा जो त्यास निंदेनें म्ह॰.

**हगरी**, स्त्री॰ शेतखान्यांत वरबसून हगायाचे सोईची सच्छिद्र पाषाणादिकांची जी रचना केली असत्ये ती; २, गलबतांत हगायास बसायाचे सोईचें जें चवकट, इ॰ साधन केलें असतें ती.

**हगवण**, स्त्री॰ वारंवार हगत असावें अशीजी कोणएकास विकृति प्राप्त होती ती; २, ला॰ कांहींएक पदार्थ कोणएकापासून पुनः पुनः तोच तोच उत्पन्न होऊं लागला असतां त्याचे उत्पत्तीस निंदेनें म्ह॰; उ॰ हिला एकजात पोरींचीच हगवण लागली आहे.

**हगवणकर**, **हगवणकरी**, ३ लिं॰ हगवण ज्यास लागली आहे तो.

**हगवणें**, प्रा॰ कोणेकाचे मनांत द्रव्यादि द्यावयाचें नसतां बलात्कारादिकानें तें त्यापासून काढणें.

**हगाड**, स्त्री॰ कों॰ गुरवाड.

**हंगाम**, पु॰ धान्यादिपदार्थ किं॰ कोणेक व्यवहार, इ॰ त्याणीं प्रचुरपणीं उत्पन्न होत असावें, विकावें, चहूंकडून येत असावें, सर्वत्र होत असावें, इ॰ विषयीं त्यांचा त्यांचा मुख्य जो समय तो.

**हंगामशीर**, अ॰ कों॰ हंगाम न जाऊं देतां त्यांतच जिन्नस घेणें, इ॰ कांचें वि॰

**हंगामा**, पु॰ कोणेकानें धावरून पराजित व्हावें म्हणून प्रा॰ अनेकानीं मिळून एकदा आवेशानें शिव्या घाल्या, नानाप्रकारें अधिकउणें बोलावें, शस्त्रें उगारावीं, अशाप्रकारें तुटून पडण्याचा जो व्यापार तो.

**हगिरडा**, ३ लिं॰ हगल्यावर जें गुदप्रक्षालनादि करायाचें शौच तें होईपर्यंत असतीजी अशुचिता ती ज्याचा ठायीं विद्यमान जो तो; २, ला॰ पुरतेपणीं शेवटास न जातां अधुरें राहिलें किं॰ ज्यामध्यें जसा नीटनेटकेपणा, घटमूटपणा, इ॰ असावा तो नाहीं असें जें कोणेक काम तो.

**हगीरमुतीर**, ३ लिं॰ रा॰ अकस्मात् कांहीं भय वाटल्यामुळें किं॰ दुःसह कांहीं शरीरास व्यथा झाल्या

झाल्यामुळें हगमूत सुटे अशा अवस्थेतें पावला जो तो.

**हगुटणें**, कांहींकरिन भयंकर दृष्टीस पडल्यामुळें धरलेला उत्साह, धैर्य, सोडून केवळ भयविव्हळ होणें.

**हगुरडा**, ३लिं॰ दे॰ हगिरडा.

**हगूट**, पु॰ आधारबंधापासून सुटून पतनोन्मुख झालेली जी विष्ठा तो आणि त्यासमयीं हगावें असें वाटायाजोगा होतो जो कलनाविशेष तो.

**हंगें, हंगे**, अ॰ अत्रां; २, इकडे; हा शब्द शूद्रभाषावृत्ति.

**हंगेतंगें**, अ॰ (लावणें॰ करणें॰) कोणेक कर्तव्य गोष्टीविषयीं इदरतिदर करणें.

**हगेरा**, ३लिं॰ हगोला.

**हगेरें**, न॰ हगोलें.

**हगोला**, ३लिं॰ हगानें लिप्त जें वस्त्र तो.

**हगोलें**, न॰ हगोलें जें वस्त्र तें.

**हग्या**, ३लिं॰ हगायास गेलेला जो मनुष्य त्यास म्ह॰; हगायास जातेसमयीं बरोबर न्यावयाकरितां नियमित करून ठेविला असतो जो जोडा, तांब्या, इ॰ त्यांचें वि॰.

**हंचतंच**, न॰ अहंचतंच याचा अपभ्रंश.

**हजबी**, स्त्री॰ हसबी.

**हजर**, ३लिं॰ वि॰ हजीर.

**हजरमजालस**, ३लिं॰ अ॰ हजीरमजालस.

**हजरी**, स्त्री॰ हजीरी.

**हजाम**, पु॰ हिं॰ नापित.

**हजामत**, स्त्री॰ वस्त्रा, कात्री, एणेंकरून डोकी दाढी, मिशी, एतत्संबंधी केश काढण्याचा जो व्यापार ती; २, ते काढायाचे जे केश त्यांस म्ह॰; ३, ला॰ गालिप्रदानादिद्वारा जी कोणेकाची थोडंती ती; कोणेकाची हजामत करणें म्हणजे त्याचें सर्वस्व हरण करून उघडा बोडका करणें.

**हजार**, पु॰ सहस्र.

**हजारा**, पु॰ तिफांशीं सोंगट्यांचे खेळांत नवांचा किं॰ सातांचा जोडा पडतो त्यास म्हा॰ सोंगट्या उडायाचे प्रसंगीं म्ह॰.

**हजारीकारंजें**, न॰ ज्यापासून हजारों धारा एकसमयावच्छेदेंकरून निघाव्या असें जें कारंजें केलें असतें तें.

**हजारीघर**, न॰ रा॰ घराचे आकाराचा एक प्रकार आहे त्या प्रकारचें जें घर तें.

**हजारीपान**, न॰ ज्याचे दोहों बाजूंचे कडांस गर्गें एकएक लवण आलें असतें असें पान तें; प्रा॰ नागवेलीचे पानाविषयीं विशेष प्र॰.

**हजारीमाड**, पु॰ रा॰ वर्षांत ज्या माडावर प्रा॰ हजारनारळ येतात असा जो माड तो.

**हजारों**, ३लिं॰ एक हजार दोन हजार अशा प्रकारें हजार या संख्येनें मेजायाजोगा जो कोणेक अर्थ तो.

**हजारोंहजार**, ३लिं॰ हजारों.

**हजीर**, ३लिं॰ कोणेक कार्याचा ठायीं विनियोग करण्याचा जे व्हां प्रसंग पडेल ते व्हां विनियुक्त होण्याविषयीं सिद्ध अशा रूपानें सन्निहित विद्यमान जो तो; कोणेकास कोणेक अर्थ हजीर करणें म्हणजे हा घ्या म्हणून अवळ आणून देणें

हजीरजबाब, पु॰ हिं॰ प्रसंगीं समयोचित जें उत्तर तो.

हजीरजबाबी, ३लिं॰ हिं॰ हजीरजबाब करण्याविषयीं कुशल जो तो.

हजीरआमीन, पु॰ हिं॰ चोर, इ॰ अपराधी किं॰ अधमर्ण यांस मोकळें सोडायाचें असतां तो आपणास पुनः भेटणार नाहीं ह्मणून कराराप्रमाणें हजीर करून देणारा असा घेतात जो आमीन तो.

हजीरनीस, पु॰ फौज, इ॰ दिकांची हजीरी घेण्याविषयीं नियुक्त केला असतो जो कारकून तो.

हजीरबिगार, स्त्री॰ हिं॰ या गांवचे मनुष्यानें त्या गावांस ओझें, इ॰ पोंचवावें त्या गांवचे मनुष्यानें पुढल्ये गावांस पोंचवावें अशी प्रकारची जी बिगारी ती.

हजीरबिगारी, पु॰ हजीरबिगार वाहणारा जो बिगारी तो.

हजीरमजालस, ३लिं॰ आकचेरीस पंचाईत, इ॰ कोणेक व्यवहार होत असतो त्या कचेरीस त्यास मयीं विद्यमान जो मनुष्य तो; २, अ॰ चौघांसमक्ष, कांहींएक करणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ याचें उत्तर तुह्मीं घरांत सांगणार नाहीं हजीरमजालस कामतें सांगेन.

हजीरी, स्त्री॰ आकर्मादिकाच्या ठायीं असायाचे जे मनुष्य, पशु, शस्त्र, भांडें, इ॰ पदार्थ त्यांची हे हजीर आहेत अशा रूपेंकरून जी तेथें तेथें गणती ती; कोणेकाची कोणेकापाशीं हजीरी लावणें ह्म॰ निवसित रूपेंकरून त्यास त्यापाशीं निरूपित करणें.

हज्जार, पु॰ हजार.

हट, पु॰ हठशब्दाचा अपभ्रंश; २, कों॰ कोणेकाचा कोणेकाशीं असतो जो द्वेष तो.

हटकणें, कोणेकास हाकेनें अभिसंबद्ध करणें; २, तुह्मी कोण कोठील को ठे जातां काय करतां किं॰ हें मीं करूं, मीं हें करतों, तुह्मी अमुक कराल काय, इ॰ रूप भाषणानें कोणेकास अभिसंबद्ध करणें.

हटकून, अ॰ प्रतिज्ञापूर्वक; २, निश्चयकरणें, बोलणें, सांगणें, इ॰ कांचें वि॰; उ॰ त्याणें हटकून निशाण मारलें; २, आवर्जून; उ॰ आह्मी गावांस आवश्यमेव घालों ह्मणजे हटकून आदुस ये तो.

हटखोर, ३लिं॰ हट करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

हटणें, कोणेकानें मागें सरणें; मागें हटणें या स्थळीं मागें या शब्दाचा अर्थ निराळा होत नाहीं; २, दे॰ वरण, पुरण, इ॰ अहाटणें.

हटयोग, पु॰ हठयोगाचा अपभ्रंश.

हटवाद, पु॰ अतिशयित जो हट तो.

हटवादी, ३लिं॰ हटखोर.

हटहटणें, कों॰ हडहडणें.

हट्ट, पु॰ कोणेक गोष्टींविषयीं हें करावें किं॰ हें न येक ऐसें जें एकवार मनांत आलें असतें तद्विषयीं अर्थनाशादि काय होईल तें होउ परंतु करीनच किं॰ नाहींच करणार असा धरिला अंश तो जो आग्रह तो; २, सं॰ बाजार मुख्यार्थीं.

हट्टी, ३लिं॰ हटखोर.

हठ, पु॰ सं॰ हट्ट प्रथमार्थीं.

हठयोग, पु॰ प्राणवायूचा निरोध करून तद्द्वारा अंतःकरण वृत्ति एकाग्र करण्याचा शास्त्रोक्त एक उपाय आहे तो; २, सतत एका पायावर उभें राहणें, अशो

अधोमुख होउन धूम्रपान करावें, वाहूनिरंतर ऊर्ध्वधरावे, इ॰ रूपदुष्कर घोरजें तप त्यास ह्म॰.

**हड**, स्त्री॰ तळें, इ॰ कांतील जी शेवाळी त्यांत एकभेद आहे; २, अ॰ कुत्र्याचें निवारण करत्येसमयीं याचा प्रयोग करितात.

**हडकणें**, ओलेंजें वस्त्र, काष्ट, इ॰ त्याणी थोडें बहूत वाळणें; २. कों॰ विरळपणें विणलेलाजो झांप, वस्त्र, इ॰ पदार्थ त्याणें घट्ट व्हावें ह्मणून पात्या, सूत्र, इ॰ जे त्याचे अवयव ते घट्टपणें बसविणें पक्षीं त्या झांप, वस्त्र, इ॰ कांसही कर्मता.

**हडकी**, स्त्री॰ हाडकी.

**हडगरी**, ३लिं॰ हडगर ह्मणून पेंव आहे तत्संबंधीजें कापड, इ॰ तो.

**हडदा**, पु॰ दे॰ ज्याचे योगाने स्वातंत्र्य रहातनाहीं ज्याची नित्यकाळजी वहावी लागत्ये असेंजें पोरं, बाळें, धंदा, रोजगार, इ॰ रूप कोणेकाचे पाठीशीं खटलें असतें तो.

**हडदें**, न॰ हडदा,

**हडप**, न॰ व्यवहारामध्यें अकाल, इ॰ संबंधी काहीं द्रेय कोणेकाचें द्यावयाचें असतें तें नवारितां तो आपल्यास सोडीत नाहीं ह्मणून विश्रामार्थ त्यापाशीं जें काहीं दुसरें वस्तु मोबादला देउन ठेवितात तें.

**हडपणें**, झडपणें प्रथमार्थी.

**हडपा**, पु॰ काहींपदार्थ आंत ठेवाया करितां फारमोठी करितात जी पेटी तो; २, दे॰ भोंवताली फळ्या लावून भिंतीचे पोटीं फडताळासारखी जीजागा केली असत्ये तो; ३, दादर प्रथमार्थी.

**हडबड**, स्त्री॰ ग्रं॰ दंगा, इ॰ कारणानें कोणेकास होत्ये जी गडबड ती; उ॰ एक ह्मणती धराधरा हडबड झाली वीरां.

**हडबडणें**, दे॰ दंगा, इ॰ कारणामुळें मनुष्यादिकानीं गडबडणें; २, अडमडणें प्रथमार्थी.

**हडबडावणें**, रा॰ हड, दूरहो, इ॰ वाईट शब्दानीं कोणेकास धिक्कृत करणें

**हडवंग**, पु॰ रा॰ कोणएकाचा कोणासंगानीं जो पराकाष्टेचा मत्सर तो.

**हडवंगणें**, कों॰ हटहटणें.

**हडवणें**, कों॰ उंचजो वृक्ष शाखा किं॰ ग्रीवा, इ॰ शरीरावयव, इ॰ पदार्थ त्यातें खालीं वांकविणें

**हडवांगणें**, कों॰ हडवंगणें.

**हडवैर**, न॰ दे॰ हाडवैर.

**हडसणी**, स्त्री॰ हडसण्याचा जो व्यापार ती.

**हडसणें**, पोतें, इ॰ कांत भरलेले दाणें, विणलेले तंतु, इ॰ पदार्थानीं घट्ट बसावें ह्मणून हालवणें, किं॰ आपटणें, इ॰ क्रिया द्वारा आंचक्यानीं विशिष्ट करणें; २, तटकारणें; ३, कापड कव्यानें गिऱ्हाइकास सनंग देत्येसमयीं हें तुला लखलाभ होओ असें ह्मणून खालीं हापटणें.

**हडहड**, अ॰ हड अव्ययार्थी; कोणेकानें कोणेकास हडहड करणें ह्म॰ दुर्भाषणानीं धिक्कारीत असणें.

**हडहडणें**, रोगादि कारणें करून कोणेकानें केवळ रोड होणें,

**हडहडावणें**, रा॰ हडबडावणें.

**हडबडीत**, ३लिं॰ हडहडला जो तो.

हडळ, हडळी, स्त्री॰ दे॰ अरवीण.

हंडा, पु॰ आकारविशेषाचें धातुमय एकपात्र आहे; २, लुगड्यांत एकजाति आहे.

हडि, अ॰ कों॰ हड अव्ययार्थी.

हंडी, स्त्री॰ दुभतें, सैंपाक, इ॰ ज्याद्वारां कडेऔम उर्की असतात त्यांची सामान्यतः संज्ञा परंतु प्रसंगविशेषीं प्र॰; दह्यांडी, उकडहंडी, इ॰ कांबरविशेषेंकरून प्र॰; कोणेकाचे डोईवर हंडी फुटणें म्हणजे खापर फुटणें; २, गंगाळ, कासंडी, यांचे आकाराचें सभादिकांचा शांतीं टांगायाचें जें बिलोरी दीपपात्र असतें ती.

हंडीबाग, पु॰ घरांत स्वयंपाक, दूध, दुभतें, इ॰ संबंधी जे भक्ष्य पदार्थ त्यांवर सर्वदा लक्ष्य ठेवून त्याभोंवतालें फिरत असावें अशास्वभावामुळें या नामानें प्रसिद्ध झालेला एक पुरुष होता त्याचे आरोपानें तादृशस्वभावाचें जें पोर, इ॰ त्यास म्ह॰; २, गारुड्याचे खेळांत धीटपणें नकलेचें भाषण बोलणारा असा एक पोर असतो त्यास म्ह॰; आणि त्याचे आरोपानें धीट बाडगा जो पोरगा त्यास म्ह॰.

हंडीमडकी, स्त्री॰ हंडेंमडकें.

हडूक, न॰ दे॰ हाडूक.

हंडेंभांडें, न॰ हांडेंभांडें.

हंडेंमडकें, न॰ हांडेंभांडें.

हंडेसाडी, स्त्री॰ हंडाद्वितीयार्थी.

हडया, अ॰ दे॰ कावळ्याचें निवारण करण्याचा शब्द आहे.

हडयावर्ण, पु॰ हाडास छिद्र पडून त्यापासून दूरक्त, वाहतें असा जो व्रणरोग होतो तो.

हणागोबा, पु॰ हनुमंतास कोणी म्ह॰; कोणेकास हणगोबा करणें म्हणजे खंडेराव करणें.

हणाणें, हाणणें.

हणमंत, पु॰ हनुमान् शब्दाचा अपभ्रंश.

हणवटी, स्त्री॰ हनुवटी.

हणवंत, हणुमंत, पु॰ हणमंत.

हणू, स्त्री॰ हनुशब्दाचा अपभ्रंश.

हत, ३ लिं॰ काठी, इ॰ कानें ताडिलाओ तो; २, कोणेकानें ठारमारला किं॰ मेलाजो तो.

हतकरवत, पु॰ दे॰ हातकरवत.

हतकरवती, स्त्री॰ दे॰ हातकरवती.

हतगूण, पु॰ दे॰ हातगूण.

हतघाई, स्त्री॰ दे॰ हातघाई.

हतचरक, पु॰ दे॰ हातचरक.

हतचलाखी, स्त्री॰ दे॰ हातचलाखी.

हतचा, ३ लिं॰ दे॰ हातचा.

हतचाळा, पु॰ दे॰ हातचाळा.

हतचाहतीं, हतचेहतीं, अ॰ दे॰ हातचे हातीं.

हतझोंबी, स्त्री॰ दे॰ हातझोंबी.

हतदैव, ३ लिं॰ दैवहीन जो तो.

हतधोंडा, पु॰ दे॰ हातधोंडा.

हतनळा, पु॰ दे॰ हातनळा.

हतपा, पु॰ हातपा.

हतभाग्य, ३ लिं॰ हतदैव.

हतभाता, पु॰ दे॰ हातभाता.

हंतरणें, हांतरणें.

हतरवी, स्त्री॰ हातरवी.

हतरहाट, पु॰ दे॰ हातरहाट.
हंतरी, हंतरी, स्त्री॰ हांतरी.
हतरुमाल, पुं॰ हातरुमाल.
हंतरूण, हतरूण, न॰ आंथरूण.
हतरूणपांघरूण, न॰ आंथरूण, इ॰ तें.
हतरूड, न॰ दे॰ हत्तीला निंदेनें ल॰.
हतलावणी, स्त्री॰ दे॰ हातलावणी.
हतवटी, स्त्री॰ हातवटी.
हतवडा, पु॰ दे॰ हातवडा.
हतवळा, पु॰ दे॰ हातवळा.
हतवीर्य, ३ लिं॰ ज्याचें अंगीं वीर्य राहिलें नाहीं असा जो मनुष्य, औषध, इ॰ तो.
हतसर, पु॰ दे॰ हातसर.
हंता, ३ लिं॰ हनन करणारा जो तो.
हतारवालीं, अ॰ हाताखालीं.
हतानिराळा, ३ लिं॰ अ॰ हातानिराळा.
हतावेगळा, ३ लिं॰ अ॰ हातानिराळा.
हतासरसा, अ॰ हातासरसा.
हताळ, ३ लिं॰ दे॰ हाताळ.
हताळणें, हातळणें प्रथमार्थी.
हतेर, न॰ हत्यार.
हतेरबंद, ३ लिं॰ हत्यारबंद.
हतोटी, स्त्री॰ हातवटी.
हतोडा, पु॰ दे॰ हातोडा.
हतोडी, स्त्री॰ दे॰ लाहान जो हतोडा ती.
हतोहात, अ॰ दे॰ हातोहात.
हतोळा, पु॰ हातवळा.
हत्त, अ॰ कोणी पशुपक्षी इ॰ जवळ आले असतां त्यांचे निवारणाविषयीं याचा प्र॰ करितात; २, कोणेक अर्थाचा अधिकार, तिरस्कार, इ॰ कर्तव्य असतां उद्गारासारिखा केवलाचा किं॰ शिवी, इ॰ ननच्छब्दामागें याचा प्र॰ होतो; उ॰ हत् वेड्या सीं असें बोलूं नको; हत् त्याचारे, हत् त्याचीय लाव, इ॰ प्र॰.
हत्ता, पु॰ दंड काढतेसमयीं हाताखालीं धरायाकरितां विटेच्या आकाराचें लांकूड, दगड, इ॰ कांचे किं॰ भुईवर ओटयासारखें साधनभूत पदार्थ करितात ते प्र॰.
हत्ती, पु॰ सर्वपशूंपेक्षां आकारानें मोठा असा एक वन्यपशु आहे जाला राजादिक वाहनलें करून वाळगीत असतात तो; ल॰ हत्तीचे पायांत सा यांचे पाय; ल॰ हत्तीचे दाखवायाचे दांत वेगळे आणि खावयाचे वेगळे; २, हस्त ह्मणून जें महानक्षत्र त्यास ल॰.
हत्तीचापाय, पु॰ ज्याचे आश्रयानें उत्तम रीतीनें आपला निर्वाह होउन आणखी लोकांचा होत असावा असें मोठें जें राज्य, देश, शेत, वतन, इ॰ तो.
हत्तीचेंमडें, न॰ ला॰ मोठेपणामुळें दुर्निर्वाह जें कांहीं एक संसारादि खटलें त्यास ल॰.
हत्तीमहाल, पु॰ हत्ती बांधावयाकरितां जी जागा केली असते ती.
हत्या, स्त्री॰ सं॰ मनुष्यादिकांचा जो वध ती आणि तज्जन्य जें पातक ती; २, ला॰ केवळ मरतुकडा जो मनुष्यादि त्यास निंदेनें ल॰; स्त्री॰ हत्या, गोहत्या, ब्रह्महत्या, इ॰ स॰.

हत्याण, न॰ घोडें, गाढव, खेचर, एतज्जातीय स्त्रियांस मैथुन करून घ्यावें अशी जी अवस्था प्राप्त होत्ये तें; घोडी इ॰ कानें हत्याण करणें म्ह णजे त्याणी हत्याणास येणें.

हत्यार, न॰ शस्त्र.

हत्यारबंद, ३ लिं॰ ज्याचे जवळ तरवार, इ॰ हत्यार आहे असा जो प्यादा, स्वार, इ॰ शिपाई तो.

हत्यारा, ३ लिं॰ ज्यास हत्या घडली आहे तो; प्रा॰ समासीं प्र॰; उ॰ बाळहत्यारा, ब्रह्महत्यारा, इ॰.

हद, स्त्री॰ हद्द.

हदगा, पु॰ अगस्ता.

हदरणें, एकास्थलीं आघातादि झाल्यामुळें त्याचे आसमंतात प्रदेशस्थ धों त्या भूमि, इ॰ कानीं कंपविशिष्ट होणें.

हदहदणें, दे॰ हदरणें; २, कों॰ अनेक दुःखें इ॰ प्राप्त होउन कोणेकानें बहुत गांजलें जाणें.

हद्द, स्त्री॰ सीमा.

हनन, न॰ सं॰ तरवार, इ॰ केंकरून कोणेक पदार्थ तोडण्याचा जो व्यापार तें; २, काठी, इ॰ केंकरून जें ताडन तें; ३, शस्त्रादिकें करून कोणेकास ठार मारण्याचा जो व्यापार तें.

हननीय, ३ लिं॰ सं॰ ज्याचें हनन करणें योग्य तो.

हनवट, पु॰ स्त्रियांचें एक पादभूषण आहे.

हनवटी, स्त्री॰ हनुवटी.

हनु, स्त्री॰ सं॰ हनवटी.

हनुमज्जयंती, स्त्री॰ चैत्री पौर्णिमा रूप जो हनुमंताचा जन्मदिवस ती.



हनुमंत, पु॰ हनुमान्.

हनुमान, हनूमान्, पु॰ वानररूपी एक ईश्वराचा अवतार आहे.

हनुवटी, स्त्री॰ खालचे ओंठाचे खालीं जो उंचवट अवयव आहे तो.

हपका, पु॰ अपका.

हपटणें, आपटणें.

हपशी, पु॰ एक यवनांत जाति आहे.

हपसाण, न॰ हपशाचें जें राज्य तें.

हपसाणी, ३ लिं॰ हपसाण संबंधी जो पैसा, चाल, इ॰ तो.

हपाप, पु॰ प्रा॰ तळतळाट या अर्थी, दे, घे, धा॰ योगीं प्र॰; म्ह॰ हपापाचा माल गपापा गेला.

हप्ता, पु॰ सर्कार किं॰ सावकार यांचें द्याव याचें जें द्रव्य तें एकदांच द्यावयास अनुकूल पडत नाहीं म्हणून अंशतः अंशतः द्यावयास जे काळावधि नियमित केले असतात ते प्र॰ आणि त्यात्या अवधीस द्यावयास ठरविला असतो जो द्रव्यांश तो.

हप्तेबंदी, स्त्री॰ हप्त्यांचा जो ठराव केला असतो ती.

हबकणें, कोणेकास हबका प्रथमार्थानें विशिष्ट करणें.

हबका, पु॰ पदार्थास आघात झाल्यामुळें किं॰ गतीचा जो आरब्धवेग तो न संपतां अकस्मात् दुसरा विरुद्ध वेग प्राप्त झाल्यामुळें जो त्यास विलक्षण चलनात्मक संस्कार प्राप्त होतो तो; उ॰ गाड्यावर बसून चाललें म्हणजे अंगास हबके बसतात; २, हपका.

हंबरडा, पु॰ गाय, बैल, यांचाजो स्वजातीय मोठा शब्द तो.

हंबरणें, गाय, बैल, याणीं स्वजातीय शब्द करणें.

हंबा, अ॰ गोजातीय पशूंचे शब्दाचें अनुकरण; २, स्त्री॰ बालांचे भाषेनें गोजातीय पशूस म्ह॰.

हंबां, अ॰ हंबा प्रथमार्थी; न॰ हंबा द्वितीयार्थी.

हंबारणें, हंबरणें.

हंबेतुंबे, स्त्री॰ न॰ अरेतुरे.

हंबेलंडी, स्त्री॰ रा॰ हलबेलंडी.

हमखास, अ॰ चोरून, मारून, लपून, छपून, असें नव्हे सर्वत्र प्रसिद्धपणें; उ॰ अडल्यावेळेस कोणी कमजाजती देउ पण हमखास दर म्हणा ल तर बारा रुपये खंडी आहे; मी हमखास रुपये दिले आणि तो नाहीं म्हणतो; २, खामाखाय.

हमजात, स्त्री॰ मनुष्यादिकांचीजी जाति ती.

हमरस्ता, पु॰ सर्वजा मार्गानें जातयेत असतात असाजो राजमार्ग तो.

हमरहा, पु॰ हमरस्ता.

हमरा, पु॰ कों॰ जेथें सोंवळें ओंवळें, नाजुकपणा, नीटनेटकेपणा, इ॰ कांची व्यवस्था राहतनाहीं असेंजें कार्यप्रयोजन संबंधी भोजनाचें मोठें खटलें त्यास म्ह॰.

हमरातुमरी, हमरीतुमरी, स्त्री॰ हंबेतुंबे.

हमरू, पु॰ एक वस्त्र विशेष आहे.

हमा. अ॰ स्त्री॰ न॰ हंबां.

हमामखाना. पु॰ हिं॰ स्नान, जलक्रीडा, इ॰ अर्थ बांधून जें जलस्थान करितात तो.



हमामा, पु॰ गुराखी, इ॰ पोरांचा एक खेळ आहे; २, ला॰ धिंगाणा.

हमाल, पु॰ पेंठ, बंदर, इ॰ कांच्या ठायीं धान्यादिकांचेंओझें आपल्या अंगें इकडचें तिकडे तिकडचें इकडे अशाप्रकारें मजूरीनें वाहून उपजीविका करितोजो पुरुष तो; २, मेणा, डोली, इ॰ वाहणाराजो भोई त्यास क्वचित् म्ह॰.

हमाली, स्त्री॰ हमालपणा; २, हमालास द्यावी लागत्येजी मजूरी ती.

हमिणी, स्त्री॰ कसा द्वितीयार्थी; २, ला॰ कों॰ डचोलें.

हमी, स्त्री॰ देणें, घेणें, इ॰ व्यवहारीं याणें तुला द्यावयाचें तें न दिल्यास मी जातीनिशीं देईन किं॰ याणें करायाचें तें न केल्यास मी जातीनिशीं करीन याप्रकारचें जें आपले खातरीसाठीं तिसऱ्याचें वचन घेतात ती.

हमीटमी, स्त्री॰ हमी, इ॰ ती.

हमीदार, पु॰ कोणेकविषयीं ज्याणें हमी दिली आहे तो.

हमीश, अ॰ हमेश.

हमीर, पु॰ कल्याणरागाचा एक भेद आहे.

हमेणी, स्त्री॰ कों॰ हमिणी द्वितीयार्थी.

हमेश, हंमेश, हमेशा, हंमेशा, अ॰ नित्यशः.

हय, पु॰ सं॰ अश्व.

हयगई, हयगय, हयगयी, स्त्री॰ कोणेक कर्तव्य कार्याविषयीं अगत्य धरून जेव्हांनें तेव्हां करावें तें न करितां आज करूं उद्यां करूं

एव्हांनाहीं केलें तर काय होतें, इ० रूपकरितात जी अनादरबुद्धि ती.

ह्यता, ३ लिं० रा० अंगुलीनें निर्देश्य असून केवल जवळचा नव्हे परंतु दृष्टीनें वेधलेला असा जो कोणेक अर्थ त्याचें परामर्शक हें सर्वनाम: उ० याचीमी तुला गोष्ट नाहीं सांगीतली ह्यता शेवटास बसला आहे तो त्याचीगोष्ट; तो शब्दापासून जसे तिकडचा, तिकडे, तसा, तेवढा, तिथे, इ० होतात तसे या शब्दापासून ही, ह्यतिकडचा, ह्यतिकडे, ह्यतसा, ह्यतेवढा, ह्यतिथे, इ० शब्द होतात तेथे तो शब्दाचे अर्थाचे स्थानीं ह्यता या शब्दाचा अर्थ संबद्ध करून विशिष्ट शब्दाचा अर्थ तद्वत् जाणावा.

ह्यराण, ३ लिं० हैराण.

ह्यराणगत, स्त्री० हैराणगत.

ह्यवान, ३ लिं० दुरवणं किं० उपास किं० मजल चालणें, इ० श्रम, इ० यत्किंचित् त्रास झालें असतां थकतो कोमेजतो अशा स्वभावाचा जो मनुष्यादि जीव तो.

ह्यहाय, अ० दे० हायहाय.

ह्यास, अ० (येणें) मट्यास येणें.

ह्यासा, पु० घोड्याचा तंग आवळणें इ० उपयोगी सुमार बोटभर रुंद आणि दोन तीन हात लांब जी वादी असत्ये तो.

ह्रर, पु० सं० महादेव; २, भाजक; ३, चोर; ४, जोजा अर्थाचें हरण करणारा तो तद्धर; पित्तहर, कफहर, ज्वरहर; वातहर, इ० स०; ५, अ० प्रत्येकीं हा याअव्ययाचा मूळचा अर्थ दरया अव्ययासारखा इतरशब्दांचे मागें योग होउनच प्र० होतो परंतु प्र० संकुचित; उ० हरघडी, हरवख्त, इ० याभाषेंत भल्रता यच्चयावत् अनेकरूप असे कांहीं इतरही अर्थ भासतात त्या अर्थांस धरून जे शब्दविशेष प्रसिद्ध आहेत ते क्रमानें त्यात्या स्थलीं लिहितों.

ह्ररउपाय, पु० नानाप्रकारचे अनेक उपाय ते.

ह्ररएक, ३ लिं० जोजो कोणी तोतो; उ० हरएक मनुष्यासमागमें पत्रपारखून संतोषवीत असावें; हीगोष्ट हरएक मनुष्यास ठाउक आहे.

ह्ररकत, स्त्री० देणें, घेणें, चाकरी, इ० व्यवहारीं चालण्याची जी सरळ रीति ती सोडून विरुद्धरीतीनें जें प्रतिकूल वर्तन ती; २, होणारे कार्यास प्रतिकूल वर्तनानें कोणी करितो जें विघ्न ती.

ह्ररकतखोर, ३ लिं० हरकत करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

ह्ररकती, ३ लिं० हरकतखोर.

ह्ररकल, पु० भातांत एक जाति आहे.

ह्ररकलपटणी, स्त्री० रा० हरकल.

ह्ररकसबी, ३ लिं० अनेकप्रकारचीं कसबें ज्याचे अंगीं आहेत तो; २, पु० हरकामी प्रथमार्थी.

ह्ररकाम, न० प्रसंगवशात् उपस्थित होणारें जेंजें काम तें.

ह्ररकामी, पु० जें पडेल तें काम करावें अशी चाकरीनें ठेवितात जो मनुष्य तो; २, ३ लिं० जें म्हटलें तें काम ज्याचे अंगीं आहे असा जो मनुष्य तो आणि अनेक कामावर उपयोगी पडाया

डायाजोगा जो शस्त्र,वस्त्र,पात्रादिपदार्थ तो.

**हरकाम्या**, ३लिं॰ पु॰ हरकामी.

**हरकारा**, पु॰ क्वचित्स्थली कागद, निरोप, इ॰ पोहोंचवावा किं॰ कोणेकास बोलावून आणावें, कोणेकास कांहींएक गोष्टीविषयीं ताकीद करावी, इ॰ कामावर नियुक्त केलेला जो राजा, सरदार, इ॰ कांपाशीं सेवक, मनुष्य, असतो आचे हातीं गोंडा लाविलेली काठी असत्ये तो.

**हरकी**, स्त्री॰ वादी किं॰ प्रतिवादी यांतून आचा वादखरा होतो तो आपल्यास हर्ष झाल्यामुळें जें सर्कारास कांहीं द्रव्य देतो ती; २, हारवलेली वस्तु सांपडली किं॰ मोठा कांहीं लाभ झाला, इ॰ कारणानें आपणास हर्ष झाला असतां हारवलेली वस्तु देणार, किं॰ आपासून लाभ होतो तत्संबंधी चाकरमाणसें, इ॰ किं॰ आपले इष्टमित्र, इ॰ त्यांस जें कांहीं द्रव्यादि देतात ती.

**हरकेंड**, न॰ रा॰ केंड; निंदेनें प्रसंगविशेषीं हरकांस म्ह॰.

**हरकेण**, न॰ रा॰ हरकांचें जें तृण तें.

**हरकोणी**, ३लिं॰ भलता कोणी.

**हरकोल**, पु॰ हरकल.

**हरघडि**, अ॰ वारंवार.

**हरजिनशी**, ३लिं॰ अनेकप्रकारचे किं॰ अनेक जातीचे अर्थांतर भेदानीं विशिष्ट जो सामान्यरूप कोणेक अर्थ तो; उ॰ त्याचे दुकानीं लहानमोठे गोउअंबट असे हरजिनशी अंबे आहेत; त्याचे बागेंत हरजिनशी झाडें आहेत; हरजिनशी लिहिणें लिहावें लागतें.

**हरजिन्नस**, पु॰ अनेकप्रकारचा जो जिन्नस तो.

**हरडा**, पु॰ कों॰ एक झाड आहे त्याचें फल तो; २, ला॰ त्या फळाचे आकाराचें जें निशाणाची काठी, पर्श्या, इ॰ कांस गोंड असतें त्यास म्ह॰.

**हरडी**, स्त्री॰ रा॰ बालहरीतकी;

**हरण**, पु॰ न॰ हरिण शब्दाचा अपभ्रंश; २, स्त्री॰ हरणी; ३, ऐरण; ४, न॰ कोणेकाचे द्रव्यादिकांचा जो अपहार तें; उ॰ वाटेनें चोरानी मासे वस्त्रालंकारांचें हरण केलें; ५, कोणेक अधिकरणापासून कोणेक अर्थ नेण्याचा व्यापार तें.

**हरणाकाळजी**, स्त्री॰ कोणेक वस्तु गेलें हारवलें असतां तद्विषयीं ची लागत्ये जी काळजी ती.

**हरणाटोळ**, स्त्री॰ सापटोळी.

**हरणी**, स्त्री॰ हरिणी शब्दाचा अपभ्रंश.

**हरणें**, कोणेकानें कोणेकाचा द्रव्यादि अर्थ अपहृत करणें किं॰ पाप, दुःख, संकट, इ॰ परिहृत करणें; २, वाद, युद्ध, द्यूत, उपदेश, दमन, इ॰ व्यापारीं ती ती आपली शक्ति दुसऱ्यावर चालवावी अशी इच्छेनें प्रवृत्त असतो जो कर्ता त्याणें ती शक्ति चालेनाशी झाल्यामुळें थकणें; या अर्थी त्याची शक्ति, बुद्धि, इ॰ कांसही विवक्षानुरूप कर्तृता येत्ये; ३, द्यूतादिव्यवहारीं पणभूत जें द्रव्यादि तें आपण जिंकणें; उ॰ त्याणें पहिल्या डावास शंभर रुपये मांडले होते ते मी हरले; मी रुपया हरलों, इ॰ स्थलीं रुपयारूप जें पणभूत द्रव्य तें

दुसऱ्यानें जिंकिल्यामुळें हारीनें विशिष्ट झालें अशाप्रकारें अर्थ आणावा.

**हरतऱ्हा**, स्त्री॰ कोणेकगोष्टीविषयीं अनेक नानातऱ्हा त्या.

**हरताळ**, स्त्री॰ पु॰ हरितालशब्दाचा अपभ्रंश; पेंठ, बाजार, इ॰ कांचा गावीं हरताळ पाडणें स्न॰ सर्कारी उपद्रव, इ॰ कांहीं कारणामुळें वाणी, इ॰ उदम्यानीं आपलालीं दुकानें लावून व्यवहार बंदकरणें; कोणेकपदार्थाची हरताळ पडणें स्न॰ तोतो पदार्थ कांहीं कारणानें दुर्मिल होणें.

**हरताळका**, स्त्री॰ पु॰ हरितालिकाशब्दाचा अपभ्रंश.

**हरदमख्याल**, पु॰ कोणेकव्यवहाराविषयीं नानाप्रकारचा युक्ति प्रयुक्ति, डावपेंच, उलीं ढालीं, जीं करावीं लागतात तो.

**हरदमख्याली**, ३ लिं॰ ज्याचेअंगीं हरदमख्याल आहेत तो.

**हरदावळ**, स्त्री॰ घोड्याचे पुढल्या दोनपायांचे मध्यें पुढले बाजूस दुष्टगुणसूचक एक चिन्हआहे ती.

**हरदाशी**, ३ लिं॰ हरदाससंबंधी जें घोडें, वेश, सूर, वीणा, इ॰ तो.

**हरदास**, पु॰ हरिदास.

**हरदू**, ३ लिं॰ दोघेजण; याचा प्र॰ प्रा॰ लेखांत होतो; २, स्त्री॰ गंजिफांचे खेळांतील एका, दुवा, इ॰ जेलगत दोन हुकूम त्यादोघां मिळून जीतलफ देतात ती.

हर

**हरडू**, न॰ हारदशब्दाचा अपभ्रंश.

**हरप**, पु॰ हरफ.

**हरपणें**, कोणेकअर्थानें आपल्यापासून पतनादिकरणानें वियुक्त होउन अज्ञातठिकाणी लागणें.

**हरपररेवडी**, स्त्री॰ एकझाडआहे; २, त्याचें फळ ती.

**हरप्रयत्न**, **हरप्रेत्न**, पु॰ कोणेककार्याविषयीं अनेकप्रकारचे जे प्रयत्न ते.

**हरफ**, पु॰ अक्षर; परंतु हा यवनी शब्द समजून फारशी अक्षराविषयींच प्र॰

**हरबटणें**, कों॰ हस्तपादाद्यवयव, पात्र, इ॰ पदार्थानीं चिखल, पिष्ट, इ॰ कांचा लेपानें युक्त होणें.

**हरबरा**, **हरभरा**, पु॰ एक द्विदल धान्य आहे.

**हरभांस**, ३ लिं॰ अनेकप्रकारचे अनेकव्यवहारीं ज्याचें शहाणपण चालतें आणि लटली ती विद्या कला ज्याचेअंगी थोडी बहुत असते असा अष्टपैलू जो मनुष्य तो; २, कों॰ हरजिनशी.

**हरभास**, ३ लिं॰ दे॰ हरदमख्याली.

**हरयुक्ति**, स्त्री॰ कोणेककार्याविषयीं नानाप्रकारचाजा युक्ति त्या.

**हरला**, पु॰ रा॰ पर्जन्यसंबंधीउदक एकत्रजमून पाटासारिखा वहातो जो त्याचा प्रवाह तो आणि तो प्रवाह वहायाचा जो मार्ग तो

**हरवखूल**, अ॰ हरघडी.

**हरवणें**, द्रव्य, वतन, प्रतिष्ठा, इ॰ आपल्यापाशीं असतें जें कांहीं एकतें घालवणें, अनवधानतेमुळें भलतेथें विसरणें, इ॰ कोणेक

णेक कारणानें गमावणें; २, वाद, युद्ध, इ॰ कांत प्रतिपक्षी जो कोणी तो हरे असा करणें.

**हरवाळ**, ३लिं॰ हळवार.

**हरहमेश**, अ॰ हमेशा.

**हरहरमहादेव**, पु॰ भोजनास बसल्येवेळेस किं॰ युद्धादिकाचेसमयीं एकदम हल्ला कर्त्तव्य असतां अनेकजण एकसमयावच्छेदें करून या चाउच्चार करितात; २, कांहीं एक पदार्थाचा एकाएकी नाश झाला असतां त्यास ल॰.

**हरहुनर, हरहुन्नर**, पु॰ न॰ नानाप्रकारचे जे हुनर ते तीं.

**हरहुनरी**, ३लिं॰ हरहुनर ज्याचे आंगीं आहेत तो.

**हरळ**, पु॰ वांग्या, मिरच्या, इ॰ कांचें रोप लावाया करितां किं॰ कांहीं अन्यकार्यार्थ व्यवसारिखी लांबट करितात जी खळी तो.

**हरळा**, पु॰ सं॰ हरला.

**हरळी**, स्त्री॰ तृणामध्यें एकजाति आहे; २, अ रोळी, शूद्रभाषा वृत्तिः.

**हरळीचीमुळी**, स्त्री॰ हरळी मुळास कटही उपट ली असतां तीचा बीजभूत मूलांश यत्किंचित् तरीं भुईंत असतो तद्वत् एकाएकी नाहींसाव्हा वयाचा नाहीं असा जो कोणेकस्थलचा वतनदा र त्यास प्रसंगविशेषीं ल॰.

**हरा**, पु॰ दे॰ वेळूचे कांबीची मोटीजी पांटी तो.

**हराम**, ३लिं॰ लबाडी, लच्चाडी, फंद, फितूर, इ॰ रूप लोकशास्त्रविनिंद्य असें अन्याय्य जें कर्म किं॰ तादृश कर्म करणारा जो मनुष्य तो.

**हरामखोर**, ३लिं॰ हरामकर्म केल्यामुळें जो दो षी तो.

**हरामखोरी**, स्त्री॰ हरामखोराचें जें कर्म ती.

**हरामजादा**, ३लिं॰ हिं॰ हराम; २, दुसऱ्यास ठकवावें आपण एकाएकी ठकूं नये असा धूर्त जो मनुष्यादि तो.

**हरामाचा**, ३लिं॰ मेहेनत न करितां लबाडी, लच्चाडी, इ॰ कानीं संपादिला जो पैसा, इ॰ माल तो.

**हरामी**, ३लिं॰ हरामजादा; २, स्त्री॰ हरामपणा.

**हराष, हरास**, पु॰ वाणिज्यादि व्यवहारीं कांहीं एककारणानें होत्ये जी हानि ती.

**हराषकाळ, हरासकाळ**, पु॰ संपत्ति, इ॰ कांचा उत्तरोत्तर ऱ्हास होउं लागावा असा जो कोणेकास प्रतिकूल कालप्राप्त होतो तो.

**हरि**, पु॰ सं॰ विष्णु ह्मणून जो देव तो; हरिसत्ता, हरिकथा, हरिकीर्तन, हरिभजन, इ॰ स॰; २, अश्व, इंद्र, सिंह, वानर, बेडूक, सूर्य, इ॰ कितीएकांची संस्कृतांत संज्ञा आहे.

**हरिण**, पु॰ एकवन्यपशु आहे जो गानाविषयीं बहुतलुब्ध असतो.

**हरिणी**, स्त्री॰ हरिणजातीय स्त्री ती.

**हरित**, ३लिं॰ सं॰ हिरवा जो रंग तो; २, तद्विशिष्ट जो वस्त्रादि पदार्थ तो.

**हरिताल**, सं॰ पु॰ न॰ एकपीतवर्ण उपरसध्या हे तो तें.

**हरितालिका**, स्त्री॰ भाद्रपदशुक्ल तृतीया; २, त्यादिवशीं पूजनार्थ जी देवीचीमूर्ति करितात ती.

**हरिदास**, पु॰ ईश्वरापुढें वीणादि घेउन उभ्या नीं जो ईश्वराचा किं॰ तद्भक्तांचा गुणाचें कीर्त्तन करीत असतो तो.

**हरिदिनी**, स्त्री॰ एकादशीस म्ह॰.

**हरिद्र**, न॰ दे॰ हरद्र.

**हरिद्रा**, स्त्री॰ सं॰ हळद.

**हरिवासर**, पु॰ द्वादशीचा जो प्रथम पाद तो, जांत भोजन करूं नये असें सांगीतलें आहे; २. आषाढ, भाद्रपद, कार्तिक, एतत्संबंधी शुक्लपक्षीय द्वादशी तिथीचा आणि अनुराधा, श्रवण, रेवती, या नक्षत्रांचा जो योग त्यास हीं म्ह॰.

**हरीक**, पु॰ कोद्रू लणून जें धान्य तो; २, हर्ष शब्दाचा अपभ्रंश.

**हरीख**, पु॰ हर्षशब्दाचा अपभ्रंश.

**हरीतकी**, स्त्री॰ हरडा.

**हरीप, हरीफ**, पु॰ शौर्यादिगुणानीं कोणेकाचें दमन करण्याविषयीं जो समर्थ तो.

**हरूष**, पु॰ ग्रं॰ हरीख.

**हर्ख**, पु॰ ग्रं॰ हरीख.

**हर्तकी**, स्त्री॰ हरीतकी शब्दाचा अपभ्रंश.

**हर्ता**, ३ लिं॰ हरण करणारा जो तो.

**हर्ष**, पु॰ इष्टलाभ किं॰ अनिष्टाचा नाश त्यामुळें सुख होउन अंतःकरणाचा जो प्रफुल्लितपणा होतो तो.

**हर्षण**, पु॰ सत्तावीस योगांतील चौदावा जो योग तो.

**हर्षणें**, कोणेकानें हर्षानें युक्त होणें.

**हर्षवायु**, पु॰ अतिशयित द्रव्यादिलाभामुळें हर्ष होउन जो वायु होतो तो.

**हर्षामर्ष, हर्षामर्षा**, पु॰ दे॰ कोणेक कारणास्तव होतो जो परस्परांचा अरेतुरे, गालिप्रदान, इ॰ रूप व्यापार तो.

**हर्षित**, ३ लिं॰ हर्ष लाजो तो.

**हल**, पु॰ सं॰ नांगर.

**हलक**, ३ लिं॰ दुखणें, श्रम, इ॰ कारणामुळें जो निःशक्त झाला तो वत्याची प्रकृति इ॰ तो; २, स्त्री॰ गाणाराचे गळ्यांत जी फिरक असती ती.

**हलकडी**, स्त्री॰ कों॰ नथीस खालीं जो बाया जोग्या जा मोत्यांचा झिळमिळ्या लावितात त्या सर्व मिळून जो समुदाय ती; २, दुर्कांशीं नथेस मोत्यें ओवाया साठीं जो दुसरा तुकडा जडवीत असतात ती.

**हलकथील**, न॰ दे॰ चित्रें, इ॰ कांस रंग देण्याचे उपयोगीं एक पदार्थ आहे.

**हलकलणें**, दंगाधोपा, अग्न्युत्पात, इ॰ भयजनक कारणामुळें देश, ग्राम, जनसमुदाय, इ॰ कानीं गडबडणें.

**हलकल्हई**, स्त्री॰ दे॰ हलकथील.

**हलका**, ३ लिं॰ जडाप्रतिपक्षी जो अर्थ तो; २, जामध्यें वेगादिजन्य बल किं॰ प्रमाण न्यून असा जो द्रव्यक्रियादिरूप कोणेक अर्थ तो; उ॰ अमलाविषयीं अफूपेक्षां भांग हलकी; कोंकणचें माप देशचे मापाहून हलकें आहे; बळानें तोडून को हलकें तोड; ३, पु॰ झोपाळा, पाळणा, इ॰ कांचा दोऱ्या, इ॰ अडकावयाचे

चे उपयोगी जे लोखंडाचे दर्शांकासारखे आं कडे करितात ते म०.

**हलकारत**, स्त्री० रा० हलकारती.

**हलकारती**, स्त्री० आंतदीपलावून देवास ओं वाळायाचे उपयोगी ओंबट आणि चापट असें एक धातुमयपात्र आहे.

**हलकारा**, पु० हरकारा.

**हलकावणें**, कोणेकातें हलकें करणें.

**हलक्यानें**, अ० लघुप्रमाणानें; कोणेक क्रियाकरण्याचें वि०; उ० मोठ्यानें बोलूं नको, हलक्यानें बोल, हलक्यानें चाल.

**हलकी**, स्त्री० एक चर्मवाद्य आहे.

**हलख**, ३ लिं० हलक.

**हलगती**, ३ लिं० हलगत म्हणून एक पेंड आहे तत्संबंधी जें कापड, इ० तो.

**हलगी**, स्त्री० हलकी.

**हलचाल**, स्त्री० हालचाल.

**हलणें**, हालणें.

**हलबेलंडी**, स्त्री० कांहीं एक संकट, दुखणें, इ० कारणामुळें कोणेकाची होतीजी दुरवस्था ती.

**हलमस्त**, ३ लिं० हालमस्त.

**हलवई**, पु० हलवाई.

**हलखूद**, ३ लिं० अवजडाचा प्रतिपक्षी जो शरीर, ओसें, इ० पदार्थ तो.

**हलवा**, पु० वर थोडा थोडा साखरेचा पाक घालून हलवून अग्निसंयोगानें वर त्या साखरेचा कांटा उभारा हीअसे सिद्ध केलेजे तीळ, वेलदोड्यांचे दाणें, लवंगा, इ० पदार्थ तो; २, मिठाई साखरचा एक पदार्थ आहे; ३, एक मत्स्यांत जाति आहे.

**हलवाई**, पु० पेढे, बर्फी, गांठ्या, हलवा, इ० मिठाई आपण करून विकावी अशा व्यापारावर उपजीवन करितो तो.

**हलवान**, न० चौहांश शालओढीचा जो एक फर्द तें.

**हलहलीन**, ३ लिं० लटल्यावेळेस उपयोगीं पडायाजोगें जें पदरीं कांहीं द्रव्य राखित असतात तें आपाशीं नाहीं तो.

**हलाक**, ३ लिं० हलक मयमार्थी.

**हलाकी**, **हलाखी**, स्त्री० उपास, दुखणें, इ० कारणामुळें जो हलकपणा येतो ती; २, ला० खर्चावेचाची ओढ असल्यामुळें जी संकटावस्था होतेती.

**हलाल**, ३ लिं० ग्रहणकरणें, भक्षिणें, इ० विषयीं विहित जो कोणेक अर्थ तो; बकरा, इ० पशु, इ० कांस हलाल करणें म्हणजे यवनशास्त्रोक्त विधीनें संस्कारपूर्वक मारणें; २, हयगय, कपट, इ० न करितां शरीरास कष्ट देऊन करितात जें सेवादिरूप काम त्याचें वि०. तादृश कष्टकरून संपादिलेलें जें द्रव्यादि त्याचें वि०.

**हलालखोर**, पु० वेतन मजूरी घेऊन शेतखाना, इ० कांतील विष्ठा काढून बाहेर टाकावी या कर्मावर उपजीवन करणारी अशी एक मनुष्यांत जाति आहे.

**हलालखोरी**, स्त्री० हलालखोराचें जें कर्म ती; २, ला० केवळ कनिष्ठ जी चाकरी, इ० त्यास म्ह०;

२, ३ लिं॰ हलालखोरसंबंधी जी भाषा, वेष, इ॰ तो.

**हलालाचा**, ३लिं॰ वास्तविक रीतीनें चाकरी, कष्ट, इ॰ करून संपादित जें द्रव्यादि तो.

**हलाहल**, न॰ सं॰ हालाहल.

**हलीहाल**, अ॰ हालीहाल.

**हल्या**, पु॰ रेडा.

**हल्लु**, पु॰ हाल.

**हल्लुक**, ३लिं॰ हलक प्रथमार्थं.

**हल्ला**, पु॰ शत्रु, किल्ला, इ॰ जिंकून आत्मसात् करावया करितां सेना, सैनिक, इ॰ कानीं आवेशपूर्वक त्यावर एकदम चालून जाण्याचा जो व्यापार तो; २, कोणे क अर्थावर तत्तत्क्रियेचा संबंध करण्याविषयीं किं॰ तत्तत्क्रिया द्वारा कोणेक कार्य करण्याविषयीं जो आवेशपूर्वक झटण्याचा व्यापार; उ॰, सगळ्यानीं जेव्हां त्याविहिरीवर हल्ला केला तेव्हां तें काम लौक र संपलें, तुह्मी सांप्रत लिहिण्यावर फारसा हल्ला मां डला हे काय.

**हल्लाहरकत**, स्त्री॰ हरकत, तंटा, बखेडा, इ॰ ती; उ॰, हा गृहस्थ बरा आहे रुपये दिल्हे असतां कांहीं हल्ला हरकत करणार नाहीं; यावाटेनें तुह्मी खुशाल जा कोणी हल्लाहरकत करणार नाहीं.

**हल्लीं**, अ॰ प्रस्तुतकालीं.

**हवई**, स्त्री॰ भा॰ मोडीजी चंद्रजोत ती.

**हवदा**, पु॰ हौदा.

**हवन**, न॰ देवतोद्देशानें भात, घृत, इ॰ पदार्थ अग्नींत टाकण्याचा जो व्यापार तें.

**हवरा**, ३लिं॰ दु॰ हावरा.

**हवरी**, स्त्री॰ दे॰ आतीचा पांढरा जी तीक ती अनेक वचनी प॰.

**हवलदार**, पु॰ हवालदार.

**हवलदील**, ३लिं॰ हिं॰ वि॰ अकस्मात् कांहीं भारी संकट प्राप्त झालें किं॰ कांहीं मोठी हानि झाली इ॰ कारणामुळें बावरें व्हावें कांहींच सुचूं न ये चित्त व्यग्र व्हावें भ्रांत व्हावें एतदवस्था पन्न झाला जो ती.

**हवळा**, पु॰ हुळा.

**हवा**, व्हावा; २, स्त्री॰ पंचमहाभूतांतील जें वायु ह्मणून महाभूत ती, पर्जन्य, धुकें, थंडी, उष्ण, वाऱ्याचा अतिशय किं॰ स्तब्धता, इ॰ भेदक निमित्तानें भिन्नभिन्न होते जी दिक्कालावस्था ती.

**हवाई**, स्त्री॰ हवई.

**हवाल**, पु॰ स्त्री॰ देश, ग्राम, मनुष्य, इ॰ कांचीबरी, वाईट, जी स्थिति ती ती प्रश्नादिप्रसंगीं प्र॰.

**हवालणें**, कोणे कांचें आपण द्यावयाचें जें द्रव्यादि तें दुसऱ्याचे हवाल्यानें संबद्ध करणें; उ॰, एव्हां तुमचे पाशीं रोखरुपये नसल्यास दुसऱ्या कोणाकडे हवालून द्या; २, ला॰ आपण करावयाचें जें कोणेक कार्य तें करण्याविषयीं दुसऱ्या कोणे काव र टाकणें.

**हवालदार**, पु॰ सुभ्याचे पोटचे जे अनेक महाल त्यांचे जे अनेक अंमलदार ते प॰; २, किल्ला इ॰ संबंधी कामाचा बंदोबस्ता करितां त्यांजवर जो मुख्य सें करून ठेविला असतो ती; ३, जमातदार, नाईक, यांसारखा अनेक मनुष्यांवर जो अधिकारी केला असतो ती.

**हवालदारी**, स्त्री॰ हवालदाराचा जो अधिकार ती.

**हवालदिल**, ३लिं॰ हवलदिल.

हवाला.

**हवाला**, पु॰ हवालदाराचा जो अधिकार तो;२, आपण सर्कार, सावकार, इ॰ कांचें द्यावयाचें जें द्रव्यादि किं॰ कोणेकाचें करावयाचें जें कांहीं काम तें आपल्या वरचें दुसऱ्या कोणेकानें द्यावें, करावें, म्हणून त्यास मान्य करून तद्विषयींचा अधिकार जो त्याजकडे देतात तो.

**हवालों, हवालीं, हवालें**, अ॰ रक्षणार्थ कोणेकाचे अधीन तेंत; कर, हो, अस, धा॰ योगीं प्र॰.

**हवालाकपाला**, पु॰ हवालाटवाला.

**हवालाटवाला**, पु॰ हमीटमी.

**हवावी**, स्त्री॰ कों॰ डोंगर इ॰ कांवर चढणें किं॰ धांवणें इ॰ कारणानीं श्रम झाल्यामुळें कोणेकास लागतो जो दम तो.

**हवाशीर**, २लिं॰ पुष्पादिकांचा सुगंध, भ्रमर, कोकिल, इ॰ संबंधी मंजुल मंजुल शब्द शीतलमंद असा सुखकारक वायु, इ॰ योगानें रमणीय जें बाग, वाडा, ग्राम, इ॰ रूप कोणेकस्थल तो.

**हवि**, न॰ हवनोपयोगी जें घृतादिद्रव्य तें; हविर्भाग, हविःशेष, इ॰ स॰.

**हविष्य**, न॰ व्रतादिदिवशीं भक्षणाविषयीं प्रशस्त म्हणून जे धर्मशास्त्रांत गोधूम गोदुग्धादि पदार्थ परिगणित आहेत ते प्र॰; २, तेच पदार्थ भक्षून रहावें असा धरला जो नियम तें; ३, ला॰ लोकशास्त्रविरुद्ध असून आवश्यकत्वें करून कोणेकाचे परिपाकांत पडलें असतें जें कोणेक कर्म त्यास म्ह॰; उ॰, यागांत सर्वलोकांस रोडयाजी हें तर हविष्य आहे.

**हविष्यान्न**, न॰ हविष्यः लाक्षणिकार्थ यांतून.

**हवेली**, स्त्री॰ दुमला तिमजला असें मोठें जें उंच गृह तो; २, एके प्रांतांत अनेक कसबे किं॰ अनेक संमता असतात त्यामध्यें ज्याचे नावानें प्रांत प्रसिद्ध असतो तो कसबा किं॰ ती संमत तो.

**हव्य**, न॰ देवतोद्देशानें होमार्थ स्वीकृत जे घृतादि तें.

**हव्यकव्य**, न॰ होमहवन, श्राद्धपक्ष, इ॰ कार्यप्रस्थ, इ॰ कर्म तें; उ॰, त्याचे घरीं कांहीं हव्यकव्य झालें असतां नलाच बोलवितात.

**हव्याशी**, ३लिं॰ कोणी एक गोष्टीविषयीं हव्यास आहे ज्यास तो.

**हव्यास**, पु॰ कोणेक गोष्टीविषयीं अनेक प्रकारचे उद्योग करावे, तेणें कार्य सिद्ध करावें, असा कोणेकास असतो छंद तो; उ॰, याजोशी बावांस पुस्तकसंग्रह करण्याचा हव्यास फार.

**हशम**, न॰ पादचारी शिपायांचा समुदाय तें.

**हशमनीस**, पु॰ हशम प्रकरणीं लिहिणें लिहिणारा जो कारकून तो.

**हँशा, हशा**, पु॰ शालजोडी, दुपट्टा, गालिचा, दुलई, इ॰ कांस तव्याहून विजातीय तव्याचे दोहों अंगें किं॰ सभोंवता अंगचा असतो किं॰ लावितात जो अरुंद अवयव तो: २. हास्यास म्ह॰.

**हँशील, हशील**, न॰ ग्रामदेश, जकात, इ॰ संबंधी सर्कार, इ॰ कांस द्यावें लागतें जें देय तें; २, लेख, भाषण, इ॰ कांतील जें तात्पर्य तें; ३,

**हंस**, पु॰ एक पक्षी आहे; हंसगति, हंसगामिनी, हंसस्वर, इ॰ समास.

**हसडणें**, हालवणें, ओढणें, इ॰ क्रियानीं कांहीं एक पदार्थ आंचक्यानें युक्त करणें; २, ला॰ युक्तिप्रयुक्तीनें कोणेकापासून द्रव्यादि काढून घेणें; कोणेकास

शिव्या

शिव्या इ॰ हसंडणें ह्मणजे देणें.

**हंसडा**, पु॰ ओसडा.

**हंसणें, हसणें**, कोणेकानें हास्यविशिष्ट होणें ; २, कोणेकानें कोणेकास हसणें ह्मणजे त्याचें वाईट कर्म पाहून त्यास खोडया लावें, इ॰ देषणें ; उ॰, तूं असेंजर वाईट कर्म करशील तर तुला लोक हंसतील आमच्यें काय गेलें ; करंज्या, गुरवळ्या, इ॰ कानी हंसणें ह्मणजे उलणें ; रा॰ चुलीवर ठेविलेल्या खापरानें हसणें ह्मणजे वर जमलेल्या मशीनें पेट घेणें.

**हसबी**, स्त्री॰ रुपये, इ॰ भरून घोडयावर घालून गांवास न्यावयाचे उपयोगी पडशीसारखी लहान एक पिशवी आहे ती.

**हंसरा**, ३ लिं॰ विशेष हांसण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हंसळी, हसळी**, स्त्री॰ सुवर्णादिकांचें एक कंठभूषण आहे.

**हंसाबाजी**, स्त्री॰ फा॰ हास्यविनोदरूप जो व्यापार ती.

**हसूं, हंसूं**, न॰ हंसें.

**हंसें, हसें**, न॰ विस्मय, आनंद, इ॰ अंतःकरणांत झाल्यामुळें किं॰ शरीरास गुदगुली, इ॰ झाल्यामुळें अंतःकरण विकसित होऊन मुखादिकांचा विकास व्हावा असा जो विकारविशेष होतो तें ; २, उपहास.

**हंसोळी**, स्त्री॰ हंसळी.

**हस्त**, पु॰ जेणेंकरून पदार्थांचें दान, ग्रहण, इ॰ घडतें असें मनुष्यादि जीवास कर्मेंद्रिय आहे तद्रूप जें शरीरास दोन अवयव असतात ते प्र॰ ; २, वर

वरपा खाडी, इ॰ टेंकायाकरितां ज्यांवरणीचे वरचे टोंकास जो लांकडाचा चापट तुकडा बसवितात तो ; ३, हत्तीची जी सोंड ती ; ४, चोवीस अंगुलें रूप जें प्रमाण तो ; ५, सत्तावीस नक्षत्रांतील तेरावें जें नक्षत्र तें ; प्रा॰ अनेकवचनांत प्र॰.

**हस्तक**, पु॰ हस्त प्रथमार्थ ; २, जो ज्याचे हाताखालीं काम काज करावयास असतो तो त्याचा असें ह्म॰.

**हस्तकौशल**, न॰ चित्र लेखनादि कांहीं एक कार्य करण्याविषयीं हस्ताचा ठायीं असतें जें कौशल तें.

**हस्तकौशल्य**, न॰ हस्तकौशल.

**हस्तक्रिया**, स्त्री॰ अनुष्ठान प्रसंग, रसायन, इ॰ कोणेकविषयींची हातानें करावयाची जी कृति ती.

**हस्तगत**, ३ लिं॰ वि॰ कोणेकाचे स्वाधीन झाला जो कोणेक अर्थ तो.

**हस्तगुण**, पु॰ हातगूण.

**हस्तचापल्य**, न॰ कांहीं एक कार्य करण्याविषयीं हस्ताचे ठायीं जें चापल्य असतें तें.

**हस्तदोष**, पु॰ लेखामध्यें अशुद्ध किं॰ चुकी पडायास कारणीभूत जो लेखकाचे हाताचा दुर्गुण तो आणि तेणेंकरून लेखांत पडतें जें अशुद्ध किं॰ चुकी ती.

**हस्तपगदस्त**, अ॰ मुदखांचें खेळांत जो मोहऱ्यास खेळायाचे उद्देशानें हात लावला तेंच मोहरें खेळावें आणि तें मोहरें जाग्यांं ठेविलें तेथून उचलून घेऊ नये नियमानें खेळण्याचें वि॰.

**हस्तमूख**, ३ लिं॰ हास्यमुख.

**हस्तलाघव**, न॰ हस्तकौशल ; २, हस्तचापल्य.

**हस्तागोर, हस्तागोरी**, स्त्री॰ हस्तनक्षत्रीं सूर्य असतां जी चें व्रत करितात अशी जी हत्तीवर

बसलेली

ह्मण हाकारी.

**हाकारा**, पु॰ रा॰ हाकाटा.

**हाकाहाक**, स्त्री॰ याणें त्याला हाक मारावी, त्याणें याला हाक मारावी अशा अनेकजा हाका होतात ती.

**हाकाल, हाकाळ**, अ॰ एतत्कालपर्यंत याचापुढें मर्याद, पर्यंत, पावेंतों, वेरीं, इ॰ कांचाही पर्यायेंकरून योग होतो: उ॰ तूं हाकाळ खोटें बोलला नाहींस म्यांही हाकालपर्यंत तुझें बाईट केलें नाहीं.

**हाकीम**, पु॰ ग्राम, देश, इ॰ कांवर हुकूम करण्याचा अधिकारीजो राजा, सोकाशी किं॰ मामलेदार, इ॰ धणी तो.

**हांजा**, पु॰ लांडा.

**हांजी**, अ॰ कोणी आपणाशीं बोलूं लागलें असतां त्यास विनयानें उत्तर द्यावयाचें असतां याचा प्र॰ करितात; कोणेकानें कोणेकापाशीं हांजी करणें, ह्मणणें, ह्म॰ स्वकार्यार्थ ह्मणेल त्यास अनुमोदन देणें; इ॰ द्वारा आर्जव करीत असणें.

**हाड**, न॰ अस्थि; कोणेकाचीं हाडें उजवणें, शेकणें, भाजणें, ह्म॰ कसेंहीकरून लग्नसंस्कार केलासा करणें; कोणेकाचे हाडीं घाव घालणें ह्म॰ आपलें इच्छादि उगवावें, इत्यार्थ त्यास फारच दुःखहोई असा कांहीं उपाय करणें; हाडाचीं काडें किं॰ मणी करणें ह्म॰ कोणेक गोष्टीच्या सिद्ध्यर्थ देह झिजे असा श्रम करणें; कोणेकाचीं हाडें निघणें, पडणें, इ॰ स्थलीं त्याणें अतिकृश होणें; कोणेकाचीं हाडें मोडणें, खुसळणें, खिळखिळीं करणें; इ॰ स्थलीं त्यास अतिशयित श्रम, दुःख, देऊन बेजार करणें; हाडाचा खरा, चांगला, इ॰ स्थलीं त्याच्या अर्थाची देहारंभक जी उपादान सामग्री ती हाडशब्दाचा अर्थ; उ॰ हा रूपयावरून बाईट दिसतो पण हाडाचा खरा आहे.

**हाडकपाळी**, ३ लिं॰ रा॰ दुसऱ्यानें सोईची हितगोष्ट सांगितली असतां ऐकूं नये, आणि स्वतःही हितगोष्टीविषयीं प्रयत्न होऊं नये, अशा स्वभावाचा जो तो.

**हाडकपाळ्या**, ३ लिं॰ कों॰ कपाळकरंटा जो मनुष्य तो.

**हाडकी**, स्त्री॰ लहानसेंजें हाड ती

**हाडकुरकुरी**, स्त्री॰ कों॰ अस्थिगत जो ज्वर असतो ती.

**हाडखाऊ**, ३ लिं॰ मांस खाणारेजे शूद्र यवनादिक त्यांस निंदेनें ह्म॰

**हाडगळ**, ३ लिं॰ कों॰ ज्याचा देह मांसल नव्हे अतएव ज्याचे हाडाचे आकार बाहेरून दिसतात असाजो तो.

**हाडगात**, न॰ शरीरास आश्रयभूत जो हाडांचा सांगाडा त्याचीं जीं हाडें तें.

**हाडजर**, पु॰ हाडकुरकुरी.

**हाडवैर**, न॰ परस्परांचाजो अर्कद्वेष तें.

**हाडळ**, ३ लिं॰ कों॰ हाडगळ; २, स्त्री॰ दे॰ हडळ.

उष्ठ.

**हांडा**, पु॰ कों॰ हंडा प्रथमार्थी.

**हांडी**, स्त्री॰ हंडी.

**हांडीबाग**, पु॰ कों॰ हंडीबाग.

**हाडूक**, न॰ कों॰ हाडकी.

**हांडूल**, न॰ कों॰ लहान जो हांडा त्यास म्ह॰

**हांडें भांडें**, न॰ कों॰ भांडें कुंडें.

**हांडोरें**, न॰ कों॰ हांडूल

**हाड्यावर्ण**, पु॰ हड्यावर्ण.

**हाणणें**, यष्ट्यादिकानें ताडणें; पक्षीं यष्ट्यादिकांसही कर्मता; २, तरवार, इ॰ शस्त्रानें कोणेकास साफ तोडणें: एथेही तरवार. इ॰ कांस पक्षीं कर्मता.

**हाणमार, हाणामार, हाणामारी**, स्त्री॰ मनुष्यादिकानीं एकमेकास किं॰ कोणेकानें कोणेकास हाणावें, मारावें, इ॰ रूप जो व्यापार ती.

**हात**, पु॰ हस्तप्रथमचतुर्थार्थी; २, गृहादि कोणेक पदार्थाचा वाम दक्षिण जा बाजू त्या प्र॰; उ॰ आमचें घर सरकारवाड्याचा उजवे हातास आहे; ३, कार्यमात्राविषयीं साधनभूत कोणेक कर्त्याचे अंगची जी कर्तृत्व शक्ति ती त्या कर्त्याचा; उ॰ अपराधावांचून शिक्षा देणें हें माझे हातानें घडणार नाही मा; झा हात चालेल तेव्हां मी तुझे रुपये देईन; ४, कोणेक अर्थ जेथें राहिला असतां आपलेस्वाधीन राहतो म्हणजे म्हटला तसा वर्तावयास सांपडतो; असेंजें आपलें सत्तारूप अधिकरण तो; याअर्थी प्रथमांत प्र॰ नाहीं; उ॰ आमचें काम करणें हें तुमचे हातांत आहे; सांप्रत माझे हातीं पैसा नाहीं; ५, हातानें वाजवायाचें मृदंग, डफ, इ॰ वाद्य किं॰ खेळायाचें दांडपट्टा, इ॰ त्यांचा जा निरनिराळ्या गति त्या प्र॰; ६, चित्रें काढणें, तासणें, विणणें, इ॰ जें हस्तक्रियासाध्य कर्म त्याचेंजें कौशल तो; उ॰ याला चित्रें काढण्यांचा हात चांगला आहे; ७, कुलपाचीजी किल्ली तो; ८, या शब्दाचा सांकट्याचे खेळांत एक अर्थ प्रसिद्ध आहे: कोणेकानें कोणेकावर हात टाकणें किं॰ करणें, म्ह॰ केवळ हातानें किं॰ शस्त्रादिकानें मारणें; द्रव्यादिकांवर किं॰ लाडू इ॰ भक्ष्यपदार्थांवर हात मारणें म्ह॰ ताव मारणें; कोणेक कर्मास हात घालणें म्ह॰ करायाकरितां अंगिकारणें: कोणेकानें कोणेकास हात देणें म्ह॰ उठावणीविषयीं आश्रयभूत होणें; खाणें, खरचणें, काम करणें, इ॰ विषयीं हात राखणें म्ह॰ त्यात्या व्यापारीं हाताला मनस्वीपणें वर्तूं न देतां आटोपता धरणें; कोणेकाचा हात चेपणें, दाबणें, म्ह॰ त्याणें स्वकार्याविषयीं अनुकूल व्हावें म्हणून त्यास गुप्तरूपें द्रव्यादि देणें; हात सुतणें. मोकळा होणें, गमावणें, इ॰ स्थलीं ममता शरीराचे अवयवभूत जे आपलें धन, पुत्र. वतन, लेख, मतलब, इ॰ कांहींएक हा हातशब्दाचा अर्थ होतो; कोणेकानें हात टेकणें

णें ह्म० मदतीस येणें; हात धुऊन कोणे-
काचे पाठीस लागणें ह्म० त्याच्या नाश क-
रण्याविषयीं साग्रह प्रवृत्त होणें; कोणेका-
नें कोणेकाचे हातावर हात देऊन किं० मा-
रून पळणें किं० जाणें ह्म० देखदेखत जा-
णें पळणें; कोणेकाचे हातास हात लागणें
ह्म० यजमान इ०कांपासून कांहीं दक्षिणा-
दि द्रव्य मिळणें; कोणेक गोष्ट हातावर येणें
किं० हाताबोटावर येणें ह्म० आतां होईल-
घटकेभऱ्यानें होईल अशा अवस्थेस येणें;
कोणेकाचें संसार, सावकारी, इ० खटलें
हातावर असणें ह्म० ह्मटलें तेव्हां आटोपा-
यास यावयाजोगें आटोपतें असणें; कोणे-
कानें हातावर संसार करणें, पोट भरणें,
इ० स्थलीं वृत्ति, भत्ता, इ० आश्रय नसतां
मोलमजूरी, चाकरी, भिक्षा, इ० द्वारा नि-
र्वाह करणें; कोणेकानें हातावर शीर घेऊ-
न असणें ह्म० मी मरेन हें भय न बाळगतां
युद्धादि साहसकर्माविषयीं सिद्ध असणें;
कोणेकानें कोणेकाचे हातावर तुरी देणें,
किं० तुरी देऊन पळून जाणें, इ० स्थलीं
हातावर हात देऊन पळून जाणें; कोणेका-
नें हातपाय चोळणें ह्म० चरफडणें; कोणे-
क गर्भिणीनें हातींपायीं सुटणें ह्म० प्रसूत
होऊन सुखी सुटका होणें; भक्षिलेलें अ-
न्नादि कोणेकाचे हातींपायीं येणें ह्म०
शरीरास जडत्व यावयाजोगें होणें; कोणे
कोणेकाचे हातींपायीं लागणें किं० पडणें
ह्म०



ह्म० केवळ देण्यानें त्याचें आर्जव करणें;
कोणेकानें हातींपायीं उठणें, खेळणें ह्म०
भक्षिलेलें अन्नादि हातींपायीं आलें अस-
तां जी अवस्था होत्ये तद्विशिष्ट होणें; कोणे-
कास किं० कोणेक कार्यास हात लावणें ह्म०
सहाय होणें; कोणेकानें हातपाय पसरणें
ह्म० थोडक्यांत करून देतों ह्मणून मान्य के-
लेंजें कोणेकाचें कांहीं काम तें लांबविणें;
किं० थोडक्यांत करावा ह्मणून हातीं धरि-
लेला जो व्यवहार त्याणें बेताबाहेर जावयाजोगें
वहाडणें किं० द्रव्य, अधिकार, इ० बळा-
नें त्यात्या व्यवहारीं जो यथास्थितपणें प्र-
वृत्त असतो त्याणें तें बळ नाहीसें झाल्या-
मुळें तें घारें सोडून मजपाशीं कांहीं नाहीं
असें ह्मणून उगीच बसणें; कोणेकानें हात
पाय गाळणें ह्म० भयादिकारणानें कोणेक
कर्माविषयीं धरिलेला उत्साह सोडून मा-
घार घेणें; खर्च वेंच इ० कोणेक व्यवहारा-
स हातपाय लावणें किं० फोडणें ह्म० नवे-
च कांहीं प्रकरणभूत अवयव त्यास जडणें;
कोणेकाचे हातपाय चालणें किं० वागणें,
येणें, ह्म० शरीर स्वाधीनपणें वर्तणें; कोणे-
क पुरुषाचे दोन हातांचे चार होणें ह्म०
बायको मिळणें; स्त्री, पोर, शेत, इ०कानें
हातातोंडास येणें ह्म० त्यापासून भर्ता, इ०
कांस व्हावयाचें जें संभोगादि फल तें याव-
याजोगी जी तारुण्यादि दशा त्या दशेस
येणें; कोणेकानें कोणेकास हात दाखविणें
ह्म०

म्ह० त्याचे मनांत वचक रहावयाजोगी कांहीं शिक्षा करणें; त्याचा हात कोण धरिता आहे इ० स्थलीं कोणेक कर्माविषयीं त्याचीब रोबरी किं० त्यावर चढ करणारा कोण आहे असा अर्थ; कोणेक स्त्रीनें कोणेकाचा हात धरून जाणें म्ह० त्याचें घर निघणें; कोणेकानें कोणेकास हातीं धरणें म्ह० त्याचें ऊर्जित करण्याविषयीं अभिमान धरून अंगिकारणें; म्हैस, गाय, इ० कांनीं हातावर लागणें, हातावर दूध देऊं लागणें, हातावर दूध देणें, म्ह० वांसरूं नसतां पान्हवून दूध देणे.

हातउगावा, पु० कोणेक व्यवहारीं आपला गुंतला असतो जो हात त्याचा युक्तिप्रयुक्तीनें करितात जो उगवलेपणा तो.

हातउसणा, ३लिं० लवकर परत करायाचा असें मनांत असतें अनन्य यद्विषयीं लेख पूस न करितां उसणा देतात घेतात जो पैसा रुपया, इ० तो.

हातकरवत, पु० एके शेवटास च आला मूठ असल्ये असा जो लहान करवत असतो तो.

हातकरवती, स्त्री० लहान जो हातकरवत ती.

हातकरीण, स्त्री० वांसरूं नसतां हातावर दूध देत्येजी गाय, म्हैस, इ० ती.

हातखंड, न० कों० अडल्यावेळेस आपले कामावर पडायाजोगा जो मूलबाळ, शेजारीपाजारी, इ० कोणी जवळ असतो तें.

हातखंडा, ३लिं० अति अभ्यासामुळें प्रसंगीं पाहिजे तशी प्रयुक्त करण्याविषयीं स्वाधीन असल्येजी कोणेक विद्या किं० कला तो.

हातखंवणी, हातखवणी, स्त्री० एका हातांत धरून नारळ, इ० खंवायाचें उपयोगी एक खंवणी आहे.

हातखुरपा, ३लिं० हातानें च आंतील खोबरें उकरून काढायाजोगा कोंवळाजो नारळ तो; याचा नपुंसकीं विशेष्यत्वें करूनही प्र० होतो; उ० दोन हातखुरपीं घेऊं नये.

हातगूण, पु० कोणेकानें हातानें करावयास धरिलेंजें कांहींएक काम किं० हाताखालीं धरिलाजो शिष्य, इ० त्याचें बरें किं० वाईट होण्याविषयीं निमित्तत्वेंकरून मानिलातजो त्याहातीं धरणाराचा प्रारब्धयोग तो.

हातघाई, स्त्री० मंदमंदपणें चालत असतें जें वाद्य वादनादि कोणेक कर्म त्याविषयीं आवेशादिकारणांमुळें तो मंदपणा टाकून होतेजी घाई ती; कोणेकाचें हातघाईवर येणें म्ह० मारामारीवर येणें.

हातचरक, पु० मनुष्यानें आपल्या हातानें च फिरवून उसाचा रस काढायाचें उपयोगीजो लहान चरक करितात तो.

हातचलाखी, हातचलाखी, स्त्री० दुसऱ्याला ठकविण्याविषयीं गारुडी, सराफ, वाणी, इ० कांचे हातांत पदार्थ प्रथम घेतो केव्हां टाकतो केव्हां, दुसरा बदलतो केव्हां, इ०

इ॰ कम न समजणाराओंस असतेंजें कसब तें.

**हातचा**, २लिं॰ हातांतलाजो तो, ३॰ म्हणजे हातचें पाणीं स्नानसंध्येस घेऊंनये; रोग्यास औषध देणें हें मनुष्याचें हातचें आहे पण आयुष्य घालणें हें कांहीं मनुष्याचें हातचें नाहीं; २, जो जाणें आपले हातानें निर्मिलेला किं॰ मिळविलेलाजो कोणेक अर्थ तो; इ॰ ही पोथी माझे हातची आहे; ही सारी दौलत त्याचे बापाचे हातची आहे; ३, अंकांची मेळवणी, इ॰ तसेंच ज्यास्थानींच्या स्थानीं मोडून किं॰ मिळवून त्याचे पुढले स्थानीं मिळवायाचाजो अंक राहतो तो.

**हातचाळा**, पु॰ कारणावांचून इकडेतिकडे हात नाचवावे, कांहीं पदार्थ उचलावा, टाकावा, इ॰ रूप ज्या कोणेकाचा हातानें चेष्टा होत असतात तो आणि तसी चेष्टा करण्याची कोणेकास लागली असतेजी खोड तो; २, लांचखाणी, इ॰ व्यवहार वरी असल्यामुळें रुपये, इ॰ खाणें, घेणें, इ॰ रूप हातास असतोजो उद्योग तो.

**हातचिटी, हातचिठी**, स्त्री॰ मामलेदार, इ॰ अधिकारीलोकांनीं शिक्का, मोर्तब, इ॰ चिन्हें नकरितां आपले हातचे निशाणीनेंच पुरी केलेलीजी चिठी ती.

**हातझाड**, न॰ रा॰ जाणें आपले हातानें लावलेलेंजें कणस, इ॰ कांचें झाड तें त्याचें.

**हातझोंबी**, स्त्री॰ परस्परांचे हात धरून करितात

रितात

रितानजी झोंबी ती; प्रथमांत प्र॰ विशेष नाहीं.

**हातणी**, स्त्री॰ घोडें, इ॰कांस थुलेसमयीं हातांत घालावयाचे उपयोगींजो काथा, इ॰कांच्या पिढावीसाररवा पदार्थ करितात ती; २, रा॰ ज्या विहिरीस बैल, रहाट, किं॰ पायरहाट लावायाचा असतो त्याविहिरीचे एके बाजूस कणेकडाचें एक टोंक टेंकावें पन्हळींतून पाणीं पडावें इत्याद्युपयोगीजी चौथऱ्या साररवी बंदिस्त करितात ती.

**हातधोंडा**, पु॰ केवळ हातानें मारलेलाजो धोंडा तो.

**हातनळा**, पु॰ हातांत धरून उडवायाचाजो दारवेचा नळा तो.

**हातपडत**, २लिं॰ रा॰ हातपात.

**हातपा**, पु॰ आंगररवा, चोळी, इ॰कांची जी बाही तो.

**हातपाणी**, न॰ लग्नामध्यें रात्र नहाणाचे दिवशीं नवऱ्येमुलीचे हातावर पाणीं घालण्याचाजो समारंभ करितात तें.

**हातपात**, २लिं॰ रा॰ किल्ली, कुलूप, सोंवळें ओवळें, इ॰ प्रतिबंधांत अडकलेल्या नव्हे, मटल्यावेळेस हातीं यावयाजोगा जवळ असतोजो पदार्थ तो.

**हातपान्हा सत लागणें**, गोमहिष्यादिकांनीं वत्स किं॰ पान्हवणें, इ॰कांची अपेक्षा नधरितां दूध देऊं लागणें.

**हातपाय**, २लिं॰ को॰ हात लांब केलाअसता पोंहचाया

पोंहचाया

पोंहचया, इतक्या अंतरावर स्थित जो पदार्थ तो; २, ज्याचीं फळें, पुष्पें, इ० भुईवर राहून हातानें तोडतां येतात इतका उंच जो वृक्ष तो किं० तीं फळें, पुष्पें, किं० जींतील पाणी वरून हातास येतें इतकी खोलजी विहीर ती.

हातपिटी, स्त्री० कलहप्रसंगीं परस्परांचीजी हातानीं मारामार ती.

हातभाता, पु० भुमीवर न ठेवितां हातांत उचलून फुंकण्याचा असाजो लहान भाता असतो तो.

हातभुरकणा, हातभुरका, ३ लिं० हातानें भुरकून खावयाजोगाजो कोंवळा नारळ तो; नपुंसकीं विशेष्यलेंकरूनही याचा प्र० होतो.

हांतर, पु० रा० वेळणाची मोठीजी हांतरीं बसायासाठीं करितात ती.

हातरगाडा, पु० रा० हातचरक.

हांतरणें, आंथरणें.

हातरवी, स्त्री० घुसळखांब मांजरी यां वांचून हातानेंच फिरवून दहीं, इ० घुसळायाचे उपयोगींजी लहानशी रवी केली असल्ये ती.

हातरहाट, पु० केवळ हातानेंच ओढून पाणी काढायाचाजो लहान रहाट तो.

हांतरी, स्त्री० आंथरी.

हातरुमाल, पु० लिल्याचे लिहिण्याचे उपयोगीजो कागदपत्रांचा घालता रुमाल केला असतो तो; २, तोंड पुसणें इत्याद्युपयोगीं जो वस्त्राचा तुकडा बाळगतात तो.



हांतरूण, न० आंथरूण.

हांतरुणपांघरूण, न० आंथरूणपांघरूण.

हातलावणी, स्त्री० वेश्यादि सामान्यस्त्रियांचा स्त्रिया उतरण्याचा जो संस्कार ती.

हातलावा, ३ लिं० रा० हातावळजो मनुष्य तो.

हातवटी, स्त्री० भाषणादि कोणेक व्यवहार करण्याविषयीं कर्तृभेदेकरून जे भिन्नभिन्न कृतिप्रकार असतात ते प्र०

हातवडा, पु० सोनार, कांसार, इ० कांचें ठोकायाचें एक आऊत आहे.

हातवडी, स्त्री० लहान हातवडा

हातवल्हें, न० केवळ हातांतच धरून वल्हवायाचे उपयोगीं जें होडी, इ० कांवर लहानसें वल्हें असतें तें.

हातवळा, पु० लेखनादि कोणेक कर्माचा अभ्यास झाल्यामुळें तद्विषयीं हाताचेठायीं येतेंजें प्रावीण्य तो.

हातविरजा, ३ लिं० रा० प्रसंगीं आपलें काम यथाकथंचित् कांहींकाळ संभाळी किं० आपल्यास कांहीं काम करायास हात लावी अशा योग्यतेंत आलेलाजो आपला पुत्र, शिष्य, कन्या, सून, इ० कोणी असतो तो.

हातशिंपणें, न० रा० सोडवणी नदेतां झोळणें, इ० साधनानें उडवूनजें भाजीपाला, केळी, इ० कांस पाणी देतात तें

हातसर, पु० स्त्रियांचें एक हस्तभूषण आहे.

हातसारवण, न० खराटा, पोतेरें, इ० साधन न घेतां केवळ हातानेंचजें भुम्यादिकांस सार-

वण देतात तें.

**हातरूख**, न० आपर द्वेष असतो त्यास हस्ता दिकेंकरून मार खायास सांपडलें असतां तिनस्यानेंच मानून घेतात जें रूख तें.

**हातळ**, ३लिं० कों० हाताळ.

**हातळणें**, फलादिपदार्थ हस्तव्यापारानें चाळवटणें; २, रा० हातळ मनुष्यानें कोणेकाचें वस्तु चोरून नेणें.

**हाता**, पु० कों० केळकीचें जें कणीस तो; २, फलपुष्पादिकांचा मोजण्यासमयीं एकएकवार हातांत जी पंचकडी, छकडी, इ० रूप समुदाय तो.

**हाताखालीं**, अ० जें कर्मकरण्याविषयीं मुख्यत्वेंकरून जो अधिकारी त्याजवळ त्या कर्माचीं अंगभूत कर्में कराव्याकरितां त्या अधिकाऱ्याचें निषम्य कोरीत; २, कोणेकाचे सनेरखालीं.

**हातानिराळा**, ३लिं० ज्याविषयींचा कर्तव्याचा किमपि गहिला नाहीं असएव आला हात लावावा नलागे असा सिद्ध झाला जो गृहादि अर्थ तो; उ० हें लिहिणें एकदां हातानिराळें झालें म्हणजे दुसरें काम घेईन; २, अ० जेथें मनुष्याचे हाताची नेहमी वहिवाट असल्ये त्या स्थलाहून इतरत्र एकीकडे; उ० कामापुरतीं भांडीं वहिवाटींत ठेवा वरकड हातानिराळीं ठेवा.

**हाताफळी**, स्त्री० हातफोंबी.

**हाताबेगळा**, ३लिं० अ० हातानिराळा.

**हातासरसा**, अ० कोणेक कार्यकरण्याविषयीं हाताचे ठायीं धरिला जो वेग त्याच वेगानें; कांहींएक इतर कार्य करण्याचें वि०; उ० उठीं काढतो आहेस तो हातासरशीं थोडीं घास मग हात धु.

**हाताळ**, ३लिं० कोणेकाची वस्तु हातीं लागली असतां चोरण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हाताळणें**, हातळणें.

**हातेर**, न० हतेर; २, कों० ग्रामसंबंधी कुळांस जी पाटील, खोत, इत्यादिअधिकाऱ्याचें शेत लावणें, इ० कामें करण्याविषयीं करावी लागत्ये जी बिगार तें.

**हातेरबंद**, ३लिं० हतेरबंद.

**हातोटी**, स्त्री० हातवटी.

**हातोडा**, पु० हातवडा.

**हातोडी**, स्त्री० हातवडी.

**हातोपा**, पु० रा० हातपा.

**हातोपात**, अ० कांहींएक ओझें वहायाचें असतां एकानें दुसऱ्याचे हातीं, दुसऱ्यानें तिसऱ्याचे हातीं, अशा प्रकारें नेणें, वाहणें, इ० कांचे वि०

**हातोफळी**, स्त्री० हाताफळी.

**हातोहात**, **हातोहातीं**, अ० हातचे हातीं.

**हातोळा**, पु० हतवळा.

**हात्यार**, **हात्येर**, न० हत्यार.

**हात्यारबंद**, **हात्येरबंद**, ३लिं० हतेरबंद.

**हौदा**, पु० कों० इरजीक.

**हौंदुळणें**, आंदुळणें; २, फळें, इ० पडणें; इ०

इत्यादार्थ वृक्षादिक आंचक्यानें हालविणें.

**हौंदेकरी, हौंदेलकरी**, पु॰ कों॰ परस्परें ज्याणीं हौंदा केला आहे ते परस्पर.

**हानि**, स्त्री॰ सं॰ नाश.

**हापटणें**, कों॰ आपटणें.

**हावकणें**, हवकणें.

**हावका**, पु॰ रा॰ हवका प्रथमार्थी.

**हामी**, स्त्री॰ हमी.

**हामीदार**, पु॰ हमीदार.

**हाय**, अ॰ खाज, संताप, इ॰ जन्यजें अंगीं दुःख असतें त्याचा खाजविणें, वारा घेणें, इ॰ संबंधानें प्रतीकार होऊं लागल्या ह्मणजे जो सुखानुभव होतो त्याचा उद्गार; २, शरीरास किं॰ अंतःकरणास कांहीं दुःसह वेदना झाली असतां त्या दुःखाचा हा उद्गार आहे; ३, स्त्री॰ मुलांचे भाषेनें तिखट, अग्नि, शस्त्र, शत, इ॰ कांस ह्म॰; कोणेकानें हाय खाणें किं॰ घेणें, ह्म॰ धास्त घेणें.

**हायसा**, ३ लिं॰ रा॰ संसार, इ॰ संबंधी ओझें, दाटी, कारागृह, इ॰ रूप दुःखदायक जे प्रतिबंध त्यांपासून सुटल्यामुळें सुखरूप झाला जो तो; उ॰ त्या दाटींतून मंमळ बाहेर आलों तेव्हां हायसा झालों; कोणेकास हायसें वाटणें ह्म॰ त्याणें हाय असा सुखोद्गार निघावा जेणें दुःखप्रतिकारद्वारा सुखानुभव विशिष्ट होणें.

**हायहाय**, अ॰ कांहींएक झालेलें पाहिलें असतां किं॰ ऐकिलें असतां किं॰ मनांत आलें असतां

सतां हा उद्गार निघतो.

**हायहूय**, स्त्री॰ शरीरास कांहीं असह्य वेदना प्राप्त झाली असतां जे कांहीं हायहूय, इ॰ अनेक प्रकारचे दुःखोद्गार निघतात ती.

**हाया**, अ॰ रा॰ हाय प्रथम द्वितीयार्थी.

**हायाहूया**, अ॰ रा॰ हायहूयरूप जो दुःखोद्गार त्याचें अनुकरण.

**हार**, पु॰ रत्नें, पुष्पें, इ॰ कांची भूषणार्थ गळ्यांत घालावयाकरितां जी माला करितात तो; २, रेशिमाच्या लड्या एकत्र ओंवून मालेसारिखा करितात जो आकार तो; ३, सं॰ भाजक; ४, स्त्री॰ एका हारानें लागत गेलेली जी अनेक पदार्थांची पंक्ति ती; ५, युद्ध, वाद, खेळ, इ॰ कांचे ठायीं येतो जो पराजितपणा ती; कोणेकानें हार जाणें ह्म॰ जिंकला जाणें.

**हारक**, ३ लिं॰ सं॰ हरणकर्ता जो तो; दुःखहारक, रोगहारक, पित्तहारक, इ॰ स॰

**हारणें**, हरणें.

**हारपणें**, हरपणें.

**हारवणें**, हरवणें.

**हारसडणें**, अ॰ रा॰ हारसडीस आणणें.

**हारसडीस**, अ॰ रा॰ हें शेवटास कसें जाईल, हें कसें आटोपेल, याचा निर्वाह कसा होईल, असें वाटायास कारणीभूत जो कोणेक गोष्टीचे अंगीं अफाटपणा, मनस्वीपणा, इ॰ धर्म असतात ते क्रमेंकरून कमी होत गेल्यामुळें आतां हें आटोपांत आलें

असें

असें वाटायाजोगे अवस्थेस येणें, आणणें, इ० धानूंचेयोगीं प्र०; उ० एक वर्षाचें लिहिणें तुंबलें आहे सारा गोंधळ झाला आहे एवढें हारसडीस आणून दे मगमी शेवटास नेईन.

**हारा**, पु० हरा.

**हाराष**, पु० हराष.

**हारास**, पु० हराष.

**हारीं**, अ० कों० कडे; शूद्रभाषायांत; उ० तो शेता हारीं गेला: त्या हारीं माझे दहा रुपये आहेत.

**हारी**. ३लिं० सं० मनोहर; २, जो जातें हरितो तो नद्दारी; पापानें हरितो तो पापहारी, दुःखहारी, इ० स०प्र०

**हारेमोहरे, हारेमोहरेस, हारेझोरे, हारेझोरेस**, अ० मनुष्यादि कोणकाचे समोरचे किं० आजूबाजूचेप्रदेशीं उभें राहणें, टिकणें, इ०कांचेयोगीं निषेधविषयीं प्र०; उ० मी एकवेळ त्यापोरास मार दिला तेव्हांपासून तोमाझे हारेमोहरे उभा राहत नाहीं; त्याशीं व्यवहार करूं म्हणतां पर तो सोदा आहे त्याचे हारेझोरेस तुह्मी उभे राहूं नका.

**हारोहार**, अ० मध्यें विजातीयानें व्यवधान किं० विच्छेदन होतां एक सारख्याक्रमानें; कोणक क्रिया होत जाणें किं० कोणेकानें असणें, इ०कांचें वि०; उ० या वाघकोस हारोहार चारखेपा मुळीच झाल्या.

**हार्द**, न० सं० कोणकाचे आंतीलजो अभिप्राय तें.

**हार्द्द**, न० हार्दशब्दाचा अपभ्रंश.

**हाऱ्यामोऱ्यास**, अ० हारेमोहरे.

**हाल**, पु० आपदा; प्र० अनेक व०; २, अ० हलीं.

**हालअपेष्टा**, स्त्री० नानाप्रकारचे हाल तो.

**हालचाल**, स्त्री० चळवळ.

**हालणें**, कोणेक पदार्थानें एके विभागंकरून आधाराशीं संबद्धअसून इतरविभागीं इतस्ततः चलित होणें; २, अधिष्ठित आधारापासून कोणेक अर्थानें इतस्ततः चलित होणें; ३, हलकलणें.

**हालतानारळ**, पु० कों० हालविला असतां आंतील पाणी वाजतें असा जो नारळ तो.

**हालमस्त**, ३लिं० दारिद्र्यमूलक आपत्तिअसूनही ज्याचेआंगीं ताठा बहुत असतां असा जो मनुष्य तो; हा० हालमस्त की मालमस्त.

**हालवा**, पु० हलवा प्रथमार्थी.

**हालवेंद्रा**, ३लिं० रा० ज्याचे अंगीं आवश्यक्ति नाहीं असा जो मनुष्य तो.

**हालहवाल**, पु० हाल अपेष्टा; फोज, इ०कानें हालहवाल होणें म्ह० हालहवालानें विशिष्ट होणें.

**हालहूल**, स्त्री० चोराचुपद्रव, राजक्रांति, इ० कारणानें होत्येजी गडबड ती.

**हालाहल**, न० सं० देवदैत्यांनीं पूर्वी समुद्रमंथन केलें तेव्हां त्यापासून उत्पन्न झालें

झालें जें विष तें; २, सर्पादिकांचें उग्र जें विष त्यास ह्म०

हालीं, अ० हल्लीं.

हालीमाजी, स्त्री० राजादिकांचे कारकीर्दींत होतें जें नवेंजुनें तें.

हालोहाल, हालोंहाल, अ० हातचेहातीं.

हाल्या, पु० हल्या.

हाल्लीं, अ० हल्लीं.

हाव, पु० सं० शृंगाररसाचा अंगीं आवेश झाल्यामुळें जा चेष्टा होतात ते.

हांव, स्त्री० हव्यास; २, खर्चवेच करणें, इ० विषयीं कोणेकास असतो दम तो; उ० हजार रुपये खर्चीत अशी त्याची हांव आहे; हांवेस भरणें ह्म० तन्हेस भरणें.

हांवभरीहोणें, दे० गतभरीहोणें.

हावभाव, पु० अभिनय आणि नेत्रेंकरून व्यंजित होतात जे रसाचे भाव ते.

हावर, पु० कों० गळ, फांड, इ०कास धरतो जो भोरतो.

हावरा, ३लिं० कितीही मिळालें तथापि अणखीं हवेंच असें इच्छिण्याचा स्वभाव ज्याचा तो; २, पु० पांढरा जोंधळा तो.

हाचा, खावा.

हांशा, पु० कों० दशाप्रथमार्थी; २, एक झाड आहे.

हांशील, न० हशील.

हांसडणें, गा० हंसणें.

हांसडा, पु० रा० प्राणोत्क्रमणाचेसमयीं सर्वांगास हिसके बसावयाजोगा लागतो जो मोठा श्वास तो; २, आंसडा.

हांसणें, हंसणें.

हांसरा, ३लिं० हंसरा.

हांसळी, स्त्री० हंसळी.

हांसूं, न० हंसूं.

हांसें, न० हसें.

हास्य, न० सं० हंसें; २, एतद्रूपच नवरसांतील एक रस आहे; ३, मुखविकसित व्हावयाजोगाजो कोणेकाचे अंगीं विकारविशेष होतो तें; ४, उपहास.

हास्यमुख, हास्यवदन, ३लिं० आनंनिरंतर हास्ययुक्त मुख असतें असाजो तो किं० कांहीं कारणानें हास्ययुक्त झालें मुख ज्याचें तो.

हांहां, अ० कांहींएक कार्याविषयीं प्रश्न जो कोणी त्याला मागेंसर असें जें ह्मणायाचें त्या अर्थाचें द्योतक हें अव्यय; हांहां ह्मणतां हांहां ह्मणें तों, इ० स्थलीं हातचेहातीं असाअर्थ.

हाहाकार, पु० सं० कांहीं महासंकट प्राप्त झाल्यामुळें किं० शोकादिकारणामुळें हाहा असा दुःखोद्गाररूप शब्द करितात तो; कांहींएक पदार्थाचा हाहाकार होणें, पडणें, ह्म० तोतो पदार्थ दुर्मिल झाल्यामुळें हाकारा पडणें; उ० दोन महिनें पावसानें ओढ दितांच चोहोंकडे पाण्याचा हाहाकार पडला.

**हाहाःकार**, पु॰ हाहाकार शब्दाचा अपभ्रंश.

**हांहूं**, न॰ कोणेकानें भय मानावें किं॰ कर्तव्य कार्य त्वरेनें यथास्थित करावें किं॰ मी जागृत आहें असावध नाहीं, इ॰ जाणावें इत्याद्यर्थ थोडा बहुत जो शब्दव्यापारादि व्यापार तें.

**हाळ**, पु॰ दे॰ अनेक गुरांनीं पाणी प्यावें एतदर्थ चुना. दगड, इ॰ कांनीं बांधून करितात जी लांब टांकी ती.

**हिंकणें**, रा॰ अन्नादि भक्षणें. निंदार्थनिष्ठ॰

**हिकडचा**, **हिकडला**, **हिकडील**, ३ लिं॰ इकडचा.

**हिकडणें**, अ॰ इकडणे.

**हिकडून**, अ॰ इकडून.

**हिकडूनतिकडून**, अ॰ इकडूनतिकडून.

**हिकडे**, अ॰ इकडे.

**हिकडेतिकडे**, अ॰ इकडेतिकडे.

**हिकमत**, स्त्री॰ कोणेक कर्मकरण्याविषयींची जी युक्ति ती.

**हिकमती**, ३ लिं॰ अनेकहि कमती ज्याचे अंगीं आहेत तो.

**हिकमत्या**, ३ लिं॰ हिकमती.

**हिंका**, पु॰ रा॰ हेंका.

**हिंकेखोर**, ३ लिं॰ हेंकेखोर.

**हिक्का**, स्त्री॰ सं॰ कोणेकास लागत्येजी उचकी ती; २, पु॰ दे॰ हेंका.

**हिकेखोर**, ३ लिं॰ हेंकेखोर.

**हिंग**, पु॰ मसाला, फोडणी, इ॰ कांत घालायाचे उपयोगीं एक झाडाचा चीक आहे, ज्याला विलक्षण वास येत असतो तो; हिंगाचें पातें म्ह॰ जवळ तादृश द्रव्य नसतां हा द्रव्यवान् असा ज्याचा लोकांत भ्रम आहे त्यास म्ह॰; कोणेकानें हिंग हगणें म्ह॰ दुखण्यामध्यें पथ्य पडणें; हिंगातुपास, हिंगाधुपास, हिंगाधुपावारी, हिंगाधुपावाली जाणें, उडणें, इ॰ स्थलीं हिंग, धूप, इ॰ किरकोळ जिनसांकडे काहीं एक द्रव्यादिकानें खर्चलें जाणें

**हिंगडा**, पु॰ एक हिंगामध्यें जाति आहे; २, वाईट जो हिंग त्यास कोणी म्ह॰

**हिंगण**, पु॰ ग्रं॰ एक वृक्ष आहे; उ॰ कल्पतरू आणि बाभूळ हिंगण आणि मयलागर.

**हिंगणबेट**, न॰ हिंगणबेटीचें जें फल तें.

**हिंगणबेटी**, स्त्री॰ एक झाड आहे.

**हिंगरूड**, न॰ रा॰ हिंगुरडें.

**हिंगपाणी**, न॰ हिंगाचें जें पाणी करित असतात तें.

**हिंगु**, पु॰ सं॰ एक वृक्ष आहे; २, त्याचा जो चीक तो ज्यास हिंग म्ह॰

**हिंगुरडें**, न॰ शरीरावर कांहीं क्षत झालें असतां हिंग खाल्ला किं॰ क्षतास हिंगाचा स्पर्श झाला असतां त्या क्षताचे अंगीं जो मांसग्रंथि होतो तें.

**हिंगुळी**, ३ लिं॰ हिंगूळसंबंधी जो रंग, रसायन, पारा, इ॰ तो.

**हिंगुळूक**, **हिंगळूक**, पु॰ रा॰ हिंगूळ.

**हिंगू**, पु॰ हिंगो.

**हिंगूळ**, पु॰ पाऱ्याचा एक सांधा आहे.

**हिंगे**, अ॰ हंगे.

**हिंगेतिंगें**, अ॰ हंगेतंगे.

**हिंगो**, पु॰ दाखविणें धातुबेयोगीं प्र॰; कोणका-सचोदी देणें.

**हिंचमिंचणें**, रा॰ एक लक्ष्य लावून कांहीं एक काम करीत असतां किं॰ दाटीनबसलेंअ-सतां विसांवा घेणें, आंग मोकळें करणें, इत्याद्यर्थ इतस्ततः जें चलनवलन तद्वि-शिष्ट होणें; उ॰ यादाटींत करेंबसावें अंम-ळ हिंचमिंचं नसरलेंतर जागा नाहीं.

**हिंचुदा**, ३लिं॰ कों॰ हिमदा.

**हिजडा**, पु॰ अनेक नपुंसक मिळोन एक जाति सारिखा समुदाय सजलाआहे त्या समुदायांतला झालेलाजो पुरुष वेष धारी नपुंसक तो; २, ला॰ बीभत्सभाषण कर-णारा निर्लज्ज असाजो मनुष्य त्यास आ-रोपानें म्ह॰

**हिजडी**, स्त्री॰ हिजड्यानें स्त्रीवेश धारण केलाअसतां त्यास म्ह॰

**हिजडें**, न॰ रा॰ हिजडा आणि हिजडी यांस सामान्यतः म्ह॰

**हिजरी**, ३लिं॰ यवनी सनाचें चि॰

**हिडगा**, ३लिं॰ टवाळ.

**हिंडणवारे**, पु॰ कों॰ उद्योगसोडून रिकामप-णें हिंडण्याचाजो व्यापार ते.

**हिंडणें**, मनुष्यादिकांनीं इकडूनतिकडे, तिकडू-नइकडे, अशी रीतीनें फिरणें.

**हिडशा**, ३लिं॰ कों॰ हिडीस प्रथमार्थी.



**हिडसणें**, कोणेकानें कोणेकास धिकारणें.

**हिडसा**, ३लिं॰ रा॰ हिडशा.

**हिडसावणें**, हिडसणें; २, कोणेक पदार्थ हिडिस-करून टाकणें; उ॰ थोडीं सारीं हिडसावून टाकलीं किंहो वेश्यानें.

**हिडीस**, ३लिं॰ ओंगळ; २, न॰ कों॰ कोणेक स्थलीं मल, मूत्र, केरकचरा, उष्टेंमाष्टें, इ॰ रूपजी घाण पडली असल्ये तें.

**हिडूस**, ३लिं॰ रा॰ हिडीस.

**हिंडोल**, पु॰ गानांतील एक राग आहे.

**हिणकर**, ३लिं॰ रा॰ हिणकस जें रुपें तो आ-णि तन्निर्मित पदार्थ तो.

**हिणकस**, ३लिं॰ धातंतरमिश्रीभावानें बीघ-डलागेलाजो रुपें किं॰ सोनें एतद्रूप धातु तो आणि त्याचा केलाजो अलंकारादि पदार्थ तो.

**हिणगें**, न॰ कों॰ शिपतरासारखें एक वंशपा-त्र आहे.

**हिणचट**, ३लिं॰ रा॰ हिणकर.

**हिणवणें**, हिणावणें.

**हिणवट**, पु॰ बायकोपेक्षां दिसण्यांत अप्रौढ असा दिसतोजो दादला तो; २, न॰ बायको पेक्षां दादला अप्रौढ दिसूंलागलाअसतां त्यां-चे दांपत्यसंबंधास दिसतेंजें वैषम्य तें.

**हिणावणें**, कोणेकाचे अंगीं जो उणेपणा अस-तो तो भाषणादिद्वारा बाहेर काढून त्यास ला-जविणें.

**हिण्याचणें**, रा॰ हिणावणें.

**हित**, न॰ कांहींएकापासून द्रव्यलाभ, दुःखनिरास, इ॰रूप आपलें होतेंजें बरें तें; २, ज्याचे योगानें तें बरें होतें तो; हितकारक. हितकारी, हितावह, इ॰स॰

**हितचा**, ३ लिं॰ इथचा.

**हितनें**, अ॰ इथनें.

**हितपर्यंत**, अ॰ इथपर्यंत.

**हितला**, ३ लिं॰ इथला.

**हितवर**, अ॰ इथवर.

**हितून**, अ॰ इथून.

**हितें**, अ॰ इथें.

**हितोपदेश**, पु॰ कोणकास कोणी हितविषयक जो उपदेश करितो तो.

**हिंदकळणें**, हिसळणें.

**हिंदवानी**, ३ लिं॰ हिंदवी.

**हिंदवी**, ३ लिं॰ हिंदुसंबंधी जी भाषा, रीति, वेष, गान, इ॰ तो.

**हिदहिदणें**, हिदहिदीत होणें.

**हिदहिदा**, ३ लिं॰ हिदहिदीत.

**हिदहिदीत**, ३ लिं॰ बिलबिलीत झालें जें गळूं, इ॰ उगाणू किं॰ आंबा, इ॰ फळ तो.

**हिंदुस्थान**, न॰ ज्यामध्यें पूर्वापर हिंदूलोक रहात आले असा पश्चिमेकडे सिंधुनद, उत्तरेकडे हिमाचल, पूर्वेकडे आणि दक्षिणेकडे समुद्र, या अवधीचे मधला जो देश तो परन्तु नर्मदेचे उत्तरेस एशानी पूर्वापश्चिम जो मथुरा, वृंदावन, दिल्ली, आगरें, इ॰ ग्राम ज्यामध्यें असा जो देश तद्विषयीं विशेषेंकरून प्र॰

**हिंदुस्थानी**, ३ लिं॰ हिंदुस्थानसंबंधी जो मनुष्य, भाषा, वेश, इ॰ तो.

**हिंदुळा**, पु॰ चोपाळा.

**हिंदू**, पु॰ पुरुषव्यक्तिमात्रास शेंडी आणि कर्णवेध हे धर्म ज्याआलीत नियत आहेत असी जी ब्राह्मण शूद्रादि अनेक अवांतर जातींनीं विशिष्ट मनुष्यजाति तो.

**हिंदोळा**, पु॰ कों॰ चोपाळा; २, ग्रं॰ झोंपाळा, इ॰ संबंधी जो झोंका तो.

**हिम**, न॰ बर्फ; २, हींव; ३, पु॰ न॰ औषधि पदार्थ भिजत घालून तसेंच विशिष्ट औषधार्थ घेतात जें पाणी तें; ४, थंड जो स्पर्श किं॰ तद्विशिष्ट पदार्थ तो.

**हिमज्वर**, पु॰ प्रथमतः थंडी भरून अनंतर जो ज्वर येतो तो.

**हिमटा**, ३ लिं॰ भक्ष्यादिपदार्थ ज्याचानें कोणासही पाहिजे तितका घालवत नाहीं किं॰ देववत नाहीं अशा स्वभावाचा जो मनुष्य तो.

**हिमट्या**, ३ लिं॰ हिमटा.

**हिंमत**, स्त्री॰ कोणेक कार्य करण्याविषयीं कोणाचे अंतःकरणांत असती जी धमक ती; म्ह॰ हिंमत मर्दां तर मदत खुदा.

**हिंमतदार**, ३ लिं॰ ज्याचे अंतःकरणांत मोठी हिंमत आहे तो.

**हिंमती**, ३ लिं॰ हिंमतदार.

**हिमतीचा**, ३ लिं॰ हिमती.

**हिमवंत**, पु॰ हिमालय.

**हिमवान्**, पु॰ हिमालय.

**हिमळ**, ३ लिं० मिष्टनाह्मणून जी गोडी ती ज्याचे अंगी थोडी असा जो अंबा, फणस, इ० फळ, पाणी, इ० पदार्थ तो; ३० पाणी मुळचें गोड जरी असलें तरी तापवून निविवलें ह्मणजे हिमळ लागतें.

**हिमाइति**, ३ लिं० हिमाईतदार.

**हिमाईत**, स्त्री० लोकांनी मानावें, भय बाळगावें, असें वजन पडायास कारणीभूत कोणाकास कोणेक समर्थाचा असतो आश्रय तद्रूपजें बळ ती.

**हिमाईतदार**, ३ लिं० कोणाकाचा हिमाईत आहे ज्यास तो.

**हिमाचल**, पु० हिमालय.

**हिमायत**, स्त्री० हिमाईत.

**हिमायतदार**, ३ लिं० हिमाईतदार.

**हिमायती**, ३ लिं० हिमाईतदार.

**हिमालय**, पु० या भरतखंडाचे सीमेवर उत्तरेस एक मोठा पर्वत आहे.

**हिय्या**, पु० कोणेक अवघड कार्याचेठायीं प्रवृत्ति नहोण्यास प्रयोजक जीं भय, लज्जा, निर्बलता, इ० प्रतिबंधकें तीं नगणितां त्या कार्यीं प्रवृत्ति होण्याविषयीं अंतःकरणाची करितात जी दृढता ती.

**हिय्येदार**, ३ लिं० ज्याचे अंगीं हिय्या आहे तो.

**हिय्यो**, अ० ग्रा० नांगरास बांधलेले बैल समोर चालत असतां त्यांस वळण घेऊन फिरायाचें इशाऱ्याचा हा शब्द आहे.

**हिरकणी**, स्त्री० लहान जो हिरा ती.



**हिरका**, पु० कों० काचाचे अंगीं जे काडी सारिखे अवयव असतात ते प्रत्येकीं; २, ग्रा० रुपाशी, रवापरपोळी, इ० कांचा पोशीं रेषांनीं भिन्नभिन्न झाले असतात जे अवयव ते प्र०

**हिरकूट**, न० हिराला निंदेनें ह्म०; २, पु० को० हिराला ह्म०

**हिरडा**, पु० हरडा.

**हिरडी**, स्त्री० जेथें दांत उगवतात असे जे मुखांत दोन अवयव आहेत ते प्र० किं० त्यामध्यें दांत उगवायाचीं जी निरनिराळीं स्थानें तीं प्र०

**हिरण्य**, न० सं० सुवर्ण ह्मणून जी धातु तें.

**हिरमुसणें**, कोणेक कर्माचेठायीं हौशीनें जो वागत असतो त्यास कोणी दुर्भाषणादि केल्यामुळें त्याणें ती हौस सोडून विरस होणें.

**हिरमूस**, ३ लिं० कांहीं कारणानें हिरमुसला जो तो.

**हिरमोड**, पु० स्त्री० कांहीं एक कार्याविषयीं धरिला असतो जो उत्साह त्याचा कांहीं कारणामुळें होतो जो भंग तो; २, ३ लिं० ग्रा० रुमाराचा जो हिरवा तो.

**हिरली**, स्त्री० ग्रा० विरली.

**हिरलें**, न० ग्रा० विरलें.

**हिरवट**, ३ लिं० ग्रा० रुमाराचा जो हिरवा तो.

**हिरवटाण**, स्त्री० हिरवट जी घाण ती.

**हिरवंडा**, ३ लिं० इषत् हिरवा जो मडकें, इ० पदार्थ तो, २, कोणेक पदार्थास येतो जो हिरवट वास त्याचें ना०

**हिरवस**, ३ लिं० पुरता परिपक्क झाला नाहीं

ओ कोणेक पदार्थ तो आणि तत्संबंधीओ वास किं॰ रुचि तो.

**हिरघळ**, स्त्री॰ कों॰ हिरव्या लहान तृणादिकांचाओ समुदाय ती; उ॰ सडकून पर्जन्य पडला ह्मणजे आठादिवसांत चोहींकडे हिरघळ होत्ये.

**हिरवा**, १ लिं॰ पाच, शेवाळ, कोमल तृण, इ॰ कांचे रंगासारिखा जो रंग तो आणि त्या रंगानें विशिष्ट जें पर्ण, फल, काष्ठ, वस्त्र, इ॰ पदार्थ तो; २, परिपक्क झालेले नव्हे असें जें फल, पर्ण, धान्य, भात, भाकर, भाजी, इ॰ अन्न, मडकें, बुद्धि, तद्विशिष्ट मनुष्यादि, इ॰ तो; ३, तत्संबंधीओ वास किं॰ रुचि तो; ४, संकेतानें भांग, गांजा, यांस किं॰ त्यांनें सेवणाराओ त्यास ह्म॰; ५, कोणाशीं मिळून रहावाचा नव्हे, शीघ्रकोपी, तुरक, जो मनुष्य त्यास ह्म॰

**हिरवें**, न॰ गुरें, इ॰ कांस भक्षावयाजोगें हिरवेंजें तृणादिक तो.

**हिरहिरी**, स्त्री॰ हिरिरी.

**हिरा**, पु॰ एक शुक्लवर्ण महारत्न आहे.

**हिराकस**, पु॰ रंगास उपयोगीं एक पदार्थ आहे

**हिरामण**, पु॰ पोपटांत एक भेद आहे.

**हिरावणें**, कोणेकापासून, द्रव्य, वस्त्रादिपदार्थ कपटानें किं॰ बलात्कारानें घेणें.

**हिराहिंग**, पु॰ चकचकत असतो असाओ फार चांगला हिंग त्यास ह्म॰

**हिरिरी**, स्त्री॰ कोणेक कार्य करण्याविषयीं कर्त्याचे अंगीं एकेक प्रयत्नानें उत्थित झाला असतोओ वेग ती; उ॰ एथून जी फौज निघाली तीणें पहिल्या हरिरीसच किल्ला घेतला; कोधाचे हिरिरीबरोबर मी एखादा वाईटशब्द बोललों असेन.

**हिरीरी**, स्त्री॰ हिरिरी.

**हिरून**, अ॰ हिरावून.

**हिरेखाण**, स्त्री॰ हिरे जेथें उत्पन्न होतात ती खाण.

**हिरेदिवे**, पु॰ मकरसंक्रांतीचे दिवशीं स्त्रिया ब्राह्मणांस दोनदीप व दोन आदर्श मिळून जें दान करितात ते.

**हिलगड**, स्त्री॰ कों॰ देणें, घेणें, इ॰ व्यवहारांतजी मानगड ती.

**हिलगडणें**, कों॰ कोणेक कार्य सिद्धीस न जाऊं देतां अडथळून पाडणें.

**हिलगणें**, कों॰ हिलगडणें; २, दोर, काष्ठ, इ॰ कांहीं एक पदार्थ कोणेक आधाराशीं सरासरी गुंतवून ठेवणें.

**हिलणें**, कों॰ हालणें.

**हिलारी**, स्त्री॰ दे॰ प्रा॰ हिरिरी.

**हिलाल**, पु॰ उत्साहादिकांचे ठायीं प्रकाशार्थ ज्योत पलिते, इ॰ घालून पाजळायासाठीं एका काठीचे अग्रास जें पणतीसारिखें लोखंडाचें पात्रसंबद्ध केलें असतें तो.

**हिलाल्या**, पु॰ हिलाल जाणें धरिला आहे तो.

**हिल्ला**, पु॰ धनी, सावकार, इ॰ कांशीं सोईनें वागावें तें न वागतां दांडगाई, कांगावे, कुधोडे, इ॰

इ॰ रूप जा लबाडया कोणी करितो तो; २, प्रपंचादि कार्य निर्वाहाविषयीं कोणेकास कोणेकाचा असतो जो आश्रय तो.

**हिल्लाहरकत**, स्त्री॰ हिल्ला. हरकत, इ॰ ती.

**हिंवज्वर**, पु॰ हिमज्वर शब्दाचा अपभ्रंश.

**हिंवडणें**, कों॰ हुडहुडणें.

**हिंवडी**, स्त्री॰ कों॰ हुडहुडी.

**हिंवणें**, कों॰ हिंवानें व्यथित होणें.

**हिंवताप**, पु॰ हिमज्वर.

**हिंवर**, पु॰ एक झाड आहे.

**हिंवस**, स्त्री॰ गा॰ पर्जन्य पडत असतां वायूचे झपाट्यानें गृहादिकांत प्रविष्ट होतो जो तुषार समुदाय ती.

**हिंवसणें**. हिरमुसणें: प्र॰ संकुचित; २, कोणेक पदार्थानें हिंवसेच्या योगानें खरदणें.

**हिंवसा**, ३लिं॰ संतमता ज्याचे अंगीं नाहीं अतएव थंड जो तो.

**हिंवसाण**, स्त्री॰ गा॰ सर्दीचे योगानें बिगडला जो वस्त्रादि पदार्थ त्यास जो एकप्रकारचा घाईरवास येतो ती.

**हिंवाडी**, स्त्री॰ हिंवडी.

**हिंवाळा**, पु॰ हेमंत, शिशिर, एतत्संबंधी थंडीचे जे दिवस ते.

**हिंवाळी**, स्त्री॰ कों॰ हिंवाळा.

**हिशेब, हिशाब**, पु॰ एक जी विशिष्ट संख्या तीतून अवांतर संख्या निरनिराळ्या काढाव्या किं॰ अनेक ज्या पृथक्पृथक् संख्या त्या एकत्र करून विशिष्टसंख्या करावी असा जो संख्या व्यवहार याची सिद्धि सौकर्येकरून व्हावी म्हणून गुणाकार, इ॰ अनेक युक्ति बुद्धिमंतानीं करून ठेविल्या आहेत तो आणि तेणेंकरून सिद्ध होतें जें संख्येची इयत्ता म्हणून फल तो; २, ला॰ न्याय प्राप्त जी रीति तो; ३, गणती हिताच्यार्थी.

**हिशेबकिताब**, पु॰ हिशाब, इ॰

**हिशेबी**, ३लिं॰ हिशेब करण्याविषयीं कुशल जो कारकून, इ॰ तो; २, हिशेबसंबंधी जो कागदपत्र, इ॰ तो; ३, ज्यामध्यें अधिक उणें यत्किंचित ही नाहीं असा बेताबाताचा जो करणें, इ॰ व्यवहार तो.

**हिशोब**, पु॰ हिशेब.

**हिशोबी**, ३लिं॰ हिशेबी.

**हिंसक**, ३लिं॰ सं॰ हिंसा करण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हिसकणें, हिंसकणें**, ढोर, पक्षी यांच्या मनुष्यादिकांचा हस्तादि अवयव इ॰ ओढल्यानें विशिष्ट करणें; २, कोणेकानें कोणेक काम फिसकेर असें करणें, ३, कोणा एकापासून द्रव्यादि हिसडणें.

**हिंसका**, पु॰ ओढका; २, हबका प्रथमार्थी; ३, हेलपटा; ४, घडायास आलें जें कोणेक काम त्यास कोणेक विघ्नसंबंधानें पडतो जो अडथळा तो.

**हिसकावणें**, कोणेकापासून वस्त्रालंकारादि पदार्थ बलानें हिसका देऊन किं॰ कपटानें ओढणें.

**हिंसडणें**, हिसकणें.

**हिंसडा, हिसडा**, पु॰ हिसका प्रथमार्थी.

**हिंसडी**, स्त्री॰ कों॰ हिंसडा.

**हिसणें, हिंसणें**, अश्वानें खिंकाळणें.

**हिंसणें**, ग्रं॰ कोणेकास जिवें मारणें.

**हिसळणें, हिंसळणें**, पात्रस्थित जो उदकादि पदार्थ त्यास धक्का, इ॰ बसल्यामुळें वर उसळणें;

पक्षीं

पक्षीं त्या पात्रास कर्तृता.

**हिसा, हिंसा**, पु॰ कोणेक अर्थाचे अनेक जे वांटे ते प्र॰

**हिंसा**, स्त्री॰ सं॰ मनुष्यादि जीवांचा जो वध तो; २, ३लिं॰ हिंवसा.

**हिंसाडणें**, हिंसडणें.

**हिंसाडा**, पु॰ हिंसडा.

**हिंसाडी**, स्त्री॰ हिंसडी.

**हिसाब**, पु॰ हिशेब.

**हिसाबकिताब**, पु॰ हिशेबकितेब.

**हिसाबी**, ३लिं॰ हिशेबी.

**हिंसेदार, हिसेदार**, पु॰ वांटेली.

**हिसेरशी, हिंसेरशी**, स्त्री॰ विभागायाचा अर्थ आणि विभागांयांची संख्या तेच भाज्य आणि भाजक करून त्रैराशिकरीतीनें विभाग करण्याचा जो प्रकार तो व त्याप्रकारानें झालीजी एकएकाची भिन्नभिन्न वांटणी तो.

**हिंस्त्र**, ३लिं॰ हिंसा करण्याचा स्वभाव ज्याचा असा जो व्याघ्र, सिंहादि प्राणी, किं॰ व्याध, हाल्दी, इ॰ कोणी तो.

**हिस्सा**, पु॰ हिसा.

**हिस्सेदार**, पु॰ हिसेदार.

**हिहिही**, अ॰ हंसण्याचे शब्दाचें अनु॰; निंदेविषयीं प्र॰

**ही**, अ॰ कोणेक विधानार्थ कोणेक अर्थाचा निर्देश करून तत्सहवर्तमानच अर्थांतराचा निर्देश करावा असा जो विवक्षेचा विषय त्याचें द्योतक हें अव्यय; त्या अर्थांतरापुढें किं॰ प्रत्येकीं सर्व अर्थांपुढें याचा प्र॰ होतो; २, देखील.

**हीड**, स्त्री॰ कों॰ वळचण.

**हीण**, न॰ सुवर्णादि धातूंमध्यें ताम्रादिकांचा जो मिश्रितांश असतो तें; २, लोकांनीं हिणवाया जोगें जें हीनत्व येतें तें; स्त॰ रीण फिटेलपण हीण फिटत नाहीं.

**हीन**, ३लिं॰ सं॰ विवक्षित तद्गुण धर्मादिकांनीं रहित किं॰ विवक्षितापेक्षां न्यून तो; २, नीच हलकें जें कर्मादि तो.

**हीर**, पु॰ माड, पोफळ, इ॰ कांचे पातीचेमध्यें जी काडी असते तो; २, हिरका.

**हीरक**, पु॰ सं॰ हिरा.

**हींव**, न॰ स्पर्शवेद्य जी थंडी तें; २, हिमज्वर.

**हुंहुं**, अ॰ उंहूं याचा प्रतिपक्षी.

**हुकणें**, विवक्षित पदार्थावर मारायाचा जो गोटा, धोंडा, इ॰ पदार्थ त्याणें त्यात्या पदार्थी न लागे असा चुकणें किं॰ तो न लागल्यामुळें त्याप्रहारानें व्हायाचीजी कांहींएक संज्ञा तीणें न होणें आणि प्रहारकर्त्यानें ही त्याचुकीनें विशिष्ट होणें.

**हुकमत**, स्त्री॰ कोणेकाचा हुकूम कोणेकावर चालावा असेंजें कोणेकाचे अंगीं स्वामित्व असतें तो.

**हुकमती**, ३लिं॰ ज्याचे हुकमतींत वागणारा जो तो त्याचा.

**हुकमा**, अ॰ हुकुम केला असतां जसें व्हावें करावें तसें; होणें, करणें, इ॰ कांचें वि॰; परंतु त्या होण्या करण्यास अनिष्टता असतां प्र॰; उ॰ पाऊस नको असें ठरलें असतां हुकमा पडतो.

**हुकमी**, ३लिं॰ हुकमती.

**हुकमें**, अ॰ हुकमा.

हुकार, पु० यवनी संप्रदायानें कागदपत्र इ० लिहावयाचें असतां प्रथम वरजी थीलिह्याची त्या स्थानीं हू असें जें अक्षर काढितात तो; २, हुंकार.

हुंकार, पु० कोणी काहीं एक गोष्ट सांगत असतां किं० विचारली असतां करितात जो हूं असा शब्द तो.

हुंकार, पु० कोणेकास दटावल्ये समयीं जो हूं असा शब्द करितात तो.

हुंकारा, पु० कों० कोणी काहीं एक गोष्ट सांगत असतां जो मध्यें मध्यें हूं असा शब्द ऐकणारे करितात तो.

हुकी, स्त्री० कोल्ह्याचा जो स्वजातीय शब्द तो; २, काहीं एक कार्य करण्याविषयीं कोणेकास येत्ये जी उत्कलिका ती.

हुकूम, पु० हिं० आज्ञा; २, गंजिफांचे पानांत चोरनक्के असें स्वरें जें पान तें.

हुकूमनामा, पु० हिं० वादी प्रतिवादी यांचे वादाचा निर्णय झाल्यानंतर जो स्वराठरतो त्यास सर्कारांतून जें निर्णयपत्र करून देत असतात तो.

हुकूमबंदा, पु० हिं० जो आज्ञा हुकमती तोत्याचा.

हुकेरी, ३लिं० हुकेरी ह्मणून एक गांव आहेतेथें उत्पन्न झालेला जो रुपयाचा शिक्का तो आणि त्या शिक्क्यानें पडलेला जो रुपया इ० नाणें तो.

हुक्का, पु० गुडगुडी.

हुक्की, स्त्री० हुकी प्रा० द्वितीयार्थी.

हुक्केबरदार, पु० हिं० हुक्का संभाळणें, भरून देणें, या कामावर ठेविला असतो जो मनुष्य तो.

हुक्केबाज, ३लिं० हुक्का ओढायाचें व्यसन ज्यास लागलें असतें तो.

हुंगणें, कोणेक पदार्थ किं० नलिका गंध आघ्रात करणें; २, ला० कोणेक गुप्त गोष्ट काहीं एका लक्षणादिकावरून आणणें.

हुंगाड्या, पु० दे० हुंग्या.

हुंग्या, पु० कोणेक गोष्टीची बातमी गुप्तरूपें करून घेणारा जो राजदूतादिक तो.

हुचमली, स्त्री० बुदबळाचे खेळांत प्यादेमातीचा एक भेद आहे

हुच्चभाई, पु० हुच्चा जो त्यास स०

हुच्चा, ३लिं० प्रपंचाचे खटल्याकडे ज्याचें अगदीं चित्त नाहीं खेळणें, बाता छाटणें, तमाशा पाहणें, दुसऱ्याचा कुचेष्टा करणें, इ० विषयांवर ज्याचें सर्वदा लक्ष्य अशा स्वभावाचा जो तो.

हुजत, स्त्री० कोणेकाशीं बोलण्याची सरळ रीति सोडून वांकड्या रीतीनें उगीच कीर्णी करितो जो वाद ती; २, शेतसारा इ० संबंधी कुळांस सर्कारांतून देतात जी पावती ती.

हुजतखोर, ३लिं० हुजत करण्याचा स्वभाव ज्याचा तो मनुष्य.

हुजती, ३लिं० हुजतखोर.

हुजरात, स्त्री० सरदाराचे दिमतीस न लाविता सर्कारानें आपले खासगीकडे ठेविली असत्ये जी फौज ती; २, ला० कोणेकापाशीं असतात जीं दासदासी, शिष्ये, खिजमतगार, कुतरीं, मांजरें, इ० त्यास ह्म०

हुजराहुजूर, अ० समक्षासमक्ष.

हुजऱ्या, पु० राजा इ०कांजवळ जो खिसमतगार असतो तो.

हुजूर, अ० समक्ष; उ० माझे हुजूर तो असें बोलला; २, मुख्य सर्कारांत; उ० महालींचोर धरले असतील तें हुजूर पाठवून द्यावे.

हुजूरपागा, स्त्री० खासपागा.

हुजूरपाग्या, पु० खासपाग्या.

हुजूरमामला, पु० सरदार इ०कांस सर्कारांतून जे ग्रामादिक देतात त्यांत जो काहीं अंशातः सर्कारचा अंमल असतो तो.

हुजूरसनदी, ३लिं० सर्कारसनदी.

हुटहुटणें, कोणेकानें हुटहुटीनें विशिष्ट होणें.

हुटहुटी, स्त्री० हुटहूट.

हुटहूट, स्त्री०पु० कोणेक गोष्टी विषयीं केव्हां करीन, केव्हां होईल, केव्हां पाहीन, केव्हां जाईन, इ०रूप जो भाव अंतःकरणांत होतो जेणेंकरून ती गोष्ट तशी होईतों चित्त उद्विग्न असतें ती तो.

हुटाटणें, हुटहुटणें.

हुंड, पु० सुवर्णाचे अंगच्या डाक इ० संबंधी मलांश जावा ह्मणून विटकर, मीठ, इ० द्रव्यांचा त्या सुवर्णास लेप करून अग्नीची आंच द्यावी असा जो संस्कार करितात तो आणि तें मीठ, विटकर, इ० जें संस्कारक द्रव्य तो.

हुडकणें, धुंडणें.

हुंडका, हुंडका, पु० रडें यावयाचे पूर्वी पोटांतून रडयाचा येतो जो उभड तो; २, गोमहिष्यादिकांचें अपत्य आपल्या आईस पित्ये समयीं दुग्ध यावें ह्मणून कांसेस करितें जो मुखानें प्रहार तो; ३, डोकी, बाहुमूल, इ० कें करून कोणेकास कोणी करितो जो प्रहार तो.

हुडकावणें, धुडकावणें.

हुंडकी, हुंडकी, स्त्री० हुंडका द्वितीयार्थी.

हुंडणावळ, स्त्री० रुपये इ०कांची हुंडी घेतली असतां त्या बद्दल बट्टा, खर्च, इ० संबंधी जें सावकारास द्रव्य द्यावें लागतें ती.

हुंड्या, पु० कों० मक्ता प्रथमार्थी.

हुडहुडणें, हुडहुडीनें युक्त होणें.

हुडहुडाजर, हुडहुडाताप, पु० कों० हिमज्वर.

हुडहुडी, स्त्री० जीचा योगानें शरीरास कंप सुटावा, दांतखिळी बाजावी, हातपाय कांकडावे, असें ज्या योगी जी शरीरांत अतिशयित थंडी भरत्ये ती.

हुडा, पु० मं० किल्ला इ० संबंधी जो बुरूज तो; उ० मेरू ऐसे लंकेचे हुडे कैसा भाशील तयापुढें.

**हुंडा**, पु० मक्का प्रथमार्थी; २, लग्नामध्यें वरास, वरपक्षीयांस, जें वस्त्रालंकारादि घावयाचें त्या बद्दल उक्ती बोली ठरावून जें रोकड द्रव्य मुलीचा बाप देतो तो; ३, भुंडा जो बैल इ० तो.

**हुंडाभाडा**, पु० कोणेक व्यवहारीं भाडें, जकात, सारा, इ० खर्चांची निरनिराळी बोलीन करितां तो व्यवहार पत्करून घेण्याविषयीं एकंदर करितात जो मक्का तो.

**हुंडारणें**, दे० गोमहिष्यादि पशूनीं आपल्या मस्तकें करून कोणेक मनुष्यादिकास पलीकडेस ढकलणें; २, जवळ प्राप्त झालेला जो मनुष्यादि कोणेक पदार्थ किं० कोणेक गोष्ट तो खिसगणतींत न आणतां आपल्यापासून दूर घालविणें.

**हुंडी**, स्त्री० कोणेक स्थळीं कोणेक सावकारापाशीं ऐवज भरून त्यापासून स्थलांतरचे सावकारावर अमुक प्रतीचें अमुक संख्याक नाणें घावें अशी जी चिठ्ठी घेतात ती; २, ला० देशांतरीं मरण पावला जो आपला कोणी गोत्रज त्याचें लेखादि येतें जें वर्तमान त्यास म्ह०; ३, एका स्थळीं रुजलेलें जें अंबा, तुळस, इ० कांचें झाड तें दुसरें स्थळीं लावायाचें असतां तें खणून काढते समयीं त्याचे मूलास आधारभूत जो मृत्तिंड राखित असतात ती आणि तद्विशिष्ट तें झाड ती; ४, बुधल्याचे तोंडास झोळी सारखी दोरी बांधून त्यावर फडकें घालून त्यांत माती, शेण, इ० ठांसून बसवावीं अग्नी जो इड्या बसवितात ती; ५, औषध्यांत एक भेद आहे या अर्थी प्रा० अनेकवचनीं प्र०

**हुंडीचिठ्ठी**, स्त्री० हुंडीपत्र.

**हुंडीपत्र**, न० हुंडी प्रथमार्थी.

**हुंडीपांडी**, स्त्री० हुंडीचिठ्ठी इ० ती.

**हुडुकहुडूक**, अ० खुडुकखुडूक.

**हुडुत्त्**, अ० हत्त्.

**हुडूक**, न० एक चर्मवाद्य आहे जें सर्व देजोशी इ० हातांत वाळगीत असतात तो; २, कोरडेशास आमनी सारिखा एक पदार्थ करीत असतात तें.

**हुंडेकरी**, पु० हुंड्या भाड्याचा व्यापार करीत असतो जो तो; २, हुंडा घेतल्यावांचून कोणाची मुलगी करीत नाहीं असा प्रतिष्ठित जो वर तो.

**हुंडेंभाडें**, न० हुंडाभाडा.

**हुत**, ३ लिं० अग्नीचे ठायीं होमिलें जें द्रव्य तें किं० ज्यामध्यें होम केला असा जो अग्नि तो; २, अग्निसंयोगानें जळून खाक झाला जो पदार्थ तो.

**हुताशनी**, स्त्री० होळी प्रथमार्थी.

**हुतुतू**, पु० एक मुलांचा खेळ आहे; २, ला० पोरें अध्ययनादि व्यापार सोडून ओरडणें, उड्या मारणें, इ० रूप करितात जी दांडगाई तीस म्ह०.

**हुंदका**, पु० हुंडका.

**हुंदकी**, स्त्री० हुंडकी.

हुंदडणें, हुंदारणें, प्रा० प्रथमार्थी.

हुंदडा, हुंदडा, पु० हुंदका, प्रा० प्रथमार्थीचा न; २, जरीमरीसारखा एक रोग आहे तो आणि तदभिमानिनी जी देवता ती; ३, मार्गादिकांच्या ठायीं काहीं अडचण असो अनुल्लंघनीय असो परंतु त्यास नगणतां जोरानें धरला असतो त्या रोखानें धडकजाणारा जो मनुष्य, पशु, इ० त्यास आरोपानें म्ह०; ४, सोंगट्याचे खेळांत एकच जी फिरतीसोंगटी राहत्ये तीस म्ह०.

हुंदडी, स्त्री० हुंदकी.

हुंदाडणें, हुंदडणें.

हुंदाडा, पु० हुंदडा.

हुडुकहुडूक, अ० खुडुकखुडूक.

हुद्दा, पु० हवालदारी, सुभेदारी, इ० रूप जो कोणीकाकडे असतो अधिकार तो; २, ताशा, मर्फा, आणि ढोल हीं तीन वाद्यें तीं व त्यांचे जे वाजविणारे ते म्ह०.

हुद्देदार, पु० सुभेदारी इ० रूप हुद्दा ज्याकडेस आहे तो.

हुदुकहुदूक, अ० हुडुकहुडूक.

हुनर, पु० स्त्री० न० कोणेक कार्य सिद्ध करण्याचा अनेक प्रकारचा अनेक ज्या युक्ति त्या म्ह०.

हुनरी, ३लिं० अनेक हुनर ज्याचे आंगीं आहेत तो.

हुनेर, पु० न० स्त्री० हुनर.

हुनेरी, ३लिं० हुनरी.

हुन्नर, पु० स्त्री० न० हुनर.



हुपट, पु० हुप्या प्रथमार्थी.

हुप्या, पु० वानरजातीय जी मोठी पुरुषव्यक्ति तो; २, ला० एकाठिकाणीं ज्याचा पाय ठरत नाहीं अतएव ज्यावर काहीं एक कार्य विश्वासतां येत नाहीं असा जो मनुष्य त्यास निंदावसरीं म्ह०.

हुंबणें, अ० कन्हणें; उ० आधींच हुंबत पायें करून हृदयीं पडिला पाषाण.

हुंबर, स्त्री० दे० गुराखी पोरांचा एक खेळ आहे; हुंबरी. तुंबरी वर येणें म्ह० अरेतुरेवर येणें.

हुंबरणें, हंबरणें.

हुंबरी, स्त्री० हुंबर.

हुबहू, अ० कोणेक अर्थाशीं सर्वधर्मीही करून सादृश्य असल्यामुळें केवळ तोच हा अशी प्रतीति होई असें; कोणेक अर्थानें असणें, दिसणें, बोलणें, इ० कांचें वि०.

हुबेहूब, अ० कों० हुबहू.

हुमण, न० पु० एक पक्षी आहे.

हुमरी, स्त्री० हुंबर.

हुमा, ३लिं० हुम्या.

हुम्मा, पु० एक पक्षी आहे जो कधींही भूम्यादिकांवर बसत नाहीं.

हुम्या, ३लिं० मोठें काहीं अडणीचें काम आल्यामुळें दुसऱ्यानें किती जरी घाई केली तरी ज्याचें आसनही ढळूं नये कोणी काहीं विचारलें पुसलें असतां झटकर उत्तर ज्याचे मुखांतून निघत नाहीं फारच झालें तर

कदाचित् हूं मात्र म्हणेल अशा स्वभावाच्या केवळ मंद जो त्यास निंदेनें म्ह०.

हुरडणें, क्रि० हुरपळणें.

हुरडफुंक्या, पु० तादृश लढाईचे उपयोगीन व्हे सरासरी नावाचा मात्र शिपाई त्यास निंदेनें म्ह०.

हुरडभूज, स्त्री० क्रि० काटकवळ इ० सामग्रीचा नास्तिकूल्यामुळें शेत जमीनीस यथा कथंचित् जो भाजण्याचा संस्कार करितात ती.

हुरडा, पु० जोंधळ्याचीं ओलीं कणसें अग्नींत भाजून त्याचे खावयासाठीं काढितात जे दाणे तो; २, तशीं भाजून खाण्याचे योग्यतेस आलेलीं जीं जोंधळ्याचीं ओलीं कणसें तो; जोंधळा सजगुण इ० कानें हुरड्यास येणें म्ह० दाणा भाजून खायास येई अशा दशेस येणें.

हुरण, न० मुंग्यांचा जो समुदाय तें; २, ला० मनुष्यांचा एकत्र जमला जो समुदाय त्यास प्रसंगविशेषीं म्ह०; ३, रा० मुंग्यांत एक जाति आहे.

हुरपळणें, हुरफळणें, अग्निकिं० नत्सदृश नसत जो फुंपाटा, धुरळा, इ० तेणें करून कोणेक पदार्थ वरवर दग्ध करणें.

हुरमुजी, ३लिं० हुरमुजेच्या जो रंग तो किं० त्याणें रंगविलेला जो भिंत इ० पदार्थ तो; २, हुरमुजेसारिखा आहे रंग ज्याचा असें जें मोतीं तो किं० तसा जो त्याचा रंग तो.

हुरमूज

हुरमूज, स्त्री० कावेसारिखा एक मृत्तिकाविशेष आहे.

हुरमोज, स्त्री० हुरमूज.

हुरमोजी, ३लिं० हुरमुजी.

हुररेवडी, स्त्री० कोणी चालतांना पडला, बोलतांना कचरला, इ० काहीं उपहासास कारण झालें असतां अनेक पोरें इ० हुर्रे करून जी त्याची बचेरी करितात ती.

हुरली, स्त्री० क्रि० हुररेवडी.

हुरवावडी, स्त्री० दे० हुररेवडी.

हुरशी, स्त्री० रा० हुरूप.

हुरहुरणें, हुटहुटणें.

हुरहूर, स्त्री० काहीं एक गोष्ट आपल्या हातून गेल्यामुळें जीवास लागती जी चटपटती.

हुरळणें, आपलें अवसान किती, ही गोष्ट केवढी, ही आपले हातून होईल किं० न होईल, हिचा परिणाम बरा होईल किं० वाईट होईल, इ० विचार न करितां मग्न होण्याविषयीं एकाएकीं मोठ्या उत्साहानें विशिष्ट होणें.

हुरा, पु० रा० शीर म्हणून झाड आहे तो; २, हुस्रें एक कुड्याचे झाडासारिखें झाड आहे.

हुरूप, पु० स्त्री० कोणेक कार्य करण्याविषयीं अंतःकरणाचाठायीं उद्भूत होतो जो उत्साह तो ती.

हुरूम, स्त्री० क्रि० मी हें अमुक काम करीन असें कोणी आपल्या आंगीं बाळगती जें अ-

वसान

वसान ती.

हुर्मत, स्त्री० अबरू.

हुर्मतदार, ३लिं० अबरूचा जो मनुष्य तो.

हुर्मती, हुर्मतीचा, ३लिं० हुर्मतदार.

हुर्र, अ० कोणेकाची अप्रतिष्ठा व्हावी म्हणून चेष्टा करायाची असतां याचा प्रयोग करितात.

हुलकट, स्त्री० रा० लोकानीं तजावजा व्हावयाजोगा जो चोर, परचक्रादिसंबंधी दंगा ती.

हुलकटणें, कों० लोकानीं तजावजा व्हावयाजोगा दंगा प्रसृत होणें; उ० गंगातीराकडे अताशीं हुलकटलें आहे तुह्मीं तिकडे जाऊं नका.

हुलकावणी, स्त्री० हा अमुक करणार आहे किं० अमकेकडे जाणार आहे इ० रूप आपले कर्तृत्वाच्या रोंख दुसऱ्याचे ध्यानांत यावयाजोगें चेष्टा, भाषण, इ० जें कांहीं करितात ती.

हुलगा, पु० कुळीथ म्हणून जें धान्य आहे तो.

हुलड, स्त्री० कों० हुलकट.

हुलवळा, पु० दे० हुलगा.

हुलोळा, पु० दे० हुलगा.

हुल्लड, स्त्री० हुलड.

हुशार, ३लिं० प्रा० सावधया अर्थी.

हुशारणें, हुशार होणें.

हुशारी, स्त्री० हुशारपणा.

हुश्श, अ० हुस्स प्रथम द्वितीयार्थी.

हुसकटणें, उसकटणें; २, हुडारणें द्वितीयार्थी; ३. कों० गोमहिष्यादिपशूनीं आम्रादिकांस पाडून बुजणें.

हुसकणें, हुसकटणें द्वितीय तृतीयार्थी.

हुस्स, अ० अतिशयित ऊष्मा झाल्यामुळें वारा घ्यावा अशी इच्छा झाली असतां हा उद्गार निघतो; २, पांखरांस हाकायाचा हा शब्द आहे; ३, कों० कोणेकास हुस्स करणें म्ह० विवक्षित कोटींतून दूर करणें.

हुळवाजणें, रा० धिंडावणें.

हुळहुळणें, अंगावर केश फिरविला असतां किं० मुंगी इ० कीटक चालला असतां जो कंडूतिविशेष होतो तैत्सजातीय कंडूतिविशेषानें कोणेक शरीरावयव विशिष्ट होणें; २, तादृश कंडूतिविशेष व्हावयाजोगें केश किं० मुंगी इ० कानीं संचरित होणें; ३, ला० तोंड, हात, पाय, इ० अवयवानीं बोलणें, मारणें, चालणें, इ० स्वस्व व्यापारीं उत्कंठा लागायाजोग्या कंडूतिविशेषानें विशिष्ट होणें.

हुळहुळा, ३लिं० घर्षणादिकारणानें इतरपदार्थस्पर्शविषयीं असहिष्णु झाला जो हस्तपादाद्यवयव तो.

हुळहुळाट, पु० हुळहुळीचा जो अतिशय तो.

हुळहूळ, स्त्री० हुळहुळण्यास कारणभूत जो कंडूविशेष प्राप्त होतो ती.

हुळा, पु० भक्षणार्थ ओल्या हरभऱ्याचे भाजलेले जे घांटे ते.

हुळूम, पु० कों० वांगी, मिरची, इ० कितीएक

झाडानीं प्रा० मेलें आयें असा जो त्याचे मूळप्रदेशीं रोगविशेष होत असतो तो.

हूँ, अ० प्रा० हां या अर्थी.

हूक, स्त्री० उसण; २, कोल्ह्यांच्या जो स्वजातीय शब्द तो; ३, ला० कोणएक गोष्टीविषयींची उठती जी बातमी ती.

हूड, ३लिं० युद्धादिप्रसंगीं मागला पुढला विचार न पाहातां उडी घालण्याचा स्वभाव ज्याचा असा जो तो.

हूप, अ० वानरांचे स्वजातीय शब्दाचें अनुकरण.

हूल, स्त्री० हुलकावणी; २, हुलकट; ३, दुफांशीं सोंकट्याचे खेळांत कदललेल्या जुगापुढें पक्की व्हावयास आणारी जी सोंगटी ती.

हूळ, स्त्री० कों० दुसऱ्यानें तत्काल घाबरलें जायें काहीं एक सुचूं नये अशी अवस्था व्हावयाजोगी त्यास कोणेक गोष्टीविषयीं कोणेक करितो जी घाई ती; प्रा० भोंवडणें धातुयोगीं प्र०; रा० कोणेकानें आपली हूळ घेऊन जाणें, नेणें, वाजविणें, इ० स्थळीं त्याणें हुळ वाजणें.

हृत्, न० सं० हृदय; याचे स० हृत्कमल, हृद्रोग, इ०; २, ३लिं० जा अर्थाचें जो हरण करतो तो तद्धृत्; दुःखहृत्, प्राणहृत्, पापहृत्, जलहृत्, इ० स० प्र०.

हृत, ३लिं० सं० हरून घेतला जो कोणेक अर्थ तो.

हृदय, न० सं० वक्षःस्थल; २, अंतःकरण; ३, कोणेकाचे मनांतील किं० भाषणादिकांतील जो आशय तें.

हृदयंगम, ३लिं० सं० हृद्य.

हृद्गत, ३लिं० हृदयस्थ जो कोणेक अर्थ तो; २, न० हृदयांतील जो अभिप्राय तें.

हृद्य, ३लिं० अंतःकरणास प्रीति उत्पन्न करावयाजोगा जो कोणेक अर्थ तो.

हृद्रोग, पु० कोणेक गोष्टीविषयीं निरंतर जी अंतःकरणास काळजी लागली असल्येती.

हृष्ट, ३लिं० सं० हर्षित जो तो; याचे स० हृष्टरोमा, हृष्टमानस, इ०.

हे, अ० संबोधनाचें द्योतक हें अव्यय आहे संबोध्यपदाचेमागें याचा योग होतो; उ० हे राजा तुझें कल्याण असो.

हेंकट, ३लिं० दुसऱ्यानें बरी गोष्ट सांगितली तथापि ती न ऐकतां आपलेंच हें क्यानें वर्तण्याचा स्वभाव ज्याचा तो.

हेंकड, हेकड, ३लिं० हेंकट.

हेंका, हेका, पु० कोणेक गोष्टीविषयीं प्रबळ जी इच्छा किं० कोणेक तऱ्हेची समजूत होत्ये तीचा भार अंतःकरणावर पडल्यामुळें तदनुरोधें करून तिकडे अंतःकरणाचा वळला असतो जो झोंक तो तद्विषयीं अनेक दोष दिसत असले किं० असें करूं नये, हें ठीक नव्हे, असें लोक सांगत असले तरी आवरला जात नाहीं; उ० पाऊस जबळ आला जाईन तर जलमार्गानेंच जाईन

ह्मणतोस पण असा हेंका कामाचा नाहीं तूं आपला पायवाटेनें जा; त्याला किती सांगितलें तरीं त्याची समजूत पडायाची नाहीं आपला हेंका घेऊन भांडत बसेल.

**हेंकेखोर, हेकेखोर**, ३लिं० हेंकट.

**हेंगडा**, ३लिं० हेंगाडा.

**हेंगडावणें**, कोणेकाचें करणें, बोलणें, इ० क्रियांस कोणेकानें अनेक प्रकारें खोड्या ठेवून त्यास हेंगाडासा ठरविणें.

**हेंगडूमेंगडू**, ३लिं० कों० कोणेकाचें अस्पष्ट हेंगाडें हेंगाडेंसें जें भाषण, लेख, इ० तो.

**हेंगाडा**, ३लिं० लिहिणें, बोलणें, नासणें, उचलणें, टाकणें, इ० यच्चयावत् कर्माविषयीं जी युक्ति असावी ती ज्याचे अंगीं नाहीं, दुसरा सांगत शिकवीत असतां ही ती मनांत घेऊं नये, आणि हस्तपादावयव तदनुरूप वळूं नये, अतएव कर्ममात्राच्यागायीं ज्याचा अज्ञाणीपणा दिसण्यांत येतो अशा स्वभावाचा जो तो किं० त्याचें तदनुसार करणें, बोलणें, इ० कर्म तो; २, आपल्यापेक्षां ज्याचा रीति, भाषा, इ० अगदीं वेगळ्या अतएव आपल्या संप्रदायास मिळत नाहीं असे जे देशांतरस्थ लोक त्यांस आणि त्यांची भाषा, रीति, इ० त्यांस ह्म०

**हेट**, अ० खालच्या प्रदेशीं; गलबताचे व्यवहारीं जे कोळी इ० लोक त्यांत विशेषें करून प्र०; उ० गलबत हेट जातें आहे; ओझें पाशें असेल तें हेट ठेवा आणि वरती माणसें बसवा; २, प्रा० सावित्री नदीस अवधि करून जो तीचे दक्षिणेकडील देश तिकडे; उ० यंदा हेटप्रांत चांगला पिकला.

**हेटकरी**, ३लिं० हेटप्रांतीं राहाणारे जे मनुष्य ते प्र०; २, पु० हेटप्रांतींचा प्रा० धरकंदाज जो शिपाई तद्विषयीं देशांत विशेषें करून प्रसिद्धि.

**हेंटाळणी**, स्त्री० हेलना.

**हेंटाळणें**, कोणेकास किं० कोणेकाचे भाषणादिकांस हेंटाळणीनें युक्त करणें.

**हेड**, स्त्री० वणजारी इ० लोक विकाया करितां नेतात किं० आणितात जो गोमहिष्यादिपशूंचा समुदाय ती.

**हेडंबा**, स्त्री० हिडिंबा ह्मणून पुराण प्रसिद्ध एक राक्षसी होती तिला आणि तिचे आरोपानें विरूप दिसायाजोगी शरीरानें फार मोठी जी स्त्री तिला ह्म०.

**हेडली**, स्त्री० कों० बोडकी बायको मरून पिशाच झाली असल्ये ती.

**हेडसरी**, स्त्री० एक वृक्ष आहे.

**हेडसावणें**, हिडसणें.

**हेड्या**, पु० हेडीचा व्यापार करणारा जो मनुष्य तो; २, ला० कोणेकास काहींएक वस्तूची गरज लागली असतां ती वस्तु अमुक ठिकाणी आहे अमुक उपायानें हस्तगत होईल असें जाणत असतो असा जो पुरा माहितगार त्यास ह्म०

**हेत**, पु० कोणेक गोष्टीविषयीं कोणेकाचें

अंतः

अंतःकरणांत उत्पन्न होऊन राहिलेला असतो जो इच्छा तो; उ॰ आपल्या डोळ्यां देखत मुलाचें लग्न व्हावें एवढामात्र हेत राहिला आहे.

**हेतु**, पु॰ सं॰ कार्यमात्राचें जें समवायिकारण, असमवायिकारण, निमित्तकारण, आणि उद्देश तें प्र॰; २, हेत.

**हेतुक**, ३ लिं॰ सं॰ जो ज्याचा हेतु तो तद्धेतुक; ज्ञान आहे हेतु ज्याचा तें ज्ञानहेतुक. अध्ययन, तंतुहेतुक, पटजलहेतुक, पुत्रहेतुक, इ॰ समासींप्र॰.

**हेतुगर्भ**, ३ लिं॰ सं॰ ज्या कार्यावर कोणेक अर्थाचा कर्तृत्वादि अन्वयविवक्षित असतो त्याचा जो हेतुभूत अर्थ त्याचा ज्याचे पोटीं संग्रह झाला असतो असें जें विशेषणविशेष्यादिपद तो; उ॰ अरे दांडेवाल्या तो अंबा पाड या वाक्यांत दांडेवाल्या हें पद हेतुगर्भ आहे.

**हेतुमान्**, ३ लिं॰ सं॰ हेतु आहे ज्यास असें जें कार्य तो.

**हेतुहेतुमद्भाव**, पु॰ सं॰ हेतु आणि हेतुमान् यांचा परस्पर जो संबंध तो.

**हेद**, स्त्री॰ एक झाड आहे.

**हेंदर**, स्त्री॰ न॰ पु॰ विष्ठा, केरकचरा, इ॰ रूप जी कोणएक स्थळीं पडलेली घाण ती, तें, तो.

**हेंदरा**, ३ लिं॰ अमंगळ जो ती; २, रा॰ ज्याचे अंगीं आटोप, ठाकठीकपणा, इ॰ नाहीं असा जो मनुष्य किं॰ त्याचें भाषण, आचरण, इ॰ तो.

**हेदी**, ३ लिं॰ हेद संबंधी जो फळी, खुरशी, इ॰ पदार्थ तो.

**हेदु**, पु॰ हेद.

**हेपसलिंगा, हेपुसलुंगा**, पु॰ पादरफुसका.

**हेबाळणी**, स्त्री॰ पोर इ॰ कास इकडून तिकडे नेलें, तिकडून इकडे आणलें, उचललें, ठेवलें, इ॰ झालें असतां त्याचे शरीरीं चोळटा चोळट, ओढाताण, होती ती.

**हेबाळणें**, हेबाळणीनें युक्त करणें.

**हेम**, न॰ सं॰ सुवर्ण म्हणून जो धातु तें.

**हेमगर्भ**, पु॰ ज्यांत सोनें पडत असतें असें एक रसायन आहे.

**हेमटी**, स्त्री॰ कों॰ हुंडकी.

**हेमंत**, पु॰ सं॰ मार्गशीर्ष, पौष, हे दोन मास मिळून जो काळ तो किं॰ वृश्चिक, धन, या दोहों राशींस सूर्य असतां जो काळ तो.

**हेमंतऋतु**, पु॰ हेमंत संज्ञक जो काळ तो.

**हेमलंबी**, पु॰ साठां संवत्सरांतील एकतिसावा संवत्सर तो.

**हेमाडपंती**, ३ लिं॰ पूर्वी हेमाडपंत म्हणून एक गृहस्थ होता त्याणें प्रसिद्ध केली जी शिशाचलीपि, देवालय, इ॰ तो.

**हेय**, ३ लिं॰ सं॰ त्याज्य.

**हेर**, पु॰ कोणेक गोष्टीचें वर्तमान जाणून विवक्षित स्थळीं कळवावें म्हणून त्या कामावर राजादिकानीं नियुक्त असतो जो दूत तो; २,

२, स्त्री० कोणेक पदार्थ हेराया करितां त्यावरून दृष्टीचें जें परिवर्त्तन ती; ३, श्लिं० रा० एर.

**हेरणें**, कोणेक पदार्थ सूक्ष्म दृष्टीनें पाहणें; २, कोणेक पदार्थ कोणेकास पुरतेपणें स्पष्ट दिसणें; ३, टेहेळणें.

**हेरफेर**, पु० स्त्री० कोणेक अर्थाचें कोणेक अर्थाशीं मूल्य, प्रमाण, गुण, इ० कृत जें अंतर असतें तो.

**हेरवाँ**, अ० रा० एरव्हां.

**हेरवीँ**, अ० गं० एरवीं.

**हेरून फेरून**, अ० फारून फेरून.

**हेरें**, न० काहीं कारणास्तव गळवताचें शीड फिरवून जो काहीं वांकडा घेतात घेरा तें.

**हेल्या**, पु० टेहेळ्या.

**हेर्यें**, न० हेरें.

**हेळ**, पु० स्त्री० कोणेकाचें ओझें आपल्या अंगावर घेऊन गांवांतल्या गांवांत किं० दोन चार कोशांवर स्थलांतरीं नेऊन पोंचवण्याचें जें कर्म व तें ओझें व तत्संबंधी जी मजूरी तो ती; २, पु० कोणास पुत्र, कन्या, झाली असतां त्याचे घरीं शूद्रस्त्रिया इ० दहा दिवसांचे आंत आणून घालितात जो जळ, दुग्ध, इ० पदार्थ तो; ३, वाहून नेण्या करितां गाड्यावर रचलेला जो कडबा, गवत, यांचा ढीग तो; ४, आड्या पाड्यांचे ग्येयांत डाबाचे समासीस हा शब्द उच्चारितात; ५, गाणें, रडणें, ओरडणें, संबंधी जो मोठा दीर्घस्वर त्यास सं०; उ० तूं हेळ काढून असा मोठ्यानें रडूं नको.

**हेळकरी**, पु० हेळ वाहून उपजीविका करितो तो; २, कोणास अपत्य झालें असतां हेळ घालणारा जो तो.

**हेळकावणें**, जळ, नौका, इ० कानीं हेळकाव्यानें विशिष्ट होणें.

**हेळकावा**, पु० समुद्र, तटाक, इ० संबंधी उदक, वृक्षाची लांब डहाळी, इ० कांस वाय्वादिकांचे धक्क्यानें किं० हस्तादिकें करून हालविल्यानें बसतो जो झोंका तो आणि त्या योगानें त्यांचा आश्रयें करून स्थित जे नौका मनुष्य इ० त्यांस जो झोंका बसतो तो.

**हेळगा**, पु० कों० रेडा.

**हेळना**, स्त्री० सं० मनुष्यादि कोणेक अर्थाची हा कः पदार्थ, यांत काय आहे, याला कोण विचारतो अशा भावानें जी गणना ती.

**हेळपटणें**, कोणेकास हेळपट्यानें युक्त करणें; २. ला० वादी किं० शत्रु, किं० कोणेकाचें कांम, भाषण, इ० ळटपटलें जाई असें करणें.

**हेळपटनिशी**, स्त्री० कों० तादृश फळ नसतां उगीच हेळपटे रचण्याचा जो व्यापार ती.

**हेळपटा**, पु० क्लेशरूपें करून मानिला जो विवक्षित स्थळपर्यंत चालण्याचा व्यापार तो; २, कोणेक मार्गास ऋजुसूत्रापेक्षां दीर्घता यावयास कारणीभूत जी वक्रता असते तो आणि त्या मार्गानें चालणारा जो त्यास अधिक चालण्यानें श्रम पडतो तो; ३,

३, फिरकांडा मथमार्थी.

**हेलपाटणें**, हेलपटणें.

**हेलपाटा**, पु॰ हेलपटा.

**हेलपाटी**, स्त्री॰ हेल वाहणें, मोलमजूरी करणें, इ॰ रूप जो व्यापार ती.

**हेलपायकी**, स्त्री॰ वा॰ हेलपटनिशी.

**हेलसांड**, स्त्री॰ कोणेकानें काहीं एक कार्यार्थ काहीं एक गोष्ट सांगितली असतां ऐकलें न ऐकलेंसें करून तद्विषयीं करितात जी अनास्था बुद्धि ती.

**हेला**, पु॰ दे॰ हेलगा.

**हेवा**, पु॰ दे॰ स्पर्धा; २, संगसंगा; ३, कों॰ द्रव्यादिविषयक कोणेकास असतो जो सोस तो.

**हैंस**, स्त्री॰ कों॰ वायु, धका, इ॰ कारणानीं समुद्रसंबंधी किं॰ नद्या, कुंभ, इ॰ संबंधी जलतैलादि पदार्थांचा उसळून वरता येतो जो अंश ती.

**हैंसणें**, कों॰ हिंसणें.

**हैंसळणें**, कों॰ हिसळणें.

**हेळणें**, रा॰ कोणेकास हेळणेनें विशिष्ट करणें.

**हेळणा**, स्त्री॰ हेलना शब्दाचा अपभ्रंश.

**हैक**, अ॰ गोमहिष्यादि पशूंस मार्गादिकांच्या ठायीं हाकण्याचे प्रसंगीं याचा प्रयोग करितात.

**हैकोल**, पु॰ स्त्रियांचे कंठांतील एक भूषण आहे.

**हैगई, हैगय, हैगयी**, स्त्री॰ हयगई.

**हैम**, ३ लिं॰ सं॰ हेमसंबंधी जो अलंकारादि तो.

**हैता**, ३ लिं॰ रा॰ हयता.

**हैराण**, ३ लिं॰ दुखणें, बहाणें, श्रम, इ॰ योगानें ज्याचे अंगीं ईषत्‌ही सामर्थ्य राहिलें नाहीं अतएव थकला, व्याकुळ झाला, जो तो.

**हैराणगत**, स्त्री॰ हैराण व्हावयाजोगी जी अवस्था होत्ये ती.

**हैवा**, पु॰ ब्राह्मणांत एक जाति आहे.

**हैवान**, ३ लिं॰ कों॰ हयवान.

**हो**, अ॰ होय; २, कोणेक प्रवृत्तिविषयीं कोणेकाचे अंगीं आरब्ध असतो जो वेग तो आटोपून स्तब्ध रहा अशी जी त्या दुसऱ्यास करावयाची प्रेरणा तीचें वाचक हें अव्यय; ३, अहो; ४, कोणेकास काहीं एक गोष्ट हटकून सांगायाची असतां त्या वाक्यापुढें किं॰ त्यांतील क्रियापदापुढें याचा योग होतो; उ॰ मुला केला आहे स जेव हो; काम सांगितलें आतें कर हो विसरशील.

**होईक**, न॰ ग्रं॰ होष्यमाण.

**होऊन**, अ॰ इतराचे प्रेरणेवांचून आपले अण; तत्तदर्थवाचक शब्दापुढें याचा प्र॰; तो होऊन जर मुलगी यायास आला तरीन मी होऊन काहीं मागणार नाहीं.

**होका**, पु॰ प्राच्यादि दिक्‌साधनाचे उपयोगी चुंबकाचें एक यंत्र आहे.

**होकार**, पु॰ काहीं एक गोष्ट करण्याविषयीं कोणेकास कोणेक देतो जो रुकार तो.

**होकारणें**, कोणेकास बोलावणें.

**होगडणें**, रा० संपत्ति,द्रव्य,वतन,प्रतिष्ठा, इ० जें काहीं आपले पदरीं असतें किं० जें मिळेल अशी संभावना असल्ये तें अव्यवस्थित पणें वर्त्तन इ०द्वारा आपले हातून जाई असें करणें.

**होगा**, १लिं० रा० अंगीं तादृश आवरशक्ति नाहीं मंद,आळशी, असा जो मनुष्य तो;२, कों० दांडगा जो मनुष्य त्यास म्ह०.

**होगाडणें**, कों० कोणेकास अधिकारादिका वरून घालविणें;२,रा० द्वारवणें.

**होट,हौंट**, पु० ओंठ.

**हौंटाळी,होटाळी**, स्त्री० ओंगळी.

**होड**, स्त्री० पैज.

**होडकी**, स्त्री० **होडकें**, न० लहान जी होडी ती; २,प्रसंगीं लघुत्व मानून होडी,मचवा,यांस ही म्ह०.

**होडंगणें**, रा० होडंगा किं० तत्सदृश लांबट पदार्थ तो एके शेवटास धरून दूर कोणेकावर फेंकणें.

**होडंगा**, पु० रा० होलपटा.

**होडगें**, न० होडकी.

**हौंडा**, पु० खळगा;२,१लिं० हुंडा तृतीयार्थी.

**होडी**, स्त्री० मोठें एक लांकूड खोदून त्याचें जें जलयान करित असतात ती.

**होणें**, कोणेक अर्थ उत्पत्तीस पावणें;उ० तुझे बायकोस पुत्र झाला;२, विवक्षित रूपें करून जी सिद्धि तद्विशिष्ट्यातें कोणेक अर्थ पावणें;उ० आंबा पक्क झाला,तूं म्हर्षी होशील;३, व्ययादिद्वारा कोणेक अर्थानें संपणें;उ० मज पाशीं रुपये होते तितके झाले आतां कोठून देऊं..

**होतकर,होतकरू**, १लिं० विद्वत्ता,पुष्टी,इ० जे गुण ते थोडथोडे कोणेकाचे अंगीं प्रकट होऊं लागल्यामुळें ह्या त्या त्या गुणानीं उत्तरोत्तर वाढत वाढत विवक्षित योग्यतेस पावेल असें वाटाया जोगा मनुष्य,पशु, वृक्ष, इ० तो.

**होतव्य**, न० भवितव्य या अर्थीं कोणी म्ह०.

**होतीवस्त**, स्त्री० दे० मिळतीवस्त.

**होत्सातां**, अ० कोणेक अर्थ विवक्षित गुणादिरूप जो विशेषणार्थ तद्विशिष्ट असतां, उ० विक्रम राजा राज्य करित होत्सातां कोणीही दरिद्री नव्हता.

**होन**, पु० सुमारें चार रुपयांचे किमतीचें सोन्याचें एक नाणें आहे, त्याचे धारवडी,एकेरी,इ० अवांतर भेद अनेक आहेत.

**होबासा**, पु० होय तूं म्हणतोस हें तुझें काम मी करीन असा कोणी कोणेकास देतात जो भरंवशाचा शब्द तो.

**होम**, पु० हवन; होम देणें म्ह० हवन करणें.

**होमणें**, हुतकरणें.

**होमशाळा**, स्त्री० अग्निहोत्रादि संबंधी अग्नि ठेवाया करितां केलें असतें जें गृह ती.

**होमहवन**, न० होम इ० जें कर्म तें.

**होय**, अ० कोणेकानें काहीं एक गोष्ट सांगितली

तली असतां तद्विषयींचे मान्यतेचें जें उत्तर किं० कोणेकानें काहींएक गोष्ट विचारली असतां ती गोष्ट ह्मणतोस तशीच आहे ह्मणून सांगावयाचें जें उत्तर त्याचें बोधक हें अव्यय.

**होयकार**, पु० होकार.

**होयबा, होयाबा**, पु० कोणी काहीं गोष्ट सांगितली असतां त्यांतील गुण दोष न पाहातां होयहोय ह्मणण्याच्या स्वभाव आचाता.

**होर**, स्त्री० कों० विवक्षित शेत इ० स्थल होरलें आवयाजोगा पर्जन्यानें धुपून येऊन बसतो जो रवळ मळ इ० ती.

**होरट**, स्त्री० पु० आपणास दुष्कर अतएव इतरांस असंमत जी कोणेक गोष्ट तीविषयीं हें मी करीनच करीन किं० हें असेंच इ० रूप धरिला जो कोणेकानें दुराग्रह ती, तो.

**होरणी**, स्त्री० कों० खर्ची, शेत, इ० होरावयाकरितां तेथें घालितात जी मृत्तिका इ० कांची भरती ती.

**होरणें**, कोणेक स्थळचा रवळगा, विहीर, किं० शरीरावरील क्षत, छिद्र, मृत्तिका, इ० कानीं भरे असें करणें; २, अलंकार, केश, इ० कानीं शरीर किं० तदवयव इ० व्याप्त करणें.

**होरपळणें, होरपाळणें**, हुरपळणें.

**होरा**, स्त्री० मेषादिलग्नावरून किं० रवियारादि वारांवरून साधावयाचे असे प्रतिदिवशींचे चोवीस मुहूर्त ज्योतिःशास्त्रोक्त आहेत ते प्र०; २, पु० कोणेकास प्रत्यय यावयाजोगी होणारी किं० झालेली कोणी सांगतो जी गोष्ट तो; ३, होणारी किं० परोक्ष जी काहींएक गोष्ट तद्विषयीं ही अशी अशी अमुक अमुक रीतीनें होईल किं० असेल अशी कोणेकाची धांवत्ये जी कल्पना तो.

**होराबारी**, स्त्री० कों० परस्परांचें जें स्वस्वपक्ष स्थापनाविषयीं दुराग्रहाचें भांडण ती.

**होरी**, स्त्री० प्रा० वसंतोत्सवसंबंधी वर्णन ज्यांत असतें असा गानामध्यें हिंदुस्थानीं भाषेंत एक कवितावीशेष आहे जो प्रा० शिमग्याचे उत्साहांत गातात.

**होलगड**, न० होला ह्मणून जो पक्षी तें.

**होलपटणें**, रा० फलपाडणें इत्याद्यर्थ वृक्षादिकांवर होलपाटा इ० लांब टपदार्थ एके शेवटास धरून फेंकणें किं० तद्वारा आम्रफलादि प्रहार विशिष्ट करणें; २, न० होलपाटा.

**होलपटा**, पु० रा० होलपाटा.

**होलपाटणें**, होलपटणें; २, रा० हेलपटणें द्वितीयार्थी.

**होलपाटा**, पु० वृक्षावरील फलादि पाडणें इत्याद्यर्थ वरश्रुगागयाकरितां घेतात जो हात दोन हात लांब लांकडाचा तुकडा तो.

**होला**, पु० एक पक्षी आहे.

**होलार**, पु० अंत्यज जातीय जे वाजंत्री ते प्र०, ज्यांचा बरोबर प्रा० डफडें वाजत असतें.

**होलिका**, स्त्री० सं० हुताशनी.

**होष**, पु० काहींएक कर्तव्य गोष्टीविषयीं जो कोणेकास उत्साहविशेष असतो तो;२,कोणेकप्रसंगीं कोणेक कर्म करण्याविषयीं बुद्धीच्या ठायीं असतें जें अवसान तो,परंतु संकटप्रसंगीं प्र०;उ० गांवावर पेंढारी आले असें ऐकतांच माझा होष गेला काहीं सुचेनासें झालें.

**होष्य**, न० होतव्य.

**होष्यमाण**, न० होतव्य.

**होहो रवरेंच**, अ० कोणेक गोष्टीची अकस्मात् होत्येजी स्मृति तीच्या उद्गार आहे; उ० होहो खरेंच आज मला तिकडे जायचें आहे नव्हे.

**होळकर**, पु० शिमग्याचे महिन्यांतील होळीच्चे जे खेळ्ये ते प्र०.

**होळणें**, कों० ओहोळणें;२,रा० धुणें या अर्थी.

**होळपणें**, कों० हुरपळणें

**होळी**, स्त्री० फाल्गुनी पौर्णिमेच्चे दिवशीं घर देवतेचें आवाहन करून पूजा करावी, आगलावावी,ह्मणून जो तृणकाष्टादिकांच्या रचित राशि करितात ती;२,माघशुद्ध पौर्णिमेस किं० फाल्गुन शुद्ध प्रतिपदेपासून किं० पंचमीपासून पौर्णिमेपर्यंत प्रतिदिवशीं देशाचारानुरूप मुलें तसेच तृणकाष्टादिकांचे ढीग करून आळतात त्यास प्र०स०;३,कों० होळीचेमध्यें पोफळ,केळ,इ०कांचें जें झाड लावितात त्यास स०;४, फाल्गुनी पौर्णिमेस स०; ग्रामादिकांची होळी करणें इ०स्थळीं तें तें जाळणें असा अर्थ; आंगाची होळी होणें स० कोधज्वरादिकें करून अतिशयित तसता होणें.

**हौद**, पु० उदकादिपदार्थ सांठवून ठेवायाकरितां दगड,विटा,चुना, इ०कांचें चतुष्कोणाद्याकारक जें पात्र करितात तो;२, पाणी तापवायाकरितां क्रिं० ठेवायाकरितां जें तदाकार धातुमय पात्र करितात त्यास स०.

**हौदा**, पु० हत्तीचे पाठीवर ठेवून आंत बसावयाकरितां हौदासारिख्यें आकारविशेषाचें काष्टादिकांचें आसन करितात आवर छाया नसत्ये तो;२,ला० तालिमखान्यांत कुस्ती खेळणें इत्याद्यर्थ हौदासारिखी खळी करितात तीस स०.

**हौर**, पु०रा० नदीस जो पूर येतो तो.

**हौशा**, ३लिं० पाहिजे तशी ख्याली खुशाली किं० वस्त्र प्रावरण अथवा गाणें बजावणें, इ०कानीं आपल्ये मनाची हौस पुरविण्याचा स्वभाव ज्याचा तो.

**हौशी**, ३लिं० हौशा.

**हौशणें**, रा० कोणेक विषयीं जी हौस तीणें करून विशिष्ट होणें.

**हौस**, स्त्री० कोणेक गोष्टीविषयीं यामध्यें काहीं चमत्कार आहे अशी भावना असल्यामुळें

सत्यामुळें हें पाहावें, हें करावें, हें घ्यावें, हें भोगावें, इ॰ वाटावा जोगा जो अंतःकरणांत उत्साहविशेष असतो ती.

**हौसणें**, क्रों॰ हौशीनें युक्त होणें.

**हौसदार**, ३लिं॰ हौशा.

**हौसी**, ३लिं॰ हौशी.

**हौळा**, पु॰ हुळा.

**ह्रद**, पु॰ सं॰ डोह प्रथमार्थी.

**ह्रस्व**, ३लिं॰ सं॰ विवक्षित प्रमाणापेक्षां लांबी किं॰ उंची जाची कमी तो; २, जांचा उच्चारणास एकमात्रात्मक काळ लागतो असे जे अ, इ, उ, ऋ, ऌ, हे स्वर ते प्र॰.

**ह्रस्वमूर्ति**. ३लिं॰ ठेंगणा जो मनुष्यादि त्यास म्ह॰.

**ह्रास**, पु॰सं॰ काहीं एक गोष्ट किं॰ पदार्थ यांचा जो उत्तरोत्तर कमीपणा तो.

**ह्रावा**, पाहिजे या अर्थी हें क्रियापद. परंतु जो अपेक्षाविषय अर्थ असतो त्यांचा लिंगानुरोधें करून याला लिंगकार्य होतें.

---

## क्ष

**क्षण**, पु॰सं॰ मुहूर्तात्मक काळाचा बारावा जो अंश तो; २, केवळ सूक्ष्म जो काळविभाग तो.

**क्षणभंगुर**, ३लिं॰सं॰ याक्षणीं आहे पण अस्साच उत्तरक्षणीं असेल असा जाविषयीं विश्वास ठेवितां येत नाहीं असा जो संपत्ति, आयुष्य, देह, इ॰ नाशवंत पदार्थ तो.

**क्षणक्षणीं, क्षणक्षणीं**, अ॰ प्रतिक्षणीं.

**क्षणिक**, ३लिं॰ सं॰ क्षणभरमात्र जाची स्थिति असे जें सुख, दुःख, ज्ञान, मति, इ॰ तो.

**क्षणोक्षणीं**, अ॰ क्षणक्षणीं.

**क्षत**, न॰सं॰ व्रण; २, ३लिं॰ शस्त्रादि लागल्यामुळें व्रणविशिष्ट झाला जो तो.

**क्षति**, स्त्री॰ सं॰ द्रव्यनाशादि झाल्यामुळें कोणेकाची होत्ये जी हानि तो; २, आपणास कोणी काहीं वाईट बोललें किं॰ अस्पृश्याचा स्पर्श, अभक्ष्याचें भक्षण, इ॰ आपल्याहातून घडलें किं॰ द्रव्यादिकांचा नाश, अपहार, इ॰ झालें इ॰ काहीं वाईट झालें असतां चित्तास वाईट वाटावें असा जो अंतःकरणांत विकारविशेष होतो ती; प्रा॰ निषेधविषयीं प्र॰

**क्षत्र**, न॰ सं॰ क्षत्रिय म्हणून जी जाति तें.

**क्षत्रिय**, पु॰ सं॰ ब्राह्मणादि चारवर्णांतील दुसरा जो वर्ण तो.

**क्षत्री**, पु॰ क्षत्रियशब्दाचा अपभ्रंश.

**क्षम**, ३लिं॰ सं॰ विवक्षित कार्य करण्याविषयीं शक्त जो कर्त्रादि तो किं॰ शक्य जें कार्य तो.

**क्षमा**, स्त्री॰ सं॰ कोणेकापासून आपलें अपराधादि अप्रिय झालें असतां तेणेंकरून होत असतो जो चित्तास क्षोभ तो न होऊं देतां त्या अप्रियाचें करितात जें सहन ती; कोणेकाचा अपराध क्षमा करणें; म्ह॰

क्षमा

क्षमाविषयकरणें; २, सहिष्णुता; ३, पृथ्वी.

**क्षमापन**, न०सं० अपराधादिकें करून क्षुब्ध झालेला जो कोणी त्यास गोडभाषण, आर्जव, इ०कें करून क्षमाविशिष्ट करण्याचा जो व्यापार तें.

**क्षमी**, ३लिं० क्षमाशील.

**क्षय**, पु०सं० मरणें, जळणें, इ० कारणानें कोणेक अर्थाचा सर्वस्वीं किं० अंशतः होतो जो नाहींसेपणा तो; धातुक्षय, पापक्षय, पुण्यक्षय, कुलक्षय, इ०स०; २, सूर्योदयानंतर प्रवृत्त जे तिथि, नक्षत्र, योग, त्यांणीं दुसऱ्या सूर्योदयाचेपूर्वींच संपावें असा जो त्यांचा होतो ह्रास तो; ३, क्षयरोग; ४, साठां संवत्सरांतील शेवटला जो संवत्सर तो.

**क्षयगामी**, ३लिं०सं० उत्तरोत्तर ज्याचा ह्रास होत चालला आहे असा जो तिथि, नक्षत्र, आयुष्य, संपत्ति, इ० तो.

**क्षयतिथि**, स्त्री०सं० जा तिथीस जो कोणी मरण पावला असतो तीजी प्रतिमासींची किं० प्रतिवर्षींची तिथि ती त्याची.

**क्षयदिवस**, पु० जा दिवशीं जो मेला तो त्याचा; २, क्षयतिथि.

**क्षयमास**, पु०सं० जामध्यें दोन संक्रांति होतात असा जो अमावास्यांत मास कदाचित् येतो तो.

**क्षयरोग**, पु० ज्याचे योगानें शरीरांतील सर्वधातु उत्तरोत्तर क्षीण होत जातात असा एक रोग आहे.

**क्षयरोगी**, ३लिं० क्षयरूपरोग ज्यास झाला आहे तो.

**क्षयिष्णु**, ३लिं० ज्याचा क्षय अवश्य व्हावयाचा अशा स्वभावाचा जो आयुष्य, संपत्ति, इ० कोणेक अर्थ तो.

**क्षयी**, ३लिं०सं० क्षयरोगी.

**क्षर**, ३लिं०सं० अवयवशः क्षरून क्षरून नाहींसा व्हावा अशा स्वभावाचा जो कोणेक अर्थ तो.

**क्षरण**, न०सं० अवयविभूत पदार्थानें अवयविस्वरूपापासून अवयवशः गळून जाण्याचा जो व्यापार तें.

**क्षरणें**, क्षरणविशिष्ट होणें.

**क्षांत**, ३लिं०सं० ज्याविषयीं क्षमा केली असें जें अपराधादि तो.

**क्षांति**, स्त्री०सं० क्षमा.

**क्षात्र**, ३लिं० क्षत्रियसंबंधी जें कर्म, वेश, रीति, इ० तो; क्षात्रकर्म, क्षात्रधर्म, क्षात्रतेज, इ०स०.

**क्षार**, पु० मीठ, समुद्रोदक, यांचे रसासारिखा साहा रसांतील एक रस आहे; २, तादृश रसविशिष्ट जे सैंधव, पादेलोण, पापडखार, टांकणखार, इ० किं० केळीचें सोप, आघाडा, हळदीचें पान, इ० कांचीं राख इ० पदार्थ ते प्र०; ३, ३लिं० तादृश क्षार रसविशिष्ट जो समुद्रोदक, मीठ, इ० किं० भोज्यपदार्थ इ० तो; क्षारोदक, क्षारसमुद्र, इ०

इ० स०

**क्षालणें**, प्रक्षाळणें.

**क्षालन**, न० प्रक्षालन.

**क्षालित**, ३लिं० प्रक्षालित.

**क्षाळण**, न० क्षालन शब्दाचा अपभ्रंश.

**क्षाळणें**, क्षालणें.

**क्षिणणें**, कोणेकानें क्षीण होणें.

**क्षिति**, स्त्री० सं० पृथ्वी; क्षितिप, क्षितिपाल, क्षितीश, क्षितिज, इ० स०.

**क्षिती**, स्त्री० क्षतिहितीयार्थी.

**क्षिप्त**, ३लिं० सं० प्रक्षिप्त; २, शिव्या, गाळी, इ० दुःशब्दानीं निर्भर्त्सिला जो तो.

**क्षिप्र**, अ० सं० लौकर; क्षिप्रकारी, क्षिप्रभोजी, इ० स०.

**क्षिप्रा**, स्त्री० खिरीस स्र०

**क्षिरापत**, स्त्री० खिरापत.

**क्षीण**, ३लिं० क्षय होऊन नाहींसा झाला जो तो किं० अंशतः क्षय झाल्यामुळें अल्प शेष राहिला जो तो; २, कृश.

**क्षीत**, स्त्री० क्षतिशब्दाचा अपभ्रंश, परंतु याचा प्रयोग द्वितीयार्थी; २, रखातर प्रथमार्थी.

**क्षीब**, ३लिं० सं० मद्यपानादिकें करून झाला जो उन्मत्त तो.

**क्षीर**, न० सं० दुग्ध; क्षीरसमुद्र, क्षीरसागर, इ० स०; २, उदक; ३, अर्क, वड, इ० वृक्षांचा पांढरा निघतो जो चीक तें; ४, स्त्री० खिरीस स्र०.

**क्षीरोदक**, न० रेशिमाचें स्त्रियांस नेसावयाचें उपयोगी एक उंचें वस्त्र आहे जें प्रा० ग्रंथीं प्रसिद्ध.

**क्षुण्ण**, ३लिं० सं० पायांनीं तुडविणें, पाषाणादिकें करून ठेंचणें, इ० द्वारा चुरडला जो कोणेक पदार्थ तो.

**क्षुत्**, स्त्री० सं० शिंक; २. क्षुधा.

**क्षुत**, न० सं० शिंक.

**क्षुद्बोध**, पु० सं० क्षुधेची जी प्रदीप्तता तो.

**क्षुद्र**, ३लिं० आकारानें किं० योग्यतेनें लहान जो पदार्थ, मनुष्य, इ० तो; क्षुद्रमत्स्य, क्षुद्रप्राणी, क्षुद्रग्राम, इ० स०; उ० केरकाढणें, जोडापुसणें, हीं क्षुद्रकर्में तुह्मासारिख्यानीं आतीनें करूं नयेत; २, न० क्षुद्रक.

**क्षुद्रक**, न० ज्याचें उद्घाटन झालें असतां लज्जा प्राप्त व्हावी हीनत्व यावें असें जें कोणेकाचे अंगीं दोष असतात तें प्र०.

**क्षुद्रघंटिका**, स्त्री० रुपें, सोनें, कांसें, इ० धातूंचे भूषणादिकांस लावावयाकरितां यांजायाजोगे हरभरा, करवंद, इ० प्रमाणाचे मण्याचे आकाराचे पोकळ जे पदार्थ विशेष करितात ते प्र०.

**क्षुधा**, स्त्री० सं० भूक; याचे स० क्षुधातुर, क्षुधार्त्त, क्षुधाक्रांत, इ०.

**क्षुधित**, ३लिं० सं० क्षुधा ज्यास लागली आहे तो.

**क्षुब्ध**, ३लिं० सं० क्षोभ पावला जो तो.

**क्षुर**, पु० सं० वस्त्रा मुख्यार्थी.

**क्षुल्लक**, ३ लिं॰ योग्यतेनें केवळ हलका जो मनुष्य, कर्म, व्यापार, गोष्ट, इ॰ तो; २, न॰ क्षुद्रक.

**क्षेत्र**, न॰ विवक्षित लांबी रुंदीनें विशिष्ट जो शेत, गृह, इ॰ उपयोगी भूतलविभाग तें; २, लांबी रुंदी, किं॰ लांबी रुंदी आणि उंची या प्रमाणानीं विशिष्ट जो भूमि, पाषाण, काष्ठ, इमारत, इ॰ अर्थ तें; ३, देवता, तीर्थ, यांचे सन्निधानामुळें जेथें पुण्यकर्म केलें असतां विशेष फळ होतें अशीं जीं काशी, अयोध्या, गया, उज्जयिनी, गोकर्ण, वांई पुष्कर, इ॰ स्थलें तीं प्र॰; ४, बाग शाळिग्रामाचा जो समुदाय तें; ५, मनुष्यादिकांचें जें शरीर तें; ६, जीजाची बायको ती त्याचें परंतु बीजारोपद्वारा पुत्रादि संततिरूप फल उत्पन्न होण्याविषयीं स्थलत्वें करून विवक्षा असतां प्र॰.

**क्षेत्रज**, पु॰ परवीर्यापासून आपले क्षेत्राचे ठायीं उत्पन्न जो पुरुष तो.

**क्षेत्रपाल, क्षेत्रपाळ**, पु॰ ग्रामादिरूप क्षेत्राचें संरक्षण करणारी एक देवता आहे.

**क्षेत्रफल, क्षेत्रफळ**, न॰ क्षेत्रनिष्ठ जी लांबी रुंदी किं॰ लांबी रुंदी आणि उंची एतद्रूप जें प्रमाण त्याची जी इयत्ता जीचें परिज्ञान लांबीनें रुंदी गुणावी इ॰ ज्योतिःशास्त्रोक्त रीति तीहीं करून होतें तें; २, ला॰ कोणेक व्यापारापासून येतें जें फळ तें, परंतु त्याची इतर व्यापारफलाशीं समता किं॰ असमता यांचा विचार कर्तव्य असतां प्र॰; उ॰ पांच पुतळ्या दिल्या काय आणि पंचवीस रुपये दिल्हे काय क्षेत्रफळ एकच.

**क्षेत्रसन्यास**, पु॰ काश्यादि कोणेक पुण्यक्षेत्रीं राहून हें क्षेत्र सोडून मरणपर्यंत कोठें जायाचें नाहीं असा जो कोणी नियम धरितात तो.

**क्षेत्रसंस्कार**, पु॰ संततिरूप फल उत्पन्न होण्याचें क्षेत्र जी स्त्री तिला करितात जो गर्भाधान, पुंसवन, इ॰ संस्कार तो.

**क्षेत्रस्थ**, ३ लिं॰ सं॰ काश्यादि क्षेत्रीं वास करणारा जो तो; प्रा॰ ब्राह्मणाविषयींच प्र॰.

**क्षेत्रज्ञ**, पु॰ सं॰ जीवात्मा.

**क्षेत्री**, पु॰ क्षत्रियशब्दाचा अपभ्रंश.

**क्षेप**, पु॰ सं॰ प्रक्षेप; २, क्षेपक द्वितीयार्थी.

**क्षेपक**, पु॰ कोणेक ग्रंथकाराचे ग्रंथांत इतरानें कोणी घातलें असतें जें श्लोक वाक्यादि तो; २, ग्रहादिकांचें सिद्ध झालेलें जें गणित तें स्पष्ट व्हावें इत्याद्यर्थ त्यांत मिळवावा किं॰ उणा करावा म्हणून सांगितला असतो जो अंकराशि तो; ३, ३ लिं॰ क्षेपण कर्ता जो तो.

**क्षेपण**, न॰ क्षेपण्याचा जो व्यापार तें.

**क्षेपणें**, प्रक्षेपणें.

**क्षेपनिक्षेप**, अ॰ कों॰ त्यामारखाय; उ॰ मी आज काहीं येत नाहीं उद्यां क्षेपनिक्षेप येईन.

**क्षेप्ता**, ३ लिं॰ क्षेपण कर्ता.

**क्षेम**, न० सं० कल्याण नपुंसकार्थी; आसीं क्षेम आहों इ० स्थळीं क्षेमविशिष्ट आहों असा अर्थ; २, क्षेमालिंगन.

**क्षेमालिंगन**, न० सं० मित्रादिकांसमीतीनें देतान जें आलिंगन तें.

**क्षोणी**, स्त्री० सं० पृथ्वी.

**क्षोभ**, पु० प्रकृत्यवस्थेच्या ठायीं स्थित जो कोणेक अर्थ त्यास कोणेक उपाधिसंबंधानें कांहीं वेग प्राप्त झाल्यामुळें त्याचे त्या अवस्थेचा होतो जो अन्यथाभाव तो; २, क्रोधावेशानें अंतःकरणाचा होतोजो अन्यथाभाव तो.

**क्षोभणें**, कोणकाने क्षोभानें युक्त होणें.

**क्षोभित**, ३ लिं० क्षोभविला जो तो.

**क्षोभ्य**, ३ लिं० क्षोभवायास योग्य जो कोणेक अर्थ तो.

**क्षौद्र**, न० सं० मध.

**क्षौर**, न० सं० वस्त्र्यानें मस्तकादिसंबंधी केश काढण्याचा जो व्यापार तें.

**क्ष्मा**, स्त्री० सं० पृथ्वी.

---

## ज्ञ

**ज्ञ**, पु० बुध; २, ३ लिं० जो जा अर्थातें जाणतो तोतज्ज्ञ; शास्त्रातें जाणतो तो शास्त्रज्ञ, रसज्ञ, व्यवहारज्ञ, किंचिज्ज्ञ, सर्वज्ञ, इ० स० प्र०.

**ज्ञप्ति**, स्त्री० सं० जाणीव.

**ज्ञात**, ३ लिं० सं० जाणला जो पदार्थ व्यवहारादि तो; २, स्त्री० ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, सोनार, शिंपी, इ० किं० गोत्र, हंस, पक्षी, इ० जा जाति त्या प्र०.

**ज्ञातव्य**, ३ लिं० ज्ञेय.

**ज्ञाता**, ३ लिं० कोणेक अर्थातें जाणणारा जो तो; २, पु० मुज्ञ.

**ज्ञाति**, पु० गोत्रज.

**ज्ञान**, न० जाणीव; २, तद्द्वारा कोणेकविषयाचें होतें जें ग्रहण तें; ३, त्या विषयग्रहणाचा जाणिवेच्या ठायीं फलित झाला असतोजो संस्कार तें; ४, चातुर्य; ५, ब्रह्मज्ञान.

**ज्ञानचक्षु**, न० बाह्येंद्रियाचा विषय नव्हे असा जो आत्मस्वरूपादि कोणेक अर्थ तोजाणण्याविषयीं समर्थ जें कोणेकाचें ज्ञान तें; २, ३ लिं० तद्विशिष्ट जो मनुष्यादि तो.

**ज्ञानदृष्टि**, ३ लिं० ज्ञानचक्षु.

**ज्ञानमार्ग**, पु० ईश्वरप्राप्तीचा वेदांतशास्त्रोक्त जो मार्ग तो.

**ज्ञानमार्गी**, ३ लिं० ज्ञानमार्ग ज्याणें अवलंबिला आहे तो.

**ज्ञानवल्ली**, स्त्री० भांगेस म्ह०.

**ज्ञानवायु**, पु० एक वातरोग आहे जो झाला असतां अनेकप्रकारच्या बारीक मोठ्या कल्पना निघतात तो.

**ज्ञानी**, ३ लिं० शास्त्रव्यवहारादिसंबंधीविशिष्ट ज्ञान आहे ज्यास तो; २, पु० ब्रह्मज्ञानी.

**ज्ञानेंद्रिय**, न० कर्ण, नेत्र, घ्राण, रसना, त्वचा,

हीं पांच आणि मन हीं जीं इंद्रियें तीं प्र०

**ज्ञानोपदेश**, पु० आत्मज्ञानविषयक जो कोणेकास उपदेश करितात तो.

**ज्ञापक**, ३ लिं० सं० कोणेक अर्थातें जाणविणारा जो शब्द, लेख, शास्त्र, चिन्ह, इ० तो.

**ज्ञापन**, न० ज्ञापविण्याचा जो व्यापार तें.

ज्ञापविणें,

**ज्ञापविणें**, ३ लिं० जाणविणें.

**ज्ञापित**, ३ लिं० जाणविला जो तो.

**ज्ञाप्य**, ३ लिं० जाणवायाचा जो कोणेक अर्थ तो.

**ज्ञाप्यज्ञापकभाव**, पु० ज्ञाप्य, आणि ज्ञापक यांचा जो परस्पर संबंध तो.

**ज्ञेय**, ३ लिं० जाणायास योग्य जो कोणेक विषय तो.